# श्रीनामदेव गाथा




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

अनुक्रमणिका

प्रकाशन ९ नोव्हेंबर १९७०

पुनर्मुद्रण : १९८२

पुनर्मुद्रण : जून २००८

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवींद्र नाट्य मंदिर इमारत,
दुसरा मजला, सयानी रोड,
प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.



मुद्रक :
व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
चर्नी रोड स्टेशनजवळ,
मुंबई ४०० ००४.

किंमत : रु. ४२०



अनुक्रमणिका

# श्रीनामदेव गाथा
## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

## परिशिष्ट 'अ'



## परिशिष्ट 'ब'



अनुक्रमणिका

## परिशिष्ट 'क'



* * * * *

# निवेदन

'नामदेव गाथा' हे महाराष्ट्राचे उच्च कोटीचे सांस्कृतिक धन आहे. श्री नामदेव महाराजांनी भागवत धर्माची ध्वजा महाराष्ट्रातच नव्हे तर महाराष्ट्राबाहेर उत्तर भारतातही फडकत ठेवली व मराठी संतांचा भक्तिमार्ग, अध्यात्म आणि ईश्वरनिष्ठा यांचा प्रत्यय महाराष्ट्राबाहेरील समाजाला करुन दिला. 'नामदेव गाथा' ही रसाळ व प्रासादिक रचना श्रीनामदेवांच्या भक्तवत्सल वाणीतून प्रगट झाली व गेल्या अनेक पिढ्या महाराष्ट्राने ती शिरोधार्य मानली. श्रीनामदेव महाराजांचे विठ्ठल हे आराध्यदैवत व श्रीज्ञानेश्वर माउली हे जणू परम दैवत ! नामदेव महाराजांनी त्यांची परोपरीनी आपल्या गाथेमध्ये आळवणूक केलेली आहे. अशी ही नामदेव विरचित गाथा महाराष्ट्राला नव्याने उपलब्ध करुन देण्याचे महत्कार्य महाराष्ट्र शासनाने अंगीकारले व गाथेची आवृत्ती अनेक वर्षांपूर्वी प्रसिद्ध केली. त्यानंतर आता त्या गाथेचे पुनर्मुद्रण महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे करण्यात येत आहे. हेतू हा की, श्रीनामदेवांची ही अनुपम रचना पुन्हा एकदा महाराष्ट्राला सुलभपणे उपलब्ध व्हावी.

श्री. किसनमहाराज साखरे हे भागवत धर्माचे निष्ठावंत उपासक आणि श्रीज्ञानेश्वरी, श्रीनामदेव गाथा यांवर अधिकारी वृत्तीने भाष्य करणारे श्रेष्ठ भक्त. श्रीनामदेव गाथेच्या या आवृत्तीला त्यांनी प्रस्तावनापर मजकूर लिहावा, अशी आम्ही त्यांना प्रेमाची विनंती केली. श्री. किसनमहाराज साखरे यांनी ती आपल्या भक्तिमार्गाला अनुसरुन तत्परतेने स्वीकारली आणि सुबोध, निरुपणात्मक प्रस्तावना लिहून दिली, त्याबद्दल त्यांचे मानावे तेवढे आभार थोडेच होतील. श्रीनामदेव गाथेची ही नवी आवृत्ती महाराष्ट्रातील घराघरातून आदरपूर्वक संग्रहित केली जाईल व तिचे वाचन, मनन, चिंतन महाराष्ट्राला भक्तिमार्गाचा पुन:प्रत्यय देईल, असा मला विश्वास वाटतो.

या नामदेव गाथेची सुसंगत अनुक्रमणिका तयार करण्याचे काम महत्त्वाचे होते. मराठीतील ज्येष्ठ कवी प्रा. शंकर वैद्य (मंडळाचे तत्कालीन सदस्य) यांनी हे काम परिश्रमपूर्वक व तत्परतेने पार पाडले. याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

मधु मंगेश कर्णिक,

स्थळ : प्रभादेवी — अध्यक्ष,

दिनांक : २३ एप्रिल २००८. — महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

अनुक्रमणिका



पंढरपूरची श्रीविठ्ठलमूर्ती

अनुक्रमणिका

## नामदेव गाथा समिती

### प्रारंभीची समिती

(शासन निर्णय क्र. आर्.एस्.आय्. २८५९ बी., दिनांक १०-९-१९५९)

प्रा. **शं. वा. दांडेकर**, अध्यक्ष

प्रा. **रा. ना. वेलिंगकर**, सभासद — डॉ. **शं. गो. तुळपुळे**, सभासद

डॉ. **सरोजिनी बाबर**, सभासद — श्री. **म. गो. बारटक्के**, सभासद

प्रा. **ल. ग. जोग**, चिटणीस

नंतरच्या घडामोडी :

(१) डॉ. **भगीरथ मिश्र** (पुणे विद्यापीठ) यांना हिंदी अभंगांचे तज्ञ म्हणून नियुक्त करावे असे समितीने सांगितल्यामुळे तशी नियुक्ती शासनाने केली. हिंदी रचनेपुरता त्यांचा संबंध राहिला. **(शासन निर्णय क्र. आर्. एस्.आय्. २८६१-ऊ, दिनांक २७-९-१९६१)**

(२) १९६९ मध्ये सरकारने प्रथम दोन नवे सभासद नेमले. ते अनुक्रमे : **(शासन निर्णय क्र. आर्.एस्.आय्. २८६९/ऊ/५५३५३, दिनांक ४-८-१९६९)**

श्री. **ग. वि. कविटकर**, सभासद

श्री. **ज. शा. देशपांडे**, सभासद

(३) यांनंतर थोड्याच दिवसांत आणखी दोन नवे सभासद नेमण्यात आले. ते अनुक्रमे : **(शासन निर्णय क्र. आर्.एस्.आय्. २८६९/११२१७/ऊ, दिनांक १०-२-१९७०)**

डॉ. **य. ग. बोधे**, सभासद

श्री. **सं. गो. टिकम**, सभासद

(४) मधील काळात प्राचार्य वेलिंगकर, श्री. बारटक्के व प्राचार्य दांडेकर यांचे दुःखद निधन झाले.

### सध्याची पुनर्रचित समिती

डॉ. **सरोजिनी बाबर**, अध्यक्ष

डॉ. **शं. गो. तुळपुळे**, सभासद — श्री. **ग. वि. कविटकर**, सभासद

श्री. **ज. शा. देशपांडे**, सभासद — डॉ. **य. ग. बोधे**, सभासद

श्री. **सं. गो. टिकम**, सभासद — प्रा. **ल. ग. जोग**, चिटणीस

या पुनर्रचित समितीची पहिली सभा १ जानेवारी १९७० रोजी शिक्षण संचालनालयात पुणे येथे भरली होती. मुख्य समितीच्या आजवर एकूण सभा ७३ झाल्या व उपसमितीच्या तीन सभा झाल्या.

अनुक्रमणिका

# निवेदन

भारतीय जीवनात संतमहात्म्यांनी केलेले कार्य फार मोलाचे आहे. त्यामुळे त्यांचे आपल्या समाज इतिहासातील स्थान अलौकिक असेच आहे. महाराष्ट्र समाज जीवनात तर संत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास या पाच संतकवींचे कार्य अद्वितीय असेच आहे. आज शतकानुशतके ह्या संतांची अमृतवाणी महाराष्ट्रीय मनाला संजीवनी देत आली आहे. हे पाच संत म्हणजे महाराष्ट्र जीवनाचे पंचप्राण होत. ह्यांचे साहित्य हे लोकांसाठी निर्माण झालेले साहित्य होय. महाराष्ट्रात ह्या संतांचे वाङमय आवडीने वाचले जाते. जेथे ह्या संत-पंचकाचा प्रवेश झाला नाही ते महाराष्ट्रीय घरच नव्हे!

संत नामदेव महाराजांच्या कर्तृत्वाचा तर एक आगळाच व देदीप्यमान पैलू आहे. त्या काळात महाराष्ट्राबाहेर जाऊन भागवत धर्माचा प्रचार गुजरात, राजस्थान, मध्यप्रदेश, पंजाब, बिहार इत्यादी प्रांतांत त्यांनी केला. भागवत धर्माची धवल पताका सर्वत्र फडकविली. आजच्या 'आंतर भारती' चे कार्यच जणू तेराव्या शतकात त्यांनी केले असे म्हणता येईल.

अशा लोकनेत्यांच्या साहित्याचा वारसा जपून त्यावर आवश्यक ते संस्करण करणे व तो सर्वसामान्य माणसाला सहजपणे उपलब्ध करून देणे हे लोकानुवर्ती शासनाचे कर्तव्यच ठरते. महाराष्ट्र शासनाने आजवर अशा लोकोत्तर सांस्कृतिक वारशाचे जतन केले आहे व तो सर्वत्रांना उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वरीसारखा अद्वितीय ग्रंथ व तुकोबांची अमरवाणी यापूर्वीच जनतेला सादर केलेली आहे. त्याचप्रमाणे 'श्रीनामदेव गाथा' हा आणखी एक सांस्कृतिक जीवनग्रंथ शासनाच्या वतीने प्रसिद्ध करताना मला अत्यंत आनंद होतो आहे. लवकरच एकनाथ महाराजांचा भागवत ग्रंथही असाच प्रसिद्ध होईल.



अनुक्रमणिका

या ग्रंथाच्या आरंभापासून प्रसिद्धीपर्यंतच्या काळात बऱ्याच घडामोडी झाल्या. ज्ञानेश्वरी मंडळाचे चिटणीस व या समितीचे एक सभासद विद्वद्वर्य रा. ना. वेलिंगकर हे कालवश झाले. पाठोपाठ नामदेव गाथा हे जीवितकार्य मानलेले श्री. म. गो. बारटक्के निधन पावले व सर्वांत म्हणजे वारकरी संप्रदायाचे अध्वर्यु व संत-वाङमय तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक-उपासक प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांचेही निधन झाले. ही तर कधीही भरून न येणारी गोष्ट होती. भाग्य एवढेच की सोनोपंतांच्या मृत्यूपूर्वी ह्या गाथेचे पाठ व अभंगांची निवड पक्की झाली होती. तसेच या ग्रंथातील हिंदी रचना पक्क्या करताना प्रा. भगीरथ मिश्र (पुणे विद्यापीठ) यांचे साह्य मिळवण्यात आले होते.

परंतु झालेल्या कामावर शेवटचा हात फिरविणे, गाथेची पक्की मुद्रित प्रत तयार करणे, फोटो वा अन्य साहित्याची जुळवाजुळव करणे, प्रस्तावना तयार करणे, शब्दकोश व प्रथम चरणानुक्रमणिका तयार करणे ही कामे शिल्लक राहिली होती. हे सर्व काम पूर्ण करण्यासाठी निवर्तलेल्या सदस्यांच्या जागी नवीन सदस्य नेमून समितीची पुनर्रचना करणे शासनास आवश्यक वाटले. त्यावेळी या समितीच्या सुरवातीपासून सभासद असलेल्या डॉ. सरोजिनी बाबर यांची शासनाने अध्यक्ष म्हणून या समितीवर नियुक्ती केली. तसेच श्री. ग. वि. कविटकर, श्री. ज. शा. देशपांडे, डॉ. य. ग. बोधे व श्री. सं. गो. टिकम यांची नवीन सभासद म्हणून नेमणूक करण्यात आली. या नव्या सभासदांची व डॉ. सरोजिनी बाबर (अध्यक्ष), डॉ. शं. गो. तुळपुळे व प्रा. ल. ग. जोग (चिटणीस) या पूर्वीच्या सभासदांची एकत्र अशी पहिली सभा १ जानेवारी १९७० रोजी घेण्यात येऊन नामदेव गाथेच्या कामास परत चालना देण्यात आली. नंतर हे सर्व काम पूर्ण होऊन वैकुंठवासी दांडेकरांच्या पहिल्या वर्षश्राद्ध दिनी म्हणजे ९ जुलै १९७० रोजी समितीकडून गाथेचे हस्तलिखित शासनाला सादर करण्यात आले. सुमारे बाराशे पृष्ठांची ही गाथा आता ९ नोव्हेंबर रोजी प्रसिद्ध होत आहे.

९ नोव्हेंबर १९७० या दिवसाला विशेष महत्त्व आहे. हा नामदेवांच्या सप्तजन्मशताब्दीचा दिवस असून हे पुढील सर्व वर्ष भारतभर ही शताब्दी साजरी होणार आहे. ह्या महत्त्वाच्या समारंभाचा प्रारंभ नामदेव महाराजांच्या महाराष्ट्र शासनाच्यावतीने अधिकृतपणे तयार करण्यात आलेल्या गाथेच्या प्रकाशनाने होत आहे. त्यामुळे महाराष्ट्र शासनाला एक महान सांस्कृतिक ठेवा जनतेला उपलब्ध करून दिल्याच्या कर्तव्यपूर्तीचा आनंद होत आहे.

अनुक्रमणिका

निवेदन

माणसाने हाती घेतलेले कोणतेही काम कितीही कष्ट घेऊन पुरे केले तरी देखील या ना त्या प्रकारची उणीव ही त्या कामात रहातेच रहाते. इतरांच्या दृष्टीने अशा उणीवा हळूहळू पुढे येत जातात. त्यामुळे उशीरा का होईना लक्षात येणारे दोष नाहीसे करून असे काम सर्वांग परिपूर्ण करण्याची खटपट केली जाते. श्रीनामदेव गाथेलाही हा नियम लागू होतो याची कृपया या गाथेच्या अभ्यासकांनी व वाचकांनी नोंद घेणे आवश्यक आहे.

वास्तविक पहाता अशा सुमारे बाराशे पृष्ठांच्या ग्रंथाची किंमत शासन-व्यवहारातून लक्षात घेतली तरीही ती पंचवीस रुपयांपावेतो जाते. परंतु श्रीनामदेव महाराजांची ही गाथा सर्वसामान्य लोकांच्याही हाती जावी ही शासनाची अपेक्षा आहे. म्हणून महाराष्ट्राच्या श्रद्धाळू व भाविक जनतेला, संत-वाङमयाच्या वाचक अभ्यासकांना आणि श्रीनामदेव महाराजांच्या निष्ठावान भक्तांना ती सहजासहजी विकत घेणे शक्य व्हावे या हेतूने या ग्रंथाची किंमत अवघी दहा रुपये ठेवण्यात आलेली आहे.

हे काम बरेच जिकिरीचे, गुंतागुंतीचे, वादग्रस्ततेचे असे होते. ह्या संपादक मंडळाने सर्व प्रकारच्या अडचणींवर मात करून 'श्रीनामदेव गाथेची' अधिकृत प्रत तयार केली ह्याबद्दल नामदेव गाथा समितीच्या अध्यक्ष डॉ. सरोजिनी बाबर व समितीचे सर्व सदस्य ह्यांचे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो व ही गाथा जनताजनार्दनाच्या चरणी अर्पण करतो.

(सही)

मुंबई :
दिनांक नऊ नोव्हेंबर १९७०

शिक्षण मंत्री
महाराष्ट्र राज्य, मुंबई



अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

मराठी सारस्वतास अभंगवृत्ताची मौलिक देणगी देणाऱ्या आणि मराठीतील आद्य आत्मचरित्रकार म्हणून प्रसिद्धी पावलेल्या संतश्रेष्ठ नामदेव महाराजांची एक अधिकृत गाथा प्रकाशित करण्याची योजना महाराष्ट्र शासनाने आखली व ती कार्यान्वित व्हावी म्हणून इ. स. १९५९ च्या डिसेंबरमध्ये नामदेव गाथा समितीची स्थापना केली.

कै. प्राचार्य शं. वा. दांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली हे काम त्यावेळी सुरू झाले. त्यासाठी नामदेवांच्या काव्याची उपलब्ध असलेली बहुतेक सर्व हस्तलिखिते मिळविण्याची योजना आखण्यात आली. त्यामुळे पंढरपूर, नगर, शिरवळ, पुणे, धुळे व तंजावर येथून एक वा अधिक प्रती उपलब्ध होऊ शकल्या. मात्र त्यांपैकी काही प्रतींच्यामधूनच हस्तलिखितांचा लेखनकाल दिलेला आढळून येतो.

पंढरपूर 'ह' प्रत शके १६५७ राक्षस संवत्सर कार्तिक शुद्ध ६ ह्या दिवशी लिहून पुरी केली गेली आहे. धुळे प्रतीतील एका हस्तलिखितात शके १५५३ ते १५५६ अशा कालखंडाचा उल्लेख आलेला आहे. पैकी धुळे प्रतीत एके ठिकाणी 'रामेन लिखितम्' १६९१ कार्तिक शुद्ध सप्तमी विरोधी असा उल्लेख सापडतो. पाटसकर २ मध्ये पौस (पौष) शुद्ध चतुर्थी शके १२५६ असा उल्लेख आलेला आहे. वही क्रमांक १८ मध्ये भाद्रपद कृष्ण १४ शनवार शके १६९७ अशी लेखनतिथी मिळते.

पंढरपूर प्रतीमधील 'श्री' प्रत, य, व, र, न, श, च, स, ष, प, ह, औ व ब या प्रती आणि गंगावने बाड ह्या प्रती जुन्या असून तज्ज्ञांच्या मते या प्रतींसाठी वापरलेला कागद व हस्ताक्षर सुमारे २५० वर्षांपूर्वीचे असावे.

या प्रतींच्या सोयीसाठी म्हणून अभंगांच्या तळटीपेत सर्व पंढरपूर प्रतींसाठी (पं.) असे अक्षर वापरण्यात आले असून धुळे प्रतींसाठी (धु.), शिरवळ प्रतींसाठी (शि.) अशी अक्षरे स्वीकारलेली आहेत.

आजवर उपलब्ध झालेल्या हस्तलिखितांपैकी शिरवळ प्रतीचे लेखन चांगले असून धुळे प्रतींचे लेखन बरेच अशुद्ध आहे. या सर्व प्रतींच्यामधून संत नामदेव, त्यांचे कुटुंबीय आणि जनाबाई यांचे अभंग एकत्रितपणे सापडतात.

अनुक्रमणिका

भाळुंकर, पंढरपूर ए, श्री, ज, प, ब, धुळे ह्या प्रतींमधून निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, तुकाराम, रामदास ह्यांचेही अभंग मिळतात! पंढरपूर 'औ' मध्ये सर्वांत कमी अभंग असून धुळे प्रतीमध्ये अधिक अभंग आढळून येतात. उपलब्ध प्रतींपैकी सात प्रतींमध्ये अमराठी अभंग सापडले असून ते सर्व हिंदी भाषेतील आहेत.

या समितीकडे उपलब्ध झालेल्या सर्व हस्तलिखित पोथ्यांची संख्या तीस असून त्यांची माहिती पुढे म्हणजे या प्रास्ताविकाचे अखेरीस दिलेली आहे. [समितीने हस्तलिखितांची नावे (पंढरपूर अ, श्री इत्यादी) अथवा क्रम (धुळे १, २, ७, १४, इत्यादी) केवळ सोयीसाठी योजले आहेत.]

हस्तलिखित पोथ्यांचेमधून विषयानुक्रमणिका अथवा वर्णानुक्रमणिका आढळून येत नाहीत ही गोष्ट सर्वश्रुत अशी आहे. तथापि ज्ञानदेवांची आदि, तीर्थावळी व समाधीमहिमा ही प्रकरणे या गोष्टीला अपवाद आहेत. सर्व हस्तलिखितांतून ही प्रकरणे ओळीने नाव दिलेली अशी आली आहेत. याचे मुख्य कारण वारकरी मंडळी ही प्रकरणे व त्यातले त्यात ज्ञानदेवांचे नमन रोज म्हणत असतात हे असावे.

जुनी हस्तलिखिते ही बाडाच्या स्वरूपाची असल्याने त्यात एकट्या नामदेवांचे अभंग सापडतात असे नाही. एखादा दुसरा अपवाद या संदर्भात सोडून दिला तर बहुतेक हस्तलिखितांतून इतर संतांचेही अभंग आढळून येतात. ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, तुकाराम, रामदास यांचे सळमिसळ अभंग जसे हस्तलिखितांतून गवसतात; तसेच काही अभंगांतून नाममुद्रा बदलण्याचाही प्रयत्न झालेला दिसून येतो.

या जुन्या हस्तलिखितांची लेखनपद्धती ही सामान्यतः आधुनिक काळातील दिसून येते. काही प्रतींमधून 'कृष्ण' हा शब्द 'ङउष्ण' असा लिहिलेला दिसतो. धुळे प्रतींतील शुद्धलेखन सदोष असले तरी त्याच प्रतींमधील काही पाठ मात्र चांगले असल्याचे आढळून येते. तथापि शिरवळ आणि पंढरपूर प्रतींतील पाठ अधिकांश रीतीने सर्वमान्य झालेले आहेत.

छापील प्रतींप्रमाणेच हस्तलिखितांतही अनेक अभंग दुबार तिबार आलेले आहेत. समितीकडे उपलब्ध झालेल्या प्रतींपैकी एकही प्रत अशी आढळून आली नाही की, जिच्यामध्ये नामदेवांचे संपूर्ण व एकत्रित असे अभंग हाती येतील. त्यामुळे ही वस्तु-स्थिती लक्षात घेऊन प्रत्येक हस्तलिखित प्रतीची अनुक्रमणिका केली असूनही हे काम योग्य झालेच असे म्हणता येत नाही. कारण पुष्कळदा असे होते की, अभंगांच्या पुनरावृत्तीचा दोष सोडला तरीही एकच अभंग वेगवेगळ्या पद्धतीने लिहिला गेला असल्याचे आढळून येते.

अनुक्रमणिका

'ऐसी स्तुती नामयाची' हा अभंग 'ज्ञानदेवासी उद्धव' असाही सापडतो. काही ठिकाणी तर पहिली ओळ ही चवथी ओळ असल्याचे दिसून येते आणि तिसरी ओळ ही पहिली झाली आहे हे लक्षात येते.* त्यामुळे ओळींच्या अनुक्रमणिकेने हा दुबारपणाचा दोष तर टाळता येत नाहीच नाही पण शब्दांतही उलटसुलटपणा झाल्याकारणाने हे काम केवळ अशक्यच होऊन बसते.

शासनाच्यावतीने प्रकाशित होणाऱ्या नामदेवांच्या अभंगांच्या या ग्रंथाचे पूर्वी श्री. आवटे, श्री. जोग महाराज, श्री. तुकाराम तात्या, श्री. गोंधळेकर व श्री. सुबंधु यांनी संपादित केलेल्या पाच प्रती प्रकाशित झालेल्या आहेत. या छापील गाथांचेमधून विषयाची अनुक्रमणिका देऊन अभंग छापलेले आढळतात. इंदिरा प्रेस, चित्रशाळा यांच्या प्रतींतील अनुक्रमणिका जवळजवळ सारख्याच आहेत. शासनाच्यावतीने प्रकाशित होत असलेल्या प्रस्तुत ग्रंथाची विषयानुक्रमणिका मात्र काहीशी वेगळी आहे.

प्रस्तावनेनंतर प्रस्तुत ग्रंथामध्ये नामदेवांचे मराठीतील अभंग दिलेले आहेत. या अभंगांच्या तळटीपेमध्ये त्या त्या ठिकाणच्या विशिष्ट हस्तलिखितांची आद्याक्षरे आढळून येतील. ज्या अभंगांच्या तळटीपेत अशी अक्षरे आढळून येणार नाहीत ते अभंग या समितीकडे उपलब्ध झालेल्या हस्तलिखितांमध्ये मिळालेले नाहीत असे समजावे.

नामदेवांच्या मराठीतील अभंगांनंतर त्यांच्या हिंदीतील अभंगांचा क्रम येतो. त्यापुढे नामदेवांच्या कुटुंबियांचे व त्यांच्या परिवारातील इतरांचे अभंग देण्यात आलेले आहेत (परिशिष्ट 'अ'). तसेच समितीस उपलब्ध झालेली अनेक हस्तलिखिते लक्षात घेता जे अभंग इतरत्र आढळून आलेले नाहीत असे अप्रकाशित राहिलेले अभंग परिशिष्ट 'ब' मध्ये समाविष्ट करण्यात आलेले आहेत. पंढरपूर प्रतींतील एका हस्तलिखितात 'तीर्थावळी' प्रकरण वेगळे सापडले ते परिशिष्ट 'क' मध्ये देण्यात आले आहे. हे प्रकरण श्री. सुबंधु यांनी प्रकाशित केलेल्या प्रतीतही आढळते. त्यानंतर नामदेवांच्या मराठीतील व हिंदीतील अभंगांमधून येणाऱ्या अवघड शब्दांचा अर्थ सुलभतेने लक्षात यावा म्हणून जे शब्दकोश तयार करण्यात आलेले आहेत ते सर्व अभंगांचे-नंतर शेवटी दिलेले आहेत. मराठी व हिंदी अभंगांचे अर्थ सुलभपणे मिळावेत म्हणून हे शब्दकोश मुद्दामच अलग अलग असे दिलेले आहेत.

वारकऱ्यांच्या परंपरेनुसार नामदेवांच्या कुटुंबियांचे अभंग व जनाबाईचे अभंग हे नामदेवांच्या गाथेतच समाविष्ट केले जातात. म्हणून या समितीचे काम नामदेवांची गाथा तयार करावी एवढेच असले तरी या सर्वांच्या अभंगांचा विचार समितीने केलेला आहे.

* उदा० आवटे प्रतीतील १४६० अभंगाचा चरणक्रम काही प्रतींत १, २, ३, ५, ४ असाही आढळतो.

अनुक्रमणिका

त्या संदर्भात परिशिष्ट 'अ' पहावे. त्या सर्वांच्या अभंगांची हस्तलिखितेही समितीने नामदेवांच्या अभंगांप्रमाणेच अभ्यासिली आहेत. मात्र नामदेवांच्या नाममुद्रेच्या अभंगां-प्रमाणे त्यांचे संपादन सूक्ष्मपणे केलेले नाही. तथापि शक्य तेथे काही पाठभेद नोंदलेले आहेत. तसेच कालबाह्य वाटतील असे कबीरादी संतांचे संदर्भ असलेले अभंग येथे अप्रस्तुत वाटल्याने गाळण्यात आलेले आहेत.

हिंदीतील अभंगांसंबंधी या समितीने पूर्वीच एक महत्त्वाचा निर्णय घेतलेला होता. त्या निर्णयानुसार पुणे विद्यापीठाने प्रकाशित केलेली आणि डॉ. भगीरथ मिश्र* यांनी संपादित केलेली प्रत ही जशीच्या तशी (पद क्रमांक १५ चा अपवाद करून) स्वीकार-लेली आहे. त्यामुळे नामदेवांची हिंदी रचना स्थळप्रतीप्रमाणे न रहाता उपरोक्त प्रतीतील रचनेप्रमाणेच आढळून येईल.

परिशिष्ट 'ब' मध्ये समितीला सापडलेल्या पण कोणत्याही छापील प्रतीत आढळून न आलेल्या अभंगांचे संपूर्ण पाठ दिलेले आहेत. शिवाय शेवटी प्रथम चरणानुसार असलेली अभंगांची अनुक्रमणिकाही जोडलेली आहे व उलट जाणे सोयीचे व्हावे म्हणून पुढे त्या अभंगांचा क्रमांकही दिलेला आहे. मात्र नामदेवांच्या मराठी अभंगांची वर्णानुसार अनु-क्रमणिका वेगळी दिली आहे. त्याचप्रमाणे त्यांच्या हिंदी पदांची अनुक्रमणिका अलग दिली आहे. तसेच कुटुंबियांच्या व परिवारातील इतर संतांच्या व नामदेवांच्या अप्रकाशित अंभगांची (तीर्थावळी धरून) एकत्र अनुक्रमणिका त्याहूनही वेगळी दिली आहे.

हा ग्रंथ तयार करतेवेळी समितीने स्थळप्रत म्हणून श्री. आवटे यांनी प्रकाशित केलेल्या नामदेव गाथेची प्रतच स्वीकारलेली आहे. प्रस्तुतची प्रत तयार करताना स्वीकृत अभंगांतील सर्व मुद्रणदोष दूर करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. जेथे निश्चितपणे अर्थबदल होत होता असेच पाठभेद चिकित्सेसाठी व निर्णयासाठी म्हणून निवडण्यात आले. मात्र लेखनिकाच्या शुद्धलेखनातील दोष व विविध लेखनपद्धती ह्यामुळे सर्वच्या सर्व पाठभेद नोंदविण्याची गरज समितीस वाटली नाही. हे पाठभेद निवडताना समितीने दोन प्रकारची अशी आपली भूमिका ठरविलेली होती.

भाषाशास्त्रीय अभ्यासाप्रमाणे यादवकालात असलेल्या मराठी भाषेचे म्हणून जे रूप मान्य करण्यात आले आहे असा पाठभेद मिळाल्यास त्याला अग्रक्रम देण्यात आला आहे. तसेच विशिष्ट शब्द कोणत्याही हस्तलिखितात न मिळाला तरी ज्याचे यादवकालीन रूप

* समितीच्या सूचनेवरून हिंदी अभंगांच्या निश्चितीसाठी महाराष्ट्र शासनाने त्यांची समितीचे सभासद म्हणून त्यावेळी नेमणूक केली होती.

अनुक्रमणिका

सिद्ध झाले आहे असा शब्द यादवकालीन रूपातच स्वीकारण्यात आला आहे. उदाहरणार्थ 'झाले' हा शब्द यादवकालात जाले, जहाले, जाहाले असा लिहिलेला सापडतो. 'झाले' असा मात्र तो कधीही कोठेही सापडत नाही. म्हणून असा शब्द हस्तलिखितात मिळाला नाही तरी देखील तो या पद्धतीने स्वीकारण्यात आलेला आहे.

नामदेवांच्या अभंगांच्या नाममुद्रिकेत विविधता आढळते; त्यामुळे नामदेव ह्याच नावाचे अनेक कवी होऊन गेले असल्याची शक्यता लक्षात येते. अभंगाच्या शेवटी नामा, केशवदास नामा, विष्णुदास नामा, नामा यशवंत, नामा पाठक अशा विविध मुद्रिका आढळून येतात. शिवाय उत्तरेकडील कबीर या सुप्रसिद्ध संत कवीच्या नावाचा उल्लेख नामदेवांच्या लेखनात येतो म्हणजे हे नामदेव कोणते असावेत हाही प्रश्न बेचैन करून सोडतो. तसेच या संदर्भात आणखी एक गोष्ट लक्षात येते ती अशी की, हिंदीतून काव्यलेखन करणारे नामदेव हे यांचेपैकीच एक आहेत किंवा अगदीच निराळे आहेत? कारण पंढरपूरचे नामदेव व हिंदीतून लेखन करणारे नामदेव हे दोन वेगवेगळे आहेत असे मानणाराही एक पक्ष आहे! त्यामुळे याबाबतीत सर्वसंमत होईल असा निष्कर्ष काढणे फार कठीण आहे.

नामदेवांच्या हिंदीतील अभंगांबद्दल समितीकडे उपलब्ध झालेल्या हस्तलिखितांत अठरा पदांखेरीज कसलाही अन्य पुरावा नाही. तथापि समितीचे एक सभासद डॉ. भगीरथ मिश्र यांनी नामदेवांच्या हिंदीतील काव्याचे संशोधन करून काढलेले निष्कर्ष अधिकृत मानून समितीने त्यांनी मान्य केलेले हिंदीतील नामदेवांचे अभंग प्रस्तुत प्रतीत स्वीकारलेले आहेत.*

सध्या उपलब्ध असलेल्या नामदेवांच्या अभंगांपैकी आदि, समाधी व तीर्थावळी ह्या प्रकरणांचेबद्दलच व नामदेवांच्या हिंदीतील कवनांबद्दलच वाद निर्माण झालेला आढळतो.

नामदेवांच्या आदि, समाधी व तीर्थावळी ह्या प्रकरणांतील अभंग ज्या प्रतींत आढळून येतात त्या प्रती तं, पं, भा, गं, है, धु, पा, शि ह्या प्रती होत. म्हणजे बहुतेक सर्व प्रमुख प्रतींच्यामधून या ना त्या स्वरूपात ही प्रकरणे आढळून येतात असा याचा अर्थ होतो.

---

* डॉ. भगीरथ मिश्र यांच्या या ग्रंथाचे प्रकाशन पुणे विद्यापीठाने केलेले असून पुणे विद्यापीठाने त्या पुस्तकातील उतारे घेण्यास समितीस खास संमती दिलेली आहे.

अनुक्रमणिका

खुद्द नामदेवांच्या हातचे अगर त्यांच्या समकालीन लेखकाच्या हातचे असे हस्तलिखित आज उपलब्ध नसल्यामुळे या संदर्भात निश्चित असे मत देणे कठीण आहे. शिवाय नामदेवांच्या वैयक्तिक माहितीसंबंधीही अनेक समस्या निर्माण झालेल्या असल्याने हा प्रश्न आणखीनच काहीसा गुंतागुंतीचा होऊन बसलेला आहे.

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । स्वयें पांडुरंगें येवोनीयां ॥
सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्त बोलों नये ॥
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले ते शेवटीं लावी तुका ॥

तुकाराम महाराजांसारख्या संतश्रेष्ठांनी व्यक्त केल्याप्रमाणे शतकोटी अभंग लेखनाची कल्पना नामदेवांना कशी सुचली ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. प्राचीनकाळी वाल्मीकीने शतकोटी रामायण रचले असे मानले जाते. त्याच धर्तीवर याही कल्पनेचा उदय झाला असावा. पण कलियुगातील माणसाला आपल्या हयातीत एकट्याने एवढी रचना करणे शक्य होणारे नाही. म्हणून नामदेवांच्या कुटुंबियांनी या कामी हातभार लावीत ९६ कोटींची पूर्तता केली असे म्हणतात. परंतु सध्या उपलब्ध असलेल्या अभंगांची संख्या त्या मानाने फारच कमी आहे. त्यातूनही नेमके नामदेवांचे अभंग कोणते आणि इतरांचे कोणकोणते हाही विचार करायला लावणारा प्रश्न आहे.

नामदेवांना जाऊन आता सुमारे सातशे वर्षांचा कालावधी लोटला आहे. त्यांची विश्वसनीय माहिती मिळावी अशी साधनेही सध्या उपलब्ध नाहीत. त्यामुळे त्यांचे चरित्र लक्षात घ्यावयाचे तर ते स्थूलमानानेच घ्यावे लागेल ही वस्तुस्थिती आहे.

या संतशिरोमणींचा जन्म शके ११९२ मध्ये झाला असावा याबद्दल सर्वसाधारणपणे मतैक्य दिसून येते. त्यासाठी प्रमुख आधार म्हणून स्वतः नामदेवांच्या नावावर उपलब्ध असलेला पुढील अभंगच विचारात घेण्यात येतो :

माझें जन्मपत्र बावाजी ब्राह्मणें । लिहिलें त्याची खुण सारू ऐका ॥ १ ॥
अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसी ॥ २ ॥
शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रभव संवत्सर, शालिवाहन शके ॥ ३ ॥
प्रसवली माता मज मळमूत्रीं । तेव्हां जिव्हेवरी लिहिलें देवें ॥ ४ ॥

शतकोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाममंत्र खुणा वाचुनि पाहे ॥ ५ ॥
ऐशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण । नामसंकीर्तन नामया वृद्धि ॥ ६ ॥
( अ. क्र. १२४० )

परंतु ११९२ हा शक श्री. भारद्वाजांना मान्य झालेला नाही. त्यांनी नामदेवांस उत्तरकालीन ठरविण्याच्या नादात 'अधिक ब्याण्णव गणित अकराशतें' हा पाठ काढून त्याऐवजी स्वतःचाच पाठ घातला आहे. त्यामुळे कालखंडाच्या दृष्टीने एका शतकाचा फरकही पडतो आहे. त्यांचे म्हणणे असे की, नामदेवांच्या "जन्मकाळच्या व समाधिकाळच्या अभंगांत शक फिरविला म्हणजे सर्व ठीक जुळते—

जन्मकाळ—अधिक ० नव गणित तेराशतें । ( शके १३०९ )
समाधिकाळ—तेराशे बहात्तर कृष्ण त्रयोदशी । ( शके १३७२ )

शके १३०९ मध्ये प्रभव संवत्सर येते व बाकीच्या प्रमाणांवरून हाच शक सिद्ध होत आहे. तेव्हा नामदेवाच्या जन्मस्थळाची व समाधिकाळाची पीछेहाट सुमारे एक शेकड्याने झाली आहे असे मला वाटते."*

श्री. भारद्वाजांच्या या विधानात एक मुख्य दोष असा आहे की, संशोधनाचे कामी असा बदल करणे योग्य ठरणारे नाही. तसेच शके १३०९ मध्ये प्रभव संवत्सर येत असले तरी त्या वर्षीच्या कार्तिक शुद्ध एकादशीला रविवार येत नाही. उलट संवत्सराचे हे नाव शके ११९२ मध्ये कार्तिक शुद्ध एकादशीस रविवार येत असल्याने श्री. भिंगारकर यांनी भारद्वाजांचे मत खोडून काढले आहे. त्यांचे म्हणणे असे की, "संप्रदायशुद्ध वारकरी लोकांच्या तोंडात वरील अभंगाचा 'प्रमोद संवत्सर' असा पाठ आहे. शके ११९२ मध्ये 'प्रभव' संवत्सर येत नाही. 'प्रमोद' येते. दोहोंचेही पहिले अक्षर 'प्र' आहे. तेव्हा हस्तदोषाने 'प्रमोद'च्या ठिकाणी 'प्रभव' पडण्याचा संभव आहे. यांपैकी खरा पाठ कोणता, हे शक, महिना, पक्ष, तिथी आणि वार या पाच गोष्टींवरून ठरविले पाहिजे. एकट्या संवत्सराच्या नावाकरिता या पाचही गोष्टी फिरविणे असमंजस होय."†

भारदे पक्षात कै. डॉ. सर रामकृष्ण भांडारकर प्रभृती विद्वान असून कै. वि. ल. भावे, कै. पांगारकर वगैरे संशोधकांना नामदेव हे ज्ञानेश्वरांचेच समकालीन वाटतात.

* ज्ञानेश्वर व नामदेव—भारद्वाज, 'सुधारक', पृ. ५, डिसेंबर १९३१.
† श्री. महासाधु ज्ञानेश्वर महाराज यांचा कालनिर्णय व संक्षिप्त चरित्र—श्री. र. भिंगारकर, पा. ४.

अनुक्रमणिका

नामदेवांनी लिहिलेले ज्ञानेश्वरांचे चरित्र (आदि, समाधी, तीर्थावळी) पाहिल्यास हे दोघे समकालीन होते याबद्दल शंका रहात नाही. तसेच महानुभाव पंथाचे पहिले आचार्य नागदेव (किंवा भटोबास) यांचे चरित्र सांगणाऱ्या 'स्मृतिस्थळा' मध्ये एका ठिकाणी विपर्यस्त स्वरूपात का होईना पण नामदेवांचा उल्लेख आलेला आहे.* स्मृतिस्थळ हा ग्रंथ शके १२३५ च्या सुमाराचा असल्याने त्यातील उल्लेखावरूनही ११९२ या शकास बळकटी येते. शिवाय शके १३२५ च्या सुमारास होऊन गेलेला नरसी मेहता हा गुजराथी संतकवी ज्याअर्थी पंढरपूरच्या नामदेवांचा उल्लेख करतो त्याअर्थी नामदेव त्यापूर्वी पुष्कळ वर्षे झालेले असणार हे उघड आहे. हे सर्व लक्षात घेता नामदेवांना शालिवाहन शतकात पुढे ढकलता येणार नाही.

'जन्मपत्रा' च्या उल्लेखाचा हा अभंग नामदेवांचा असेल किंवा नसेल; परंतु तेवढ्यामुळे त्यात उल्लेखिलेला ११९२ हा त्यांचा जन्मशक संशयित ठरू नये.

श्री. शं. पु. जोशी यांनी शके ११८५ हा नामदेवांचा जन्मशक मानून श्री. प्र. रा. मुंगे यांच्या सहाय्याने एक कुंडलीही दिलेली आहे.†

श्री. सूर्यनारायण व्यास यांनी तत्कालीन व पौराणिक सत्पुरुषांच्या कुंडल्यांचा एक संग्रह प्रसिद्ध केला असून त्यात संत नामदेवांचीही एक कुंडली दिलेली आहे.‡ या कुंडलीत ग्रहांचे स्पष्टीकरण नसून जन्मवेळ सकाळची दाखविली आहे. तसेच कुंडलीचे अनुमान म्हणून निरपेक्ष भक्ती व निर्मल ज्ञान सांगितले आहे. तथापि याही कालनिर्णयास शास्त्रशुद्ध बैठक दिली गेलेली नाही.

आपल्याकडे कालनिर्णयासाठी सामान्यपणे शक आणि संवत्सर या दोहोंचाही निर्देश केला जातो. कालनिर्णयाचे एक स्वतंत्र शास्त्र आहे. त्यास अनुसरून कलियुगाच्या सुरवातीपासूनच पंचांगे तयार करण्यात आलेली आहेत. त्या आधारावर शक आणि संवत्सर इत्यादींची माहिती काढली जाते. ज्योतिषशास्त्रातील सूर्यसिद्धांताच्या सहाय्याने तयार केलेल्या पंचांगास अनुसरून नामदेवांच्या अभंगातील नोंद झालेला शक, महिना, तिथी वगैरे तपशील लक्षात घेता त्यावेळी प्रमोद संवत्सरच दक्षिणेत चालू असलेल्या कालनिर्णयाप्रमाणे योग्य ठरते.

---

* "विष्णुदास नामदेव पंडितमुखें वेधु संक्रमण:" ही २४४ वी स्मृती पहावी. तीत नामदेवांचा उल्लेख 'नामदेव सींपा' असा केलेला आहे.

† पंजाबातील नामदेव—शं. पु. जोशी, पृ. १६.

‡ कुंडली संग्रह, पान १४९, उज्जैन, १९४०.

अनुक्रमणिका

उत्तरेकडे गुरूच्या भ्रमणावरून व दक्षिणेकडे सौरचंद्र भ्रमणावरून कालनिर्णय करीत असत.

समितीचे एक सभासद सर्जन डॉ. य. ग. बोधे यांनी आपल्या ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासानुसार श्रीनामदेव महाराजांची एक कुंडली तयार केलेली आहे. गणन यंत्राचे सहाय्य घेऊन त्यांनी या संदर्भात एक नवीनच प्रकाश पाडलेला आहे. त्यांच्या मते श्रीनामदेवांचा जन्म शके ११९२ मध्ये कार्तिक शुद्ध एकादशीस घ. ३२ व प. १४ यावेळी रविवारी झाला आहे. त्यावेळी रोहिणी तारा हा पूर्व क्षितिजावर आल्यानंतर सायंकाळी ७ वाजता हा जन्म झाला आहे. डॉ. बोधे यांच्या मते दक्षिणेकडील हे सौरचंद्र संवत्सर शास्त्रोक्त शालिवाहन शकाचे असून या वर्षाला दुजोरा देणारे असे कालमापक संवत्सर आहे. ज्योतिषशास्त्रदृष्टया हे नक्षत्र कार्तिक महिन्यात एकादशीस सूर्यास्तानंतर एक तासाने वर येते. त्यावरून नामदेवांचा जन्म संध्याकाळी सूर्यास्तानंतर अर्ध्या एक तासाचे दरम्यान झाला असावा. म्हणून 'उगवता आदित्ये' याचा अर्थ सूर्योदय असा न घेता पूर्व क्षितिजावर असाच घेणे इष्ट ठरते. म्हणजे नामदेवांच्या जन्मवेळी रोहिणी नक्षत्र हे पूर्व क्षितिजावर होते हे उघड आहे.

शके ११९२ म्हणजे इ. स. १२७० होय. कार्तिकी एकादशीस २६ ऑक्टोबर ही तारीख येते. (मात्र ही तारीख पूर्वी रूढ असलेल्या ज्यूलियन पद्धतीची आहे.)

डॉ. बोधे यांनी संत नामदेव महाराजांची तयार केलेली कुंडली प्रस्तुत ग्रंथात प्रथमच प्रकाशित होत आहे. ही कुंडली लक्षात घेता रोहिणीचे पंचमात शुक्र कन्या राशीत असून बुध व शुक्र यांचा अन्योन्य संबंध असल्याने नामदेवांना जन्मजातच दैवी सामर्थ्य प्राप्त झाले होते व कवित्वाची देणगी लाभली होती हे दिसून येते. बाबाजीने नामदेवांचे भविष्य वर्तविताना शतकोटी अभंग यांचे हातून लिहून पुरे होतील असे केलेले भाकित या कुंडलीवरून खात्रीलायक असे लक्षात येते.

या पत्रिकेतील पंचमारंभी असलेला शुक्र व पुढे येणारा बुध लक्षात घेता तीर्थयात्रा घडणे व अभंगरचना करणे या गोष्टी सुसंगत ठरतात. तसेच बुधाचे अकरावे स्थानी शनि-मंगळ युति होणे व गुरु-रवि मार्गी येऊन मिळणे हा योग संस्थापकत्व दर्शवितो. शुद्ध बुद्धी व उच्च विचारसरणी यांच्या जोरावर उपास्य देवतेचे स्थान पक्के होते. या पत्रिकेतील पंचमस्थान हे उपासना दर्शविते व नवमस्थान हे प्रवास आणि प्रचार कार्य दर्शविते. बाबाजीने नामदेवांच्या बाबतीत भाकित करताना नामकीर्ती वाढेल म्हणून केलेल्या उल्लेखाचा येथे पडताळा येतो. तसेच पंचमातील राहूमुळे नामदेवांना सहन कराव्या लागलेल्या त्रासाचाही अंदाज घेणे शक्य होते.

अनुक्रमणिका

# कुंडली

## श्री संत नामदेव महाराज

जन्म शके ११९२, प्रमोदनाम संवत्सरे, कार्तिक शुद्ध ११, घ २२, प. १४,
सूर्यास्तानंतर उत्तराभाद्रपदा, चरण तृतीय, ता. 26 OCT 1270
(JULEAN YEAR) रोहिणीतारा उदित

स्पष्ट ग्रह

| | रा | अ | क |
|---|---|---|---|
| र | ६ | २९ | २८ |
| चं. | ११ | २० | २६ |
| मं | ४ | २४ | ३० |
| बु. | ६ | १३ | ३६ मा |
| गु. | ६ | २२ | २८ |
| शु. | ५ | १२ | १२ |
| श | ४ | ८ | ४८ |
| ह | १ | १२ | ३६ व |
| ने. | ४ | २२ | ० |
| रा. | ५ | २५ | २७ |

निरयन भावचलित भोग वृषभ १७ अ ३५क

३ | ह २ | १ | के. | १२ चं. | ११ | १० | ९ | ८ | ७ बु. गु. र. | शु. | ६ | रा. | श. | मं. ५ ने. | ४

सायन भावचलित कुंडली वृषभ २९/३५




अनुक्रमणिका

नामदेवांच्या या पत्रिकेतील शनिस्थान हे अष्टमेश नवमेश असे आहे. चंद्राचे षष्ठातील शनि, प्रकृती निकोप व सुदृढ ठेवतो व आत्मबल तीव्र ठरवितो. बाबाजीने नामदेवांचे आयुष्य तिसऱ्या साडेसातीत संपेल असे म्हटले आहे. पैकी पहिली साडेसाती १४ व्या वर्षी सुरू झाली. नंतर आयुष्याची दिशा बदलून संतसमागम, गुरुपदेश वगैरे स्थित्यंतरे घडली. याच कालखंडामध्ये महत्त्वाच्या घटना घडत गेल्या. ४४ व्या वर्षी दुसरी साडेसाती सुरू झाली. नामदेव महाराज उत्तर हिंदुस्थानात याचवेळी गेले व तेथे वास्तव्य करून त्यांनी कवित्वाच्या व कीर्तनाच्या द्वारा भागवत धर्माचा प्रचार केला. तिसऱ्या साडेसातीत नामदेवांनी हरिनामाचा अपरंपार गजर करीत आपला देह ठेवला व स्वर्गलोकी प्रयाण केले.

डॉ. बोधे यांनी तयार केलेल्या कुंडलीवरून या सर्व गोष्टींचा पडताळा येतो.

नामदेवांसारख्या संतश्रेष्ठाचा व कीर्तन शिरोमणीचा जन्म कोठे झाला हाही एक त्यांच्या जन्मकालाप्रमाणेच मतभेदाचा असा विषय आहे. काही तज्ञांच्या मते नामदेव पंढरपुरी जन्मले, तर काहींच्या मते त्यांचा जन्म नरसी-बामणी येथे झाला आहे. परंतु या नरसी-बामणीबद्दलही वाद आहे. कारण याच नावाची दोन-तीन ठिकाणे आहेत.

नरसी-बामणी येथे नामदेवांचा जन्म झाला आहे या मताच्या मंडळीमध्ये 'महाराष्ट्र सारस्वत'कार कै. वि. ल. भावे व कै. आजगांवकर यांचा प्रामुख्याने समावेश होतो. आपल्या या मतास आधार म्हणून त्यांनी नामदेवांच्या नावावर असलेल्या पुढील अभंगाचा नामनिर्देश केलेला आहे—

नरसी ब्रह्मणीचा दामाशेट शिंपी । केशिराजरूपीं मग्न असे ॥ १ ॥
ग्रामाचे बाहिर देवालय मूर्तीचें । तेथें भजन त्याचें एकनिष्ठ ॥ २ ॥
मूर्तीशी नैवेद्य दाविल्यावांचुनि । न करी भोजन दामाशेटी ॥ ३ ॥
त्याचिये स्त्रियेचें नाम गोणाबाई । पोटीं पुत्र नाहीं सेवा करी ॥ ४ ॥

पण एकतर हा संपूर्ण अभंगच अत्यंत संशयित स्वरूपाचा असल्यामुळे त्यातील सर्व उल्लेख नीटपणे पारखून घेतले पाहिजेत. दुसरे असे की, या अभंगातील तिसऱ्या चरणात उद्धृत केलेला दामासेठी हा नरसी-ब्रह्मणीचा असला तरी त्याने व त्याच्या बायकोने पुत्र-प्राप्तीसाठी म्हणून जी भक्ती केली ती त्याच गावातील केशिराजाची केली असे कोठेच म्हटलेले नाही. उलट, याच अभंगाच्या पुढील भागात केशिराजाच्या ठिकाणी विठ्ठलाचे नाव येते. याचा अर्थच मग असा की, दामासेठी मूळचा नरसी-बामणीचा खरा, पण तो पंढरपूरला स्थायिक होऊन तेथील केशिराजाची म्हणजेच विठ्ठलाची भक्ती सहकुटुंब करीत होता.

अनुक्रमणिका

कोणत्याही नरसी-बामणीत एक तर केशिराजाचे इतके जुने देऊळ नाही व पंढरपूरचे विठ्ठलाचे देऊळ हे नामदेवांच्या जन्मापूर्वीही अनेक वर्षे अस्तित्वात होते. इतकेच नव्हे तर त्यावेळेस ते एक अगदी लहान असे केवळ गर्भागारी देऊळ होते असे पंढरपुरात नव्याने मिळालेल्या शके ११११ च्या विठ्ठल देवाच्या शिलालेखावरून कळते.* या लेखात त्या देवळाचा उल्लेख 'लान मडु' असा आलेला आहे.

नामदेवांच्या जन्मानंतर पुढे शके ११९५ मध्ये त्या देवळाचा जीर्णोद्धार किंवा विस्तार झाला असे त्या वर्षीच्या 'चौऱ्यांशीचा लेख' या नावाने प्रसिद्ध असलेल्या शिलालेखावरून समजते. सारांश, वरील संशयित स्वरूपाच्या अभंगातील उल्लेख बरोबर आहेत. असे गृहीत धरून देखील त्यामध्ये नामदेव नरसी-बामणीस जन्मले असे कोठेही सूचित झालेले नाही.

येथे पंढरपूरचा नेमका असा उल्लेख येत नाही, पण तेथील केशिराजाचा किंवा विठ्ठलाचा व त्याच्या देवळाचा मात्र येतो आणि तो पुरेसा बोलकाही आहे. शिवाय नामदेव पंढरपुरी जन्मले या मतास परंपरेचा बळकट आधार आहे, तोही नरसी-बामणी पक्षास नाही.

जनाबाईने या संदर्भात दिलेली माहिती अशी आहे—

लेलो लागला अंबेचा । विठाबाई आनंदीचा ।
आदि ठाणें पंढरपूर । नांदे कान्हाई सुंदर ॥
गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देई मला ।
शुद्ध देखोनियां भाव । पोटीं आले नामदेव ॥
दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद जाला ॥

(जनाबाईचे अभंग क्र. २७४)

जनाबाईप्रमाणेच संत एकनाथांनी नामदेवांच्या जन्मस्थळासंबंधी सांगितलेली कथा अशी आहे—

द्वारकेहुनी विठू पंढरीये आला । नामयाचा पूर्वज दामाशेटी वहिला ॥ १ ॥
दामा आणि गोणाई नवसी विठूसी । पुत्र देई आम्हां देवा भक्तराशी ॥ २ ॥
तोचि नामदेव जन्में शिंपियाचे कुळीं । भक्तातें पाहुनी वेधला वनमाळी ॥ ३ ॥
एका जनार्दनी परंपरा कथियेली । धन्य धन्य विठू अनाथाची माऊली ॥ ४ ॥

(एकनाथ गाथा क्र. ३५५४—आवटे)

* प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळेकृत); १९६३. लेख क्र. १७, पृ. ८५–९२.

अनुक्रमणिका

पंच वरुषी नामा जाहला । छंद विठूचा लागला ॥
(आ. क्र. ३५५५)

येथे एकनाथांनी नरसी-बामणीचा कोठेही उलेख केलेला नाही हे महत्त्वाचे आहे. कारण नामदेवांचा जन्म जर खरोखरच नरसी-बामणीस झाला असता तर त्यांनी तसे एकदा तरी म्हटले असते. उलट पंढरीचा व तेथील विठ्ठलाचा मात्र ते पुन्हा पुन्हा उल्लेख करतात. याचा अर्थच असा की, एकनाथांचे वेळी म्हणजे नामदेवांचे नंतर सुमारे अडीचशे वर्षांनी, नामदेव हे पंढरपूरचेच असा सर्वत्र समज असला पाहिजे.

गोणाईने पंढरपूरच्याच विठ्ठलाला नवस केला होता हे या वरील दोन्ही अभंगांवरून स्पष्ट होते. उपरोक्त संशयित अभंगावरून फार तर इतके म्हणता येईल की, नामदेवांचे घराणे हे मूळचे नरसी-बामणीचे असावे व नामदेवांचे जन्मापूर्वीच त्यांचे आईबाप हे पंढरपुरी येऊन विठ्ठलभक्ती करीत तेथेच स्थायिक झाले असावेत.

'नामदेव परिचयी' कार श्री. अनंतदास यांनीही पंढरपूर हेच नामदेवांचे जन्मस्थान मानिले आहे.

पंढरपूर जहाँ नगर सकल भोग कराही ।
नामदेव को पिता बसे बैरौजा माही ।
जा कौ पुत्र पुनीत नामदेव सब विधि पूरौ ॥
(परिचयी साहित्य—त्रिलोकी नारायण दीक्षित, पृ. ८२)

तेव्हा नामदेवांचे जन्मस्थान म्हणून पंढरपुराकडेच पहाणे उचित ठरेल.

नामदेवांच्या घराण्याचे मूळ ठिकाण जे नरसी-बामणी ते बहुधा परभणी जिल्ह्यातील असावे. परंतु तेथे नरसी व बामणी अशी दोन निरनिराळी गावे असून त्यांच्यामध्ये सुमारे दहा कोसांचे अंतर आहे. म्हणून या दोन गावांचा एकत्र संबंध कसा आला हे लक्षात येत नाही. तथापि त्या भागात ही दोन्ही गावे नरसी-बामणी याच जोडनावाने प्रसिद्ध आहेत हेही विसरता येणार नाही. नामदेवांची एक समाधी व देऊळ नरसी गावापासून जवळच असलेल्या कयाधु (कयाड) नदीच्या काठी असून तेथे फाल्गुन वद्य ११ ला यात्राही भरते. तसेच नरसी येथे नामदेवांच्या घराची जागाही दाखवितात आणि त्यांच्या अभंगात उल्लेखिलेली नरसी ती हीच असा समजही तेथे रूढ आहे. ज्या गावी जाऊन नामदेवांनी विसोबा खेचराकडून गुरुपदेश घेतला ते नागनाथाचे आवंढे हे गाव



अनुक्रमणिका

या नरसीपासून जवळच आहे हेही येथे लक्षात घेणे अगत्याचे आहे. या विविध कारणांचेवरून नामदेवांचे मूळ घराणे हे या नरसीचे असावे याबद्दल संदेह उरू नये.

आपल्या आईच्या पोटी मुलाने जन्म घ्यावा हा निसर्गनियम आहे. त्याप्रमाणेच संत नामदेवांनीही आपल्या आईच्याच पोटी जन्म घेतला असला पाहिजे याबद्दल वाद नसावा. परंतु संत चरित्रकार महिपतींनी नामदेव हे एका शिंपल्यात जन्मल्याची दंत-कथा आपल्या 'भक्तविजया' मध्ये सांगितली आहे, ती अशी—

आतां ऐका श्रोते सज्जन । क्षीरसागरीं नारायण ।
उद्धव-शुकासीं पाचारून । म्हणे अवतार घेणें मृत्यूलोकीं ॥ ७ ॥

ते म्हणती पयोब्धिवासा । आम्ही न जाऊं गर्भवासा ।
अयोनिसंभव हृषीकेशा । जन्म देई आम्हांसी ॥ ८ ॥

ऐसे ऐकोनी जगज्जीवन । बाह्य दिधलें त्या कारण ।
शुक्तिकेचें पोटीं घालून । वर्षते घनी टाकिले ॥ ९ ॥

एक पडला भागीरथींत । एक पडिला भीमरथींत ।
प्रवाहें वाहत येत । स्मरण करीत तें ऐका ॥ १० ॥

शिंपला पडला भागीरथींत । तो राम राम स्मरण करीत ।
दुजा पडिला भीमरथींत । तो विठ्ठल विठ्ठल म्हणत निजछंदें ॥ ११ ॥

रामभजन करी तो शुक । उद्धव पांडुरंग उपासक ।
प्रवाहीं वाहतां देख । काय कौतुक वर्तलें ॥ १२ ॥

दामाजी शिंपी वैष्णवजन । परम भाविक पुण्यपावन ।
भक्तिज्ञान वैराग्यपूर्ण । त्याचे ठायीं असती की ॥ १३ ॥

गोणाई त्याची कांता । परम भाविक पतिव्रता ।
पंढरीत राहती उभयता । श्री जगन्नाथा आठवुनी ॥ १५ ॥

पोटीं नाही पुत्रसंतान । गोणाई म्हणे पतीलागून ।
तुम्ही पांडुरंगापाशीं जाऊन । एक पुत्र मागावा ॥ १६ ॥

मग महाद्वारासी जाऊन । देवासी केलें साष्टांग नमन ।
म्हणे कांता इच्छी पुत्रसंतान । होई प्रसन्न श्रीहरे ॥ २६ ॥

अनुक्रमणिका

ऐसे बोलोनि वचन । निद्रा आली न लागतां क्षण ।
स्वप्नीं येऊनी जगज्जीवन । म्हणे पुत्रदान तुज दिधलें ॥ २७ ॥

दुसरे दिवशीं दामशेटी । सत्वर आला भीमातटीं ।
स्नान करूनि उठाउठी । नित्य नेम सारिला ॥ ३१ ॥

तों भीमातटीं वाहत । शिंपला अकस्मात देखिला येत ।
दामशेटीने जातजात । घेतला सत्वर तेधवा ॥ ३२ ॥

उकलोनि पाहातां तये क्षणीं । तों लावण्यबाळ देखिलें नयनीं ।
जैसें मातेच्या उदरांतुनी । येचि क्षणी उपजलें ॥ ३३ ॥

परंतु आज या दंतकथेवर कोणीही विश्वास ठेवणार नाही. आपल्याला पूज्यस्थानी असलेल्या थोर विभूती या अयोनिज आहेत असे मानण्याकडे भाविकांची प्रवृत्ती असते. त्यामुळे जीज़स् ख्राईस्ट किंवा कबीर यांच्या संबंधीही अशाच कल्पना रूढ आहेत. मात्र वस्तुस्थिती म्हणून कोणी या कल्पना स्वीकारलेल्या नाहीत. खुद्द नामदेवांनी स्वतःच आपल्या जन्मपत्राच्या अभंगात 'प्रसवली माता मज मळमूत्रीं' असे स्पष्टपणे म्हटले आहे. त्यामुळे या प्रश्नाची अधिक चर्चा येथे उद्‌भवत नाही.

नामदेव हे आपल्या तरुणपणी दरोडेखोर होते आणि अनुताप होऊन पुढे ते भक्तिमार्गाकडे वळले असा एक गैरसमज नामदेवांच्या चरित्रातील पूर्वभागासंबंधी झालेला दिसून येतो. कविचरित्रकार कै. आजगांवकर* यांनी तर तो गृहीत इतिहास म्हणून स्वीकारला आहे. शिवाय 'महाराष्ट्र सारस्वत' कार कै. भावे यांनाही तो मान्य दिसतो.

वास्तविक पहाता असा समज असणे ही चुकीची गोष्ट आहे. नामदेवांच्या म्हणून छापल्या गेलेल्या ज्या ५६ चरणी अभंगाच्या द्वारे वाटमारीचा प्रसंग निर्देशिला जातो तो अभंगच मुळी अत्यंत संशयित स्वरूपाचा आहे. अशा अभंगाचे कर्तृत्व नामदेवांकडे देणे ही कल्पनाच अशास्त्रीय आहे.

या अभंगातील 'बाच्छायें तामजाह पाठविलें' असली वाक्ये फारसीमय असून ती निश्चितपणे उत्तरकालीन आहेत. नामदेवांचा जन्म शके ११९२ मध्ये झाला हे गृहीत धरून त्यांचे वय ज्ञानेश्वरांच्या समाधिकाळी, म्हणजे शके १२१८ मध्ये २६ वर्षांचे ठरते. त्यापूर्वी त्यांनी ज्ञानेश्वरांसह तीर्थयात्रा देखील उरकली होती. शिवाय त्याहीपूर्वी ज्ञानेश्वरांच्या सांगण्यावरून नामदेवांनी विसोबा खेचरांकडे जाऊन त्यांचा अनुग्रह घेतला

* नंतरच्या आवृत्तीत दरोडेखोरीचा भाग गाळला आहे.



अनुक्रमणिका

होता. याचा अर्थ असा होतो की, नामदेव ज्ञानेश्वरांचेकडे प्रथम आले ते शके १२१४ च्या सुमारास. त्यावेळी त्यांचे वय २०-२२ वर्षांचे असावे. तेव्हा त्यांचे पूर्वचरित्र वाटमारीत गेले असे मानले तर इतक्या अल्प कालावधीमध्ये बाळपण, बालभक्ती, वाटमारी, अनुताप, शरणागती अशा अनेक घटना एकत्रित घ्याव्या लागतात. त्यामुळे त्यांच्या चरित्रात असंभवनीयता येते. तसेच ज्या परखड मुक्ताबाईने नामदेवांच्या भक्तीचा अहंकार उघडा केला ती त्यांच्या या वाटमारीच्या पूर्वायुष्यासंबंधी अवाक्षरही काढीत नाही. नामदेव हे जर खरोखरच वाटमारीत उतरले असते तर मुक्ताबाईने किंवा आणखी कोणीही पहिल्या भेटीतच त्यांचेशी या संदर्भात खात्रीने बोलणे केले असते. पण तसे काहीच घडलेले दिसत नाही.

महानुभावांच्या 'स्मृतिस्थळ' या ग्रंथातील उपरोक्त स्मृतीत (क्र. २४४) नामदेवांच्या पूर्वायुष्याविषयी विपरीत असे काहीही आलेले नाही हेही अत्यंत महत्त्वाचे होय. कारण तसे काही असतेच तर त्यासंबंधीचा उल्लेख या स्मृतिस्थळकाराने आवर्जून केला असता. अर्थात तरुणपणी नामदेवांनी वाटमारीत भाग घेतला म्हणून तेवढ्यामुळे काही बिघडले किंवा त्यांच्या मोठेपणाला बाध आला असे मानण्याचे मुळीच कारण नाही. परंतु वस्तुस्थिती मात्र तशी नाही हे येथे कटाक्षाने लक्षात घेतले गेले पाहिजे. कारण तसे काही असते तर नामदेवांच्या समकालीन मंडळींनी या ना त्या रूपाने ह्या गोष्टींचा खात्रीने गाजावाजा केला असता.

विठोबाच्या चरणी कल्पतरूची छाया उपभोगणारे, कामधेनूचे दुभते अनुभविणारे आणि पंढरीरायाचे प्रेमभंडारी झालेले नामदेव आणि ज्ञानियांचे राजे ज्ञानेश्वर हे समकालीन होते किंवा कसे याबद्दलही वाद उभा व्हावा याचे आश्चर्य वाटते. 'तीर्थावळी' या नामदेवांच्या रसाळ काव्यप्रकरणात या दोघांच्या परस्पर संबंधाचा भरभक्कम पुरावा मिळत असूनही कै. सर रामकृष्ण भांडारकर प्रभृतींनी या दोन संत कवींच्यामध्ये एका शतकाचे अंतर मानावे म्हणजे मोठी नवलाची गोष्ट आहे. कै. भांडारकर प्रभृतींच्या या मताचे खंडन कै. पांडुरंग शर्मा यांनी नरसी मेहताच्या आधारे केले असून ते निर्णायक मानण्यास हरकत नसावी. शके १३३५ च्या सुमारास काठेवाडात होऊन गेलेल्या नरसी मेहतांनी पंढरपूरच्या नामदेवांचा उल्लेख केला आहे* त्याअर्थी नामदेवांचे चरित्र हे त्यापूर्वी घडले असणार हे उघड आहे. शिवाय नामदेव

* उल्लेख असे—(१) नामिचे हाथ तिथं दूध पियुला ॥
(२) नामायां छापरां आप्यां छाही ॥
(३) नामदेव गाय सजीवन करे ॥

अनुक्रमणिका

आपली अंध सगुण भक्ती टाकून देऊन भागवत संप्रदायाच्या भक्तिमार्गाकडे वळले ते ज्ञानेश्वरांच्या प्रेरणेनेच वळले ही गोष्टही प्रसिद्ध आहे.

नामदेवांच्या कवितेत मुसलमानांच्या स्वाऱ्यांचे उल्लेख येतात पण ज्ञानेश्वरांच्या लेखनात मात्र ते येत नाहीत; या कारणामुळेदेखील त्या दोघांच्यामध्ये शतकाचे अंतर मानणे चुकीचे आहे. अल्लाउद्दीन खिलजीची दक्षिणेवरील पहिली स्वारी शके १२१६-१७ मध्ये म्हणजे ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर चार वर्षांनी व ज्ञानेश्वरांच्या समाधीपूर्वी वर्ष दोन वर्षेच झाली आहे. त्यामुळे त्यांच्या ग्रंथात या इस्लामी आक्रमणाचा उल्लेख कोठेही आढळत नाही. उलट नामदेव हे ज्ञानेश्वरानंतर ५४ वर्षे जिवंत होते. इतकेच नव्हे तर त्यांपैकी काही वर्षे त्यांनी उत्तरेकडे पंजाबमध्ये वास्तव्य केलेले आहे. तेव्हा या ५४ वर्षांच्या कालावधीत मुसलमानांची जी आक्रमणे दक्षिणेवर झाली होती त्यांचे स्वरूपच असे होते की, कोणत्याही कवीच्या लेखनात त्यासंबंधीचे पडसाद उमटावेत. स्वाभाविकच नामदेवांच्या कवितेत ते उमटले आहेत. ज्ञानेश्वरांनी शके १२१८ मध्ये समाधी घेतली आणि नामदेवांचा अंत शके १२७२ मध्ये झाला. म्हणजे या दोघांत अंतर मानावयाचेच झाले तर ते फार तर अर्धशतकाचे मानावे लागेल. परंतु काही झाले तरी त्या दोघांच्यामधील कालखंडाची तफावत एका शतकाने दाखविणे इष्ट होणार नाही.

तो माझा विठ्ठलु दावा दृष्टीभरी । आस मी न करी आणिकांची ॥
काया वाचा मनें मज तोचि व्हावा । गीतीं गातां जीवा सुख वाटे ॥
सर्व सुख मज आहे त्याचे पायीं । आणिकांच्या वाहीं न पडे कदां ॥
(अ. क्र. ९१३)

पंढरीरायांच्याबद्दल असा श्रद्धाभाव बाळगणाऱ्या नामदेवांनी ज्ञानेश्वरांच्या सहवासात उत्तरेची तीर्थयात्रा एकवेळ केलेली होती तरी देखील ज्ञानेश्वरांनी समाधी घेतल्यानंतर ते पुन्हा उत्तरेकडे गेले होते. पंजाबात गेल्यानंतर तेथे त्यांचे १८–२० वर्षे वास्तव्यही झाले होते. त्यासंबंधीची तपशिलवार माहिती गुरुमुखीत प्रसिद्ध झालेल्या जनमसाखीत* पहावयास मिळते.

शिखांच्या आदिग्रंथात—ग्रंथसाहेबात—नामदेवांच्या नावावरील ६१ पदे समाविष्ट करण्यात आलेली आहेत. शिवाय हिंदी भाषेतील त्यांची आणखी काही रचनाही उपलब्ध झालेली आहे.

---

* पुरणदासकृत.

अनुक्रमणिका

'ग्रंथसाहेबा'तील पदे 'संत नामदेवजीकी गुरुबानी' म्हणून प्रसिद्ध असून शीख धर्मीयांच्या ती नित्य पठणातही आहेत. तथापि या संदर्भात एक प्रश्न असा उद्‌भवतो की, पंजाबी व हिंदी या संमिश्र भाषांतील नामदेवांची रचना लक्षात घेता ही पदे रचणारे नामदेव हे पंढरपूरचे ज्ञानदेवकालीन नामदेव की आणखी कोणी वेगळे नामदेव आहेत हा होय. या पदांची संत नामदेवांच्या अभंगाशी तुलना केली असता दोहोंमध्ये वैचारिक साम्य आढळून येते ही गोष्ट नाकारता येणार नाही. तसेच या पदांचेमधून येणारे चरित्रविषयक उल्लेखही नामदेवांच्या चरित्राशी जुळणारे असे आहेत. विशेषतः त्यांची 'छीपा' म्हणजे शिंपी ही जात, त्यांच्या हातचे नैवेद्याचे दूध देव प्याल्याचा उल्लेख, मंदीर फिरल्याची घटना, सुल्तानाची गाय जिवंत झाल्याचा चमत्कार इत्यादी संत नामदेवांच्या चरित्रातील प्रसिद्ध गोष्टी याही पदांचेमधून उल्लेखिलेल्या आढळतात. 'ग्रंथसाहेबा'तील नामदेव वेगळे असते तर दोघांच्या चरित्रांत एवढे साम्य आढळले नसते. अर्थात या अंतर्गत पुराव्याचे खंडन करणे कठीण आहे.

शीखांच्या 'ग्रंथसाहेबा'त ज्यांची कवने समाविष्ट केली गेली आहेत असे इतर काही कवी जे आहेत ते नामदेवांच्याविषयी जे बोलतात ते पंढरपूरच्या नामदेवासच लागू पडते. संतश्रेष्ठ कबीरांनी नामदेवांचा उल्लेख केला असून त्यांच्या तोंडी घातलेला पुढील मजकूर नामदेवांच्या चरित्रातील आवंढ्या नागनाथाच्या देवळातील प्रसंगाशी जुळणारा असा आहे--

ढूंढत डोलहि अंधगति अरूचिनतनाही संत ।
कहि नामा किउपाइ ऐ बिनु भगतह भगवंतु ॥

याशिवाय 'ग्रंथसाहेबा'तील नामदेवांच्या हिंदीतील पदांमधून मराठी भाषेच्या काही खुणाही आढळतात. उदाहरणार्थ भूतकालवाचक 'ल' हा प्रत्यय—

आनीले कागद, काटीले गूडी । आकासमधे अरमीअले । (रामकली १)

'कस' (कसें) हे सार्वनामिक विशेषण—

राम कहत जन कस न तरे

षष्ठीचा 'च' हा प्रत्यय—

जांचै घरि लछिमी कुंआरी

तसेच या पदांचेमधून येणारा विठ्ठलाचा उल्लेखही सूचक आहे--

ई भै बीठलु उभै बीठलु बीठलु बिनु संसार नहीं (आसावरी २)

अनुक्रमणिका

या प्रकारच्या वरील सर्व प्रमाणांचेवरून व घुमान ( पंजाब, जि. अमृतसर ) येथील नामदेव मंदिरात मिळणाऱ्या माहितीवरून 'ग्रंथसाहेबा'तील नामदेव म्हणजे पंढरपूरचे ज्ञानदेव समकालीन संत नामदेव हेच होत, याविषयी शंका रहात नाही.

तथापि हा मतभेदाचा प्रश्न असून हे दोन नामदेव वेगळे आहेत असे मत श्री. प्रियोळकर यांनी 'विविधज्ञान विस्तारा'मध्ये ( व. ६८, अं. ११-१२ ) सप्रमाण मांडल्याने या संदर्भात आणखी सखोल संशोधन होण्याची आवश्यकता आहे.

तेराव्या शतकात वारकरी संप्रदायाची विचारसरणी आणि भागवत धर्माचा प्रसार करण्याचे महत्त्वाचे कार्य संत नामदेवांनी उत्तरेकडील प्रदेशात केले आणि—

नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥

(अ. क्र. १४९४)

हे आपले स्वप्न साकार करण्याचा प्रयत्न केला ही त्यांची कामगिरी अलौकिक आहे. भागवत धर्माचे महत्त्व उत्तरेकडील लोकांना पटवून देणारे नामदेव हेच पहिले संतशिरोमणी होत.

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठोबाचें ॥

हेंचि घडो मज जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥

मुखीं नाम सदा संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥

(अ. क्र. १६६९)

पंढरीरायांचेबद्दल अशा प्रकारची उत्कट भक्ती आणि अपूर्वाईचा मनोभाव पदरी बाळगणाऱ्या नामदेवांनी आपले अखेरचे दिवस पुन्हा पंढरपुरी घालविले आणि वयाच्या ८० व्या वर्षी तेथेच आपला देह ठेविला. पंढरपूरच्या श्रीविठ्ठल मंदिराच्या प्रवेशद्वारातील 'नामदेवांची पायरी' ही त्यांची समाधी म्हणूनच ओळखिली जाते.

भक्तिप्रेमाची बहार उडवून दिलेल्या या महाभागाने देहभान विसरून, हाती वीणा घेऊन, मुखी हरिनाम धरून आणि अन्नोदक सोडून पंढरीच्या राउळात कवित्व करीत कीर्तनाचा सोहळा पार पाडला. एवढेच नव्हे तर—

केशव तोचि नामा । नामा तोचि केशव ॥

अनुक्रमणिका

या अद्वैताच्या भूमिकेतून देवाशी जवळीक केली. आपली भक्ती ज्ञानाने डोळस राहील हे पाहिले आणि ज्ञानाला भक्तीचा ओलावा दिला—

श्रीहरि श्रीहरि ऐसें वाचे म्हणेन । वाचा धरिसी तरी श्रवणीं ऐकेन ॥
श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहीन । ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥
जेथें जायें तेथें लागलासी आम्हां । न संडी म्हणे नामा वर्म तुझें ॥

(अ. क्र. १४०२)

देवाशी असे बोलणे केले. त्यासाठी अभंगसंकीर्तनाचे माध्यम स्वीकारले.

आपल्या अभंगसंकीर्तनाने मराठीचे राऊळ दुमदुमून सोडलेल्या नामदेवांनी हरिनामाचा सुकाळ एवढ्या जिवाभावाने केला की, 'विठ्ठला' च्या नावाला त्यामुळे एक प्रकारची भव्यता प्राप्त झाली. रात्रंदिवस विठ्ठलाच्या चिंतनात असताना त्यांनी आपल्या बुद्धीला आणि मनाला एवढा शीण येऊ दिला की, त्यामुळे त्या संबंधातील त्यांच्या कवित्वाने बहारीचे कल्पनावैभव प्रकट केले. आपण स्वतः आणि आपले आराध्य दैवत 'श्रीविठ्ठल' यांच्यामधील सहवासात अगर जवळिकेत कसलाही खंड पडू नये याची खबरदारी घेणाऱ्या नामदेवांनी आपला मनोभाव प्रगट करताना भाषेच्या साधेपणातील रहस्य लक्षात घेतले. तिच्या माध्यमातून आपले मन मोकळे करण्याचा प्रयत्न केला. आणि—

भक्ताचें तें गाणें बोबडीया बोली । तें तें विठ्ठलीं अर्पियली ॥

आपल्या कवित्वासाठी ही बैठक स्वीकारली. त्याच बरोबर—

तूंचि माझें व्रत तूंचि माझें तीर्थ । तूंचि धर्म अर्थ काम देवा ॥

आपल्या जीवनाचे सार या रीतीने सांगून टाकले. आणि—

नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥

ही भूमिका स्वीकारून भागवत धर्माच्या प्रचाराचा झेंडा हाती घेतला. त्या कारणाने त्यांची कविता ही त्यांच्या आत्माविष्काराचे साधन बनली. विठ्ठलभक्तीचा आपला छंद पुरा करण्यासाठी 'प्रेम सुख गोडी' चा भरपूर आस्वाद घेऊन तो इतरांनाही देऊ करणे शक्य व्हावे म्हणून नामदेवांनी कवित्वाचे माध्यम पत्करले. त्यामुळे त्यांच्या काव्यलेखनाची पार्श्वभूमी ही परमेश्वराबद्दलच्या नितांत श्रद्धेवर आणि पराकाष्ठेच्या पूज्यबुद्धीवर आधारिली गेली. प्रत्यक्ष स्वानुभवावर त्यांचे लेखन झाल्याकारणाने त्यास एक प्रकारचे ऐतिहासिक महत्त्वही प्राप्त झाले.

श्रीनामदेव महाराजांनी केवळ काव्यलेखन करावे या हेतूने आपल्या काव्यशक्तीला राबविले नसून आपल्या ठायी उत्पन्न होणाऱ्या सहजोद्गाराचे माध्यम म्हणून तिचा

अनुक्रमणिका

स्वीकार केलेला आहे. त्यामुळे त्यांच्या कवितेची भाषा साधी राहिली. तिने नामदेवांच्या आर्त हृदयाचा अप्रतीम आविष्कार केला. साध्या, सरळ आणि समर्पक शब्दांच्या बळावर तिने वत्सल, करुण आणि अद्‌भुत रस सहजतेने हाताळले. पंढरीनगरी, विठ्ठल आणि भक्तिमहिमा या प्रमुख विषयांच्या भोवतीच तिने आपले विश्व उभे केले. त्यामागे नामदेवांनी भागवत धर्माचा प्रसार आणि प्रचार हा मुख्य उद्देश मानला होता. म्हणून त्यांचे काव्यलेखन हे पौराणिक थाटाचे ठरले आणि त्यांचा वर्णित विषय हा अद्‌भुतात विलीन होऊ शकला.

आपल्या कवितेमधून नामदेवांनी त्या त्या वेळच्या आपल्या प्रबळ अशा मनोभावांची स्वाभाविक अशी मांडणी केली आहे. त्यामुळे त्यांच्या अभंगांतून विठ्ठलप्रीतीची उत्कटता आढळून येते. भगवत्‌प्रेमाच्या विविध छटा निरनिराळ्या भूमिकांचेमधून नामदेवांनी मोठ्या सहजतेने साकार केलेल्या आहेत —

महामुक्ति क्षेत्र तीर्थांचें तारक । उपमेशी आणिक नाहीं दूजें ॥ १ ॥
तें हें पंढरपूर प्रेमाचें भांडार । नामें निरंतर गर्जतसे ॥ २ ॥

(अ. क्र. ९३८)

पंढरीनगरीविषयी ही भूमिका धारण केलेल्या नामदेवांनी—

तीर्थें करूनि नामा पंढरीये आला । जिवलगा भेटला विठोबासी ॥ १ ॥
सद्‌गदीत कंठ ओसंडला नयनीं । घातली लोळणी चरणांवरी ॥ २ ॥
शिणलों पंढरीराया पाहें कृपादृष्टी । थोर जालों हिंपुटी तुजवीण ॥ ३ ॥
अज्ञानाचा भाग होता माझे मनीं । हिंडविलें म्हणोनी देशोदेशीं ॥ ४ ॥
परि पंढरीचें सुख पाहतां कोटी वाटे । स्वप्नींही परि कोठें न देखेंची ॥ ५ ॥
उदंडा तीर्थांची ऐकों जाय प्रौढी । परि चित्त माझें ओढी चंद्रभागा ॥ ६ ॥
म्हणोनि चरणांची ठाकोनी साउली । आलों मज सांभाळी मायबापा ॥ ७ ॥

(अ. क्र. ९२३)

विठ्ठलाशी केलेले असले सुखसंवाद आकर्षक झालेले आहेत.

नामदेवांच्या अशा कवित्वामुळे सामान्यजनांच्या बुद्धीस सहजतेने मोठा चटका लागून राहिलेला आहे. अनेकांच्या वाचनामध्ये, कित्येकांच्या पठणामध्ये, काहींच्या गायनामध्ये आणि वारकऱ्यांच्या भजनकीर्तनामध्ये नामदेवांच्या कवितेने आपले वेगळे स्थान निर्माण केलेले आहे. त्यामागे आवर्जून श्रद्धा उभी ठाकलेली आहे व भक्ती उचंबळून आलेली आहे.

त्या कारणाने 'अमृताहुनी गोड नाम तुझें देवा' असे नामदेवांनी का म्हटले असावे याचा उलगडा होऊ शकलेला आहे.

अवघी ही पंढरी सुखाची वोवरी । अवघ्या घरोघरीं ब्रह्मानंद ॥
अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे । अनुसरे तो लाहे सर्वसुख ॥
पहावा नयनीं ऐकावा श्रवणीं । अवघा ध्यावा ध्यानीं अवघ्या मनें ॥
अवघा ओळखोनि अवघा गिळिजे मनें । अवघा हाचि होणें म्हणे नामा ॥

(अ. क्र. ४१४)

अवघ्या ब्रह्मांडाचे दर्शन पंढरीत घेणाऱ्या नामदेवांच्या या लेखनात काव्य, भक्ती आणि ज्ञान यांचा मोठा सुरेख संगम झालेला आहे.

ज्ञानेश्वरादि भावंडांची चरित्रे सांगताना, तीर्थावळी आणि समाधीसंबंधीचे लेखन करताना नामदेवांची वाणी मोठी रसाळ उतरलेली आहे. त्यांच्या या लेखनात कल्पनेच्या उत्तुंग भराऱ्या नसल्या तरी भावकतेची संपन्नता मात्र जरूर आहे--

कोटि सूर्य प्रभादीप्ति । गगनीं झळकली अवचिती ॥
संत नामयासी सांगती । पैल आला कमलापती ॥
वच्छालागीं जैसी धेनु । तैसा धांवे जगज्जीवनु ॥
गरुडाचे पक्षवाति । दाही दिशा आक्रंदती ॥
हरि कंठींची सुमनमाळ । सुटूनि आली भूमंडळा ॥
सवें चाललें सुदर्शन । भक्त करावया रक्षण ॥
उचलोनि दोहीं बाहीं । नामा धरिला हृदयीं ॥

(अ. क्र. १७७६)

ईश्वर दर्शनाचे नामदेवांनी केलेले हे वर्णन सुंदर आहे. काव्यमय आहे. प्रतिभासंपन्न आहे.

तीर्थयात्रेला जाण्यासाठी म्हणून ज्ञानदेव ज्यावेळी नामदेवांना बोलाविण्यासाठी आले त्यावेळी—

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले । लोटांगण घातलें नामदेवें ॥ १ ॥
देऊनी आलिंगन प्रीतीच्या पडिभारें । पूजिलें आदरें यथा विधी ॥ २ ॥
धन्य तो अवसरू संतसमागमू । करीतसे संभ्रमु आवडीचा ॥ ३ ॥
नामदेव म्हणे सफळ माझें जिणें । स्वामिच्या दर्शनें धन्य जालों ॥ ४ ॥

(अ. क्र. ९०३)

पूर्व पुण्य माझें फळोन्मुख जालें । प्रत्यक्ष भेटले पांडुरंग ॥ १ ॥

(अ. क्र. ९०४)

अनुक्रमणिका

नामदेव आनंदाने भारावून गेले आणि—

हांसोनि पंढरिनाथ पाहे नाम्याकडे । म्हणे नवल केवढें भाग्य तुझें ॥ १ ॥
प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ति ज्ञानेश्वर । करितसे आदर संगतीचा ॥ २ ॥
ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें । तरिच जन्मा यावें विष्णुदासा ॥ ३ ॥
जावें स्वस्तिक्षेम यावें शीघ्रवत । करावें स्वहित कळेल तैसें ॥ ४ ॥
सर्व भावें आमचा विसरू न पडावा । लोभ असों द्यावा मजवरी ॥ ५ ॥

(अ. क्र. ९०८)

खुद्द विठ्ठलाची ही अवस्था झाली! त्याकारणाने नामदेवांची अशी कविता वाचताना वाचकही भावसिंधूत हेलावून उठतो, त्या भावनाविष्कारात तल्लीन होऊन जातो. म्हणून हे भावमधुर आणि आत्मनिष्ठ काव्य वाचण्याचा किंवा ऐकण्याचा मोह भाविक, श्रद्धाळू मनाला टाळता येत नाही.

संत नामदेवांनी अधून मधून आपल्या कवितेत अलौकिक अशा अद्भुत चमत्कारांचीही पेरणी केलेली आढळून येते. तीर्थयात्रेच्या निमित्ताने होणाऱ्या प्रवासात असताना तहानेने व्याकूळ झालेल्या नामदेवांना मारवाडातील पाण्याचे दुर्भिक्ष एवढे जाणवले की, त्यांनी—

तुझिये भेटीची बहु खंती वाटली । आसुवें दाटलीं नेत्रकमळीं ॥
धीर न धरवे जीवा पोकारितो धांवा । ये माझ्या केशवा मायबापा ॥

(अ. क्र. ९२०)

आर्ततेनें विठ्ठलाचा असा धावा केला! त्यांची ही आर्त हाक ऐकून प्रत्यक्ष परब्रह्मही त्यावेळी साक्षात त्यांच्यापुढे ठाकले आणि क्षणार्धात त्या रखरखीत मुलुखात—

तंव गडगडीत कूप उदकें ओसंडला । कल्पांतीं खवळला सिंधु जैसा ॥

(अ. क्र. ९२१)

हा चमत्कार घडून आला!!

त्यामुळे त्यावेळी ज्ञानदेवांनी त्या प्रवासात असतानाच त्या अपूर्वाईबद्दल आपला मनोदय—

तीर्थयात्रे जाणें न लगे कांहीं करणें । ऐकोनी तुझें गाणें सुखरूप ॥

(अ. क्र. ९२२)

यापरीने प्रकट करीत नामदेवांना धन्यवाद दिले.

ज्ञानेश्वर, नामदेवादि संतकवी हे मुख्यतः साक्षात्कारी संत होते. काव्यरचना त्यांनी केली ती केवळ ईश्वरभक्तीचेच एक साधन मानून केली. कीर्तनाद्वारे केल्या जाणाऱ्या भक्तीचे माध्यम म्हणून नामदेवांनी अभंगरचना केली. त्यांनी आपल्या भावानुभवांशी मिळत्याजुळत्या अशा प्रतिमा उभारल्या आणि आपल्या प्रकट चिंतनाचा एक भाग म्हणून काव्याकडे पहाताना त्यांनी—

कोटि दिवाळ्या दसरे । आम्हां हेचि जाले पुरे ।
घरोघरीं ओवाळणी । विठ्ठल देखिला नयनीं ॥

(अ. क्र. १७७२)

अनुक्रमणिका

आपल्या आध्यात्मिक अनुभवाला सामान्यांच्य. परिभाषेत नेऊन सोडले.

नामदेवांनी आपल्या कवित्वासाठी षडक्षर चरणात्मक निवृत् गायत्री अभंग छंद बराचसा वापरला असून या छंदाचे लक्षणही पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे—

अभंगाची कळा नाहीं मी नेणत। त्वरा केली प्रीत केशीराजें ॥ १ ॥
अक्षरांची संख्या बोलिले उदंड। मेरू सुप्रचंड शर आदी ॥ २ ॥
सहा साडेतीन चरण जाणावे। अक्षरें मोजावीं चौक चारी ॥ ३ ॥
पहिल्यापासोनि तिसऱ्यापर्यंत। अठरा गणीत मोज आलें ॥ ४ ॥
चौक चारी आदी बोलिलों मातृका। बाविसाची संख्या शेवटील ॥ ५ ॥
दीड चरणाचें दीर्घ तें अक्षर। मुमुक्षु विचार बोध केला ॥ ६ ॥
नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी। प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ॥ ७ ॥

(अ. क्र. १३८२)

संतशिरोमणी नामदेवांच्या कवितेमध्ये प्राचीन मराठीची साक्ष देणारे—

"प्रीती पडीभरें, अवसरू, संभ्रमु, आसक्त, मोहरत, तापत्री संतप्त, रजरेणु, भाते, ठाकीन, फावली, न संडिती, आर्त, हासिन्नले, विसरू, सांकडे, दाटले, पैलपारू, बोळविला, निडारले, दिठी, पढियंते, कीजे, धवळले, रत्नकीळ, जळदनीळ, मळवटु, ल्लाटीं" इत्यादी शब्द गवसतात. मात्र या कवितेत अनेकदा प्रत्यय, विभक्तीरूपे व क्रियापदरूपे ही बरीचशी अर्वाचिनलेलीही आढळून येतात. अर्थात हा दोष मूळच्या पद्याची नक्कल करणारांनी केलेला असला पाहिजे. कारण नक्ला करणारे हे प्राय: शास्त्रीय भाषेचे अभ्यासक नसतात. केव्हा केव्हा उदरनिर्वाहाचे साधन म्हणूनही हे काम त्यांनी पत्करलेले असते.

त्यामुळे मजकुराची जुनी भाषा डोळ्यांनी पहावयाची व तिचा उच्चार स्वकालीन भाषेप्रमाणे तोंडातल्या तोंडात जिभेच्या सहाय्याने करून त्यावेळी नकळत तयार होणारी अर्वाचीन भाषा हाताने लिहावयाची हा नकलकारांचा सर्वत्रच परिपाठ आहे. म्हणून नामदेवांची कविताही या गोष्टीला अपवाद राहू शकली नाही. ज्या मानाने कवितेचा प्रसार अधिक त्या मानाने त्यात पालटही अधिक व्हावा हे या संदर्भात ओघानेच येते.

तथापि "निडारलें नयन स्वेदें भिजलें वदन। हृदय जालें पूर्ण करुणारसें॥" एवढ्या जिव्हाळ्याने नामदेवाकडे पहाणाऱ्या विठ्ठलासंबंधी नामदेवांनी लिहिलेली कविता जनमानसाने एवढी जवळ केली की, हे दोष सहसा कोणाच्याही लक्षात येऊच नयेत. नामदेवांचे लेखन हे त्यांची स्वत:ची परंपरा घेऊन येतच विकसित झालेले आहे.

अनुक्रमणिका

परंतु नामदेव केवळ कवित्व करून थांबले नाहीत. इतर संतांनी केले नाही असे अधिक मोलाचे कार्य त्यांनी करून दाखविले. आयुष्याची जवळ जवळ ५४ वर्षे त्यांनी भागवत धर्माच्या प्रचारासाठी वेचली. पंढरपूरच्या भक्तिमार्गाची पेरणी त्यांनी पंजाबात केली. त्यांच्या या कार्यातूनच पुढे रामानंद, कबीर, नानक, रैदास, पीपा इत्यादी संत निर्माण झाले. त्या सर्वांच्या काव्यांतून नामदेवांचा उल्लेख आलेला आहे.

पंजाबात नामदेवांचे अनेक शिष्य होऊन गेले. त्यापैकी विष्णुस्वामी, बहोरदास, जाल्हो, लध्धा आणि केसो हे प्रमुख होत. त्यांचेपैकी काही पंढरपुरीही येऊन गेले असावेत. सध्या पंजाबातील 'घुमान' या गावी नामदेवांचे स्मारकमंदिर असून ते 'गुरुद्वारा बाबा नामदेवजी' या नावाने प्रसिद्ध आहे. नामदेव जिथे रहात असत तिथे त्याच जागेवर त्यांच्या पट्टशिष्याने—बहोरदासाने हे मंदिर उभारले असे तेथील मंडळी मानतात. घुमान येथील मंदिरात पत्र्यावर कोरलेले एक नामदेवांचे चित्रही आहे. येथे माघ शु. २ स मोठी यात्रा भरते. नामदेवांच्या शिष्यांना या भागात 'बाबा नामदेविए' असे म्हणतात. संख्येने ही मंडळी बरीच आहे.

पंजाबातील बहुतेक शिंपी नामदेव संप्रदायी असून तिकडे त्यांना चिंबा किंवा छिपा असे म्हणतात. या भागात नामदेवांची अनेक मंदिरे (गुरुद्वारा) असून त्यांच्या नावाने स्थापिल्या गेलेल्या अनेक संस्थाही आहेत.

प्रचाराची व प्रवासाचीही फारशी साधने हाताशी नसताना नामदेवांनी जे कार्य केले ते आश्चर्यकारक होते यात शंका नाही. हे कार्य करताना नामदेवांनी कोणताही स्वार्थ पदरी बाळगिला नव्हता. संत मंडळींनी सुखात रहावे, हरिदास चिरंजीव ठरावेत, ज्यांच्या मुखी पांडुरंग आहे त्यांचे कल्याण व्हावे एवढीच देवापाशी त्यांची प्रामाणिक मागणी होती. नामदेवांच्या या निःस्वार्थ कार्यास व कवित्वास उदंड आयुष्य लाभेल यात तिळमात्रही शंका असू नये.

भक्त भागवत बहुसाल ऐकिले । बहु होऊनि गेले होती पुढें ॥
परि नामयाचें बोलणें नव्हे हें कवित्व । हा रस अद्‌भुत निरूपमु ॥
हे सुख विश्रांति नाहीं हो कल्पांतीं । विचारावें संतीं दूरदृष्टी ॥
हे खुण जाणतां एक पंढरीराव । रुखमादेवी नाहो श्री विठ्ठल ॥
(अ. क्र. ९१८)

ज्ञानदेवांनी नामदेवांबद्दलचा आपला मनोभाव या रीतीने म्हणूनच प्रकट केला असावा. म्हणून ज्ञानदेवांप्रमाणेच आपल्यालाही म्हणावयाचा मोह निश्चितपणे होतो की, संत नामदेवांसारखा भक्त आजवर झाला नाही व यापुढेही तो होणे नाही.

अनुक्रमणिका

## समितीकडे उपलब्ध झालेल्या सर्व हस्तलिखित पोथ्यांची माहिती

| प्रतीचे नाव | प्रतीचा क्रमांक | प्रतीमधील एकूण अभंग | मराठी | अमराठी | प्रतीची लांबी-रुंदी | लेखनासंबंधी माहिती | नामदेवाच्या नावावरचे अभंग | इतरांच्या नावावरील अभंग |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| पंढरपूर "श्री" प्रत .. | १ | २६४ | २६३ | १ | ३३×२१·५ सें. मी. .. | नामदेव जन्म नोंद कार्तिक शुद्ध ११, ११९२, समाधी १२७२, आषाढ वद्य १३. | १९८ | ६६ |
| पंढरपूर "अ" प्रत .. | २ | ६१० | ६०७ | ३ | ३३×२० सें. मी. .. | काही नाही .. | ५६५ | ४५ |
| पंढरपूर "आ" प्रत .. | ३ | ८४९ | ८४८ | १ | ३३×२० सें. मी. .. | काही नाही .. | ८३५ | १४ |
| पंढरपूर "ए" प्रत .. | ४ | ३०५ | ३०५ | ० | २१×१५ सें. मी. .. | काही नाही .. | २५ | २८० |
| पंढरपूर "ऐ" प्रत .. | ५ | १८० | १८० | ० | १४×२१ सें. मी. .. | काही नाही .. | १७९ | १ |
| पंढरपूर "ओ" प्रत .. | ६ | २४८ | २४८ | ० | २०×१६ सें. मी. .. | काही नाही .. | ० | २४८ |
| पंढरपूर "औ" प्रत .. | ७ | १ | १ | ० | १६×१३ सें. मी. .. | काही नाही .. | १ | ० |
| पंढरपूर "च" (१,२,३) .. | ८ | १२६ | १२६ | ० | २२·५×१२·५ सें. मी. .. | काही नाही .. | १२३ | ३ |
| पंढरपूर "ज" प्रत .. | ९ | २५ | २५ | ० | १६×१०·५ सें. मी. .. | काही नाही .. | २५ | ० |

अनुक्रमणिका

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पंढरपूर "न" प्रत | .. | १० | २२ | २२ | ० | २१×१६·५ सें. मी. .. | काही नाही | .. | १२ | १० |
| पंढरपूर "प" प्रत | .. | ११ | २४ | २४ | ० | २१×१६·५ सें. मी. .. | काही नाही | .. | १८ | ६ |
| पंढरपूर "ब" प्रत | .. | १२ | २६ | २६ | ० | १९·५×११ सें. मी. .. | काही नाही | .. | २४ | २ |
| पंढरपूर "य" प्रत | ... | १३ | १११ | १११ | ० | २०×१५ सें. मी. .. | काही नाही | .. | १०९ | २ |
| पंढरपूर "र" प्रत | .. | १४ | १७ | १७ | ० | २०·५×१६ सें. मी. .. | काही नाही | .. | १७ | ० |
| पंढरपूर "ळ" प्रत | .. | १५ | १२ | १२ | ० | २०·५×१५·५ सें. मी. .. | काही नाही | .. | ९ | ३ |
| पंढरपूर "व्" प्रत | .. | १६ | ९ | ९ | ० | २०·५×१६ सें. मी. .. | काही नाही | .. | ९ | ० |
| पंढरपूर "श" प्रत | .. | १७ | २४ | २४ | ० | २०·५×१६ सें. मी. .. | काही नाही | .. | १५ | ९ |
| पंढरपूर "ष" प्रत | .. | १८ | ८५ | ८५ | ० | २०×१६ सें. मी. .. | काही नाही | .. | १९ | ० |
| पंढरपूर "स" प्रत | .. | १९ | २६० | २६० | ० | १४·५×९ सें. मी. .. | काही नाही | .. | २४१ | १९ |
| पंढरपूर "ह" प्रत | .. | २० | ७० | ७० | ० | १६×१३ सें. मी. .. | शके १६५७ राक्षस संवत्सरे, कार्तिक शुद्ध ६. | | ६६ | ४ |
| पंढरपूर "क्ष" प्रत | .. | २१ | २३ | २३ | ० | २१·५×१७·५ सें. मी. .. | काही नाही | .. | १३ | १० |
| शिरवळ प्रत (शि.) | .. | २२ | १२३२ | १२२८ | ४ | ३२·५×२०·५ सें. मी. .. | काही नाही | .. | ९८४ | २४८ |
| भाळुंकर प्रत (भा.) | .. | २३ | ३९८ | ३९२ | ६ | ३४×२१ सें. मी. .. | काही नाही | .. | २७२ | १२६ |
| गंगावने प्रत (गं.) | .. | २४ | ५४ | ५२ | २ | ३३×१९ सें. मी. .. | काही नाही | .. | ५४ | ० |
| तंजावर प्रत (तं.) | .. | २५ | १३० | १३० | ० | .... | काही नाही | .. | १२१ | ९ |

**समितीकडे उपलब्ध झालेल्या सर्व हस्तलिखित पोथ्यांची माहिती—समाप्त**

| प्रतीचे नाव | प्रतीचा क्रमांक | प्रतीमधील एकूण अभंग | मराठी | अमराठी | प्रतीची लांबी-रुंदी | लेखनासंबंधी माहिती | नामदेवाच्या नावावरचे अभंग | इतरांच्या नावावरील अभंग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धुळे प्रत (धु.) .. | २६ | २१४८ | २१४७ | १ | .... .. | शके १५५३ ते १५५६ या काळात लिहिले आहे. रामेन लिखितम् १६९१, कार्तिक शुद्ध ७ विरोधी. | १८३६ | ३१२ |
| पाटसकर १ (पा.) .. | २७ | १४३ | १४३ | ० | २९×१६ सें. मी. .. | काही नाही .. | १४३ | ० |
| पाटसकर २ (पा.) .. | २८ | ७० | ७० | ० | २२·५×१२·५ सें. मी. .. | पौंस शुद्ध ४, सन १२५६ | ७० | ० |
| वही क्रमांक १८ .. | २९ | ११६ | ११६ | ० | २२·५×१२ सें. मी. .. | शके १६९७, भाद्रपद कृष्ण १४, शनवार. | १०६ | १० |
| नगर प्रत (न.) .. | ३० | ५२७ | ५२७ | ० | २३×१२·५ सें. मी. .. | काही नाही .. | ४४४ | ८३ |

अनुक्रमणिका

## श्रीभक्त शिरोमणी संत नामदेव महाराजांची भक्तिज्ञाननिष्ठा आणि अपूर्व व्यक्तिमत्त्व

महाराष्ट्रीय संतमंडळींत श्री नामदेव महाराजांचे स्थान अनन्यसाधारण आहे. त्यांची श्रीविठ्ठलेशावरील भक्ती निस्सीम व पराकोटीची होती, हे महाराष्ट्रांत सर्वश्रुत आहे. श्रीज्ञानराज माउलींनी महाराष्ट्रांत भागवत धर्माचा अर्थात् वारकरी संप्रदायाचा पाया घातला आणि वारकरी भक्तिमार्गाला जे तत्त्वज्ञानाचे भक्कम अधिष्ठान दिले त्या संप्रदायाचा प्रचार व प्रसार श्रीनामदेव महाराजांनी येथे धडाडीने केला, हे सर्वांना ठाउकी आहे ; पण हा प्रसार त्यांनी केवळ या महाराष्ट्रापुरता सीमित केला नाहीं ; तर तो उत्तर भारतांतही केला. श्रीविठ्ठलाला सोडून पंढरपुराबाहेर तीर्थयात्रेलाही जाण्यास तयार नसलेल्या श्रीविठ्ठलाच्या एकनिष्ठ भक्ताने गुजरात, राजस्थान, पंजाब, उत्तर प्रदेश अशा अनेक प्रांतांतील शहरांत व खेड्यांत भागवत धर्माची पताका फडकावली ; एवढेच नव्हे तर आपल्या उत्तर आयुष्यांत ' पंजाब ' ही आपली ' कर्मभूमी ' केली व दीड तपाहून अधिक काळ तेथे राहून, त्या प्रांतांत व आसमंतातील प्रदेशांत भागवत धर्माच्या " भक्ति-ज्ञानाची गंगा " नेऊन परकीय स्वाऱ्या व आक्रमणांनीं होरपळून निघालेल्या जनतेला ' अमृत-संजीवनी ' दिली, तेथील जनतेत नवचैतन्य ओतले आणि स्वधर्म रक्षणाकरिता सिद्ध राहण्याची केवढी व कशी तयारी केली, याची महाराष्ट्रांत घ्यावी तेवढी दखल अद्यापिही घेतली नाहीं. पंढरीच्या वाळवंटांतील विठ्ठल नामाचा गजर आणि भागवत धर्माच्या " भक्ति-ज्ञाना " चे रहस्य श्रीनामदेव महाराजांनीं उत्तरेतही कसे गाजविले, हे कळून येते ; पण याचा उद्‌घोष महाराष्ट्रांत जितका व्हावा तितका अद्यापि झालेला नाहीं. ती माहिती व श्रीनामदेव महाराजांचे संपूर्ण 'व्यक्तिमत्त्व' व 'कार्य' आपल्यास येथे थोडक्यात पाहावयाचे आहे.

श्रीपुंडलिक रायांनीं श्रीविठ्ठलाला विटेवर उभे केले ; त्या दैवताचा संप्रदाय व वारी श्रीज्ञानदेव महाराज व श्रीनामदेव महाराज यांच्या उदयापूर्वी सुमारे दोनशे-तीनशे वर्षे तरी असावी असे इतिहास संशोधकांचे मत आहे. त्यांच्यापूर्वी श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी एक " श्री पांडुरंगाष्टक " लिहिले आहे; ते सर्वजन प्रसिद्ध आहे. त्यावेळी आजच्या संप्रदायाची शान, मान व प्रतिष्ठा नव्हती. त्यावेळी महानुभाव व लिंगायत पंथही आपल्या संप्रदायाचा प्रचार करीत होते. ते दोन्हीही पंथ अवैदिक असल्याने व वैदिक तत्त्वज्ञानाची त्यांना बैठक नसल्याने शिवाय महानुभाव पंथांत त्यांच्या लिपीची दुर्बोधता व विचाराची गुप्तता असल्याने जनमानसावर त्यांची छाप पडत नसे. हेमाद्री, रोप देवासारखी पंडित मंडळी संस्कृत धर्मग्रंथावर संस्कृत भाषेतच टीका करीत अगर ग्रंथरचना करीत ; ह्यामुळें प्राकृत जनांना त्याचा काही उपयोग नव्हता. आध्यात्मिक उन्नतीकडे नेणारा व जनमानसांत चैतन्याचा संचार करणारा असा जोमदार पंथ उदयास आला नव्हता ; ही उणीव भरून काढणारा 'भागवत धर्माच्या भक्ति-ज्ञानाचा दीप' श्रीसंत ज्ञानदेव आणि श्रीसंत नामदेव यांनी उजळला आणि जनतेला अंधारातून प्रकाशात-ज्ञान प्रकाशात आणिले.

महाराष्ट्रांत जो ' वारकरी-संप्रदाय ' हल्ली चोहीकडे फैलावला आहे, त्याचा संत बहिणाबाईच्या सर्वतोमुखीं असलेल्या अभंगाप्रमाणे " ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिले देवालया ।। " हे खरे आहे. श्रीज्ञानराज माउलींनीं आपल्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, हरिपाठ आणि अभंग-गाथा यांतील भक्ती, ज्ञान, योग, निष्काम कर्म आणि नामभक्तियोग यांच्या सुबोध



अनुक्रमणिका

विवेचनाने मूळच्या वारकरी-संप्रदायाला तत्त्वज्ञानाचा भक्कम आधार, प्रतिष्ठा व ओज प्राप्त करुन दिले आणि श्रीविठ्ठलेशासही डोलायला लावणाऱ्या भक्तिरसाने ओथंबलेल्या आपल्या रसाळ व प्रबोध संपन्न वाणीच्या कीर्तनांनी श्रीनामदेव महाराजांनी श्रोतृवृंदाला मंत्रमुग्ध करुन सोडणारे वातावरण महाराष्ट्रांत निर्माण केले व ते श्रीविठ्ठलाच्या नामगर्जनांनी दुमदुमून टाकले.

'पंढरपूर' हे नावच ते पांडुरंगाचे नगर असल्याचे दर्शविते आणि मूळ 'पांडुरंग' हे दैवत नाम त्या देवाचा वर्ण पांढरा म्हणजे गोरा असल्यानें तें अर्थात् शिवाचे अभिधान असल्याचे सुचविते. पंढरपूर हे पहिले शैव-शिवाचे क्षेत्र होते.

शिवाय 'पांडुरंगाचे-पुर' ते 'पंढरपूर' असे ग्रामनाम पडले, असेही काहींचे मत आहे. तसेच जेथे 'शुभ्र' व 'कृष्ण' या उभयवर्णांच्या छटा संमिश्र झालेल्या असतात, त्या वर्णछटेस "पाण्डुर" असे म्हणतात, व असेही सांगतात की, श्रीकृष्णावतारांत भगवान गाईंच्या समवेत रानोरानीं त्यांना चारीत जात असल्यामुळे पांढऱ्या मातीची पांढरी ' गगन गाळीव ' धूळ भगवंताच्या अंगावर बसत असे. सांवळ्या अर्थात् कृष्णनील वर्णाने सुशोभित असणाऱ्या श्रीकृष्णाच्या देहावर " समता-शुभ्रवर्ण " धूळ बसल्याने तो देह " तेवी सत्यासत्य समरसे । सत्यासत्यचि जिणिजे "---परस्परा ध्यासाने सदसत्-विलक्षण, अनिर्वचनीय असा तिसऱ्या " पांडुर " रंगाचा दिसू लागला. त्यामुळे श्रीकृष्णास "पांडुरंग" असे नाव पडले. तोच श्रीकृष्ण-पांडुरंग पुंडलिकाच्या भावार्थासाठी गोकुळाहून पंढरीस आला. याविषयी श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

पुंडलिकाच्या भावार्था । गोकुळीहुनी झाला येता ।
निजप्रेम भक्ति भक्ता । घ्या घ्या आतां म्हणतसे ।। श्रीज्ञानेश्वर महाराज ।।

याप्रमाणे " कर कटावरी ठेवूनिया, ते सुंदर ध्यान विटेवरी उभे राहिले " असा उपलब्ध " इतिहास इति-ह-आस" आहे ; असो.

भक्त पुंडलिकरायाने आपल्या भक्तिबळाने श्रीविठ्ठलास यावयास लावले व विटेवर उभे केले. " पुंडलिकाचें भेटीं परब्रह्म आले गा ! " असे श्रीनामदेव महाराजांनींच म्हटले आहे. आज जी श्रीविठ्ठलमूर्ती कमरेवर हात ठेवून उभी आहे. किंबहुना ! श्रीविठ्ठल-मूर्ती ही शिव आणि विष्णू यांची ऐक्यमूर्ती " परब्रह्म लिंग भजे पांडुरंगम् " आहे. ती पुराणांतील कोणतीही विशिष्ट देवता नसून, ते निर्गुण-निराकार परब्रह्माचे सगुण-साकार रुपडे आहे. इतर क्षेत्रे त्या त्या विशिष्ट देवतेसाठी असतात ; पण श्रीक्षेत्र पंढरपूर, हे ' पाण्डुरंगा' चे म्हणजे साक्षात् निर्गुण-निराकार परब्रह्माचें अतीन्द्रिय स्वरुप असून ही इंद्रियांकरवी येथे त्याचे दर्शन घडविणारे क्षेत्र आहे. ह्यासारखे दुसरे कोणतेही क्षेत्र ह्या भूतलावर – अवनीच्या पाठीवर नाही, असे श्रीनामदेव महाराज म्हणतात. " ऐसे क्षेत्र कोणी दाखवा। गोमटे जेथें प्रत्यक्ष भेटे परब्रह्म।। " —श्रीनामदेव गाथा.

अमूर्ताला मूर्तरूप, निराकाराला आकार देणाऱ्या व भक्तावर दया करुन, त्याचा उद्धार करणाऱ्या श्रीविठ्ठलाची भक्ती श्रीनामदेवरायांच्या घराण्यांत पूर्वीपासून होती. त्या सांवळ्या सुमनोहर रुपाचे दर्शन होताच देहभाव हरपून सोडणारी चित्तवृत्ती श्रीनामदेवरायांमध्ये उपजतच होती. औंढ्याच्या ज्योतिर्लिंगाच्या स्थानाजवळ नरसी हे त्यांचे मूळचे गाव होय. तेथे त्यांचे आई-वडील राहत. त्यांच्या घरी शिवाची भक्ती आणि पंढरीची वारी होती. श्रीनामदेवराय वारंवार पंढरीला जात. देवाला पाहताच त्यांचे अंत:करण भक्तीने उचंबळून येई आणि

बाळ जसे आईला पाहताच तिजकडे धाव घेते आणि तिला कवटाळून स्तनपान मागते ; त्याप्रमाणे श्रीनामदेवरायांना होई व ते श्रीविठ्ठलाला म्हणत—

तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा।
पाजी प्रेम पान्हा पांडुरंगे ।।
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस ।
तोडी भवपाश पांडुरंगे ।। श्रीनामदेव गाथा

व देवाला अशा लडिवाळपणानें आळवीत त्यांची पांडुरंगावरील निष्ठा इतक्या पराकोटीची होती की,

देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ-भावो।। १ ।।
चरण न सोडी सर्वथा। आण तुझी पंढरीनाथा।। २ ।।
वदनीं तुझें मंगळ नाम। हृदयीं अखंडित प्रेम ।। ३।।
नामा म्हणे केशीराजा । केला पण-नेम चालवी माझा ।। ४ ।।

आपला हा निश्चय अखंड आणि अबाधित चालावा असे त्यांना वाटे ; पण प्रपंचाच्या कटकटींतून कित्येक वेळा तसें घडत नसे. त्याची त्यांना खंत वाटे व देवाला म्हणत—

अमृताहूनि गोड नाम तुझें देवा ।
मन माझें केशवा का बा नेघे ।। १ ।।
सांग पंढरीराया काय करूं यासी ।
कां रूप ध्यानासी नये तुझें ।। २ ।।
कीर्तनीं बैसतां निद्रें नागवीलें ।
मन माझें गुंतलें विषयसुखा ।। ३ ।।
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति ।
नये माझ्या चित्तीं नामा म्हणे ।। ४ ।। श्रीनामदेव गाथा

तुझे नाम खरोखर अमृतापेक्षांही गोड आहे ; पण माझे दुर्दैव असे कीं, प्रपंचाच्या यातनांमुळें ते कित्येकदां घ्यायला बनत नाहीं आणि तुझें ध्यानही प्रपंचाच्या त्रासानें नीट लागत नाही. याला काय करू तो उपाय सांग. कीर्तनाला बसलों तर झोप येऊं लागते, नाहीतर चित्त विषयाकडे धांवते-धांव घेते. हरिदास नामाच्या कीर्ती गातात व त्याचा जोरजोरानें घोष करितात; पण काही वेळा माझे लक्षच लागत नाही. माझ्यामध्ये अनेक दोष आहेत व मी अपराधी आहे, असे वाटू लागते. " काय गुण दोष माझे विचारिसी । आहे मी तो राशी अपराधांची ।। " " आतां तूंच माझा गुरु तूंच माझा स्वामी । सकळ अंतर्यामी गाऊं तुज ।। " असा मी निर्धार केला आहे, तो तडीला ने. मी तुझ्यासाठी कितीही तडफडलो व हाल सोसले तरी तुझी कृपा असल्याशिवाय माझे श्रम सफल होणार नाहीत. हरीच्या चिंतनांत बराच काळ गेला तरी त्याची भेट होत नाही, हे दिसल्यावर मन अधीर होऊन ते म्हणत—

हरि रे वाड वेळ झाला।
कोण्या भक्तानें गोविला ।। १ ।।
झडकरी येईं गा विठ्ठला ।
कंठ आळवितां शोषला ।। २ ।।
प्राण केव्हां येइल माझा ।
आलिंगिल चहूं भुजा ।। ३ ।।



अनुक्रमणिका

नामा गंहिवरें दाटला ।

पूर धरणियें लोटला ।। ४ ।। श्रीनामदेव गाथा

अशी स्थिती झाली तरी जर परमेश्वराने भेट दिली नाही तर भक्तालाही राग व रुसवा येतो व तो म्हणू लागतो —

पतितपावन नाम ऐकुनी आलों मी दारा ।

पतितपावन न होसी म्हणुनी जातो माघारा ।।

इतकी एकनिष्ठ भक्ती करुनही तुझे मन द्रवत नाही तर मी आता परतच जातो. " सोडी देवा ब्रीद आतां न होसी अभिमानी । पतित पावन नाम तुजला ठेवियलें कोणी । " हेच मला कळत नाहीं ' पतितपावन ' ह्या ब्रीदाचा तुला मुळी अभिमानच नाही, ते आता टाकून दे. तुझा उदारपणा तरी काय वानावा ? " घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार । व्यर्थ मी कां रोधूं तुमचं कृपणाचे दार ।। " तुझ्यासारख्या कंजूषाच्या दारात उभे राहण्यात काही अर्थ नाहीं माझी आता पक्की खात्री झाली आहे की, तू पतितांचा उद्धार करणारा मुळीच नाहीस. तेव्हा–

हातीं घेऊनि झांगड झेंगा फिरेन त्रैलोकीं ।

पतित पावन न होसी ऐसा मोठा घातकी ।।

नामा म्हणे देवा । तुमचे न लगे मज कांहीं ।

प्रेम असो द्या हृदयी, तुमचे लागतसे पायीं ।।

हातात आता झांज घेऊन तिच्या दणदणाटांत असा डांगोरा पिटतो की, हा देव मुळीच पतितपावन नाही, तो खोटी आशा लावून विश्वासघात करणारा आहे, तुमचे मला काहीही नको. मी तुमचे पाय चित्तात सदा आठवीत राहीन. तुमच्या हृदयांत प्रेम तेवढे असू द्या म्हणजे मला पुरे झाले.

रुसवा धरला तरी श्रीनामदेवरायांना पंढरीनाथावाचून दूर कोठे रहावत होते ? आणि देवाला तरी त्यांच्यावाचून कोठे चैन पडत होती ?

स्फुंद स्फुंदोनि नामा उभा महाद्वारीं ।

चित्त पायावरी विठोबाच्या ।। १ ।।

उभा दिनानाथ उभारुनी बाहे ।

पालवीत आहे पीतांबरे ।। २ ।।

आरता येरे नाम्या धरिलासे पोटासी ।

कोणें गांजलासी दुर्जनानें ।। ३ ।।

अंतरिचें सांग पडे माझ्या मागे ।

का करिसी उद्वेग संसारीचे ।। ४ ।।

नामा म्हणे विठोबा असे मी नेणता ।

आठवी पंढरीनाथा वेळो वेळा ।। ५ ।। १७८५ ।। स. सं. गाथा

परमेश्वराच्या एका प्रेमाशिवाय श्रीनामदेवरायांना दुसरे काही नको होते. देवाच्या महाद्वाराजवळ येताच त्यांना अनिवार गंहिवर येई. लक्ष देवाच्या पायावर लागलेले असे. हृदय प्रेमभराने दाटून

अनुक्रमणिका

येई व त्याची अभिव्यक्ती एकसारखे स्फुंदन व अश्रुपातासह रुदनाने होई. आपला हात वर काढून दीनदयाल श्रीविठ्ठल त्यांना खुणावून म्हणतो की, इकडे ये. श्रीनामदेवराय जवळ येताच त्यास पोटाशी धरुन कोणी दुष्टाने.तुला छळले काय म्हणून विचारतात की, तुझ्या मनात काय आहे ? जे असेल ते माझ्यावर विश्वास ठेवून नि:शंकपणे सांग. मी तुला पाठीशी घातले असता संसारांतील आपत्तींनी कष्टी का होतोस व उद्विग्नता का धरतोस ? श्रीनामदेवराय म्हणाले --देवा ! मी अजाण आहे, मला काही कळत नाही. तुझे स्मरण करीत राहणे एवढेच मी जाणतो. नितांत निष्ठा, अढळ विश्वास आणि अखंड प्रेम यांनी, देवाला त्यांनी आपलेसे केले होते. ते श्रीविठ्ठलेशाचे कलिजा झाले होते, श्रीनामदेवरायांना बालपणीच पांडुरंगाचा सगुण-साक्षात्कार झाला होता.

त्यामुळे त्यांच्या ' जीवींचे आर्त ' पुरले ; पण देवाचे तात्त्विक स्वरुप जाणण्याची त्यांना तीव्र इच्छा होती. ती पुरी करण्यासाठीं ते म्हणतात—

तत्त्व पुसावया गेलो वेदज्ञासी ।
तंव भरले त्यापाशीं विधिनिषेध ।। १ ।।
तया समाधान नुमजे कोणे काळीं ।
अहंकार बळी झाला तेथें ।। २ ।।
स्वरुप पुसावया गेलो शास्त्रज्ञासी ।
तंव भरले तयापाशी भेदाभेद ।। ३ ।।
एकमेकाच्या न मिळती मतासी ।
भ्रान्त गर्व राशी भुलले सदा ।। ४ ।।
पुराणिकाशीं पुसतां स्वरुपाची स्थिति ।
तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें ।। ५ ।।
विषयीं ठेवुनि मन सांगती ब्रह्मज्ञान ।
तेणें समाधान नुमजे कदा ।। ६ ।।
हरिदासासी पुसु भक्तीचा उपाव ।
तंव तयापाशीं भाव नाहीं कोठें ।। ७ ।।
वाचेनें सांगती नामाचा बडिवार ।
विषयीं पडिभर सदाकाळीं ।। ८ ।।
ऐसे विचारितां बहुत भागलों ।
म्हणुनि शरण आलों पांडुरंगा ।। ९ ।।
भयभीत झालों संसार करितां ।
नामा म्हणे आतां तारी मज ।। १० ।।  १६१४ स. सं. गाथा

जीव, जगत व परमात्मा यासंबंधी रहस्य समजून घेण्याकरितां वेदज्ञांकडे गेलो तर ते या संबंधी काही न बोलता कोणते कर्म करावे व कोणते करु नये, व स्वर्ग कसा मिळतो याबाबतीत विधिनिषेधांचे चऱ्हाटच लावीत बसले. स्वत:ला कधी समाधान मिळाले नसता आपल्या पढिक

विद्येच्या गर्वानेंच ते फुगून गेले होते. शास्त्री-पंडितांच्याकडे ईश्वराचे स्वरुप जाणण्यासाठी गेलो तर त्यासंबंधी विविध संप्रदायांमधील मतभेदांची भांडणेच ते बोलू लागले. शब्दज्ञानाच्याच तोऱ्यांत मिरविणाऱ्याजवळ सगळाच संभ्रम तर ते कसचे समाधान करणार ? पुराणिकांच्याकडे हेलपाटे घातले तर त्यांचे चित्त विषयांत गुरफटलेले व तोंडाने मात्र ब्रह्मज्ञान बडबडणारे व स्वत:लाच मुळी रहस्य कळले नाही व शांती मिळाली नाही, ते दुसऱ्यांना कसली शांती देणार ? हरिदासांकडे जाऊन भक्तिमार्गाचे तत्त्व व साधना यांचा खुलासा विचारला तर त्यांच्या अंत:करणांत भक्तिभावाचा पूर्ण अभाव दिसून आला. 'नवविधा-भक्ती' ची केवळ तोंडाने बडबड चाललेली दिसे ; पण चित्त सारे विषयांत गुंतल्याचे आढळांत येई. याप्रमाणे ज्याच्याकडे जावे त्याच्याजवळ सर्व दांभिकपणा व वाचाळता दिसली. त्याचा शीण आला आणि शेवटी पांडुरंगा ! तुला शरण आलो आहे. तूच माझे समाधान कर.

देवांनी सांगितले, "नामदेवा ! हे ज्ञान मिळविण्यासाठीं-संतांनाच-सद्गुरूनाच शरण गेले पाहिजे. त्यांच्यावाचून दुसरे कोणीही तुझे समाधान करू शकणार नाही. हा मोठा अभंग येथे उद्धृत करण्याचे कारण हे की, श्रीनामदेवरायांची भक्ती भाबडी नव्हती. त्यांना सर्व रहस्य समजून घेण्याची तळमळ होती. जे कोणी सांगू शकतील असे त्यांना वाटले, त्यांच्याकडे गेले ; पण निराशाच कशी पदरात पडली, सर्वत्र दांभिकपणा कसा आढळून आला, याचे त्यांनी काढलेले विदारक चित्र दाखवून ते किती डोळस होते ते नजरेत भरावे.

त्यावेळी श्रीनिवृत्तिनाथ, श्रीज्ञानदेव महाराज यांची कीर्ती सर्वत्र पसरली असल्याने श्रीनामदेवराय त्यांच्याकडे गेले. ते आलेले पाहताच 'पंढरीचा प्रेमा आला घरीं' असे श्रीनिवृत्तीनाथांना वाटले. त्यांनी नम्र भावाने आणि आनंदभराने श्रीनामदेवरायांना वंदन केले ; पण श्रीनामदेवरायांनी मात्र उलट नमस्कार केला नाही. श्रीज्ञानराज माउलींनीही श्रीनामदेवरायांना नमस्कार केला ; पण आपण त्यांच्यापेक्षा वडील आहोत, या भावनने श्रीनामदेवरायांनी परत नमस्कार केला नाहीं. ही सारी घटना संत मुक्ताबाई दुरुन पाहत होत्या. त्यांना मात्र श्रीनामदेव-रायांच्या वागण्याचा-अहंकाराचा राग आला होता. श्रीपांडुरंगाला ज्याने आपले वेड लाविले आहे, त्यास नतमस्तक होणे योग्य आहे ; असे श्रीनिवृत्तीनाथ म्हणाले तरी श्रीमुक्ताबाई उद्गारल्या— " म्हणे मुक्ताबाई घाला लोटांगण । आपणा दर्शन न लगे त्याचें ।। " सकल संत गाथा—१३४६ ।। कुंभारानें केलेलें मातीचे मडके भाजल्याविना तें पाणी धरेल काय ? मेणाची पुतळी अग्नीच्या शेजारी क्षणभर तरी टिकेल काय ? हे कच्चे मडके भाजल्यावांचून काय उपयोग ? गोरोबा काकांना बोलवा त्यांची परीक्षा आम्ही मानू असे मुक्ताबाई म्हणाल्या. (स. सं. गाथा १३४७) श्री गोरोबा काकांनी येऊन आपल्या प्रातिभ अनुभवाच्या थापटण्याने मडके कच्चे आहे, भाजले पाहिजे, असा आपला निर्णय देताच कोणाचाही निरोप न घेता श्रीनामदेवराय तडक देवापाशी गेले व देवाला सारी हकिकत सांगितली. " होउनी दीनाचे अतिदीन । सद्गुरुशीं शरण रिघावे " असे देवांनी सांगताच श्रीनामदेवराय म्हणाले—देवां ! " तूं रोकडा जोडलासी । आतां सद्गुरुसीं काय काम " भेदाभेद व मायेचा निरास आणि सत्यज्ञानाची अनुभूती सद्गुरुकृपेवाचून होणार नाही, असे देवांनी श्रीनामदेवरायास परोपरीने सांगितले व म्हणाले " देव म्हणे नाम्या गुरु वांचूनिया । मुक्ति पावावया आन नाहीं ।। " स. संत गाथा १३६७

अनुक्रमणिका

शेवटी देवांच्या सूचनेप्रमाणे आणि श्रीनिवृत्तिनाथांकडे श्रीनामदेवराय गेले असता त्यावेळेची घटना व तिचे स्वारस्य त्यांना आता कळून आल्याने आपल्या मूळ गावाशेजारील औंढ्या नागनाथाच्या ज्योतिर्लिंगाजवळ विसोबा खेचरांकडे ते गेले.

श्रीनागनाथाच्या देवालयात जाऊन पाहतात तो देवाच्या पिंडीवर पाय ठेवून श्रीविसोबा झोपल्याचे दृश्य श्रीनामदेवरायांना दिसले. श्रीनामदेवराय आश्चर्याने थक्कच झाले. सगुण-साक्षात्कारी श्रीनामदेवराय निर्गुण साक्षात्कारासाठी येत आहेत, हे अंतर्ज्ञानानें जाणूनच सर्वांठायी परमेश्वर आहे, ह्या तत्त्वाची श्रीनामदेवरायास प्रतीती आणून देण्यासाठीच श्रीविसोबांनी हे दृश्य दाखविले असावे. आश्चर्यचकित झालेल्या श्रीनामदेवरायांनी श्रीविसोबांना देवावरील पाय काढून घेण्यास सांगितले. श्रीविसोबांनी उलटप्रश्न केला—

विसोबा खेचर बोले नामदेवा ।
उठविले जीवा कारे माझ्या ।। १ ।।
देवावीण ठाव रिता कोठें आहे ।
विचारुनि पाहे नामदेवा ।। २ ।।
जेथें देव नसे तेथें माझे पाय ।
ठेवी पां अन्वय विचारोनी ।। ३ ।।
नामा म्हणे अवघा जिकडे तिकडे देव ।
कोठे रिता ठाव न देखेची ।। ४ ।।

श्रीविसोबांच्या चरणांना देवावरील पाय काढून ठेवण्यासाठीं स्पर्श करताच चमत्कार झाला, तो म्हणजे " अवघी सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ।। " देव आणि जीव यांच्या दोन स्वतंत्र सत्ता आहेत, ही भ्रांत समजूत निवृत्त होऊन अवघी सत्ता एकच आहे, असा व्यापक बोध मला प्राप्त झाला या बोधाचे दाते श्रीविसोबा खेचर आहेत, असे श्रीनामदेवराय सांगतात. अशी खात्री श्रीनामदेवरायांना पटली व त्यांनी—

इतुकें देखूनिया चरणीं घाली मिठी ।
साठविला सृष्टी अवघा देव ।। १ ।।
तिहीं त्रिभुवनीं आपण व्यापूनी ।
आनंदे कोंदोनी राहियेला ।। २ ।।
श्रीगुरूचे पाय जीवें न विसंबत ।
मनोवृत्तीसहित ओवाळीलें ।। ३ ।।

श्रीनामदेवरायांनी विसोबांच्या चरणांना मिठी घातली व सर्व विश्व व्यापून परमात्मा भरला असल्याची त्यांना प्रचीती आली व सर्व वृत्तीसह आपला देह सद्गुरुरायांवरून ओवाळून टाकला व त्यांचे पाय हृदयांत कायमचे अधिष्ठित केले. त्यांना कैवल्यप्राप्ती झाली आणि निर्गुण—निराकार परमात्माच सगुण होऊन—

कैवल्याचा गाभा विटेवरी उभा ।
दिसे दिव्य शोभा पांडुरंग ।। १ ।।
नामा म्हणे माझी भक्ति हे माउली ।
कृपेची साऊली केली मज ।। स. संत गाथा १३७०

अनुक्रमणिका

सर्वत्र व्यापून असलेले निर्गुण-निराकार स्वरूपच सगुण साकार झाले आहे. त्या परतत्वा-वाचून अन्य काही नाही. तेच—

सुखाचे सुखरुप घेऊनी जा तरी ।
विठ्ठलनामें भरी तीनी लोक ।। १३७८ ।।

अशी आज्ञा श्रीनामदेवरायांना श्रीविसोबांनी केली आणि ज्ञानानुभूती देऊन म्हणाले की, माझ्या हृदयींचे सर्व गुज काढून तुला दिले आहे. याप्रमाणे-

सद्गुरू नायके पूर्ण कृपा केली ।
निजवस्तु दिधली (दाविली) माझी मज ।। १ ।।
माझें सुख मज दावियले डोळा ।
दिधली प्रेम कळा ज्ञान मुद्रा ।। २ ।।
तया उतराई व्हावे कवण्या गुणें ।
जन्म नाहीं येणें ऐसे केले ।। ३ ।।
नामा म्हणे निकी दावियली सोय ।
न विसरावे पाय विठोबाचे ।। ४ ।। स. सं. गाथा १३९०

सद्गुरुरायांनी पूर्ण कृपा करून माझा स्वतःचा ठेवा मला दाखविला. माझे सुख माझ्या डोळ्यांना दाखविले. ज्ञानाची चित्कला आणि भक्तीची प्रेमकळा यांचा एकत्र अनुभव घडविला, व जन्म-मरणाचा फेरा नष्ट केला. त्यांच्या ऋणांतून मी मुक्त होणे शक्य नाही. श्रीविठ्ठलाचे पाय कधीही विसरु नये, असा उपदेश करून सगुण-निर्गुणाचा समन्वय केला आणि मला कृतार्थ केलें व जनतेला कृतार्थ करण्याचा आदेश दिला. श्रीनामदेवरायांच्या मुखांतून मग आनंदाचे उद्गार निघाले कीं,

बोलूं ऐसे बोलें । जेणें बोलें विठ्ठल डोले ।। १ ।।
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ।। २ ।।
नाचूं कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावूं जगीं ।। ३ ।।
परहूनि परते घर । तेथें राहूं निरंतर ।। ४ ।।
सर्व सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ।। ५ ।।
श्रीनामदेव स. सं. गा. १५२२

श्रीविठ्ठलासही डोलायला लावतील असे गोड बोल आता मुखातून निघायला लागतील. साऱ्या अंगांत त्यांचे प्रेम तुडुंब भरल्याने वाणी 'विठ्ठल—रखुमाईचेच नाम' गात राहील. कीर्तनाच्या रंगांत नाचत नाचत ज्ञानाची ज्योत प्रज्वलित करू आणि तिच्या प्रकाशाने सारे विश्व उजळून टाकू. दृश्यादृश्याच्या पलीकडील अखंड निवासाचे स्थान—परावाणीच्याही पलीकडचे स्थान श्रीसद्गुरु देवांच्या कृपाप्रसादाने हस्तगत झाले आहे. आता तेथे कायमचा निवास होईल. मूळचीच श्रीनामदेवरायांची गोड-मधुर वाणी सद्गुरु कृपा होताच कमालीची रसाळ झाली व श्रोत्यांना कीर्तनाच्या रंगांत गुंग करून डोलायला लावू लागली. आता प्रेमाच्या गोडीला ज्ञानाच्या स्वादाची जोड मिळाली. त्यांचे तत्त्वज्ञानाचे अभंगदेखील 'रसाळ' व 'स्वादिष्ट' आहेत. नमुन्यादाखल एक अभंग पहा—

सगुण निर्गुण नाहीं ज्या आकार।
होऊनी साकार तोचि ठेला ।। १ ।।

अनुक्रमणिका

जळीं जळगार दिसे जैशापरी ।
तैसा निराकारी साकार हा ।। २ ।।
सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण ।
निर्गुणीं सगुण ययापरी ।। ३ ।।
ऐसा पूर्णपणें सहजीं सहज ।
सखा केशीराज प्रगटला ।। ४ ।।
पांडुरंगीं अंगे सर्व झालें जग ।
निववी सर्वांग नामा म्हणे ।। ५ ।। सकल संत गाथा ३३०

मूळ तत्त्व निर्गुण निराकार आहे. त्याला आकार मुळीच नाहीं ; पण तेच आकार धारण करिते. पाणी आणि पाण्याची गार वस्तुत: अभिन्न होत ; पाणीच गारांचें रूप धारण करते. बर्फाचा तुकडा जसा पाण्यात दिसतो तसाच निराकारी हा आकार होय. ह्याचप्रमाणें निर्गुण आणि सगुण यांत भेद नाहीं. सोने व त्याचेच केलेले नाणे यांच्यात वस्तुत: काय भेद आहे ? त्याच सोन्याने नाण्याचे रूप घेतले आहे. त्यांत सत्य दृष्टीने काही फरक नाही. सोने आणि त्याचे नाणे एक होय. सहज निर्गुण रूपाने असणारा परमात्मा, ज्याला केशीराज असेही म्हणतात, तोच सहजी सहज होऊन प्रगट झाला आहे. पांडुरंगाचे अंगच म्हणून हे सर्व जग प्रगट झाले आहे. ते त्याच्यापासून स्वतंत्र सत्तेने वेगळे नाही ; अभिन्न आहे, हे ज्याने जाणले त्याला विश्वात्मक पांडुरंगाची मूर्ती सर्वांगानें सुख देते.

हा श्रीनामदेवरायांचा अभंग वाचला की, श्रीज्ञानराज माउलींच्या "म्हणौनि जग परौते । सारुनि पाहिजे मातें । तैसा नव्हे उखिते । आघवे मीचि" ।। ज्ञा. १४– १२८ ।। ह्या ओवीची आठवण होते. जल आणि त्याची गार, सोने आणि त्याचे अलंकार हे दृष्टान्तदेखील श्रीज्ञानराज माउलींच्या दृष्टान्ताप्रमाणेच आहेत. ह्या श्रीनामदेवरायांच्या छोट्याशा गोड अभंगांत श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या तत्त्वज्ञानाचें रहस्य त्यांच्याच पद्धतीने पूर्ण उतरले असून पांडुरंगाला परब्रह्माचे प्रतीक म्हणून पाहण्याची दृष्टीदेखील तीच आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी जो अनुग्रह विसोबा खेचरांवर केला, तोच विसोबांनी जसाच्या तसा श्रीनामदेवरायात संक्रमित केला आहे.

जसे श्रीज्ञानदेव महाराज सर्व भेदातीत तसे श्रीनामदेवरायही आता झाले. त्यांना सर्व जग परमेश्वररूप दिसू लागले. त्यांना भेदभाव दिसेनासा झाला. भक्तिज्ञानाने ईश्वर प्राप्ती करुन घेण्यात कसलाच भेदभाव अगर आडकाठी नाहीं. "एथ भक्तिगा एक सरे। जाति अप्रमाण।।" हे श्रीज्ञानराज माउलींनी उद्घोषित केलेले तत्त्व श्रीनामदेवरायांनी प्रत्यक्षतेत आणून दाखविले.

श्रीनिवृत्तिनाथ, श्रीज्ञानेश्वर महाराज यांचे श्रीनामदेवरायांवर हार्दिक प्रेम हे पहिल्यापासूनच होते. श्रीविसोबांच्या अनुग्रहाने श्रीनामदेवराय पूर्णप्रज्ञ झाल्यावर तर ते पहिले प्रेम नितांत आदरयुक्त अशा उदात्त प्रेमांत परिणत झाले. त्यांचा अधिक सहवास घडावा व सुखसंवादाचा लाभ मिळावा म्हणून श्रीज्ञानराज माउली स्वत : पंढरपूरला श्रीनामदेवरायांच्या भेटीसाठी गेले. आळंदीत पहिल्या भेटीच्या वेळी श्रीनिवृत्तिनाथ व श्रीज्ञानदेव महाराजांनी वंदन केले तरी श्रीनामदेवराय स्तब्धच होते. ते श्रीनामदेवराय आता उरले नव्हते. आता ज्ञानयुक्त पराभक्तीची नम्रता त्यांचे अंगी बाणली होती. अशा वेळी—

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले।
लोटांगण घातलें नाम देवें।। १।।
देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें।
पूजिलें आदरें यथाविधी।। २ ।।
नामदेव म्हणे सुफळ माझें जिणें।
स्वामीच्या दर्शनें धन्य झालों।। ३ ।। स. सं. गाथा ९१३।।

श्रीज्ञानदेव महाराज आलेले पाहताच आता श्रीनामदेवरायांनी त्यांच्या पायी लोटांगण घातले व मग त्यांची यथासांग पूजा केली. माझे पूर्वपुण्य आज फळाला आले. भूतलावरील दीन पतितांचा उद्धार करण्यास अवतरलेला भगवंतच माझ्यावर कृपादृष्टी करण्यास माझ्याकडे चालून आला. केवढे हे माझे भाग्य ! त्यांवर श्रीज्ञानराज माउली श्रीनामदेवरायांना म्हणाले—

ज्ञानदेव म्हणे तूं भक्त शिरोमणि ।
जोडिले जन्मोनि केशव चरण ।। १ ।।
प्रेमसुख गोडी तुजची फावली ।
वासना मावळली समूळ तुझी ।। २ ।।
धन्य तुझे जन्म धन्य तुझे कूळ ।
धन्य तुज राउळ जवळी असे ।। ३ ।। स. सं. गाथा ९१४

श्रीज्ञानदेव महाराज म्हणाले, तू भक्तशिरोमणी आहेस. संसारातील साऱ्या वासना समूळ नष्ट करुन पांडुरंगाचे पाय जोडलेस. त्याचे मंदिरच नव्हे तर साक्षात् तोच तुझ्याजवळ नित्य आहे. प्रेमसुखाची सुमधुर गोडी तुलाच एकट्याला लाभली आहे. तुझे कूळ व तुझा जन्म त्रिवार धन्य ! माझी अनिवार इच्छा अशी आहे की, तुझा सुदीर्घ सहवास घडावा आणि तुझ्याशी सुखसंवादाच्या गुजगोष्टी करीत राहावे. श्रीज्ञानेश्वर महाराज आणखी पुढे म्हणाले की, "जीवन्मुक्त ज्ञानी जरी झाले पावन। तरी भगवद् भजन न सोडिती।। भूतळींची तीर्थें पहावी नयनी। ऐसी आस मनी विष्णुदासा।।" हे माझ्या मनांतील आर्त मनोरथ तू पूर्ण करावेस, असे विनविण्यास मी आलो आहे. हे ऐकल्यावर विठोबाचे पाय आठवीत श्री नामदेवराय म्हणाले—

सर्वसुख मज आहे पांडुरंगीं ।
जावें कवणालागीं कवणा ठाया ।। १ ।।
या सुखा कारणें शरीर कर्वती फोडिलें ।
दुर्जय तोडिलें मायाजाळ ।। २ ।।
त्रिभुवनींचें वैभव सांडूनिया दूरी ।
झालासे भिकारी पंढरीचा ।। ३ ।। स. सं. गाथा ८९५

सर्व मायापाश तोडून स्वत:च्या शरीराची चिरफाड करुन पांडुरंगाची प्राप्ती करुन घेतली. त्रिभुवनींचे सर्व सुख माझ्याजवळ आहे. ते टाकून मी कोठे व कशासाठी जावे ? तथापि राउळात जाऊन पंढरीनाथ आज्ञा करील ते तुमच्या आग्रहासाठी करीन. मग दोघे जण मंदिरात देवाजवळ गेले. पुढे असे वर्णन आहे की, देवालाही श्रीनामदेवरायांचा विलक्षण लळा असल्याने श्रीनामदेवराय तीर्थयात्रेस गेल्यास देवालादेखील करमणार नाही. तथापि परब्रह्ममूर्ती श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या बरोबर तीर्थयात्रा करावयास मिळणे म्हणजे श्रीनामदेवरायांचे मोठे भाग्य असल्याने श्रीविठ्ठलेशाने

परवानगी दिली. मग श्रीनामदेवरायांनी श्रीज्ञानोबारायांबरोबर सुमारे शके १२१३ ते १२१८ पर्यंत आसेतु हिमाचल भारतातील तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. या दीर्घ काळात श्रीनामदेवराय, श्रीज्ञानेश्वर महाराज आणि श्रीनिवृत्तिनाथ यांचा अखंड सहवास झाला व तो चालू असता त्या पूर्णप्रज्ञ भक्ताग्रणींच्यामध्यें भक्तिज्ञानादी आध्यात्मिक विषयावर स्वानुभवाच्या सुरम्य, सिद्धानुवादरूपाच्या गोष्टी झाल्या त्या संवादांत त्यांची अंतरंगें रंगून गेली व एकतानत पावली.

पण त्यांचा हा आनंद फार वेळ टिकावयाचा नव्हता, यात्रेहून परत आल्यावर थोड्याच दिवसात श्रीज्ञानराज माउलींनीं 'संजीवन समाधी 'चा निर्णय घेतला. निकट संबंध घडून आल्यानंतर हा निर्णय म्हणजे श्रीनामदेवरायांना आपल्यावर वज्राघात झाल्याप्रमाणे असह्य क्लेशाचा वाटला—

कासावीस प्राण मन तळमळी ।
जैसी कां मासोळी जिवनावीण ।। १ ।।
दाहीदिशा ओस वाढती उदास ।
करिताती सोस मनामाजीं ।। २ ।।
घातियेली घोण प्राण आला कंठी ।
ज्ञानदेवासाठी तळमळी ।। ३ ।।
नामा म्हणे देवा वाटतसे खंती ।
चालती विभूति योगियांची ।। स. सं. गाथा १०५९

श्रीनामदेवराय म्हणतात—माझे प्राण कासावीस झाले. पाण्यावाचून मासोळी तडफडते तशी माझ्या मनाची तगमग झाली. साऱ्या दिशा ओस वाटू लागल्या व मन कष्टी आणि उदास झाले. प्राण कंठात आले आणि विराशेनें दोन्ही गुडघ्यांत मान घालून श्रीज्ञानोबारायांचा कायमचा वियोग होणार म्हणून तळमळू लागलों. योगिराजांची विभूती अदृश्य होत आहे म्हणून असह्य दु:ख झाले. माझी अवस्था काय सांगावी —

कोण जाणे माझ्या जीवींचा कळवळा ।
प्रेमाश्रू ते डोळा लोटताती ।। १ ।।
तारियेले जड माझिये कीर्तनीं ।
आठविती मनीं गुण तुझे ।। २ ।।
नामा म्हणे येथें बोलवेना मज ।
जातसे निजगुज आवडीचें ।। १०५५ ।।

माझा जीव किती कळवळून जातो आहे, हे दुसऱ्या कोणाला कळणार ? माझ्या अत्यंत आवडीचा आणि जीवींचा कलिजा निघून चालला म्हणून मला मुळीच बोलवत नाही. माझ्या कीर्तनाने जे जडमूढ तरले ते तुझ्याच प्रभावाने होय. तुझे असे अनंत गुण आठवतात आणि डोळ्यांतून एकसारखे अश्रूंचे पूर वाहू लागतात.

ज्याने गीतेवर टीका लिहून तिचा भावार्थ उकलून दाखविणारा अपूर्व ग्रंथ निर्मिला असा हा ज्ञानाचा ईश्वर " नामा म्हणे आता देहाला विटला । स्वरुपीं पालटला ज्ञानदेव।। " आत्मरूपी परत लीन होत आहे. श्रीज्ञानदेव महाराज आता संजीवन समाधी घेणार म्हणून संत मंडळीसह सारे लोक हळहळून गेले. श्रीनामदेवरायांची अवस्था तर " नामा तळमळी वत्सा ऐसा।। " अशी झाली.

अनुक्रमणिका

श्रीज्ञानेश्वर महाराज, श्रीनिवृत्तिनाथांचा निरोप घेण्याला त्यांच्यापुढे आले आणि कृतज्ञतापूर्वक म्हणाले, लहानपणापासून आपण मला,

पाळिलें पोशिलें चालविला लळा ।
बा माझ्या कृपाळा निवृत्ति राजा ।। १ ।।
स्वामिचिया योगें झालो स्वरुपाकार ।
उतरलो पार भव नदी ।। २ ।।
निवृत्तिनें हात उतरला वदना ।
त्यागिले निधाना आम्हा लागीं ।। ३ ।।
नामा म्हणे देवा देखवेना मज ।
ब्रह्मी ज्ञानराज मेळविला ।। ४ ।। स. सं. गाथा १०८९

आपण मला लहानपणापासून लडिवाळपणे वागविले व माझे पालनपोषण केले. आपल्या अनुग्रहाने मी मायानदीतून पार उतरलो व आपल्या कृपाप्रसादाने मी स्वरुपाकार झालो, ही मजवर आपली असीम कृपा व अथांग कनवाळूपणा आहे. श्रीज्ञानोबारायांची ही हृदयस्पर्शी कृतज्ञतेची वाणी ऐकताच श्रीनिवृत्तिनाथांनी गहिवरुन श्रीज्ञानोबारायांच्या मुखावरुन आपला हात फिरविला. अंतिम वियोगाचे दुःख असह्य होऊन श्रीज्ञानोबारायांना कुरवाळून ते म्हणाले, "हे आमच्या सर्वस्व निधाना ! तू आम्हाला सोडून चाललास" श्रीनिवृत्तिनाथांनी ही हृदय पिळवटून सोडणारी व्यथा " वरिष्ठाच्या आधीं कनिष्ठानें जाणें। केले नारायणें उफराटे।" ह्या आपल्या अभंगातही व्यक्त केली आहे. श्रीनामदेवराय म्हणतात, श्रीज्ञानोबारायांनी परब्रह्मांत विलीन होण्याचा हा प्रसंग मला पाहवेनादेखील. श्रीनिवृत्तिनाथांच्या हृदयांतील प्रेम ओसंडून आले--

ओसंडोनि निवृत्ति आलिंगो लागला ।
आणिकांचा डोळा अश्रू येती ।। १ ।।
नामा म्हणे संत कासाविस सारे ।
लाविती पदर डोळियांसी ।। २ ।।

भावनाकूल होऊन श्रीनिवृत्तिनाथांनी श्रीज्ञानोबारायांना मिठी मारलेली पाहताच डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. सारी संतमंडळी कासावीस झाली आणि डोळ्यांना पदर लावू लागली. श्रीसोपान काका आणि संत मुक्ताबाई यांच्या शोकाला तर पारावारच राहिला नाही. खिन्न मनाने श्रीनिवृत्तिनाथ म्हणाले —

निवृत्तिदेव म्हणे करिता समाधान ।
कांहीं केल्या मन स्थिरावेना ।। १ ।।
बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट ।
ओघ बारावाट मुरडताती ।। २ ।।
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा ।
तृण रानोमाळ पांगलेसे ।। ३ ।।
हरिणीवीण खोपी पडियेला ओस ।
दशदिशा पाडस धांवताती ।। ४ ।।

अनुक्रमणिका

मायबापें आम्हा त्यागियेले जेव्हां ।
ऐसे संकट तेव्हां झालें नाहीं ।। ५ ।।
नामा म्हणे देवा पेटला हुताशन ।
करा समाधान निवृत्तीचें ।। ६ ।। स. सं. गाथा १०९४

कशीही समजूत करु गेलो तरी मनाला पटत नाही. तव्याचा बांध फुटल्यावर पाणी जसे साऱ्या दिशांना वाट सापडेल तिकडे धावू लागते, बांधलेली पेंढी सुटली तर सोसाट्याच्या वाऱ्याने तीमधील गवत रानोमाळ विखुरले जाते, हरिणी नाहीशी होताच खोप ओस पडून पाडसे दश दिशांना सैरावैरा पळू लागतात, तशी आमची आज अवस्था झाली आहे. आमचे आईवडील आम्हाला टाकून निघून गेले तेव्हादेखील एवढे संकट आम्हाला वाटले नाही, अशी दुर्दशा आज झाली आहे. ज्ञानाचे साक्षात् आगर अशा श्रीनिवृत्तिनाथांना एवढे शोकाकुल झालेले पाहून श्रीनामदेवराय म्हणतात—देवा ! आता वणवाच भडकला आहे, तरी आधी श्रीनिवृत्तिनाथांनाच शांत करा. संत व मुनिजन श्रीनिवृत्तिनाथांना म्हणाले—तुमच्यासारख्या ज्ञानी पुरुषाने असा शोक केला तर इतर अज्ञ जनांनी काय करावे ? श्रीनिवृत्तिनाथांचा हात धरुन त्यांना आधी उठविण्यात आले ; मग श्रीनिवृत्तिनाथांनी आणि देवांनी श्रीज्ञानोबारायांचे हात धरुन फुलें, तुळसी आणि बेलांनी मंडित केलेल्या समाधीच्या आसनावर त्यांना नेऊन बसविले. श्रीज्ञानराज माउलीच्या समोर ज्ञानेश्वरी ठेविली. श्रीज्ञानोबारायांनी सर्वांना वंदन करुन 'भीम मुद्रा' स्वीकारुन नित्य परब्रह्मस्थितीत सदाचे स्थिरावले—

"नामा म्हणे आतां लोपला दिनकर । बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ।।" स. सं. गाथा ११०० ।।

श्रीनिवृत्तिनाथांनी समाधीची शिळा लावलेली पाहताच श्रीसोपानदेव आणि संत मुक्ताबाई यांनी धरणीवर अंग लोटले. श्रीनिवृत्तिनाथही कोसळतात की काय असे दिसले, तेव्हा त्यांना सावरा सावरा असे लोक म्हणू लागले, इतर सर्वांचीही मने उद्विग्न झाली ; आणि तशा अवस्थेत समाधीवर फुले वाहून, इंद्रायणीत आचमन करुन लोक परतू लागले :

"श्रीज्ञानेश्वर महाराजांचा संजीवन समाधी" हा एक हृदयाला चटका लावणारा, कारुण्यपूर्ण, पण उदात्त गंभीर प्रसंग आहे. श्रीनामदेवराय त्याप्रसंगी समक्ष उपस्थित होते. त्या समयीच्या प्रत्येक घटनेचे त्यांनी सद्गदित अंत:करणाने आणि करुणामय वाणीने त्यावेळचे गंभीर आणि अंत:करणाला हलवून सोडणारे दृश्य ऐकणाऱ्याच्या व वाचणाराच्या मनश्चक्षूपुढे जसेच्या जसे उभे केले आहे. ते कोणाच्याही चित्ताची कालवाकालव करुन नेत्रांतून अश्रुधारा वाहविल्यावाचून राहणार नाही. त्यामधून श्रीनामदेवरायांचे हळुवार मन, सुकोमल अंत:करण आणि विशुद्ध भावना दिसून येतात.

श्रीनामदेवरायांचे अंत:करण मूळचेच प्रेमळ आणि भक्तिप्रवण होते. ते विठ्ठल भक्तींत नितांत रंगले व त्या एकविध भक्तीने सगुण साक्षात्कार झाला. पुढे श्रीविसोबांच्या अनुग्रहाने त्यांना सर्वत्र परमात्मा ओतप्रोत भरल्याची अनुभती आली, व निर्गुण साक्षात्कारही झाला. त्यानंतर श्रीज्ञानोबारायांबरोबर केलेल्या तीर्थयात्रेत त्यांच्याशी श्रीनामदेवरायांना घडलेला दीर्घ सहवास, अध्यात्म विषयावरील झालेला संवाद व चर्चा यामुळे त्यांच्या ज्ञानालाही उजाळा मिळाला. त्यांना श्रीज्ञानोबारायांचे सर्वांभूती प्रेम, परम दयाळू अंत:करण व विशाल व्यक्तिमत्त्व यांचे जवळून दर्शन घडले. श्रीज्ञानोबारायांचे सूक्ष्माहून सूक्ष्म आणि विशालाहून विशाल वस्तू आकलन करणारी प्रखर बुद्धिमत्ता व अगाधज्ञान. प्रसन्नता अनुभवास आल्याने त्यांचे ठसे त्यांच्यावर अनायासे उमटले.

अनुक्रमणिका

श्रीज्ञानोबारायांबरोबर श्रीनामदेवरायांची तीर्थयात्रा शके १२१३ ते १२१८ च्या दरम्यानच्या काळात झाली ही गोष्ट स्पष्ट आहे. शके १२१२ हा ज्ञानेश्वरीच्या निर्मितीचा काल असून, कार्तिक वद्य १३ शके १२१८ ही त्यांच्या "संजीवन-समाधीची" तिथी असल्याने त्या दरम्यानच्या काळात ही तीर्थयात्रा झाली हे उघड आहे. वाराणसी येथील दशाश्वमेध घाटावर ज्ञानेश्वरी मठ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वास्तूच्या आवारात तेथे श्रीज्ञानेश्वर महाराज आल्याची स्मृती म्हणून एक स्तंभ उभारला गेला आहे. अर्थात श्रीनामदेवरायही त्या यात्रेत तेथे गेले होते.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, तीर्थयात्रेपूर्वीच परतत्त्व हे साऱ्या विश्वाला व्यापून आहे, निर्गुण-निराकार परब्रह्माचेच श्रीविठ्ठल हे साकार रूप आहे, ती दगडाची मूर्ती म्हणजे देव नव्हे, तीत ज्योतीच्या निजज्योतीचा साक्षात्कार श्रीज्ञानेश्वर महाराजांना झाला, तसाच श्रीनामदेवरायांनाही आपले सद्‌गुरु विसोबा खेचर यांच्याकडून झाल्याचा विचार श्रीनामदेवरायांच्या खालील अभंगात स्पष्टपणे नमूद आहे :—

दगडाची मूर्ति मानिला ईश्वर ।
परी तो साचार देव नव्हे ।। १ ।।
प्रस्तराचा देव बोलत भक्तातें ।
सांगते ऐकते मूर्ख दोघे ।। २ ।।
द्वादशीचे गांवीं झाला उपदेश ।
देवावीण ओस स्थळ नाहीं ।। ३ ।।
तो देव नामया हृदयीं दाविला ।
खेचरानें केला उपकारु हा ।। ४ ।। स. सं. गाथा १३९१

अशी श्रीनामदेवरायांना निर्गुणाची अनुभूती आली. विठ्ठल हे सगुण-साकार रूप त्या ज्ञानरूप परब्रह्माचेच आहे. सगुण निर्गुणाचा समन्वय खालील अभंगात दिसून येईल—

संपूर्ण विश्वाचा आत्म्याचा जो निज आत्मा ।
तोचि हा परमात्मा विटेवरी ।। १ ।।
अनंत सूर्याची ज्योतीची जी निजज्योति ।
ती ही उभी मूर्ति विटेवरी ।। २ ।।
अनंत ब्रह्माचे जें का निजब्रह्म ।
तें हें परब्रह्म विटेवरी ।। ३ ।। स. सं. गाथा ३८५

ह्या विटेवरील मूर्तीला पाहून तीतून मला निराकार विश्वचैतन्याची अनुभूती येते, असा हा सगुण-निर्गुणाचा गोड, सम्यक-समतोल-सुमधुर समन्वय आहे.

उत्तर हिंदुस्थानातील यात्रेत श्रीनामदेवरायांना हे कळून आले की, पंजाब हा परकीय आक्रमणाचा दरवाजा आहे. तेथे आक्रमक प्रथम धाड घालतात व भारतात शिरतात. वारंवारच्या स्वाऱ्यांनी त्या भूमीचा कण नि कण आधी तुडविला जाऊन तेथून ही धाड, भारताच्या इतर प्रदेशांत धुडगूस घालीत सुटते. परकीय स्वाऱ्यांच्या धाडींनी आणि राजकीय व धार्मिक आक्रमणांनी तेथील जनता हवालदिल झाली असून, तीत नैराश्य पसरले आहे. धर्माची भावना क्षीण होत चालली आहे, भीती निर्माण होऊन धैर्य खचत आहे. तेव्हा जो उंबरठा ओलांडून परकीय सैन्याचे हल्ले भारताच्या इतर प्रांतावर होतात, तेथेच तळ ठोकून तेथल्या लोकांची धर्मभावना व आत्मबल वाढविले पाहिजे, हा निर्णय श्रीनामदेवरायांनी घेतला हे स्पष्ट दिसते. तेथे त्यांनी आपल्या प्रचाराला सुरुवात केली. आभाळ फाटले असता मनुष्य त्याकडे पाहून परमेश्वराचा आधार मिळेल का म्हणून तिकडे डोळे लावतो. त्यांना उत्साह व धैर्य मातब्बर उद्धारक जो अवतरला तो श्रीनामदेवराय या रूपाने होय.

अनुक्रमणिका

संस्कृत वेदान्त ग्रंथात पारिभाषिक शब्दांनी मांडलेले विचार केवळ अधीत-पढिकांनाच कळणारे होते. त्यांचा जनसामान्यांना काही उपयोग नव्हता. ते ज्ञान सामान्यांना कळेल, अशा देशी भाषेत, सोप्या रीतीने मांडण्याची 'भावार्थ-पद्धती' श्रीज्ञानराज माउलींनी उपयोगात आणिली व त्या ज्ञानभांडाराचा आपल्या अनुभूतीने अधिक हृद्य व आकर्षक केलेला प्रवाह खेड्यापाड्यांतील अशिक्षितांनाही सेविता येईल, असा त्यांच्या आवाक्यात आणून सोडला. सर्वांघटी एकच परमेश्वर आहे, त्याची शुद्ध अंत:करणाने आणि भक्तिभावाने उपासना केल्यास तो आपल्या भक्तांचा उद्धार करतो. एवढेच नव्हे तर त्यांच्यावर प्रेम करतो. तो भावाचा भुकेला आहे, त्याच्याजवळ स्त्री-पुरुष, असा उच्चनीच असा कसलाही भेदभाव नाही, "एथ भक्ति गा एक सारे। जाती अप्रमाण।।" अंत:करणांतील प्रेमभाव तो जाणतो. एकविध भक्ती करणाऱ्याला ज्ञान देऊन तो आपल्या पदाला पोचवितो. हे तत्त्व श्रीज्ञानराज माउलींनी आपल्या अमोघ वाणीने ज्ञानेश्वरी, अमृतानुभव वगैरे आपल्या मराठी भाषेतील ग्रंथात प्रतिपादिले. तेच विचार आत्मसात करुन श्रीनामदेवरायांनी आपल्या रसाळ व अनुभूतिगुण संपन्न वाणीने महाराष्ट्रात प्रसारित करुन, भक्तिभावाने श्रोत्यांना मंत्रमुग्ध करुन भागवत संप्रदाय वाढविला हेच कार्य त्यांनी उत्तर हिन्दुस्थानांत विशेषत: पंजाबात तेथल्या लोकांना कळणाऱ्या हिंदी भाषेत केले. भक्तीने मुक्ती ही कोणाही व्यक्तीला सुलभ व त्याच्या आटोक्यातील गोष्ट असल्याचे पटवून देऊन, आत्मोद्धाराचा राजमार्ग तिकडे खुला केला व त्याची वाटचाल कशी करावी, हे तिकडच्या मोठ्या शहरांतच नव्हे, तर खेडोपाडी प्रचार करुन, "देखी लागेल लोकां यया " अशा आपल्या आचरणाने त्यांच्यांत सुमारे वीस वर्षे वास्तव्य करुन दाखवून दिले. श्रीनामदेवरायांनी उपदेशिलेल्या भक्तिमार्गाने चालणारा मोठा अनुयायी वर्ग तिकडे आहे. श्रीनामदेव संप्रदायी लोक आहेत. श्रीनामदेवरायांची स्मृतिमंदिरे आजही आहेत. ती आज सातशे वर्षे आदराने व भक्तिभावाने चालू ठेवली आहेत ह्यावरुन श्रीनामदेवरायांच्या 'शिकवण' व 'प्रभावा'ची कल्पना येईल.

घोमान येथे त्यांची परंपरा अखंड चालत आली आहे. तेथे त्या मंदिराला "नामदेवजी का गुरुद्वार" ह्या वंदनीय नावाने उल्लेख करतात. ह्यावरुन श्रीनामदेवरायांना तिकडे किती पूज्य मानतात याची कल्पना येईल. श्रीनामदेवरायांचे दीर्घ वास्तव्यात केलेले कार्य लक्षणीय व चिंतनीय आहे. पुढे वृद्धापकाळात शरीर क्षीण होऊ लागल्यावर श्रीनामदेवराय पंढरपुरास वास्तव्यास गेले. तेथे जीवन्मुक्तीचे विलक्षण सुख भजन-भक्ती-द्वारा सेवन करीत असता, त्यांनी त्यांच्या एका अभंगात आपली आंतरिक तळमळीची आर्तता व्यक्तविली. त्याप्रमाणे त्यांनीं श्रीक्षेत्र पंढरपुरातच श्रीविठ्ठलेशाच्या द्वारीच "समाधी" घेतली. "श्रीनामदेव-पायरी" म्हणून 'महाद्वारी' प्रसिद्ध आहे ; तीच त्यांची समाधी होय. ते म्हणतात कीं---

मरोनी जन्माचें पंढरीचे पारीं ।
व्हावे महाद्वारीं कृमी किटक ।। १ ।।
संत-चरणरज लागे येतां जातां ।
नामा म्हणे आतां हेचि व्हावे ।। २ ।।

आणखी एका अभंगांत श्रीनामदेवराय म्हणतात---

नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे ।
संत पाय हिरे वरी देती ।।

**सारांश—**

श्रीनामदेवराय, हे खरोखर एक 'अलौकिक' आणि 'अद्वितीय' संत महाराष्ट्रात होऊन गेले. त्यांच्याजवळ भक्तीचा ओलावा व जिव्हाळा मूळचाच होता. पुढे सद्गुरुपदेशाने त्यांना ज्ञानदृष्टी लाभली. नंतर श्रीज्ञानोबारायांच्या चिरसहवासात ती पूर्ण विकसित झाली. भक्ती ज्ञानाच्या सुरस कीर्तनाने रसाळ वाणीच्या विलक्षण प्रभावाने ते जातील तेथल्या श्रोतृवृंदाला तल्लीन करून डोलायला लावीत. श्रीज्ञानराज माउलींनीं भक्तीला ज्ञानाचे भक्कम अधिष्टान दिले आणि भागवत धर्माचा खंबीर पाया घातला.

श्रीनामदेवरायांनी ह्या भागवत धर्माची पताका महाराष्ट्राबाहेर नेली ; परकीय सत्तेच्या राजकीय व धार्मिक आक्रमणाचे प्रवेशद्वार जो पंजाब प्रांत, तेथे जाऊन, ही पताका भारताच्या उत्तर सरहद्दीपर्यंत फडकत ठेवली. परकीय आक्रमणाने त्रस्त व उद्ध्वस्त झालेल्या प्रदेशांत पसरलेले, नैराश्य दूर केले व जनतेत निर्माण झालेले भीतीचे वातावरण नाहीसे केले. औपनिषदिक ज्ञानावर अधिष्ठित, अशा भक्तीचा, सगुण-निर्गुण-स्वरूपाचा समन्वय करणारा, समतेचा-जीवेश्वैरायाचा पुरस्कार करुन सर्वांना आचरण्याला सुलभ असा आत्मोद्धाराचा व समाजोद्धाराचा सोपा राजमार्ग जो " भागवत-धर्म " तो त्या पंजाबातील जनतेला उपलब्ध करून दिला. हे कार्य दूरच्या प्रांतांत अपरिचित समाजांत, त्यांना आपलेसे करून तडीस नेले. केवढ्या कठीण क्रांतीचे कार्य हे !! ते श्रीनामदेवरायांच्या हातून पार पडण्यास त्यांच्यांतही विलक्षण क्रांती घडून आली !!! अन्य भाषिक संतांनी दूरच्या अन्य भाषेच्या व सर्वस्वी भिन्न परिस्थिती असलेल्या प्रांतात जाऊन "अपूर्व कार्य" केल्याचे दुसरे उदाहरण नाही. म्हणून श्रीनामदेवरायांची भक्ती, ज्ञाननिष्ठा आणि अपूर्व व्यक्तिमत्त्व सर्वस्वी सदाच अपूर्व होय.

—श्री. किसनमहाराज साखरे

।। इति शम् ।।

अनुक्रमणिका

[१]

प्रथम नमन करूं गणनाथा । उमाशंकराचिया सुता ।
चरणावरी ठेवूनि माथा । साष्टांगीं आतां दंडवत ॥ १ ॥
दुसरी वंदूं सारजा । जे चतुराननाची आत्मजा ।
वाक्सिद्धि पाविजे सहजा । तिच्या चरणवोजा दंडवत ॥ २ ॥
आतां वंदूं देवब्राह्मण । ज्यांचेनि पुण्यपावन ।
प्रसन्न होऊनी श्रोतेजन । त्यां माझें नमन दंडवत ॥ ३ ॥
आतां वंदूं साधुसज्जन । रात्रंदिवस हरिचें ध्यान ।
विठ्ठल नाम उच्चारिती जन । त्यां माझें नमन दंडवत ॥ ४ ॥
आतां नमूं रंगभूमिका । कीर्तनीं उभे होती लोकां ।
टाळ मृदुंग श्रोते देखा । त्यां माझे दंडवत ॥ ५ ॥
ऐसें नमन करोनि सकळां । हरिकथा बोले बोबड्या बोला ।
अज्ञान म्हणोनि आपल्या बाळा । चालवी सकळां नामा म्हणे ॥ ६ ॥

[२]

प्रथम नमूं गजवदनु । गौरीहराचा नंदनु ।
सकळ सुरवरांचा वंदनु । मूषकवाहनु नमियेला ॥ १ ॥
त्रिपुरावधीं गणाधिपति । हरें पूजिला भावें भक्तीं ।
एके बाणें त्रिपुर पाडिला क्षितीं । तें पशुपति संतोषला ॥ २ ॥
इंद्रादिकीं अष्टलोकपाळीं । लंबोदरू पूजिला कनककमळीं ।
त्यासी प्रसन्न जाला तयेवेळीं । म्हणवूनी सकळीं पूजियेला ॥ ३ ॥
सटवें रात्रीं मदनु शंभरें नेला । प्रद्युम्न समुद्रामाजी टाकिला ।
तें कृष्णें विघ्नहरु पूजिला । प्रद्युम्न आला रतीसहित ॥ ४ ॥
पूजिला साही चक्रवर्ती । त्यांचिया पुरती आर्ती ।
युधिष्ठिरें पूजिला चतुर्थी । राज्यप्राप्ती जाली तया ॥ ५ ॥
म्हणवूनि सुरवरीं केली पूजा । त्रिभुवनीं आणिक नाहीं दुजा ।
विष्णुदास नामा म्हणे स्वामी माझा । भावें भजा एकदंता ॥ ६ ॥

---

अभंग १—(शि.), २—(शि.) व (पं.)

[३]

गणेश नमूं तरी [1]तुमचा नाचणा । म्हणोनि नारायणा नमन [2]माझें ॥ १ ॥
सारजा नमूं तरी तुमची गायणी । म्हणोनि चक्रपाणि नमन माझें ॥ २ ॥
इंद्र नमूं तरी तुमचिया भुजा । म्हणोनि गरुडध्वजा नमन माझें ॥ ३ ॥
ब्रह्मा नमूं तरी तुमचिये कुसी । म्हणोनि हृषिकेशी नमन माझें ॥ ४ ॥
शंकर नमूं तरी तुमची विभूति । म्हणोनि कमळापति नमन माझें ॥ ५ ॥
वेंद्र नमूं तरी तो तुझा स्थापिता । म्हणोनि लक्ष्मीकांता नमन माझें ॥ ६ ॥
गंगा नमूं तरी तुमच्या अंगुष्टीं । म्हणोनि जगजेठी नमन माझें ॥ ७ ॥
लक्ष्मी नमूं तरी तुमच्या पायांतळीं । म्हणोनि वनमाळी नमन माझें ॥ ८ ॥
[3]नामा म्हणे भेटी जालिया पैं राया । कोण गणि वायां सेवकासि ॥ ९ ॥

[४]

गाण जरी म्हणों तरी गणेश सारजा । आणिक नाहीं दुजा तयावांचूनी ॥ १ ॥
नाचणू म्हणों तरी तांडववनीं महेश्वरू । तो एक नृत्यकारू करूं जाणे ॥ २ ॥
बोलका म्हणों तरी बोलके वेद चारी । त्याणे काय उरी जें मी बोलों ॥ ३ ॥
जाणुं म्हणों तरी अठराही जाणें । त्या पैं काय उणें जें मी जाणों ॥ ४ ॥
कळावंत म्हणों तरी चंद्र सूर्य दोन्ही । बारा सोळा गगनीं दाविताती ॥ ५ ॥
नामा म्हणे आवघे आवघे वेचलें । केशवें आपुलें म्हणावें मातें ॥ ६ ॥

[५]

तरी मी गाणु नव्हे जे गाणीव करी । जेणें तुमतें हरि संतोष उपजे ॥ १ ॥
तरी मी जाणु नव्हे जे जाणीव करी । जेणें तुमतें हरि संतोष उपजे ॥ २ ॥
तरी मी दाता नव्हे जें दातृत्व करी । जेणें तुमतें हरि संतोष उपजे ॥ ३ ॥
तरी मी बहुरूपी नव्हे जे अभिनव नट धरी । जेणें तुमतें हरि संतोष उपजे ॥ ४ ॥
तरी मी योगी नव्हे जें मी ध्यान धरी । जेणें तुमतें हरि संतोष उपजे ॥ ५ ॥
यावरी जाणसी तें तूं करी अनंता । नामा विनवी संतां विष्णुदास ॥ ६ ॥

---

अभंग ३—(धु.), (पं.) व (शि.), ४—(शि.) व (पं.), ५—(आ.)

१ 'तुमचा' या शब्दाऐवजी 'तुझा' असा शब्द काही हस्तलिखितांत सर्व अभंगभर सापडतो. (पं. व शि.) २ काही हस्तलिखितांत 'माझें' च्या ऐवजी 'तुज' असे सर्वत्र सापडते. ३ ऐसें नमन माझें सकळिकां देवा । नामा म्हणे केशवा नमन माझें ॥ १ ॥ (पं., शि. व आ.)

अनुक्रमणिका

[६]

लंबोदरा तुज शोभे शुंडादंड । करीतसे खंड दुश्चिन्हांचा ॥ १ ॥
[1]चतुर्भुज आयुधें शोभताती हातीं । भक्ताला रक्षिती निरंतर ॥ २ ॥
भव्य रूप तुझें उंदीरवाहना । नमन चरणा करीतसे ॥ ३ ॥
तुझें नाम घेतां दोष [2]जळताती । कळिकाळ [3]कांपती तुझ्या नामें ॥ ४ ॥
चौदा विद्या तुझे कृपेनें येतील । मुके बोलतील वेदघोष ॥ ५ ॥
रूणझुण पायीं वाजताती वाळे । ऐकोनी भुलले मन माझें ॥ ६ ॥
भक्तवत्सला ऐकें पार्वतीनंदना । [4]नमन. चरणां करितसें ॥ ७ ॥
नामा म्हणे आतां देई मज स्फूर्ती । [5]वर्णितसें कीर्ति कृष्णजीची ॥ ८ ॥

[७]

सरस्वती माते द्यावी मज स्फूर्ती । येतों काकुलती तुजलागीं ॥ १ ॥
लाडकें लडिवाळ मागतसें तुज । वंदीन हे रज चरणींचे ॥ २ ॥
त्वरें येवोनियां मस्तकीं ठेवीं हात । जाईल ही भ्रांत तेव्हां माझी ॥ ३ ॥
आपुल्या बाळासी धरी आतां हातीं । न करी फजिती जनामध्यें ॥ ४ ॥
विश्वात्मा जो हरि त्याची वर्णीन कीर्ति । आवडीचा ओती रस यातें ॥ ५ ॥[6]
[7]ऐकोनियां स्तव जालीसे प्रसन्न । नाम्या तुझा अभिमान मजलागीं ॥ ६ ॥

[८]

प्रल्हाद नारद पराशर पुंडरीक । व्यास आणि वाल्मिक नमीयेले ॥ १ ॥
बगदालभ्य तो भीष्म अंबरीष शौनक । ब्रह्मनिष्ठ शुक नमीयेले ॥ २ ॥
रुक्मांगद अर्जुन वसिष्ठ बिभीषण । केलेसें नमन याजलागीं ॥ ३ ॥
टीकाकार श्रीधर बहिरंभट चतुर । करा निरंतर कृपा मज ॥ ४ ॥

---

अभंग ६—(घु.) व (आ.), ७—(घु.), ८—(घु.)
१ चतुर्थ (आ.) २ पळतांती (घु.) ३ भिती (घु.) ४ मस्तक चरणा ठेवितसे।(घु.)
५ वर्णावया कीर्ति विठोबाची । (घु.) ६ हा चरण काही हस्तलिखितांत सापडत नाही. (घु.)
७ विष्णुदास नामा विणवितसे तुज । राखि माझि लाज आदिमाते । (घु.)

अनुक्रमणिका

[1]साधुसंतसिद्ध शिरीं ठेवा हात । वर्णीन समस्त कृष्णलीला ॥ ५ ॥
नामा मनीं आठवी खेचरचरण । तयाच्या कृपेनें सिद्धि जावो ॥ ६ ॥

[९]

देवा आदिदेवा सर्वत्रांच्या जीवा । ऐकें वासुदेवा दयानिधी ॥ १ ॥
ब्रह्मा आणि इंद्र [2]वंद्य सदाशिवा । ऐकें वासुदेवा दीनबंधु ॥ २ ॥
चौदा लोकपाळ करिती तुझी सेवा । ऐकें वासुदेवा कृपासिंधु ॥ ३ ॥
योगियांचें ध्यानीं नातुडसी देवा । ऐकें वासुदेवा जगद्गुरु ॥ ४ ॥
निर्गुण [3]निराकार नाहीं तुज माया । ऐकें कृष्णराया कानडिया ॥ ५ ॥
करुणेचा पर्जन्य शिंपी मज तोया । ऐकें कृष्णराया गोजरीया ॥ ६ ॥
नामा म्हणे जरी दाखविशील पाया । तरी [4]वदावया स्फूर्ति चाले ॥ ७ ॥

[१०]

क्षीरसागरांत अससी बैसला । धांवोनी मजला भेटी देई ॥ १ ॥
शेषावरी जरी असशी निजला । धांवोनी मजला भेटी देई ॥ २ ॥
कैलासी शिव पूजितसे तुजला । धांवोनि मजला भेटी देई ॥ ३ ॥
योगियांचें ध्यानीं अससी बैसला । धांवोनि मजला भेटी देई ॥ ४ ॥
गहिंवरोनि नामा बाहात विठ्ठला । धांवोनी मजला भेटी देई ॥ ५ ॥

[११]

चक्रवाक पक्षी वियोगें बाहाती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ १ ॥
चुकलिया माय बाळकें रडती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ २ ॥
वत्स न देखतां गाई हुंबरती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ ३ ॥
जीवनावेगळे मत्स्य तळमळती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मज ऐसें वाटे चित्तीं । करीतसे खंती फार तुझी ॥ ५ ॥[5]

अभंग ९—(धु.) व (बा.), १०—(धु.) व (पं.), ११—(पं.) व (धु.)
१ साधुसंत शीघ्र (धु.) २ वंदी सदासीव (धु.) ३ निर्विकार (आ.) ४ वंदावया (बा.)
५ काही प्रतींत हा चरण नाही. (धु.)

अनुक्रमणिका

[१२]

काय माझा आतां पाहातोसी अंत । येई बा धांवत [1]देवराया ॥ १ ॥

माझ्या जीवा होय तुजविण आकांत । येई बा धांवत देवराया ॥ २ ॥[2]

असे जरी काम भेटूनियां जात । येई बा धांवत देवराया ॥ ३ ॥

[3]येरे देवा आतां नामा तुज बाहात । येई बा धांवत देवराया ॥ ४ ॥

[१३]

न वर्णवे वाचे जन्ममरण दुःख । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ १ ॥

कुरळिया केश भाळीं शोभे टिळक । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ २ ॥

भोंवया व्यंकटा शोभती सुरेख । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ ३ ॥

कमलाकार नेत्र सुंदर नासीक । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ ४ ॥

कर्णींची कुंडलें न वर्णवे हाटक । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ ५ ॥[4]

अधरारक्त दंत इंदुहूनि अधिक । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ ६ ॥

विष्णुदास नामा तुझेंचि बाळक । दावीं आतां मुख पांडुरंगा ॥ ७ ॥[5]

[१४]

बाहुबळें तुवां काढिलें अमृत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ १ ॥

जननी माझी जंव्हां ज्याकडे बाहात । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ २ ॥

देवा बैसवोनि सुधेते वाढीत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ३ ॥

क्षीराचा सागर उपमन्यूशीं देत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ४ ॥

घेवोनियां चक्र परीक्षिता रक्षीत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ५ ॥[6]

कवटाळुनी धरिलें ध्रुवासी वनांत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ६ ॥

विदुराच्या घरीं कण्या सांभाळीत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ७ ॥

चिरंजीव करूनियां नगरी सुवर्ण देत । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ८ ॥

नामा म्हणे युद्धीं रक्षियेला पार्थ । ठेवीं बा तो हात शिरावरी ॥ ९ ॥

---

अभंग १२, १३ व १४--(धु.)

१ रामराया (धु.) २ हा चरण काही प्रतींत सापडत नाही. (धु.) ३ येरे रामा (धु.) ४ हा चरण काही प्रतींत मिळत नाही. (धु.) ५ काही प्रतींत चरणांचा क्रम पुढीलप्रमाणे आहे—१, ६, ४, ३, २, ५ व ७. (धु.) ६ हा चरण काही प्रतींत सापडत नाही. (धु.)

अनुक्रमणिका

[१५]

रुणझुण पायीं वाजताती वाळे । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ १ ॥
जनक श्रुत देवाच्या घरासी जे गेले । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ २ ॥
धरियेलें नक्रें तेव्हां जे धाविले । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ३ ॥
वस्त्रहरणीं ज्यातें द्रौपदीनें चिंतिलें । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ४ ॥[१]
देखोनियां ज्यांतें कौरव भ्याले । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ५ ॥
धर्म आणि भीष्म विदुरादिक धाले । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ६ ॥
स्वयंवराशीं जातां शीळें उद्धरिलें । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ७ ॥
नामा म्हणे ज्यातें बळीनें पूजिलें । दावीं तीं पाऊलें दयानिधी ॥ ८ ॥

[१६]

अडखळूनी पडशी घालूं नको जोडा । धांवत दुडदुडा येईं आतां ॥ १ ॥
बैसावयासाठीं घेऊं नको घोडा । धांवत दुडदुडा येईं आतां ॥ २ ॥[२]
भोजना बैसलासी येथें घेईं विडा । धांवत दुडदुडा येईं आतां ॥ ३ ॥
बाहुबळें काढिला देवांचा जो खोडा । धांवत दुडदुडा येईं आतां ॥ ४ ॥
[३]कृपाळु बहुत लक्ष्मीचा [४]चुडा । त्याला बाहतसे वेडा नामदेव ॥ ५ ॥

[१७]

येरे येरे देवा तुला देईन मी पेडा । वेगीं बाहे वेडा नामदेव ॥ १ ॥
ज्याचे पायीं असे बिरुदाचा तोडा । त्याला बाहे वेडा नामदेव ॥ २ ॥
जनीं पुसे सुखी रखुमाईचा [५]चुडा । त्याला बाहे वेडा नामदेव ॥ ३ ॥
यावयासी येथें आळस तुम्हीं सोडा । घेईन इडापिडा नामा म्हणे ॥ ४ ॥

[१८]

युगा ऐसें पळ तुजविण जाय । पहातोसी काय अंत माझा ॥ १ ॥
कोमळ हृदय तुझें [६]पंढरीच्या राया । कठिण सखया कैसें जालें ॥ २ ॥

---

अभंग १५—(धु.) व (पं.), १६—(धु.) व (बा.), १७ व १८—(धु.)
१ हा चरण काही हस्तलिखितांत सापडत नाही. (धु.) २ काही प्रतींत हा चरण सापडत नाही. (धु.) ३ नामा म्हणे सुखी लक्ष्मीचा हा चुडा । त्याला बाहतो वेडा नामदेव ॥ (बा.) ४ जोडा (आ.) ५ जोडा (आ.) ६ बऱ्याच ठिकाणी ' रामराया ' असा शब्द आढळतो. (धु.)

अनुक्रमणिका

विचारिलें चित्तीं दुर्लभ हरिहरा । जाऊं [1]कैसा घरा रंकाचिया ॥ ३ ॥
अंगिकारावरी अव्हेराची मात । नव्हे हें उचित देवराया ॥ ४ ॥
मागें जे कां आळी केली वासुदेवा । उदारा केशवा पुरविली ॥ ५ ॥
नुपेक्षिसी ऐसा भरंवसा चित्तासी । दिसोनी निराशा जाली आतां ॥ ६ ॥
वांचोनिया दुःख भोगावें म्यां आतां । प्राणासी मुकतां तेंचि भलें ॥ ७ ॥
वर्णितां नामा जाला समाधिस्थ । जहालें विदित पांडुरंगा ॥ ८ ॥

[१९]

त्वरें धांवोनियां आलासे गोविंद। सावध सावध नामदेवा ॥ १ ॥
रुसलासे नामा देवासी न बोले । करें कुर्वाळिलें वदन तेव्हा ॥ २ ॥
समजावूनि देवें धरिला पोटासीं । बोले मजपाशीं नामदेवा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा उशीर कां केला । किंवा माझा आला राग तुला ॥ ४ ॥

[२०]

वेळोवेळां तुज बाहे वेडा भक्त । राहू नेदी निवांत क्षण एक ॥ १ ॥
मागें बहुतांनीं केले रे प्रबंध । तुझे पाहूनि छंद वेडावलों ॥ २ ॥
माथा ठेऊनि हात बोले विश्वाचा जो बाप । वर्णिरे प्रताप नामदेवा ॥ ३ ॥

[२१]

करील जो प्रश्न सांगेल जो कथा । श्रवण करितां उद्धरती ॥ १ ॥
कथा भागीरथी स्नान जे करिती । त्याचे उद्धरती पूर्वज ते ॥ २ ॥
भागीरथी स्नाना श्रम लागे फार । करावें एकाग्र मन येथें ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें बोले भागवत । शुक सांगतसे परीक्षिती ॥ ४ ॥

[२२]

पापी जे अभक्त दैत्य ते माजले । धरणीसी जालें ओझें त्यांचें ॥ १ ॥
दिधलासे त्रास ऋषि मुनि सर्वा । न पूजिती देवा कोणी एक ॥ २ ॥

अभंग १९, २०, २१ व २२—(धु.)
१ काय (धु.)

राहियेले यज्ञ मोडिलें कीर्तन। पळाले ब्राह्मण दैत्यां भेणें ॥ ३ ॥
वत्सरूपीं पृथ्वी ब्रह्मयापाशीं जाय । नेत्रीं बाहे तोय सांगतसे ॥ ४ ॥
बुडविला धर्म अधर्म जाला फार । सोसवेना भार मज आतां ॥ ५ ॥
ब्रह्मा इंद्र आणि बरोबरी शिव । चालियेले सर्व क्षीराब्धीशीं ॥ ६ ॥
नामा म्हणे आतां करितील स्तुती । सावधान चित्तीं परिसावें ॥ ७ ॥

[ २३ ]

वासुदेवा हृषिकेशा माधवा मधुसूदना । करिताती स्तवना पुरुषसूक्तें ॥ १ ॥
पद्मनाभ त्रिलोकेशा वामना [१]शेषशायी । आम्हां कोणी नाहीं तुजवीण ॥ २ ॥
जनार्दना हरि श्रीवत्स गरुडध्वजा । पाव अधोक्षजा आतां आम्हां ॥ ३ ॥
वराहा पुंडरीका नृसिंह नरांतका । वैकुंठनायका देवराया ॥ ४ ॥
अच्युता शाश्वता अनंता अज अव्यया । कृपेच्या अभया देई आम्हां ॥ ५ ॥
नारायणा देवाध्यक्षा कैठभभंजना । करीरे मर्दना दुष्टाचिया ॥ ६ ॥
चक्रगदाशंखपाणि नरोत्तमा । पाव पुरुषोत्तमा दासा तुझ्या ॥ ७ ॥
रामा हयग्रीवा भीमा रौद्रोद्भवा । आश्रय भूतां सर्वां तुझा असे ॥ ८ ॥
श्रीधरा श्रीपति चतुर्बाहो मेघःशामा । लेकुरें आम्ही आम्हां पाव त्वरें ॥ ९ ॥
नामा म्हणे ऐसें करितां स्तवन । तोषला भगवान क्षीराब्धींत ॥ १० ॥

[ २४ ]

आकाशीं वाणी होय सांगे सकळांसी । तळमळ मानसीं करू नका ॥ १ ॥
देवकीच्या गर्भा येईल भगवान । रक्षील ब्राह्मण गाई भक्त ॥ २ ॥
उतरील भार मारील दैत्यांसी । आनंद सर्वांसी करील तो ॥ ३ ॥
रोहिणी उदरीं शेष बळिभद्र । यादव समग्र व्हारे तुम्ही ॥ ४ ॥
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं । येती स्वस्थळासी नामा म्हणे ॥ ५ ॥

[ २५ ]

शेषाप्रती बोले लक्ष्मीचा तो वर । चला अवतार घेऊं आतां ॥ १ ॥
पृथ्वीवरी दैत्य [२]ते मातले फार । गाऱ्हाणें सुरवर सांगू आले ॥ २ ॥

---

अभंग २३—(धु.), २४—(पं.) व (धु.), २५—(आ.)
१ जळशाई (धु.) २ मारिले ते फार (आ.)

शेष म्हणे मज श्रम जाले फार । या लागीं अवतार मी न घेचि ॥ ३ ॥
राम अवतारीं जालों लक्षुमण । सेविलें अरण्य तुम्हासवें ॥ ४ ॥
चौदा वर्षांवरी केलें उपोषण । जाणतां आपण प्रत्यक्ष हें ॥ ५ ॥
नामा म्हणे एसें वदे धरणीधर । हांसोनी श्रीधर काय बोले ॥ ६ ॥

[२६]

पूर्वी तूं अनुज जालासी कनिष्ट । सोसियेले कष्ट मजसवें ॥ १ ॥
आतां तूं वडील होईगा सर्वज्ञा । पाळीन मी आज्ञा तुझी बारे ॥ २ ॥
देवकी उदरीं राहावें जावोनी । मायेसी मागूनि पाठवितों ॥ ३ ॥
योगमाया तुज काढील तेथून । घालील नेऊन गोकुळासी ॥ ४ ॥
लक्ष्मीशीं सांगे तेव्हां हृषिकेशी । कौंडण्यपुराशीं जावें तुम्ही ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसा करूनि विचार । घ्यावया अवतार सिद्ध असे ॥ ६ ॥

[२७]

वसुदेवा देत देवकी बहीण । लग्नामध्यें विघ्न जालें ऐका ॥ १ ॥
आकाशीची वाणी सांगतसे कंसा । मानी भरंवसा हा बोलण्याचा ॥ २ ॥
आठवा इचा पुत्र वधील तुजसी । ऐकोनीं मानसीं क्रोधावला ॥ ३ ॥
घेऊनियां खड्ग माराया धांवला । हात तो धरीला वसुदेवें ॥ ४ ॥
देईन मी पुत्र सत्य माझें मानी । ठेवा बंदिखानीं दूतां सांगे ॥ ५ ॥[1]
होतांचि प्रसूत नेऊनियां देत । साहाही मारीत दुराचारी ॥ ६ ॥
धन्य त्याचें ज्ञान न करीच शोक । वधितां बालक नामा म्हणे ॥ ७ ॥

[२८]

सातवा जो गर्भ योगमाया नेत । आश्चर्य करीत मनामाजीं ॥ १ ॥
रोहिणी उदरीं नेवोनी घातला । न कळे कोणाला देवावीण ॥ २ ॥
कंसाचिया भेणे यादव पळाले । ब्राह्मण राहिले अरण्यांत ॥ ३ ॥

अभंग २६—(आ.) २७—(धु.), २८—(पं.) व (धु.)

१ चरण ५ व ६ यांच्यामध्ये (आ.) प्रतीत खालील चरण सापडतो. तो असा—
पुण्य सारावया भेटे देवऋषी । वधी बाळकांसी ठेवूं नको ॥ (आ.)

नाहीं कोणा सुख तळमळ मानसीं । वधील दुष्टासी कोण आतां ॥ ४ ॥
[1]विश्वाचा जनिता कळेल तयाला । दावितसे लीला संभूतीची ॥ ५ ॥
अहर्निशी [2]ध्यान भक्तांचें मानसीं । स्थापील धर्मासी नामा म्हणे ॥ ६ ॥

[२९]

देवकीचें तेज दिसे जैसा सूर्य । कंसाचें हृदय जळतसे ॥ १ ॥
हरणें पळती देखोनियां व्याघ्र । कांपे थरथर तैशापरी ॥ २ ॥
अजासर्पन्यायें कीटकभ्रमर । दिसती नारीनर कृष्णरूप ॥ ३ ॥
जेवितां बोलतां शेजेसी तो निजे । आला आला मज मारावया ॥ ४ ॥
नासील हा आतां दैत्यांचे तें बंड । फाटलीसे गांड तेव्हां त्याची ॥ ५ ॥
नामा म्हणे भयें लागलेंसें ध्यान । चराचरी कृष्ण दिसतसे ॥ ६ ॥

[३०]

विमानांची दाटी अंतरिक्षीं देव । करिताती सर्व गर्भस्तुति ॥ १ ॥
सत्रा अक्षरांत असे तुझी मूर्ती । यज्ञेशा तुजप्रती नमो नमो ॥ २ ॥
सहाजणें भांडती नवजणी स्थापिती । न कळे कोणाप्रती अंत तुझा ॥ ३ ॥
अठराजणें तुझी वर्णिताती कीर्ति । गुणातीत श्रीपती नमो तुज ॥ ४ ॥
चौघा जणां तुझा न कळेचि पार । श्रमसी वारंवार आम्हांसाठीं ॥ ५ ॥
अठ्यांशीं सहस्र वर्णिताती तुज । ब्रह्मांडाचें बीज तुज नमो ॥ ६ ॥
जन्ममरणाचें नाहीं तया भय । आठविती पाये तुझे देवा ॥ ७ ॥
नवजणी तुझ्या पायीं लोळताती । परब्रह्म मूर्ति तुज नमो ॥ ८ ॥
नामा म्हणे ऐशी करिताती स्तुती । पुष्पें वाहुनि जाती स्वस्थळासी ॥ ९ ॥

[३१]

मयूरादि पक्षी नृत्य करिताती । नद्या वाहताती दोन्ही थडया ॥ १ ॥
भूमीवरी सडे केशर कस्तुरी । आनंद अंतरीं सकळांच्या ॥ २ ॥

---

अभंग २९, ३० व ३१—(पं.) व (धु.)
१ जो आत्मा (आ.) २ सुख (धु.)

विमानांची दाटी सुरवर येती । गंधर्व गाताती सप्तस्वरें ॥ ३ ॥
मंदमंद मेघ गर्जना करिती । वाद्यें वाजताती नानापरी ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वर्गीं नगारे वाजती । अप्सरा नाचती आनंदानें ॥ ५ ॥

[३२]

दशरथें मारिला तोची होता मास । वर्षा ऋतु असे कृष्णपक्ष ॥ १ ॥
वसूनाम तिथीं बुधवार असे । शुक सांगतसे परीक्षिती ॥ २ ॥
रोहिणी नक्षत्र दोन प्रहररात्र । माया घाली वस्त्र रक्षपाळा ॥ ३ ॥
नवग्रह अनुकूल सर्वांचें जें मूळ । वसुदेव कपाळ धन्य धन्य ॥ ४ ॥
जयाचा हा वंश तयासी आनद । माझ्या कुळीं गोविंद अवतरला ॥ ५ ॥
अयोनीसंभव नोहे कांहीं श्रमी । नामयाचा स्वामी प्रगटला ॥ ६ ॥

[३३]

कोटिशा आदित्य [1]गोठे एके ठायीं । तेजें दिशा दाही उजळल्या ॥ १ ॥
घाबरा होऊनी वसुदेव पाहे । हृदयीं आश्चर्य करीतसे ॥ २ ॥
मुकुटावरीं रत्न नक्षत्रांचा मेळा । भाळीं शोभे टिळा केशराचा ॥ ३ ॥
व्यंकटा भ्रूकुटी कमलाकार नेत्र । नासीक विचित्र शुकचंचु ॥ ४ ॥
विद्युल्लते ऐसी झळकती कुंडलें । अधर कोवळें अरुणोदय ॥ ५ ॥
कंबुग्रीव कंठ हृदयीं वच्छलाच्छन । ब्रह्मयासी [2]खूण न कळे अंत ॥ ६ ॥
चतुर्भुज शंखचक्रगदापद्म । चिमणा मेघःशाम वर्ण ज्याचा ॥ ७ ॥
कौस्तुभ निर्मळ वैजयंती माळा । कासे सोनसळा हाटकवर्ण ॥ ८ ॥
रुणझुण रुणझुण वाजताती वाळे । आरक्त वर्तुळ नखीं शोभा ॥ ९ ॥
ध्वजवज्रांकुश जैसीं रातोत्पळें । नामा म्हणे डोळे दिपताती ॥ १० ॥

[३४]

अयुत गायी ब्राह्मणांसी । सोडी संकल्प मानसीं ॥ १ ॥
ओळखिलें तुज । आतां कळलासी मज ॥ २ ॥

अभंग ३२, ३३ व ३४—(पं.) व (धु.)
१ घोटिले (धु.) २ सीण (पं. व आ.)

धर्म स्थापावया । येथें येसी देवराया ॥ ३ ॥
आलिंगितां दोहीं बाहीं । नामा म्हणे डोई पायीं ॥ ४ ॥

[३५]

सोडी सोडी मिठी । लपवा लपवा जगजेठी ॥ १ ॥
झणीं कंसासी कळेल । माझ्या बाळासी मारील ॥ २ ॥
[1]वसुदेव चिंता मनीं । तेज न माये गगनीं ॥ ३ ॥
नामा म्हणे आलें हांसें । देव तेव्हां सांगतसे ॥ ४ ॥

[३६]

नंदाच्या घराला । मज नेई गोकुळाला ॥ १ ॥
माया उपजली तेथें । ठेवी मज आणी येथे ॥ २ ॥
म्हणसी असे रक्षपाळ । ते म्यां मोहिले सकळ ॥ ३ ॥
आच्छादित रूप । नामा म्हणे माझा बाप ॥ ४ ॥

[३७]

[2]उचलिला कमळापती । पायींचीं [3]बंधनें गळती ॥ १ ॥
त्रैलोक्यांत जो न माय । त्यासी बंधन करील काय ? ॥ २ ॥
कवाडें उघडती । देखतांची देवाप्रती ॥ ३ ॥
मंद मंद पडे पाऊस । शिरीं छाया करी शेष ॥ ४ ॥
पूर चढला अवचट । त्यासी लाविला अंगुष्ठ ॥ ५ ॥
त्वरें आला नंदाघरीं । निद्रिस्त त्या नरनारी ॥ ६ ॥
ठेवी तेथें कृष्णजीला । माया घेऊनि निघाला ॥ ७ ॥
रडे माया करी आकांत । नामा म्हणे उठती दूत ॥ ८ ॥

[३८]

पूर्णब्रह्म मानी कंसाच्या भयासी । वाटेल मानसीं कोणाचिया ॥ १ ॥
इच्छामात्रें करी सृष्टीचा प्रलय । त्यासी असे भय कवणाचें ॥ २ ॥

अभंग ३५, ३६ व ३७—(पं.) व (धु.), ३८—(आ.)
१ वसुदेवाचे चित्तांत । यासी लपवावें त्वरित ॥ (धु.) २ उचलीता (पं.) ३ पैंजणें (पं.)

अनुक्रमणिका

नंदाचें सुकृत जालें अगणित । म्हणोनी भगवंत आला तेथें ॥ ३ ॥
सर्वां होय सुख तरतील लोक । नामा म्हणे शुक सांगतसे ॥ ४ ॥

[३९]

तांतडीनें जाती । कंसा सेवक सांगती ॥ १ ॥
उपजला वैरी । त्यासी तूं रे त्वरें मारी ॥ २ ॥
त्वरें धांव घाली । पाहे कन्या उपजली ॥ ३ ॥
ज्याचा धाक तुज । कन्या द्यावी मज ॥ ४ ॥
मारायाशीं खड्ग घाली । हातींची निसटूनियां गेली ॥ ५ ॥
तुजलागीं जो का वधी । उपजला मज आधीं ॥ ६ ॥
सांगे ब्रह्मज्ञान । देवकीचें समाधान ॥ ७ ॥
नामा म्हणे तयेवेळीं । त्यांची बंधनें काढिलीं ॥ ८ ॥

[४०]

बोलावुनी अवघीयातें । कंस पाहे विचारातें ॥ १ ॥
कोणी एक रे बोलती । आम्हां ठावी देववस्ती ॥ २ ॥
जेथें पुराण कीर्तन । गाईब्राह्मण करिती यज्ञ ॥ ३ ॥
तेथें असे नारायण । वधूं तयासी जाऊन ॥ ४ ॥
वैरी सहजची मरेल । ऐसे बोलताती बोल ॥ ५ ॥
कंसा मानवलें जाण । करा मजसाठीं यत्न ॥ ६ ॥
नामयाचा छंद । नंद करितो आनंद ॥ ७ ॥

[४१]

शुक म्हणे राया ऐक परीक्षिती । श्रवण करितां तृप्ति नाहीं तुज ॥ १ ॥
माया जातां मथुरे होती ते निद्रिस्त । देखिला भगवंत यशोदेनें ॥ २ ॥
ब्रह्मांडें उदरीं न कळे कोणाला । वाजविती थाळा जन्मकाळीं ॥ ३ ॥
यज्ञभोक्ता कृष्ण त्यासी देती बोळा । ध्यानीं ध्याय भोळा सदाशिव ॥ ४ ॥
गौळणी बाहाती नंदालागीं तेव्हां । पुत्रमुख पाहा नामा म्हणे ॥ ५ ॥

अभंग ३९, ४०--(पं.) व (धु.), ४१--(धु.)



अनुक्रमणिका

[४२]

विश्वाचा जो बाप हातीं ज्याच्या सूत्र । म्हणविती पुत्र नंदजीचा ॥ १ ॥
तीर्थें ज्याच्या चरणीं करीताती न्हाणी । यशोदा जननी म्हणताती ॥ २ ॥[1]
वेडावला शेष शिणले वेद चारी । निजे मांडीवरी यशोदेच्या ॥ ३ ॥
शरणागता देत क्षीरसिंधु [2]जाण । [3]चोखीतसे स्तन आवडीनें ॥ ४ ॥
त्रैलोक्याचा राजा वर्णूं काय रंक । ऐकावें जातक नामा म्हणे ॥ ५ ॥

[४३]

नंदें करूनियां स्नान । वस्त्रें घेतलीं नूतन ॥ १ ॥
पाचारा ब्राह्मण । शृंगारावें देवसदन ॥ २ ॥
बाहा बाहा दशग्रंथी । त्यासी सांगो आणा पोथी ॥ ३ ॥
त्वरें बाहारे ज्योतिषी । नंद करी जातकासी ॥ ४ ॥
केलें देवतार्चन । द्विज सांगती तर्पण ॥ ५ ॥
फार त्याला सुख । पाहे कृष्णजीचें मुख ॥ ६ ॥
करी पुण्याहवाचनें । नामा म्हणे आनंदानें ॥ ७ ॥

[४४]

आला जगदोद्धार । त्याचे भरलें भांडार ॥ १ ॥
सुशोभित दिसे मही । दोन लक्ष दिधल्या गायी ॥ २ ॥
तिळ तांदूळ पर्वत । द्रव्यें वांटी अगणित ॥ ३ ॥
एक जाती एक येती । ओझें उचलितां कुंथती ॥ ४ ॥
भाट वर्णिताती । नामा म्हणे ज्याची कीर्ति ॥ ५ ॥

[४५]

तुतारे भोंवारें वाजंत्री वाजती । अप्सरा नाचती [4]थैथैकारें ॥ १ ॥
झणझणा झणझणा झांजा गर्जताती । [5]नौबता वाजती धो धो धो धो ॥ २ ॥

---

अभंग ४२—(धु.), ४३—(पं.), ४४ व ४५—(पं.) व (धु.)

१ हा चरण काही प्रतींत सापडत नाही. (धु.) २ दाना (धु.) ३ त्यासी देत स्तना यशोदा ते। (धु.) ४ थैय थैया (बा. व आ.) ५ नौबदा (आ.)

अनुक्रमणिका

सुरवर येती विमानांची दाटी । करिती पुष्पवृष्टी देवावरी ॥ ३ ॥
नारद तुंबर गंधर्व किन्नर । गाती [१]सर्व सप्त स्वरीं तेव्हां ॥ ४ ॥
कीर्तनाचा घोष टाळांचा गजर । मृदंग वीणे सुस्वर वाजताती ॥ ५ ॥
केशरी गंध टिळा लावीतसे भाळा । घाली पुष्पमाळा द्विजाकंठीं ॥ ६ ॥
घरोघरीं नंद धाडी शर्करेसी । वस्त्रें सुहृदांसी नामा म्हणे ॥ ७ ॥

[ ४६ ]

ब्राह्मण आशिर्वाद देती । नंदा पुसोनि निघती ॥ १ ॥
चलाचला म्हणती लोक । पाहूं नंदाचें बालक ॥ २ ॥
नरनारी अलंकार । शृंगारिलें हो नगर ॥ ३ ॥
दैन्य दारिद्र अपेश । पळती मानूनियां त्रास ॥ ४ ॥
आणिताती बाललेण । स्त्रिया पाहताती कृष्ण ॥ ५ ॥
नामा म्हणे पाहतां मुख । हारपली तहान भूक ॥ ६ ॥

[ ४७ ]

पाटावरी बैसविती । गोपी अक्षवाणें करिती ॥ १ ॥
ब्रह्मादिक न देखती माथा । त्यासी लाविती अक्षता ॥ २ ॥
नव्हे प्राकृत बालक । परस्परें म्हणती लोक ॥ ३ ॥
ध्वज वज्रांकुश चिन्हां । आला वैकुंठीचा राणा ॥ ४ ॥
लोक येती वेळोवेळां । नामा म्हणे पाहती डोळां ॥ ५ ॥

[ ४८ ]

द्रव्य द्यावयासी । नंद गेला मथुरेसी ॥ १ ॥
तेथें भेटे वसुदेव । सांगितलें गुह्य सर्व ॥ २ ॥
कंसाचें मानसीं । घात इच्छी गोकुळासी ॥ ३ ॥[२]
जाई जाईरे त्वरित । होती गोकुळीं आघात ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें सांगे । नंद तेथुनियां निघे ॥ ५ ॥

अभंग ४६ व ४७—(धु.), ४८—(पं.) व (धु.)
१ व्योमीं (धु.) २ हा चरण काही प्रतींत सापडत नाही. (धु.)



अनुक्रमणिका

[४९]

कंसें पाठविली मायावी पूतना । देवोनियां स्तना बाळें मारी ॥ १ ॥
दीन दुर्बळांची मारीत बालकें । करीताती शोक मायबाप ॥ २ ॥
गर्हिवरोनि तेव्हां पुसे परीक्षिती । भगवंताची मूर्ती बाळरूप ॥ ३ ॥
अभय देतसे बापा नको रडूं । तें काय घुंगुर्डुं मारूं शके ॥ ४ ॥
जेथें पुराणें कीर्तन होत नामघोष । तेथें यम त्रास घेत असे ॥ ५ ॥
पळती तेथुनि असुरादिक वैरी । तेथें नाहीं उरीं पाप तापा ॥ ६ ॥
नामा म्हणे आली नंदाचिये घरीं । स्वरूपें सुंदरी देवांगना ॥ ७ ॥

[५०]

कृष्णा लावितसे स्तनीं । तिसी मारी चक्रपाणि ॥ १ ॥
भयाभीत प्रेत । जन विस्मय करीत ॥ २ ॥
रडे तेव्हां माया। वांचलासी बा तान्हया ॥ ३ ॥
[1]मिळोनियां समस्त । भाळीं आंगारा लावीत ॥ ४ ॥
वसुदेवें सांगितलें । नंद म्हणे तैसें जालें ॥ ५ ॥
कुऱ्हाडी आणिती । शस्त्रें करूनि तोडिती ॥ ६ ॥
नामा म्हणे दिला अग्नी । वास न माये गगनीं ॥ ७ ॥

[५१]

पुण्यवंता दावी बाळलीला देव । पालथा केशव पडे तेव्हां ॥ १ ॥
नंदें उत्साहासी केलें तेव्हां पार । दिधलें अपार द्रव्य द्विजां ॥ २ ॥
यशोदा घेतसे देवाचें चुंबन । तुजला न्हाणीन तान्ह्या माझ्या ॥ ३ ॥
चोंगईचा मुका घेताती गौळणी । हांसे चक्रपाणि आनंदानें ॥ ४ ॥
नामयाचा स्वामी मंदमंद हांसे । यशोदा करितसे निंबलोण ॥ ५ ॥

[५२]

करावया वनभोजन । जाती गोकुळींचे जन ॥ १ ॥
कोणी भोजन करिती । कोणी देवा खेळविती ॥ २ ॥

अभंग ४९—(धु.), ५० व ५१—(पं.) व (धु.), ५२—(धु.)
१ सकळ वेल्हाळि (धु.)

डोळे झांकीत श्रीपती । दावी निद्रेची आकृती ॥ ३ ॥
बहुत खेळलासे खेळा । आतां निजवा गे बाळा ॥ ४ ॥
वस्त्रें घालुनी शकटातळीं । निजविती वनमाळी ॥ ५ ॥
क्षण एक निजला देव । रडे उठे वासुदेव ॥ ६ ॥
मुलांलागीं म्हणे तेव्हां । माझा कान्होबा खेळवा ॥ ७ ॥
रागेंरागें झाडी लात । गाडा मोडोनी पडत ॥ ८ ॥
नामा म्हणे वाटी धन । नंद वांचला नंदन ॥ ९ ॥

[५३]

मांडीवरी घेत यशोदा सुंदरी । आळवी श्रीहरी नाना युक्ती ॥ १ ॥
तूंची माझा प्राण तूं माझी माउली । तूं माझी बहिणुली कान्हाबाई ॥ २ ॥
गणगोत भाऊ तूंची माझा सखा । संसार लटिका तुजवीण ॥ ३ ॥
तूंचि माझें धन तूंचि माझें जीवन । चुंबीत वदन वेळोवेळां ॥ ४ ॥
नामा म्हणे भार घाली मांडीवरी । ठेवी भूमीवरी कृष्णजीला ॥ ५ ॥

[५४]

कंसें पाठविला आला तृणावर्त । धुळीनें समस्त व्यापियेलें ॥ १ ॥
दुष्टबुद्धि तेव्हां उचली देवासी । धरियेलें त्यासी कंठीं देवें ॥ २ ॥
यशोदा पाहात न दिसे श्रीकृष्ण । ऊर बडवूनी शोक करी ॥ ३ ॥
गौळणींचा मेळा मिळाला समस्त । कोणी कृष्णनाथ नेला सये ॥ ४ ॥
न लगे घरदार बुडाला संसार । दावा गे श्रीधर तान्हें माझें ॥ ५ ॥
ठावें असतें ऐसें बांधित्यें पोटासी । कोठें गुंतलासी बाळा माझ्या ॥ ६ ॥
धांवा गे धांवण्या पाहा गे लेंकरूं । शोक अनिवारू करीतसे ॥ ७ ॥
शिणल्या भागल्या येतों तुम्हां घरां । मुख हें उदारा दावी कृष्णा ॥ ८ ॥
सोडूं पाहे प्राण यशोदा सुंदरी । हंबरडा फोडी कृष्णालागीं ॥ ९ ॥
चेपोनी नरडी गतप्राण केला । भूमीसी पाडिला दैत्य तेव्हां ॥ १० ॥
नामा म्हणे वरी खेळत गोविंद । पाहोनी आनंद सकळांचा ॥ ११ ॥

---

अभंग ५३—(पं.) व (धु.), ५४—(धु.)

अनुक्रमणिका

[५५]

आला गोकुळासी । हर्ष न माये मानसीं ॥ १ ॥
नंदे गर्गातें देखिलें । [1]पूजा स्तवनीं तोषविलें ॥ २ ॥
भूतभविष्य वर्तमान । तुम्हां कळे हो संपूर्ण ॥ ३ ॥
पाहा सामुद्रिक लक्षण । याचें काय सांगा चिन्ह ॥ ४ ॥
बोले तेव्हां गर्गऋषी । झणीं कळेल कंसासी ॥ ५ ॥
रोहिणीनंदादि बैसती । गर्ग घेउनी एकांतीं ॥ ६ ॥
घालूनियां मंगलस्नान । आरंभीं पुण्याहवाचन ॥ ७ ॥
ऐसी वदे शुकवाणी । नामा म्हणे ऐका कानीं ॥ ८ ॥

[५६]

जन्मजन्मांतरीं जाला तुज श्रम । म्हणोनियां ब्रह्म आलें येथें ॥ १ ॥
राखतील गाई मारतील दुष्ट । न करी बोभाट जनामध्यें ॥ २ ॥
द्वादश गांव अग्नि करील प्राशन । वांचवील प्राण सकळांचे ॥ ३ ॥
चोरोनियां गाई नेईल सौंगडे । लावील हा वेड ब्रह्मयासी ॥ ४ ॥[2]
उचलील पर्वत हरील हा गर्व । तारील हा सर्व नाममात्रें ॥ ५ ॥
समुद्रीं हा नगरी रचील क्षणांत । चरित्र अद्‌भुत करील हा ॥ ६ ॥
सोळा सहस्र स्त्रिया अष्ट त्या नायका । करील बाईका तुझा कृष्ण ॥ ७ ॥
[3]त्रैलोक्यांत हाची उदाराचा राणा । देईल ब्राह्मणा हेमपुरी ॥ ८ ॥
सांगुनिया ऐसें आशीर्वाद देऊनि । नामा म्हणे मुनि जाता जाला ॥ ९ ॥

[५७]

श्रीकृष्ण जन्मला वार्ता ही ऐकोनी । चिंता कंसा मनीं प्रवर्तली ॥ १ ॥
उद्विग्न मानसीं कंस तो बैसला । सन्मुख देखिला महाबळ ॥ २ ॥
गौरवोनी त्यासी सांगे वर्तमान । शत्रूसीं जाऊनि कोण मारी ॥ ३ ॥

अभंग ५५ व ५६—(पं.) व (धु.), ५७—(आ.)
१ पूजा आसनीं (धु.), भूजा स्तवनीं (आ.) २ अनेक प्रतींत ह्या चरणानंतर अभंग पुरा होतो. (बा.) ३ त्रैलोक्यांतरे उदाराचा राजा। (धु.)

अनुक्रमणिका

महाबळ दैत्य प्रतिज्ञा बोलत । शत्रुसी त्वरित मारीन मी ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसा बोलूनि निघाला । वेष धरियेला कपटाचा ॥ ५ ॥

[ ५८ ]

विप्र वेष तेव्हां घेऊनि निघाला । गोकुळासी आला लागवेगें ॥ १ ॥
पुत्रोत्सव कोठें लोकांस पुसत । भाविक सांगत नंदाघरीं ॥ २ ॥
ऐकोनियां ऐसें आला अकस्मात । यशोदा देखत सन्मुख त्या ॥ ३ ॥
श्रीकृष्णासी तेव्हां वोसंगीं घेतलें । दंडवत केले ब्राह्मणासी ॥ ४ ॥
सन्मुख बैसोनि वर्तमान पुसे । बाळाचें या कैसें चिन्ह सांगा ॥ ५ ॥
पंचांग त्या वेळीं काढिलें कपटानें । मान तुकावोनी पाहातसे ॥ ६ ॥
नामा म्हणे मंदें पंचांग पाहून । यशोदे लागून बोलतसे ॥ ७ ॥

[ ५९ ]

तुझिया पुत्रासी लागलेसें मूळ । करील निर्मूळ सर्वत्रांचें ॥ १ ॥
बाळकाचे अंगीं अवचिन्हें बहुत । नेऊनीं गर्तेत टाका यासी ॥ २ ॥
लोभ धरूनियां ठेवाल बाळकासी । ग्रासील सर्वांसी एकदांची ॥ ३ ॥
ऐकोनी यशोदा गहिंवरोनी बोले । गर्गानीं कथियेलें उत्तम गुण ॥ ४ ॥
अमंगळ वाणी पुनरपि बोलिला । गर्ग तो चुकला गणितासी ॥ ५ ॥
स्तनपान करीत असतां श्रीकृष्ण । मांडिलें विंदान नामा म्हणे ॥ ६ ॥

[ ६० ]

ठाईंहुनि जातीं उखळें उडताती । मस्तकीं आदळती येवोनियां ॥ १ ॥
पाटे वरवंटे वसुपात्रालागीं । जीव त्या प्रसंगीं येता जाला ॥ २ ॥
घाबरे दुर्जन पळाया पाहत । आडव्या ठाकत बाजा पुढें ॥ ३ ॥
जानवें तुटलें पंचांग फाटलें । धोतरही गळालें ढुंगणाचें ॥ ४ ॥
पाठीवरी होती बदबदा मार । तेथुन सत्वर पळता जाला ॥ ५ ॥
आयुष्याची कांहीं बाकी उरली होती । म्हणुनी श्रीपती सोडी त्यातें ॥ ६ ॥
नामा म्हणे जीव घेऊनि पळाला । मथुरेसी आला कंसापासीं ॥ ७ ॥

---

अभंग ५८ ते ६०—(आ.)

[ ६१ ]

परीक्षिती राया सांगतसे शुक । वैकुंठनायक रांगतसे ॥ १ ॥
दुडदुडा पळती मुखीं घाली माती । शेणांत लोळती दोघेजण ॥ २ ॥
नंदाच्या पुढील ओढीताती ताट । मिटक्या मटमट वाजविती ॥ ३ ॥
कटीं कडदोरा वांकी घुंघुरुवाळा । पिंपळपान भाळा शोभतसे ॥ ४ ॥
देवातें झोंकिती वर्जिल्या रडती । घडोघडीं येती बिदीमाजीं ॥ ५ ॥
वत्साचिये पुच्छें बळें ओढीताती । खोडी न सोडिती दोघेजण ॥ ६ ॥
विमानांची दाटी येताती सुरवर । नाम्याचा दातार पाहावया ॥ ७ ॥

[ ६२ ]

मृगाचिये श्रृंगे धरोनि नाचती । जन हांसताती खदखदां ॥ १ ॥
भोजना बैसती घांस घेती हातीं । मांजरें देखती दुरोनिया ॥ २ ॥
गळां त्यांच्या तेव्हां धरी मेघःश्याम । पुच्छ बळिराम ओढीतसे ॥ ३ ॥
यशोदा धांवत खदखदां हांसत । गौळणी समस्त पाहताती ॥ ४ ॥
पुसतांची मामा चोंगई दाविती । मर्कटाचे धरिती दोन्ही कान ॥ ५ ॥
रोहिणी म्हणे डसतील बाळा । किती म्यां याजला सांभाळावें ॥ ६ ॥
पाणी उडविती प्रतिबिंब पाहाती । गोरस सांडिती भूमीवरी ॥ ७ ॥
नामा म्हणे स्वामी सर्वांचा जो साक्षी । धरितसे पक्षी चुकवुनी ॥ ८ ॥

[ ६३ ]

मुतूनियां हातें भूमी सारविती । पोटासी पुसती दोघेजण ॥ १ ॥
घेऊनियां काष्ट घाशिताती दांत । वाकुल्या दावीत नंदालागीं ॥ २ ॥
जेवितां जेवितां बाहेर पळती । श्वानासी बाहाती युयु करुनी ॥ ३ ॥
तयापुढें दोघे ठेवुनियां वाटी । घालिताती मिठी गळां त्याच्या ॥ ४ ॥
देखोनियां जन खदखदां हांसती । यशोदे सांगती कवतुक ॥ ५ ॥
भिंती धरूनियां उभे राहताती । आधार जगतीं ज्यांचा असे ॥ ६ ॥
उभयतां जाती बिदी खेळावया । कुरवंडी काया नामयाची ॥ ७ ॥

अभंग ६१ व ६२—(पं.) व (धु.), ६३—(धु.)

अनुक्रमणिका

[ ६४ ]

मिळवुनी सौंगडे सांगती तयासी । चला गोरसासी देतों तुम्हां ॥ १ ॥
गेली असे एक गौळण जळाला । सांगे गोपाळाला तेथें जाऊं ॥ २ ॥
न पुरेचि हात दूध शिंक्यावरी । करावें मुरारी कैसें तेथें ॥ ३ ॥
पाटावरी पाट रची वनमाळी । पाडीतसे डुळी मोहोरीनें ॥ ४ ॥
बडवोनी टिरी नाचतसे पेंदा । भली ले गोविंदा युक्ती केली ॥ ५ ॥
उगला ले. बेते कलुं नका गलबला । थांबाला ले गोला लोनियाचा ॥ ६ ॥
कोणी पिती दूध कोणी खाती दहीं । आली लवलाही गौळण ते ॥ ७ ॥
अहर्निशीं धरूं मी जपतसें तुज । जासी कैसा आज चोरटिया ॥ ८ ॥
मुखींहुनि पय टाकी तिच्या डोळां । नामा म्हणे पळा सांगतसे ॥ ९ ॥

[ ६५ ]

गाऱ्हाणें सांगाया । आल्या गोकुळीच्या स्त्रिया ॥ १ ॥
यशोदा ऐकत । पळे बाहेरी भगवंत ॥ २ ॥
एक म्हणे लोणी । माझें भक्षी चक्रपाणि ॥ ३ ॥
फोडितसे भांडें । [1]वर्जिलिया म्हणे रांडे ॥ ४ ॥
गाई वासरें सोडितो । येऊन आम्हांसी सांगतो ॥ ५ ॥
अष्टदळ काढिलें अंगणीं । वरी मुते चक्रपाणि ॥ ६ ॥
घेऊनियां आला अग्न । तुझ्या घरासी लावीन ॥ ७ ॥
देईन मी तोंडावर । तुझ्या बापाचें हें घर ॥ ८ ॥
घेतसे वरखडे । शिव्या देऊनियां रडे ॥ ९ ॥
[2]देखोनिया गरोदर । म्हणे केवढें उदर ॥ १० ॥
सांगती गाऱ्हाणीं । नामा म्हणे ऐका कानीं ॥ ११ ॥

[ ६६ ]

एक म्हणे धरी स्तन । त्याचे उपटीन कान ॥ १ ॥
यशोदे तुला येईल राग । आपुल्या पोरा कांहीं सांग ॥ २ ॥

अभंग ६४ व ६५—(पं.) व (धु.), ६६—(पं.)
१ विर्जिलिया (आ.) २ येकीस म्हणे गरोदर। पाडु तुझा हा डोंगर॥ (पं. व धु.)

अनुक्रमणिका

अंधारीं लपत । पोरें करिती आकांत ॥ ३ ॥
सांगतसे शिकवणा । खोडी नको करूं कान्हा ॥ ४ ॥
तोंड करूनि वांकडें । मला म्हणे तशीच रडे ॥ ५ ॥
पोरां शिकवीत । गोरस आणारे समस्त ॥ ६ ॥
[1]आम्हीं निजलों समस्त । काजळ मुखासी लावीत ॥ ७ ॥
मेले आणूनिया सर्प । माझ्या पोरा दावी दर्प ॥ ८ ॥
योगियांचे न ये लक्षा । त्यासी लावूं म्हणती शिक्षा ॥ ९ ॥
अनंत गाऱ्हाणीं । नामा म्हणे कीर्ति वानीं ॥ १० ॥

[ ६७ ]

मुलें सांगताती । माती खातो गे श्रीपती ॥ १ ॥
लांकुड घेऊनि हातांत । माती खात असे पुसत ॥ २ ॥
भावा भुललासे खरा । कांपतसे थरथरा ॥ ३ ॥
मुख तियें उघडोनि । दावी तेव्हां चक्रपाणि ॥ ४ ॥
ब्रह्मांडें देखिलीं । नामा म्हणे वेडी जाली ॥ ५ ॥

[ ६८ ]

यशोदा घुसळीत । स्तन मागे भगवंत ॥ १ ॥
घालोनी पदर । पाजीतसे जगदीश्वर ॥ २ ॥
दूध जातसे उतोन । उठे कृष्णासी टाकून ॥ ३ ॥
मंथनपात्रातें फोडीत । पळे तेथूनि त्वरित ॥ ४ ॥
[2]मागें धांवली यशोदा । धरावया त्या गोविंदा ॥ ५ ॥
हातीं न लगे जगजेठी । नामा म्हणे होय कष्टी ॥ ६ ॥

[ ६९ ]

कृपा उपजली । उभा राहे वनमाळी ॥ १ ॥
धरूनि आणिला । आजी बांधीन मी तुला ॥ २ ॥

---

अभंग ६७ ते ६९—(पं.) व (धु.)
१ काजळ मुखासी लावित । चिमटे घेवोनि उठवित ॥ (पं.) २ धाव घालित (पं.)

दावें सोडुनियां । बांधितसे देवराया ॥ ३ ॥
फार करितोसी खोड्या । गोपी दाविती [1]वाकुड्या ॥ ४ ॥
दावीं अनंत लावीत । दोन बोटें उणें येत ॥ ५ ॥
करिताती चोज । परि नव्हेचि उमज ॥ ६ ॥
श्रमतसे वारंवार । पुढती करी जगदोद्धार ॥ ७ ॥
विष्णुदास नामा पुढें । [2]आतां उद्धरिल झाडें ॥ ८ ॥

[ ७० ]

कुबेराचे पुत्र मदोन्मत्त जाले । म्हणूनि शापिले नारदानें ॥ १ ॥
व्हाल तुम्हीं वृक्ष ऐकोनी सावध । जाला अपराध ऋषिराया ॥ २ ॥
विमलार्जुन वृक्ष व्हाल गोकुळांत । उश्शाप वदत कृपाळुवा ॥ ३ ॥
कृष्णाचा चरण लागेल तुम्हांसी । आपुल्या स्थळासी याल वेगीं ॥ ४ ॥
मोडितसे तेव्हां वृक्ष लक्ष्मीचा पती । दोघे निघताती दिव्य पुरुष ॥ ५ ॥
नामा म्हणे तेव्हां दिव्य करितांती स्तुती । पापें दग्ध होती ऐकतांची ॥ ६ ॥

[ ७१ ]

दामोदरा केशवा वामना देवा कृष्णा । परंज्योति नारायणा तुज नमो ॥ १ ॥
विश्वव्यापका जनार्दना वासुदेवा निर्गुणा । अव्यया जगजीवना तुज नमो ॥ २ ॥
अनंत अवतार घेसी भक्तांसाठीं । कृपाळु जगजेठी तुज नमो ॥ ३ ॥
यज्ञेशा सर्वेशा दयानिधी हृषिकेशा । पुराणपुरूषा तुज नमो ॥ ४ ॥
धन्य हा दिवस देखिले तुझे पाय । कृपादृष्टी पाहे आम्हांकडे ॥ ५ ॥
जोडोनियां हात करिती विनंति । देई तुझी भक्ति जन्मोजन्मीं ॥ ६ ॥
करूनि नमस्कार हळूहळू चालती । वेळोवेळां पाहती कृष्णाकडे ॥ ७ ॥
मोडतांचि वृक्ष धांवोनियां येती । मग पाहताती नामा म्हणे ॥ ८ ॥

[ ७२ ]

समस्तां सांगती लहानाली मुलें । नवल देखिलें आम्हीं आतां ॥ १ ॥
वृक्ष मुळींहुनी दोघे निघताती । पायासी लागती कान्होबाच्या ॥ २ ॥

अभंग ७०—(पं.) व (धु.), ७१—(आ.), ७२—(धु.)
१ वांकुल्या (आ.), वाकुडि (धु.)   २ आला जेथें उभी झाडें । (आ.)

यशोदेचे मनीं जालासे विवेक । वैकुंठनायक येथें आला ॥ ३ ॥
नामा म्हणे तिसी घालितसे माया । अपराध तयां काय असे ॥ ४ ॥

[ ७३ ]

नंदें सोडविलें तेव्हां त्या कृष्णासी । नासूं दे ग यासी दहींदूध ॥ १ ॥
मजला लेकरें नाहींत गे फार । विश्रांतीस थार एवढेंचि ॥ २ ॥
निवारिलें विघ्न देवें हें केवढें । पडती जरी झाडें याजवरी ॥ ३ ॥
आजपासूनि यासी बोलसी कठीण । देईन मी प्राण तुजवरी ॥ ४ ॥
स्फुंद स्फुंद रडे तेव्हां नारायण । देई त्यासी स्तन भुकेलासे ॥ ५ ॥
येश्वदा बाहातसे न ये वनमाळी । धांवोनि कुरवाळी वदन त्याचें ॥ ६ ॥
समजावोनि देवा पाजितसे स्तन । घालीत भोजन नामा म्हणे ॥ ७ ॥

अभंग ७३—(धु.)

• • •

अनुक्रमणिका

[७४]

एक गोप तेव्हां स्त्रियेसी सांगत । सांठवी समस्त नवनीत ॥ १ ॥
देवाचा नवस आहे पुरवणें । धरावें येथून अनसुट ॥ २ ॥
सांगोनियां ऐसें राहिला तो स्वस्थ । मागें स्त्रीनें कृत्य काय केलें ॥ ३ ॥
चोरोनियां घृत भरोनि घागरीं । नेवोनि शेजारीं ठेवियेल्या ॥ ४ ॥
गौळियानें तेव्हां संकल्प सोडिला । नवस फेडिला नामा म्हणे ॥ ५ ॥

[७५]

गोपीनें घृतासी चोरूनी ठेविलें । देवासी कळलें अंतर्यामीं ॥ १ ॥
सेजे घरीं होतें ठेविलें चोरून । सौंगडे घेऊन गेला तेथें ॥ २ ॥
आज्य घेऊनियां गोपाळासी देत । आपण भक्षित आनंदानें ॥ ३ ॥
तृप्त होवोनियां गेला क्रीडायासी । पूर्ण नवसासी केलें त्याच्या ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसा वैकुंठनायक । दावित कौतुक नानापरी ॥ ५ ॥

[७६]

कांहीं दिवस लोटलियावरी । गोपी तिचे घरीं प्रवेशली ॥ १ ॥
म्हणे माझा कुंभ देई वो आणून । येरीनें सदन धुंडाळिलें ॥ २ ॥
म्हणे सये येथें नाहीं तुझें घृत । ऐकोनियां मात क्रोधावली ॥ ३ ॥
चोरी नवनीत नाहीं तुझें गेलें । माझें काय जालें पुसतसे ॥ ४ ॥
नष्टें अभिलाष केला सांग सत्य । बोलोनि निवांत राहिली ते ॥ ५ ॥
कलह करावा भ्रतारा कळेल । तो शिक्षा करील यथास्थित ॥ ६ ॥
न मिळे जाणोन म्हणे कृष्णार्पण । आली तें बोलोन मंदिरासी ॥ ७ ॥
नामा म्हणे शुक सांगे परीक्षिती । ऐशा किती ख्याति तुज सांगों ॥ ८ ॥

[७७]

एकदां श्रीकृष्ण खेळत असतां । प्रवेश अवचिता गोपीगृहीं ॥ १ ॥
दोहीं करें तेव्हां नेत्र चोळीतसे । गोपी पुसतसे काय जालें ॥ २ ॥
कृष्ण म्हणे माझे दुखताती डोळे । उपाय न कळे करूं काय ॥ ३ ॥

---

अभंग ७४ ते ७७—(आ.)

अनुक्रमणिका

पुत्राची जननी तिचें दूध मिळे । घालितांची डोळे बरे होती ॥ ४ ॥
गोपी म्हणे दूध देतें मी काढून । तें नेत्रीं घालून बरें करी ॥ ५ ॥
देव म्हणे दूध काढून तूं देसी । कैसा गुण त्याशीं येईल सांग ॥ ६ ॥
माझिया करानें पिळूं देसी स्तन । तरी येईल गुण लवकरी ॥ ७ ॥
ऐकतांचि गोपी धांवे मारावया । पळे उठोनियां नामा म्हणे ॥ ८ ॥

[ ७८ ]

यशोदे भोंवत्या मिळाल्या गौळणी । सांगती गाऱ्हाणीं नानापरी ॥ १ ॥
गोरस भक्षोनी फोडितो भाजन । गोकुळ सोडोनि जाऊं सये ॥ २ ॥
एक गोपी म्हणे माझ्या घरा येसी । बांधीन खांबासी तुजलागीं ॥ ३ ॥
यशोदेसी ऐसीं सांगोनि गाऱ्हाणीं । चालिल्या कामिनी गृहाप्रती ॥ ४ ॥
नामा म्हणे गोपी बोलिली बांधिन । तिजवरी विघ्न करी देव ॥ ५ ॥

[ ७९ ]

निशीं प्राप्त होतां भ्रताराचे शेजे । गोपिका ती निजे आनंदानें ॥ १ ॥
संधी पाहोनिया प्रवेशला देव । करीत लाघव काय तेव्हां ॥ २ ॥
भ्रताराची दाढी कांतेची ती वेणी । एकत्र करोनी ग्रंथी देत ॥ ३ ॥
करूनि कौतुक निघोनियां गेला । अरुणोदय जाला तयेवेळीं ॥ ४ ॥
गोदोहनालागीं गोपी ते उठत । वेणी आसंडीत दाढीसंगें ॥ ५ ॥
भ्रतारासी तेव्हां बोले ते कामिनी । न धाय अजूनी मन कैसें ॥ ६ ॥
भ्रताराची दाढी ओढतांच जाण । सक्रोध होऊनि बोलतसे ॥ ७ ॥
मत्त होवोनिया माजली धांगडी । करिसी ओढाओढी मज-लागीं ॥ ८ ॥
नामा म्हणे तेव्हां उठोनि बैसती । आश्चर्य करिती मनामाजीं ॥ ९ ॥

[ ८० ]

उभयतां तेव्हां कलह करिताती । आण वाहताती परस्परें ॥ १ ॥
सोडूं जों पहाती सत्वर ग्रंथिका । न सुटे ब्रह्मादिकां कदाकाळीं ॥ २ ॥
सोडितां सुटेना जाळितां जळेना । कापितां कापेना कांहीं केल्या ॥ ३ ॥
स्त्रियेलागीं तेव्हां भ्रतार बोलत । तुजसंगें मृत्यु मज आला ॥ ४ ॥

अभंग ७८ ते ८०—(आ.)

अनुक्रमणिका

दोघेंहि रडत बिदीमाजीं येती । कोल्हाळ करिती तयेवेळीं ॥ ५ ॥
गोकुळीचे जन डोळां पाहाताती । जाऊन सांगती नंदालागीं ॥ ६ ॥
नामा म्हणे नंद बैसला चावडी । घेऊन आवडी कृष्णजीला ॥ ७ ॥

[८१]

गोपीगोप तेथें पातलीं त्वरित । हांसती समस्त देखोनियां ॥ १ ॥
कृष्ण म्हणे कैसी बांधिसी मजला । बांधिलें तुजला भगवंतें ॥ २ ॥
पायां पडताती रडोनी बोलती । सोडवा म्हणती आम्हालागीं ॥ ३ ॥
पाहोनी कींव त्याची दया आली चित्ता । कृपेनें पाहातां मुक्त जाली ॥ ४ ॥
नामा म्हणे तेंव्हां वंदोनी देवासी । गेलीं निजधामासी आनंदानें ॥ ५ ॥

[८२]

नंदाचिये घरीं चंपाषष्ठी नेम । कुळीं कुलधर्म मार्तंडाचा ॥ १ ॥
पक्वान्नेंहीं नाना रोटिया भरीत । केलीं अपरमित यशोदेनें ॥ २ ॥
वाघियामुरळी सांगितलीं दोन्ही । आला चक्रपाणि खेळतची ॥ ३ ॥
मातेलागीं म्हणे लागलीसे क्षुधा । थांब रे गोविंदा म्हणे माता ॥ ४ ॥
घेतलीसे आळी करी लगबग । विस्तारिलें सांग नैवेद्यासी ॥ ५ ॥
नेवोनियां पुढें देवाच्या ठेविलें । बोलवा वहिलें आमंत्रिक ॥ ६ ॥
तोंवरी मागें तो भक्षी नारायण । यशोदा आपण रागावली ॥ ७ ॥
दुरळ हा देव होय आतां कैसें । मार्तंडाचें पिसें लागे तुज ॥ ८ ॥
करी क्षणामाजीं वांकडेंचि मुख । हरी खात विख कालवलें ॥ ९ ॥
जाणीतला भाव मायेचें अंतर । करूनिया खरें दावी देव ॥ १० ॥
वांकडिया हातें ग्रास घाली मुखें । मुख तेंहि सुखें तैसें दावी ॥ ११ ॥
पिसाळल्या परी करी वेडेचार । भय वाटे फार मायेलागीं ॥ १२ ॥
पूर्वीं म्यां सांगतां नायकसी कैसा । पुढें हा वोळसा ओढवला ॥ १३ ॥
पाचारिले देवऋषि हालवितीं सुपें । त्याचिया न बापें देव निघे ॥ १४ ॥
वासोनियां डोळे तयाकडे पाहे । कांपे तया भयें थरथरां ॥ १५ ॥
मंत्रूनियां पाणी आणिला अंगारा । तयाचा मातेरा केला देवें ॥ १६ ॥
नवसा न पावती गोकुळींच्या देवता । उपाय मागुता राहिलासे ॥ १७ ॥

---

अभंग ८१ व ८२—(आ.)



अनुक्रमणिका

चिंतावली माय मूर्च्छा आली तिसी । जाली पोरपिसी मोहजाळें ॥ १८ ॥
जाणोनी अंतर म्हणे कृष्णार्पण । तेव्हां आलें विघ्न दूर होय ॥ १९ ॥
नामा म्हणे देव पाहे कृपादृष्टी । जाणवलें पोटीं हाचि देव ॥ २० ॥

[८३]

गोपिका म्हणती यशोदा सुंदरी । करितो मुरारी खोडी बहु ॥ १ ॥
यशोदेप्रति त्या गौळणी बोलती । संकष्टचतुर्थी व्रत घेई ॥ २ ॥
गणेश देईल यासी उत्तम गुण । वचन प्रमाण मानावें हें ॥ ३ ॥
गजवदनासी तेव्हां म्हणत यशोदा । माझिया मुकुंदा गुण देईं ॥ ४ ॥
ऐसें हें वचन ऐकून कृष्णनाथें । सत्य गणेशातें केलें तेव्हां ॥ ५ ॥
एक मास खोडी देवें नाहीं केली । प्रचीत ते आली यशोदेसी ॥ ६ ॥
धन्य धन्य देव गणपती पाहे । यशोदा ती राहे उपवासी ॥ ७ ॥
इंदिराबंधूचा उदय होऊं पाहात । यशोदा करीत पूजनासी ॥ ८ ॥
शर्करामिश्रित लाडू येकवीस । आणीक बहूवस मोदक ते ॥ ९ ॥
ऐसा नैवेद्याचा हारा तो भरूनी । देव्हारा घेऊनि ठेवी माता ॥ १० ॥
मातेसी म्हणत तेव्हां हृषिकेशी । लाडू केव्हां देशी मजलागीं ॥ ११ ॥
यशोदा म्हणत पूजीन गजवदन । नैवेद्य दाऊन देईन तुज ॥ १२ ॥
ऐसें म्हणूनियां माता बाहेर गेली । देव्हाऱ्याजवळी हरि होता ॥ १३ ॥
एकांत देखोनी हारा उचलिला । सर्व स्वाहा केला एकदांची ॥ १४ ॥
घेऊनियां ग्रास उगीच बैसला । भक्तांलागीं लीला दावितसे ॥ १५ ॥
धूप घेवोनियां आली सदनातें । रिता हारा तेथें देखियेला ॥ १६ ॥
विस्मय बहुत मातेसी वाटला । नैवेद्य हरीला पुसतसे ॥ १७ ॥
कृष्ण म्हणे सत्यवचन मानी माते । एक सहस्र उंदीर आले येथें ॥ १८ ॥
त्यांत एक थोर होता तो मूषक । वरी विनायक बैसलासे ॥ १९ ॥
सकळिक लाडू सोंडेनें उचलिले । सर्व आकर्षिले एकदांची ॥ २० ॥
सर्वांगासी त्याणें चर्चिला शेंदूर । सोंड भयंकर हालवितसे ॥ २१ ॥
उंदीर भ्यासूर भ्यालों मी देखूनी । वळली वदनीं बोबडी ते ॥ २२ ॥
न बोलवे कांहीं माझेनी जननी । क्षुधा मजलागोनी लागलीसे ॥ २३ ॥

अभंग ८३—(आ.)

अनुक्रमणिका

लाडू मज देई म्हणे जनार्दन । माता क्रोधें करून बोलतसे ॥ २४ ॥
माता म्हणे कृष्णा पाहूं तुझें वदन । लाडू त्वांचि पूर्ण भक्षियेले ॥ २५ ॥
हरी म्हणे माते लाडू ते बहुत । मावतील मुखांत कैसे माझ्या ॥ २६ ॥
गणपती सर्व लाडू गेलासे घेऊन । आलें विहरण मजवरी ॥ २७ ॥
हरी म्हणे मज मारूं नको माते । तुज वदनातें दावितो मी ॥ २८ ॥
कृष्णनाथें तेव्हां मुख पसरिलें । ब्रह्मांड देखिलें मुखामाजीं ॥ २९ ॥
असंख्य गणपती दिसती वदनीं । पाहातसे नयनीं यशोदा ते ॥ ३० ॥
मुखांत गणपती मातेसी बोलत । पूजावें त्वरित हरिलागीं ॥ ३१ ॥
ऐसें देखोनियां समाधिस्थ होत । चहूंकडे पाहात तटस्थ ते ॥ ३२ ॥
योगमाया तेव्हां हरीनें घालून । मातेपुढें जाण उभा असे ॥ ३३ ॥
यशोदा हरीसी कडेवरी घेत । मुखासी चुंबित आवडीनें ॥ ३४ ॥
हरी घेऊनियां घरांत ती गेली । भोजना बैसली नामा म्हणे ॥ ३५ ॥

[ ८४ ]

कोणी एके दिवशीं श्रीकृष्ण अंगणीं । विलोकी नयनीं प्रतिबिंब ॥ १ ॥
मातेप्रती तेव्हां म्हणतसे हरी । काढोनि झडकरी देई मज ॥ २ ॥
माता म्हणे बाळा न ये तें काढितां । आणिक अनंता माग कांहीं ॥ ३ ॥
ऐसें ऐकोनियां मागतसे हरी । त्यासी नानापरी समजावित ॥ ४ ॥
बहुत खेळणीं पुढें ठेवी माता । परी तो रडतां न राहेची ॥ ५ ॥
पालखी नेऊनि हरीसी निजवित । यशोदा ते जात स्वकार्यासी ॥ ६ ॥
तेच समयीं राधा आलीसे मंदिरीं । देखिला श्रीहरी रडतां तिनें ॥ ७ ॥
पालखी जवळी जाऊनि सत्वर । घेत कडेवरी हरिलागीं ॥ ८ ॥
राधा म्हणे कां तूं रडतोसी चाटा । गोष्टी त्या अचाटा सांगतोसी ॥ ९ ॥
ऐसें ऐकोनियां उगाची राहिला । खेळवी हरिला प्रेमें राधा ॥ १० ॥
मागुती नेऊनि पालखां घातला । रडाया लागला हरी तेव्हां ॥ ११ ॥
राधेसी म्हणत यशोदा सुंदरी । यासी क्षणभरी नेई आतां ॥ १२ ॥
आपले मंदिरा घेऊन जाय यासी । ऐकोनि मानसीं संतोषली ॥ १३ ॥
नामा म्हणे राधा घेऊन हरीसी । गेली मंदिरासी आपुलिया ॥ १४ ॥

---

अभंग ८४--(आ.)

[ ८५ ]

मंदिरा नेवोनि पलंगीं बैसविला । म्हणत हरीला तयेवेळीं ॥ १ ॥
ऐसिया समयीं थोर तू अससी । तरी हृषिकेशी बरें होतें ॥ २ ॥
देखोनि तिचा भाव थोर जाला हरी । पाहूनि सुंदरी आनंदली ॥ ३ ॥
सुखशयनीं राधा एकांतीं असतां । अनया अवचिता आला तेथें ॥ ४ ॥
सक्रोध होऊनि बोलला राधेसी । कोणासी बोलसी गुजगोष्टी ॥ ५ ॥
भ्रताराचा शब्द ऐकतां श्रवणीं । दचकली मनीं राधिका ते ॥ ६ ॥
हात जोडोनियां विनवित हरीसी । होई हृषिकेशी सान आतां ॥ ७ ॥
ऐकोनि करुणा बाळ जाला हरी । दहिंभात झडकरी ठेवी पुढें ॥ ८ ॥
कवाड उघडून बोलत अनयासी । घरांत हृषिकेशी जेवितसे ॥ ९ ॥
कावड ठेऊनि घरांत तों आला । जेवितां देखिला कृष्णनाथ ॥ १० ॥
नामा म्हणे अनया आनंदला मनीं । हृदयीं चक्रपाणि धरियेला ॥ ११ ॥

[ ८६ ]

राधेप्रती अनया बोले तयेवेळीं । घरांत एकली अससी तूं ॥ १ ॥
एकलें हें तुज कर्मेना मंदिरीं । खेळावया हरी आणीत जाई ॥ २ ॥
भ्रतार वचन राधेनें ऐकोनी । आनंद तो मनीं थोर तिच्या ॥ ३ ॥
स्वामी तुमची आज्ञा मजलागीं प्रमाण । म्हणौनि चरण वंदियेले ॥ ४ ॥
सुखशयनीं राधा भोगित अनंता । गोकुळांत वार्ता प्रगटली ॥ ५ ॥
राधेचिया घरीं थोर होतो हरी । गोकुळींच्या नारी गुजगुजती ॥ ६ ॥
यशोदा मातेसी सांगती सुंदरी । आवरी मुरारी आपुला हा ॥ ७ ॥
तैसीच जाऊन राधेच्या गृहासी । सांगती सासूसी तिच्या तेव्हां ॥ ८ ॥
राधेलागीं वृद्धा म्हणे तयेवेळीं । घरासी वनमाळी आणूं नको ॥ ९ ॥
नामा म्हणे लोकीं पडियेली तुटी । तीसी जगजेठी अंतरला ॥ १० ॥

[ ८७ ]

प्रातःकाळीं राधा उठोनियां जाण । नंदसदनावरून पाण्या जातां ॥ १ ॥
इकडे गोदोहन करीतसे हरी । पाहे उभी द्वारीं राधिका ते ॥ २ ॥

अभंग ८५ ते ८७—(आ.)

अनुक्रमणिका

विसरे गोदोहन वृषभाखालीं बैसत । कृष्णजीचें चित्त वेधियेलें ॥ ३ ॥
भरणा रिचवोनी बाहेर आली माता । वृषभ दोहतां हरि देखे ॥ ४ ॥
माता म्हणे काय करीसी घननीळा । प्रत्युत्तर त्यावेळां हरि देत ॥ ५ ॥
दाराकडे पाहे राधेसी न्याहाळून । मातेसी वचन बोलतसे ॥ ६ ॥
भरणा भरला आतां जाई तूं घेऊन । माता क्रोधायमान जाली तेव्हां ॥ ७ ॥
कृष्णासी यशोदा म्हणे खालीं पाहे । वृषभ कीं गाय दोहतोसी ॥ ८ ॥
कृष्ण खालीं पाहे वृषभ देखिला । म्हणे यशोदेला ऐक एक ॥ ९ ॥
देवाचा नवस चुकलीस बहुतेक । चौथानांचे थान एक जालें ॥ १० ॥
वचन ऐकोनी हांसत यशोदा । द्वारीं उभी राधा देखियेली ॥ ११ ॥
कां गे येथें उभी घेऊनि घागर । जातसे सत्वर राधा तेव्हां ॥ १२ ॥
नामा म्हणे ऐसे जालें गोदोहन । मुख प्रक्षाळून हरी जेवी ॥ १३ ॥

[८८]

मंथना आरंभ करीतसे राधा । आठवी गोविंदा मनामाजीं ॥ १ ॥
मेळवोनी मुलें खेळे तिचे द्वारीं । देखिला श्रीहरी राधिकेनें ॥ २ ॥
विसरोनी मंथन रित्या डेरियांत । रवी फिरवीत गरगरां ॥ ३ ॥
डेरा खडबडा वाजतां ऐकोन । वृद्धा ते धांवोन बाहेर आली ॥ ४ ॥
सासू म्हणे काय गेले तुझे नेत्र । देतसे उत्तर राधा तीसी ॥ ५ ॥
डेरा धड किंवा फुटका म्हणुनी । रवी घुसळोनी पाहतसे ॥ ६ ॥
वृद्धा म्हणे तुझें चित्त नाहीं स्थिर। द्वारीं हो श्रीधर देखियेला ॥ ७ ॥
रागें भरोनियां बोलत म्हातारी । येथें कां रे हरी खेळसी तूं ॥ ८ ॥
कृष्ण म्हणे आम्हीं खेळतों बिदीसीं । तूं कां दटाविसी थेरडिये ॥ ९ ॥
ऐसें बोलोनियां श्रीहरी पळाला । घरासी तो गेला नामा म्हणे ॥ १० ॥

[८९]

मध्यान्हकाळीं मग हरीसी घेऊन । करीतसे भोजन यशोदा तें ॥ १ ॥
भोजन करूनि पलंगी निजत । श्रीकृष्णासी घेत पुढें तेव्हां ॥ २ ॥
यशोदेसी सुखनिद्रा हो लागली । राधिका ते गेली यमुनेसी ॥ ३ ॥
नेत्रासी पदर लावोनी रडत । अंतरीं अनंत आठवोनी ॥ ४ ॥

---

अभंग ८८ व ८९--(आ.)

करुणा शब्द तिचा ऐकोनी श्रवणीं । उठला चक्रपाणि तेंथोनियां ॥ ५ ॥
जावोनियां राधा धरिली पदरीं । तिजलागीं हरि समजावित ॥ ६ ॥
संसारासी माझ्या पडियेलें पाणी । ऐसें चक्रपाणि तुवां केलें ॥ ७ ॥
इकडे यशोदा ती जागी जंव होत । हरिसी धुंडीत तयेवेळीं ॥ ८ ॥
एखादी कळी घेऊन येईल आतां । पाहातसे माता चहुंकडे ॥ ९ ॥
पाउलाचा मार्ग चालली काढीत । पावली त्वरीत यमुना तीरा ॥ १० ॥
राधा तयेवेळीं म्हणे रे अनंता । पैल तुझी माता येत असे ॥ ११ ॥
मातेंसी देखुनि गडबडा लोळत । यशोदा ते घेत कडेवरी ॥ १२ ॥
मातेसी म्हणे चोरोनी कंदुक । घेऊनियां देख आली येथें ॥ १३ ॥
माता म्हणे कां वो यासी रडविसी । चेंडू तूं हरिसी देई वेगीं ॥ १४ ॥
कृष्ण म्हणे माते झाडा घेई आतां । कंदूक तत्त्वतां निघेल पें ॥ १५ ॥[1]
वस्त्र जंव झाडीत राधा तयेवेळीं । पडिला भूतळीं कंदूक तो ॥ १६ ॥
ऐसें देखोनियां लज्जित जहाली । हांसत वनमाळी नामा म्हणे ॥ १७ ॥

[ ९० ]

चेंडू देखोनियां यशोदा कोपली । म्हणे तयेवेळीं राधिकेसी ॥ १ ॥
महा नष्ट तुम्ही अवघिया गवळणी । माझा चक्रपाणि ब्रह्मचारी ॥ २ ॥
इतुकें ऐकोनि राधा ते चालिली । स्वगृहासी गेली आपुलिया ॥ ३ ॥
राधेचिया मनीं समजलें पूर्ण । ब्रह्म सनातन श्रीकृष्ण हा ॥ ४ ॥
इकडे यशोदा घेऊनि हरीसी । गेली मंदिरासी नामा म्हणे ॥ ५ ॥

[ ९१ ]

गोकुळीं अनर्थ होताती बहुत । मिळोनी समस्त विचारिती ॥ १ ॥
[2]वृद्ध ते म्हणती येतें आमुच्या मना । [3]जाऊं वृंदावना सकळीक ॥ २ ॥
समस्तां मानला तयांचा विचार । निघती नारीनर शीघ्र तेव्हां ॥ ३ ॥
अहर्निशीं देवा करिती जतन । नामा म्हणे मन [4]गोविंदाचें ॥ ४ ॥

---

अभंग ९०—(आ.), ९१—(पं.), (धु.) व (आ.)
१ येथे खालील चरण (आ.) प्रतीत अधिक आढळतो—
मा मिसें हा मजवरी घेई गे तुफान । मजपाशीं जाण चेंडू नाहीं ॥ १५ ॥ (आ.)
२ ब्राह्मण म्हणताती । (धु.) ३ जावे सकळीके वृंदावना ॥ (पं.) ४ गोविंदापें (आ.)

[ ९२ ]

विचाग्नि हो श्रीपती । जे म्यां जावें वनाप्रती ॥ १ ॥
राखावया गायी । भार उतरावया मही ॥ २ ॥
एके दिनीं सायंकाळीं । नंदा पुसे वनमाळी ॥ ३ ॥
उद्यां जाईन मी रानां । [1]घेऊनियां जी गोधना ॥ ४ ॥
बुद्धीचा चालक । नामा म्हणे हाचि एक ॥ ५ ॥

[ ९३ ]

प्रातःकाळीं मुलें येताती सकळ । उठरे गोपाळ म्हणताती ॥ १ ॥
आळस देवोनी उठे देवराणा । बळीराम गोधना सोडितसे ॥ २ ॥
देऊनियां स्तना काकुळती येत । सांभाळा भगवंत वनामध्यें ॥ ३ ॥
जवळीच खेळा जाऊं नका दुरी । सांभाळा मुरारी प्राण माझा ॥ ४ ॥
होताती उत्पात याजवरी मोठे । मोडतील कांटे सांभाळावें ॥ ५ ॥
आसनीं शयनीं भोजनीं जतन करा । नामया दातारा केशिराजा ॥ ६ ॥

[ ९४ ]

चालियेले तेव्हां गडी आणि देव । खेळताती सर्व आनंदानें ॥ १ ॥
वछाचिया वेषें वछासूर आला । माराया कृष्णाला परीक्षिती ॥ २ ॥
पाहोनियां ऐसें तयासी मारिलें । झोंकोनियां दिल्हें आकाशातें ॥ ३ ॥
चला आतां जेवूं बसूं एके ठायीं । काढारे लवलाही शिदोरीया ॥ ४ ॥
गोपाळ मिळोनी आनंदें जेविले । ब्रह्मरसें धाले कृष्णासंगें ॥ ५ ॥
उदक प्राशन करावया आले । बकानें देखिलें कृष्णजीला ॥ ६ ॥
दुष्टबुद्धि तेव्हां देवासी गिळीत । हृदय जाळीत उगाळीला ॥ ७ ॥
धरूनियां हातें उभाची चिरीला । आनंद देवाला न समाये ॥ ८ ॥
नामा म्हणे आले घरासी सकळ । सांगताती बाळें वर्तमान ॥ ९ ॥

---

अभंग ९२ ते ९४—(पं.) व (धु.)
१ घेउनि या रे (पं.)

[९५]

उठोनी प्रातःकाळीं गौळणी बोलती । जाईल श्रीपती वना आतां ॥ १ ॥
चला जाऊं त्याचें पाहूं गे श्रीमुख । हरेल गे भूक डोळियांची ॥ २ ॥
तांतडीनें येती नंदाचिया घरा । 'पाहाती उदारा कृष्णराया ॥ ३ ॥
कुरळे हे केश सुहास्य वदन । आकर्ण नयन शोभताती ॥ ४ ॥
अरु य प्रभा अधर दिसती । हिरे झळकती दंत तुझे ॥ ५ ॥
भोंवया व्यंकटा सुंदर नासीका । पाहोनियां सुख फार होय ॥ ६ ॥
ललाटीं शोभत केशराचा टिळा । वर बिंदु रेखिला कस्तुरीचा ॥ ७ ॥
वैजयंती माळा किरीट कुंडलें । नामयानें केलें निंबलोण ॥ ८ ॥

[९६]

उठोनियां प्रातःकाळीं । देवें वाजविली मुरली ॥ १ ॥
गडी मिळोनी समस्त । घ्यारे शिदोऱ्या सांगात ॥ २ ॥
अलंकार घालिताती । दिसे सुशोभित मूर्ति ॥ ३ ॥
नामा म्हणे स्वामी माझा । आला भक्ताचिये काजा ॥ ४ ॥

[९७]

अनेक पुष्पांच्या साजताती माळा । गुंजाहार गळां शोभताती ॥ १ ॥
रक्त पितांबर आरक्त अधर । 'चरण सुंदर चालताती ॥ २ ॥
रक्त चंदनाची घेतलीसे उटी । मयूर पत्रवेंठी शोभताहे ॥ ३ ॥
शिंगें रंगविती देऊनियां रंग । चालती श्रीरंग मागें मागें ॥ ४ ॥
चित्तीं सर्वकाळ राहे ऐसें ध्यान । नामा म्हणे धन्य तोचि एक ॥ ५ ॥

[९८]

शिवादिक ज्याचें वंदी पायवणी । पायांवर न्हाणी यशोदा ते ॥ १ ॥
नंद पुण्य लेखा नव्हे आम्हांप्रती । शुक परीक्षिती सांगतसे ॥ २ ॥

---

अभंग ९५—(धु.), ९६—(पं.), (शि.) व (धु.), ९७—(पं.) व (धु.), ९८—(धु.)
१ मुख दावि। (धु.) २ चरणीं (आ.)

अनुक्रमणिका

सनकादिक ज्याचे ध्यानीं जाले पिसे । गायी चारीतसे गोकुळांत ॥ ३ ॥
गडियांसी काला वांटीत श्रीधर । कौतुक सुरवर पाहाताती ॥ ४ ॥
नामा म्हणे सुख देईल भक्तांशीं । वधील दुष्टांसी स्वामी माझा ॥ ५ ॥

[९९]

कंसें धाडीला आघासूर । मारी नंदाचा कुमर ॥ १ ॥
एक ओठ घाली खालीं । दुजा मेघाच्या मंडळीं ॥ २ ॥
गाई गोपाळ उदरीं । [१]देवा कळलें अंतरीं ॥ ३ ॥
[२]आंत प्रवेशला कृष्ण । रूप धरीत वामन ॥ ४ ॥
क्षणार्धेंचि मारी । भक्तजनांचा कैवारी ॥ ५ ॥
भेणें गोपाळ पडियेले । कृपादृष्टी उठविले ॥ ६ ॥
तेज अद्भूत निघालें । कृष्णमुखीं प्रवेशलें ॥ ७ ॥
भक्तासी रक्षीत । नामा म्हणे कृष्णनाथ ॥ ८ ॥

[१००]

गडी आणि रमापती । तेव्हां आनंदें जेवती ॥ १ ॥
कोणी मांडिताती पानें । वरी ठेविताती अन्नें ॥ २ ॥
कोणी ठेवी मांडिबरी । कोणी जेवी भूमीवरी ॥ ३ ॥
कोणी पसरिती चवाळें । कोणी अंथरती जाळें ॥ ४ ॥
गोळे घेऊनियां हातीं । येरयेरातें हाणिती ॥ ५ ॥
पाहताती देव । धन्य धन्य त्यांचा भाव ॥ ६ ॥
मिटकिया देती । देवा वांकुल्या दाविती ॥ ७ ॥
माया [३]मोही ब्रह्मादिकां । नामा म्हणे तेंचि ऐका ॥ ८ ॥

---

अभंग ९९—(धु.), १००—(पं.) व (धु.)

१ सांठविती दुराच्यारी (धु.)

२ (धु.) प्रतीत पहिल्या तीन चरणांनंतर खालील चरण आढळतात—
ऐसें कळलें देवराया । अघासुर धरला पाया ॥
अपटुनिया मारीला । दुजा प्राणासी मुकला ॥
देव क्षणामध्यें मारी । भक्तजनाचा कैवारी ॥
नामा म्हणे कृष्णनाथ । करील दुर्जनाचा घात ॥

३ मोहो (पं.)

अनुक्रमणिका

[ १०१ ]

गौळियांचीं पोरें वांकुल्या दाविती । क्रोधावला चित्तीं ब्रह्मदेव ॥ १ ॥
चोरोनियां नेत गोवत्स गोपाळ । पाहू यांचें बळ किती आहे ॥ २ ॥
जाणोनि अंतर देव हांसतसे । सामर्थ्य पाहातसे पुत्र माझा ॥ ३ ॥
तेथून आणावी नव्हे हें उचित । म्हणेल किंचित पराक्रम ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें विचारलें चित्तीं । करीतसे श्रीपती काय तेव्हां ॥ ५ ॥

[ १०२ ]

गायीवत्सगोपाळ केलीसे निर्माण । न लागतां क्षण परीक्षिती ॥ १ ॥
पूर्ववत सर्व न्यून कांहीं नोहे । न करी आश्चर्य मनामाजीं ॥ २ ॥
इच्छामात्रें करी ब्रह्मांडाच्या कोटी । त्यासी काय गोष्टी अपूर्व हे ॥ ३ ॥
सायंकाळीं जाती गोकुळाभीतरीं । आपुलाल्या परी घरीं सर्व ॥ ४ ॥
ब्रह्मादिकां ज्याचा नकळेची पार । मानवा विचार न कळे कांहीं ॥ ५ ॥
ऐसा हा समर्थ नामयाचा धनी । वंदी पायवणी सदाशिव ॥ ६ ॥

[ १०३ ]

एक संवत्सर सकळ जाहला । पाहावया आला ब्रह्मदेव ॥ १ ॥
पूर्ववत गाई गोपाळ देखिले । आश्चर्य वाटलें तेव्हां त्यासी ॥ २ ॥
ब्रह्मांडांत ब्रह्मा दुजा असे कोण । केलेंसे उत्पन्न याजलागीं ॥ ३ ॥
घेवोनियां गेलों तेंची आहे येथें । जावोनियां तेथें पाहातसे ॥ ४ ॥
भ्रांतीनें व्यापिलें तयाचें तें मन । देखतों मीं स्वप्न किंवा सत्य ॥ ५ ॥
नामा म्हणे एके ठायीं उभा राहे । न्याहाळून पाहे सकळांसी ॥ ६ ॥

[ १०४ ]

चतुर्भुज दिसे शंखचक्र हातीं । मुकुट शोभती सर्वांलागीं ॥ १ ॥
कर्णीचीं कुंडलें वैजयंती माळा । देखतसे डोळां ब्रह्मा तेव्हां ॥ २ ॥
कौस्तुभ हृदयीं श्रीवत्सलांच्छन । बाहूचीं भूषणें पाहातसे ॥ ३ ॥

अभंग १०१, १०२ व १०४—(पं.) व (धु.), १०३—(आ.)

अनुक्रमणिका

चरणीं तोडर पीत पीतांबर । तेजें दिवाकर लोपतसे ॥ ४ ॥
आपादपर्यंत तुळसीच्या माळा । मुद्रिका दशांगुळा रत्नाचिया ॥ ५ ॥
केशराचे टिळे नेत्र कमळाकर । दंती इंदुकर बैसलेती ॥ ६ ॥
कोटी कृष्ण मूर्ति कोटी ब्रह्में दिसती । स्तवनीं स्तविताती सुरवर ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसे दावीत गोविंद । जालासे सावध ब्रह्मा तेव्हां ॥ ८ ॥

[ १०५ ]

ओळखे बापाला । ब्रह्मा तेव्हां धाविन्नला ॥ १ ॥
नेत्रीं अश्रुचिया धारा । कांपतसे थरथरां ॥ २ ॥
घाली नमस्कार । म्हणे अपराधी मी फार ॥ ३ ॥
जोडोनियां हात । नामा म्हणे स्तुति गात ॥ ४ ॥

[ १०६ ]

श्रवणमात्रें जळती पापांचे पर्वत । ऐके ब्रह्मगीत शुक म्हणे ॥ १ ॥
धरूनि विश्वास करी जो पठण । [1]तरेल तो जाण भवसिंधू ॥ २ ॥
आपण तरेल नव्हे हें नवल । कुळें [2]उद्धरतील सकळांची ॥ ३ ॥
येका येका अक्षरीं निर्दाळी महापाप । करा याचा जप [3]सकळिक हो ॥ ४ ॥
नाम घेतां धांवे अनवाणीच पाय । कोमळ हृदय कृष्णजीचें ॥ ५ ॥
न विचारी जाति न म्हणे अमंगळ । न विचारी काळवेळ धांवतसे ॥ ६ ॥
शरणागता नेदी काळाचिये हातीं । नामा म्हणे चित्तीं दृढ धरा ॥ ७ ॥

[ १०७ ]

मेघःश्याम वर्ण जालासे सगुण । कार्य आणि कारण तुज नमो ॥ १ ॥
गुंजाहार गळां मयुरपुच्छें वेठी । कृपाळु जगजेठी तुज नमो ॥ २ ॥
वनपुष्पमाळा आपाद [4]शोभती । लक्ष्मीच्या पति तुज नमो ॥ ३ ॥
वेणू वाजविसी गायी त्या चारीसी । न कळे कोणासी तुझी लीला ॥ ४ ॥

अभंग १०५—(आ.), १०६—(पं.), (धु.) व (भा.), १०७—(धु.) व (भा.)
१ तारील (धु.) २ उद्धरील सकळहि (धु. व पं.) ३ सात्त्विक (आ.) ४ रूळती (भा.)

अनुक्रमणिका

हातीं तुझ्या [1]कवळ शोभे पितांबर । चरण सुंदर तुज नमो ॥ ५ ॥
घेवोनी अवतार दुष्टांसी मारिसी । भक्तांसी रक्षिसी निरंतर ॥ ६ ॥
रावण कुंभकर्ण मारीसी आत्मारामा । सोडविलें आम्हां बंदीहुनी ॥ ७ ॥
तुझें मीं बाळक वेडें अविचारी । नामा म्हणे करी कृपा आतां ॥ ८ ॥

[ १०८ ]

भवसिंधु तराया एकचि उपाय । ध्यावे तुझे पाय वासुदेवा ॥ १ ॥
गोविंद गोपाळ वाचेसी निखळ । उद्धरे तात्काळ कलीमाजीं ॥ २ ॥
नारायण नारायण करी जो पारायण । तो उद्धरी जाण इहलोकीं ॥ ३ ॥
तुटती यातना कर्माच्या भावना । जडजीवा उद्धरणा नाम स्मरा ॥ ४ ॥
अहर्निश कीर्ति गाती भाविक भोळे । त्यांनीं तुज जिंकिलें ब्रह्मा म्हणे ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें दाविलें सुगम । नलगे तुम्हां नेम नाना कोटी ॥ ६ ॥

[ १०९ ]

कृष्णभक्तीविण तरला आहे कोण । द्यावा निवडून एक तरी ॥ १ ॥
कार्य आणि कारण लटकाचि शीण । वर्म न कळोन वायां गेलें ॥ २ ॥
नामा म्हणे माझी खेचर माउली । [2]कृपेनें दाविली वाट माझी ॥ ३ ॥

[ ११० ]

धन्य ते गोप धन्य त्यांच्या गायी । धन्य हेचि मही ब्रह्मा म्हणे ॥ १ ॥
विश्वात्मा जो हरी क्रीडे या वनांत । तृणादि समस्त धन्य धन्य ॥ २ ॥
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन । वृक्षादि पाषाण धन्य धन्य ॥ ३ ॥
धन्य हें गोकुळ धन्य हे गोपाळ । व्रजवासी सकळ धन्य धन्य ॥ ४ ॥
धन्य ही यशोदा स्तन दे मुकुंदा । धन्य तूंची नंदा त्रैलोक्यांत ॥ ५ ॥
[3]ब्रह्मसनातन वेदांसी न कळे । गडयासंगें खेळे अरण्यांत ॥ ६ ॥
विश्वाचा जो बाप नंद त्याचा पिता । यशोदेसी माता म्हणतसे ॥ ७ ॥
सद्‌गदित कंठ नेत्रीं जळ वाहे । नामा म्हणे काय मागतसे ॥ ८ ॥

---

अभंग १०८—(आ.), १०९—(पं.), (शि.) व (धु.), ११०—(धु.)
१ कमळ (भा.) २ विठोने (पं. व शि.) ३ हा चरण काही हस्तलिखितांत सापडत नाही. (धु.)

[ १११ ]

इतुकें मागतसे तुज । वनीं जन्म देई मज ॥ १ ॥
सुखें करूनी राहीन । तुझे चरण पाहीन ॥ २ ॥
बहुत शीणलों । आतां तुजपाशीं आलों ॥ ३ ॥
न करीं अव्हेर । दास तुझा मी किंकर ॥ ४ ॥
ब्रह्मा येतो काकुलती । नामा म्हणे देवा प्रती ॥ ५ ॥

[ ११२ ]

काय देशील यांजला । ब्रह्मा म्हणे न कळे मला ॥ १ ॥
म्हणसी देईन मी मुक्ति । तरी ऐक रमापति ॥ २ ॥
मारायासी आले । त्यांसी स्वरूपीं मिळविलें ॥ ३ ॥
न फिटे यांचें पूर्ण । तुजवरी जालें ऋण ॥ ४ ॥
येथोनियां नवजासी । मज कळलें मानसीं ॥ ५ ॥
आणोनियां देत । गायी गोपाळ समस्त ॥ ६ ॥
घाली पोटामध्यें डोई । क्षमा करी माझे आई ॥ ७ ॥
आज्ञा घेऊनियां गेला । नामा म्हणे स्वस्थळाला ॥ ८ ॥

[ ११३ ]

आनंदें खेळत । राम गडी कृष्णनाथ ॥ १ ॥
गडी म्हणती रामा । ताडफळें देई आम्हां ॥ २ ॥
सकळ मिळोनी । आले धेनूकांचे वनीं ॥ ३ ॥
वृक्ष हालवोनी । फळें पाडिती मेदिनी ॥ ४ ॥
येत धांवोनी असुर । करी तयाचा संहार ॥ ५ ॥
भक्तांचा अंकित । नामा म्हणे कृष्णनाथ ॥ ६ ॥

[ ११४ ]

कालिंदीचे डोहीं कालियाची वस्ती । ऐक परीक्षिती चरित्र हें ॥ १ ॥
पक्षीश्वापदांनीं सोडियेलें स्थळा । निघताती ज्वाळा तया डोहीं ॥ २ ॥

अभंग १११ व ११२—(धु.), ११३ व ११४—(पं.) व (धु.)

अनुक्रमणिका

विपाचिया योगें झाडें जळताती । जीवन न घेती कोणी त्याचें ॥ ३ ॥
वैकुंठनायक तया वनीं आला । गोपाळांचा मेळा बरोबरी ॥ ४ ॥
हुतुतु हमामा लपंडाई खेळती । देवासी म्हणती लपें आतां ॥ ५ ॥
तृषाक्रांत गाई जहाले गोपाळ । पिती तेव्हां जळ कालिंदीचें ॥ ६ ॥
लहानाली मुलें नाहीं तयां ज्ञान । जाले गतप्राण सकळांचे ॥ ७ ॥
नामा म्हणे तेव्हां कृपादृष्टी पाहात । उठवी समस्त गायी गडी ॥ ८ ॥

[ ११५ ]

जगजेठी तेव्हां क्रोधावला चित्तीं । करीन मी शांति तुझी आतां ॥ १ ॥
माझिया लेकरा दिधलासे त्रास । करीन मी [1]नाश आतां तुझा ॥ २ ॥
त्रैलोक्यांत कोण ऐसा हो समर्थ । माझे शरणागत मारील जो ॥ ३ ॥
माझिया भक्तांसी जो दुःखदायक । करीन प्रळय त्याजवरी ॥ ४ ॥
स्फुरताती दंड कांपती अधर । उठला सत्वर जगदीश ॥ ५ ॥
कळंबाचे वृक्षीं देव चढतसे । पीतांबर सोगे खोवियले ॥ ६ ॥
जगद्गुरु तेव्हां पुष्पमाळा काढी । टाकितसे उडी जळामध्यें ॥ ७ ॥
नामा म्हणे शोकें व्यापिलें समग्र । करूनि एकाग्र मनें ऐका ॥ ८ ॥

[ ११६ ]

घालीतसे वेढे दिसतसे जळीं । आकांत सकळीं मांडियेला ॥ १ ॥
गडी रडताती वळें पडताती । कपाळ पिटिती सकळिक ॥ २ ॥
तुजवांचोनियां रक्षी कोण आम्हां । काय सांगु रामा सकळिक ॥ ३ ॥
रुसल्या आमुचे करी समाधान । तुजवीण वन ओस वाटे ॥ ४ ॥
आम्हांसाठीं तुवां दुष्टांसी मारिलें । कोण आतां लळे पुरवील ॥ ५ ॥
तुजवांचोनियां आम्हीं सर्व दीन । न जाऊं येथून गोकुळासी ॥ ६ ॥
वियोगानें तेव्हां पक्षी रडताती । आतां कृष्णमूर्ति कैची आम्हां ॥ ७ ॥[2]
बोलोनियां ऐसें निस्तेज पडती । नदी वाहत होती स्थिरावली ॥ ८ ॥
नामा म्हणे होतीं दुश्चिन्हें बहुत । गोकुळीं समस्त विचारिती ॥ ९ ॥

अभंग ११५ व ११६--(प.) व (धु.)
१ नाच तुजवरी (धु.) २ काही प्रतींत चरण ७, ८, ९ हे सापडत नाहीत. (धु.)

अनुक्रमणिका

[११७]

यशोदा व्याकुळ जाहालीसे प्राणें । सुखी असो तान्हें वनामाजीं ॥ १ ॥
उठती तिडका स्तनीं माझ्या फार । लवतसे नेत्र वेळोवेळां ॥ २ ॥
जीव तळमळी दाटे माझा घसा । पाहीन पाडसा माझ्या केव्हां ॥ ३ ॥
गोकुळीचे जन निघाले सकळ । पाहताती गोपाळ वनामध्यें ॥ ४ ॥
कालिंदीच्या तीरीं पडिले सकळ । पाहोनि कोल्हाळ करिताती ॥ ५ ॥
कपाळ पिटिती यशोदा रोहिणी । आतां चक्रपाणि कैचा आम्हां ॥ ६ ॥
धांव धांव कृष्णा दावी रे वदना । पाजूं आतां पान्हा कोणालागीं ॥ ७ ॥
तुझिया कौतुकें कंठीं मी संसार । जळतें अंतर तुजसाठीं ॥ ८ ॥
कोणावरी आतां घालूं अलंकार । बुडालें हें घर माझें आतां ॥ ९ ॥
नामा म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण । सकळांचे जीवन कृष्णनाथ ॥ १० ॥

[११८]

नंद म्हणे माझें बुडालें जहाज । अभाग्यासी मज कृष्ण कैंचा ॥ १ ॥
काय माझें तप संपूर्ण सरलें । म्हणोनी बुडालें तान्हें माझें ॥ २ ॥
चिंतेनें व्याकुळ पिटी वक्षस्थळा । दावारे सांवळा प्राण माझा ॥ ३ ॥
आलीया अतीता त्रासें दवडीलें । म्हणोनी बुडालें बाळ माझें ॥ ४ ॥
प्रातःकाळीं पाहूं कोणाचें मी मुख । येथूनियां सुख नाहीं नाहीं ॥ ५ ॥
समस्तांची दृष्टी करी तुज कष्टी । म्हणोनी जगजेठी टाकियलें ॥ ६ ॥
गोकुळीचे जन देऊं पाहाती प्राण । वांचाया कारण काय आतां ॥ ७ ॥
अभय देतसे बळिभद्र सर्वांसी । मारून दुष्टांसी येईल आतां ॥ ८ ॥
अंतर्यामीं जाणें जन जाले वेडे । नामा म्हणे वेडे काढितसे ॥ ९ ॥

[११९]

तयाचे मस्तकीं नाचे नारायण । आरंभीं गायन जगदीश ॥ १ ॥
त्रैलोक्याचा भार घाली हृषिकेशी । दमीत दुष्टासी स्वामी माझा ॥ २ ॥
होता एक क्षण जाला तेव्हां क्षीण । जाऊं पाहे प्राण कालियाचा ॥ ३ ॥

अभंग ११७ ते ११९--(पं.) व (धुं.)

अनुक्रमणिका

तेव्हां त्याच्या स्त्रिया येती काकुळती । लक्ष्मीच्या पती कृपाळुवा ॥ ४ ॥
यज्ञेशा अच्युता गोविंदा माधवा । दयानिधी केशवा कृष्णनाथा ॥ ५ ॥
श्रीधरा वामना अगा वासुदेवा । ऐकावी ही देवा विज्ञापना ॥ ६ ॥
आम्हांलागीं आतां देई चुडेदान । धरिती चरण कृष्णजीचे ॥ ७ ॥
दीनाचा दयाळ दासाचा कैवारी । नामा म्हणे हरि उतरला ॥ ८ ॥

[ १२० ]

गरुडा नका येथें जावें समुद्रासी । सांगे हृषिकेशी सकळिकां ॥ १ ॥
तुझिया मस्तकीं असे माझा चरण । न भक्षीच तुज जाण पक्षीराज ॥ २ ॥
दिव्य सुमनांच्या घालितात माळा । पूजिती सांवळा बाप माझा ॥ ३ ॥
अनर्घ्य रत्नांचे देती अलंकार । श्रीमुख सुंदर पाहाताती ॥ ४ ॥
[1]जांबुनदातटीं घालिती भोजन । निघती तेथून सकळिक ॥ ५ ॥
आला भगवान आनंदले गडी । उभारिती गुढी जन तेव्हां ॥ ६ ॥
काळिया आख्यान स्मरे जो मानसीं । न डंखिती तयासी सर्पकुळें ॥ ७ ॥
अहर्निशीं याचें करी जो पठण । नामा म्हणे विघ्न नाहीं तेथें ॥ ८ ॥

[ १२१ ]

आला वनमाळी । मग भेटती सकळी ॥ १ ॥
यशोदा रोहिणी । पोटीं धरिती चक्रपाणि ॥ २ ॥
गायी धांवताती । कृष्ण अंगातें चाटती ॥ ३ ॥
उड्या मारताती । गडी आनंदें नाचती ॥ ४ ॥[2]
न वर्णवे तो आनंद । नामयाची वृद्धि मंद ॥ ५ ॥

[ १२२ ]

जाला अस्तमान तेथेंचि राहती । ऐके परीक्षिती अद्‌भुत तें ॥ १ ॥
निद्रेनें व्यापिलें असे तेव्हां सर्वां । लागला वणवा तया वनीं ॥ २ ॥

---

अभंग १२० व १२१—(पं.) व (धु.), १२२—(पं.), (धु.) व (आ.)
१ जांबुनंदातटि (धु.)   २ हा चरण काही हस्तलिखितांत सापडत नाही. (पं.)

अनुक्रमणिका

गायी [1]पळताती पक्षी [2]आहाळती । पिलीं पडताती कृष्णापुढें ॥ ३ ॥
हाहा:कार जाला धांव धांव कृष्णा । वांचवी रे प्राणा सकळांच्या ॥ ४ ॥
तुझीं आम्हीं बाळें वांचवी रे आम्हां । धांव धांव रामा म्हणताती ॥ ५ ॥
आक्रोशें रडती मारिताती हांका । वैकुंठनायका रक्षीं आम्हां ॥ ६ ॥
दीनांचा दयाळ मनाचा कोमळ । घाली अग्नी ज्वाळ मुखामाजीं ॥ ७ ॥
होतां प्रात:काळ सकळ उठले । नामा म्हणे आले गोकुळांती ॥ ८ ॥

[१२३]

दुष्ट दुराचारी । गोपाळाचा वेष धरी ॥ १ ॥
दैत्य ओळखिला । रामें प्रलंब मारिला ॥ २ ॥
देव करिती जयजयकार । पुष्पें वर्षती अपार ॥ ३ ॥
सूर्य आलासे माध्यान्हा । देवा बाहाती भोजना ॥ ४ ॥
नामा म्हणे पाचारती । गडी एकत्र बैसती ॥ ५ ॥

[१२४]

एके ठायीं करूनि अन्न । हातें वाढी नारायण ॥ १ ॥
हें पाहोनी सुरवर । चित्तीं करिती विचार ॥ २ ॥
धन्य पुण्य गौळियांचें । आम्हां अन्न मिळे कैचें ॥ ३ ॥
एक असे युक्ति । हात धुविल श्रीपती ॥ ४ ॥
उच्छिष्टाचे मिषें । देव जळीं जाले मासे ॥ ५ ॥
हें कळलें घननीळा । सांगतसे हें गोपाळा ॥ ६ ॥
चला वृंदावना जाऊं । नामा म्हणे उदक घेऊं ॥ ७ ॥

[१२५]

तृणाचिया लोभें गायी गेल्या दुरी । पाचारी मुरारी नामें त्यांची ॥ १ ॥
चंद्रभागे, गंगे, भागिरथी, यमुने । येई ताम्रपर्णे धांवोनियां ॥ २ ॥

अभंग १२३ व १२५—(पं.) व (बु.), १२४—(आ.)
१ पडताती (आ.) २ रडताती (आ.), उडताती (पं. व बु.)



अनुक्रमणिका

सरस्वती, प्रवरे, कालिंदी, नर्मदे । येई तुंगभद्रे धांवोनियां ॥ ३ ॥
देवाजीचा शब्द ऐकोनियां कानीं । येताती धांवोनी नामा म्हणे ॥ ४ ॥

[१२६]

त्रिभंगी देहुडें उभें वृंदावनीं । वेणु चक्रपाणि वाजवितो ॥ १ ॥
[1]व्याघ्रावरी गायी टाकिताती माना । बाळें स्तनपाना विसरती ॥ २ ॥
सर्प आणि नाग मुंगुसें बैसती । जळेंही वाहाती विसरलीं ॥ ३ ॥
हस्ती सिंह एके ठायीं बसताती । भ्रमर भुलती वेणुनादें ॥ ४ ॥
विचरती वेणी तेथें राही फणी । करितां भोजनीं ग्रास मुखीं ॥ ५ ॥
उदकाचे कुंभ गोपिकांचे शिरीं । यमुनेच्या तीरीं वेडावल्या ॥ ६ ॥
जाहले तटस्थ त्रिलोकींचे जीव । विसरला शिव देहभाव ॥ ७ ॥
नामा म्हणे व्योमीं उभ्या देवांगना । पाहोनियां कृष्णा भुलताती ॥ ८ ॥

[१२७]

मार्गशीर्ष मासीं कात्यायनी व्रत । कुमारी समस्त आचरती ॥ १ ॥
अरुणोदयीं येती कालिंदीचे तीरीं । गाती त्या सुंदरी [2]कृष्णलीला ॥ २ ॥
सिकतेची मूर्ति करूनी देवीची । पूजाअर्चा तिची करिताती ॥ ३ ॥
जोडोनियां कर करिताती स्तवना । ऐके विज्ञापना आदिमाये ॥ ४ ॥
नंदाचा नंदन देई आम्हां पती । [3]नामा म्हणे येती स्वस्थळासी ॥ ५ ॥

[१२८]

कालिंदीचे तीरीं वस्त्रें ठेविताती । जळांत रिघती सकळीक ॥ १ ॥
गड्यांसमवेत आला तेथें कृष्ण । करावया पूर्ण व्रत त्यांचें ॥ २ ॥

---

अभंग १२६—(पं.), १२७—(पं.), (धु.) व (न.), १२८—(पं.) व (धु.)
१ तयावरी (आ.)  २ कृष्णजीला (आ.)
३ वरील अभंगाच्या पुढे पुढील अभंग (न.) प्रतीत आढळतो—
अधरींचे अमृत सेविसी तूं एकलें । काय पुण्य केलें नेणों पाविया रे ॥ १ ॥
तुळशी माळा शोभती गोपाळा । त्याहूनि आगळा तूं पाविया रे ॥ २ ॥
सोळा सहस्र गोपी बोलतील प्रौढी । अधरींची गोडी नेली त्वां रे ॥ ३ ॥
विष्णुदास नामा केशवी सौरस । उद्धरिला वंश पाविया त्वां रे ॥ ४ ॥

वस्त्रें घेवोनियां चढे कळंबावरी । धाबरल्या नारी पाहोनियां ॥ ३ ॥
वस्त्रें देई आतां आमुचीं मुकुंदा । जाऊनियां नंदा सांगों आतां ॥ ४ ॥
अच्युता अनंता कृष्णा गरुडध्वजा । दासी आम्ही तुझ्या सकळिया ॥ ५ ॥
वाजतसे सीत जाऊं पाहे प्राण । यशोदेची आण तुज असे ॥ ६ ॥
ऐकोनियां ऐसें नामा म्हणे हांसे । धर्म सांगतसे तयालागीं ॥ ७ ॥

[ १२९ ]

नग्न होवोनियां स्नान जे करिती । त्यांचीं व्रतें होतीं निरर्थक ॥ १ ॥
त्वरें करूनियां या गे मजपाशीं । सांगतो तुम्हांसी प्रायश्चित्त ॥ २ ॥
[1]येक्या मागें एक काम सदनि हात । आनंद बहुत मनामध्यें ॥ ३ ॥
करा नमस्कार सांगे वनमाळी । एक हस्त भाळीं लाविताती ॥ ४ ॥
देवां द्विजां ऐसा करितां नमस्कार । पाप याचें फार धर्मशास्त्रीं ॥ ५ ॥
ऐकोनियां ऐसें लाज सोडोनियां । पडताती पाया आदित्याच्या ॥ ६ ॥
वस्त्रें देत तेव्हां तयां जगजीवन । मनोरथ पूर्ण करीन मी ॥ ७ ॥
नामा म्हणे येती गोकुळासी नारी । चालिला श्रीहरी तेथूनियां ॥ ८ ॥

[ १३० ]

प्रातःकाळीं सांगे सकळांसी कृष्ण । नका घेऊं अन्न आज कोणी ॥ १ ॥
सोडोनियां गायी चालिले वनासी । गडी हृषिकेशी खेळताती ॥ २ ॥
वर्जियलें आम्हां नका घेऊं अन्ना । खावें काय कृष्णा आजी आतां ॥ ३ ॥
गडियांसी सांगे वैकुंठीचा राणा । सांगावें ब्राह्मणां जावोनियां ॥ ४ ॥
वनीं उपवासी आहेत रामकृष्ण । द्यावें त्यासी अन्न कृपा करोनी ॥ ५ ॥
गोपाळासी तेव्हां धाडी वासुदेव । पाहावया भाव याज्ञिकांचा ॥ ६ ॥
जोडोनियां हात वंदिती द्विजांसी । धाडिलें आम्हांसी कृष्णनाथें ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसें सांगती गोपाळ । याज्ञिका सबळ अभिमान ॥ ८ ॥

---

अभंग १२९ व १३०—(पं.) व (धु.)
१ एकी आड एक गुह्यस्थानी हात । (आ.)



अनुक्रमणिका

[ १३१ ]

पडे प्रायश्चित्त बोलों नका कोणी । ऐकूं नये कानीं शब्द यांचा ॥ १ ॥
स्वर्गसुखासाठीं करिताती यज्ञ । टाकिती अवदानें अग्निमुखीं ॥ २ ॥
भोक्ता वनीं आला न कळेची त्याला । १पूर्ण ब्रह्म याला न जाणती ॥ ३ ॥
कृपाळु बहुत परीक्षिती राया । उद्धार कराया पाठविलें ॥ ४ ॥
इच्छामात्रें पाडी अन्नाचे पर्वत । काकुळती येत अन्नासाठीं ॥ ५ ॥
गडियांसी २कळे तेथील आकार । निघती सत्वर तेथुनियां ॥ ६ ॥
येवोनियां कृष्णा सांगितलें त्यांनीं । हांसे चक्रपाणि नामा म्हणे ॥ ७ ॥

[ १३२ ]

कृष्णा पांच खाणी उथळ दिसती । लाहानाल्या भिती त्याजवरी ॥ १ ॥
विस्तु घालिताती गवत आंथरती । बडबड करिती अवघेजण ॥ २ ॥
घालुनियां तूप हातीं घेती चाटू । करीत ॐ फट् अक्षेवेळां ॥ ३ ॥
लांकडाचें पाळें घेऊनि बैसला । मिळालासे मेळा त्याजपुढें ॥ ४ ॥
एवढेंसें भांडें तांदूळ शिजविती । तुजला काय देती त्यांतूनियां ॥ ५ ॥
३घडिघडी उठती घडिघडी बैसती । तें काय श्रीपति आम्हां सांग ॥ ६ ॥
काय चतुराई असे त्या गोपाळा । भावासी भुलला नामा म्हणे ॥ ७ ॥

[ १३३ ]

गडियांसी तेव्हां सांगितलें देवें । स्त्रियांसी सांगावें जाऊनियां ॥ १ ॥
नको कृष्णा द्विज आम्हांसी मारिती । अभय श्रीपती त्यांसी देत ॥ २ ॥
त्वरें करोनियां गेले स्त्रियांपाशीं । सांगितलें त्यांसी वर्तमान ॥ ३ ॥
ऐकोनियां ऐसें उठिल्या सत्वर । वर्जिती भ्रतार तेव्हां त्यांचे ॥ ४ ॥
एका ब्राह्मणानें स्त्रियेसी बांधिलें । प्राणासी सोडिलें परीक्षिती ॥ ५ ॥
सुकुमार सांवळा राजीवलोचन । पाहताती कृष्णमुख तेव्हां ॥ ६ ॥
आनंदाचे नेत्रीं वाहातें जीवन । पुसे वर्तमान नामा म्हणे ॥ ७ ॥

---

अभंग १३१ ते १३३—(प.) व (धु.)

१ अहंतेने तयाला नाडियेलें । (धु.) २ कळलें त्याहींचे अन्तर । (धु.)
३ अक्षेवेळे बसती अक्षे वेळा उठती । (धु. व पं.)

अनुक्रमणिका

[ १३४ ]

घरा जावें ऐसें सांगे पुरुषोत्तम । ऐकोनियां श्रम फार होय ॥ १ ॥
दयानिधि ऐके अगा मेघश्यामा । धाडूं नको आम्हां येथूनियां ॥ २ ॥
तुजसाठीं आम्हीं सोडिलें भ्रतारां । चरणीं देईं थारा देवराया ॥ ३ ॥
देव ना संसार आम्हां जालें कृष्णा । सांगावें हें कोणा दुःख आतां ॥ ४ ॥
तुमचे भ्रतार वंदिती [1]आम्हांसी । सांगे हृषिकेशी भिऊं नका ॥ ५ ॥
सांगतांची ऐसें चालियेल्या त्या सर्व । पाहाती केशव वेळोवेळीं ॥ ६ ॥
द्विजांचे मानसीं होय अनुताप । निंदिती आप आपणातें ॥ ७ ॥
भोजन करूनी गडी रामकृष्ण । निघती तेथून नामा म्हणे ॥ ८ ॥

[ १३५ ]

इंद्राचा विभाग भक्षी नारायण । रूप गोवर्धन धरूनियां ॥ १ ॥
क्रोधावला इंद्र गौळियां निंदीत । दावीन सामर्थ्य तुम्हां आतां ॥ २ ॥
पोरांच्या बुद्धीनें वर्तताती सर्व । धरूनियां गर्व तेचि करिती ॥ ३ ॥
प्रळय मेघांच्या काहाडिल्या शृंखला । वर्षावें गोकुळां सकळांनीं ॥ ४ ॥
आज्ञा म्हणोनियां वंदियेला इंद्र । कोपे जैसा रुद्र प्रळयींचा ॥ ५ ॥
मुसळाच्या धारा मेघ वर्षताती । गारा पडताती शिळा जैशा ॥ ६ ॥
मरताती पक्षी श्वापदें अपार । हिंवें नारीनर कांपताती ॥ ७ ॥
नामा म्हणे गायी हंबरडा फोडिती । येऊनी पडती कृष्णापुढें ॥ ८ ॥

[ १३६ ]

काकुळती येती सकळिक लोक । पाहासी कौतुक काय आतां ॥ १ ॥
मागें बहुतापरी रक्षियलें आम्हां । अगा पुरुषोत्तमा दीनबंधु ॥ २ ॥
कोण तुजविण आम्हासि रक्षिता । उदारा अनंता जगजेठी ॥ ३ ॥
शरण शरण अगा वासुदेवा । अच्युता माधवा दीनबंधु ॥ ४ ॥
विलंब केलिया जातील रे प्राण । धरिती चरण नामा म्हणे ॥ ५ ॥

---

अभंग १३४ व १३५—(पं.) व (धु.), १३६—(धु.)
१ तुम्हांसी (पं. व धु.)

[१३७]

सकळिकां लोकां देवें आश्वासिलें । इंद्रें हें मांडिलें विघ्न येथें ॥ १ ॥
महेंद्राचा रंक करीन क्षणांत । पहा पुरुषार्थ दावीन मी ॥ २ ॥
रक्षिणार यासी आहे मी गोविंद । उतरीन मद [१]याचा आतां ॥ ३ ॥
शरणागत मारी ऐसा कोण थोर । मशक पामर पाहूं आतां ॥ ४ ॥
या साठीं करीन सृष्टीचा उभारा । लागों नेदी वारा दुःखाचा मी ॥ ५ ॥
गोवर्धना तुम्ही चलारे समस्त । दावितों सामर्थ्य इंद्रा आतां ॥ ६ ॥
उचलिला गिरी प्रथम अंगुळीं । नामा म्हणे बळी बाप माझा ॥ ७ ॥

[१३८]

राहा याजतळीं आनंदें करूनी । मानूं नका मनीं भय याचें ॥ १ ॥
पाहूं किती दिवस पडतो पाऊस । धरीन निःशेष प्रलयान्त ॥ २ ॥
सांगतांचि ऐसें राहाती सकळ । वर्णिताती बळ परस्परें ॥ ३ ॥
सौंगडे म्हणती पडेल अवचिता । लावा कीं रे हाता सकळिक ॥ ४ ॥
उगेंचि होती श्रमीं बालकें अज्ञान । म्हणे नारायण काहाडा हात ॥ ५ ॥
सप्त दिन होती सांगतो योगींद्र । पहावया इंद्र येता जाला ॥ ६ ॥
अद्‌भुत चरित्र पाहून गेली भ्रांत । मेघासी सांगत पुरे करा ॥ ७ ॥
नामा म्हणे चित्तीं इंद्र चिंतावला । अपराध घडला समर्थाचा ॥ ८ ॥

[१३९]

राहिला पाऊस निघावें बाहेर । सांगे विश्वंभर सकळिकां ॥ १ ॥
दीनबंधू तेव्हां ठेवी पर्वतासी । भेटती देवासी सकळिक ॥ २ ॥
आयुष्य बहुत तुज होवो कृष्णा । वांचविले प्राणा सकळांच्या ॥ ३ ॥
विष्णुदास नामा ओवाळून जाय । ये गे माझे माय भेटी देई ॥ ४ ॥

[१४०]

इंद्राचिये नेत्रीं वाहातसे नीर । अपराधी थोर देवराया ॥ १ ॥
क्षमा करीं आतां अच्युता अनंता । अगा कृष्णनाथा दीनबंधू ॥ २ ॥

अभंग १३७—(पं.) व (धु.), १३८ ते १४०—(धु.)
१ तुझा (आ.)

अनुक्रमणिका

तुझिया दासासी दुःख म्यां दिधलें । भ्रांतीनें मोहिलें मन माझें ॥ ३ ॥
दावी तुज थोरी न करीच सेवा । करा दंड देवा मजलागीं ॥ ४ ॥
तूंचि माझा बाप तूंचि माझी आई । क्षमा कृष्णाबाई करी आतां ॥ ५ ॥
दैत्य मारावया भूतळीं आलासी । भक्ताला रक्षिसी निरंतर ॥ ६ ॥
जगद्गुरू धन्य माझा वनमाळी । जोडोनि आंजुली उभा असे ॥ ७ ॥
चतुर्भुज गळां वैजयंती माळा । पाहातसे डोळां नामा म्हणे ॥ ८ ॥

[ १४१ ]

गोविंदा माधवा [1]केशवा वामना । मायातीता कृष्णा तुज नमो ॥ १ ॥
गोवर्धनधरा देवा विश्वंभरा । निर्गुण निराकारा तुज नमो ॥ २ ॥
जनार्दना हरि कृपाळु हृषिकेशा । पुराणपुरूषा तुज नमो ॥ ३ ॥
अत्यक्ता क्षेत्रज्ञा अचिंत्या कूटस्था । भुवनत्रय नाथा तुज नमो ॥ ४ ॥
अनंत ब्रह्मांडें तुझिये उदरीं । घनश्याम हरि तुज नमो ॥ ५ ॥
देवराया तुझें कोमळ हृदय । कृपा दृष्टी पाहे मजकडे ॥ ६ ॥
तुझा मी किंकर आहे वासुदेवा । अभय या जीवा देईं आतां ॥ ७ ॥
नामा म्हणे घाली चरणासी मिठी । बोले जगजेठी स्वामी माझा ॥ ८ ॥

[ १४२ ]

तुझा मोडिला म्यां यज्ञ । ऐक तयाचें कारण ॥ १ ॥
न करी रे स्मरण । सुखारूढ तुझें मन ॥ २ ॥
विसरलासी मज । अनुग्रह केला तुज ॥ ३ ॥
ऐसें सांगे नारायण । नामा म्हणे समाधान ॥ ४ ॥

[ १४३ ]

आणूनि सुरभि करी अभिषेक । येती सकळिक मरुद्गण ॥ १ ॥
सुरवरांची दाटी करिती नमस्कार । होतसे अपार पुष्पवृष्टी ॥ २ ॥
वेदमंत्रघोष ऋषी करिताती । अप्सरा नाचती थैयथैयां ॥ ३ ॥
नारद तुंबर गंधर्व गायन । वर्णिताती गुण कृष्णजीचे ॥ ४ ॥

अभंग १४१ ते १४३—(धु.)
१ श्रीधरा (धु.)

यथाविधी इंद्र पूजी विश्वंभरा । जोडोनियां करां उभा राहे ॥ ५ ॥
आज्ञा घेऊनियां जाय स्वस्थळासी । येती गोकुळासी सकळिक ॥ ६ ॥
चरित्र जो कोणी उच्चारील वाचे । जळती पापांचे पर्वत हे ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसें सांगतसे शुक । सूत पुराणीक शौनकासी ॥ ८ ॥

[१४४]

अहर्निशीं कंस बसे चिंताक्रांत । विचार पुसत प्रधानासी ॥ १ ॥
प्रतिज्ञा करूनि शत्रुवधा जाती । ते मागें न येती परतोनी ॥ २ ॥
आतां पुरूषार्थी कोण पाठवावा । तो मज सांगावा निवडोनि ॥ ३ ॥
सांगती प्रधान धाडा असुरासुर । तव तो असुर उभा राहे ॥ ४ ॥
म्हणे मृत्यु नसे मज कोणा हातीं । द्वापारीं मारुती गुप्त जाला ॥ ५ ॥
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं । गौरविलें त्यासी नानापरीं ॥ ६ ॥
नामा म्हणे काळें बोलाविलें त्यासी । सत्वर वनासी येता जाला ॥ ७ ॥

[१४५]

आनंदे वनांत खेळताती गोप । गाईंचे कळप चरताती ॥ १ ॥
अकस्मात दैत्य देखती दुरोन । म्हणती कृष्णा विघ्न थोर आलें ॥ २ ॥
लपें तूं कान्होबा म्हणताती गडी । घालितों घोंगडी तुजवरी ॥ ३ ॥
घाबरले तेव्हां समस्त गोपाळ । पाहोनी घननीळ बोलतसे ॥ ४ ॥
तुम्ही कांहीं चिंता न करा मानसीं । मारितों मी यांसी क्षणामाजीं ॥ ५ ॥
राहोनिया उभा पाहात अंतरीं । यासी मृत्यु करीं कोणाचिया ॥ ६ ॥
वातात्मजा हातीं मरण असे यासी । कळलें देवासी नामा म्हणे ॥ ७ ॥

[१४६]

गायी गोप तेव्हां लपवोनी क्षणेक । जानकी नायक जाला देव ॥ १ ॥
आकर्ण नयन हातीं धनुष्यबाण । करितसे ध्यान मारुतीचें ॥ २ ॥
स्वामीचा तो धांवा ऐकोनियां कानीं । हुडबडिला मनीं कपींद्र तो ॥ ३ ॥
निघोनी त्वरित वनामाजीं आला । चरणासी लागला प्रेमभावें ॥ ४ ॥
म्हणे स्वामी कांहीं सेवकासी आज्ञा । करावी सर्वज्ञा दयानिधी ॥ ५ ॥
देव म्हणे बा रे काय सांगू फार । पैल तो असुर येत आहे ॥ ६ ॥

अभंग १४४ ते १४६—(आ.)

अनुक्रमणिका

तुझ्या हातें आहे तयासी मरण । म्हणोनि स्मरण केलें तुझें ॥ ७ ॥
तयासी जावोनी मारी तुवां आतां । चरणीं ठेवूनि माथा निघाला तो ॥ ८ ॥
दुर्जनें ते वेळीं मारुती पाहिला । म्हणे काळ आला कोठोनियां ॥ ९ ॥
धरूनिया नरडी केला गतप्राण । पुनरपि येऊन वंदितसे ॥ १० ॥
नामा म्हणे दोन्ही जोडोनियां कर । बोलिला उत्तर काय आतां ॥ ११ ॥

[ १४७ ]

त्रेतायुगीं ख्याती करोनियां थोर । वधिले असुर रावणादि ॥ १ ॥
कोण्या हेतुस्तव पुन्हां आगमन । सांगा कृपाकरून दासालागीं ॥ २ ॥
ऐकोनियां वचन बोले सर्वेश्वर । द्वापारीं अवतार आठवा हा ॥ ३ ॥
तुझे भेटीस्तव रूप हें धरिलें । दावी तें वहिलें कपी म्हणे ॥ ४ ॥
कृष्णलीला पाहूं हेत आहे चित्ता । दावी सीताकांता दीनालागीं ॥ ५ ॥
चतुर्भुज रूप दाविलें प्रगट । शिरीं मोर मुगुट शोभतसे ॥ ६ ॥
गुंजाहार गळां वैजयंती माळा । कांसेसी पिवळा पीतांबर ॥ ७ ॥
नवलक्ष गायी गोपही तितुके । खेळती कौतुकें करोनियां ॥ ८ ॥
नामा म्हणे तेव्हां स्तुति ते करीत । न कळे तुझा अंत ब्रह्मादिकां ॥ ९ ॥

[ १४८ ]

द्वापाराची ठेव संपूर्ण पाहून । विनवी जोडून करालागीं ॥ १ ॥
रामरूप धरून मज बोळवावें । तें रूप पाहावें हृदयामाजीं ॥ २ ॥
मनोरथ त्याचा ऐकोनी श्रवणीं । जाला चापपाणि तात्कालिक ॥ ३ ॥
पाहोनियां ध्यान करूनि नमन । निघाला तेथून वायुसुत ॥ ४ ॥
घेवोनियां आज्ञा सेतुबंधा गेला । ध्यानस्थ बैसला नामा म्हणे ॥ ५ ॥

[ १४९ ]

गौळी म्हणती हृषिकेशी । दावी आपल्या स्थळासी ॥ १ ॥
सुखें तूंचि कृष्णा । आमुची पुरवी वासना ॥ २ ॥
दावी वैकुंठ सकळां । क्षण एक पाहूं डोळां ॥ ३ ॥
नामा तेथील रहिवासी । आला स्थापाया [1]धर्मासी ॥ ४ ॥

---

अभंग १४७ व १४८—(आ.), १४९—(धु.)
१ भक्तासी (धु.)

[१५०]

लोपला आदित्य चढे चंद्रप्रभा । वृंदावनीं शोभा सुशोभित ॥ १ ॥
देहुडा पाउलीं उभा तये वनीं । वेणू चक्रपाणि वाजवितो ॥ २ ॥
ऐकतांचि [1]नाद गोकुळींच्या नारी । पाहावया [2]हरि निघताती ॥ ३ ॥
भ्रतार सेजेसीं टाकुनी उठती । वाढितां पंगती निघताती ॥ ४ ॥
स्तन देतां बाळें टाकिलीं भूमीसी । मोकळिया केशीं निघताती ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐशा गेल्या देवापाशीं । आनंद मानसीं न समाये ॥ ६ ॥

[१५१]

वनामध्यें कां गे आलाती सकळ । विनोदें गोपाळ म्हणतसे ॥ १ ॥
निशींमाजीं व्याघ्र फिरताती रानीं । जावें सकळांनीं घरां आतां ॥ २ ॥
ऐकोनियां ऐसें कठीण वचन । चालिलें जीवन नेत्रींहूनी ॥ ३ ॥
वेणुनाद दूत धाडिला आम्हांसी । आलिया म्हणसी जावें आतां ॥ ४ ॥
शहाणा चतुर आहेसी नेटका । वैकुंठनायका विचारावें ॥ ५ ॥
कामाग्नीनें [3]कृश पाडिले सकळ । मांडियेला खेळ मन्मथाचा ॥ ६ ॥
एक एक [4]नारी एक एक कृष्ण । करावया पूर्ण इच्छा त्यांची ॥ ७ ॥
[5]प्रकृतीसी ऐसा भुलला गोविंद । करिती आनंद नामा म्हणे ॥ ८ ॥

[१५२]

जाला अभिमान धन्य आम्ही आतां । लक्षुमीचा कांता भोगितसों ॥ १ ॥
गुप्त जाला तेव्हां वैकुंठ नायक । करिताती शोक सकळीक ॥ २ ॥
निघाल्या तेथूनि फिरताति वनें । यशोदेचें तान्हें धुंडावया ॥ ३ ॥
वृक्ष आदि पक्षी पुसती तयांसी । तुम्ही हृषिकेशी देखियेला ॥ ४ ॥
मृगासी पुसती देखियेला डोळां । सांगा रे सांवळा कोणीतरी ॥ ५ ॥
आम्हांवरी तुम्ही काय रे कोपता । सांगा रे भगवंता पुसतसों ॥ ६ ॥[6]

अभंग १५० ते १५२—(पं.) व (धु.)
१ नंद (धु.) २ श्रीहरि (धु.) ३ कृष्णा पीडिलो (आ.) ४ कृष्ण गोपीप्रति जाणा (पं.)
५ प्राकृतासि (पं.) ६ हा चरण (धु.) मध्ये नाही.

अनुक्रमणिका

कुरवंडी करूं सकळांचे प्राण । देऊं त्या भूषण अंगावरी ॥ ७ ॥
नामा म्हणे जेथें असे अभिमान । तेथें नारायण नाहीं नाहीं ॥ ८ ॥

[ १५३ ]

ऐकावें चरित्र परीक्षितिराया । बरोबरी जाया एक असे ॥ १ ॥
तोडोनियां पुष्पें [1]गुंफोनियां हार । घालीत श्रीधर तिजवरी ॥ २ ॥
न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । घालितसे वेणी आवडीनें ॥ ३ ॥
वंदियेलीं शिवें चरणींची गंगा । करीतसे भांगा नीट तिच्या ॥ ४ ॥
गोपिकांच्या वेषें प्रगटल्या श्रुती । गुह्य तुजप्रति सांगितलें ॥ ५ ॥
घेवोनियां तिसी गेला कुंजवना । वज्रांकुश चिन्हां उमटती ॥ ६ ॥
गोपिकांचा मेळा येतसे तांतडी । युगा ऐसी [2]घडी जाय तयां ॥ ७ ॥
न लगेची शोध शीणती सकळा । न जाती गोकुळा नामा म्हणे ॥ ८ ॥

[ १५४ ]

चंद्राच्या प्रभेनें चमकती पाऊलें । दुरोनि देखिलें गोपिकांनीं ॥ १ ॥
कृपणाचें धन होतें जे चळलें । तयासी लाधलें अवचिता ॥ २ ॥
एकीमागें एक धावताती नारी । आहे येथें हरी ऐसें वाटे ॥ ३ ॥
घेवोनियां रज लाविताती भाळा । पाहती सकळां न्याहाळूनि ॥ ४ ॥
बरोबरी [3]नारी कोणीतरी असे । पाउलांचे ठसे उमटले ॥ ५ ॥
पापिणि गे तुम्ही आम्ही सकळिक । पुण्याची अधिक म्हणुन भोगी ॥ ६ ॥
बरोबरी तिसी होय अभिमान । जालासे स्वाधीन माझ्या देव ॥ ७ ॥
कडे घेसे तरी येतें बरोबरी । चालवेना हरि मज आतां ॥ ८ ॥
त्राणोनि अंतर [4]ठकविलें भगवंतें । नामा म्हणे येथें रडतसे ॥ ९ ॥

[ १५५ ]

मागोनियां गोपी आल्या तिजपाशीं । कोठें हृषिकेशी सांग आम्हां ॥ १ ॥
टाकोनियां गेला मज पूतनारी । येथेंची मुरारी गुप्त जाला ॥ २ ॥

अभंग १५३ ते १५५—(पं.) व (धु.)
१ करी अलंकार (आ.) २ झाली (आ.) ३ गोपिका (पं.) ४ उठविले (धु.)

वैकुंठनायका अगा नारायणा । दावी रे वदना एक वेळां ॥ ३ ॥
कृष्णाचें चरित्र सकळ करिती । मन रंजविती नामा म्हणे ॥ ४ ॥

[१५६]

जोडोनियां हात येती काकुळती । पाव कृपामूर्ति आम्हांलागीं ॥ १ ॥
अवतार घेसी दुष्ट वधायासी । येसी गोकुळासी म्हणोनियां ॥ २ ॥
पाहोनियां तुला लक्ष्मी पातली । दरिद्रें पळालीं येथोनियां ॥ ३ ॥
सकळांसी सुख द्यावया आलासी । आम्हीं वनवासी दुःखी होतों ॥ ४ ॥
नामा म्हणे कंठीं धरियेला प्राण । दाखवी चरण दयानिधी ॥ ५ ॥

[१५७]

सरोवरीं कमळें तैसे तुझे नेत्र । त्याहूनि विचित्र दिसताती ॥ १ ॥
कृपाळुवा ऐके क्षमा हृषिकेशी । आम्हीं तुझ्या दासी मोलाविण ॥ २ ॥
कामरूपदैत्य मारितो आम्हांसी । भक्तांसी रक्षिसी कीर्ति जगीं ॥ ३ ॥
दीनासी रक्षिसी दुष्टांसी मारिसी । धर्माला स्थापिसी निरंतन ॥ ४ ॥
घेवोनियां शस्त्र मारावें सकळां । आलासे कंटाळा नामा म्हणे ॥ ५ ॥

[१५८]

सुकुमार सांवळें जैसीं रातोत्पळें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ १ ॥
ध्वजवज्रांकुश [१]जयाशीं शोभलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ २ ॥
दमोनियां दुष्टां बाहेर काढिलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ ३ ॥
रांगतां रांगतां विमलार्जुन मोडीले । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ ४ ॥
अघासुरा उदरीं उभीं जीं राहिलीं । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ ५ ॥
नामा म्हणे ज्यांतें वरुणानें पूजिलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ ६ ॥

[१५९]

सकळांचें तुझ्या हातीं असे सूत्र । यशोदेचा पुत्र नवसीला ॥ १ ॥
नंदाचिया ऋणा फेडाया आलासी । कळलें आम्हांसी तुझ्या कृपें ॥ २ ॥

---

अभंग १५६ ते १५८—(धु.), १५९—(पं.) व (धु.)
१ पद्म तें (आ.)

अनुक्रमणिका

तेहतीस कोटी देव ब्रह्मा सदाशिव । प्रार्थिताती सर्व तुजलागीं ॥ ३ ॥
यादवकुळटिळका वैकुंठनायका । विधीच्या जनका भेट आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मुख दाखवी कृष्णनाथा । हरेल ही व्यथा वियोगाची ॥ ५ ॥

[१६०]

शरणांगत तारी भवसिंधु त्वरित । [1]ठेवावा तो हात शिरावरी ॥ १ ॥
अरण्यांत दुष्ट दैत्यांसी मारीत । ठेवावा तो हात शिरावरी ॥ २ ॥
वेणू पांवा जया हातांत शोभत । ठेवावा तो हात शिरावरी ॥ ३ ॥
घेवोनी शिदोऱ्या गड्यांसी वांटीत । ठेवावा तो हात शिरावरी ॥ ४ ॥
रक्षावया प्रजा उचलिला पर्वत । ठेवावा तो हात शिरावरी ॥ ५ ॥
सुवर्णाचीं कडीं भूषणें अमित । ठेवावा तो हात शिरावरी ॥ ६ ॥
ऐशा त्या गोपिका आनंता वर्णिती । निष्पाप पाहाति नामा म्हणे ॥ ७ ॥[2]

[१६१]

अभिमानें घाला घातला आम्हांसी । म्हणूनि लपलासी देवराया ॥ १ ॥
तुजवांचोनियां जाऊं पाहे प्राण । दाखवी वदन एकवेळां ॥ २ ॥
मुकुट कुंडलें श्रीमुख सांवळें । केशरीं लाविलें गंध भाळीं ॥ ३ ॥
पाहोनियां जीवीं होय फार सुख । हरेल ही भूक डोळियांची ॥ ४ ॥
तुजवांचोनियां आम्हां नाहीं कोणी । तिहीं त्रिभुवनीं नामा म्हणे ॥ ५ ॥

[१६२]

चरणासी शरण तुझिया जे येती । तेचि उद्धरती भवसिंधु ॥ १ ॥
लक्ष्मीनें ज्यातें असे आराधिलें । ठेवीं तीं पाऊलें स्तनावरी ॥ २ ॥
आवडीनें शिवें मस्तकीं वंदिलें । ठेवीं तीं पाऊलें स्तनावरी ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसी करिताती स्तुती । शिंपीयेली क्षिती अश्रुपातें ॥ ४ ॥

---

अभंग १६०—(पं.), (शि.) व (धु.), १६१ व १६२—(धु.)

१ ठेवि तोचि हात स्तनावरी (पं. व धु.) प्रत्येक कडव्याचा दुसरा चरण हा वरील चरणाप्रमाणे आहे. २ हा चरण (पं.) व (स.) प्रतींत आढळतो.

अनुक्रमणिका

[ १६३ ]

आम्हांवरी कांरे धरियेला राग । काय तुझें सांग आम्हीं केलें ॥ १ ॥
रडतसों आम्हीं मारितसों हांका । विश्वाच्या जनका नायिकसी ॥ २ ॥
कामाग्नीनें आम्ही जळतों सकळ । करावें शीतळ अधरामृतें ॥ ३ ॥
नामा म्हणे देई एकवेळ भेटी । तुजसाठीं कष्टी फार होतों ॥ ४ ॥

[ १६४ ]

वाजवोनी वेणू पसरिलें जाळें । आम्हांसी न कळे कपटिया तूं ॥ १ ॥
दुखवोनी सर्वां टाकियेलें वनीं । गेलासी येथुनि पारधिया ॥ २ ॥
धरूनियां धीर [1]राहूं एक क्षण । देऊं मग प्राण सकळिक ॥ ३ ॥
सकळांच्या हत्या येती तुजवरी । नामा म्हणे हरि भेट आतां ॥ ४ ॥

[ १६५ ]

त्रिविधतापें प्राणी होताती संतप्त । शीतळ करीत कथामृतें ॥ १ ॥
अमृतापरीस तुझी कथा अधिक । सांगतसों ऐक देवराया ॥ २ ॥
स्वर्गीं जे अमृत प्राशन करिती । पुण्य सरल्या येती मृत्युलोकां ॥ ३ ॥
तुझी कथा देत अच्युत पदांसी । न विचारी मानसीं याति कांहीं ॥ ४ ॥
नाहीं चतुराई बोबडे हे बोल । लिहित विठ्ठल नामा म्हणे ॥ ५ ॥

[ १६६ ]

गायी घेवोनियां जासी जेव्हां राना । आमुचिया मना दुःख वाटे ॥ १ ॥
सुकुमार सांवळीं जैसीं रातोत्पळें । त्याहूनि कोवळे पाय तुझे ॥ २ ॥
खडे कांटे बहू कठिण तृणमुळें । ठेवीसी पाऊलें तयांवरी ॥ ३ ॥
पावतोसी क्लेश अगा वासुदेवा । म्हणोनियां जीवा दुःख वाटे ॥ ४ ॥
सांगतसों आम्ही नित्य यशोदेसी । धाडूं नको यासी वनांमध्यें ॥ ५ ॥
नामा म्हणे होय सकळांचा उद्धार । म्हणोनी श्रीधर वना जाय ॥ ६ ॥

अभंग १६३—(पं.) व (धु.), १६४ ते १६६—(धु.)
१ न राहूं (धु.)



अनुक्रमणिका

[१६७]

तुजवांचोनियां वैकुंठनायका । आम्हांसी घटिका युग होय ॥ १ ॥
अस्तमान होतां येसी तूं गोकुळीं । मुखावरी धुळी गोरजांची ॥ २ ॥
कुरळ हे केंस सुंदर नासिक। पाहोनियां सुख होय फार ॥ ३ ॥
लवती पापण्या न सोसवे आम्हां । अहिर्निशीं नामा हेंचि गाय ॥ ४ ॥

[१६८]

टाकियेलें आम्हीं पतिबंधुसुतां । आलोंत अच्युता तुजपाशीं ॥ १ ॥
आमुची ही इच्छा करिशील पूर्ण । आहेसी कठीण [1]ठावें नाहीं ॥ २ ॥
घालोनियां कूपीं [2]ववियेला दोरा । साधियेलें वैरा आपुलिया ॥ ३ ॥
वरोनियां टाकी मोठासा पर्वत । म्हणती समस्त नामा म्हणे ॥ ४ ॥

[१६९]

तुझे भेटीविण । जाती सकळांचे प्राण ॥ १ ॥
दया तुझिया मना । कां रे न ये नारायणा ॥ २ ॥
बोलवेना आतां । कंठ [3]शोषला अनंता ॥ ३ ॥
ऐसें पाहोनियां । नामा म्हणे आली दया ॥ ४ ॥

[१७०]

देतसे दर्शन । सकळांसी नारायण ॥ १ ॥
जाला सकळां आनंद । हृदयीं धरिला गोविंद ॥ २ ॥
टाकोनियां आम्हां । कां रे गेलासी पुरुषोत्तमा ॥ ३ ॥
तुम्हा जाला अभिमान । नामा म्हणे [4]सांगे खूण ॥ ४ ॥

[१७१]

सकळांची इच्छा करीतसे पूर्ण । भुलला श्रीकृष्ण त्यांच्या भावा ॥ १ ॥
विमानीं बैसोनी सुरवर पाहाती । गंधर्व गाताती सप्तस्वरें ॥ २ ॥

---

अभंग १६७ व १६८—(धु.), १६९ ते १७१—(पं.) व (धु.)
१ वाट (धु.) २ कापियेला (आ.) ३ शोकला (आ.) ४ सांगतसे (धु.).

अनुक्रमणिका

विणे वाजताती मृदंगाचा घोष । वाचे तो उल्हास वर्णवेना ॥ ३ ॥
न जाय चन्द्रमा न जाये नक्षत्र । पाहाती सर्वत्र रासक्रीडा ॥ ४ ॥[1]
जलक्रीडा करी लक्ष्मीचा पती । लाळ घोटीताती देवस्त्रिया ॥ ५ ॥
धन्य त्या गोपिका धन्य त्यांचें पुण्य । भोगिताती कृष्ण पूर्णब्रह्म ॥ ६ ॥
नामा म्हणे होय कामाची ते पूर्ती । नव्हे वीर्यच्युती गोविंदाची ॥ ७ ॥

[ १७२ ]

होतां प्रातःकाळ सांगतसे तयां । जावें येथोनियां शीघ्र आतां ॥ १ ॥
क्षणोक्षणीं पाहाती देवाजीचें मुख । येती सकळीक गोकुळांसी ॥ २ ॥
परीक्षिती ऐके [2]ऐशा कौतुकासी । होत्या त्याजपाशीं त्याच्या स्त्रिया ॥ ३ ॥
म्हणोनियां कोणी नाहीं विचारिलें । अंतरीं न कळे दुज्या आल्या ॥ ४ ॥
यथामति रास वर्णिला देवाचा । संपूर्ण हे वाचा काय करी ॥ ५ ॥
चरित्र श्रवण करील जो कोणी । धन्य तोचि प्राणी नामा म्हणे ॥ ६ ॥

[ १७३ ]

सरस्वती तीरीं अंबिकेचें स्थान । गोकुळीचे जन जाती तेथें ॥ १ ॥
करोनी पूजन करिती प्रार्थना । नंदाच्या नंदना सुखी राखी ॥ २ ॥
सारितां भोजन लोपिला आदित्य । नामा म्हणे तेथ राहताती ॥ ३ ॥

[ १७४ ]

निद्रिस्त सकळ तयें वनीं व्याळ । गिळितसे बळें नंदालागीं ॥ १ ॥
कृष्णा धांव वेगीं मज गिळी सर्प । काळावरी दर्प तुझा देवा ॥ २ ॥
माझिया [3]पाडसा येईं रे धांवोनी । दावी रे वदन अंतकाळीं ॥ ३ ॥
आली काय तुज निद्रा रे कान्हया । माझिया तान्हया ऊठ वेगीं ॥ ४ ॥
ऐकोनियां ऐसें उठती सकळ । घालिती मुसळ सर्पावरी ॥ ५ ॥
श्रमले सकळ न सोडि नंदाला । पिटी वक्षस्थळा नंदपत्नी ॥ ६ ॥

---

अभंग १७२ ते १७४—(पं.) व (धु.)

१ चौंर व पाच हे चरण काही प्रतींत पाच व चार ह्या क्रमाने आहेत. २ एका (आ.)
३ तान्हया (पं.)

उठे जगद्‌गुरु काय जाले माय । लावितसे पाय तयालागीं ॥ ७ ॥
टाकियेलें सर्प तेव्हां कलेवर । पुरुष सुंदर निघतसे ॥ ८ ॥
नामा म्हणे वाचे स्तवी विश्वंभरा । करूनि नमस्कारा जाता जाला ॥ ९ ॥

[१७५]

करिती गायन रामकृष्ण हरी । गोकुळीच्या नारी जाती तेथें ॥ १ ॥
शंख नामा तेथें आलासे गुह्यक । नाहीं त्या विवेक पापियासी ॥ २ ॥
उपजला काम तयाचिया मना । घालोनि विमाना स्त्रिया नेत ॥ ३ ॥
धांव धांव रामा नेतसे हा आम्हां । अगा मेघश्यामा कृष्णनाथा ॥ ४ ॥
नेतो स्त्रिया काय न कळेचि देवा । यासी करूं द्यावा अपराध ॥ ५ ॥
हातीं वृक्ष दोघे ऐसे पाहोनियां । टाकोनि तो स्त्रिया पळतसे ॥ ६ ॥
घालितांची वृक्ष प्राणासी मुकला । मणी त्याचा दिला वळीभद्रा ॥ ७ ॥
भक्तांसाठीं मारी दुष्टा जगजेठी । नामा म्हणे तुटी विसरेना ॥ ८ ॥

[१७६]

गोपिकांचा मेळा आला गृहाप्रती । काय त्या म्हणती नंदालागीं ॥ १ ॥
परब्रह्म साक्षात् क्षीरसागरवासी । त्या कैसा धाडसी वनामध्यें ॥ २ ॥
ब्रह्मा आणि [1]इंद्र आले गोकुळासी । वर्णिती कृष्णाशीं तुम्ही देखा ॥ ३ ॥
तेहतीस कोटी देव जयातें प्रार्थित । तयासी अरण्यांत रूतती कांटे ॥ ४ ॥
दैत्यांचा हा भार जाहला पृथ्वीसी । वधाया कंसासी आला येथें ॥ ५ ॥
त्याजसाठीं फार श्रमताती योगी । कैलासाचा जोगी ध्यान करी ॥ ६ ॥
[2]भ्रांती कांरे तुज पडे वेळोवेळां । पाहतोस डोळां चरित्र तें ॥ ७ ॥
नामया सुकृत जाहालेंसे फार । म्हणोनी विचार नाठवेची ॥ ८ ॥

[१७७]

वृषभाच्या रूपें आला रिठासूर । इंद्रादि सुरवर भीती जया ॥ १ ॥
बहु देतां त्रास गोकुळींच्या जनां । धांव धांव कृष्णा मारी याला ॥ २ ॥

अभंग १७५ ते १७७—(धु.)
१ रुद्र (धु.) २ भ्रांत ते रे (धु.)

अनुक्रमणिका

जगजेठी तेव्हां धरितसे शिंगें । सारितसे मागें भुजाबळें ॥ ३ ॥
पाडोनियां खालीं दिला पाय वर । मारिला असुर नामा म्हणे ॥ ४ ॥

[१७८]

कंसाचिया घरा आला नारदमुनी । एकांतीं बैसोनी सांगतसे ॥ १ ॥
सातवा जो गर्भ [1]जिराला म्हणसी । जाला रोहिणिसी बळिराम ॥ २ ॥
आठवा जो पुत्र देवकीसी जाला । वसुदेवें नेला नंदाघरीं ॥ ३ ॥
यशोदेची कन्या घेउनियां येत । गेली आकाशांत मारितां जे ॥ ४ ॥
तुझिया मानसीं अशंका येईल । होते रक्षपाळ माझे तेथें ॥ ५ ॥
ईश्वराची माव नकळे कोणाला । कळलें मजला त्यांच्या कृपें ॥ ६ ॥
घेवोनियां शस्त्र उठला त्वरित । करितों मी घात वसुदेवाचा ॥ ७ ॥
तयेवेळीं म्हणे ब्रह्मयाचा सुत । ऐक तुज मात सांगतों मी ॥ ८ ॥[2]
[3]शत्रू वधी आधीं मग मारी यासी । आहे तुजपासीं कारागृहीं ॥ ९ ॥
सांगोनियां ऐसें शांतविलें त्यासी । गेला गोकुळासी नामा म्हणे ॥ १० ॥

[१७९]

गोकुळा येवोनी भेटे नंदादिकां । वैकुंठनायका सांगतसे ॥ १ ॥
कंसानें मांडिला अधर्म बहुत । मारावें त्वरित तयालागीं ॥ २ ॥
लावोनियां आग आपण विझविली । तेचि परी केली नारदानें ॥ ३ ॥
सांगोनियां ऐसें विणा सांवरोन । निघाला तेथून नामा म्हणे ॥ ४ ॥

[१८०]

कंसें पाठविला केशी । मारावया कृष्णासी ॥ १ ॥
बहु असे तो प्रतापी । आला अश्वाचिये रूपीं ॥ २ ॥
डसावया धाविन्नला । पायीं धरोनि झोकिला ॥ ३ ॥
मुखीं देऊनियां हात । श्वास कोंडी जगन्नाथ ॥ ४ ॥
नामा म्हणे पडलें प्रेत । हर्ष सुरवरां बहुत ॥ ५ ॥

---

अभंग १७८—(पं.) व (धु.), १७९—(आ.), १८०—(धु.)
१ राहिला (धु.) २ हा चरण काही (धु.) व (पं.) प्रतींत मिळत नाही.
३ आधीं मारि पुत्र तुझा जो का वैरी। असे तुझ्या घरीं मग त्यासी ॥ (पं. व. धु.)

[१८१]

शेळया मेंढियांचा खेळ । आतां खेळूं रे सकळ ॥ १ ॥
कोणी मेंढया होती । कोणी चोर म्हणताती ॥ २ ॥
म्हणती रात्र जाली । आतां जावें वनमाळी ॥ ३ ॥
कोणी श्वान होती । चोरा डसाया धांवती ॥ ४ ॥
तेथें व्योमासुर येत । गोपाळांचा वेष धरीत ॥ ५ ॥
करोनियां चोरी । नेऊन ठेवी पर्वत-दरी ॥ ६ ॥
हें तो देवासि कळलें । नामा म्हणे संहारिलें ॥ ७ ॥

[१८२]

कंस दुराचारी करोनि विचार । धाडिला अक्रूर गोकुळासी ॥ १ ॥
अक्रूरा आनंद जाला असे फार । पाहीन श्रीधर [1]डोळे भरी ॥ २ ॥
आजि होईल माझ्या जन्माचें सार्थक । वैकुंठनायक पाहीन मी ॥ ३ ॥[2]
काग सव्य येती वाम जाती मृग । पाहीन श्रीरंग स्वामी माझा ॥ ४ ॥
शुभ हे शकुन मार्गानें होताती । पाहीन भूपती [3]त्रैलोक्याचा ॥ ५ ॥
येथुनियां माझी सरली येरझार । कंसानें उपकार केला मोठा ॥ ६ ॥
अजी माझे पितर उद्धरती सकळ । पाहीन घननीळ कृपासिंधू ॥ ७ ॥
नामा म्हणे आला गोकुळा सन्निध । हृदयीं आनंद न समाये ॥ ८ ॥

[१८३]

चौदाजणी ज्याच्या चरणातें पूजिती । त्याची घेईन माती आपुल्या शिरीं ॥ १ ॥
एकांतीं अर्चन करिती धूर्जटी । त्यासी बोलेन गोष्टी आवडीच्या ॥ २ ॥
सप्तऋषि ज्याचे वर्णिताती गुण । करितसे ध्यान ब्रह्मा त्याचें ॥ ३ ॥
चारी वेद ज्याची वर्णितात कीर्ति । करिताती स्तुती साही जणें ॥ ४ ॥
तेहतीस कोटि देव जयातें पूजिती । श्रुति वर्णिताती गुण ज्याचे ॥ ५ ॥
लक्ष्मीचा पति ध्याती सनकादिक । पाहीन श्रीमुख एक वेळां ॥ ६ ॥

अभंग १८१--(धु.), १८२ व १८३--(पं.) व (धु.)
१ स्वामी माझा (धु.)　२ हा चरण (धु.) मध्ये नाही.　३ वैकुंठींचा (आ.)

अनुक्रमणिका

पृथ्वीचा हा भार करावया दूर । म्हणोनि अवतार घेतलासे ॥ ७ ॥
नामा म्हणे आला यमुनेजवळी । उतरला खालीं रथाचिया ॥ ८ ॥

[१८४]

धन्य ही यमुना धन्य हें गोकुळ । वृक्षादि सकळ धन्य धन्य ॥ १ ॥
धन्य ह्या गोपिका धन्य हे गोपाळ । पक्षादि सकळ धन्य धन्य ॥ २ ॥
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन । नंदाचा नंदन क्रीडतसे ॥ ३ ॥
धन्य ती यशोदा धन्य तिचा पति । अखंड पाहाती मुख ज्याचें ॥ ४ ॥
गायी घेवोनियां देव गेला रानां । वज्रांकुश चिन्हां उमटलीं ॥ ५ ॥
नेत्रीं अश्रुपात उतरे रथाखालीं । गडबडा लोळे चरणावरी ॥ ६ ॥
ब्रह्मादिकां सर्वां दुर्लभ हे माती । घेवोनियां हातीं मुखीं घाली ॥ ७ ॥
नामा म्हणे पुढें चांलिला त्वरित । देखे गाडियांत परब्रह्म ॥ ८ ॥

[१८५]

तनु हें आकाश चंद्रमा तें मुख । ऐसें निष्कलंक परीक्षिती ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र त्याहुनी अधिक । शोभत श्रीमुख कृष्णजींचें ॥ २ ॥
भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा । खेळत सांवळा जगद्गुरू ॥ ३ ॥
वैजयंति माळा किरीट कुंडलें । अक्रूरें देखिले दोघेजण ॥ ४ ॥
जोडोनियां हात घाली नमस्कार । वाहातसे नीर क्षणोक्षणीं ॥ ५ ॥
नामा म्हणे त्वरें धांवे हृषिकेशी । धरीत पोटाशीं अक्रुरातें ॥ ६ ॥

[१८६]

भेट देई मज म्हणे बळिराम । न वर्णवे [1]प्रेम अक्रुराचें ॥ १ ॥
पेंद्यासी पुसती अवघे गडी तेव्हां । कोण रे हा बाबा आला येथें ॥ २ ॥
आपुल्या कान्होबाच्या पाया कां पडतो । काय हा मागतो सांग आम्हां ॥ ३ ॥
अक्रूर बळिराम घरीं आले गोपाळ । नंदादि सकळ [2]भेटविले ॥ ४ ॥
मधुपर्कविधि करिती पूजन । म्हणे धन्य दिन आजिचा हा ॥ ५ ॥

अभंग १८४ ते १८६—(प.) व (धु.)
१ प्रेमा अक्रुराचा (धु.) २ भेटियेले (आ.)

[1]अक्रुरासह पंक्ति सारिलें भोजन । पुसे वर्तमान मग त्यासी ॥ ६ ॥
भक्त माझें दैवत जगा दावी मात । कृपाळु वहुत नामा म्हणे ॥ ७ ॥

[१८७]

प्रातःकाळीं मात जाली गोकुळांत । जातो भगवंत मथुरेसी ॥ १ ॥
गौळणींचा मेळा मिळाला सकळ । पिटिती कपाळ आपुल्या हातें ॥ २ ॥
एकी त्या घालीती केसामध्यें माती । एक त्यां लोळती भूमीवरी ॥ ३ ॥
कोणी रथापुढें जाऊनि पडती । आक्रोशें रडती सकळिक ॥ ४ ॥
आम्हां सोडूनियां तूं रे कैसा जाशी । तुजविण पीशीं आम्ही सर्व ॥ ५ ॥
अक्रूरा आम्ही सर्व पसरितों पदर । नेऊं नको श्रीधर मथुरेसी ॥ ६ ॥
अक्रूर नसे वाई असे क्रूर मोठा । नामीं निरंतर क्रिया वसे ॥ ७ ॥
नामा म्हणे शोक न वर्णवे आतां । जाला तो हांकिता रथ त्वरें ॥ ८ ॥

[१८८]

ब्रह्मनिष्ठ तेव्हां स्थिरावला चित्तीं । अक्रुराचे गळती दोन्ही नेत्र ॥ १ ॥
दहीं दूध तूपें भरिल्या कावडी । चालती तांतडी सकळिक ॥ २ ॥
चितेनें व्यापिलें अक्रुराचें मन । काय वर्तमान होईल नेणों ॥ ३ ॥
नरनारी शोक करिती सकळ । दुराचारी खळ कंस आहे ॥ ४ ॥
मार्गीं स्नानालागीं उतरला अक्रूर । रथावरी किशोर नंदजीचे ॥ ५ ॥
[2]दावोनि कौतुक निरसी त्याचा धाक । सांगतसे शुक परीक्षिती ॥ ६ ॥
जुंपुनिया घोडी चालिला सत्वर । लोपे दिनकर नामा म्हणे ॥ ७ ॥

[१८९]

जोडोनियां करां विनवी विश्वंभरा । चलावें मंदिरा सकळिकीं ॥ १ ॥
आम्हांवरी कृपा करी कृष्णनाथा । ठेवितसे माथा पायांवरी ॥ २ ॥

अभंग १८७ ते १८९—(पं.) व (धु.)
१ अक्रुरासि आधी घालीत भोजन । (पं.), अक्रुरा बरोबरी करिती भोजन । (आ.)
२ सोडोनिया घोडी चालिला तातडी । दिली असे बुडी जळामध्ये ॥ (आ.) प्रतींतील हा चरण गाळला आहे.

मारूनिया कंस येईन तुझ्या घरां । आग्रह अक्रूरा करूं नको ॥ ३ ॥
सकळ समुदाय मथुरेचें वनीं । सहित चक्रपाणि म्हणे नामा ॥ ४ ॥

[१९०]

प्रातःकाळीं गडी उठे कृष्णराम । पाहावया ग्राम चालियेला ॥ १ ॥
मागती रजका देईना तो वस्त्रें । वधी नख शस्त्रें पापियासी ॥ २ ॥
तीठाईं वांकडी नीट केली तिसी । तिनें चंदनासी लावियेलें ॥ ३ ॥
जोडोनियां हात विनवी सुदामा । चला मेघःशामा घरा माझ्या ॥ ४ ॥
वस्त्रें देती तेव्हां मथुरेचे लोक । नरनारी मुख पाहाताती ॥ ५ ॥
मोडितां धनुष्य येती रक्षपाळ । नामा म्हणे खळ वधियेले ॥ ६ ॥

[१९१]

इच्छामात्रें मोडी ब्रह्मांडांच्या कोटी । चालिला जगजेठी कंसद्वारा ॥ १ ॥
मदोन्मत्त हत्ती देखोनियां हांसे । पितांबर गोसे खोवियेला ॥ २ ॥
सांवरोनियां हात केंसां देत गांठ । खोवितसे नीट वैजयंती ॥ ३ ॥
खंब ठाकोनियां राहे पुढें उभा । सांवळी ही प्रभा अंगकांती ॥ ४ ॥
पाहोनियां शुक जाला समाधिस्थ । ऋषि मुनी समस्त वेडावले ॥ ५ ॥
तेव्हां धांवे हत्ती घाली अंगावरी । क्षणार्धेंची मारी गजालागीं ॥ ६ ॥
उपडोनि दांत घेतसे श्रीधर । जाहला उद्धार कुवलयाचा ॥ ७ ॥
नामा म्हणे पुढें चालिला गोविंद । परीक्षिती सावध शुक बोले ॥ ८ ॥

[१९२]

चौदा भुवनें वसे जयाचिये पोटीं । त्यासी आणी जेठी मारावया ॥ १ ॥
इंद्रादि सुरवर जयाचे किंकर । त्यासी आणि पामर झोंबिसाठीं ॥ २ ॥
अतुर्बळी तेव्हां दिसे नारायण । जळतसे मन वैरियाचें ॥ ३ ॥
कंसाचे अंगणीं उभा असे देव । जैसा ज्याचा भाव तैसा भासे ॥ ४ ॥
कृष्णातें देखोनी वल्गना करिती । चोळिताती माती दंडालागीं ॥ ५ ॥

---

अभंग १९० ते १९२—(पं.) व (धु.)

अनुक्रमणिका

बळिभद्रा खुण दावियेली तेव्हां । उशीर न लावावा माराया ॥ ६ ॥
नामा म्हणे एक उरला असे कंस । वधिती सकळांस दोघेजण ॥ ७ ॥[1]

[१९३]

रमेचा वल्लभ देखियेला कंसें । धरोनी आवेशें बैसलासे ॥ १ ॥
त्वरें धांवोनियां धरियेला केशीं । पाडिला भूमिसी दुष्टबुद्धि ॥ २ ॥
वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण । सोडियेला प्राण कंसें तेव्हां ॥ ३ ॥
देव वर्षताती सुमनांचे भार । भक्त जयजयकार गर्जताती ॥ ४ ॥
गाऱ्हाणीं सांगती ऋषिमुनी सर्व । गाताती गंधर्व सप्तस्वरें ॥ ५ ॥
नामा म्हणे पुढें अप्सरा नाचती । वर्णिताती कीर्ती वेद ज्याची ॥ ६ ॥

[१९४]

राज्यीं स्थापियेला उग्रसेन तेव्हां । देवकीवसुदेवा सोडविलें ॥ १ ॥
देवकीच्या स्तनीं फुटलासे पान्हा । वसुदेव रूदना करितसे ॥ २ ॥
वसुदेवें केलें त्याचें समाधान । भायी दिल्या दान ब्राह्मणांसी ॥ ३ ॥
समस्तांची क्रिया करी उग्रसेन । जालासे दिवाण देव त्याचा ॥ ४ ॥
पळोनियां गेले होते जे यादव । आणियेले सर्व रामकृष्णें ॥ ५ ॥
आनंद न समावे सकळिकां लोकांला । मथूरेंत राहिला नामा म्हणे ॥ ६ ॥

[१९५]

नंदालागीं तेव्हां म्हणे चक्रपाणि । जावें सकळांनीं गोकुळासी ॥ १ ॥
अहर्निशीं माझें करावें चिंतना । दुःख सांडी मना नंदराया ॥ २ ॥
ऐसें ऐकोनियां निराश वचन । जाई माझा प्राण तुजविण ॥ ३ ॥
गडी म्हणती देवा आम्हांसी टाकिलें । काय अमुचें सरलें पुण्य देवा ॥ ४ ॥
कोणासवें आम्हीं खेळूं यमुनेंत । रक्षिल आम्हांतें कोण आतां ॥ ५ ॥
ब्रह्मादिक तुझ्या [2]वंदिताती पायां । दिल्या आम्ही शिव्या क्षमा करीं ॥ ६ ॥

---

अभंग १९३ ते १९५—(पं.) व (धु.)
१ संहारिले जेठी कंस भयाभीत । आता माझा अंत करील हा ॥ हा चरण (धु.) मध्ये अधिक आहे. २ वर्णिताती (पं.)

यशोदेसी सांगा माझा नमस्कार । देईन सत्वर भेटी तुम्हां ॥ ७ ॥

[1]कंठ सद्‌गदित नेत्रीं अश्रुपात । निघती समस्त नामा म्हणे ॥ ८ ॥

[१९६]

चारी वेदा ज्याचा नयेचि उमज । करितसे मुंज वसुदेव ॥ १ ॥

कर्दळीचे स्तंभें वाडे शृंगारिले । गर्गासी धाडिलें आणावया ॥ २ ॥

यशोदेसी पत्रिका लिहिल्या वसुदेवें । मुंजीसाठीं यावें कृष्णजीच्या ॥ ३ ॥

मथुरेचे लोक आणिती आहेर । होतसे गजर वाजंत्र्यांचा ॥ ४ ॥

उग्रसेनें तेव्हां फोडिलें भांडार । द्विजांसी अपार द्रव्य दिलें ॥ ५ ॥[2]

विष्णुदासनामा वांटितो सुपारी । जाले ब्रह्मचारी रामकृष्ण ॥ ६ ॥

[१९७]

घालितसे पंथ तरावया जनां । गेले सांदीपना घरीं दोघे ॥ १ ॥

गुरुसेवा करिती [3]वंदिती चरण । जाहली संपूर्ण विद्या तेव्हां ॥ २ ॥

जोडोनियां हात करिती प्रार्थना । मागावी दक्षिणा गुरुराया ॥ ३ ॥

नामा म्हणे द्विज पुसत स्त्रियेसी । मागे जें मानसीं इच्छा तुज ॥ ४ ॥

[१९८]

समुद्रांत पुत्र बुडाला रे माझा । पराक्रम तुझा ठावा असे ॥ १ ॥[4]

अवश्य म्हणोनी तेथोनि निघाले । समुद्रांत आले रामकृष्ण ॥ २ ॥

करोनियां पूजा पुसे वर्तमान । देईं रे आणून गुरुपुत्र ॥ ३ ॥

पांचजन्य दैत्य [5]वळें येथें राहे । बंधू तेथें पाहे कृष्णनाथा ॥ ४ ॥

टाकोनियां उडी वधिलें तयासी । पाहे हृषिकेशी उदरांत ॥ ५ ॥

नाहीं ऐसें कळों आलें विश्वंभरा । घेवोनी शरीरा आला वरी ॥ ६ ॥

परीक्षिती काय न कळे तयाला । दावितसे लीला नामा म्हणे ॥ ७ ॥

---

अभंग १९६ ते १९८—(पं.) व (धु.)

१ नामा म्हणे देवा पुढील विचार । धरिला अवतार भक्तासाठीं ॥ (पं.)

२ चरण क्र. ५ हा (पं.) व (धु.) प्रतींत काही ठिकाणी सापडत नाही. ३ चुरिती (धु.)

४ हा चरण काही (धु.) मध्ये नाही. ५ येथे बळी (आ.)

अनुक्रमणिका

[१९९]

यमाचिया नगरीं दोघेजण गेले । शंखातें स्फुरिलें कृष्णनाथें ॥ १ ॥
ऐकोनियां नाद कांपतसे काळ । उठिले सकळ पाहावया ॥ २ ॥
जोडोनियां हात आणी अधोक्षजा । करोनियां पूजा पुसतसे ॥ ३ ॥
सांदीपन पुत्र आहे तुजपाशीं । आणी रे तयासी शीघ्र आतां ॥ ४ ॥
तुमचा मी किंकर निरोप मज द्यावा । रामा वासुदेवा पुसतसे ॥ ५ ॥
घेवोनियां पुत्र तेथोनी चालिले । नामा म्हणे आले गुरूगृहीं ॥ ६ ॥

[२००]

काढीतसे दृष्टी सांदीपनपत्नी । न वर्णवे वाणी हर्ष तिचा ॥ १ ॥
असे कांहीं इच्छा मागावें आणिक । दिलें हें बाळक म्हणती दोघे ॥ २ ॥
अर्हनिशीं तुम्हां असावें कल्याण । आले रामकृष्ण मथुरेसी ॥ ३ ॥
कृतांतासी धाक नामा म्हणे ज्याचा । आहें मी तयाचा शरणांगत ॥ ४ ॥

[२०१]

युगांबरोबरी जाताती घटिका । गोकुळींच्या लोकां तैसें जालें ॥ १ ॥
उदास दिसती वनें दाही दिशा । काय रे जगदीशा [1]आम्हां केलें ॥ २ ॥
रोडावल्या गायी करिताती खंती । वत्स न करिती स्तनपान ॥ ३ ॥
अन्नपाणी तेव्हां वर्जिती गौळणी । आतां चक्रपाणि कैचा आम्हां ॥ ४ ॥
यमुनेचे तीरीं वृक्ष ते सुकले । पाषाण [2]उलले तया दुःखें ॥ ५ ॥
प्रातःकाळीं गडी अवघेचि बोलती । मारूनि श्रीपती गेला नाहीं ॥ ६ ॥[3]
जीवनाविण मत्स्य जैसे तळमळती । नामा म्हणे चित्तीं धन्य प्रेमा ॥ ७ ॥

[२०२]

अंतर्यामीं जाणे सर्वांचा जो साक्षी । रडताती पक्षी मजसाठीं ॥ १ ॥
पाहूनियां प्रेमा भुलला गोविंद । रडतसे मंद मंद तेव्हां ॥ २ ॥

अभंग १९९—(पं.) व (धु.), २०० व २०१—(धु.), २०२—(आ.)

१ केले आम्ही (धु.) २ फुटले (धु.) ३ हा चरण (धु.) मध्ये नाही. त्याऐवजी अंतर्यामी जाणे सर्वांचा जो साक्षी। रडताती पक्षी मजसाठीं ॥ हा चरण अधिक आहे.

अनुक्रमणिका

उच्चारितां नामें तरताती पापी । न विसरती गोष्टी कांहीं केल्या ॥ ३ ॥
विश्वाचा जो आत्मा शोक तया नाहीं । भुललासे तोहि भक्तिप्रेमें ॥ ४ ॥
चिंतेनें व्यापिला तेव्हां हृषिकेशी । पाठवूं कोणासी गोकुळांत ॥ ५ ॥
तयेवेळीं पुढें देखिलें उद्धवा । बाहातसे तेव्हां तयालागीं ॥ ६ ॥
नामा म्हणे आतां करील एकांत । सावधान चित्त अवधारा ॥ ७ ॥

[ २०३ ]

शुकादिक ज्याची वर्णिताती कीर्ति । तो ये काकुळती उद्धवासी ॥ १ ॥
दयेचा सागर बोले तये वेळां । मजलागीं गोकुळा तुवां जावें ॥ २ ॥
मजवरी त्यांनीं ठेवियेला प्राण । संसाराचें भान नाहीं कोणा ॥ ३ ॥
यशोदा आणि नंद जालेती तटस्थ । गडी माझे समस्त पिसे जाले ॥ ४ ॥
गाई मजविण न घेती त्या तृण । वाळें स्तन पान विसरलीं ॥ ५ ॥
चालतांना पंथ चुकती नारीनर । पक्षांनीं आहार सांडियेला ॥ ६ ॥[1]
शाहाणा चतुर आहेसी नेटका । बोधाव्या गोपिका ब्रह्मज्ञानें ॥ ७ ॥
नामा म्हणे ठेवी चरणावरी माथा । जुंपुनियां रथा निघतसे ॥ ८ ॥

[ २०४ ]

सारथ्यासी सांगे हांकी रहंवर । पाहियेलें तीर यमुनेचें ॥ १ ॥
उभा राहोनियां पाहे चहूंकडे । बोलताती कोडें पक्षीराज ॥ २ ॥
व्याघ्र आणि गायी एकत्र बैसती । कोकिळा बोलती कृष्ण कृष्ण ॥ ३ ॥
सर्प आणि नकुल निस्तेज पडती । चिमण्या बोलती कृष्ण कृष्ण ॥ ४ ॥
वियोगानें तेव्हां मयूरें रडती । [2]शोकें बोलताती कृष्ण कृष्ण ॥ ५ ॥
कृष्णाच्या कृपेनें कळलें उद्धवासी । धन्य धन्य त्यांसी म्हणे तेव्हां ॥ ६ ॥
[3]ब्रह्मज्ञान सांगो देवें पाठविला । तो रडूं लागला तये वेळीं ॥ ७ ॥
नामा म्हणे आला नंदाचिया घरा । पुढील अवधारा निरूपण ॥ ८ ॥

[ २०५ ]

धांवोनियां नंदें धरिले चरण । घालूनि आसन बैसविला ॥ १ ॥[4]
सुकुमार सांवळा राजीवलोचन । सुखी आहे कृष्ण मथुरेंत ॥ २ ॥

अभंग २०३ व २०४—(पं.) व (धु.), २०५—(आ.)

१ हा चरण (पं.) मध्ये नाही. २ शुक (धु. व आ.) ३ बोधाया धाडिले (धु.) ४ चरण १ ते ६ काही (धु.) मध्ये नाहीत.

रोहिणीचा पुत्र सुखी [1]आहे राम । स्मरे पुरुषोत्तम कधीं आम्हां ॥ ३ ॥
गोकुळांत गौळी आहे एक नंद । आठवी गोविंद कधीं तरी ॥ ४ ॥
काय माझें पुण्य उद्धवा सरलें । [2]म्हणोनि [3]टाकिलें कृष्णनाथें ॥ ५ ॥
परब्रह्म पूर्ण धाडीं मी वनासी । म्हणोनि [4]हृषिकेशी कोपलासे ॥ ६ ॥
मेघःश्याम मूर्ति सुकुमार सांवळे । न देखती डोळे आतां माझे ॥ ७ ॥
उठा नंदा जेवा कोण म्हणे आतां । दुःख माझ्या चित्ता फार वाटे ॥ ८ ॥
सद्गदित कंठ नेत्रीं आश्रुपात । पडे तो मूर्च्छित नामा म्हणे ॥ ९ ॥

[२०६]

[5]पाहियेलें तेव्हां यशोदेचि भ्रांती । ऐके परीक्षिती प्रेम तिचें ॥ १ ॥
खोडी नको करूं म्हणे दटाविलें । म्हणोनि रुसलें तान्हें माझें ॥ २ ॥
नंदा लागीं म्हणे पाहूं कोठें कृष्णा । दाटलासे पान्हा स्तनीं माझ्या ॥ ३ ॥
उद्धव चित्तांत करीतसे खेद । यशोदे सावध होई माते ॥ ४ ॥
दुष्ट मी पापीण बांधी उखळासी । म्हणोनि रुसलासी देवराया ॥ ५ ॥
माती खातां वेळे तुज म्यां मारिलें । म्हणोनि टाकिलें मजलागीं ॥ ६ ॥[6]
नामा म्हणे त्यांचें करी समाधान । सांगे ब्रह्मज्ञान दोघांजणां ॥ ७ ॥

[२०७]

प्रातःकाळीं उद्धव स्नानासी चालिला । मिळालासे मेळा गोपिकांचा ॥ १ ॥
परस्परें म्हणती [7]कोण आतां आला । न्यावया नंदाला पाठविलें ॥ २ ॥
सकळांच्या प्राणा घेऊनियां येई । म्हणोनियां पाही धाडी यांसी ॥ ३ ॥
धांवून उद्धवाचे धरिती चरण । आमुचें स्मरण करितसे ॥ ४ ॥[8]
स्वरूपहीन आम्ही सुंदर कंसदासी । म्हणोनि तुजसी पुसतसों ॥ ५ ॥

अभंग २०६—(पं.), (धु.), (बा.) व (आ.), २०७—(पं.) व (धु.)
१ बळी (धु.) २ 'मजलागीं' हा शब्द अधिक. (धु.) ३ त्यागिले (धु.) ४ कृष्णनाथ (धु.) ५ पाडियेली जेव्हां यशोदेशी भ्रांती (आ.), पडियेली (बा.) ६ हा चरण (धु.) मध्ये नाहीं. ७ बा हा (पं.) ८ भ्रमरासीं स्त्रिया कुशब्दें ताडिती । आवडीनें बोलती नाना शब्द ॥ ४ ॥ (आ.) हा चरण काही प्रतींत सापडत नाहीं. तसेच चरण क्र. ४ व ५ हेही काही प्रतींत सापडत नाहींत.

अनुक्रमणिका

आम्हांसाठीं तेथें जाऊनियां म्हण । एकदां चरण दावी [1]सर्वां ॥ ६ ॥
मेल्या त्या गोपिका त्यांची राख जाली । वाजवी मुरली तया ठायां ॥ ७ ॥
नामा म्हणे त्यांसी सांगे ब्रह्मज्ञान । श्रीकृष्ण कृपेनें स्थिरावल्या ॥ ८ ॥

[ २०८ ]

समस्तांचें त्यानें केलें समाधान । सारिलें भोजन सकळिकीं ॥ १ ॥
यशोदा आणि नंद देती अलंकार । कृपा दीनावर असों द्यावी ॥ २ ॥
गोपाळ गौळिणी पुसत उद्धवा । मिळोनियां सर्व बोळविती ॥ ३ ॥[2]
पक्षी श्वापदांसी सांगत उद्धव । असों द्यावा भाव कृष्णापायीं ॥ ४ ॥
आला मथुरेसी सांगे वर्तमान । नामा म्हणे धन्य श्रोते वक्ते ॥ ५ ॥

[ २०९ ]

अक्रुराच्या घरां आले रामकृष्ण । संतोषले मन फार त्यांचें ॥ १ ॥
घालोनि आसन प्रक्षाळी चरण । म्हणे धन्य दिन अजींचा हा ॥ २ ॥
जोडोनियां हात घाली नमस्कार । जाहला उद्धार पूर्वजांचा ॥ ३ ॥
हस्तनापुरासी अक्रूरा त्वां जावें । सांगितलें देवें नामा म्हणे ॥ ४ ॥

[ २१० ]

अवश्य म्हणोनि चालिला अक्रूर । पाहियेलें पूर कौरवांचें ॥ १ ॥
धृतराष्ट्रा सांगे विवेकाच्या गोष्टी । फार तुझ्या पोटीं दुष्टबुद्धि ॥ २ ॥
बंधूचिया पुत्रा धरितोसी दूर । होसी लोभापार पुत्रावरी ॥ ३ ॥
धरितोसि द्वेष पंडुच्या पुत्रांचा । होशील नरकाचा अधिकारी ॥ ४ ॥
स्वर्गींचे पूर्वज हांसतील तुज । धरावा उमज येथोनियां ॥ ५ ॥
सांगोनियां ऐसें तेथोन उठला । कुंतीसी भेटला नामा म्हणे ॥ ६ ॥

[ २११ ]

देवकी रोहिणी बळीराम वसुदेव । सखे सुखीं सर्व आहेत कीं ॥ १ ॥
पाहोनियां तुज जालें समाधान । सुखी आहे कृष्ण मथुरेंत ॥ २ ॥

---

अभंग २०८ ते २११—(पं.) व (धु.)
१ डोळां (धु.), सख्या (धु.)   २ चरण ३, ४ व ५ हे (धु.) प्रतीत नाहीत.

आमुची एक कुंती आहे हस्तिनापुरीं । स्मरतो अंतरीं किंवा नाहीं ॥ ३ ॥
बहुतां दिवसां धाडिलें अक्रूरा । म्हणोनि अंतरा सुख वाटे ॥ ४ ॥
माझिया बाळासी फार देती दुःख । नाहीं मज सुख क्षणभरी ॥ ५ ॥
राजा पंडू आम्हां टाकुनियां गेला । रक्षीं या बाळाला कोण आतां ॥ ६ ॥
नामा म्हणे ऐसें सांगतसे कुंती । शिंपियेली क्षिती अश्रुपातें ॥ ७ ॥

[ २१२ ]

निरोप हा माझा सांगारे कृष्णाला । भरंवसा मजला आहे तुझा ॥ १ ॥
अच्युता अनंता श्रीधरा वामना । अगा नारायणा शरण तुज ॥ २ ॥
जनार्दना हरी त्रिविक्रमा केशवा । अगा वासुदेवा शरण तुज ॥ ३ ॥
गोविंदा माधवा हरी मेघःशामा । अगा पुरुषोत्तमा शरण तुज ॥ ४ ॥
चक्रपाणि अगा वैकुंठनायका । रक्षी या बालका दासा तुझ्या ॥ ५ ॥
त्रिविधतापें माझी जळतसे काया । दावीं मज पायां एक वेळां ॥ ६ ॥
विदूर अक्रूर करिती समाधान । करावें श्रवण नामा म्हणे ॥ ७ ॥

[ २१३ ]

परब्रह्म पूर्ण तुझा आहे सखा । मानिसी कां दुःखा जननीये ॥ १ ॥
इंद्राचा अवतार आहे हा अर्जुन । घेईल गे प्राण कौरवांचा ॥ २ ॥
करील गे युद्ध धरोनियां धीर । न देखे मी वीर त्रैलोक्यांत ॥ ३ ॥
सांगुनियां ऐसें पुसोनि सर्वांसी । आला मथुरेसी नामा म्हणे ॥ ४ ॥

अभंग २१२ व २१३—(पं.) व (धु.)

• • •

अनुक्रमणिका

[२१४]

कृष्णराम लीला सवें त्या गोपाळां । जन्मासी सांवळा कैसा आला ॥ १ ॥
विस्तार बोलाया बैस तूं अंतरा । करीं तूं पामरा कृपादान ॥ २ ॥
म्हणोनि विनवी पायां पें निगुती । ऐकावें श्रीपती नामा म्हणे ॥ ३ ॥

[२१५]

भूमि भार जाला चालली उदकांत । धरूनियां रूप गाईचें हो ॥ १ ॥
विधीपाशीं गेली रडूं ते लागली । समग्र वहिली कथा सांगे ॥ २ ॥
नको भिऊं म्हणोनि आश्वासिलें विधीनें । सवें तीस घेऊनी गेला ठायां ॥ ३ ॥
नामा म्हणे तेंचि आधार सर्वांसी । रूप नाम त्यासी कांहीं नाहीं ॥ ४ ॥

[२१६]

देव क्षीराब्धीसी आले हो सकळ । होवोनि निश्चळ मनामाजीं ॥ १ ॥
प्राणायाम मुद्रा लावुनि अंतरीं । इंद्रादि श्रीहरि चिंतूनियां ॥ २ ॥
विराट जें पाही संस्कृतें वर्णिलें । तेंचि चितियेलें नामा म्हणे ॥ ३ ॥

[२१७]

अकस्मात तेथें उठली ते वाणी । नका भिऊं म्हणोनि मेघरूपा ॥ १ ॥
ऐकतांची कानीं हरुषल्या मनीं । देवाचियां श्रेणी नामा म्हणे ॥ २ ॥

[२१८]

गौळियाचे घरीं रहिवास गोकुळीं । तेथें तुम्ही सकळीं वास कीजे ॥ १ ॥
वसुदेव देवकीं उदरीं जन्मेन । कंस भयें राहीन गोकुळीं हो ॥ २ ॥
तेथें आहे काज कळेल सकळां । आनंद सोहळा पुरवीन ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें देव बोलियेले । आपण ते गेले निजधामा ॥ ४ ॥

[२१९]

तयेकाळीं देव गोकुळीं भरले । अगोचर जालें रूप ठायीं ॥ १ ॥
सकळ संपत्ति भरूनि उरल्या । दिगंतरीं गेल्या विपत्ति त्या ॥ २ ॥
नामदेवा तेव्हां आनंद तो जाला । गोकुळीं भरला पांडुरंग ॥ ३ ॥

अभंग २१४ ते २१९--(आ.)



अनुक्रमणिका

[२२०]

शेषशायी हरी उठोनि लवकरी । म्हणे सख्या धरी मनुष्यरूप ॥ १ ॥
तुजविण मज न गमे घटिका । म्हणोनि नेटका रूप धरी ॥ २ ॥
देवकी उदरीं जाऊन रिघावें । अंतरीं बसावें रोहिणीच्या ॥ ३ ॥
तुझियेचें सेवें येतों मी माघारां । नामया दातारा कळों आलें ॥ ४ ॥

[२२१]

देवकी कवण वसुदेव कवण । सांगावी हे खूण [1]नागवळा ॥ १ ॥
ऐकोनि उत्तर देव मनीं पाही । बोलतो लवलाहीं चित्त देईं ॥ २ ॥
सुतपाप्रती ते अनुष्टानीं दोघे । करूनियां तपें वर मागे ॥ ३ ॥
तया दिला वर पुत्र मी होईन । यालागीं कारण आहे तेथें ॥ ४ ॥
तींचि दोघें जालीं वसुदेव देवकी । म्हणोनि यादवीं जन्म घेणें ॥ ५ ॥
तयाचा वृत्तांत आतां कोठें आहे । सांगेन लवलाहे नामा म्हणे ॥ ६ ॥

[२२२]

अवतरले हरी नंदाचे मंदिरीं । जाणोनियां सुरीं तोषिजेत ॥ १ ॥
आतां गेली सर्व आमुची ही चिंता । भूभार सर्वथा उतरील ॥ २ ॥
यज्ञ दान तप होतील अपार । आमुचा आहार आम्हालागीं ॥ ३ ॥
दुष्ट दुराचारी मातले राक्षस । यांचा करील नाश क्षणामाजीं ॥ ४ ॥
नीति न्याय धर्म वाढेल अपार । भाविकांसी पार उतरील ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐशा आनंदानें सुर । वर्षताती भार सुमनांचे ॥ ६ ॥

[२२३]

बरवें बरवें बाळ कोडीसवाणेरे । यशोदा म्हणे दृष्टी होईल बारे ॥ १ ॥
बरवी बरवी डोळस सांवळी । लोण उतरोनि हरीची पाऊलीं ॥ २ ॥
चंदन पाटोळा कांसे सोनसळा । विष्णुदास नामा चरणाजवळ ॥ ३ ॥

अभंग २२० (आ.), २२१—(बा.), २२२ व २२३—(पं.) व (शि.)
१ अंगवळा (बा.)

[२२४]
'डोलत डोलत टमकत चाले । गोजिरीं पाऊलें घालोनियां ॥ १ ॥
पायीं रुणझुण 'वाजताती वाळे । गोपी पाहतां डोळे मन निवे ॥ २ ॥
'सांवळे सगुण मानसमोहन । गोपीमनरंजन म्हणे नामा ॥ ३ ॥

[२२५]
कंसा हातीं विडा पाहे चहूंकडा । पूतना त्या पुढां काय बोले ॥ १ ॥
जाईन गोकुळा वधीन त्या बाळा । ऐसी त्या चांडाळा बोलतसे ॥ २ ॥
विष भरूनि स्तन निघाली पूतना । तीतें देखूनि कान्हा दूध मागे ॥ ३ ॥
येऊनि द्वारीं थोकली तव यशोदे देखिली । कृष्णा आली माऊली राहें उगा ॥ ४ ॥
तंव अधिकचि आळी करी वनमाळी । येरी म्हणे दे जवळी पाजीन दूध ॥ ५ ॥
पुतने वोसंगा दिधलासे कान्हा । घटाघटा पयपाना करीतसे ॥ ६ ॥
शोषियेलें विख न धायेची भूक । नामया स्वामी न राखे प्राण तिचा ॥ ७ ॥

[२२६]
वाढों लागे हरि नंदाचे मंदिरीं । नाना क्रीडा करी नित्य नवी ॥ १ ॥
देखोनियां चोज भुलल्या नरनारी । देहभावें वरी ओवाळिती ॥ २ ॥
'साजिरें गोजिरें दिसें नेत्रालागीं । म्हणोनि वोसंगीं सदा घेती ॥ ३ ॥
नाचे उडे बोले मंजुळ बोबडें । तेणें वेदा पडे मौन सदा ॥ ४ ॥
नीच नवी लीला दाखवी अपार । मन तेथें स्थिर 'लावियेले ॥ ५ ॥
नामा म्हणे गोप त्यासंगें रातले । प्रेमानें मातले एकसरें ॥ ६ ॥

[२२७]
एके काळीं मोठा आनंद दाटला । नभीं उगवला पूर्ण चंद्र ॥ १ ॥
तेव्हां गोप आले 'विनविती गोपाळा । आतां जाऊं चला चोरीलागीं ॥ २ ॥

अभंग २२४ ते २२६—(पं.) व (शि.), २२७—(आ.)
१ दोंदील दोंदील (आ.) २ रुणझुणती (आ.) ३ नामा म्हणे त्याची काये वर्णू थोरी । नंदाचिया घरीं बाळकृष्ण ॥ (पं. व शि.) ४ सांवळे (पं.) ५ लांचावले (आ.)
६ विनंती (पं.)

कोठें काय असे तें आम्हां ठाऊकें । जाऊं एकमेकें मिळोनियां ॥ ३ ॥
तुझिये संगतीं वाढतो आनंद । दाविसी विनोद ब्रह्मादिकां ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें गोपाळ बोलिले । ऐकोनियां जालें देवा गोड ॥ ५ ॥

[२२८]

देव सांगे तुम्ही सामोग्री हे करा । सांगेन प्रकारा जाणोनियां ॥ १ ॥
तेणें सर्व काज साधेल तुमचें । ठेविलें ठायींचें नवें पडे ॥ २ ॥
घ्यारे आतां बरी मृत्तिका गाळूनी । सराटे वेंचूनि वोटी भरा ॥ ३ ॥
डांगा एक आणा वेचुनियां खडे । निघावें रोकडें एकसरा ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें ऐकती गोपाळ । नाचती सकळ कृष्णापुढें ॥ ५ ॥

[२२९]

जेथें नाहीं कांहीं नामरूप गुण । बोलती निर्गुण तयालागीं ॥ १ ॥
तोचि गोकुळांत होऊनि 'गोपाळ । म्हणवितो बाळ यशोदेचा ॥ २ ॥
चिन्मय चिद्रूप अक्षय अपार । परेहूनि पर म्हणती ज्यातें ॥ ३ ॥
सर्वां भूतांचियां फुटकिया खोळे । भरले न गळे आत्मपणें ॥ ४ ॥
अद्भुत आनंद मातला अपार । वेदासही पार नाहीं ज्याचा ॥ ५ ॥
नामा म्हणे सर्व रूपीं जो रूपस । गोकुळीं विलास मांडियेला ॥ ६ ॥

[२३०]

आई मज म्हणशील अवगुणांचें । तरी मी काय करितों कोणाचें ।
जें जें होणार जयाचें । तें कां मजवरी घालिसी ॥ १ ॥
भट आलासे माभळ । तेणें वर्णिला जन्मकाळ ।
तो चुकला ग्रहमूळ । तेणें त्यांसीं पीडीलें ॥ २ ॥
माये तीच मावशी । तिनें मज घेतलें वोसंगाशीं ।
तिचे अंगीं होती विवशी । तिनें तिसी ग्रासिले ॥ ३ ॥
दहीं भात रत्न ताटीं । कालवुनि दिधली माझे हातीं ।
जेवितां तेथें कागाची झपेटी । तो म्यां थापें मारियला ॥ ४ ॥

अभंग २२८ व २२९—(पं.) व (शि.), २३०—(आ.)
१ गोवळ (आ.)

कैसी पाठविली रिठागांठी । ती घातली माझे कंठीं ।[1]
तेणें माझ्या गळां मिठी । मग म्यां दाढें रगडिली ॥ ५ ॥
खेळत होतो यमुनेतटीं । बक लागला माझे पाठीं ।
मग मी धरूनि चंचु उपटीं । भूमीवरी आहाटिला ॥ ६ ॥
आई म्यां तुझें काय केलें । त्वां मज उखळासी बांधिलें ।
रांगत रांगत अंगणीं आलों । तेणें वृक्ष उन्मळिले ॥ ७ ॥
ऐसा नाटकी हृषिकेशी । परब्रह्म दावी यशोदेशी ।
विष्णुदास नामा अहर्निशीं । हृदय कमळीं पहातसे ॥ ८ ॥

[२३१]

[2]मोरविसाचे कुंचे [3]ढळताती अपार । येताती कुमर यशोदेचे ॥ १ ॥
शिगें पावे मोहऱ्या वाजती कुसरी । हुंबरीं आखरीं गगनं गर्जे ॥ २ ॥
मोतियांचे घोस चांदवे झळकती । कनक दंड ढाळिती रामकृष्णा ॥ ३ ॥
गोरजें डौरला पितांबर भिजला । स्वेद जो दाटला मुख कमळीं ॥ ४ ॥
रूळती वनमाळा कंठीं गुंजाहार । तरू घोस अपार खोविले शिरीं ॥ ५ ॥
गजगती पाऊलें ठेविती भूमीवरी । धन्य ते संसारीं डोल देती ॥ ६ ॥
कुंकुम केशर रंगलें रातोत्पल । ध्वज वज्रांकुश कमळ ऊर्ध्व रेखा ॥ ७ ॥
विमानवत् आकाश जाहालें पैं सकळ । धन्य तें गोकुळ म्हणती देवा ॥ ८ ॥
देव पुष्प-वृष्टी करिती कृष्णावरी । अंबर जयजयकारी गर्जतसे ॥ ९ ॥
माडिया गोपुरीं पाहती सुंदरी । यशोदेचे करीं लिंबलोण ॥ १० ॥
ओंवाळिला नाम्या शिप्याचा दातार । रखुमादेवीवर श्रीविठ्ठला ॥ ११ ॥

[२३२]

खांद्यावरी पांवा कस्तुरीचा टिळा । चालत गोपाळ गाई मागें ॥ १ ॥
यमुने पाबळी गोपा पाचारीत । शिदोऱ्या शोभत पाठीवरी ॥ २ ॥
अङती पंक्ती करी त्या गोपाळांच्या । संगें गोविंद त्यांच्या अखंडित ॥ ३ ॥
नामा म्हणे बोनें विटों देऊं नका । वैकुंठनायका सांभाळावें ॥ ४ ॥

---

अभंग २३१—(पं.), (शि.), (धु.) व (भा.), २३२—(आ.)
१ हा चरण (धु.) प्रतीत नाही. २ मोरपिसा (आ.) ३ ढाळिती (शि.), ढळति (धु.)

[२३३]

श्रीमुख सुंदर वाटोळें । कैसें निलोत्पल सांवळें ॥ १ ॥
पैल पेंदा गडी धाकुटा । होय घोंगडें खांदा मोठा ॥ २ ॥
थिरूं वासुरें हाकारी । पुढें वाहती पावे मोहरी ॥ ३ ॥
हातीं घेऊनियां वेताटी । कैसा लागे वासुरा पाठीं ॥ ४ ॥
बाळगोपाळासहित मुरारी । खेळूं खेळे नानापरी ॥ ५ ॥
विष्णुदास नामयाचा दातारु । ब्रह्मादिकां त्याचा न कळे पारु ॥ ६ ॥

[२३४]

गोवळे म्हणती कांहो आम्हां भितो । ब्रह्माहि वंदितो पायधूळी ॥ १ ॥
गाई तृप्त करी कळंबाच्या तळीं । सोडिली शिदोरी दावितसे ॥ २ ॥
हमामा घालितां नव्हेती माघारे । नाहीं भीत पोरें येत संगें ॥ ३ ॥
नामा म्हणे काय भिऊनि राहिले । निवांतचि ठेले ब्रह्मादिक ॥ ४ ॥

[२३५]

हुंबरीचे मिषें हुतुतु खेळती । गडयांशीं श्रीपति सर्वकाळ ॥ १ ॥
कळंबाचे झाडाखालीं कुंकुमाचे सडे । [१]गोपाळा पवाडे दावितसे ॥ २ ॥
काय काय सोंग घेसी नानापरी । गोपिकांचे घरीं काम सारी ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसी अगाध जे कीर्ति । भोळ्या भक्तांप्रति दावीतसे ॥ ४ ॥

[२३६]

डोहामाजीं वास होता बहु दिवस । आतां कासावीस काय सांगूं ॥ १ ॥
विक्राळ होऊनि आला चक्रपाणि । कालिया निर्वाणीं ध्यान करी ॥ २ ॥
नको काढूं मज उदका बाहेरी । दंडवत करी कालिया तो ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसा काढिला विखारी । कीर्ति वानूं तरी किती देवा ॥ ४ ॥

अभंग २३३ ते २३६—(पं.) व (शि.)
१ गोपाळ (पं.)

अनुक्रमणिका

[२३७]

ब्रह्मादिकां पाहतां ठक पडियेलें । पहा हो कैवल्य गौळिया जोडलें ॥ १ ॥
कोण्या ॠणें या केला नकळे । परब्रह्म आमचें आहे सांवळें ॥ २ ॥
या गोकुळाचेनि पाडे पाहतां । सुख वैकुंठीं न दिसे सर्वथा ॥ ३ ॥
ऐसा अभिनव आनंदु जाणतो । गोकुळाचें तृण तरु तरी होतो ॥ ४ ॥
कामलोभ लावियेला येणें निवें । तेणें सुखें शुद्ध लागलीसें सवें ॥ ५ ॥
नामयाचा स्वामी हृदयींचा विसांवा । आपुलें सर्वस्व देऊनियां जोडावा ॥ ६ ॥

[२३८]

आकाश गडगडी विद्युल्लता तळपती । अनिवार मेघ सणसणां वरुषती ॥ १ ॥
राखियेलें येणें देवकीनंदनें । गोपाळ म्हणती आमुचें कान्हें ॥ २ ॥
गोवर्धनगिरी उचलोनी निज करीं । राखिलें यापरी नामा म्हणे ॥ ३ ॥

[२३९]

जन्म गेले याचे राखतां गाई । याचिया बोला विश्वास काई ॥ १ ॥
गोधनें राखितो आपण पेंढारा । तुझ्यानी मिळती पाणियाचा थारा ॥ २ ॥
हातीं डांगा खांदी कांबळा । तुझ्या गाई आम्ही राखों गोपाळा ॥ ३ ॥
आठ कोटी नव बहात्री गाई । गोधनें वसलीं आपुले ठायीं ॥ ४ ॥
धाली गोधनें बसली वाडां । संत पाहों आले तंव झोंपा उघडा ॥ ५ ॥
गोधनें चरती बाराही रानें । माझें मन तुझें वासरूं तान्हें ॥ ६ ॥
गोधनें चारितां कृष्ण सांगाती । विष्णुदास नामा देतुसे वळती ॥ ७ ॥

[२४०]

कृष्णातें चैतन्य गौळिया गोपाळा । जिवींचा जिव्हाळा कृष्ण एक ॥ १ ॥
न गमेचि तया कृष्ण संगाविणें । कृष्णचरणीं मन सर्वकाळ ॥ २ ॥
कृष्ण सुख जिवीं कोंदलें सर्वांसी । उभे कृष्णापाशीं मागेंपुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे कृष्ण भक्तांचें जीवन । कृष्णीं समाधान भक्तांलागीं ॥ ४ ॥

अभंग २३७ ते २३९—(पं.) व (शि.), २४०—(आ.)

अनुक्रमणिका

[२४१]

आणा उचित उचितें । भाणा भात [१]रायतें ॥ १ ॥
भात सारा भात सारा । हरिहरस्मरणीं ॥ २ ॥
गाई गोपाळापें हरी । आणा तरी शिदोऱ्या ॥ ३ ॥
नामा म्हणे काल्या मिसें । श्रीनिवास स्मरावा ॥ ४ ॥

[२४२]

गड्यांनो राजा कीरे जाला । कृष्ण सिंहासनीं बैसला ॥ १ ॥
पांवा मोहरी घोंगडी । आम्ही खेळूं यमुने थडीं ।
नाचूं पाउला देहुडी । कृष्ण आमुचा कीं रे गडी ॥ २ ॥[२]
खेळूं हुतूतू हुंबरी । थडक हाणो टिरीवरी ।
आतां चालिला दळभारी । आमचे यशोदेचा हरी ॥ ३ ॥
कुस्ती खेळतां कासविसी । शेंबुड खरकटें नाकासो ।
कडे घेऊं सावकासी । आतां बहु भितों यासी ॥ ४ ॥
आम्ही तुम्ही सर्वे जेऊं । गाई वळावया जाऊं ।
त्याचे मानेंत बुक्या देऊं । जवळी जावयास भिऊं ॥ ५ ॥
नामा म्हणे चला जाऊं । हात जोडोनी उभे राहूं ।
पायां पडून मागून घेऊं । जनीं वनीं तोचि कृष्णजी ध्याऊं ॥ ६ ॥

[२४३]

परब्रह्म निष्काम तो हा गौळियां घरीं ।
[३]वाक्यावाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी ॥ १ ॥
म्हणती गौळणी हरीचीं पाऊलें धरा ।
रांगत रांगत येतो हरी हा राजमंदिरा ॥ २ ॥
लपत छपत येतो हरी हा राजभुवनीं ।
नंदासी टाकूनि आपण बैसे सिंहासनीं ॥ ३ ॥
सांपडला देव्हारीं यासी [४]बांधी दाव्यांनीं ।
शंख चक्र गदा पद्म शारंगपाणी ॥ ४ ॥

---

अभंग २४१—(आ.), २४२—(पं.) व (शि.), २४३—(पं.) व (धु.)
१ आईतें (आ.) २ हा चरण (शि.) प्रतीत नाही. ३ वाक्या वाळे पायीं अंदु कृष्ण नवनीत चोरी । (धु.) ४ बांधा (धु.)

अनुक्रमणिका

बहुतां कष्टें बहुतां पुण्यें जोडिलें देवा ।
अनंत पवाडे तुमची न कळती मावा ॥ ५ ॥

नामा म्हणे केशवा अहो जी दातारा ।
जन्मोजन्मीं द्यावी तुमची चरण सेवा ॥ ६ ॥

[२४४]

यशोदे घराकडे चाल मला जेवूं घाल ॥ ध्रु० ॥
साध्या गव्हाची पोळी लाटीं । मला पुरणपोळी करून दे मोठी ।
नाहीं अडवीत गुळासाठीं । मला जेवूं घाल ॥ १ ॥
तूप लावून भाकर करीं । वांगें भाजून भरीत करीं ।
वर कांद्याची कोशिंबिरी । मला जेवूं घाल ॥ २ ॥
आई ग खडिसाखरेचे खडे । लवकर मला करून दे वडे ।
बाळ स्फुंदस्फुंदोनी रडे । मला जेवूं घाल ॥ ३ ॥
आई लहानच घे गे उंडा । लवकर भाजून दे मांडा ।
लांब गेल्या गाईंच्या झुंडा । मला जेवूं घाल ॥ ४ ॥
आई मी खाईन शिळघांटा । दह्याचा करून दे मट्ठा ।
नाहीं माझ्या अंगीं ताठा । मला जेवूं घाल ॥ ५ ॥
भाकर बरीच गोड जाली । भक्षुनी भूक हारपली ।
यशोदेनें कृपा केली । मला जेवूं घाल ॥ ६ ॥
आई मी तुझा एकुलता एक । गाई राखितों नऊ लाख
गाई राखून झिजलीं नखं । मला जेवूं घाल ॥ ७ ॥
नामा विनवी केशवासी । गाई राखितो वनासी ।
जाऊन सांगा यशोदेसी । मला जेऊं घाल ॥ ८ ॥

[२४५]

तळवे तळहात टेकीत । डाव्या गुडघ्यानें रांगत ।
रंगणीं रंगनाथ । तो म्यां देखिला सये ॥ १ ॥
गवळण जसवंती पैं सांगे । आली कृष्णाचेनि मागें ।
येणें येणें हो श्रीरंगें । नवनीत माझें भक्षिलें ॥ २ ॥

अभंग २४४—(आ.), २४५—(पं.), (धु.) व (शि.)

अनुक्रमणिका

एक्या हातीं लोण्याचा कवळु । मुख माखिलें अळुमाळु ।
चुंबन घेतां येतो परिमळु । नवनीताचा गे सये ॥ ३ ॥
येणें माझें कवाड उघडिलें । पुढती शिंकें हो तोडिलें ।
दह्यादुधातें भक्षिलें । उलंडिलें ताकातें ॥ ४ ॥
ऐसें जरी मी जाणतें । यमुना पाणिया नवजातें ।
वोढुनि उखळी बांधितें । शिक्षा लावितें गोविंदा ॥ ५ ॥
ऐसा पुराणप्रसिद्ध चोर । केशव नाम्याचा दातार ।
[1]पंढरपुरीं उभा विटेवर । भक्त पुंडलिकासाठीं ॥ ६ ॥

[ २४६ ]

गेलिया वृंदावना तेथें देखिला कान्हा ।
सवंगडियामाजीं उभा ध्यान लागलें मना ॥ १ ॥
हरिनाम गोड जालें काय सांगो गे माय ।
गोपाळ बाहती पावे मन कोठें न राहे ॥ २ ॥
त्याचें श्रीमुख साजिरें वो कुंडलें चित्त चोरें ।
सांडुनी अमृतधनीं लुब्धलीं चकोरें ॥ ३ ॥
सांडुनी ध्रुवमंडळ आली नक्षत्रमाळा ।
कौस्तुभा तळवटीं वैजयंती शोभे गळां ॥ ४ ॥
सांडुनी मेघराजु कटिसूत्रीं तळपे विजू ।
भुलला चतुराननु तया नव्हे उमजू ॥ ५ ॥
सांडुनी लक्ष्मी निज गोपाळासी बोले गुज ।
अचोज हा चोजवेना ब्रह्मादिकां सहज ॥ ६ ॥
वांजट धीट मोठी ऐसी कवण असे खिळू ।
भेदली हरिचरणीं पायीं मुरडीव वांकी सोज्वळू ॥ ७ ॥
त्याचे पायींचीं नेपुरें वाजती वो गंभीरें ।
लुब्धलीया पक्षयाती धेनु पाचारी स्वरें ॥ ८ ॥
आणिक एक नवल कैसें स्वर्गीं देव जाले पिसे ।
ब्रह्मादिक उच्छिष्टालागीं देखा जळीं जाले मासे ॥ ९ ॥

अभंग २४६—(पं.) व (शि.)
१ भावेंवीण नेघे प्रीति करूं । नवनीताचा गे सये ॥ (शि.)

अनुक्रमणिका

आणिक एक नवल परी करीं घेऊनि शिदोरी ।
सवंगड्या वांटितसे नामया स्वामी मुरारी ॥ १० ॥

[२४७]

हरिनाम गोड जालें काय सांगू गे माये ।
गोपाळ वाहताती वेणू आर्ते पाहे ॥ १ ॥
गेलें होतें वृंदावना तेथें भेटला कान्हा ।
गोपाळासी वेध माझा छंद लागला मना ॥ २ ॥
[1]आणिक एक नवल चोज गोपाळांसी सांगे गुज ।
आजळ जळीं चोजवेना पाहतां नेत्र ते अंबुज ॥ ३ ॥
आणि एक नवलपरि करीं धरिली सिदोरी ।
गोपाळांसी वाढीतसे नामयाचा स्वामी हरी ॥ ४ ॥

[२४८]

जाऊं पाण्या निसुरवाण्या । आळविती गोंड राण्या ॥ धृ० ॥
गोविंद गीतीं गाऊं गोविंद गीतीं गाऊं । आनंदें जाऊं पाण्या ॥ १ ॥
खाऊं कंदमुळें आम्ही असों वनीं । न देखों श्रीकृष्ण न ऐकों कानीं ॥ २ ॥
आम्ही गोंड भिल्लिणी काय ऐसी गोडी । तुझिया नामाची लागली आवडी ॥ ३ ॥
आजीचा दिवस आम्हां जालासे आनंदु । विष्णुदास नामा यानें लावियेला छंदु ॥ ४ ॥

[२४९]

येत येत उभा राजबिदीं । सवें चाले गोपाळांची मांदी ॥
नारी पाहती उभया बिदीं । एकीच्या धरूनी बाहू वा खांदीं ॥ धृ० ॥
हरीहर वंदना सादृश्य लोचना । डोळयां वेगळा नवजासी कान्हा ॥
अरे कान्हा मनमोहना । गोपी भुलल्या तुजिया गुणां ॥ १ ॥

अभंग २४७—(बा.), २४८—(पं.) व (शि.), २४९—(पं.), (धु.) व (शि.)

१ आणिक एक नवल कैचे ब्रह्मादिकांलागीं पिसें । उच्छिष्टा लागोनियां देव जाहले जळीं मासे ॥ असा चरण क्रमांक २ व ३ यामध्ये (आ.) प्रतीत आढळतो.

[१]चतुरवेद नागवी भाट सांगते । उभया वर्णितां रामकृष्णातें ॥
श्रुतिस्मृति विद्यावंतें । जय जय म्हणती कृपानिधीतें ॥ २॥
[२]येत येत उभा रहात । सुदाम्याच्या खांद्यावरी ठेवुनि हात ॥
समदृष्टी गोपिका न्याहाळीत । चैतन्य चोरूनि आनंदें डुल्लत ॥ ३ ॥
ऐसा गे माये सौभाग्यसुंदरु । नंदरायाचा कुमरु ॥
विष्णुदास नामयाचा दातारु । [३]भक्तिभागें वोळंगा शारंगधरु ॥ ४ ॥

[२५०]

जाये जाये जाये परतोनि पाहे । लाचावले जीव पर न लगे माये ॥ १ ॥
नावेक विठ्ठल पाहूं द्या साजणी । न पुरे गे धणी डोळियांची ॥ २ ॥
देखिला गे माय लावण्यसागर । नामया दातार केशिराज ॥ ३ ॥

[२५१]

मल्हार मह्रडें गगनीं दाटलें । विजु खळें गर्जिन्नलें गे माय ॥ १ ॥
गोविंद पाहाया लोकरी । कैसे वरुषताहे मधूधारी गे माय ॥ २ ॥
आनंदें मयूरें नाचती आपैसे । प्रेमें नीळकंठ जाले कैसें ॥ ३ ॥
नामया स्वामी दृष्टी सोज्वळ । जीव लागला गोपाळ गे माय ॥ ४ ॥

[२५२]

ध्यान सांवळें गोकुळीचें । धांव पाव वेगीं हरी सांवळिया ॥ धृ० ॥
सांवळिसी अंगीं उटी । सांवळी कस्तुरी लल्लाटीं ।
सांवळीसी कांसे कसियला कटि । गोंवळिया ॥ १ ॥

अभंग २५० व २५१—(पं.) व (शि.), २५२—(धु.)
१ पीतांबर शेला कासियेला । माणिक्य मेखला वरी गांठियेला ॥
कस्तुरीचा मळवटु रेखियेला । परिमळु बाहाळ साजे गोपाळा ॥ १ ॥ (पं. व शि.)
जये जये मानस मनमोहना । जीवेंजीव विगुंतला नंदानंदना ॥
अरे कान्हा अरे कृष्णा मनमोहना । गोपिका भाळलिया तुजिया गुणा ॥ १ ॥ (धु.)
चतुरविध भाट पुढें चालत । साही कीर्ती वर्णिती राधाकृष्णातें ॥
श्रुति स्मृति राहती तल्लीन तेथें ॥ १ ॥
२ वैजयंति पुष्प हार रुळती गळां । कस्तुरीचा टिळक रेखियेला ॥
मस्तकींचा मुगुट शोभे गोपाळा । (धु.)
३ खेळु खेळे बाळलीला ॥ (धु.)

सांवळीसी तनु बरवी । सांवळें वृंदावन मिरवी ।
सांवळयाशा तुळसी कानीं । मंजुरिया कोंवळिया ॥ २ ॥
सांवळीशी कंठीं माळा । सांवळें हृदयीं पदक विशाळा ।
सांवळयाशा गोपी केल्या ओंवळया । गोंवळिया ॥ ३ ॥
सांवळीसी हातीं काठी । सांवळासा कांबळा पाठीं ।
नामयाचा स्वामी गाई राखी । धवळया आणि पिवळया ॥ ४ ॥

[२५३]

कोकिळेची कळा रत्नाची ते कीळा । माणकीं सोज्वळा वर्णु हरीचा ॥ १ ॥
वृंदावनीं वेणु वाजे रुणुझुणु । वेध तनूमनू [1]गोपाळांचा ॥ २ ॥
देहूडा पाऊलीं हरि गोपाळा गोजिरीं । वाहाती ते लालोरी हरी छंदें ॥ ३ ॥
वेधलीं वनचरें गोधनें अपारें । पक्षीकुळें साचारें तल्लिन जालीं ॥ ४ ॥
यमुनेचें उदक जळचरें सम्यक । पाताळीं पन्नग ऐकों ठेलीं ॥ ५ ॥
ऐसें कृष्णवेधें तल्लिन जाले बोधें । नामा म्हणे वेणूछंदें स्थिर जालीं ॥ ६ ॥

[२५४]

ध्यानीं ध्यातां मनीं हाचि येऊनी बैसे । गीतीं गातां वसे हृदयकमळीं ॥ १ ॥
बाहेरी भीतरीं वेधिलें वो येणें । रुक्मिणीरमणें पांडुरंगें ॥ २ ॥
याविण दुसरें मज कांहींच नाठवे । लागलीसे सवें गोपाळाची ॥ ३ ॥
भोगितां या जीवा कांहींच नाठवे । लागलीसे सवें गोपाळाची ॥ ४ ॥
ऐसा अखंड विदेही लौकिकाविरहित । नामा जीवन्मुक्त होउनी ठेला ॥ ५ ॥

[२५५]

रात्र काळी घागर काळी । यमुनाजळेंही काळीं वो माय ॥ १ ॥
बुंथ काळी बिलवर काळी । गळां मोतीं एकावळी काळी वो माय ॥ २ ॥
मी काळी कांचोळी काळी । कांस कांसिली ते काळी वो माय ॥ ३ ॥
एकली पाणीया नवजाय साजणी । सवें पाठवा मूर्ति सांवळी वो माय ॥ ४ ॥
विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी । कृष्णमूर्ति बहु काळी वो माय ॥ ५ ॥

अभंग २५३—(पं.) व (शि.), २५४ व २५५—(पं.), (धु.) व (शि.)
१ गोपिकांचा । (पं.)

[२५६]

यशोदेचा बाळ अलगट । रूपें राजस बरवया बरवंट ॥ १ ॥
वेधीं लावूनि वेधिलें येणें मानस । आड घालूनियां आपुला प्रकाश ॥ २ ॥
आपणासींच खेळें विनोदें । विश्व निववी तेणें सुखें निजबोधें ॥ ३ ॥
दृष्टी याची पावे देखणीया । आड रिघोनि तेज सांवळें भरिलें डोळियां ॥ ४ ॥
मन [1]मुरोनि आर्त पुरविलें । रूप दावूनि चित्त भुलविलें ॥ ५ ॥
नामया स्वामी आसनीं शयनीं । दुरी नवजे डोळ्यांपासोनी ॥ ६ ॥

[२५७]

दुःखाची निवृत्ति सुखाचें तें सुख । पाहतां श्रीमुख गोविंदाचें ॥ १ ॥
रंगणीं रांगत गुलगुल बोलत । असुर रूळत चरणतळीं ॥ २ ॥
नामा म्हणे हातीं लोणियाचा उंडा । गौळणी त्या तोंडा भुललिया ॥ ३ ॥

[२५८]

चंद्रबिंबासरी देवो जरी मुखा । कोटी चंद्रप्रभा देखा कृष्णमूर्ति ॥ १ ॥
धवळलें चांदिणें रांगतां रंगणीं । धन्य वो गौळणी [2]सुखी तुम्हीं ॥ २ ॥
कानींचीं कुंडलें गुरुशुक्र बिंबले । शिरीं ते शोभलें पिंपळपान ॥ ३ ॥
कंठी वाघनखें साजिरी ते सरी । कटीकडदोरा वरी राजसासी ॥ ४ ॥
सुकुमार दोंदिलें किंकिणी कटीतटीं । चरणीं नाद उठी नेपुरांचा ॥ ५ ॥
श्रुतिसमागमें नाद ऐके कानीं । संतोषोनि मनीं डुले हरी ॥ ६ ॥
देखोनियां माते होय समाधान । उतरीं निंबलोण मुखावरूनि ॥ ७ ॥
सच्चिदानंदघन तान्हुलें आपण । विष्णुदास नामयानें वोवाळिलें ॥ ८ ॥

[२५९]

घागरिया छंदें चरण घवघवी । अरुणा दाखवी चरणतळीं ॥ १ ॥
अरुता येई कान्हा देई आलिंगन । उतरी निंबलोण मुखावरूनि ॥ २ ॥
वाघनखें कडदोरा कंठी घालुनि सरी । झणीं तुज मुरारी दृष्टी लागो ॥ ३ ॥

---

अभंग २५६ ते २५८—(पं.) व (शि.), २५९—(पं.), (शि.) व (आ.)
१ मारोनि (आ.)   २ कुसी तुझी (पं.)

अंबुलें लोळिया कंठी रिठे गांठीं । छंदें जगजेठी हालवी मान ॥ ४ ॥
भाळीं चंदन वरी मसीचा टिळकला । झणीं तुज गोपाळा दृष्टी लागे ॥ ५ ॥
[1]नामयाचा स्वामी हरी माझें चित्त । सर्व छंदें गीत गाऊं नाचूं ॥ ६ ॥

[२६०]

कृष्ण डोलतु रांगतु रंगणीं । इडापीडा धांवोनि घेती गौळणी ॥ १ ॥
जीवापरीस हें वाल्हें बालक । शिणलिया विसांवा त्याचें श्रीमुख ॥ २ ॥
सर्व सुख याचेनी मनोहरें । तेंचि खेळवितां धणी न पुरे ॥ ३ ॥
देह गेह नाठवे सर्वथा । सुतपतीची मावळली वार्ता ॥ ४ ॥
सुख न सांगवे वैखरी कोंदली । रूपीं रमतां मनें बुडी दिधली ॥ ५ ॥
नामया स्वामी सुखाचा सागरू । कृष्ण खेळवितां सुफळ हा संसारू ॥ ६ ॥

[२६१]

चाल सखिये वेगु करीं वहिला । दिन सरला काळ थोडा उरला ॥ १ ॥
आवडी घेऊं गे [2]हरिसुख धनीचें । आर्त पुरोनी जें उरलेंसे मनीचें ॥ २ ॥
कृष्णमुख पाहे दृष्टी भरोनी । चित्त सांडी कुरवंडी करोनी ॥ ३ ॥
झणीं विसरसी हे खूण निरुती । मग अंतरलें सर्वसुख पुढती ॥ ४ ॥
हाचि निर्धार करूनियां मानसीं । आंत बाहेरी हरिरूप देखसी ॥ ५ ॥
नामया स्वामी राजीवलोचनु । रमारमणु तों जीवींचा जीवनु ॥ ६ ॥

[२६२]

हातीं घेऊनियां काठी । शिकविते श्रीपती ।
यमुनेची माती । खासी कां कां कां कां ॥ १ ॥
हरी तूं खोडी नको करूं । माझ्या वा वा वा वा ॥ धृ० ॥
धांऊनियां धरिला करीं । वैसविला मांडीवरी ।
मुख पसरोनि करी । आ आ आ आ ॥ २ ॥
विष्णुदास नामा म्हणे । मरोनियां जन्मा येणें ।
कृष्ण सनातन पाहूं । या या या या ॥ ३ ॥

अभंग २६० व २६१—(पं.) व (शि.), २६२—(आ.)
१ नामयाचा स्वामी हरि माझें चिंतणें । छंदें गीत गाऊं नाचूं मी सदा जाणें ॥ (आ.)
२ निजमुख (आ.)

[ २६३ ]

गौळणी ठकविल्या । गौळणी ठकविल्या ।
एक एक संगतीनें । मराठी कानडीया ।
एक मुसलमानी । कोंकणी गुजरणी ।
अशा पांचीजणी गौळणी ठकविल्या ॥ धृ० ॥

गौळणी सुंदरी । गौळणी सुंदरी ।
गेल्या यमुनेतीरीं । वस्त्रें फेडुनियां स्नान करिती नारी ।
गोविंदानें वस्त्रें । नेलीं कळंबावरी ।
स्नान करोनियां । त्या आल्या बाहेरी ॥ १ ॥

लडोबा गोविंदा । लडोबा गोविंदा ।
निरवाणी आज । आडचाल्लो पडचाल्लो ।
शिर फोडचा न कोडो । मारी कन्हय्या ।
पानी खेळचा न खेळो ॥ २ ॥

देखरे कन्हय्या देखरे कन्हय्या । मै इज्यतकी बडी ।
कदम पकडूंगी । मैयां कूटोजुडी ।
मेरी चुनरी दे । मेरी ले दुल्लडी ॥ ३ ॥

देवकी नंदना । देवकी नंदना ।
तूं एक श्रीपती । उघडी हिंवाची । तुज विनवुं किती ।
पायां पडत्यें बा । मी येत्यें काकुळती ।
माझी साडी दे । घे नाकाचें मोतीं ॥ ४ ॥

पावगा दातारा । पावगा दातारा । तूं नंदाचा झिलो ।
माकां फडको दी । मी हिवान मेलों ।
घे माझें कोयतो । देवा पायां पडलों ॥ ५ ॥

ज्योरे माधवजी ज्योरे माधवजी । में शरण थई ।
तनका काकैपी । बाप दयाळ तूंही ।
मारी साडी अपो । हातणी ले कंकणी ॥ ६ ॥

इतुकें ऐकोनी । इतुकें ऐकोनी । देव बोले हांसोनी ।
सूर्या दंडवत करा कर जोडोनी । नामा विनविती ।
म्हणे शारंगपाणी । गौळ्या ऐक तूं । धन्य तुझी करणी ॥ ७ ॥

---

अभंग २६३--(आ.)

अनुक्रमणिका

[२६४]

लांचावलें ब्रह्म भक्तीचेनि सुखें ।
तें गोकुळीं गोपाळवेषें गाई राखे ॥ १ ॥

त्रिभुवनीं न समाये ब्रह्मादिकीं लक्षा नये ।
तें दास्यत्व करिताहे गौळीयांचें ॥ २ ॥

नवलाव गे माये देखियला ।
तें सुख काय सांगों तुला ॥ ३ ॥[1]

कैसें गोवळेपणाची बुंथी घेऊनियां साजिरा ।
परब्रह्म जालेंसे पिसें गे माये ॥ ४ ॥[2]

निगमा निर्धारितां अमरा दर्शनाची आस ।
मुनिजनां ध्यानीं आभास तोही नाहीं ॥ ५ ॥

तें हें नित्य पूर्ण [3]खेळविती गौळणी ।
चुंबन देउनी हृदयीं आलिंगिती ॥ ६ ॥

क्षीरसागरीचें सुख सांडुनी अशेष ।
लक्ष्मी सेजेचे विलास तेहि नावडती ॥ ७ ॥

तें हें गोधना गोठणीं लोळे शुद्ध चैतन्य सांवळें ।
तें सुखही न कळे साचें चतुरानना ॥ ८ ॥

भक्ती प्रेम भाव देखे आहे जेथें ।
हरी ओरसला जाये तेथें कैचें नैश्वरत्व ॥ ९ ॥

न विचारी जातीकुळ शुची अथवा चांडाळ ।
हृदय देखुनी निर्मळ प्रीति धरी तेथें ॥ १० ॥

ऐसें त्रिभुवन सुखाचें सार कीं अनाथाचें माहेर ।
अव्यक्त परि साकार जालें असें तें ॥ ११ ॥

भक्ताचेनि वियोगें श्रमलें म्हणोनि गोकुळासी आलें ।
तेणें प्रेम सुख दिधलें नामयासी ॥ १२ ॥

---

अभंग २६४—(पं.), (शि.) व (गं.)

१ (पं.), (ड.) व (शि.) मध्ये पहिल्या तीन चरणांनंतर असे अधिक चरण आहेत—-
शुद्ध चैतन्य तरी सावळें कवण्या सुखें नाकळे । रजा गोकुळीं रूळे सांग चतुरानना ॥ ४ ॥
भक्तिच्यानी योगें भ्रमलें तें या गोकुळीं विश्रांति पावलें । तेणे प्रेमसुख दिधलें नामयासी ॥ ५ ॥

२ चरण ३ व ४ हे गंगावने बाडात नाहीत. ३ लाडेकोडे खेळविती (आ.)



अनुक्रमणिका

[२६५]

बाळ सगुण गुणाचें तान्हें गे । बाळ दिसतें गोजिरवाणें गे ।
काय सांगतां गाऱ्हाणें गे । गोकुळींच्या नारी ॥ १ ॥
श्रीरंग माझा वेडा गे । याला नाहीं दुसरा जोडा गे ।
तुम्ही याची संगत सोडा गे । गोकुळींच्या नारी ॥ २ ॥
पांच वर्षांचें माझें बाळ गे । अंगणीं माझ्या खेळे गे ।
कां लटकाच घेतां आळ गे । गोकुळींच्या नारी ॥ ३ ॥
सांवळा गे चिमणा माझा गे । गवळणींत खेळे राजा गे ।
तुम्ही मोठ्या ढालगजा गे । गोकुळींच्या नारी ॥ ४ ॥
तुम्ही खाऊन लोण्याचा गोळा गे । आळ घेतां या गोपाळा गे ।
तुम्ही ठाईंच्या वोढाळा गे । गोकुळींच्या नारी ॥ ५ ॥
तुम्ही लपवुनी याची गोटी गे । लागतां याचे पाठी गे ।
ही एवढीच रीत खोटी गे । गोकुळींच्या नारी ॥ ६ ॥
तुम्ही लपवुनी याचा भंवरा गे । आळ घेतां शारंगधरा गे ।
तुम्ही बारा घरच्या बारा गे । गोकुळींच्या नारी ॥ ७ ॥
हा ब्रह्मविधीचा जनिता गे । तुम्हीं याला धरूं पाहतां गे ।
हा कैसा येईल हातां गे । गोकुळींच्या नारी ॥ ८ ॥
नामा म्हणे यशोदेसी गे । हा तुझा हृषिकेशी गे ।
किती छळितो आम्हांसी गे । गोकुळींच्या नारी ॥ ९ ॥

[२६६]

वारी वो दशवंती आपुला तूं बाळ । विकटू हा खेळ खेळतसे ॥ १ ॥
धाकुटिया मुलां घेतो हा चिमोरे । काय करूं धुरे भीत असों ॥ २ ॥
घरींचा म्हातारा हाणितला येणें । काय सांगूं उणें तुजपाशीं ॥ ३ ॥
मी वो लटिकी तरी नामयासी पुसा । तुझा बाळू कैसा आसंदत ॥ ४ ॥

[२६७]

कान्हा तूं आजि कां जालासि बेभान ॥ धृ० ॥
तूं तो आमुचा गडी । म्हणोनि मी केली खोडी ।
घालूं हुंबर यमुनेची मोडूं मान ॥ १ ॥

अभंग २६५--(धु.), २६६--(पं.) व (शि.), २६७--(आ.)

अनुक्रमणिका

होसी तूं आमुचा वळी । म्हणोनि म्यां केली कळी ।
तेथें कशाचा काय गुमान ॥ २ ॥
जरी तूं होसी सखा । होऊं दे जाला वाखा ।
चल रूपवती घरीं घेऊं मान ॥ ३ ॥
समजूनियां देव । येक नामा नामदेव ।
जाले तें हरपलें । या द्वैत भान ॥ ४ ॥

[२६८]

हरी तुझी ऐसी कैसी हे खोड ॥ धृ० ॥
घेउनी चिमुटे मुळसी पळसी । गोपी तुज म्हणती हा दोड ॥ १ ॥
सोडुनी वासरें गाईंसी पाजिसी । यांत तुज काय मिळती जोड ॥ २ ॥
आडवा होऊनी गोपीसी धरिसी । चुंबितां वदन म्हणती मज सोड ॥ ३ ॥
अशा ह्या चेष्टा नाम्यासी करिसी । हरी [१]तुझी ऐसी कैसी हे खोड ॥ ४ ॥

[२६९]

सोडी कान्हा रविदोर । मथिल्या देतें । बया मज तें दे ।
आई मज तें दे डेरां घुमघुमतें ॥ १ ॥
यशोदा उचलोनी । कडे त्यासी घेऊनी । दाविती चित्रशाळेतें ॥ २ ॥
करीं कर धरूनी । नेऊनी अंगणीं । दावी कुप बावीतें ॥ ३ ॥
दावीत आरशांत । म्हणे पाहे कृष्णनाथ । मुखमुखा चुंवितें ॥ ४ ॥
चिमण्या या गौळणी । आल्या त्या हो मिळोनी । राधे उरीं मज तें दे ॥ ५ ॥
राधेसी म्हणे नामा । कृष्णासी तुझा प्रेमा । समजावियासी तें दे ॥ ६ ॥

[२७०]

मला तूं हरी कळलासी रडीवाला ॥ धृ० ॥
विधीचें अक्षर खरें हें असतां । अजासुताचें कां जाले हाल ॥ १ ॥
पाराशरसुत वरचढ जाला । म्हणून कां त्वां फुगविले गाल ॥ २ ॥

---

अभंग २६८—(धु.) व (भा.), २६९—(भा.), २७०—(आ.)
१ मी तुझी मोडिन हे खोड ॥ (भा.)

अनुक्रमणिका

बळीनें तुज पाहे खरीद केलें । खर्चून तो धनमाल ॥ ३ ॥
नामा मनीं निर्भय गुरूवर कृपें । तुजलागीं देतां हे प्रतिख्याल ॥ ४ ॥

[२७१]

मुक्ताफळ नथ नाकीं । चरणीं ल्याली वर वांकी ।
पितांबरें अंग झांकी । कृष्णाई माझी ॥ १ ॥
खांद्यावरी कांवळी । पायघोळ लांबली ।
पांघरली धावळी । कृष्णाई माझी ॥ २ ॥
गाई पाठीं लागली । पळतां नाहीं भागली ।
मायबहिण चांगली । कृष्णाई माझी ॥ ३ ॥
देहुडा पाउलीं । उभी माझी माउली ।
विश्रांतीची साउली । कृष्णाई माझी ॥ ४ ॥
कर ठेवुनी कटावरी । उभी भीवरेचें तीरीं ।
नामयाची कैवारी । कृष्णाई माझी ॥ ५ ॥

[२७२]

रावणा मारून माझे माये गे । बिभीषण लंकेस स्थापिलास काय गे ।
अयोध्येस आलीस काय गे । माझे हृदयमंदिरीं राहे गे । विठ्ठल माये गे ॥ १ ॥
रुसुनी आली रखुमाबाई गे । तिच्या मागें तूं धांवलीस काय गे ।
संगें घेऊनियां गोपाळ गाय गे । मम हृदयमंदिरीं राहे गे ॥ २ ॥
सत्ये राधिकेचे पायीं गे । सोडूनी द्वारकेचा ठाव गे ।
आलीस काय गे । माझे हृदयमंदिरीं राहे गे ॥ ३ ॥
धन्य पुंडलीक भक्त माय गे । त्यानें विटेवर उभा केला काय गे ।
नामा म्हणे माझे माय गे । माझे हृदयमंदिरीं राहे गे ॥ ४ ॥

[२७३]

चिदानंद दोंदिल बाळ डोळस । कृष्ण खेळवितां निवे मानस ॥ १ ॥
सये आन कांहीं या जीवा नावडे । चित्त गुंतलें तया सुखी न निवडे ॥ २ ॥
देहा गेहा आठव नाहीं सर्वथा । स्थिति बाणली सहज रूप पाहतां ॥ ३ ॥

अभंग २७१ व २७२—(आ.), २७३—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

तेज सांवळें दृष्टींत कोंदलें । तेणें प्रकाशें सबाह्य वेधलें ॥ ४ ॥
वृत्ति सहित इंद्रियें परतलीं । कृष्णरूपीं मिळोनियां गेलीं ॥ ५ ॥
नामया स्वामी आदि परंपरा । आवडता आहे तो माझा सोयरा ॥ ६ ॥

[२७४]

चिदानंद दोंदिल बाळ सांवळें । कृष्ण पाहतां नयनीं मन मावळे ॥ १ ॥
तें सुख कवणें वाचे बोलिजे । चित्त चैतन्य समरस भोगिजे ॥ २ ॥[1]
परा परतली पश्यंति तन्मया । मध्यमा वैखरी पावली हो लया ॥ ३ ॥
आलिंगना लागुनी बाह्या स्फुरती । देह न दिसे पाहतां कृष्णमूर्ति ॥ ४ ॥
तेथें आर्तींचा आनंदु गोठला । तो हा कृष्णरूपें अंकुर उठिला ॥ ५ ॥
नामया स्वामी सबाह्याभ्यंतरीं । गेले रसरंग गोकुळाभीतरीं ॥ ६ ॥

[२७५]

चिदानंद चिद्रूप चित्त चिन्मय । बाळ यशोदेचें आनंद अद्वय ॥ १ ॥
सत्य अभिनव सुख याच्या दर्शनीं । मिठी पडली पाहतां रूप नयनीं ॥ २ ॥
दृष्टीया डोळियां आड रिघोनी । तनु मनासी केली भुलवणी ॥ ३ ॥
आंत बाहेरी निजसुख वावरे । नित्य नूतन जीव जीवपणा विसरे ॥ ४ ॥
आपरूपी रूप सकळां केलें । गोपी गोपाळां धेनु वत्सां भूलविलें ॥ ५ ॥
नामया स्वामी आनंद उदधि । माजीं बुडोनियां गेली देहबुद्धि ॥ ६ ॥

[२७६]

चिदानंदनघन चिन्मय बाळकृष्ण । खेळवितां मन होय उन्मन ॥ १ ॥
सुख अनुभवी अनुवाद खुंटला । विश्वंभरी तोचि अनुवाद गोठला ॥ २ ॥
दुजें न दिसे उपमेसीं द्यावया । मन न मिळे आन सुख घ्यावया ॥ ३ ॥
ज्ञाता ज्ञान हेंचि अद्वय । ध्याता ध्यान हेंचि निरामय ॥ ४ ॥
जन्मोजन्मीचें पुण्य संचित । जालें गौळियांचें काय मूर्तिमंत ॥ ५ ॥
नामया स्वामीची अनुपम्य आवडी । चित्तें दिधली प्रेमरसीं बुडी ॥ ६ ॥

अभंग २७४ ते २७६—(पं.) व (शि.)
१ हा चरण (पं.) मध्यें नाहीं.

अनुक्रमणिका

[ २७७ ]

जो भक्तजन करुणाकर क्षीरसिंधुचा दानी ।
तो चोरोनी खाय लोणी नवल देखा ॥ १ ॥
जो न माये भूतळीं [1]वेदार्थाहि न कळे ।
तो बांधिला उखळें नवल देखा ॥ २ ॥
एका पादें करूनि आक्रमी मेदिनी ।
त्यासी चालूं सिकविती गवळणी नवल देखा ॥ ३ ॥
ज्याचे मायेचेनि कुवाडें ब्रह्मादिक वेडें ।
तो बागुल म्हणता दडे नवल देखा ॥ ४ ॥
दानवांची कोटी हेळांचि निवटि ।
त्यांते माता भयें दावी सोंपटी नवल देखा ॥ ५ ॥
नामा म्हणे हरी विश्वीं विश्वंभरीं ।
तो [2]म्हणती नंदाघरीं नवल देखा ॥ ६ ॥

[ २७८ ]

गोपाळाशीं खेळती । आनंदें डोलती ।
कृष्ण आमुचा सांगाती । डो डो डो डो डो ॥ १ ॥
कान्होबाची संगती । ब्रह्मादिक इच्छिती ।
धन्य आम्ही म्हणती । अ ल ल ल ल ॥ २ ॥
कृष्णाप्रती गोपाळ । म्हणताती सकळ ।
अकळसी नाकळ । हा त त त त ॥ ३ ॥
मामा मारूं गेलासी । आपटिलें गजाशीं ।
मल्लयुद्ध खेळलासी । हू तू तू तू तू ॥ ४ ॥
अजगर मारिला । वडवानळ गिळिला ।
गोवर्धन उचलिला । अ ब ब ब ब ॥ ५ ॥
पुतनेसी शोषिलें । नारदासी मोहिलें ।
गणिकेसी उद्धरिलें । अ रे रे रे रे ॥ ६ ॥
गौळियाचें घरां जाशी । दहीं दूध लोणी खासी ।
त्यांच्या सुना मोहिसी । छी छी छी छी छी ॥ ७ ॥

अभंग २७७—(बा.), २७८—(धु.) व (भा.)
१ वेदांतें (बा.) २ तो बाळ (बा.)

अनुक्रमणिका

सोळा सहस्र भोगिसी । ब्रह्मचारी म्हणविसी ।
लटिकेची ठकविशी । लु लु लु लु लु ॥ ८ ॥

सोडोनियां मी पण । आम्हां घाली लोटांगण ।
परब्रह्म नारायण । आ हा हा हा हा ॥ ९ ॥

ऐसे तुझे पवाडे । वर्णिताती वाडेकोडें ।
विष्णुदास नामा म्हणे । यु यु यु यु यु ॥ १० ॥

[ २७९ ]

प्रातःकाळीं प्रहरा रात्रीं उठिल्या गौळणी बाळा ।
घुसळण मांडियेलें घरोघरीं सकळां ।
नित्यानंदें परमानंदें गाती गोपाळा ।
सहस्रापरी कैशा गाती मदन सांवळा ॥ १ ॥

घुम घुम करिती घुम घुम करिती डेरे घुमती ।
आनंदल्या गौळणी छंदें छंदें डोलती ॥ धृ० ॥

एक म्हणती साजणी तुम्ही लपवा गे लोणी ।
नकळे नकळे हो बाई कृष्णाची करणी ।
कोणीकडून हा गे येईल सखये चक्रपाणि ।
खास खांदुनि तुम्ही आतां लपवा दुधाणी ॥ २ ॥

बोलतां चालतां इतुक्यामध्यें हरी आला ।
कवणेंहि नाहीं देव दृष्टी देखिला ।
सूक्ष्म रूप धरूनि डेऱ्यामध्यें प्रवेशला ।
वरच्यावरी देव लोणी खाऊनियां गेला ॥ ३ ॥

उन्हवणीं शिळवणी घालिती परतें लोणी येईना ।
काय जाले ढोण सासूबाई कळेना ॥ ४ ॥

हा हा गे बायांनों तुमचे जाणते चाळे ।
यशोदेच्या मुला देतसां गोळे ।
उगेचि मग पाहातां आतां फिरगे निराळे ।
मारी ठोसरे दोन्ही गाल्होरे घेतले ॥ ५ ॥

डेऱ्यामधून मार माझा, जगजीवन पाहे ।
नामा म्हणे धन्य धन्य वर्णू मी काये ॥ ६ ॥

अभंग २७९—(पं.)

अनुक्रमणिका

[२८०]

मस्तकीं ठेवोनियां डेरा । करूं निघाली विकरा ।
साच करितसे पुकारा । म्हणे गोविंद घ्या वो ॥ १ ॥
बोल बोलती अबळा । तंव त्या हांसती सकळा ।
मुखीं पडियेला चाळा । तो गोपाळाचा ॥ २ ॥
दहीं म्हणावेसे ठेलें । वाचे गोविंद पैं आलें ।
चित्त चैतन्य रंगलें । कान्हुचरणीं बाई वो ॥ ३ ॥
उन्नतीये बोलती नेती । चालतां गजगती ।
कान्हु वांचुनी चित्तीं । आणीक नेणें बाई वो ॥ ४ ॥
जाऊनियां बळीच्या द्वारां । त्रिकांड केली वसुंधरा ।
कैसा सामावला तुमच्या डेरा । दाखवी बाई वो ॥ ५ ॥
वृद्धा गौळणी पाचारिती । आणी वो अरुता श्रीपती ।
कोठें गोविंदु विकिती । नाहीं देखियला बाई वो ॥ ६ ॥
श्रीरंगीं रंगला जीवु । म्हणे घ्यावो हा माधवु ।
बरवा रमापती गौरवु । साच आणियला कैसा ॥ ७ ॥
[1]बाळा भरूनियां बाळा । देखें श्रीरंगु सांवळा ।
वेधी वेधल्या सकळां । गोपी गोविंदासवें ॥ ८ ॥
गोविंद गोविंद म्हणा वाचे । गोविंद स्मरण करा साचे ।
दोष हरती जन्माचे । छंद लागला तयाचा ॥ ९ ॥
नामया स्वामी हो मुरारी । मज पाहतां अभ्यंतरीं ।
शेखीं व्यापिलें निर्धारीं । मनुष्यपण ॥ १० ॥

[२८१]

रूपें श्यामसुंदर निलोत्पल गाभा । सखिये स्वप्नीं[2] शाभा देखियेली ॥ १ ॥
नेत्र विशाळ भाळ दंत हिरया ज्योती । बाईये मदनमूर्ति देखियेला ॥ २ ॥
शंख चक्र गदा पद्म शोभती चहूं करीं । सखिये गरुडावरी देखियेला ॥ ३ ॥[3]
शयन शेषापृष्ठीं नाभीं परमेष्ठी । गंगा वामांगुष्ठीं देखियेला ॥ ४ ॥[4]

अभंग २८०—(बा.), २८१—(पं.) व (शि.)
१ चाळा (बा.) २ स्वप्नीं (पं. व शि.) ३ हा चरण काही (पं.) प्रतींमध्ये ४ था आहे.
४ हा चरण काही (पं.) प्रतींमध्ये ५ वा आहे.

पीतांबर कटीतटीं दिव्य चंदनउटी । सखिये जगजेठी देखियेला ॥ ५ ॥[1]
विचारितां मानसीं नये जो व्यक्तीसी । मन लुब्धलें विठ्ठलेसि म्हणे नामा ॥ ६ ॥

[२८२]

अव्यक्त परब्रह्म कैसें आलें वो व्यक्तीं ।
अकळू न कळचि तो हा अमूर्ती ।
पुंडलिकाचे भक्तीं येऊनियां वाळवंटीं ।
उभा राहे विटेवरी कर ठेवुनि कटीं ॥ १ ॥
जिवाचा जीवनु वो मज भेटवा हरी ।
लागलें प्रेमपिसें होईन दासी कामारी ॥ धृ० ॥
कांसे कसिला पितांबर तयावरी मेखळा ।
अंगीं उटी चंदनाची शोभती वनमाळा ।[2]
बाहू बाहूवाटे तें रूप गुंतलें डोळां ।
मन माझें मोहिलें दृष्टि देखतां घननीळा ॥ २ ॥[3]
अधर जे पोंवळियाचे दंत हिरिया ज्योति ।
विशाल नयन वो भोंवयां व्यंकटा अति ।
टिळक जो रेखियेला मृगनाभी ल्लाटीं ।
उपमा नये व्यक्ती चंद्रा पडियेली तुटी ॥ ३ ॥
माथां मुगुट जो रत्नें जडियेलीं वरी ।
त्याखालीं मयुरपत्रीं वेटी साजे मुरारी ।
माथां त्या विरगुंठी पुष्पें तुरंबिलीं वरी ।
[4]तेणें भाळलियें भेटवावो झडकरी ॥ ४ ॥
इंद्रनीळ कीळ उभा घनश्यामु हा दिसे ।
पाहातो एक दृष्टी चकित केलें वो हांसें ।
तेचि ते कामबाण जिवा लागलें पिसें ।
नामया विष्णुदासा व्यापिलें हृषिकेशें ॥ ५ ॥

[२८३]

संसार परजनीं । दूर दिधलें मज साजणी ।
द्वारकापुर पाटणीं । माझें माहियेर ॥ १ ॥

---

अभंग २८२--(पं.), (धु.) व (शि.), २८३--(पं.) व (शि.)
१ हा चरण (शि.) मध्ये नाही. २, ३ हे चरण काही (पं.) प्रतींमध्ये नाहीत. ४ तेणें मी भाळलियें (पं. व शि.)

अनुक्रमणिका

थोर उत्कंठा मनीं । वाट पाहे प्रतिदिनीं ।
मज नेतु कां कोणी । तया माहियेरा ॥ २ ॥

चित्तीं न लगती व्यापार । मनीं हेंचि वारंवार ।
आड ठाकले गिरि डोंगर । तया माहियेरा ॥ ३ ॥

माझिया सासुरे निष्ठुरें । दुरळ बोलिलीं उत्तरें ।
तंव तंव मी स्मरें । विठू बापू माहियेरा ॥ ४ ॥

येथें कोणी नाहीं माझें एक । जें त्यासीं बोलूं सुखदु:ख ।
हें मन उतावेळ देख । तया माहियेरासाठीं ॥ ५ ॥

कामक्रोध भावें दीर । बोलती अति निष्ठुर ।
ते वेळीं त्यजिजे संसार । ऐसें वाटतसे मना ॥ ६ ॥

या वो संसारीं नसिजे[1]। संगु अवघ्याचा सांडिजे ।
नि:संग होऊनि राहिजे । तया माहियेरा ॥ ७ ॥

या वो प्राणाचें संकटीं । आतमां ठेऊनियां कंठीं ।
मग चालवी घररहाटी । म्हणिजे काम रात्रंदिवस ॥ ८ ॥

याचे क्रूर बोल न होती । तेणें मी असे निर्वुज चित्तीं ।
निरोप धाडूं कवणा हातीं । तया माहियेरा ॥ ९ ॥

तंवचि वो शिणीजे । जंव यातें न वोळंगिजे ।
याचें बीज पाविजे । नामें एकें विठ्ठलें ॥ १० ॥

आतां बहु काय बोलिजे । यासि सुवेळा न पुसिजे ।
पुण्यमार्गें जाईजे । तया माहियेरा ॥ ११ ॥

माझी सखी जे कां भक्ति । मज तेंचि संबोखिती ।
तियें लाविलें शुद्धमति । 'साह्य तें मज चुकों नेदी ॥ १२ ॥

सत्य भावो मज सांगाती । येर लटकिया व्युत्पत्ति ।
मी वो जाईन हरखेजती । तया माहियेरा ॥ १३ ॥

कृष्ण माऊली भेटेल । शीण अवघाचि हरेल ।
सुख आनंदू न मायेल । या त्रिभुवनीं ॥ १४ ॥

या बहू जन्माचा शीण वो जाईल । विठोदर्शनें दु:ख हरेल ।
नामा सुखिया होईल । केशव चरणीं ॥ १५ ॥

---
१ साध्य (पं.)

अनुक्रमणिका

[२८४]

कृष्ण अनुरागें रंगली कामिनी । कामधामें गेली घरा विसरोनी ॥ १ ॥
होती बहुत जन्में वियोगें शिणली । आप नाठवे पर सुखें मिनली ॥ २ ॥
मनें करूनियां जाये विषयांचें संकल्प । तंव ते अवघे होय कृष्णरूप ॥ ३ ॥
दृष्टीं देखणें जें जें आवडे । वेणू वाहे तेथें उभें देहुडें ॥ ४ ॥
सुखशयनीं स्वप्नीं देखे सांवळा । कंठीं कौस्तुभ रूळे बरी वनमाळा ॥ ५ ॥
जीवें धांवुनी आलिंगीं प्रीती । तंव ते आर्ती होय कृष्णमूर्ति ॥ ६ ॥
देह परतोनी मागुते सांभाळी । तंव स्वयें सिद्ध आपण वनमाळी ॥ ७ ॥
नामया स्वामी जिवींचा जिवलगू । कृष्णसुखाचा सुखबोध अंतरंगु ॥ ८ ॥

[२८५]

भिन्न रात्रीं माध्यान्हीं वो । सेजे सुतली नारी ।
आपआपणा विसरूनियां । सुशोभित अंधारीं ॥ १ ॥
त्यामाजी चारी भुजा । शंख चक्र वो करीं ।
पद्म गदा हातीं शोभती । दिसे सर्व शृंगारीं ॥ २ ॥
येऊनि हंस तुळिके । कैसें धरियलें करीं ।
देऊनि आलिंगन । वोसरला वो दुरी ॥ ३ ॥
पालवीं धरितां धरितां । रिघाला बाहेरी ।
त्यालागीं प्राण जातो । भेटवा झडकरी ॥ ४ ॥
कवण ते प्राणसखी । भेट करी विठोसी ।
सांडूनि वीरगुंठी । चरण न झाडी केशी ॥ ५ ॥
कवण मी कैंचा नेणों । जाती कूळ तयाचें ।
कवणा पासाव जाला । तें मी नेणें वो साचें ॥ ६ ॥
इंद्र चंद्र नीळ कीळ । घन नभ रूप तयाचें ।
चरणीं तोडर रूळे । वरि नेपुरें [१]साचे ॥ ७ ॥
नख चंद्रमंडित वो । जन्मस्थान गंगेचें ।
जानू जघन नीट । पीतांबर वो कांसे ॥ ८ ॥

अभंग २८४ व २८५—(पं.) व (शि.)
१ साजे (शि. व पं.)

त्यावरी नाग मुरडी । रत्न मेखळा साजे ।
माजू जों मुष्टी माय । त्या मन वेधलें माझें ॥ ९ ॥
नाभीं सरोवरीं वो । दिसे ब्रह्मकमळ ।
अनुकम्प उदर ज्याचें । विशाळ वक्षस्थळ ॥ १० ॥
कौस्तुभ वरी शोभे । करितो झळपळ ।
कुंडलाचेनि रत्नें । कैसेनि फांकतांती कीळ ॥ ११ ॥
वदनीं मी काय वानूं । प्रसिद्ध निर्मळा ।
भांळीं तो अर्ध चंद्र । मृगनाभीचा टिळा ॥ १२ ॥
सरळ ज्या अंगोळिका । नवरत्नें जडीत ।
कंकिणें मनगटीं । बाहुवटीं सुशोभित ॥ १३ ॥
त्यावरी कीर्तिमुखें । भुजादंड मिरवत ।
वैजयंती पदक हीरे । मुगुटीं झळकत ॥ १४ ॥
मयूरपत्रें शिरीं । शोभा दिसे अमित ।
चंद्र मंडळ लोपलीं वो । महातेज अद्भुत ॥ १५ ॥
व्यापिलें वनमाळिये । लावण्य तेज अमित ।
तें रूप देखावया । माझा जीव उल्हासत ॥ १६ ॥
ऐसी तापली विरहज्वरें । थोर होतो उबारा ।
चंदन पोळतसे । न घाला विंजण वारा ॥ १७ ॥
चंद्रमा दाहतसे । उष्ण तो खडतरा ।
तंव येरीं जाणितला । वेध नंदकुमारा ॥ १८ ॥
येईल केशीराजा । नेईल द्वारकापुरा ।
भक्ति ही [1]वीर माता । तिनें आणिला घरा ॥ १९ ॥
नामया विष्णुदासा । भेटी शारंगधरा ।
तनु मन जीवें त्याला । सुख [2]जालें अंतरा ॥ २० ॥

[२८६]

स्त्री गरवार पति उदरीं । पतिव्रतापण साजे तिये नारी ॥ १ ॥
अंबुला खेळवी मोहें । कडीये घेवो देतसे पाहे ॥ २ ॥
समस्तीं मिळोनि पाळणा घातला । विष्णुदास नामयानें अनुभव गाईला ॥ ३ ॥

अभंग २८६—(आ.)
१ विरहा (आ.) २ होईल अपारा (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[ २८७ ]

जो जो जो जो रे मधुसुदना । बाळा जगजीवना ।
हालवी यशोदा पाळणा । नीज बा नारायणा । जो जो जो जो रे ॥ धृ० ॥
प्रथम अवतारीं । स्तवन करितांचि पैं विधी ।
करुणासागर गुणनिधी । शंखासुर वधोनि ॥ १ ॥
द्वितीये संकष्टीं इंद्रासी । कूर्मरूप होसी ।
सिंधू मंथुनियां श्रमलासी । सौख्य समस्तां देसी ॥ २ ॥
तृतीये वराह हिरण्याक्षी । धरूनी त्याची कुक्षी ।
पळतां धरियेला अनुलक्षी । फोडुनि त्याची वक्षी ॥ ३ ॥
चतुर्थ नरसिंह विशाळ । अग्नीचा कल्होळ ।
निवडुनि असुराचें तेजाळ । काढी अंत्रमाळ ॥ ४ ॥
पंचम वामन सुंदर । क्षीराब्धीचा वर ।
जेणें भुलविला दिनकर । हरिला दानासुर ॥ ५ ॥
षष्टम भार्गव अभिदानीं । पिता जमदग्नी ।
पृथ्वी निःक्षेत्रीं त्रिवाणी । दिधली विप्रा दानीं ॥ ६ ॥
सप्तम अयोध्यापुरवासी । राजा राम होसी ।
पितृवचनाचे नेमासी । राहुनियां वनवासी ॥ ७ ॥
अष्टम अवतार गोकुळीं । जन्मला वनमाळी ।
चाणुर कंसाची मंडळी । जाळुनि केली होळी ॥ ८ ॥
नवम बौध्य अवतार । पुढें येती युगांतर ।
दशम कलंकी होणार । नामा म्हणे संतां ॥ ९ ॥

[ २८८ ]

संसार घन घनदाट । कैं होईल शेवट जातियाचा ॥ १ ॥
जीव हेंचि जातें कर्म हाचि खुंटा । वोढिती वरवंटा चौघीजणी ॥ २ ॥
जातां वैर वैरणें जंव आहे लहाणे । जातां जाईजणें जाईल जाणा ॥ ३ ॥
एकोत्तरशें कौरव वैरिले वैरणा । पांचा पांडवा जाणा तेचि जालें ॥ ४ ॥
नळनीळ मांधाता वैरियेलें जातां । निमिष न लागतां पीठ जालें ॥ ५ ॥

अभंग २८७—(आ.), २८८—(धु.)

अनुक्रमणिका

संसाराचा वोढा वोढितां न वोढे । बैस पलीकडे लावी हात ॥ ६ ॥
नामा म्हणे विठोबा दीनाचें माहेर । सदा पंढरपुर गाऊं गीतीं ॥ ७ ॥

[२८९]

पहिला बागुल तो ऐसा । त्याचें नांव म्हणती मासा ।
शंखासुर वधिला कैसा । चारी वेद आणिले ॥ १ ॥
कृष्णा राहे रे उगला । नाहीं तर सांगेन त्या बागुला ।
घुसळणाशी उशीर जाला । रवी सोड गोविंदा ॥ धृ० ॥
दुसरा बागुल बोलती । नाम कांसव म्हणती ।
जेणें सृष्टी धरिली पृष्ठीं । पाय पोटीं सूदले ॥ कृष्णा० ॥ २ ॥
तिसरा बागुल बोलती । नाम वराह म्हणती ।
जेणें दाढें धरिली क्षितीं । दैत्य थोर मारिले ॥ कृष्णा० ॥ ३ ॥
चवथा बागुल नरहरी । थोर खांबांत गुरगुरी ।
दैत्य वधोनि मांडीवरी । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ कृष्णा० ॥ ४ ॥
पांचवा बागुल ब्रह्मचारी । उभा असे बळीचे द्वारीं ।
[1]भिक्षा त्रिपांड धरित्री । बळीचें द्वार रक्षिलें ॥ कृष्णा० ॥ ५ ॥
सहावा बागुल बोलती । नाम परशुराम म्हणती ।
ज्यानें वधिलें मातेप्रती । पितृवचन मानुनी ॥ कृष्णा० ॥ ६ ॥
सातवा बागुल [2]सत्त्वाचा । राम म्हणती दशरथाचा ।
रावण वधोनि दशमुखाचा । जानकीसी आणिलें ॥ कृष्णा० ॥ ७ ॥
आठवा बागुल बोलती । गोकुळीं थोर आहे ख्याती ।
त्यानें वधिलें कंसाप्रति । देव सुखी केले ॥ कृष्णा० ॥ ८ ॥
नववा बागुल बोलती । नांव बौद्ध म्हणती ।
कोणा न कळे त्याची गती । बौद्ध रूपें राहिला ॥ कृष्णा० ॥ ९ ॥
होता कलंकीचा रथू । वेगीं येई बा धांवतु ।
नामा म्हणे पंढरीनाथु । बागुल तूं जालासी ॥ कृष्णा० ॥ १० ॥

[२९०]

समस्त मिळोनि गोपाळीं । तया यमुनेच्या पाबळीं ।
कृष्णे मांडिली धुमाळी । कळंबातळीं आनंद ॥ १ ॥[3]

अभंग २८९—(आ.) व (बा.), २९०—(पं.)
१ भिक्षा मागोनि निर्धारीं (आ.) २ साचा (बा.) ३ हमामा हुंबरी घालु कान्हू गोवळिया ॥ धृ० ॥ (पं.)

अनुक्रमणिका

वळुनि कांबळया वेटी । त्याही बांधिल्या मनगटीं ।
विवाद मांडिला निकटीं । धूर्जटी कान्होसी ॥ २ ॥

आतां कृष्णा कवणे ठायीं । जासी तुजवरी आली डाई ।
आमची हमामा हुंबरी देई । उभा राहे पैं कां गा ॥ ३ ॥

कृष्ण म्हणे मी एकवटु । तुम्ही आम्ही गडी वाटूं ।
[1]गोवळी घातलासे हाटु । अति निकटू कान्हूसी ॥ ४ ॥

म्हणे बळीराम पहागा । बोल नव्हे तुम्हाजोगा ।
तुम्ही समर्थ श्रीरंगा । आम्हां कांगा भेटविसी ॥ ५ ॥

ऐसा सकळीं मान केला । तेव्हां कृष्ण संतोषला ।
आनंद चित्तासी पावला । म्हणे भला भला नाम्या ॥ ६ ॥

[२९१]

कान्होबा निवडी [2]आपुलीं गोधनें ॥ धृ० ॥

पांच पांच पोळया तीन भाकरी । दीड कानवला एक पुरी ।
आम्हां धाडिलें वइल्या दुरी । आमची ठकवुन खाल्ली शिदोरी ॥ कान्होबा० ॥ १ ॥

परियेसी शारंगधरा । तुझा बैल चुकला मोरा ।
सांगूं गेलों तुझ्या घरा । पाठीं लागला तुझा म्हातारा ॥ कान्होबा० ॥ २ ॥

परियेसी हृषिकेशी । गाई म्हशीचें दूध पिशी ।
वासरें प्यालीं म्हणून सांगशी । उद्यां ताक नाहीं आम्हांसी ॥ कान्होबा० ॥ ३ ॥

कान्होबा ओढाळ तुझ्या गाई । होत्या नव्हत्या कळंबा ठायीं ।
शिव्या देती तुझी आई ॥ कान्होबा० ॥ ४ ॥

---

अभंग २९१--(पं.) व (शि.)

१ मग पाहूं लागे पाटु । मजसी हट मांडियेला ॥ ३ ॥
नामा म्हणे हुंबरीचे मिसें । कृष्णें लावियेलें पिसें ।
काया वाचा मानसे । तयासी कैसे विसरावे ॥ ४ ॥
वरील अभंगातील ३, ५ व ६ कडवी नाहींत. (पं.)

२ आपुल्या गायी (पं.)

३ शिव्या देईल आमुची आई । वटिकें दाविसी नवाई । आतां कायी बोल नाही ॥ धृ० ॥ (शि.)
पेंदा म्हणे गा हृषिकेशी, आम्हां अवघ्यांचा डोळा चुकविशी ॥
मग चोरूनि गाई दुहिशी, उद्यां ताक नाहीं आम्हासी ॥ ३ ॥
सुदामा म्हणे बा यदुटिळका, आम्हां गांवां धाडिलें ताका ॥
पावा मोहरी आणि कितिका, माझी चोरूनि नेलीं ताटिका ॥ ४ ॥
ऐसे गोपाळांचे गाऱ्हाणें, प्रेमें प्रीति आलिंगुन ॥
नामया स्वामीनें केलीं बुजावणें ॥ ५ ॥ (बा.)



अनुक्रमणिका

विष्णुदास नामा साहे । देवा तूंचि बाप माये ।
अखंड माझे हृदयीं राहे ॥ कान्होबा० ॥ ५ ॥

[२९२]

अरे अरे कान्हया वेल्हाळा । तूं रे बरविया गोपाळा ।
तुज देखियलें डोळां । रे धनुवा हुंबरती ॥ १ ॥
माते दे वो शिदोरी । ऐसें म्हणतसे मुरारी ।
मी जाईन वो दुरी । धेनु चारावयालागीं ॥ २ ॥
आलें बेलें चिलें मेकें । सुरण मिरगोडी पैं तिखें ।
दह्यावांचोनि नव्हें निकें । शिदोरी ताकें कालवूं ॥ ३ ॥
वडजा वांकुडा पेंदा सुदामा । हेंचि पांतिकर आम्हां ।
तेथें विष्णुदास नामा । उच्छिष्ट शितें वेंचितसे ॥ ४ ॥

---

अभंग २९२—(पं.) व (शि.)

● ● ●

अनुक्रमणिका

[२९३]

कुळगुरु वशिष्ठ सांगे नृपवरा । असती गरोदरा तुझ्या कांता ॥ १ ॥
धर्म शास्त्र ऐसें डोहळे पुसावे । त्यांचे पुरवावे मनोरथ ॥ २ ॥
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं । कैकई सदनासी जाता जाला ॥ ३ ॥
मंचकीं बैसली होती ते पापिणी । देखतां नयनीं पहुडली ॥ ४ ॥
सुंदरपणाचा अभिमान मनीं । त्यावरी गर्भिणी नामा म्हणे ॥ ५ ॥

[२९४]

राजा म्हणे इच्छा तुझिये मानसीं । डोहळे मजसी सांग आतां ॥ १ ॥
येरी म्हणे ऐसें वाटतसे जीवा । कनिष्ठासी द्यावा राज्यपट ॥ २ ॥
ज्येष्ठासी धाडावें दुरी दिगंतरा । न ये समाचार त्याचा आम्हां ॥ ३ ॥
जनांत हें निंद्य वेदबाह्य कर्म । करितां अधर्म पाप बहू ॥ ४ ॥
माझिये मस्तकीं ठेवावा हा दोष । तुम्हांकडे लेश नाहीं नाहीं ॥ ५ ॥
निंदीतील जन मज वाटे सुख । ऐकतांची दुःख राया जालें ॥ ६ ॥
वृश्चिकाचे पेंवी तक्षक पडत । घालिताती घृत अग्निमुखीं ॥ ७ ॥
ऐशी व्यथा होय नामा म्हणे त्यासी । उठिला त्वरेसी तेथूनियां ॥ ८ ॥

[२९५]

येतसे दशरथ सुमित्रा मंदिरीं । देखतां सामोरी येती जाली ॥ १ ॥
न माये आनंद तियेचे मानसीं । ठेवी मस्तकासी चरणांवरी ॥ २ ॥
घालोनी आसन प्रक्षाळी चरण । सर्वांगीं लेपन तीर्थोदकें ॥ ३ ॥
गंध धूप दीप पुष्पांचिया माळा । अर्पुनी तांबुला उभी राहे ॥ ४ ॥
कैकयीचें दुःख विसरला राव । पाहोनियां भाव सुमित्रेचा ॥ ५ ॥
होती जे डोहळे तुझिये मानसीं । सांग मजपाशीं पतिव्रते ॥ ६ ॥
प्राणनाथा ऐसें वाटतसे जीवा । वडिलांची सेवा अहर्निशीं ॥ ७ ॥
आवडे हें एक नावडे आणिक । द्यावें मज एक हेंचि आतां ॥ ८ ॥
ऐकतांची ऐसें कांतेचें वचन । आनंदें निमग्न मन होय ॥ ९ ॥
घेऊनियां हातीं रत्नाचें भूषण । टाकी ओवाळून नामा म्हणे ॥ १० ॥

अभंग २९३ ते २९५—(धु.)

[२९६]

दशरथ राजा उठिला तेथुनी । कौसल्ये सदनीं जाता जाला ॥ १ ॥
पाहातसे दृष्टी तेव्हां श्रावणारी । न माये अंतरीं तेज तिचें ॥ २ ॥
तुझिये मानसीं होती जे डोहाळे । सांग वो वेल्हाळे मजपाशीं ॥ ३ ॥
उदरांत असे भक्तांचा कैवारी । तेथें कैंची उरी देहभावा ॥ ४ ॥
सदा समाधिस्थ रामरूप जाली । कौसल्या माउली नामा म्हणे ॥ ५ ॥

[२९७]

न बोलेचि कांहीं इसी काय जालें । भूतें झडपिलें निश्चयेंसी ॥ १ ॥
माझिये अदृष्टीं नाहीं हा नंदन । म्हणोनियां विघ्न ओढवलें ॥ २ ॥
निवारी हें विघ्न वैकुंठनायका । रक्षी या बाळका सुदर्शनें ॥ ३ ॥
तुझा मी किंकर आजी अंबुजाक्षा । द्यावी मज भिक्षा हेचि आतां ॥ ४ ॥
नामाचा उच्चार ऐकतांचि कानीं । नेत्र उघडोनि पाहती जाली ॥ ५ ॥
राजा म्हणे कांहो ऐसी हे अवस्था । कांहो श्रम चित्ता जाला असे ॥ ६ ॥
विश्वाचा मी आत्मा स्वयें असे राम । [1]मजमाजीं श्रम कैंचा असे ॥ ७ ॥
अवतार महिमा वाणी वेद माझा । सुरवरांच्या काजा नामा म्हणे ॥ ८ ॥

[२९८]

रावणें हें केलें लग्नामाजीं विघ्न । असे कीं स्मरण तुजलागीं ॥ १ ॥
आणी रे धनुष्य मारीन रावणा । लंका बिभीषणा देईन मी ॥ २ ॥
अंगद सुग्रीव जांबुवंत वीरा । हनुमंत पाचारा लवकरी ॥ ३ ॥
टाकोनी पर्वत बुजवा रे सागरा । पायवाट करा जावयासी ॥ ४ ॥
लंकेपुढें मोठें माजवीन रण । तोडीन बंधन सुरवरांचें ॥ ५ ॥
विश्वामित्रयाग नेईन मी सिद्धी । मारीन कुबुद्धि दोघांजणां ॥ ६ ॥
खर दूषणांचा घेईन मी प्राण । धनुष्य मोडीन भुजाबळें ॥ ७ ॥
ध्याती मज त्यांची बहुत आवडी । न विसंबे घडी त्यांसी एक ॥ ८ ॥
बोलिला वाल्मिक तैसेंचि करीन । वर्तोनि दाविन नामा म्हणे ॥ ९ ॥

---

अभंग २९६ व २९७—(धु.), २९८—(पं.) व (धु.)
१ मज माझा (धु.)

अनुक्रमणिका

[२९९]

परब्रह्म पूर्ण आलें माझे घरीं । न कळे अंतरीं नृपाचिया ॥ १ ॥
करी ती बडबड होती भूतचेष्टा । पाचारा वसिष्ठा लवकरी ॥ २ ॥
येऊनि वसिष्ठ पाहे कौसल्येसी । नावरती त्यास अष्टभाव ॥ ३ ॥
राजा म्हणे कैसें विपरीत जालें । वसिष्ठा झडपिलें महाभूतें ॥ ४ ॥
श्रावणवधाचें अघ नाहीं जळालें । दुजें हें निर्मिलें प्रारब्धासी ॥ ५ ॥
ऐकतांचि हांसे सावध होऊनि । बोलतसे झणीं नामा म्हणे ॥ ६ ॥

[३००]

विरंचीचा बाप क्षीरसागरवासी । ध्याती योगी त्यासी निरंतर ॥ १ ॥
परेहूनिपर वैखरीहूनि दुरी । कौसल्येचे उदरीं तोचि असे ॥ २ ॥
बोलियेलें जें जें नव्हे असत्य वाणी । न येऊं दे मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥
माझें हें संचित धन्य धन्य आतां । पाहीन मी कांता लक्ष्मीच्या ॥ ४ ॥
धन्य धन्य धन्य अयोध्येचे लोक । वैकुंठनायक पाहातील ॥ ५ ॥
धन्य पशुपक्षी श्वापदें तरुवर । राजा रघुवीर पाहातील ॥ ६ ॥
त्रैलोक्यांत धन्य तूंचि एक नृपा । नामयाच्या बापा पाहातील ॥ ७ ॥

[३०१]

उत्तम हा चैत्रमास । ऋतु वसंताचा [१]दिवस ॥ १ ॥
शुक्लपक्षीं ही नवमी । उभे सुरवर ते व्योमीं ॥ २ ॥
माध्यान्हासी दिनकर । पळभरी होय स्थिर ॥ ३ ॥
[२]धन्य मीच त्रिभुवनीं । माझे वंशीं चक्रपाणि ॥ ४ ॥
सुशोभित दाही दिशा । आनंद नरनारी [३]शेषा ॥ ५ ॥
नाहीं कौसल्येसी भान । गर्भी आले नारायण ॥ ६ ॥
अयोनीसंभव । प्रगटला हा राघव ॥ ७ ॥
नामा म्हणे डोळां । पाहीन भुवनत्रयपाळा ॥ ८ ॥

अभंग २९९—(धु.), ३००—(पं.) व (धु.), ३०१—(धु.) व (बा.)
१ वास (धु.) २ हा चरण (धु.) प्रतीत नाही. ३ विशेषा (बा.)

अनुक्रमणिका

[३०२]

सुवर्णाचा शोभे मस्तकीं मुगुट । हिरे घनदाट तयावरी ॥ १ ॥
विस्तीर्ण कपाळ व्यंकटा भृकुटी । टिळक ललाटीं [1]केशराचा ॥ २ ॥
कमळाकार नेत्र आकर्ण शोभती । कुंडलें झळकती कर्णीं ज्याच्या ॥ ३ ॥
सरळ नासिक [2]आरक्त अधर । हनुवटी सुंदर राघवाची ॥ ४ ॥
कंठाचा आकार कंबुग्रीवा ऐसा । हृदयावरी ठसा द्विजपद ॥ ५ ॥
सुकुमार सुरेख जयाचें उदर । ब्रह्मांडें अपार वसती जेथें ॥ ६ ॥
नाभीं कमळींचा ब्रह्मा नेणे अंत । कडदोरा शोभत कटीं ज्याच्या ॥ ७ ॥
दंडी पेट्या करीं जडित मुद्रिका । पिवळा नेटका पीतांबर ॥ ८ ॥
केशराची उटी सरळ बाहुदंड । चिमणा कोदंड हातीं ज्याच्या ॥ ९ ॥
गर्जती नेपुरें कोमळ चरणीं । वज्रांकुश चिन्हीं विराजित ॥ १० ॥
कौस्तुभ मुक्तमाळा रुळे वैजयंती । भ्रमर भुलती नामा म्हणे ॥ ११ ॥

[३०३]

सांगताती दाया । तुम्हां पुत्र जाला राया ॥ १ ॥
ऐकतांचि ऐसें कानीं । हर्ष न समाये मनीं ॥ २ ॥
उठा उठा वो त्वरेसी । पाचारावें वसिष्ठासी ॥ ३ ॥
ब्राह्मणासी पाचारा । सांगा सर्व नारीनरा ॥ ४ ॥
फोडा फोडा रे भांडारें । आणवा गाईंचीं खिल्लारें ॥ ५ ॥
उभवा उभवा रे गुढी । सोडा [3]वस्त्रांचीं गाठोडीं ॥ ६ ॥
झाडोनियां टाका खडे । घाला केशराचे सडे ॥ ७ ॥[4]
नामा म्हणे भूमंडळा । स्वामी माझा पहा डोळां ॥ ८ ॥

[३०४]

अनंत ब्रह्मांडें जयाचें उदरीं । ध्यातसे त्रिपुरारी अहर्निशीं ॥ १ ॥
पाहातसे मुख दशरथ त्याचें । भाग्य मी तयाचें काय वर्णूं ॥ २ ॥

---

अभंग ३०२ ते ३०४—(पं.) व (धु.)

१ कस्तुरीचा (धु.) २ लावण्य मुखचंद्र (आ.) ३ वस्त्राची या (धु.) ४ हा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही.

अनुक्रमणिका

गंध पुष्प वस्त्रें अर्पोनियां द्विजां । समभावें पूजा सकळांसी ॥ ३ ॥
साखरेच्या गोण्या घाला हत्तीवरी । धाडी घरोघरीं नामा म्हणे ॥ ४ ॥

[३०५]

करितसे स्नान [1]अयोध्येचा पाळक । वस्त्रें अमोलिक परिधान ॥ १ ॥
लावोनियां भाळीं कस्तुरी केशर । करी नमस्कार वसिष्ठासी ॥ २ ॥
पुण्याहवाचनीं बसे दशरथ । त्रिभुवनीं समर्थ तूंचि एक ॥ ३ ॥
वेदमंत्र घोष करिती ऋषीश्वर । पुष्पें सुरवर वरुषती ॥ ४ ॥
[2]आणिती आहेर अयोध्येचे जन । करिती गायन गायक जे ॥ ५ ॥
नाचती अप्सरा वाजती नगारे । वाजंत्री तुतारे भोंवारें ही ॥ ६ ॥
गुलालाची धूम रंग वस्त्रावरी । बंदीजन द्वारीं गर्जताती ॥ ७ ॥
नामा म्हणे इंद्रें पाहोनियां सभा । नाहीं ऐसी शोभा चित्तीं म्हणे ॥ ८ ॥

[३०६]

बाई कशाच्या नवबता । पुत्र जाला दशरथा ॥ १ ॥
चला चला तेथें जाऊं । कौसल्येचें बाळ पाहूं ॥ २ ॥
नवसे बहुत । तिशीं पावला भगवंत ॥ ३ ॥
घ्या ग घ्या ग त्वरें वाण । झगा फडकीं पेहरण ॥ ४ ॥
करुनि शृंगारा । येती राजयाच्या घरा ॥ ५ ॥
पाहतां सुकुमार सांवळा । लवूं विसरला डोळा ॥ ६ ॥
सार्थक जन्माचें । नामा म्हणे जाले त्यांचें ॥ ७ ॥

[३०७]

भांडारी येऊनि करिती प्रार्थना । द्विजांसी [3]दक्षिणा काय द्यावी ॥ १ ॥
जया लागे जितुकें तितुकें त्यानें घ्यावें । तुम्हीं न रहावें उभे तेथें ॥ २ ॥
धांवताती तेव्हां विप्र सकळिक । एकावरी एक पडताती ॥ ३ ॥
करूं नका घाई सर्वांसी पुरेल । न राहे दुर्बळ यांत कोणी ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें धन वांटी राजा । सुखी केल्या प्रजा सकळिक ॥ ५ ॥

---

अभंग ३०५ ते ३०७--(धु.)
१ अजाचा बाळक (आ.) २ येवोनि (धु.) ३ दक्षणा (आ.)

अनुक्रमणिका

[३०८]

ब्राह्मणांची इच्छा पूर्ण जाली जेव्हां । आशिर्वाद तेव्हां वदताती ॥ १ ॥
कल्पकोटी यासी नाहीं नाहीं भय । सकळांचे ध्येय हेंचि असे ॥ २ ॥
तपाचिया राशी जाहल्या बहुत । म्हणोनियां सुत जाला तुज ॥ ३ ॥
तथास्तु म्हणोनि जोडित अंजुळ । पायांवरी भाळ नामा म्हणे ॥ ४ ॥

[३०९]

वाई कौसल्येचा पुत्र । दिसे सर्वांही विचित्र ॥ १ ॥
ऐसें वाटे माझ्या चित्तीं । प्रगटली विष्णूमूर्ती ॥ २ ॥
झणें होईल या दृष्ट । मोडताती कानीं बोट ॥ ३ ॥
तिच्या भाग्यें असों सुखी । नामा म्हणे सर्वांमुखीं ॥ ४ ॥

[३१०]

धन्य ते संसारीं पवित्र ते वाणी । अखंड उच्चारणीं रामनाम ॥ १ ॥
तयांचीच एक सरली येरझार । उतरले पार भवनदी ॥ २ ॥
वधोनी ताटिका सुबाहुही देख । सिद्धी नेला मख कौशिकाचा ॥ ३ ॥
पहावया यावें स्वयंवर सीतेचें । आलें जनकाचें पत्र तेथें ॥ ४ ॥
मारगीं चालतां ब्रह्मयाची बाळा । उद्धरली शिळा पदरजें ॥ ५ ॥
मोडील धनुष्य तया हे देईन । केला होता पण जनकानें ॥ ६ ॥
रावणादि राजे आले थोर थोर । त्यांचा उतरला नूर पाहातांची ॥ ७ ॥
अहर्निशीं जया ध्यानीं ध्याय भोळा । तो उठला सांवळा बाप माझा ॥ ८ ॥
सुरा असुरा असाध्य ऐसें तें प्रचंड । तें तीं ठायीं कोदंड मोडियेलें ॥ ९ ॥
पाहोनियां ऐसें नामा म्हणे बळ । सीता घाली माळ रघुवीरा ॥ १० ॥

[३११]

संत समागमें चाले दळभारू । आशा तृष्णा देशधडी अहंकारू ॥ १ ॥
दुम दुम दुम दुम भेरी वाजे । आले अयोध्येसी श्रीरघुनाथ राजे ॥ २ ॥
भक्तभद्रजाती दोहों बाही चालत । विष्णुदास नामा कीर्ति वाखाणित ॥ ३ ॥

---

अभंग ३०८ ते ३११—(आ.)

[३१२]

पैल आला रामराणा । लंका दिधली बिभीषणा ॥ १ ॥
नळनीळ जांबुवंत । मध्यें चाले रघुनाथ ॥ २ ॥
मागें वानराचे थाट । पुढें गर्जताती भाट ॥ ३ ॥
केला अयोध्या प्रवेश । म्हणे नामा विष्णुदास ॥ ४ ॥

[३१३]

राम पिता सीता माता । लक्ष्मण सोयरा चुलता ॥ १ ॥
तयांसी भेटों जाऊं आतां । चित्रकुटींच्या पर्वता ॥ २ ॥
नामा म्हणे माझें गोत । चित्रकुटीं असे नांदत ॥ ३ ॥

[३१४]

काळे गोरे धनुर्वाडे । ते चालताती रामापुढें ॥ १ ॥
राम निळिये गुढारी । कनकदंड चौरेवरी ॥ २ ॥
चला चित्रकूटीं जाऊं । राम दशरथाचा पाहूं ॥ ३ ॥
अयोध्यें केला अवतारु । राम नामया दातारु ॥ ४ ॥

[३१५]

गोरे सांवळे धनवटे । एक चालती एकापुढें ॥ १ ॥
राम निळीय गुढारी । कनकदंड चौरेवरी ॥ २ ॥
राम लक्ष्मण विजयी जाले । आनंदें अयोध्ये आले ॥ ३ ॥
चंद्रगिरीचे तळवटीं । राम सीतेसी जाली भेटी ॥ ४ ॥
चंद्रगिरी चला जाऊं । राम दाशरथी पाहूं ॥ ५ ॥
चंद्रगिरी केला वास । म्हणे नामा विष्णुदास ॥ ६ ॥

[३१६]

म्हणसी बिभीषण शाहणा । परि तो महामूर्ख जाणा ॥ १ ॥
काय तो रामासी भेटला । आवघा रामचि नाहीं जाला ॥ २ ॥

---

अभंग ३१२—(पं.), (शि.), (धु.) व (न.), ३१३ व ३१४—(पं.) व (शि.), ३१५—(शि.), ३१६—(पं.), (शि.) व (धु.)

राम दृष्टी देखतांची । पदवी न घेववेचि त्याची ॥ ३ ॥
कोण हित केलें तेणें । राम नाकळी चिंतनें ॥ ४ ॥
जरी तो जाला लंकापती । नाश पावेल कल्पांतीं ॥ ५ ॥
नामया स्वामीतें [1]जाणोन । अवघा रामचि होईन ॥ ६ ॥

[३१७]

गुंडाळिल्या जटा तोचि माथा फेटा । गोजिरा गोमटा रामचंद्र ॥ १ ॥
वैकुंठींचा राजा म्हणवितो योगी । दावावया जगीं योग करी ॥ २ ॥
आकर्ण लोचन हातीं चापबाण । वल्कलें भूषणें नेसोनियां ॥ ३ ॥
पितृवचनालागीं मानोनि साचारी । जाला पादचारी वनीं हिंडे ॥ ४ ॥
देवांचिया काजीं ठेवोनियां निज । सर्वांपरी सज्ज जाला अंगें ॥ ५ ॥
नामा म्हणे त्यांचें न कळे कौतुक । आपुलिया सुख वाढावया ॥ ६ ॥

[३१८]

श्रीराम सोयरा आला माझ्या घरा । दिधला म्यां थारा हृदयीं माझ्या ॥ १ ॥
पावलों विश्रांति धालें माझें मन । न लगे आतां ध्यान शिकावया ॥ २ ॥
ज्यासाठीं हिंडणें जटामौनमग्न । धरिलें तेणें ठाणें हृदयीं माझ्या ॥ ३ ॥
योग याग तप करावें साधन । तोहि जाण ओठीं सदा वसे ॥ ४ ॥
तीर्थयात्रा देव ज्यासाठीं करावें । तें ब्रह्म वरवें नांदे देहीं ॥ ५ ॥
ब्रह्मचर्यादिक आश्रम साधावे । केली तया देवें देहीं वस्ती ॥ ६ ॥
वेदशास्त्र पुराण ज्यासाठीं पठण । तो नांदे परिपूर्ण हृदयीं माझ्या ॥ ७ ॥
ऐसा तो सज्जन जिवलग सांगाती । दिधली मज विश्रांती नामसंगें ॥ ८ ॥
तैसें नव्हे ज्ञान फुटक्या हांडोऱ्याचें । धरूनियां वाचे खोखा वाजे ॥ ९ ॥
स्वधर्मी विचार वेदांचें अन्वयें । लाधले [2]हे पाय गुरूकृपें ॥ १० ॥
अभंग भंगेना फोडितां फुटेना । गुरूकृपें जाणा प्राप्त जालें ॥ ११ ॥
चावळी वटवट बोलणें बासर । हे तंव अवघे चार मर्कटाचे ॥ १२ ॥
परनिंदा परद्रोहो करणें या संतांचा । जाळावी ते वाचा ज्ञान त्याचें ॥ १३ ॥

---

अभंग ३१७—(आ.), ३१८—(पं.). (शि.) व (बा.)
१ जिकोन (शि.) २ उपाय (बा.)

न लगे सोंग धरणें देह ताप करणें । ऐसें निज ध्यान हातां आलें ॥ १४ ॥
नाम घेतां रूप हृदयीं बिंबलें । सर्वत्र देखिलें तेचि डोळां ॥ १५ ॥
नाममंत्र बीज नाहीं जंववरी । केशव तंववरी प्राप्त नाहीं ॥ १६ ॥
नामाचे धारक केशवरूप देख * वैकुंठीचें सुख रुळे पायीं ॥ १७ ॥
नामेंविण ज्ञान नपुंसक ऐसें । नातळती कैसे साधुसंत ॥ १८ ॥
नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम । नामरूपा भिन्न नाहीं नाहीं ॥ १९ ॥
आकारला देव नाम रूपा आलें । म्हणुनि स्थापिलें नाम देवें ॥ २० ॥
नामा परता मंत्र नाहीं वो आणिक । सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥ २१ ॥
नामा म्हणे ज्ञान केशव केवळ । जाणती प्रेमळ भले भले ॥ २२ ॥

[ ३१९ ]

हनुमंत गेला सीताशुद्धिलागीं । लंका मध्यभागीं घेऊनियां ॥ १ ॥
माता जानकीच्या करीत शुद्धीसी । हिंडे गृहदेशीं राक्षसांच्या ॥ २ ॥
न देखे तो सती सीतादेवी माया । अकस्मात तया वनामाजीं ॥ ३ ॥
शिंसीवावृक्षाचे असे तळवटीं । समीप निकटीं राक्षसाचे ॥ ४ ॥
न चले उपाय कांहीं तो बोलाया । स्मरे रामराया तये काळीं ॥ ५ ॥
श्रीरामें मुद्रिका दिली होती संगें । तयासी अव्यंग सोडावया ॥ ६ ॥
वृक्षाचिया माथां बैसोनियां बळी । देत करकमळीं सोडूनियां ॥ ७ ॥
जानकी अवलोकी श्रीरामाची मुद्रा । कोठोनी कपींद्रा आणलीसे ॥ ८ ॥
सुखी रामराणा कवणिये वना । माझिया तूं प्राणा बोले वेगीं ॥ ९ ॥
ऐकोनि कपींद्र चरणासी वंदी । म्हणे रामचंद्र सुखी असे ॥ १० ॥
सहितसौमित्र वनामाजीं आहे । शुद्धीलागीं पाहे पाठविलें ॥ ११ ॥
तुझेनि वियोगें रामराजा दुःखी । यालागीं तुज देखीं पाठविलें ॥ १२ ॥
ऐकतांचि वाणी करीत आक्रोशा । म्हणे राम कैसा सोडियेला ॥ १३ ॥
नानापरी खेद आलाप करूनी । हा हा रामवाणी बोलतसे ॥ १४ ॥
समीप जे होते रक्षपाळ बळी । ऐकोनि आरोळी दूर जाले ॥ १५ ॥
तये संधीमध्यें हनुमंत खालौता । येवोनियां माता वंदितसे ॥ १६ ॥
क्षुधाक्रांत भारी म्हणे काय खाऊं । सांगसी उपाऊ तरी येथें ॥ १७ ॥

अभंग ३१९—(आ.)

वनामाजी मेवा घेऊनियां कांहीं । क्षुधेसी ते पाही शांतवावी ॥ १८ ॥
म्हणे सीता दूता रक्षपाळ होती । निरोध करिती तुजलागीं ॥ १९ ॥
म्हणोनियां पाही भूमिगत कांहीं । घेऊनि स्वदेहीं विश्रांतीसी ॥ २० ॥
पडलें तें घेई ऐसी आज्ञा पाही । वंदोनिया पायीं संतोषला ॥ २१ ॥
करोनी उड्डाण वृक्षमाथां बैसे । उपडोनि झाडास हालवीत ॥ २२ ॥
खालीं पाडी फळें तयांचें भोजन । करूनियां वन विध्वंसिलें ॥ २३ ॥
रक्षपाळ सारे मिळोनी कपींद्रा । धरावया सारा यत्न केला ॥ २४ ॥
न चढे हातासी बहु बळ त्यासी । राक्षसां विध्वंसी हातपायीं ॥ २५ ॥
वृक्षाचेनि घायें मारिलें उपायें । ऐसी बळ सोय दाखवीत ॥ २६ ॥
जंबूमाळी बागीं तया अधिकार । धांवोनी सत्वर रायापाशीं ॥ २७ ॥
मात ते घेऊनि आला तो धांवुनि । कपीराज वनीं आला एक ॥ २८ ॥
त्यानें सर्व वन पाडिलें उपडोन । कोणाचा तो कोण कळेना हो ॥ २९ ॥
राजा करी आज्ञा धरा बांधा त्याला । मारा वानराला वेगीं जा रे ॥ ३० ॥
ऐकतांचि वाणी भूपामुखींची हो । उठिले लवलाही राक्षसगण ॥ ३१ ॥
जावोनि वेढिला कपिराजराणा । धनुष्यासी बाणां लावूनियां ॥ ३२ ॥
मारितां बाणासी न लागे कपीसी । तेव्हां युक्ति कैसी आरंभिली ॥ ३३ ॥
करूनि फांसासी धरूं म्हणती त्यासी । न ये तो फांसासी आटोपितां ॥ ३४ ॥
धरिती जरी बाही निघोनियां जातां । न चढे तो हाता कवणाच्या ॥ ३५ ॥
थोर जरी फांसा होत तो लहान । जाय तो निघोन फांशांतुनी ॥ ३६ ॥
लहान जरी केला तरी होतो थोर । फांशाचा विचार व्यर्थ करिती ॥ ३७ ॥
ऐशापरी जाले श्रमातुर भारी । कपि तो विचारी कार्य पुढें ॥ ३८ ॥
म्हणून फांशांत पडे तो तेधवां । धरोनी वानरा नेती दूत ॥ ३९ ॥
सन्मुख रावणें देखुनि कपीसी । करी कौतुकासी अपूर्व हो ॥ ४० ॥
कधीं नाहीं ऐसें स्वरूप देखिलें । येणें फार केलें नाशालागीं ॥ ४१ ॥
पुसत तूं कोण कवण कार्यालागीं । पातलासी वेगीं याच ठायीं ॥ ४२ ॥
वानर म्हणे आलों मूर्खा रावणा रे । रामदूत खरे सीताशुद्धि ॥ ४३ ॥
ऐकोनि रावण म्हणे यासी जाळा । शेंपूट गुंडाळा अग्नि लावा ॥ ४४ ॥
कपीसी पुसिलें मरण कोणे ठायीं । येरू पुच्छ दावी म्हणोनियां ॥ ४५ ॥
समग्र लंकेची आणोनियां वस्त्रें । कपी पुच्छ पुरें न होयची ॥ ४६ ॥

तेव्हां राजधानी आणोनि वेष्टितां । परी तो पुरतां न होयची ॥ ४७ ॥
तेव्हां तेल घाला म्हणे तो रावण । दूत ते धांवोन टाकिताती ॥ ४८ ॥
लावूनि अग्निसी केला मोठा ज्वाळ । वानर तत्काळ उडाला हो ॥ ४९ ॥
लंकेची ते केली सारी तेणें होळी । सहित मंडळी राजघरें ॥ ५० ॥
भुभुक्कार केला वानर उडाला । लंकेमाजीं जाला प्रळय हो ॥ ५१ ॥
अग्नीचा उबाळा धुरानें दाटला । देखे कपी त्याला सुखरूप ॥ ५२ ॥
मुखासी लागला पाहतांची डोळां । म्हणोनि तो जाला शामवर्ण ॥ ५३ ॥
येवोनी लवलाही श्रीरामातें पाही । नमूनि सर्वही सांगितलें ॥ ५४ ॥
तेव्हां नामा म्हणे होतों मी जवळा । चरणकमळां ध्यात तेथें ॥ ५५ ॥

• • •

अनुक्रमणिका

[ ३२० ]

निर्गुणींचें वैभव आलें भक्तिमिषें । तें हें विठ्ठलवेषें ठसाविलें ॥ १ ॥
बरविया बरवें पाहतां नित्य नवें । हृदयीं ध्यातां निवे त्रिविधताप ॥ २ ॥
चोवीसांवेगळें सहस्रांआगळें । निर्गुणा निराळें शुद्धबुद्ध ॥ ३ ॥
वेदां मौन पडे श्रुतीसी कानडें । वर्णितां कुवाडे पुराणांसी ॥ ४ ॥
भावाचें आळुकें भुललें भक्तिसुखें । दिधलें पुंडलिकें साधूनियां ॥ ५ ॥
नामा म्हणे आम्हां अनाथां लागुनी । निडारलें नयनीं वाट पाहे ॥ ६ ॥

[ ३२१ ]

आषाढी कार्तिकी विसरूं नका मज । सांगतसे गुज पांडुरंग ॥ १ ॥
पतितपावन मी तो आहे खरा । तुमचेनि बरा दिसतसें ॥ २ ॥
तुम्हीं जातां गांवा हुरहुर माझे जीवा । भेटाल केधवां मजलागीं ॥ ३ ॥
धांवोनियां देव गळां घाली मिठी । स्फुंदस्फुंदुन गोष्टी बोलतसे ॥ ४ ॥
तिन्हीं त्रिभुवनीं मज नाहीं कोणी । म्हणे चक्रपाणि नामयासी ॥ ५ ॥

[ ३२२ ]

निर्विकल्प निराकारू । निःशून्य निराधारू ।
निर्गुण अपरंपारू । चिदानंद सांवळें ॥ १ ॥
तया पुंडलिकासाठीं । येऊनि उभें वाळवंटीं ।
दोन्ही कर ठेवूनि कटीं । प्रसन्न दृष्टी पाहातसे ॥ २ ॥
म्हणऊनि उठा घ्या रे वाट । ठाका पंढरी वैकुंठ ।
येर वाउगे काय कष्ट । ब्रह्मी भेट पंढरीये ॥ ३ ॥
मूळग्राम मायापूर । पडिलें [१]भूतग्रामाचार ।
म्हणऊनि कर जघनावर । उभा राहुनि दावितसे ॥ ४ ॥
विठ्ठल नाम हृदयीं धरा । हाचि उतार पैलपारा ।
मग नाहीं येरझारा । शंभू कुमरा सांगतसे ॥ ५ ॥
भेटी चौघे मुरडले । अठरा धांवतां भागले ।
पंथी साही भांडले । ते अद्यापि बुझले नाहीं ॥ ६ ॥

अभंग ३२०—(पं.) व (भा.), ३२१—(शि.) व (धु.) ३२२—(पं.) व (शि.)
१ भूतग्रामचार (पं.)

अनुक्रमणिका

जो सहस्रामाजीं न दिसे । चोविसांत न भासे ।
दो सहस्र अनारिसे । पाहतां अरे न दिसेचि ॥ ७ ॥
लयलक्ष लावूनि समाधि । योगियां हेचि उपाधि ।
उघडा डोळां प्रेमपदीं । रे विठोजी न्याहाळा ॥ ८ ॥
येर वाउगि खटपट । ठाका पंढरी वाळुवंट ।
हरुनि मनुष्यपण दृष्ट । चतुर्भुज करील ॥ ९ ॥
जना ऐहिक पाहारे हित । हें पंढरीचें कुळदैवत ।
येर वाउगे खेचर भूत । रे संगीतं चित्रींचें ॥ १० ॥
पूर्वज उद्धरावयाचि चाडु । तरी वेणुनादीं जेवण करा गोडु ।
कोटिकुळें उद्धरती सुरवाडू । तुम्ही रे पावाल कैवल्य ॥ ११ ॥
धन्य धन्य तो संसारीं । जेणें देखिली पंढरी ।
जेणें सप्रेम होऊनि महाद्वारीं । लोटांगण घातलें ॥ १२ ॥
केलें चंद्रभागे स्नान । आणि संतचरणीं दर्शन ।
नामघोषें निवे मन । समाधान जीवासी ॥ १३ ॥
पंढरी हें वैकुंठ भुवन । म्हणऊनि करी कांरे दरुषन ।
मग नाहीं आया गमन । रे सुरगण वंदिती ॥ १४ ॥
भुक्ति मुक्तिचा दातारू । तो हा वोळगा सारंगधरू ।
नामया स्वामीचा दातारू । रुक्मादेवीवरू पंढरीये ॥ १५ ॥

[ ३२३ ]

अनिर्वाच्य ब्रह्म निगम म्हणती । शिणले वेवादती अठरा साही ॥ १ ॥
तें हें पुंडलिकें चोहांटा उभें केलें । भावें भुलविलें पंढरीये ॥ २ ॥
घ्या रे घ्या रे तुम्हीं कैवल्याचें पीक । देतो पुंडलिक सकळ जीवां ॥ ३ ॥
जें उपनिषदांचें मथित जें साराचें यथार्थ । तो हा पंढरीनाथ प्रगट जगीं ॥ ४ ॥
हरिहर विरंची त्रिमूर्ती पैं हाची । माउली दीनांची लोभापर ॥ ५ ॥
जो श्रवणांचा श्रवण नयनांचा नयन । ज्ञानाचा दर्पण दृष्ट होय ॥ ६ ॥
आदिमध्यअन्तीं व्यापक सर्वांभूतीं । तो हा आला व्यक्ति भक्तिभावें ॥ ७ ॥
सच्चिदानंद आनंदघन परिपूर्ण । कारण महाकारण प्रभा हाचि ॥ ८ ॥
चित्ता चेतवितां बुद्धीतें पाळितां । मनादि चाळितां इंद्रियासी ॥ ९ ॥

अभंग ३२३—(पं.) व (धु.)

अनुक्रमणिका

तो या चराचरा जिवलग सोईरा । म्हणोनि अनुसरा पांडुरंगा ॥ १० ॥
नामा म्हणे काया वाचा मनें त्याचें । नाम जपा कैंचें जन्ममरण ॥ ११ ॥

[ ३२४ ]

ज्ञानियांचें ज्ञेय ध्यानियांचें ध्येय । पुंडलिकाचें प्रिय सुख वस्तु ॥ १ ॥
तें हें समचरण उभें विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठल रूप ॥ २ ॥
जें तपस्वियांचे तप जें जपकांचें जाप्य । योगियांचें गौप्य परमधाम ॥ ३ ॥
जें तेजकांचें तेज जें गुरुमंत्राचें गुज । जें पूजकांचें पूज्य कुळदैवत ॥ ४ ॥
जें जीवनातें जीवविते पवनातें निववितें । जें भक्तांचें उगवितें मायाजाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे तें सुखचि आयतें । जोडलें पुंडलिकातें भाग्य योगें ॥ ६ ॥

[ ३२५ ]

वेदां अगोचर परब्रह्म कारण ।
योगियां हृदयींचें परमतत्त्व निर्वाण ।
आकळूं न कळेचि शेखीं धरियेलें मौन ।
तें रूप पंढरिये विटे समचरण ॥ १ ॥
कानडा विठ्ठल वो उभा भिवरेतीरीं ।
[1]भेटिचे आर्त वो जीवा लागलें भारी ॥ धृ० ॥
भूवैकुंठ पंढरी हे देवें रचियेली पैं गा ।
शिवें ती वंदियेली विठो समचरणांची गंगा ।
सदाचा नामघोषु कलिमल जाय भंगा ।
काय वानूं सुख तेथिचें भेटलिया पांडुरंगा ॥ २ ॥
विठ्ठल नाम वाचे जना हाचि उपचारु ।
म्हणवुनि दावीतसे कटीं ठेवूनियां करू ।
येरासी मायानदी काम क्रोध मगरू ।
ठेवा हा नामयाचा स्वामी विठ्ठलवीरू ॥ ३ ॥

[ ३२६ ]

वेडावली [2]वाचा वेदाची बोलतां । देवा पाहूं जातां अनिर्वाच्य ॥ १ ॥
अनिर्वाच्य वाचा बोलावया गेली । जिव्हा हे चिरली भूधराची ॥ २ ॥
भूधराची जिव्हा जालीसे कुंठित । नामा म्हणे अंत नलगे त्याचा ॥ ३ ॥

---

अभंग ३२४—(पं.), (शि.) व (न.), ३२५—(पं.) व (शि.), ३२६—(पं.), (शि.) व (गं.)
१ भक्तांचे (पं. व आ.) २ वाणि (पं. व गं.)

अनुक्रमणिका

[ ३२७ ]

[1]हवा हवा म्हणताती श्रुति । परि त्या नेणती भुललीया ॥ १ ॥
तुझिया रूपा नेणती अगा कमळापती । बाळक म्हणती गौळियांचें ॥ २ ॥
विष्णुदास नामयानें दावियेल्या खुणा । पंढरीचा राणा श्रीविठ्ठल ॥ ३ ॥

[ ३२८ ]

पुष्पासी परिमळु दुध घृत मेळु । उंस तो रसाळु बीज नाहीं ॥ १ ॥
तैसें परब्रह्म आहे तें निर्वाण । वर्णितां पुराण न पडे ठायीं ॥ २ ॥
दीपाचीही दीप्ति दर्पणाची कांति । तैसी ब्रह्ममति कवण जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे जैसें सर्वां घरीं आकाश । केशव परमहंस तैसा जाणा ॥ ४ ॥

[ ३२९ ]

निर्गुण सगुण नाहीं ज्या आकार । होऊनि साकार तोचि ठेला ॥ १ ॥
जळीं जंळगार दिसे जैशा परी । तैसा निराकारीं साकार हा ॥ २ ॥
सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण । निर्गुण सगुण ययापरी ॥ ३ ॥
ऐसा पूर्णपणें सहजीं सहज । सखा केशिराज प्रगटला ॥ ४ ॥
पांडुरंगीं अंगें सर्व जालें जग । निववी सर्वांग नामा म्हणे ॥ ५ ॥

[ ३३० ]

आपणची कर्ता आपणची मित्र । आपण सर्वत्र हरी जाला ॥ १ ॥
साधन साधितां हरि दिसे पूर्ण । प्रपंच हें भान न देखे डोळां ॥ २ ॥
किमर्थ हें टवाळ मायामोह जाळ । वांयांच पाल्हाळ कोरडे करी ॥ ३ ॥
नामा म्हणे सखोल विठ्ठल पूर्ण बोल । उच्चारितां मोल नलगे कांहीं ॥ ४ ॥

[ ३३१ ]

एक तत्त्व एकाकार सर्व देशीं । एक तो नेमेंसी सकल जनीं ॥ १ ॥
ऐसें ब्रह्म पहा आहे सर्व एक । नलगे विवेक करणें कांहीं ॥ २ ॥

अभंग ३२७ व ३२८—(पं.) व (शि.), ३२९—(आ.), ३३० व ३३१—(पं.) व (शि.)
१ हावो हावो (शि. व पं.)

अनुक्रमणिका

मिथ्या हें डंबर माया मथितार्थ । हरि हाचि स्वार्थ वेगीं करी ॥ ३ ॥
नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद । नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

[ ३३२ ]

[1]ज्ञान सत्य मुक्त शुद्ध बुद्ध युक्त । कारण रहित निरंजन ॥ १ ॥
तें आम्हीं देखिलें चर्मचक्षु दृष्टी । उभा वाळवंटीं पंढरीयें ॥ २ ॥
वेदां अगोचर तयां सहस्रमुखां । तें जालें पुंडलिका लोभापर ॥ ३ ॥
परतल्या श्रुती म्हणती नेती नेती । आम्हां गातां गीतीं सांपडलें ॥ ४ ॥
स्वरूपाचा निर्धार नेणती पुराणें । शिणली दरुशनें वेवादतां ॥ ५ ॥
नामा म्हणे यासी भावची कारण । पावावया चरण केशवाचे ॥ ६ ॥

[ ३३३ ]

ब्रह्मीं ब्रह्म पूर्ण मुळीं नाहीं जग । सर्व माया योग कल्पनेचा ॥ १ ॥
स्थावर जंगम सर्व मायोपाधि । जाण पां त्रिशुद्धि आत्मज्ञानें ॥ २ ॥
रवीच्या किरणें जैसें मृगनीर । तैसें ब्रह्मीं कीर विश्व जालें ॥ ३ ॥[2]
नामा म्हणे विठ्या ऐक निज खूण । स्वरूपीं तल्लिन होऊनि राहे ॥ ४ ॥

[ ३३४ ]

वंदावें तें काय निंदावें तें काय । सर्वांठायीं पाहे कोंदाटलें ॥ १ ॥
आहे कवणा ठायीं नाहीं कवणा ठायीं । ठायींच्या पैं ठायीं कोंदाटलें ॥ २ ॥
रविरश्मीचें तेज सर्वांठायीं असे । त्या परि अनायासें बुझतु जाय ॥ ३ ॥
भाव तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । जाणोनियां वर्म म्हणे नामा ॥ ४ ॥

[ ३३५ ]

हात पाय सर्व मिळोनियां मेळा । चला पाहूं डोळां म्हणताती ॥ १ ॥
देखणें तें नव्हें देखतील कैसें । देखणाची असे सर्व डोळां ॥ २ ॥

---

अभंग ३३२—(न.), ३३३—(पं.), (शि.) व (भा.), ३३४ व ३३५—(आ.)
१ सत्य नित्य युक्त शुद्ध बुद्ध मुक्त । (न.)
२ (भा.) मध्ये ३ व ४ या चरणांच्यामध्ये आणखी एक चरण आहे तो असा—
एकमेव तेची जाले नानाकार । जाण पां निर्धार ब्रह्मीं माया ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

चंचुभुत अंश अंशांत मिळाली । निर्गुणाची खोली देव जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे तेव्हां तुज पाहों आला । पाहोनि तो ठेला सर्वांभूतीं ॥ ४ ॥

[ ३३६ ]

देख देख देख पैल पैल । पैल उभा असे विटेवरी ॥ १ ॥
खोळबुंथीचा आकारु झळके पीतांबरु । सौभाग्य सुंदरु विठ्ठल देव ॥ २ ॥
दान दीक्षा गुरु नामया दातारु । धरावया नागरु केशिराज ॥ ३ ॥

[ ३३७ ]

काष्ठीं अग्नी असे प्रगटे नयनीं । काष्ठींही असोनि वेगळाची ॥ १ ॥
तैसें निर्धारितां असे पैं सकळां । दावितां निराळा पांडुरंग ॥ २ ॥
तरु बीजीं जैसें सर्व व्यापक असे । जळाविण नसे फळ पहा कीं ॥ ३ ॥
नामा म्हण बीज नासिलें तें भोग । तूंचि पांडुरंग आम्हांसाठीं ॥ ४ ॥

[ ३३८ ]

वैकुंठीं पाहें तंव चतुर्भुज दिसे । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ १ ॥[1]
क्षीरसागरीं पाहें तों तेथें निद्रस्त । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ २ ॥
द्वारकें पाहें तव पाताळीं चरण । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ ३ ॥
हृदयीं तव अव्यक्तची दिसे । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसा सर्व गुण संपूर्ण । पंढरिये उभा शोभतसे ॥ ५ ॥

[ ३३९ ]

निर्गुण सगुण नव्हे ते समान । तैसें तेंहि जाण योगाभ्यासीं ॥ १ ॥
प्रल्हादासी हरि शंख चक्र गदा । सगुण गोविंदा शोभतसे ॥ २ ॥

---

अभंग ३३६—(पं.) व (शि.), ३३७—(आ.), ३३८—(पं.), (आ.) व (बा.), ३३९—(पं.) व (शि.)

१ हा अभंग (पं.) व (बा.) प्रतींत पुढीलप्रमाणे आढळतो—
चरण (१) आहे तसाच.
चरण (२) क्षीरसागरीं म्हणों तरी निद्रिस्तची दिसे । परि सुंदर ........
चरण (३) लंकेसि म्हणों तरी वानराचेनि संगें । परि सुंदर ........
चरण (४) गोकुळीं म्हणों तरी गौळियांचे बुंथी । परि सुंदर ........
चरण (५) वेदु यासी म्हणों तरी नाहींत करचरण । परि सुंदर .......
चरण (६) वरील ४ था चरण.
चरण (७) वरील ५ वा चरण.

अर्जुनासी देव उभा पाचारासी । सखा उद्धवासी साक्ष दावी ॥ ३ ॥
नामा म्हणे माझा केशिराज भोळा । दाविसी गोपाळा बाललीला ॥ ४ ॥

[ ३४० ]

अमराचें ठेवणें विश्वाचें जीवन । सौभाग्य लावण्य रखुमाईचें ॥ १ ॥
धन्य गौळियांचें जिणें कृष्ण बाळपण । यशोदानंदन क्रीडा करी ॥ २ ॥
अंगें स्थूलपणें ब्रह्म खेळा येणें । लीला सामावणें रोमरंध्रीं ॥ ३ ॥
विष्णुदास नामा दैवेंचि लहाणें । ज्या घरीं खेळणें परब्रह्म ॥ ४ ॥

[ ३४१ ]

धन्य गोकुळ महीतळीं मंडन । सुखावलें ब्रह्म जालें सगुण ॥ १ ॥
काय न कळे आवडी त्याचा भाव । सुख नेलें रे गोवळीं म्हणती देव ॥ २ ॥
आली वैकुंठभुवनीं विकृति । ते हे पाहवी [1]गौळियांची विश्रांती ॥ ३ ॥
योगियांचें ध्यानीं उबगलें । तया गौळियांचे अनुरागीं रंगलें ॥ ४ ॥
वेद श्रुतीसी पारू न कळे । कोण सुख सर्वांहुनि आगळें ॥ ५ ॥
नामयाचा स्वामी आमुचें कुलदैवत । शरण जाऊनि गौळिया मागु [2]उच्छिष्ट ॥ ६ ॥

[ ३४२ ]

उपाधिनिर्मळ शोभती चरण । नादबिंदु पूर्ण मध्यभागीं ॥ १ ॥
कदंबावरतीं चढे वनमाळी । शोभती निढळा उर्ध्वपुंड्र ॥ २ ॥
श्रवणीं कुंडलें शोभती नक्षत्र । श्रीमुख पवित्र दिसों येत ॥ ३ ॥
नामा म्हणे मज ढापवेना डोळे । करुणा कल्लोळें देखुनियां ॥ ४ ॥

[ ३४३ ]

यमुने पाबळीं देखियली मूर्ति । तळपती दिप्ती तेजोमय ॥ १ ॥
सांवळें सुंदर ओंकार वर्तुळ । मध्यें घननीळ पाचारितो ॥ २ ॥

---

अभंग ३४० व ३४१—(पं.) व (शि.), ३४२—(आ.), ३४३—(पं.) व (शि.)
१ गोकुळीची (पं. व शि.)   २ उचित (पं. व शि.)

अनुक्रमणिका

सुरंग ओतली प्रेमतनु छाया । तेणें तुझी माया काय वाणू ॥ ३ ॥
नामा म्हणे विठो [1]चातुर्य करुणा । गुणागुणीं [2]किरणा प्रभा भासे ॥ ४ ॥

[३४४]

विटेवरी समचरण सुंदर । बाळ सुकुमार यशोदेचें ॥ १ ॥
वाळे वांकी गर्जे तोडर चरणीं । नाद झणझणी वाजताती ॥ २ ॥
कांसे कसियेला पीत पीतांबर । लोपे दिनकर तेणें प्रभा ॥ ३ ॥
नामा म्हणे नाहीं तुझ्या रूपा पार । तेथें मी किंकर काय वानूं ॥ ४ ॥

[३४५]

कमळगर्भ मनीं थोर चिंता करी । पद्मठसे वरी उमटताती ॥ १ ॥
नीलोत्पल जैसें चरण वानूं कैसे । सुकुमार राजस विठ्ठलाचे ॥ २ ॥
लावण्यसागरु रूप पाहों ठेली । दृष्टी पैं खुंटली रुक्मिणीची ॥ ३ ॥
नामा म्हणे विठोचे चरण सकुमार । तेथें वाहे धार गंगादेवी ॥ ४ ॥

[३४६]

काळा गे दादुला पाहतां आकळू । तो जाला गोवळू नंदाचा गे ॥ १ ॥
काळा गे दादुला काळा गे दादुला । पंढरीं पहा चला विठ्ठल गे ॥ २ ॥
काळा म्हणौनी पाहीं गेलों जवळां । सुनीळु सांवळा दिसतसे ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्व भक्षितो हा काळु । भक्तांचा कृपाळु श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

[३४७]

सहस्रदळांत आकाशाच्या परी । राहोनी शरीरीं शोभा दावी ॥ १ ॥
तेंचि नटे थाटे उभे विटेवरी । कर कटावरी ठेऊनियां ॥ २ ॥
जयाचिये नाभीं जन्मला विधाता । तेथोनी वाढता लोक जाला ॥ ३ ॥
श्रुतीचिये वाचे नोहे गोचर । जेथें अवतार तिहीं देवा ॥ ४ ॥
नामा म्हणे विश्वंभरु आणिक । अंगुळ दशक आहे जें कां ॥ ५ ॥

---

अभंग ३४४ ते ३४६—(पं.) व (शि.), ३४७—(आ.)
१ करुणा चातुर्या। (पं.) २ क्रिया प्रभा दिसे ॥ (पं.)

अनुक्रमणिका

[३४८]

परब्रह्ममूर्ति सांवळे सगुण । पंढरी निधान वाळुवंटीं ॥ १ ॥
आनंद अमृत बोळला दरुशनें । तुटेल बंधन हेळामात्रें ॥ २ ॥
नामा म्हणे नको नामीं सदा मन । उभा नारायण भेटी पुरे ॥ ३ ॥

[३४९]

कस्तुरी कुंकुम रेखे लाल [1]टिळा । केशराची उटि सर्वांगासी ॥ १ ॥
पाहिला पाहिला माझा पांडुरंग । जिवीं जिवलग डोळे भरी ॥ २ ॥
हार शोभे गळां मंजुरीचा तुरा । कर्ण रत्नफळा झळाळित ॥ ३ ॥
विटेवरी नीट गोमटीं पाउलें । त्यांवरी ठेविलें मस्तक म्यां ॥ ४ ॥
नामयाची धणी भुकेली ते धाली । आनंद दिवाळी आजि जाली ॥ ५ ॥

[३५०]

सुखाचें हें सुख श्रीहरि मुख । पाहतांही भूक ताहान गेली ॥ १ ॥
भेटली भेटली विठाई माउली । वासना निवाली जिवांतील ॥ २ ॥
चंद्रासी चकोर मेघासी मयूर । वाटे तैसा भर आनंदाचा ॥ ३ ॥
नामा म्हणे पाप आणि ताप दुःख । गेलें जालें सुख बोलवेना ॥ ४ ॥

[३५१]

माझ्या मनें तुझ्या चरणीं दिली [2]बुडी । इन्द्रियें [3]बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥
[4]आतां विषयसुख जाणावें हें कोणें । जाणोनी भोगणें कोणें स्वामी ॥ २ ॥
[5]देह सहज स्थिति राहिलें निष्काम । हृदयीं सदा प्रेम वोसंडत ॥ ३ ॥
[6]नामा म्हणे केशवा कृपेच्या सागरा । तूं आम्हां सोयरा आदि अंतीं ॥ ४ ॥

---

अभंग ३४८—(आ.), ३४९—(बा.), ३५०—(आ.), ३५१—(पं.) व (शि.)
१ तिटी (बा.) २ मिठी (पं. व शि.) ३ हिंपुटी होऊनि ठेलीं (पं. व शि.)
४ तया नाठवेचि कांहीं । सुख तुझ्या पाइं देखियेलें । (पं.)
५ हे कडवे (पं.) व (शि.) ह्यामध्ये सापडत नाही.
६ नामा म्हणे संति दाखविली सोय । जेणें विठोबाचे राहे प्रेम हृदयीं । (पं. व शि.)
जेणें विठोबाचे राहे प्रेम सुख । (पं. व शि.)

अनुक्रमणिका

[ ३५२ ]

शांति भीमातीरीं भक्ति पंढरपुरीं । प्रेम विटेवरीं देखियेलें ॥ १ ॥
देखिला गे माय देखिला गे माय । देखिला गे माय पंढरीये ॥ २ ॥
नामारूपातीत नित्य सदोदित । जेथें बिरे चित्त योगियांचें ॥ ३ ॥
दुरी ना जवळी त्रिपुटीं वेगळा । केशव भेटला नामा म्हणे ॥ ४ ॥

[ ३५३ ]

[1]योगियांचें ब्रह्म शून्य व्योमाकार । आमुचे साकार विटेवरी ॥ १ ॥
[2]दाटुगें नागर कटीं ठेऊनि कर । सर्वस्वें उदार भक्तांलागीं ॥ २ ॥
ज्ञानीया सिद्धांतीं लक्षापरी नये । आमुची वाट पाहे अनाथाची ॥ ३ ॥[3]
पुंडलिकाप्रति भावा वोळलें वोरसें । नेणों काय कैसें प्रेम त्याचें ॥ ४ ॥
जाप्यकाचें जाप्य नाम मंत्रमय । आमुचें भक्तिप्रिय [4]संसारिकां ॥ ५ ॥
नामा म्हणे जीवें करीन ओंवाळणी । क्षणीं चक्रपाणि दिठावसी ॥ ६ ॥

[ ३५४ ]

श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं । तेथें माझी दृष्टी बैसलीसे ॥ १ ॥
कटावरी कर समचरण साजिरे । देखावया झुरे माझें मन ॥ २ ॥
माहेरींची आस दसरा दिवाळी । बाहे ठेवीं निढळी वाट पाहे ॥ ३ ॥
बंदिजन नामा उभा महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णितसे ॥ ४ ॥

[ ३५५ ]

वाळक माझें मन पांगुळ पैं जालें । हारपोनी गेलें साक्षात्कारें ॥ १ ॥
मन हारपलें करूं आतां काय । पहावया गेलें तो परतोनी कां नये ॥ २ ॥
भक्ति ज्ञान वैराग्य अवघेंचि आहे । अवघेंचि होये अवघें येणें ॥ ३ ॥
नामा म्हणे जनाबाई आहे वो कैसा । बाबा उदकीं घट बुडोनी ठेला जैसा ॥ ४ ॥

---

अभंग ३५२—(आ.), ३५३—(पं.), (शि.), (धु.), (भा.) व (गं.), ३५४—(आ.), ३५५—(पं.), (शि.) व (धु.)

१ योगियांचे ध्यानीं ध्यातां नातुडेसि । तो आम्हां असती मागांपुढां ॥ (धु.) बऱ्याच प्रतींत पहिला चरण सापडत नाही २ नेटकें (धु.) ३ गंगाधने बाडात हा चरण असा आहे— योगियांसि ध्यानीं ध्यातां लक्षा नये । तें वाट पाहताहे अनाथांचि ॥ ४ संसारासी (धु.)

अनुक्रमणिका

[३५६]

'केशवाचें नाम्या लागलेसें ध्यान । देखे त्रिभुवन तदाकार ॥ १ ॥
जया तया म्हणे माझा चक्रपाणि । जाय लोटांगणीं सर्व भावें ॥ २ ॥
प्रेम बोथरत नामाचेनि छंदें । हृदय प्रेमानंदें वोसंडत ॥ ३ ॥[2]
धांवूनि येऊनि चरणाजवळी । वंदी पायधुळी सर्वभावें ॥ ४ ॥
घन:श्याम मूर्ति सुंदर सांवळी । ध्यान हृदयकमळीं नित्य राहे ॥ ५ ॥
भाग्यवंत नामा भक्तां शिरोमणी । अखंड उन्मनी भोगितसे ॥ ६ ॥

[३५७]

वेणू वाहूनि चित्त दुहिलें । रूप दाऊनि मज मोहियलें ॥ १ ॥
वेधी वेधकू गोपाळ लाघवी । जीवा लावियली आवडी निच नवी ॥ २ ॥
दृष्टीपुढें माझें ध्यान ठेवियेलें । वृत्तिसहित मन तेथें माझें गोविलें ॥ ३ ॥
शुद्धशामकमळदळलोचनु । पावा वाहातसे देहुडा रुणझुणीं ॥ ४ ॥
तया प्रभा दिसती दिशा निर्मळ । कृष्ण पाहतां मन जालें व्याकुळ ॥ ५ ॥
नामया स्वामीचें अनुपम्य रूपडें । पाहतां मन मुरडे माघारें ॥ ६ ॥

[३५८]

शाममूर्ति डोळस सुंदर सांवळी । तें ध्यान हृदयकमळीं धरूनि ठेला ॥ १ ॥
सकळ स्थिति सुखाचा अनुभव जाला । सकळ विसरला देहभाव ॥ २ ॥
पांगुळलें मन स्वरूपीं गुंतलें । बोलणें खुटलें प्रपंचाचें ॥ ३ ॥
सबाह्याभ्यंतरीं स्वरूप कोंदलें । द्वैत निरसलें चंद्राकारें ॥ ४ ॥
निज निर्धारितां नयन सोज्वळ जाले । रोमांच दाटले रवरवीत ॥ ५ ॥
नामामृताचा घन वोळला अंबरीं । वर्षाव सहस्त्रधारीं होत असे ॥ ६ ॥
तें क्षीर सेवितां जालें समाधान । चुकलें जन्ममरण कल्पकोडी ॥ ७ ॥

---

अभंग ३५६—(पं.), (शि.) व (धु.), ३५७ व ३५८—(पं.) व (शि.)

१ केशवाच्या नामीं (आ.)

२ (धु.) प्रतीमध्ये अन्य ठिकाणी असाही चरण सापडतो—
देहीं देह बुधी पडला विसर । वाचेसी परीकर गिळोनि ठेले ॥

अनुक्रमणिका

सहज सुखें निवाला भवदुःख विसरला । विसांवा भेटला पांडुरंग ॥ ८ ॥
[1]नामा म्हणे देवा दृष्टी लागे क्षणीं । पुंडलिका धर्में करूनि जोडिलासी ॥ ९ ॥

[ ३५९ ]

जीव विठ्ठल शिव विठ्ठल । आत्मा विठ्ठल अखंडित ॥ १ ॥
जनक विठ्ठल जननी विठ्ठल । सोयरा विठ्ठल सांगाती ॥ २ ॥
अहिक्य विठ्ठल परत्र विठ्ठल । निरंतर विठ्ठल तारिता ॥ ३ ॥
नाम विठ्ठल रूप विठ्ठल । पतित पावन विठ्ठल विठ्ठल नामा ॥ ४ ॥[2]

[ ३६० ]

तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल । देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ॥ १ ॥
माता विठ्ठल पिता विठ्ठल । बंधु विठ्ठल गोत्र विठ्ठल ॥ २ ॥
गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल । निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल ॥ ३ ॥
नामा म्हणे मज विठ्ठल सांपडला । म्हणोनि कळिकाळां पाड नाहीं ॥ ४ ॥

[ ३६१ ]

माता पिता बंधु भगिनी इष्टमित्र विठ्ठला तूं रे ॥ धृ० ॥
बापा यावें भेटावें विसावा माझा गा तूं ।
माझा कुळाचार माहेर रे जिव्हार विठ्ठला तूं ॥ १ ॥
माझें विद्याधन आयुष्य आरोग्यता विठ्ठला तूं गा ।
माझें तप व्रत तीर्थ दान पुण्य विठोबा तूं गा ॥ २ ॥
माझा गुरुमंत्र दैवत आगम निगम विठ्ठला तूं गा ।
भूपति सुरपति ब्रह्ममूर्ति विठोबा तूं गा ॥ ३ ॥
माझा आचार विचार सत्यवाद धीर धर्म विठोबा तूं गा ।
यश कीर्ती निवृत्ति आतां माझी तृप्ति विठोबा तूं गा ॥ ४ ॥
माझे यम नियम प्राणायाम प्रत्याहार विठ्ठला तूं गा ।
नामा म्हणे विठोबा केशव परमातमा माझा तूं गा ॥ ५ ॥

---

अभंग ३५९ ते ३६१--(पं.) व (शि.)
१ धन्य तो नामदेव भक्त शिरोमणी । त्याचा चक्रपाणि वेळाइतु ॥ (पं. व शि.)
२ हा चरण (पं.) व (शि.) मध्ये नाही.

अनुक्रमणिका

[३६२]

[1]बरवेपण बरवा बाप मदनाचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ १ ॥
उदारपणें उदार दाता त्रैलोक्याचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ २ ॥
झुंजार आणि शूर अरी त्या दैत्यांचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ३ ॥
चतुरपणें चतुर बाप ब्रह्मयाचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ४ ॥
पवित्रपणें पवित्र उद्धार तीर्थांचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ५ ॥
नामा म्हणे आधार सकळां जीवांचा । तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ६ ॥

[३६३]

विटेवरी उभा दीनांचा कैवारी । भेटाया उभारी दोन्ही बाह्या ॥ १ ॥
गुण दोष त्याचे न पाहेचि डोळां । भेटे वेळोवेळां केशिराज ॥ २ ॥
ऐसा दयावंत घेत समाचार । लहान आणि थोर सांभाळितो ॥ ३ ॥
सर्वांलागीं देतो समान दरुशन । उभा तो आपण समपायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे तया संतांची आवडी । भेटावया कडाडी उभाची असे ॥ ५ ॥

[३६४]

दीनाची माउली । आजि [2]म्यां देखियेली ॥ १ ॥
कटीं ठेऊनियां कर । उभी राहे विटेवर ॥ २ ॥[3]
मुगुट रत्नांचा साजिरा । वरी मोतियांचा तुरा ॥ ३ ॥
रूप लावण्य गोजिरें । हृदयीं पदक साजिरें ॥ ४ ॥
कांसे पिवळा पीतांबर । चरणीं ब्रिदाचा तोडर ॥ ५ ॥
भक्तां कृपेची सावली । नामा वंदी पायधुळी ॥ ६ ॥

[३६५]

आषाढी कार्तिकी हेचि आम्हां सुगी । शोभा पांडुरंगीं घनवटे ॥ १ ॥
संतांचीं दर्शनें हेंचि पीक जाण । देतां आलिंगन देह निवे ॥ २ ॥

---

अभंग ३६२ व ३६३—(आ.), ३६४ व ३६५—(पं.) व (शि.)

१ सुंदरपणें सुंदर (बा.) २ आम्हि हे (शि. व पं.) ३ (पं.) व (शि.) मध्ये २ व ३ या चरणांच्यामध्ये एक चरण आहे. तो असा—भक्तांवर केली । विठ्ठलें कृपेची साउली ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

देह निवे किती नवल सांगावें । जीवासी दुणावे ब्रह्मानंद ॥ ३ ॥
नामा म्हणे यासी मूळ पांडुरंग । त्याचेनि अव्यंग सुख आम्हां ॥ ४ ॥

[ ३६६ ]

आवडे जें जीवा तें पंढरीये उभे । पुंडलिकें लोभें राहविलें ॥ १ ॥
जोडुनि पाऊलें ठेवियलीं विट । करद्वय गोमटें कटावरी ॥ २ ॥
कान मुख डोळे न म्हणती पुरे । सेवितां न पुरे धणी मना ॥ ३ ॥
गोड लागे पोट न भरे न धाये । भूकेलीच राहे भूक सदा ॥ ४ ॥
नामा म्हणे संत-संगतीं विश्वास । घेऊं अनुभवास फार फार ॥ ५ ॥

[ ३६७ ]

जयालागीं हृदय उले । ते म्यां जीवेंसि धरिलें ॥ १ ॥
विठ्ठलाचीं पाऊलें । म्यां मस्तकीं वाहिलीं ॥ २ ॥
नामा म्हणे मुनि रंगले । तें म्यां जीवेंसि धरिलें ॥ ३ ॥

[ ३६८ ]

आमुचा विठ्ठल प्रचंड । इतरां देवांचें न पाहूं तोंड ॥ १ ॥
एका विठ्ठलावांचुन । न करुं आणिक भजन ॥ २ ॥
आम्हां एकविध भाव । कदा न म्हणूं इतरां देव ॥ ३ ॥
नित्य करूं हा अभ्यास । म्हणे नामा विष्णुदास ॥ ४ ॥

[ ३६९ ]

भजूं एका विठोबास । आणिक न करुं अभ्यास ॥ १ ॥
येथें साधन आहे एक । पाहों विठोबाचें मुख ॥ २ ॥
वर्णू हरीचे पवाडे । काळ लावूं देशधडे ॥ ३ ॥
नामा विष्णुदास म्हणे । ऐसें करुं हरिकीर्तन ॥ ४ ॥

अभंग ३६६—(आ.), ३६७—(पं.) व (शि.), ३६८ व ३६९—(पं.)

[ ३७० ]

जीवप्राणें एक विठ्ठलची व्हावा । ऐसिया मी भावा रतलिया ॥ १ ॥
आवडे पंढरी आवडे चंद्रभागा । येती यमुनागंगा प्रतिदिनीं ॥ २ ॥
आवडे पद्मतीर्थ आवडे गरुडपार । राउळीं माहेर पांडुरंग ॥ ३ ॥
नामा म्हणे अहा विठाई रुक्माई । आणिकांपाशीं नाहीं चित्त माझें ॥ ४ ॥

[ ३७१ ]

न पाहे गे माय विठाईविण डोळां । सर्वस्वें कंटाळा आणिकांचा ॥ १ ॥
विठोविण कांहीं नायकें मी कानीं । जडली चरणीं चित्तवृत्ती ॥ २ ॥
आणिकांचे मार्गीं न चालोत पाय । जीव वोढे सयें पांडुरंग ॥ ३ ॥
नामा म्हणे करीं आणिकांची पूजा । न करीं गरुडध्वजावांचुनियां ॥ ४ ॥

[ ३७२ ]

विठ्ठल कानडे बोलूं जाणे । त्याची भाषा पुंडलिक नेणें ॥ १ ॥
युगें अठ्ठावीस जालीं । दोघां नाहीं बोलाबोली ॥ २ ॥
कर ठेवूनि कटावरी । उभा भिवरेच्या तीरीं ॥ ३ ॥
नामा म्हणे स्वामी माझा । उभा भक्तांचिया काजा ॥ ४ ॥

[ ३७३ ]

मान तोडावया कर शस्त्रांचे । कठिण बहुतांचे उभारिले ॥ १ ॥[1]
तरी न वदे न वदे आन । आन कांहीं या विठोबावांचून ॥ २ ॥
विठोबा परतें दैवत आहे म्हणती । ऐसें श्रुतिस्मृती जरी बोलती ॥ ३ ॥
तरी ते अपशब्द कानीं पडो न द्यावें । पाखांडीं म्हणती जरी उगेंचि असावें ॥ ४ ॥
ब्रह्मदेवेसी जालिया भेटी । तोहि जरी वदेल ऐसिया गोष्टी ॥ ५ ॥
या विठोबापरतें दैवत म्हणेल सृष्टीं । चळला पोटीं निभ्रांत जाणा ॥ ६ ॥
कोटी कोटी ब्रह्मांडें एक एक रोमीं । व्यापूनियां व्योमीं वर्ततसे ॥ ७ ॥
तो हा माझा विठोबा सर्वांघटीं सम । न सांडावें वर्म म्हणे नामा ॥ ८ ॥

---

अभंग ३७० व ३७१—(आ.), ३७२—(पं.), (शि.) व (त.), ३७३—(पं.) व (शि.)

१ (आ.) प्रतीत हा अभंग जवळ जवळ असाच दुबार होता. त्यातील आरंभीच्या वेगळ्या ओळी अशा—

केशवापरते देव आणिक आहेती । ऐसें श्रुति स्मृति बोलतील ॥
तरी ते शब्द झणे कानी हो पडती । पाखांडी म्हणती सहावे ते ॥



अनुक्रमणिका

[ ३७४ ]

बांधिलें राहीना वैरलें खाईना । दवडिलें जाईना जाणते हो ॥ १ ॥
तया खुंटा नांदावें सैरा सैरा धांवे । कशानें करावें वोढाळे वो ॥ २ ॥
तया नेत्र वा पाय तिन्हीं एक पाहे । न देखावें तें ठाय देखताहे ॥ ३ ॥
नामा म्हणे श्रोता विचारावें ज्ञानीं । केशवाचे नयनीं उतरला ॥ ४ ॥

[ ३७५ ]

ध्यान धारणा न लगे टाळी । विठो पाहावा उघडे डोळीं ॥ १ ॥
विठो समाधीचें सुख । पाहातां हरे तहानभूक ॥ २ ॥
नामा म्हणे न लगे कांहीं । चित्त रंगो हरिचे पायीं ॥ ३ ॥

[ ३७६ ]

येतियां पुसें जातियां धाडी निरोप । पंढरपुरीं आहे माझा मायबाप ॥ १ ॥
येईवो येईवो येईवो विठाबाई माऊली ये । निढळावरी कर ठेऊनि वाट पाहे ॥ २ ॥
[1]पिवळा पितांबर गगनीं झळकला । गरुडावरी बैसोनी माझा कैवारी आला ॥ ३ ॥
विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिवाळी । विष्णुदास नामा जीवें भावें ओवाळी ॥ ४ ॥

[ ३७७ ]

विठ्ठलेंविण जया न जमे एक घडी । सर्वस्व आवडी विठ्ठलाचि ॥ १ ॥
विठ्ठलचि माता विठ्ठलचि पिता । भगिनी आणि भ्राता विठ्ठलचि ॥ २ ॥
विठ्ठलचि क्रिया विठ्ठलचि कर्म । विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत ॥ ३ ॥
गुज गौप्य जीवीचें विठ्ठला सांगावें । विठ्ठलें पुरवावें कोड त्याचें ॥ ४ ॥
सर्वकाळ करणें विठ्ठलाची कथा । विठ्ठल जडला चित्ता जयाचियां ॥ ५ ॥
विठ्ठल जागृती स्वप्न आणि सुषुप्ति । अखंड वदती विठ्ठल विठ्ठल ॥ ६ ॥
ऐसें सर्वस्वेंसी विठ्ठल भजतां । सुख आलें हाता विठ्ठलाचें ॥ ७ ॥
नामा म्हणे त्याचें चरणरज होऊन । जाहलोंसे पावन म्हणे आतां ॥ ८ ॥

अभंग ३७४—(धु.), ३७५ व ३७६—(पं.), (शि.) व (धु.), ३७७—(आ.)
१ पितांबर सेला कैसा गगनीं झळकला ॥ (धु. व पं.)
२ डोळयांतील बाहुली माझी विठाई जाली । धनानंद मूर्ति माझ्या ध्यानासी आली ॥ (धु. व आ.)

[ ३७८ ]

विठ्ठल विसावा सकळिकां । विठ्ठल आधार तिहीं लोकां ।
विठ्ठल न कळे ब्रह्मादिकां । विठ्ठल देखा पंढरिये ॥ १ ॥
विठ्ठल डोळस सांवळा । विठ्ठल पाहाती अबलाबाळा ।
विठ्ठल ध्यावा वेळोवेळां । विठ्ठल कमलावल्लभ ॥ २ ॥
विठ्ठल धरा रे मानसीं । विठ्ठल सोडवील अहर्निशी ।
विठ्ठलाविण मुक्ती कैंची । [1]कुंटणी गणिकेसी उद्धरिलें ॥ ३ ॥
विठ्ठल उभा भीमातीरीं । कर ठेवूनि कटावरी ।
विठ्ठल भक्तकाज कैवारी । विठ्ठल हरी महादोष ॥ ४ ॥
विठ्ठल अनाथा कोंवसा । विठ्ठल नुपेक्षी भरवंसा ।
विठ्ठलेंविण शून्य दाही दिशा । विठ्ठलाविण नाहीं हें अनेक ॥ ५ ॥
श्रीविठ्ठल धन्य दिवस । श्रीविठ्ठल भक्तिरस ।
श्रीविठ्ठल परमपुरुष । विष्णुदास म्हणे नामा ॥ ६ ॥

[ ३७९ ]

दोन्ही हात ठेवोनि [2]कटा । उभा भिवरेच्या तटा ॥ १ ॥
हरि बरवया बरवया । विठोबा पंढरीच्या राया ॥ २ ॥
नामा म्हणे वेगीं धांवा । [3]देव आले याचि गांवा ॥ ३ ॥

[ ३८० ]

आघवें तीर्थ तीर्थरूप । परि तें विठ्ठल चरणींचें स्वरूप ।
विठ्ठल देखिलिया निष्पाप । जीवजंतू होताती ॥ १ ॥
एवढें क्षेत्र पांडुरंग । सर्वां तीर्थांमाजीं अभंग ।
धरिलिया संतसंग । महादोष हरताती ॥ २ ॥
हरिकीर्तन करीं वेगीं । हेंचि उद्धरील जगालागीं ।
जें जें अनुसरलें पांडुरंगीं । तें तें गेलें वैकुंठा ॥ ३ ॥

---

अभंग ३७८ व ३७९—(पं.) व (शि.), ३८०—(आ.)
१ विठ्ठली (पं.) २ कडवा (पं. व शि.) ३ दैव (पं.)



अनुक्रमणिका

नामा जपे सदा काळीं । रामकृष्ण नामावळीं ।
विठ्ठल विठ्ठल हृदयकमळीं । जपतसे सर्वदा ।। ४ ।।

[ ३८१ ]

केशव आराध्य देवांचाहि देव । पंढरीचा राव पांडुरंग ।। १ ।।
पांडुरंगाविण नाहीं त्रिभुवनीं । [1]भोळा चक्रपाणिवांचुनियां ।। २ ।।
नामा म्हणे ध्यानीं ध्यावें विठोबासी । अखंड मानसीं भजा देवा ।। ३ ।।

[ ३८२ ]

अनंत म्हणती माझिया स्वामीतें । अनंत गुण त्यांतें म्हणोनियां ।। १ ।।
पतितपावन म्हणती माझिया स्वामीतें । उद्धरी पतितातें म्हणोनियां ।। २ ।।
विश्वंभर म्हणती माझिया स्वामीतें । पोशितो विश्वातें म्हणोनियां ।। ३ ।।
जगजीवन म्हणती माझिया स्वामीतें । जीवन जगातें म्हणोनियां ।। ४ ।।
हृषिकेश म्हणती माझिया स्वामीतें । [2]चाळी इंद्रियातें म्हणोनियां ।। ५ ।।
नामा म्हणे केशव म्हणती स्वामीतें । नासितो क्लेशातें म्हणोनियां ।। ६ ।।

[ ३८३ ]

संपूर्ण विश्वाचा आत्म्याचा जो आत्मा । तोचि हा परमात्मा विटेवरी ।। १ ।।
द्वादश लिंगाचें जें का आत्मलिंग । तें हें पांडुरंग विटेवरी ।। २ ।।
अनंत सूर्याची ज्योतीची निजज्योती । तीहि उभी मूर्ति विटेवरी ।। ३ ।।
अनंत शक्तीची जी निजशक्ती । ती ही उभी मूर्ति विटेवरी ।। ४ ।।
अनंत ब्रह्माचें जे कां निजब्रह्म । तें हें परब्रह्म विटेवरी ।। ५ ।।
अवघ्या चैतन्याचें जें कां निजचैतन्य । तें हें समध्यान विटेवरी ।। ६ ।।
अनंत विराटाचें स्वरूपाचें निजरूप । तें हें चिद्रूप विटेवरी ।। ७ ।।
अनंत वेदांचा अर्थाचा निजअर्थ । तोचि महा अर्थ विटेवरी ।। ८ ।।
अनंत शास्त्राचें पुराणाचें सार । त्याचेंही जिव्हार विटेवरी ।। ९ ।।
अनंत सिद्धीची जी कां निजसिद्धी । तें हें महासिद्धी विटेवरी ।। १० ।।

अभंग ३८१ ते ३८३—(पं.) व (शि.)
१ भोळघा (पं. व शि.) २ पाळी (शि. व पं.)

चहुंहि वाचेचि जी निजवाचा । तें हें अनिर्वाच्य विटेवरी ॥ ११ ॥
भक्तीची निजभक्ति मुक्तिची निजमुक्ति । शांतीची निजशांती विटेवरी ॥ १२ ॥
क्रोधाचा महाक्रोध बोधाचा महाबोध । शुद्धाचाहि शुद्ध विटेवरी ॥ १३ ॥
काळाचा महाकाळ वेळेची महावेळ । फळाचें महाफळ विटेवरी ॥ १४ ॥
अनंत पिंडाचें ब्रह्मांडसहित । सांठवण सत्य विटेवरी ॥ १५ ॥
अनंत सत्वाचें जें कां निजसत्व । तत्वाचें निजतत्त्व विटेवरी ॥ १६ ॥
सर्व संबंधाचा जो कां निजसंबंध । आनंदाचा कंद विटेवरी ॥ १७ ॥[1]
नामा म्हणे सर्व सुखाचा आराम । धामा परधाम विटेवरी ॥ १८ ॥

[ ३८४ ]

अहो त्रिभुवनामाझारीं । भूवैकुंठ पंढरी ।
चंद्रभागा सरोवरीं । विटेवरी नीट उभा ॥ १ ॥

उभा कैवल्यनायक । दृष्टी सन्मुख पुंडलीक ।
ज्याचे ब्रह्मादिक सेवक । इतरां कवण पाड ॥ २ ॥

सुरंग रंगें चरणतळें । रातलीं रातोत्पळें ।
जिंकिलीं माणिक निळें । मज पाहातां बाई ॥ ३ ॥

पद अंकुश पताका । ध्वज वज्रांकित रेखा ।
तेथें लक्ष्मी रतली देखा । सिंधुतनया बाई ॥ ४ ॥

अनुपम्य गे माय अनुपम्य सार । परब्रह्म वो साकार ।
मंत्रमय त्रिअक्षर । विठ्ठलनाम बाई ॥ ५ ॥

तें गा प्रत्यक्ष ध्यान । सर्व सुखाचें निधान ।
दृष्टीं पाहतांचि मन । माझें परतेना ॥ ६ ॥

न लागे पातया पातें । लक्ष लागलें निरुतें ।
सुख जालें वा मनातें । तें काय सांगों वो माय ॥ ७ ॥

मन इंद्रियें वेधलीं । घर वृत्तीचें रिघालीं ।
काय स्वानंदा मुकलीं । वेगळेंपणें ॥ ८ ॥

पदद्वयाची ठेवणी । इंद्रनीळ गुल्फमणी ।
गंगा मिरवत चरणीं । वांकी तोडर पायीं ॥ ९ ॥

---

अभंग ३८४—(पं.) व (शि.)

१ (पं.) व. (शि.) मध्ये चरण १७ व १८ यांच्यामध्ये एक चरण आहे तो असा—
ज्ञानाचें निज ज्ञान ध्यानाचें निज ध्यान । मौन्याचें निज मौन्य विटेवरी ॥ १८ ॥

अनुक्रमणिका

सरळ अंगोळियावरी । नखें वर्तुळ साजिरीं ।
चंद्र देखोनि अंबरीं । झाला कळाहीन ॥ १० ॥

पोटरीया जानु जंघ । मर्गजमणीचे स्तंभ ।
कंसे बोळले स्वयंभ । ओघ जैसे कालिंदीचे ॥ ११ ॥

पितांबर माळ गांठी । रत्नकिळा बरवंटीं ।
विद्युलतेच्या थाटीं । जैशा मेघमंडळीं ॥ १२ ॥

वीर कंकणें मनगटीं । कांडोवांडीं मुद्रिका दाटी ।
माज सामावे जो मुठीं । वरी कटीं कटिसूत्र ॥ १३ ॥

नाभीं सरोज गहन । ब्रह्मयाचें जन्मस्थान ।
वरी त्रिवळी लक्षण । कैसें शोभे रोमराजी ॥ १४ ॥

काय वाणूं तें उदर । सांठवलें चराचर ।
ब्रह्मगोळ निरंतर । जया रोमरंध्रीं ॥ १५ ॥

तनु मृदु शाम निर्मळ । प्रभा दिसती सोज्वळ ।
जेवीं ओळेलेंसें जळ । घनमंडळीं ॥ १६ ॥

शुद्ध चंदन पातळ । आंगीं चर्चिला निर्मळ ।
जेवीं इंद्रनीळकिळ । गुल्फ मोतियांचे ॥ १७ ॥

पदक बाहुभूषणें । नवरत्नांचे खेवणें ।
कैसें सर्वां जालेंपणें । लेणें लेणियासी ॥ १८ ॥

कौस्तुभ मिरवे कंठीं । [1]माजी रत्नांचिये दाटी ।
तेथें सुरवरांच्या दृष्टी । भाळलिया ॥ १९ ॥

श्रवणीं कुंडलें झळकती । जैशा विजुवा तळपती ।
कंठीं माळ वैजयंती । सह तुळसीदळेंसी ॥ २० ॥

विशाल नयन दृष्टी । ठेऊनियां नासापुटीं ।
दावी योग कसवटी । योगीयांसी गे माये ॥ २१ ॥

लिंग स्वयंभू शीर स्थळीं । रश्मी मुकुट झळाळी ।
वेटी मोरपिसांतळीं । मृग नाभी तिळक ॥ २२ ॥

स्मित अधर सुरेख । कैसे निमासुर मुख ।
तेथें मदन मयंक । कोटी कुरवंड्या ॥ २३ ॥

विष्णुदास नामा जिवें । ओंवाळित सर्व भावें ।
अनुभव अनुभवें । अनुभविजे सदा ॥ २४ ॥

१ मूर्ति दिसती गोमटी (पं.) हा भाग (पं.) व (शि.) मध्ये काही प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

[३८५]

पितयाची भक्ति पुंडलिकें केली । मात हे ऐकिली देवरायें ॥ १ ॥
नवलक्ष गोधनें पांचसें संवगडे । रामकृष्ण पुढें चालताती ॥ २ ॥
उठा चला जावो पुंडलिक पाहो । देव म्हणे भावो पाहो त्याचा ॥ ३ ॥
गोकुळिंहुनि देव पंढरपुरा पातला । त्वरित पावला वेणूनादीं ॥ ४ ॥
तेथुनि परतला वाळवंटीं आला । तंव देव देखिला पुंडलिकें ॥ ५ ॥
देव उभा आहे पुंडलिक पाहे । चतुर्भुज [1]स्वयें देखियला ॥ ६ ॥
देखियेला हरी शंख चक्र करीं । आयुधें तीं चारी झळकती ॥ ७ ॥
चतुर्भुज मूर्ती देखियली दृष्टी । पुंडलिकें इट टाकियेली ॥ ८ ॥
इटेवरी उभा राहिला विठ्ठल । ठसा मिरविला त्रिभुवनीं ॥ ९ ॥
पुंडलिक भाव पाहूं आला देव । प्रसन्न जाले सर्व पुंडलिका ॥ १० ॥
वैकुंठ कैलास आणील हा येथ । नामा म्हणे हित जालें आम्हां ॥ ११ ॥

[३८६]

पुंडलिकालागुनी म्हणे पांडुरंग । सखा जिवलग तूंचि माझा ॥ १ ॥
न पाहासी वास बोलसी उदास । सांडोनियां आस सर्वस्वाची ॥ २ ॥
वैकुंठ सांडोनि आलों तुजपाशीं । कां गा न बोलसी भक्तराया ॥ ३ ॥
पितृभजनाचा जालासी अधिकारी । केली बा पायरी वैकुंठासी ॥ ४ ॥
माग बापा कांहीं आवडे तें घेई । मज वाटें हृदयीं घालावाची ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा स्वामी मुगुटमणी । उभा कर ठेवुनी कटीवरी ॥ ६ ॥

[३८७]

येक वेळ भेटीं आलों भक्तराया । स्फुरती माझ्या बाह्या क्षेमालागीं ॥ १ ॥
ऊठ पुंडलिका परतोनियां पाहें । जीवींचें आर्त काय सांग मज ॥ २ ॥
जीवाची शिराणी फेडी डोळयांची । वास श्रीमुखाची पाहूं देई ॥ ३ ॥
हेंची आर्त धरोनी आलों असें जीवीं । तें तूं सर्व पुरवी भक्तराया ॥ ४ ॥
नामयाचा स्वामी कृपेचा कोंवळा । म्हणऊनि उतावळा भक्तालागीं ॥ ५ ॥

अभंग ३८५—(पं.) व (शि.), ३८६—(पं.), (शि.) व (धु.), ३८७—(पं.) व (शि.)
१ सव्य (पं.)

अनुक्रमणिका

[ ३८८ ]

सांडूनी वैकुंठ न धरत पातलों । तुज भेटावया आलों पुंडलिका ॥ १ ॥
प्रीतिचा वोरसु हृदयीं दाटला । नुठिसी कां वहिला आलिंगना ॥ २ ॥
भक्त शिरोमणी आमचा जिवलग । म्हणे पांडुरंग पुंडलिका ॥ ३ ॥
स्फुरती भुजादंड आणि वक्षस्थळ । हरुषें नयनकमळ विकासलें ॥ ४ ॥
आनंदें रोमांच उद्‌भवले आंगीं । क्षेमा देई वेगीं भक्तराया ॥ ५ ॥
मज नाम रूप तुमचेनी संभ्रमें । केलीं जन्मकर्में असंख्यात ॥ ६ ॥
तुमचिया आवडी असें म्यां विकिला । सांग कोण्या बोला रुसलासी ॥ ७ ॥
हृदयींचें निजगुज सांग रे सकळिक । तेणें मज सुख होईल जीवा ॥ ८ ॥
परतोनियां दृष्टि पाहे आळुमाळ । तेणें हरेल सकळ श्रम माझा ॥ ९ ॥
ऐसा भक्तजनवत्सलु भक्तांचा विसांवा । भक्तांचिया भावा भाळलासे ॥ १० ॥
कटावरी दोन्ही हात उभा पुंडलिका द्वारीं । नामया स्वामी हरि विनवितसे ॥ ११ ॥

[ ३८९ ]

माझिया पितयाचा होईल निद्राभंग । न घडे प्रसंग बोलायाचा ॥ १ ॥
क्षण एक मौन धरुनियां रहा । शरणागत पहा कृपादृष्टि ॥ २ ॥
करूनि निर्धार आलेती जेणें भावें । जतन करावें वचन देवा ॥ ३ ॥
नवजावें देवा माझे गांवेहुनि । मागतों प्रार्थुनी हेंचि तुम्हां ॥ ४ ॥
माझें सुख पहावें मागेन तें द्यावें । माझे गांवीं व्हावें अधिपती ॥ ५ ॥
नामयाचा स्वामी भक्तीसी भुलला । पुंडलिकें राहविला पंढरीये ॥ ६ ॥

[ ३९० ]

आलासी आरते धरिलासी चित्तें । आतां तुज मागुतें जावों नेदी ॥ १ ॥
शरीर प्राणाचा देईन मी बळी । तुज हृदयकमळीं सांठवीन ॥ २ ॥
धरिलासि तूं एक वैकुंठनायक । म्हणे पुंडलिक पांडुरंगा ॥ ३ ॥
इहलोकीचें सुख न मगे सकळिक । आणिक परलोकीं चाड नाहीं ॥ ४ ॥
पंढरीस राही रुक्माई समवेत । तेणें मनोरथ पूर्ण होती ॥ ५ ॥

अभंग ३८८ व ३९०—(पं.) व (शि.), ३८९—(पं.)

अनुक्रमणिका

तुझें रूप दृष्टी नामस्मरण पुटीं । मना चरणीं मिठी पडोनि गेली ॥ ६ ॥
तुझे चरणीं आर्त हृदयीं नामामृत । तेणें मी समर्थ मिरवे जगीं ॥ ७ ॥
संतां सोयरियां व्हावयासि भेटी । म्हणोनि वाळवंटीं वस्ती केली ॥ ८ ॥
परब्रह्म पुतळा देखिलासि डोळां । समाधि सुख सोहळा पांडुरंगा ॥ ९ ॥
कटीं ठेवूनि हात आपण पंढरीनाथ । भक्तांचा एकांत श्रवण करी ॥ १० ॥
उभारे म्हणोनि दिधलें आपणांतें । संबोखोनि नाम्यातें प्रेम दिलें ॥ ११ ॥

[ ३९१ ]

म्हणे पुंडलिक देवा शिरोमणी । परिसावी विनवणी एक माझी ॥ १ ॥
संसारबंधन तोडी [1]रे दारुण । [2]हें एक मागणें [3]तुजपाशीं ॥ २ ॥
[4]पंच महापातकी विश्वासघातकी । त्यासी यमादिकीं गांजियेलें ॥ ३ ॥
ऐसिया पतिता करी रे सनाथ । पुरवी माझें आर्त पांडुरंगा ॥ ४ ॥
हेंचि माझें काज अंतरीचें गुज । उद्धरी सहज महादोषी ॥ ५ ॥
नामा म्हणे वर दिला नारायणें । विठ्ठलदर्शनें मोक्ष जीवा ॥ ६ ॥

---

अभंग ३९१—(पं.) व (शि.)
१ बा दरुषणें (पं.) २ हेंचि (पं.) ३ तुजप्रति (पं.)
४ ऋद्धिसिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सांडियेली आस त्याचि जीवें ॥
(आ.) प्रतीत हा तिसरा चरण आहे, पण (पं.) व (शि.) प्रतींत हा चरण आढळत नाही.

• • •

अनुक्रमणिका

[३९२]

सहस्र अठ्यांशीं ऋषि । स्कंद उपदेशी तयांसी ।
तिहीं एक पुसिली पुसी । ते तयासी अकळ ॥ १ ॥
आतां [1]जाऊं कैलासा । सकळ पुसूं त्या महेशा ।
मग निघाले [2]आकाशा । पितृदेशा पातले ॥ २ ॥
बरे होऊनियां सावध । ऐका भक्तीचा संवाद ।
विनविता जाला स्कंद । तो अनुवाद शंभूचा ॥ ३ ॥
स्कंदें [3]विनविला त्रिपुरारी । सहित वामभागीं गौरी ।
स्तुति स्तवनें केली भारी । हृदासनीं नमियेला ॥ ४ ॥
मग निघाला लोटांगणीं । म्हणे आहे आहे शूळपाणि ।
करें उचलिला धांवोनि । मग आसनीं बैसविला ॥ ५ ॥
ऋषींसि आसनें देऊनि वेगां । जवळीं बैसविलें पैं गा ।
ते म्हणती झडकरी सांगा । जें वेदशास्त्रांसि प्रिय ॥ ६ ॥
तव स्कंद म्हणे ताता । ऋषिनीं पुसिली जे वार्ता ।
ते अकळ माझिया चित्ता । वेदशास्त्रविरहित ॥ ७ ॥
बरवीं तीर्थें पुण्यरासी । माहात्म्यें सांगत होतों त्यांसी ।
परी तीर्थ क्षेत्र भक्त देवांसी । नाहीं चहूंसी एक मेळा ॥ ८ ॥
जें जें क्षेत्रीं करितां विचार । तें तें ठायीं तेंचि थोर ।
परि तयांमाजीं असे सार । जें माहेर सकळिकां ॥ ९ ॥
पाप घडे जे जे मेदिनीं । तयांसी तें तीर्थ करी धुंणी ।
तीर्था वर्णी शूळपाणि । सांगा हानि जें करी ॥ १० ॥
जाळिती पातकांचिया कोडी । ऐसीं तीर्थें आहेत गाढीं ।
तयां सकळिकां तीर्थां आहे खोडी । तें मी उघडी सांगेन ॥ ११ ॥
हिमकाळीं कीजे स्नान । हेचि प्रयागासी न्यून ।
काशीं इच्छी जो मरण । थोर निर्वाण पाविजे ॥ १२ ॥
पितृस्मरण आचमन । करोनि देईजे पिंडदान ।
तेणें पूर्वज होती पावन । हेंचि न्यून गयेसी ॥ १३ ॥
गाढें कुरुक्षेत्र जाण । तेथें किजे हिरण्यदान ।
केदारीचें उदकपान । करी पीडन देहासी ॥ १४ ॥

---

अभंग ३९२—(पं.) व (धु.)
१ चला (धु.) २ आपैसा (धु.) ३ देखिला (धु.)

उपमाद्वारकेहुनी । अरुच गोमतीचें पाणी ।
सहा मास सेविल्यावांचुनी । नव्हे दाटनी चकाशी ॥ १५ ॥

गंगा बारा वरुषावरी । सकळिकामध्यें गोदावरी ।
सिंहस्थीं महिमा थोरी । हें न्यून भारी तयासी ॥ १६ ॥

अयोध्या माया मथुरा । कांची आवंतिका करवीरा ।
लोण्हार हाटकेश्वर तुंगभद्रा । आणि पुष्करा कावेरी ॥ १७ ॥

कलिमाजीं वैकुंठ साक्षात । गाढें क्षेत्र जगन्नाथ ।
त्या देवासी नाहीं पायहात । उणीव बहुत तयासी ॥ १८ ॥

गाढें श्रीशैल्यपर्वत । लक्षावया उदित ।
तेथें जिवासी करिजे घात । ही उणीव बहुत तयासी ॥ १९ ॥

गाढें क्षेत्र परियेसा । गोकर्ण सेतुबंधु महेशा ।
तयासी उणीव ऐसा । जे यमदिशा म्हणताती ॥ २० ॥

ऐसीं तीर्थें कोटीरासी । परि लांछन आहे सर्वांसी ।
पहिलें राहिजे उपवासी । मग डोईसी मुंडन ॥ २१ ॥

सकळ तीर्थांचा पारू । जो गा देखिला सागरु ।
तयासी उणीव आहे थोरु । योग येतो अमावास्ये ॥ २२ ॥

म्हणोनि पुसों आलों तुज । सकळ तीर्थांचें बीज ।
तें झडकरी सांग मज । देवा तुज जें प्रिय ॥ २३ ॥

ऐसी करोनि विनवणी । मग स्कंद लागला चरणीं ।
येरें उचलिला झडकरुनी । मग शूळपाणि हे बोलिले ॥ २४ ॥

पुत्रा तुवां जे केली विनंति । हेंचि गिरिजा पुसत होती ।
तरी सांगेन तुजप्रती । चित्त देऊनि परियेसी ॥ २५ ॥

महिमा दरुशनाचा पूर्ण । एक लक्ष्मी जाणे खूण ।
शुक सनकादिक मुनि सज्जन । आणि वैष्णवजन प्रेमळ ॥ २६ ॥

जैसा कृपणाचा ठेवा । तैसें [1]आर्त रे माझिया जीवा ।
पुत्रा पुसिलें तुवां । तरी वृत्तांत बरवा सांगेन ॥ २७ ॥

मी बैसोनियां स्मशानीं । जयाचें नाम जपतो ध्यानीं ।
तें दैवत आहे जये स्थानीं । चित्त देऊनि परियेसा ॥ २८ ॥

१ अर्थ (धु.)

अनुक्रमणिका

युगा अठ्ठाविसांवरी । आहे पुंडलिकाच्या द्वारीं ।
विठ्ठल उभा भीमातीरीं । विश्व तारी दरुशनें ॥ २९ ॥

घेऊनि तरुवरांची बुंथि । देव सेवा जाणवीती ।
आदिकरोनी पार्वती । आम्हां वस्ति तये ठायीं ॥ ३० ॥

तेजें झळाळे वैकुंठ । तयापरी चोखट ।
पहा पंढरपूर नीट । महिमा अद्भूत तिहीं लोकीं ॥ ३१ ॥

जेणें पीडिलें तिन्ही लोकां । त्यासि वधावया पावलों देखा ।
ओढी काढोनी त्र्यंबका । श्रीहरि सखा स्मरला ॥ ३२ ॥

घात करोनी त्रिपुरा । वधियेलें तिन्हीं असुरां ।
तेंचि तीर्थ भिवरा । सचराचरा तारक ॥ ३३ ॥

प्रतिदिनीं मध्यान्हीं । सकळ तीर्थें [1]स्थानीं ।
भिवरे सुस्नात होऊनि । विठ्ठलचरणीं लागती ॥ ३४ ॥

तये क्षेत्रीं पाप घडे । ऐसें बोलतां जिव्हा झडे ।
काय तुज सांगूं पुढें । ब्रह्म उघडें असे जेथें ॥ ३५ ॥

लोहो लागलिया परीसे । सोनें जालें एक सरिसें ।
आतां पालटेल कैसें भलतें । तैसें जरी जालें ॥ ३६ ॥

एक वेळ पंढरीये जाऊन । मग भलतिये ठायीं राहो कां जन ।
तो राहे वैकुंठींच जाण । कर्महीन जरी जाला ॥ ३७ ॥

ऐसें ऐकोनी उत्तर । स्कंद हरुषें निर्भर ।
आदि करोनी ऋषीश्वर । पंढरपूर ठाकिती ॥ ३८ ॥

विष्णुदास नामा म्हणे । एक वेळ पंढरीये जाणें ।
विठ्ठल धन्यावरी पाहणें । नाहीं येणें संसारा ॥ ३९ ॥

[ ३९३ ]

जगीं पेठा जाण असती अनेगा । अति सुरंगा वाखाणिती ॥ १ ॥
जंव तूं न देखसी पेठ द्वारकेची । श्रीरंगरायाची राजधानी ॥ २ ॥
द्वारकेची पेठ तेथें स्वरूप चोखट । बरवी बरवंट शोभत असे ॥ ३ ॥
तैसेंचि पंढरीचें सोपें बहु ठाण । संत सुलक्षण जाणताती ॥ ४ ॥

---

अभंग ३९३—(आ.)
१ येतो स्थानीं (पं.)

अनुक्रमणिका

तयाचें दर्शनें लाभ कोटी गुणें जाला । भवसिंधु आटला हेळामात्रें ॥ ५ ॥
ऐसी पेठ निर्मिली देवें ही पंढरी । पुंडलीक द्वारीं उभा असे ॥ ६ ॥
या पेठेचा शेट्या पुंडलीक भक्त । नामा शरणागत केशवासी ॥ ७ ॥

[३९४]

पंढरी हें क्षेत्र पावन पवित्र । महिमा विचित्र त्रिभुवनीं ॥ १ ॥
पाहिलिया क्षणीं नासती पातकें । ऐसियासी तुके दुजें कोण ॥ २ ॥
तृण पक्षी सर्व जाले ऋषिदेव । पहाती वैभव पंढरीचें ॥ ३ ॥
भूमि ते राहिली विष्णु चक्रावरी । वैकुंठीची परी सर्व येथें ॥ ४ ॥
टाळ नृत्य घोष पताकांचे भार । गर्जे भीमातीर सर्वकाळ ॥ ५ ॥
पुंडलिकासाठीं ठाके केशीराज । भेटीनें सायुज्य त्यास देती ॥ ६ ॥
स्नानें उद्धरती दर्शनें प्रशस्ती । वाचे नाम कीर्ती विठोबाची ॥ ७ ॥
नामा म्हणे लाभ थोर हा जोडतो । पंढरिसी येतो प्राणी त्यासी ॥ ८ ॥

[३९५]

पंढरीचें सुख आनंदें गर्जती । ध्यातसे पार्वती अखंडित ॥ १ ॥
भीमातीरीं उभा सखा पांडुरंग । देतो अंगसंग अखंडित ॥ २ ॥
उशीर जाला काय कामकाजा । यावें अधोक्षजा अनिरुद्धा ॥ ३ ॥
नामा म्हणे पाहा पंढरीमाझारीं । केशीराज तारी एकसरा ॥ ४ ॥

[३९६]

निंबलोण करूं पंढरीच्या सुखा । [1]आणिक पुंडलिका मायबापा ॥ १ ॥
पाहतां भूमंडळीं नाहीं आणिक रे । पांडुरंग क्षेत्रावांचोनीयां ॥ २ ॥[2]
अणिमादि सिद्धि भक्ताचिये द्वारीं । होऊनि कामारि वोळंगति ॥ ३ ॥
परलोकींची येती परतोनि मागुते । सर्व सुख तेथे भोगावया ॥ ४ ॥
मुक्तीपद कोणी नेघे फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूप ॥ ५ ॥

अभंग ३९४—(आ.), ३९५—(पं.) व (न.), ३९६—(पं.), (शि.) व (धु.)
१ वैकुंठ नायका पांडुरंगा । (धु.) २ हा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही.

अनुक्रमणिका

भक्ताचियां पायां पडे पूढतो पुढती । मज करा सांगाती मोक्ष म्हणे ॥ ६ ॥
सत्य लोकीं जया सुखाची शिराणी । तें आम्हां अनुदिनीं प्रत्यक्ष दिसे ॥ ७ ॥
वंदीजन नामा उभा महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णितसे ॥ ८ ॥

[ ३९७ ]

पंढरीचें सुख जिहीं अनुभविलें । भावें अनुसरलें विठ्ठलपायीं ॥ १ ॥
काया वाचा मन रंगलें चरणीं । धरियेला मनीं पांडुरंग ॥ २ ॥[१]
नामाचेनि बळें उडविलीं साधनें । तोडीलीं बंधनें संसाराचीं ॥ ३ ॥
योगियांचे घर रिघे काकुलती । आव्हेरिलें संतीं म्हणोनियां ॥ ४ ॥
दोन्ही कर जोडोनि मोक्ष पाहे वास । म्हणे मी होईन दास हरिदासाचा ॥ ५ ॥
तंव तुच्छ करोनी न पाहाती दृष्टि । आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानीं ॥ ६ ॥
अष्ट महासिद्धी म्हणती कवण गति । यावें काकुलती कवणा आम्ही ॥ ७ ॥
मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं । आमुची तें सोयी काय धरिती ॥ ८ ॥
[२]ऐसी सर्व जीवा श्रीदेवासी पुज्य । ते एक राज्य केलें पुंडलिकें ॥ ९ ॥
हर्षे निर्भर नामा नाचे महाद्वारीं । मुखीं निरंतरीं नामघोष ॥ १० ॥

[ ३९८ ]

पंढरीचें सुख पाहतां एक घडी । वास कल्पकोडी वैकुंठीचा ॥ १ ॥
आणितां अनुमाना न पवे सम सरी । महिमा न कळे थोरी सहस्रमुखा ॥ २ ॥
जें सुख सुरवरां स्वप्नीं नाहीं दृष्टि । तें हें वाळवंटीं तुम्हां आम्हां ॥ ३ ॥[३]
धन्य नरनारी गर्जती हरिनामें । ऐकोनि प्रेमें डोले शूलपाणी ॥ ४ ॥
धन्य वेणुनाद धन्य वृंदावन । धन्य तें [४]जीव जन क्षेत्रवासी ॥ ५ ॥
धन्य पंचक्रोशी धन्य आसपासी । दुमदुमी अहर्निशीं नामघोष ॥ ६ ॥
धन्य पशु पक्षि कीटक आणि भृंग । जयां अंगसंग पांडुरंगीं ॥ ७ ॥
धन्य ते तरुवर सर्व सान थोर । अवतरले अमर गुप्तरूपें ॥ ८ ॥

---

अभंग ३९७—(पं.), (शि.) व (पा.), ३९८—(पं.), (शि.), (घु.) व (पा.)

१ हा चरण (पं.), (शि.) व (पा.) या प्रतींत नाही. २ ऐसे भक्तराज देवा वंद्य जाले । ते एक राज्य केलें पुंडलिकें ॥ (आ.) ३ वरील ३ व ४ या चरणांमध्ये एक चरण आहे तो असा : धन्य चंद्रभागा पुण्य सरोवर । धन्य भीमातीर पुण्य भूमी ॥ (आ.) हा चरण (पं.) व (पा.) मध्ये नाही. ४ जीवन तीर्थरूप (पा.)



अनुक्रमणिका

धन्य ते संसारी [1]अवघे जीवन्मुक्त । [2]जयां आर्त असे पांडुरंगीं ॥ ९ ॥
धन्य त्याचा वंश ज्या नामीं विश्वास । धन्य विष्णुदास नामा म्हणे ॥ १० ॥

[३९९]

ऐका पंढरीचें महिमान । राउळ तितुकें प्रमाण ।
तेथील तृण आणि पाषांण । तेहि देव जाणावे ॥ १ ॥
ऐसी पंढरी मनीं ध्याती । त्यांसी तिहीं लोकीं गति ।
ते आणिका तीर्थां जाती । तीं वंदिती तयांसी ॥ २ ॥
वाराणसी चालिजे मासा । गोदावरी एक दिवसा ।
पंढरी पाऊल परियेसा । ऐसा ठसा नामाचा ॥ ३ ॥
ऐसें शंकर सांगे ऋषीजवळी । सकळ तीर्थें माध्यान्हकाळीं ।
येती पुंडलीकाजवळी । करिती अंघोळी वंदिती चरण ॥ ४ ॥
ऐसेनि तीर्थीं पाप घडे । ऐसें बोलतां जिव्हा झडे ।
नामा विनवी संतांपुढें । पंढरी पेठ न सांडावी ॥ ५ ॥

[४००]

अगाध भवजळ तरावया दुस्तर । रची पंढरपूर कलीमाजी ॥ १ ॥
तारू पंढरीनाथ मोलेंविण उतरी । उभा भिमातीरीं वाट पाहे ॥ २ ॥
बुडण्याचें भय नाहीं पैं संसारीं । कलीमाजी पंढरी थोर नाव ॥ ३ ॥
जया नावेवरी आठराही आवलें । साही खण भले मिरवती ॥ ४ ॥
चहूंमुखीं जिचा नकळेचि पार । पाहतां विचार सहस्रमुखा ॥ ५ ॥
सडचा लावी कांसे कुटुंबी नावेवरी । उतरिलें तीरीं केशिराजें ॥ ६ ॥
प्रेमाचिया पेटी बांधोनियां पोटीं । उतरी जगजेठी पांडुरंग ॥ ७ ॥
अंगें घाली उडी बुडतियां काढी । ऐसे कल्पकोडी तारियेले ॥ ८ ॥
तारियेलें सत्य हाचि पैं निर्धार । नामा पैल पार उतरला ॥ ९ ॥

[४०१]

धन्य पंढरीचे सकळही जन । जिहीं सख्य केलें विठ्ठलपायीं ॥ १ ॥
विठ्ठल हा ध्यानीं विठ्ठल हा मनीं । विठ्ठल चिंतनीं रात्रंदिवस ॥ २ ॥

अभंग ३९९—(पं.), (शि.), (घु.) व (पा.), ४०० व ४०१—(पं.) व (शि.)
१ वर्तति (आ.) २ सदा ज्यांचे आर्त पांडुरंगी (पं. व आ.)

अनुक्रमणिका

विठ्ठलेविण जया न गमे एक घडी । सर्वस्वें आवडी विठ्ठलाची ॥ ३ ॥
विठ्ठलची माता विठ्ठलचि पिता । भगिनी आणि भ्राता विठ्ठल ज्यांचा ॥ ४ ॥
[1]विठ्ठलचि मित्र विठ्ठलचि पुत्र । विठ्ठल कुळगोत्र केला जिहीं ॥ ५ ॥
विठ्ठलचि क्रिया विठ्ठलचि कर्म । विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत ॥ ६ ॥
गुज गौप्य जीवीचें विठ्ठला सांगावें । विठ्ठले [2]पुरवावें कोड त्यांचें ॥ ७ ॥
सर्वकाळ करणें विठ्ठलाची कथा । विठ्ठल जडला चित्ता जयांचिया ॥ ८ ॥
विठ्ठल जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं । अखंड बोधरती विठ्ठल विठ्ठल ॥ ९ ॥
ऐसा सर्वस्वेंसी विठ्ठल भजतां । सुख आलें हातां विठ्ठलाचें ॥ १० ॥
नामा म्हणे त्यांचें चरणरेणु होऊन । जाल्यों मी पावन म्हणे आतां ॥ ११ ॥

[४०२]

पंढरीचे जन अवघे पावन । ज्या जवळी निधान पांडुरंग ॥ १ ॥
विठ्ठलनामें घेणें विठ्ठलनामें देणें । विठ्ठलनामें करणें सकळ काम ॥ २ ॥
विठ्ठलनामें क्रिया विठ्ठलनामें कर्म । हाचि प्रिय धर्म जया चित्ता ॥ ३ ॥
सभराभरित विठ्ठल मागें पुढें । जिकडे जाती तिकडे विठ्ठलचि ॥ ४ ॥
निरंतर गर्जती विठ्ठलपवाडे । पहाती निवाडे विठ्ठलरूप ॥ ५ ॥
विठ्ठलनामें सरतें विठ्ठलनामें पुरतें । विठ्ठलनाम ज्यातें भांडवल ॥ ६ ॥
विठ्ठलनामें करिती [3]वाचे योगक्षेम । नित्य ज्याचें प्रेम विठ्ठलनामीं ॥ ७ ॥
सदा हृदयीं भरित विठ्ठलाचें प्रेम । हर्षें विठ्ठलनाम गर्जताती ॥ ८ ॥
विठ्ठलनामीं गोडी धरोनी आवडी । विठ्ठलनामीं बुडी दिली जेणें ॥ ९ ॥
नामा म्हणे अवघें विठ्ठलचि जालें । विठ्ठलें दिधलें प्रेमसुख ॥ १० ॥

[४०३]

[4]नित्य हे दिवाळी असे पंढरपुरीं । ओंवाळिती नारी विठ्ठलासी ॥ १ ॥[5]
[6]पावा वाहे वेणु वरविया नादें । [7]नामघोष आनंदें नाचतसे ॥ २ ॥
नामा म्हणे आम्ही पंढरीये जावें । कवतुकें पहावें विठ्ठलासी ॥ ३ ॥

---

अभंग ४०२ व ४०३—(पं.) व (शि.)

१ विठ्ठलचि मित्र विठ्ठल कुळगोत्र । विठ्ठल हा सर्वत्र केला जिही ॥ (पं. व शि.)
२ सुखावे (पं.) ३ आवडी (पं. व शि.) ४ दिवाळी दसरा नित्य पंढरपुरीं । (पं.)
५ पंढरीसी करुं नित्य दिवाळी । आरती ओवाळी केशवासी ॥ १ ॥ (पं.) ६ भावाचया भेटी वरव्याविनोदें । नामघोष छंदें नाचत असे ॥ २ ॥ (पं.) ७ विठ्ठलाच्या छंदें (पं.)



अनुक्रमणिका

[४०४]

अवघी हे पंढरी सुखाची मांदुस । माजी स्वप्रकाशरत्ना हरी ॥ १ ॥
धन्य संतजन तेथिचें पारखी । ज्या जाली ओळखी विठ्ठल रूपीं ॥ २ ॥
अनुभवुंनी चित्तीं पाहिलें विवेकें । धरिलें पुंडलिकें हृदयकमळीं ॥ ३ ॥
भक्तीचें खेवण प्रेमाचें कोंदण । करोनि भूषण मिरवीतसे ॥ ४ ॥
युगें गेलीं परी पालटचि नाहीं । नित्य शुद्ध पाही तेजःपुंज ॥ ५ ॥
पाहतां नित्य नवें ध्यातां चित्त निवे । म्हणोन नामा जिवें न विसंबे ॥ ६ ॥

[४०५]

अनंत तीर्थाचें माहेर । अनंत रूपांचें हें सार ।
अनंता अनंत अपार । तो हा कटीं कर ठेवूनि उभा ॥ १ ॥
धन्य धन्य पांडुरंग । सकळ दोषां होय भंग ।
पूर्वज उद्धरती सांग । पंढरपूर देखिलिया ॥ २ ॥
निरा भिवरा पडतां दृष्टी । स्नान करितां शुद्ध सृष्टी ।
अंतीं [1]तो वैकुंठप्राप्ति । ऐसें परमेष्टि बोलिला ॥ ३ ॥
तेथें एक शीत दिधल्या अन्न । कोटी कुळांचें होय उद्धरण ।
कोटि याग केले पूर्ण । ऐसें महिमान ये तीर्थींचें ॥ ४ ॥
नामा म्हणे धन्य जन्म । जे धरिती पंढरीचा मान ।
तया अंतीं पुरुषोत्तम । जीवें भावें न विसंबे ॥ ५ ॥

[४०६]

ऐसें तीर्थ कोणी दाखवा गोमटें । जेथें प्रत्यक्ष भेटे परब्रह्म ॥ १ ॥
कोठें ऐसें क्षेत्र आहे त्रिभुवनीं । सकळां शिरोमणि चंद्रभागा ॥ २ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवावें । देखतांचि सुख पावे मन ॥ ३ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा साजिरें । सदा प्रेमपुरें वोसंडत ॥ ४ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ । जेथें समारंभ हरिकथेचा ॥ ५ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ । परब्रह्म केवळ सकळां जीवा ॥ ६ ॥[2]
नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर । धन्य पंढरपूर गीतीं गातां ॥ ७ ॥

अभंग ४०४—(पं.) व (शि.), ४०५—(पं.), (शि.) व (धु.), ४०६—(पं.) व (शि.
१ वास त्या वैकुंठी (शि. व पं.) २ खालील चरण (पं.) व (शि.) प्रतींत अधिक आढळतो
ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुंदर । गरुड टकें भार अपार हे ॥

अनुक्रमणिका

[४०७]

काय सांगूं तुझी करणी नारायणा । वेदपारायणा केशिराजा ॥ १ ॥
पृथ्वीवरी तीर्थें आहेत अपार । परी पंढरिची सर एका नाहीं ॥ २ ॥
जन्मो जन्मींचिया पातका दरारा । चुकती येरझारा एके खेपें ॥ ३ ॥
ब्रह्मज्ञानेंविण मोक्ष आहे भूतीं । वाचेसी ते घेती विठ्ठलनाम ॥ ४ ॥
बेताळीसांसहित जातील वैकुंठा । नामा म्हणे भेटा विठ्ठलासी ॥ ५ ॥

[४०८]

सांडूनि पंढरी जासी आणिका तीर्थी । लाज तुझ्या चित्ता कैसी नये ॥ १ ॥
त्रिभुवनींचीं तीर्थे जालीं तीं मळीन । न्हावया पावन आलीं येथें ॥ २ ॥
एवढा ब्रह्मानंद कैंचा आणिका ठायीं । जो या आहे पायीं विठोबाच्या ॥ ३ ॥
काळ मृत्यु दोन्ही घालोनि पायांतळीं । वाजविल्या टाळीं कीर्तनसंगें ॥ ४ ॥[1]
नित्य नवी दिवाळी सुखाचा सोहळा । [2]भोगिजे अवलीळा संतसंगें ॥ ५ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष मुक्ती चारी । दैतो हा मुरारी नामें एका ॥ ६ ॥
[3]नामा म्हणे निकी दाखवीलि सोये । न विसंबें मी पाय खेचराचे ॥ ७ ॥

[४०९]

काशी हे पंढरी । प्रयाग नीरा नरसींगपुरी ।
पिंड ठेवा पुष्पावती संगमपदावरी । पूर्वज होती चतुर्भुज ॥ १ ॥
सकळ तीर्थांसह वाराणसी । मध्यानकाळीं येती पंढरीसी ।
ओंवाळिती विठोबासी । विश्वनाथ म्हणोनियां ॥ २ ॥
म्हणऊनि वेगीं चला पंढरपुरा । विठोबारायाच्या नगरा ।
चंद्रभागा सरोवरा । देव कौतुक पाहती ॥ ३ ॥
वाराणसी मनिकर्णिका । चंद्रभागा पुंडलिका ।
वाराणसी भागीरथी देखा । पांडुरंगीं भीमरथी ॥ ४ ॥
वाराणसी पंचगंगा । पुष्पावती पांडुरंगा ।
महापातकें जाती भंगा । तीर्थें मस्तकीं वंदिल्या ॥ ५ ॥

---

अभंग ४०७—(पं.) व (शि.), ४०८—(पं.), (शि.), (धु.) व (पा.), ४०९—(पं.) व (आ.)

१ हा चरण (पं.), (पा.) व (शि.) मध्ये नाही. २ भक्ता भोगवीले पांडुरंगें । (धु.)
३ नामा म्हणे चला जाऊं पंढरिये । पाहूं बाप माये पांडुरंग ।। (आ.)

अनुक्रमणिका

वाराणसी दंडपाणि । क्षेत्रपाळ हे हनुमंत दोन्ही ।
सकळ तीर्थें विठोबाचे चरणीं । काशी होय पंढरी ॥ ६ ॥[1]

वाराणसी माधवबिन्दू । पांडुरंगीं वेणुनादु ।
पंचक्रोशी तीर्थ उदंडू । पांडुरंगीं पद्मतीर्थ ॥ ७ ॥

वाराणसी मोक्षपंथा । विठ्ठलाचेनि सायुज्यता ।
एवढें तीर्थ त्रिभुवनीं पाहतां । तीर्थ नाहीं यापरतें ॥ ८ ॥[2]

वाराणसी चंद्रमौळी । पांडुरंगीं वनमाळी ।
विश्वनाथ नंदी जवळी । विठोबा जवळी गरुड ॥ ९ ॥

वाराणसी [3]गौरी खुणा । पांडुरंगीं रुक्मिणी जाणा ।
वाराणसी अन्नपूर्णा । पांडुरंगीं जाणा सत्यभामा ॥ १० ॥

वाराणसी त्रिशुळावरी । सुदर्शनावरी पंढरी ।
कांहीं संदेह मनीं न धरी । काशी होय पंढरी ॥ ११ ॥

ऐसें सकळ तीर्थांचे माहेर । तीर्थ नाहीं यापरतें थोर ।
विष्णुदास नामयाचा दातार । पुंडलिकासहित असे ॥ १२ ॥

[४१०]

पाहतां देऊळाची पाठ । तीर्थें घडलीं तीनशें साठ ॥ १ ॥
स्नान करितां पद्माळें । उद्धरती सर्व कुळें ॥ २ ॥
सन्मुख पाहतां विठाई । त्यासी उपमा द्याया नाहीं ॥ ३ ॥
ऐसा पंढरीचा महिमा । काय वर्णूं म्हणे नामा ॥ ४ ॥

[४११]

कृत त्रेता द्वापार कली । ऐसा चौयुगांचा मेळीं ।
तें महायुग [4]शब्द आढळी । वेदांतशास्त्रीं ॥ १ ॥

---

अभंग ४१०—(पं.), ४११—(पं.), (शि.) व (घु.)

१ हा चरण (भा.) मध्ये असा आहे—
वाराणसी भवानी । पांडुरंगी रुक्मीणी । संदेह न धरी मनी । काशी होये पंढरीसी ॥

२ हा चरण (पं.) मध्ये नाही. एकंदर चरणसंख्या ११ आहे. ३ पार्वती अपर्णा (पं.)
४०९ अभंगाची (भा.) प्रतीमध्ये चरणसंख्या १२ आहे, पण चौथा चरण नाही व ११ आणि
१२ वा चरणांमध्ये एक वेगळा चरण आहे तो असा—
ऐसा महिमा पंढरीसी । दक्षिण द्वारा नाम जैसी ।
विठोबा मानवला भक्ता पुंडलीकासी । म्हणोनी आला पंढरीये ॥ ११ ॥

४ सबळ अढळ (पं.)

ऐसा ब्रह्मयाचा दिनांतर । तैसीच रात्र एक सहस्र ।
तीसा दिवसांचा प्रखर । एक मास ॥ २ ॥
ऐसे बारा मास । त्याचें एक वरुष ।
शतभरी आयुष्य । ब्रह्मयाचें ॥ ३ ॥
ऐसा ब्रह्मयाचा दिनांत । शत वरुषें गणीत ।
ज्या प्रळयीं पोहत । मार्कंडेय उदकीं ॥ ४ ॥
ऐसीं अठ्ठावीस युगें जाण । पंढरपुरासी जालीं पूर्ण ।
जो कीं ब्रह्मयाचा दिन । प्रळय काळ ॥ ५ ॥
नामा म्हणे पंढरीची संख्या । सांगितली संत महंत लोकां ।
लक्षूनि पादुका । विठोबाच्या ॥ ६ ॥

[४१२]

श्रोते म्हणती विष्णुदासा । या ब्रह्मदिनाचे प्रळयीं ।
पंढरीच्या भासा । नाश कीं नाहीं ॥ १ ॥
तंव नामा म्हणे सुदर्शनावरी । देवें रचिली पंढरी ।
भक्तासहित राज्य करी । रुक्मिणीवर ॥ २ ॥
तो परमात्मा गुणातीत । अपरोक्ष भक्तांसहित ।
तेथें प्रळय हात जोडीत । जयालागीं ॥ ३ ॥
जें ब्रह्मयाचें आयुष्य सरे । तें लया जाय चराचरें ।
तें मिळे पंढरपुर । वस्तु माझी ॥ ४ ॥
नामा म्हणे या खुणा । [1]कळती संतजना ।
इतर मायिक जना । नेणवती ॥ ५ ॥

[४१३]

आधीं रचिली पंढरी । मग वैकुंठ नगरी ॥ १ ॥
जेव्हां नव्हतें चराचर । तेव्हां होतें पंढरपूर ॥ २ ॥
जेव्हां नव्हती गोदा गंगा । तेव्हां होती चंद्रभागा ॥ ३ ॥[2]
चंद्रभागेचे तटीं । धन्य पंढरी गोमटी ॥ ४ ॥

अभंग ४१२—(पं.) व (घु.), ४१३—(पं.), (शि.), (भा.) व (घु.)
१ येक जाणे पंढरीराणा । (पं.)   २ हा चरण (पं.), (भा.) व (शि.) प्रतींत नाही.

नासिलीया भूमंडळ । उरे पंढरीमंडळ ॥ ५ ॥
असे सुदर्शनावरी । म्हणूनि अविनाश पंढरी ॥ ६ ॥
नामा म्हणे बा श्रीहरी । [1]ते म्यां देखिली पंढरी ॥ ७ ॥

[४१४]

अवघी ही पंढरी सुखाची बोवरी । अवघ्या घरोघरीं ब्रह्मानंद ॥ १ ॥
अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे । अनुसरे तो लाहे सर्व सुख ॥ २ ॥
[2]पहावा नयनीं ऐकावा श्रवणीं । अवघा ध्यावा ध्यानीं अवघ्या मनें ॥ ३ ॥
अवधिये आवडी अवघा गावा गीतें । अवघा सर्वांभूतीं तोचि आहे ॥ ४ ॥
अवघा हा जाणावा अवघा हा मानावा । अवघा हा वाखाणावा अवघी वाचा ॥ ५ ॥
अवघा ओळखुनी अवघा गिळिजे मनें । अवघा हाचि होणें म्हणे नामा ॥ ६ ॥

[४१५]

अवघें हें पवित्र पांडुरंग क्षेत्र । सुखचि सर्वत्र भरलें असे ॥ १ ॥
अवघा हा विठ्ठल गीतीं गातां गोड । अवघें पुरे कोड नामें एक ॥ २ ॥
अवघें जे सांडोनी अनुसरले यातें । अवघें देतो त्यांतें आपलें प्रेम ॥ ३ ॥
अवघी चित्तवृत्ति ठेविती याच्यापायीं । त्यांतें अवघ्या बाहीं आलिंगतो ॥ ४ ॥
अवघें आपलें मन दिल्हें जिहीं यातें । असे त्या सांगातें मागें पुढें ॥ ५ ॥
[3]अवघ्यासि अनुसरला अवघेंचि विसरला । अवघा नामा जाला सुखरूप ॥ ६ ॥

[४१६]

[4]जाऊं नको जेथें तेथें । जरी तुज मुक्तीचें आर्तें ।
तुज मी सांगेन हित । देऊनि चित्त परियेसी ॥ १ ॥
शंभु अडसष्टी तीर्थांचें माहेर । सकळ सिद्धी ऋषीश्वर ।
माध्यान्हकाळीं सुरवर । पंढरपूर ठाकती ॥ २ ॥

अभंग ४१४ ते ४१६—(पं.) व (शि.)
१ आम्ही नाचो पंढरपुरि ॥ (धु.)
२ पहावा अवघा नयनीं ऐकावा श्रवणीं । अवघे होउनी एकचित्त ॥ (पं. व शि.)
३ अवघीया (शि. व पं.)
४ 'तूं' हा शब्द काही प्रतींत सुरवातीस आहे.

जाई जाई आलियां रे । पांडुरंगीं राहे स्थिर रे ।
न लगती आणिक दैवतें रे । एक पुरे विठ्ठलची ॥ ३ ॥

तीर्थ क्षेत्र दैवतें । ऐसें नाहीं जेथें तेथें ।
तिन्ही सर्वोत्तम जेथें । तें पैं क्षेत्र सांगेन ॥ ४ ॥

श्रीहरिच्या चोविस मूर्ति । विठ्ठल प्रेमदृष्टीं प्रीति ।
सहस्र नामांवरती कीर्ती । विठ्ठल दैवत जाणावें ॥ ५ ॥

रुद्राधांगी गौरी । जान्हवी असे शिरीं ।
सर्वांग व्यापिनी भीमा सुंदरी । आले त्रिपुरारी ठाकोनी ॥ ६ ॥

कोटि जन्माचें पातक । नासे स्नान केलिया देख ।
एवढें क्षेत्र अलौकिक । पांडुरंग भीवरा ॥ ७ ॥

काशीं त्यागिजे शरीर । हिवें शिणलें केदार ।
पाणी गोमतीचें क्षार । म्हणवोनि महिमा सम नाहीं ॥ ८ ॥

जन्म मरणावेगळें । वैकुंठ तुकिलें सगळें ।
परि त्याहुनि आगळें । एक अक्षर जाणावें ॥ ९ ॥

गया भोंवूनि चौदापदीं । तीं अनंतें वेणुनादीं ।
काला केला गोविंदीं । हा दृष्टांत पहा पां ॥ १० ॥

ज्यांचेनि नांवें पिंडदान । त्यासी गयेसी गति जाण ।
येथें करितां नाम स्मरण । सर्व पूर्वजां मुक्ति ॥ ११ ॥

कार्तिकिये आदित्यवारीं । जो पद्माळा स्नान करी ।
त्यांसी नाहीं येरझारी । नये पुढती संसारा ॥ १२ ॥

इंद्र येवढे परमेष्टी । तेथें मनुष्याच्या काय गोष्टी ।
धन्य धन्य तो एक सृष्टी । पंढरी दृष्टी जो देखे ॥ १३ ॥

बरवें पुंडलीकें केलें । हें परब्रह्म रे अर्चिलें ।
जगांत शांतवन केलें । परि [1]न टके सर्वथा ॥ १४ ॥

तीर्थ सोपारें सधर । कष्ट न लगती अपार ।
उपवासी निराहार । कीं क्षौर करणेची नलगे ॥ १५ ॥

येथें सुखें येणें जाणें । घेणें नलगे धरणें ।
मनींचे मनोरथ पुरवणें । एके भेटीसाठीं ॥ १६ ॥

१ नेटकें (आ.)

अनुक्रमणिका

पूर्वजन्मीचा तापसी । तीर्थें केलीं पुण्य राशीं ।
सहस्र शतें भोजनासी । देवां द्विजा भजिन्नला ॥ १७ ॥

शाळिग्रामाची पूजा करी । त्यासी प्रसन्न जाले हरि ।
त्यासी दावितो पंढरी । पूर्व संस्कारी म्हणोनियां ॥ १८ ॥

जयासी नावडे पंढरी । तो पापिया दुराचारी ।
उपजोनियां संसारीं । येरझारी शिणतो ॥ १९ ॥

त्यासी श्वान सुकर हांसती । म्हणती यासी कैसी पडली भ्रांती ।
उपजोनियां मनुष्ययाती । पंढरपूरपती नोळखे ॥ २० ॥

जो विन्मुख पंढरपुरा । त्याचा संग क्षणें करा ।
मोडोनि सुकृताचा थारा । पापशरीरासी तो गेला ॥ २१ ॥

जो पंढरीसी आर्तु । त्याची करा बरवी मातु ।
अंतःकाळीं पंढरीनाथू । यमपंथु चुकवील ॥ २२ ॥

बरवें समतुल्य वाळुवंट । वरी वैष्णव मिळाले घनदाट ।
करिती हरिनामाचें बोभाट । वीर उद्भट विठ्ठलाचे ॥ २३ ॥

[1]जे येथें प्रेमासी आतुर । ते चतुर्भुज होती नर ।
येवढें क्षेत्र पंढरपूर । महिमा थोर तिहीं लोकीं ॥ २४ ॥

अन्य क्षेत्रीं पाप किजे । तें पुण्यक्षेत्रीं विनसिजे ।
पुण्यक्षेत्रीं पाप किजे । तें त्यागिजे पंढरीसी ॥ २५ ॥

पंढरीचें पातक । पंढरीस नासे देख ।
एवढें क्षेत्र अलौकिक । त्रिभुवनामाझारी ॥ २६ ॥

पैल इटेवरी सांवळा । विठोबा पहा पहा रे डोळां ।
विघ्न घालोनि पायातळां । आणिक कळिकाळा दमेना ॥ २७ ॥

जप तप अनुष्ठान । नलगे जीवासी बंधन ।
आणिक न करावें साधन । पहावे चरण विठोबाचे ॥ २८ ॥

देवा सांगे वसुंधरा । मी न भीयें सप्तसागरा ।
स्थावर जंगमादि सारा । नाहीं भार तयाचा ॥ २९ ॥

ज्यासी नावडे विठ्ठल वीरू । त्याचा मज भार थोरु ।
त्यासी नरकीं होय थारू । तो असुर प्राणिया ॥ ३० ॥

---

१ जे यमासी आतुर। (पं. व शि.)

अनुक्रमणिका

ऐसा हा पंढरपूरपति । जीवंतु असतां देतो मुक्ति ।
मेलिया देतो ब्रह्मप्राप्ति । दोहींकडे सौरस ॥ ३१ ॥
येरां प्राणियां कष्ट थोर । परी ते न भरे उदर ।
मेलिया यम किंकर । अष्टौप्रहर जाचिती ॥ ३२ ॥
ऐसा कैलासीचा राणा । गिरीजे स्कंदा सांगे खुणा ।
तुम्ही आणिकु मंत्र नेणा । या पांडुरंगावांचुनी ॥ ३३ ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणतां । तुटती महापातक चळथा ।
विष्णुदास नामा विनवी संता । सावधान व्हा जी म्हणतसे ॥ ३४ ॥

[४१७]

सुखालागीं जरी करिसी तळमळ । तरी तूं पंढरीसी जाय एक वेळ ॥ १ ॥
मग तूं अवघाची सुखरूप होसी । जन्मोजन्मीचें दुःख विसरसी ॥ २ ॥[1]
चंद्रभागेसी करितां स्नान । तुझे दोष पळती रानोरान ॥ ३ ॥
लोटांगण घालोनी महाद्वारीं । कान धरोनि नाच गरुडपारीं ॥ ४ ॥
नामा म्हणे उपमा काय द्यावी । माझ्या विठोबाची [2]इडापीडा घ्यावी ॥ ५ ॥

[४१८]

यारे नाचों प्रेमानंदें । विठ्ठल नामाचिया छंदें ॥ १ ॥
[3]जाऊं म्हणती पंढरीवाटें । कळिकाळा भय वाटे ॥ २ ॥[4]
चंद्रभागें घडलें स्नान । यमलोकीं पडली [5]हान ॥ ३ ॥
जाली पुंडलिका भेटी । पूर्वज आनंदले वैकुंठीं ॥ ४ ॥
राउळासीं जातां । जाली जीवाची मुक्तता ॥ ५ ॥
विष्णुदास नामा म्हणे । आतां नाहीं येणें जाणें ॥ ६ ॥

अभंग ४१७—(पं.), (शि.), (धु.) व (पा.), ४१८—(पं.) व (शि.)
१ (पं.) मध्ये फक्त पहिले दोनच चरण आहेत.
२ आलाबला (धु., पं., शि. व पा.)
३ जाऊ म्हणती पंढरी । यम त्याची सेवा करी ॥ (पं.)
४ चरण २ व ३ मध्ये पुढील चरण (शि.) प्रतीत आहे—
धरितां पंढरीची वाट । कळीकाळा भय वाटे ॥
५ खाण (पं.)

अनुक्रमणिका

[४१९]

पैल ते पंढरी पैल ते पंढरी । पांढरीवरीं काळीं वसविलीं ॥ १ ॥
सांवळें हें ब्रह्म सुनिल हें ब्रह्म । [1]विद्युल्लता ब्रह्म पाहूं चला ॥ २ ॥
नामा म्हणे माझा विठ्ठल हा [2]डोळा । अर्धमात्रें जवळां पाहुं चला ॥ ३ ॥

[४२०]

[3]झळझळित सोनसळा । कळस दिसतो तेजाळा ॥ १ ॥
वरवें वरवें पंढरपूर । विठोबा रायाचें नगर ॥ २ ॥
माहेर संतांचें । नामया स्वामी केशवाचें ॥ ३ ॥

[४२१]

काय पुण्य केलें इहीं जीवा जनीं । पंढरी नयनीं देखियेली ॥ १ ॥
अनंता जन्माचें हेंचि प्रायश्चित । वाचे जपे नित्य रामनाम ॥ २ ॥
कोटी कुळें केलीं क्षणेंची पावन । केल्या एक स्नान चंद्रभागें ॥ ३ ॥
शोक मोह ताप विध्वंसिला हेळा । अवलोकित डोळा पांडुरंग ॥ ४ ॥
महापापराशी तींही केल्या होळी । वाजविल्या टाळीं विठ्ठलनाम ॥ ५ ॥
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं । चालविती वारी पंढरीची ॥ ६ ॥

[४२२]

काशिराज क्षेत्रीं जुंपिले आऊत । अष्ट धान्यें तेथ पेरियेलीं ॥ १ ॥
मेघःश्यामघोष वर्षे सर्वांधारीं । बीज विटेवरी सासिन्नलें ॥ २ ॥
जगाचें जीवन पंढरी पिकली । चाराया सोकलीं [4]भुतेंजातें ॥ ३ ॥
घालुनियां माळां रक्षि कळीकाळा । काय कलिमळा संसाराची ॥ ४ ॥
पाप सोकरण भक्ति हें गोफण । भूस सांडी कण [5]वेंचिताती ॥ ५ ॥
वेदस्मृती श्रुति ऐसे बोलविता । गूढ उगवितां लाभ होती ॥ ६ ॥
नामा म्हणे स्वामि केशव सुकाळ । अन्न ब्रह्म फळ [6]नाम बीज ॥ ७ ॥

---

अभंग ४१९—(पं.), (शि.) व (धु.), ४२०—(पं.) व (शि.), ४२१ व ४२२-- (आ.)
१ विठ्ठल हें (पं., धु. व शि.) २ भोळा (पं. व धु.) ३ झळकती पताका (आ.)
४ भूतजातें (आ.) ५ वेगळिता (बा.) ६ त्रिभुवनी (बा.)

अनुक्रमणिका

[४२३]

कार्तिकी एकादशी । पोहा मिळाला पंढरीसी ।
तेथील महिमा वर्णू कैसी । ब्रह्मादिकां न वर्णवे ॥ १ ॥
दिड्या गरुडटक्याचे भार । मृदंग वाजती अपार ।
वैष्णव नाचती जयजयकार । नादें अंबर गर्जतसे ॥ २ ॥
उपजोनियां संसारीं । वेळोवेळां पाहा रे पंढरी ।
विठ्ठलराज भीमातीरीं । वाट पाहे भक्तांची ॥ ३ ॥
कल्पतरू चिंतामणी । घरीं कामधेनूची दुभणीं ।
मोतियांचे चौक राजांगणीं । वृंदावनें शोभती ॥ ४ ॥
संत बैसले पद्मासनीं । राया विठ्ठला तुझे चरणध्यानीं ।
हरिकीर्तन ऐकोनी कानीं । अंतःकरणीं निवाले ॥ ५ ॥
जें जें चिंतन मानसीं । तें फळ पावलें अहर्निशीं ।
मुक्ति देऊनि तयासी । अढळपदीं बैसविलें ॥ ६ ॥
सकळ तीर्थें मध्यान्हकाळीं । येती चंद्रभागेजवळी ।
विमानें येती अंतराळीं । देव स्नानें करीताती ॥ ७ ॥
धन्य धन्य ऐसें चंद्रभागा तीर्थ । तेथें चतुर्भुज होती प्राणिमात्र ।
ऐसें आणिक नाहीं क्षेत्र । भूवैकुंठ पंढरी ॥ ८ ॥
मणिकर्णी वैतरणीं । स्नान करिजेती अंतःकरणीं ।
लीन होईल विठ्ठल चरणीं । पापधुणी होईल ॥ ९ ॥
अनंत जन्मांचा उपाव । नामया स्वामी पंढरीराव ।
देईल वैकुंठीं ठाव । पुनर्जन्म चुकविल ॥ १० ॥

[४२४]

एक एकादशी होय पंढरीसी । सुकृताच्या रासी ब्रह्मा नेणें ॥ १ ॥
चंद्रभागेतीरीं चतुर्भुज नरनारी । विठ्ठल कैवारी उभा असे ॥ २ ॥
परतुन येथें न येसी मागुता । आणिकां सर्वथा ऐसें नाहीं ॥ ३ ॥
क्षीरसागरींचें जिव्हार वैकुंठीचें सार । पुंडलिकें उपकार केला लोकां ॥ ४ ॥
नामा म्हणे आम्हां थोर लाभ जाला । तापत्रय गेला पांडुरंगा ॥ ५ ॥

अभंग ४२३—(पं.), ४२४—(वि.)

अनुक्रमणिका

[४२५]

अरूप रूपासी आलें । परब्रह्म ठसावलें ।
भक्ता पुंडलिका फावलें । गौप्य जालें प्रगट ॥ १ ॥
धन्य धन्य भिवरातट । चंद्रभागा वाहे निकट ।
धन्य धन्य वाळुवंट । मुक्तिपेठ पंढरी ॥ २ ॥
धन्य धन्य पद्माळें । सबराभरित स्वानंदजळें ।
स्नान केलिया निर्मळें । कोटिकुळें उद्धरती ॥ ३ ॥
धन्य धन्य गा मानदेशु । जेथें विठ्ठलें केला रहिवासु ।
नामा विनवी विष्णुदासु । देईं सौरसु भक्तीचा ॥ ४ ॥

[४२६]

पांडुरंगाचें नाम बरवें । आवडी घेतली माझ्या जीवें ॥ १ ॥
कैसा देहुडा पाउलीं उभा आहे । वेणुनादीं गोपाळ वेणु वाहे ॥ २ ॥
आंगीं चर्चित चंदन माळा गळां । भाळीं शोभताहे कस्तुरीचा टिळा ॥ ३ ॥
नामा म्हणे धन्य धन्य जिणें । एकवेळ पंढरी पाहणें ॥ ४ ॥

[४२७]

उठाउठी जावो पंढरीस राहों । आनंदें क्षेत्र पाहों विठ्ठलाचें ॥ १ ॥
नाम वदनीं ध्यावो । चरण हृदयीं ध्यावो ।
रूप डोळां पाहों । विठ्ठलाचें ॥ २ ॥
जीवें भेटीं घेवो । आनंदभावें गावों ।
प्रेमसुख घेवो । म्हणे नामा ॥ ३ ॥

[४२८]

विठोबाच्या गांवा जाईन धांवोनी । घालीन लोळणी चरणांवरी ॥ १ ॥
[1]शिणभाग दवडिला म्हणेल । जीविचें पुसेल जडभारी ॥ २ ॥

अभंग ४२५—(पं.) व (शि.), ४२६—(पं.), (धु.) व (भा.), ४२७—(आ.), ४२८—(पं) व (धु.)

१ म्हणेल लेकुरें कुर्वाळील । (पं.), म्हणेल करें कुर्वाळिल । (पं.)
(धु.) मधील ४२८ हा अभंग तीन चरणांचा आहे. १, ४ व ६ हे तीनच चरण त्यात आहेत.

अनुक्रमणिका

हरुषें लोळत जाईन महाद्वारां । भेटाया सामोरा येईल मज ॥ ३ ॥
उचलोनी वोसंगें घेयील आदरें । मुख पीतांबरें पुसिल माझें ॥ ४ ॥
धरोनी बाहुवटी उठवील हस्तकीं । ठेवील मस्तकीं अभयकर ॥ ५ ॥
राही रखुमाइ माता सत्यभामा । कडे घेऊनि नामा बुझाविला ॥ ६ ॥

[४२९]

धांऊनियां मिठी घालीन संतचरणीं । सांगेन वचनीं मनिंचे गुज ॥ १ ॥
विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां । तापत्रयें आहाळला जीव माझा ॥ २ ॥
आनंदाचें जीवन पाहेन श्रीमुख । शोक मोह दुःख हरती माझे ॥ ३ ॥[1]
विटेसहित चरण देईन आलिंगनु । तेणें माझी तनु ओल्हावेल ॥ ४ ॥
तुम्ही आवडते हरीचें अंतरंग । माझे जीवलग प्राणसखे ॥ ५ ॥
नामा म्हणे विठोबा कृपेची माउली । तळहातें साउली करील मज ॥ ६ ॥

[४३०]

ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ । जेथें समारंभ हरिकथेचा ॥ १ ॥
तें एक पंढरी विख्यात त्रिभुवनीं । सकळां शिरोमणी चंद्रभागा ॥ २ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुखरूप । जेथें त्रिविध ताप हारपती ॥ ३ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुंदर । गरुडटकभार विराजती ॥ ४ ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ । जेथें नासे मळ दुष्टबुद्धि ॥ ५ ॥
नामा म्हणे [2]संतजनांचें माहेर । [3]गातां मनोहर गोड वाटे ॥ ६ ॥

[४३१]

सर्व सुखरासी भिवरेचे तीरीं । आमुची पंढरी कामधेनु ॥ १ ॥
प्रेमामृतें दुभे सदा संतजनां । वोसंडतो पान्हा नित्य नवा ॥ २ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष चाऱ्ही थानें । दोहोणार धन्य पुंडलीक ॥ ३ ॥
जीयेचें दुभतें नित्य नवें वाढे । पंढरीसी वोढे पूर्वपुण्यें ॥ ४ ॥
भक्तिचेनि बळें भावाचेंनि मेळें । देखोनियां वोळे अधिकाधिक ॥ ५ ॥
भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला । प्रेमें वोसंडला गर्जे नामें ॥ ६ ॥

---

अभंग ४२९—(पं.) व (धु.), ४३०—(पं.), (शि.) व (धु.), ४३१—(पं.) व (शि.)

१ हा चरण (धु.) मध्ये असा आहे : श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं । तेथें माझी दृष्टी खुंटलीसे ॥

२ सकळा जीवाचे (धु.) ३ सदा मनोहर गातो गीति ॥ (धु.)

अनुक्रमणिका

[४३२]

पंढरीच्या सुखा अंत पार नाहीं लेखा । शेषा सहस्रमुखा न वर्णवेची ॥ १ ॥
पंढरीच्या सुखा तोचि अधिकारी । जन्मोजन्मीं वारी घडली जया ॥ २ ॥[१]
पंढरीस जातां प्रेम उचंबळत । आनंदें गर्जत नामघोष ॥ ३ ॥
विश्वमूर्ति विठो विश्वंभर देखें । विसरला दुःखें देहभाव ॥ ४ ॥
नामा म्हणे त्याचा होईन चरणरज । नुपेक्षील मज पांडुरंग ॥ ५ ॥

[४३३]

पंढरीची वारी जयाचिये कुळीं । त्याची पायधुळी लागो मज ॥ १ ॥[२]
तेणें त्रिभुवनीं होईन सरता । नलगे पुरुषार्थां मुक्ति चारी ॥ २ ॥
नामाची आवडी प्रेमाचा जिव्हाळा । क्षण जीवावेगळा न करी त्यासी ॥ ३ ॥[३]
नामा म्हणे माझा सोयरा जिवलग । सदा पांडुरंग तयाजवळीं ॥ ४ ॥

[४३४]

पंढरीचें प्रेम आहे ज्याचे जीवीं । त्याची नित्य नवी करीन आशा ॥ १ ॥
ते माझे सोयरे सुखाचे सद्‌गुरु । भवसिंधूचा पारु उतरती ॥ २ ॥
माझ्या विठोबाच्या नामीं ज्या विश्वास । होईन त्यांचा दास आवडीचा ॥ ३ ॥
माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव । दारवंटा पाय धरीन त्यांचे ॥ ४ ॥
माझ्या विठोबाचें ध्यान ज्याचें मनीं । सांडोवा अंगणीं होईन त्याचे ॥ ५ ॥
ऐसें सर्वभावें विठोबासी शरण । त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे ॥ ६ ॥

[४३५]

अभिमानें लोक जाती वाराणसी । आमुची मिरासी पंढरीये ॥ १ ॥
तीर्थ व्रत नेम मज केशीराजा । पंढरीचा राजा बोळवया ॥ २ ॥
पाउलापाऊलीं चालती मारग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे मज पंढरी विसांवा । दर्शन केशवा पुरे मज ॥ ४ ॥

---

अभंग ४३२—(पं.) व (शि.), ४३३—(पं.), (शि.) व (धु.), ४३४—(पं.) व (शि.), ४३५—(आ.)

१ (पं.) मध्ये हा चरण नाही. २ (धु.) मधील चरण एक साधारण वरील पहिल्या चरणासारखा आहे. पुढचा चरण अगदी वेगळा आहे. तो असा—

विठोबाचे नाम ते माउलीचे वोटीं । विठो तिचे पोटीं गर्भवास ॥

३ हा तिसरा चरण (धु.) मध्ये नाही.

अनुक्रमणिका

[ ४३६ ]

जाऊं म्हणतां पंढरी । यम थोर चिंता करी ॥ १ ॥
धरितां पंढरीची वाट । पापें पळालीं कपाट ॥ २ ॥
कळस देखतां नयनीं । होय पातकांची धुणी ॥ ३ ॥
घेतां विठोबाची भेटी । दोष जाती उठाउठी ॥ ४ ॥
करितां चंद्रभागे स्नान । सर्व दोषां पडे खाण ॥ ५ ॥[1]
नामा म्हणे रे केशवा । आम्ही करूं तुझी सेवा ॥ ६ ॥

[ ४३७ ]

वांकडें पाहणें जया लौकिकासी । मज पंढरीसी वास पुरे ॥ १ ॥
उदंड उपास कासया करावे । पुरे एका भावें भाविकांसी ॥ २ ॥
तीर्थ क्षेत्र मूळ जाणा वाळूवंट । कटीं कर [2]नीट भक्तासाठीं ॥ ३ ॥
नामा म्हणे माझी वैकुंठ पंढरी । तेथें निरंतरीं जन्म देई ॥ ४ ॥

[ ४३८ ]

आम्हीं स्वर्गसुख मानुं जैसा ओक । देखोनियां सुख पंढरीचें ॥ १ ॥
नलगे वैकुंठ न वांछूं कैलास । सर्वस्वाची आस देवा पायीं ॥ २ ॥
नलगे संतति आणि धन मान । एक असे ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥
सत्य कीं मायिक आमुचें बोलणें । तुझी तुज आण सांग हरी ॥ ४ ॥
जीवभाव आम्हीं सांडूं ओंवाळूनि । [3]नामा लोटांगणीं महाद्वारीं ॥ ५ ॥

[ ४३९ ]

वैकुंठासी आम्हां नको धाडूं हरी । वास दे पंढरी सर्वकाळ ॥ १ ॥
वैकुंठ कोपट जुनाट झोंपडी । नको अडाअडी घालूं आम्हां ॥ २ ॥

अभंग ४३६—(पं.), ४३७—(आ.), ४३८—(शि.) व (धु.), ४३९—(पं.)

१ पाचव्या चरणानंतर (पं.) मध्ये आणखी एक चरण आहे. तो असा—
पुंडलीका झाली भेटी । पूर्वज उद्धरिले वैकुंठीं ॥

२ नीर (आ.) ३ म्हणे दासी जनी नामयाची ॥ (शि.) ह्यावरून कदाचित हा अभंग जनाबाईचा असावा असे वाटते.

वैकुंठीं जाऊनि कायं बा करावें । उगेंचि बैसावें मौनरूप ॥ ३ ॥
नामा म्हणे मज येथेंच हो ठेवी । सदा वास देई चरणांजवळी ॥ ४ ॥

[ ४४० ]

नित्य प्रेमाचे पेटे बांधीं माझे पोटीं । उतरी जगजेठी पैलपार ॥ १ ॥
निरे भिवरे ऐक्य तीरीं । कां पद्माळा पंढरपुरीं ॥ २ ॥
केलिया रविवारीं आंघोळी । महादोषां होय होळी ॥ ३ ॥
पाप जाईल जन्माचें । पद पावाल अच्युताचे ॥ ४ ॥
म्हणाल बोलणें कोणाचें । नामया स्वामी केशवाचें ॥ ५ ॥

अभंग ४४०---(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[ ४४१ ]

अवताराची राशी तो हा उभा विटेवरी ।
शंखचक्रगदापद्मसहित करीं हरी ॥ १ ॥
देखिला देखिला देवादि देव बरवा ।
समाधान जीवा पाहतां वाटे गे माये ॥ २ ॥
सगुण चतुर्भुज रूपडें तेज पुंजाळती ।
[1]वंदी चरणरज नामा विनवीतसे पुढतीं [2]गे माये ॥ ३ ॥

[ ४४२ ]

भक्ताचिया काजा अवतार धरी । कृपाळू श्रीहरि सांचोकार ॥ १ ॥
तो हा महाराज चंद्रभागे तीरीं । उभा विटेवरी पांडुरंग ॥ २ ॥
[3]वेद नेले म्हणोनि मत्स्य जाला हरी । शंखासुरा मारी आफळोनि ॥ ३ ॥
समुद्र मंथनीं मंदार बुडाला । [4]कांसव तो जाला तया तळीं ॥ ४ ॥
हिरण्याक्षें धरा नेतां रसातळां । [5]वराहरूपें त्याला वधियेलें ॥ ५ ॥
प्रल्हादासी पिता गांजी नानापरी । स्तंभीं नरहरी प्रगटला ॥ ६ ॥
[6]देवाचिया काजा वामन भूतळीं । बळीसी पाताळीं घातियेला ॥ ७ ॥
भूमिभार जाला क्षत्रियांचें कुळीं । केली निःक्षत्रिय परशुरामें ॥ ८ ॥
सीतेचिया [7]काजा रावण मर्दिला । सूर्यवंशीं जाला रामचंद्र ॥ ९ ॥
गोकुळीं जन्मला श्रीकृष्ण आठवा । होऊनि पांडवा साहाकरी ॥ १० ॥
[8]भक्ताचिया काजा बौद्ध अवतार । जाला दिगंबर अवनियें ॥ ११ ॥
[9]कलंकि अवतार होणार श्रीहरी । तेव्हां पृथ्वीवरी तृण न उरे ॥ १२ ॥
नामा म्हणे तुझे अनंत अवतार । काय मी पामर बोलूं वाचे ॥ १३ ॥[10]

अभंग ४४१—(पं.), ४४२—(पं.), (शि.) व (धु.)
१ वंदुनी (पं.) २ 'गे माये' (पं.) च्या काही प्रतीत नाही.
३ ब्रह्मयाचे वेद चोरी शंखासुर । मत्स्य अवतार तयाकाजीं ॥ (आ.) ४ कूर्म रूप जाला तये वेळीं ॥ (आ.) ५ क्रौडरूपें (धु., पं. व शि.) ६ देवकाजी जाला (आ.) ७ व्याजा (पं. व धु.) ८ व्रतभंगासाठीं (आ.) ९ कल्की अवतार होणार पुढारे (धु.)
१० (धु.) प्रतीत प्रत्येक चरणाच्या शेवटी—
तोची महाराज चंद्रभागे तीरीं । उभा विटेवरी पांडुरंग ॥ असे ध्रु. पद आढळते.

अनुक्रमणिका

[ ४४३ ]

होसि भक्तांचा कोंवसा । तुझीं ब्रीदें हृषिकेशा ।
निवविलें सायासा । कृपासिंधु मुरारी ॥ १ ॥

अंबऋषिकारणें । दहा वेळ गर्भवासा येणें ।
अवतार धरिला नारायणें । [1]गजापूर नगरीं ॥ २ ॥

अंदुरायाच्या घरीं । बाळ जनसेनाच्या कुमरीं ।
मत्स्य रूप अवतार धरीं । वेद हरणकैवारी नारायण ॥ ३ ॥

विद्यापूर नगरीं । अंधरू राजा राज्य करी ।
श्रियादेवी त्या सुंदरी । उदरीं कुमरू जन्मला ॥ ४ ॥

पृथ्वी रसातळवटीं । जातां थोर आंदोळली सृष्टी ।
धांवण्या धांविन्नले जगजेठी । धरा पृष्ठीं सांवरिली ॥ ५ ॥

मर्गजपुरीं पुरपती । हिरण्याक्ष चक्रवर्ती ।
अग्नि असे जनवंती । घरीं बाळवराह ॥ ६ ॥

त्रिदशदेवश्रिया चाडा । हिरण्याक्ष वधिला गाढा ।
भूगोल धरूनियां दाढा । केला निवाडा स्वर्गीचा ॥ ७ ॥

कपूरपूरपाटण । हरिभक्तीचें हें स्थान ।
सदयादेवी प्रिया नंदन । उदरीं नृसिंह जन्मला ॥ ८ ॥

पित्या पुत्रा जाली कळी । स्तंभीं प्रगटला तये वेळीं ।
असुर मारिला करकमळीं । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ९ ॥

कश्यपनंदनवर्धन । कोंवळादशेचा वामन ।
खुजट रूप धरून । महेंद्रपुरीसी आला ॥ १० ॥

दानें तपें व्रतें बळी । तोही घातला पाताळीं ।
अद्यापि राहिला जवळी । चरणतळीं पद देउनी ॥ ११ ॥

रेणापुरीं देवी रेणुका । लाधली जमदग्नीस देखा ।
तिचे उदरीं विश्वतारका । परशुराम जन्मला ॥ १२ ॥

असुरीं वधियेली माया । म्हणे धांवे पुत्रराया ।
अवचित पातला धांवया । सहस्रार्जुन मारिला ॥ १३ ॥

---

अभंग ४४३—(पं.) व (शि.)
१ विनजापूर (पं. व शि.)

अयोध्या नाम नगरी । जन्म कौसल्ये उदरीं ।
देवभक्तांचा कैवारी । दशरथनंदन राघव ॥ १४ ॥

राम त्रैलोक्यीं वीर दारुण । तेणें वधियेला रावण ।
अढळपद देऊन । राज्यीं बिभीषण स्थापिला ॥ १५ ॥

मथुरा नामें नगरी । वसुदेव देवकी उदरीं ।
कृष्ण आठवा अवतारी । लीलाविग्रहि जन्मले ॥ १६ ॥

कंस चाणूर मर्दिले । विमलार्जुन उन्मळिले ।
सप्त गर्भांचे सूड घेतले । रक्षियेले गाई गोपाळ ॥ १७ ॥

बौद्ध श्रीवत्साच्या घरीं । जन्म शांभवीच्या उदरीं ।
राजा कांतिये नगरीं । निरंतर रूपें राहिला ॥ १८ ॥

ध्यान मुद्रा मांडूनियां । वस्त्रें शस्त्रें त्यजूनियां ।
राहिला पैं निरंजनिया । भक्तिभाव ओळखे तो ॥ १९ ॥

[1]कल्कि जसरायाचा पुत्र । सावित्री देवीचा कुमर ।
[2]शंभलापुरीं करील अवतार । दाहीं रूपें प्रगटला ॥ २० ॥

ऐसा अमूर्त मूर्ति विटेवर । उभा राहिला निरंतर ।
विष्णुदास नाम्याचा दातार । वर विठ्ठल पंढरीये ॥ २१ ॥

[४४४]

देवा तूं प्रथम गर्भवास भोगिसी । सागरीं जळचरू मत्स्य जालासी ।
कमठें पाठी न-संडी कैसी । कूर्मे कासाविसी केलें तुज ॥ १ ॥

अपवित्र नाम आदि वराह । याहूनि थोर कूर्म कांसव ।
अर्ध सावज अर्ध मानव । हे भवभाव कर्माचे ॥ २ ॥

खुजेपणें बळीस पाताळीं घातलें । तेणें कर्में तयाचें द्वार रक्षिलें ।
पितयाचे वचनें मातेसी वधिलें । तें कर्म जडलें परशुरामा ॥ ३ ॥

श्रीरामा जाल्या आपदा बहुता । कर्में भोगविलें अंतरली सीता ।
भालुकातिर्थीं वधियेलें अवचिता । नाम अच्युता तुज जालें ॥ ४ ॥

ऐसा कष्टि होऊनी बौद्ध राहिलासी । तूं कलंकिया लोकां मारिसी ।
आपल्या दोषांसाठीं आणिकां दंडिसी । निष्कलंक होसी नारायणा ॥ ५ ॥

---

अभंग ४४४—(शि.)
१ कलंकी (शि.) २ सींगलपुरी (शि.), शिंगळापुरी (पं.)

अनुक्रमणिका

ऐसा तूं बहुतां दोषी बांधिलासी । पुढिलाचि जन्में अवगतोसी ।
विष्णुदास नामा म्हणे हृषिकेशी । तुझी भीड कायसी स्वामियाहो ॥ ६ ॥

[४४५]

प्रथम अवतारीं देव मच्छ जाले सागरीं । वधोनि शंखासुर वैरी आणिले वेद ॥ १ ॥
कूर्म अवतारीं सांवरीली सृष्टी । वराहद्विज नेहटी धरणीधरू ॥ २ ॥
प्रल्हाद कैवारा स्तंभाभीतरीं । बळी बंधन हरी प्रगट जाला ॥ ३ ॥
रेणुका नंदन द्विजकुळ पाळण । त्रिंबक भंजन रघुनाथ ॥ ४ ॥
गोकुळीं अवतारू सोळा सहस्त्र वरू । आपण योगेश्वरू बौध्यरूपीं ॥ ५ ॥[1]
कलंकी अवतारू बदतसे वरू । नामया दातारू केशिराज ॥ ६ ॥

[४४६]

मत्स्य कच्छ क्रोड मृग ते खुजट । जेथूनि प्रगट जालीं रूवें ॥ १ ॥
तेंचि ब्रह्म उभें भिवरेच्या तीरीं । हात कटावरी ठेवूनियां ॥ २ ॥
मातृघाती हिंडे वनीं जो रडत । चोर जार घात करी दुष्ट ॥ ३ ॥
दिगंबर अश्वारूढ खड्गधारी । पृथ्वीचा जो करी ग्रास एक ॥ ४ ॥
नामा म्हणे मुंगी आदि ब्रह्मावरी । नाना अवतारीं एकलाचि ॥ ५ ॥

[४४७]

अंगाचिये सेज फणि छाया धरी । सहस्त्रमुखीं करी स्तुति शेष ॥ १ ॥
परि तयातें तुझें चरित्र [2]अकल्पित । तेथें माझें गीत कोणीकडे ॥ २ ॥
कैशापरी तुज आम्हीं ध्यावें देवा । हें वर्म केशवा सांग मज ॥ ३ ॥
मार्कंडेयो भृशुंडी लोमहर्ष अगस्ति । करितां तुझी स्तुति कल्प गेलें ॥ ४ ॥
ध्यानीं पाहतां तुज न पवती योगी । तेथें मी तो रोगी कोणीकडे ॥ ५ ॥
ब्रह्मचर्यव्रत आचरती देव । ऋषिमुनि सर्व करिती सेवा ॥ ६ ॥
परि तुवां गर्व हरिला तयांचा । तेथें माझी वाचा कोणीकडे ॥ ७ ॥

अभंग ४४५––(पं.) व (शि.), ४४६ व ४४७––(आ.)

१ (शि.) मध्ये एकंदर पाचच चरण असून ५ व ६ वा एकत्र आहेत––
देव गोकुळी अवतारू । वदतसे वरू । नामया दातारू केशीराज ॥ ५ ॥

२ न कळतें (पं.)

इतुकें ऐकोनि बाल केशिराज खुणें । आरुता येई म्हणे नामयासी ॥ ८ ॥
मुखीं माझें नाम हृदयीं धरूनि प्रेम । हेंचि तुज वर्म सांगितलें नाम्या ॥ ९ ॥

[४४८]

चारी वेद तुझ्या नांदती नगरीं । तेथें मी भिकारी काय वानूं ॥ १ ॥
वर्णितां पार नेणें चतुरानन । तेथें मी अज्ञान काय जाणें ॥ २ ॥
अंगलग सेवक [१]तो सारिखा । तेथें माझा लेखा कोणीकडे ॥ ३ ॥
कैलासींचा राणा करितसे ध्यान । तेथें भ्रांत मन केवीं रिघे ॥ ४ ॥
इंद्रासहित देव जेथें ओळंगणें । तेथें दास्य करणें घडे कांहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा काय म्यां करावें । तुझे पायीं रहावें कैशापरी ॥ ६ ॥

[४४९]

वेदां नकळे पार [२]श्रुतिसी गव्हार । उपनिषदां सार नकळेचि ॥ १ ॥
तो हरि गोकुळीं वसुदेवा कुळीं । यशोदेजवळी बाळकृष्ण ॥ २ ॥

अभंग ४४८ व ४४९--(पं.) व (शि.)
१ शेषाच्या (आ.) २ श्रुती अगोचर (आ.)
४४७ या अभंगाचे (धु.) प्रतीत खालील चरण वेगळे मिळतात. चरणापुढील क्रमांक मूळच्या चरणाचे आहेत--
लक्ष्मी थोरपण सांडुनि आपण । सेवि वोळगे तुझे चरण अष्टप्रहर ॥ (च. ४)
तयासी न लभे पूर्ण तुझी भेटि । तेथें माझि गोष्ठि कोणिकडे ॥ (च. ५)
येतां जातां देवा वाहे पृष्टिवरी । उभा राहिजे आसे दारी कर जोडुनि ॥ (च. ६)
तया गरुडा आकळसि हो गा देवा । तेथें माझा केवा कोणिकडे ॥ (च. ७)
भूत भविष्य वर्तमान जाणे परमेष्टि । घडितां मोडितां श्रृष्टि न लगे वेळ ॥ (च. ८)
माझी मात तोहि गोकुळांत न लगे तुझा आंत । तेथें मि पतित कोणीकडे ॥ (च. ९)
दिव्यचक्षु दृष्टि देउनि किरिटी । विश्वरुपि भेटि केली तया ॥ (च. १०)
तोहि तुज जाला पाहाता आलक्षु । तेथें माझे चर्मचक्षु कोणिकडे ॥ (च. ११)
(पं.) मध्ये मूळ अभंगातील ४, ५, ८ व ९ हे यानंतर आहेत.
काही (धु.) प्रतींत एकंदर १९ चरण आहेत. चरण १२ ते १९ असे आहेत--
भाट होउनियां श्रुती हरी कीर्ती । वेळोवेळां वाखाणाजे गा मा * * ॥ १२ ॥
परी तेही नेति नेति ऐसि म्हणेति । तेथें माझी मति रे कोण्हीकडे ॥ १३ ॥
ब्रह्मचारी व्रत धरूनियां देवा । रुद्र तुझी सेवा करी भावें ॥ १४ ॥
परी तयाचाही गर्व मोडिला तुवां । तेथें माझा कैवारें का मग ॥ १५ ॥
ऐसा आकळही जना अठराही पुराणा । साही दर्शना नव्हेसा ठावा ॥ १६ ॥
ध्यानीं तुझी सोय नेणति जे योगी । तेथ मी भवरोगी कोन्हीकडे ॥ १७ ॥
गाड माझे नाम हृदई धरूनी प्रेम । सकळ मोक्षे वर्म हेंचि जाणें ॥ १८ ॥
ऐसें ऐकुनियां बोलणे केशिराजी खुण । ना भी ना भी रे म्हणे नामया ॥ १९ ॥

अनुक्रमणिका

ब्रह्मादिक वंदिती शिवादिक ध्याती । शास्त्रांसी तों गति नकळेचि ॥ ३ ॥
योग्यांचें चिंतन मुनींचें अंजन । शेषादिकां ध्यान सदा ज्याचें ॥ ४ ॥
पुराणें भागलीं आचारें श्रमलीं । बोलतां राहिलीं साधुवृंदें ॥ ५ ॥
नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरी । नाममात्रें तारी सकळांसी ॥ ६ ॥

[४५०]

सहस्र तोंडाचा तोहि भागियेला । अंत नाहीं ज्याला गुणालागीं ॥ १ ॥
तेथें मी पामर काय बोलूं वाणी । तुझी कीर्ति जनीं काय कैसी ॥ २ ॥
यथामति कांहीं बोलियलों बोलु । तोचि हा विठ्ठलु नामा म्हणे ॥ ३ ॥

[४५१]

अगणित गुण वर्णिती पुराणें । पंढरीचे राणे ख्याती जगीं ॥ १ ॥
अलक्ष भेटी लक्षिताची नाहीं । पुंडलिकें कांहीं तप केलें ॥ २ ॥
[1]युगें गेलीं अठ्ठावीस ते अझुनी । उभा चक्रपाणि राहिलासी ॥ ३ ॥
वेद म्हणती नेति पुराणें तें किती । भांबावल्या [2]मती म्हणे नामा ॥ ४ ॥

[४५२]

खोळ बुंथीचा तो [3]देवकीनंदन । उभा देखिला तो गे बाई ॥ १ ॥
नंदाचा नंदनु संताचें जीवन । उभा देखिला तो गे बाई ॥ २ ॥
कामिनीमनोहर नामया दातार । उभा देखिला तो गे बाई ॥ ३ ॥

[४५३]

फेडूनि पीतांबर उभा दिगंबर । कटीं ठेवूनि कर वाळवंटीं ॥ १ ॥
मोतियाचे हार सांडूनि रत्नकीळा । तुळशीच्या माळा गळां घाली ॥ २ ॥
पर्यंक शयन शेषाचें आसन । सांडूनि [4]निजभुवन उभे येथें ॥ ३ ॥
सांडूनियां भक्ति सनकादिकीं प्रेमा । कलियुगीं नामा आवडला ॥ ४ ॥

अभंग ४५० व ४५१—(आ.), ४५२ व ४५३—(पं.) व (शि.)
१ युगें अठ्ठावीस गेलीं तरी अझुनी (बा.) २ श्रुती (बा.) ३ चौबारा (पं.) ४ निधान उभा विटे। (आ.)

[४५४]

पुंडलिकाचे भेटीं भीवरेचे तटीं ।
परब्रह्म उभें वाळुवंटीं गे माये ॥ १ ॥
उभा वीटेवरी कर ठेवुनि कटावरी ।
उभा भीमातीरीं जगजेठी गे माय ॥ २ ॥
विठ्ठल कान्हा चरणीं वांकी तोडर ।
कांसे पीतांबर पदकलीळा मनोहर गे माय ॥ ३ ॥
कान्हा विठ्ठल कान्हा प्रसन्नवदन थोरा ।
जो आथी करुणाकरा हरि नामया दातारा ॥ ४ ॥

[४५५]

देहुडा चरणु [1]वहातसे वेणु । गोपिकारमणु स्वामी माझा ॥ १ ॥
देखिला गे माय यमुनेचे तीरीं । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥ २ ॥
गुंजावर्ण डोळे शिरीं बाबर झोटी । मयूर पिच्छ वेटि शोभतसे ॥ ३ ॥
सगुण मेघःश्याम [2]लावण्य सुंदर । नामया दातार केशवराज ॥ ४ ॥

[४५६]

हरि भोळा हरि भोळा । आम्ही डोळां पाहिला ॥ १ ॥
हरि श्रेष्ठ हरि श्रेष्ठ । आम्हां कष्ट नाहीं ते ॥ २ ॥
हरि उदार हरि उदार । आम्हां धीर होईना ॥ ३ ॥
नामा म्हणे हरि दाता । आम्हां दासां रक्षितो ॥ ४ ॥

[४५७]

अधरीचें अमृत सेविसी एकला । काय पुण्य केलें नेणों पावया ॥ १ ॥
तुळशीच्या माळा शोभति गोपाळा । तयाहूनि आगळा पावया तूं ॥ २ ॥
सोळासहस्र गोपी बोलतील प्रौढी । अधरींची गोडी नेली तुवां ॥ ३ ॥
विष्णुदास नामा केशवीं सौरस । उद्धरिला वंश पावया तुवां ॥ ४ ॥

अभंग ४५४—(आ.), ४५५—(पं.), (शि.), (धु.) व (गं.), ४५६—(आ.), ४५७—(पं.) व (शि.)

१ उभा वाहे (धु.) २ सगुण सुंदर रूप मनोहर (धु.)

[४५८]

वैकुंठ तें घर । सांडूनियां निरंतर ॥ १ ॥
तो हा पुंडलिका द्वारीं । उभा कर कटावरी ॥ २ ॥
क्षीर सागरींची मूर्ती । तो हा रुक्मिणीचा पती ॥ ३ ॥
नये योगियांचे ध्यानीं । छंदें नाचतो कीर्तनीं ॥ ४ ॥
नामा म्हणे आला । सवें परिवार आणिला ॥ ५ ॥

[४५९]

अनंता श्रीधरा गोविंदा केशवा । मुकुंदा माधवा नारायणा ॥ १ ॥
देवकीतनया गोपिकारमणा । भक्तउद्धरणा त्रिविक्रमा ॥ २ ॥
मकर कुंडलें श्रवणीं शोभती । एकावळी दीप्ति तेजें भारी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझा नकळेचि पार । भजों निरंतर सर्वकाळ ॥ ४ ॥

[४६०]

सत्यसंकल्पाचा कर्ता जो विश्वाचा । अनाथा जीवांचा मायबाप ॥ १ ॥
पुंडलिकें तया आणिलें रंगणीं । कटावरी पाणि ठेवूनियां ॥ २ ॥
अणुरेणुमाजि व्यापूनि राहिला । [1]आनत्व जाहला एकलाचि ॥ ३ ॥
नामा म्हणे वेद त्यालागीं बोभाय । जोडोनियां पाय ठाके उभा ॥ ४ ॥

[४६१]

तुझिया सत्तेनें वेदासी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया बळें ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणूनि शरण आलों ॥ २ ॥
मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें । वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥
[2]नामा म्हणे काडी न हाले साचार । प्रभु तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

---

अभंग ४५८--(पं.), ४५९--(पं.) व (शि.), ४६०--(भा.), ४६१--(पं.)

१ आनंतत्वें (भा.) २ (पं.) हस्तलिखितात पुढील दोन कडवी जास्त आहेत--

सर्वही भूताचें पृथ्वी ओझें धरी । विरे पाण्यावरी आज्ञा तुझी ॥ ४ ॥
आकाश पोकळ भूता ग्रासे काळ । जेव्हां देसी बळ तुझें तया ॥ ५ ॥

अनुक्रमणिका

[४६२]

अच्युता अनंता श्रीधरा माधवा । देवा आदिदेवा पांडुरंगा ॥ १ ॥
कृष्णा विष्णु हरि गोविंदा वामना । तूंचि नारायणा नामधारी ॥ २ ॥
मुकुंदा मुरारी प्रद्युम्ना केशवा । नाम सदाशिवा शांतरूपा ॥ ३ ॥
रूपातीत हरी दाखवी सगुण । निरंतर ध्यान करी नामा ॥ ४ ॥

[४६३]

पंढरीचा देव तत्सच्चित अद्वय । तूंचि मायबाप पांडुरंगा ॥ १ ॥
सगुण निर्गुण दाविसी प्रकार । दाही अवतार निमित्तासी ॥ २ ॥
ऐसा माझा स्वामी समर्थ गोविंद । निरंतर छंद हरिनामीं ॥ ३ ॥
नामा म्हणे कांहीं न धरिसी लाज । भाविकांसी गुज कानीं सांगें ॥ ४ ॥

[४६४]

केशिराजा आदि सकळा अनादि । तूंचि कृपानिधि नारायणा ॥ १ ॥
अव्यक्ता अक्षरा सर्व अविनाशा । अगा पंढरीशा पांडुरंगा ॥ २ ॥
तूंचि ब्रह्मचारी गोपिकांचे घरीं । सर्वस्वें उद्धरी सर्व जीवां ॥ ३ ॥
लटिकें दाविसी गोकुळाभीतरीं । नामा म्हणे शिरीं भार वाही ॥ ४ ॥

[४६५]

अनंत हे कळा अनंत हे लीळा । अनंत जयाला वेद गाती ॥ १ ॥
तोचि पांडुरंग पंढरीचा राजा । धणी जाला वोजा भावबळें ॥ २ ॥
अनंत तयाच्या सेवा वोजावणी । नामरूप गुणी नामातीत ॥ ३ ॥
नामा म्हणे अंत असेना तो कांहीं । सांपडतो पाहीं पंढरीये ॥ ४ ॥

[४६६]

देव दाखवी ऐसा नाहीं गुरु । जेथें जाय तेथें दगड शेंदरू ॥ १ ॥
देव दगडाचा बोलेल कैंचा । कोणे काळीं त्यास फुटेल वाचा ॥ २ ॥
देव देव करितां शिणलें माझें मन । जेथें जाय तेथें पूजा पाषाण ॥ ३ ॥
नामा तोचि देव हृदयीं पाहे । नामा केशवाचे न सोडी पाय ॥ ४ ॥

अभंग ४६२ ते ४६५--(आ.), ४६६--(पं.) व (शि.)

[४६७]

वाळवंटीं उभा करें कुरवाळिल । जीवीचें पुसेल जडभारी ॥ १ ॥
हरूषें लोळणीं घालूं महाद्वारीं । येईल सामोरी केशिराज ॥ २ ॥
शोभतसे पायीं भक्त ब्रीदावळी । जिवासी सांभाळी दीनानाथ ॥ ३ ॥[1]
माझा अभिमान धरून मानसीं । नामा म्हणे होसी भक्तां साह्य ॥ ४ ॥

[४६८]

करुणा बहुत तुझ्या चरणापाशीं । धांवोनि हृषिकेशी आलों सर्व ॥ १ ॥
वाळवंटीं उभे पताकांचे भार । पाहोनि शंकर वेडावला ॥ २ ॥
सूर्य चंद्रादिक घालिती लोटांगण । करी प्रदक्षिणा स्वयें गंगा ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें सांगतां बहुत । वेदशास्त्र ग्रंथ ठकावले ॥ ४ ॥

[४६९]

[2]देव आपण नाटक । भक्तां दाखवी वैकुंठ ॥ १ ॥
देव आपण संसारीं । होसी भक्तांचा साह्कारी ॥ २ ॥
देव आपण निराळा । भक्तां दाविती सोहळा ॥ ३ ॥
नामा म्हणे भक्तांसाठीं । हात जोडी जगजेठी ॥ ४ ॥

[४७०]

गोविंद गुणाचें निधान । गोविंद नयनींचें अंजन ।
गोविंद बाळकाचें स्थान । गोविंद चिंतन योगियांचें ॥ १ ॥
गोविंद पांघुरे कांबळा । गोविंद कृपेचा कोंवळा ।
गोविंद भावालागीं भोळा । गोविंद अजामेळा उद्धरणें ॥ २ ॥
गोविंद बुद्धीची बुद्धि । गोविंद एकली मांदी ।
गोविंदें हरिली विघ्नव्याधि । गोविंद सिद्धि स्मरलिया ॥ ३ ॥
गोविंद [3]गोकुळपाळक । गोविंद अंगवणें एक ।
गोविंदें दैत्या लावियेला धाक । गोविंद शेष शयनीं ॥ ४ ॥

अभंग ४६७---(पं.) व (शि.), ४६८ व ४६९---(आ.), ४७०---(पं.) व (शि.)·
१ हा चरण (पं.) व (शि.) मध्ये नाही. २ देव आपणचि नट (बा.) ३ व्यापक (शि.)·

अनुक्रमणिका

गोविंद आडलिया काजा कैवारी । गोविंद बुडत्यांतें तारी ।
गोविंद सोळा सहस्र नारी । गोविंद बाळ ब्रह्मचारी ॥ ५ ॥
गोविंद दान दीक्षा गुरु । गोविंदें अढळ केला धुरू ।
गोविंद नामया दातारू । रुक्मिणीरू गोविंदु ॥ ६ ॥

[४७१]

विठ्ठल माउली कृपेचि [1]सावली । [2]आळवितां घाली प्रेम पान्हा ॥ १ ॥
न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळी व्यापक न विसंबे ॥ २ ॥
माया मोह कैसा झकवि सर्वथा । अंतरींची व्यथा तोचि जाणे ॥ ३ ॥
सुखशांति रूपें [3]लेवउनि अंगीं । लागों नेदी धगी संसाराची ॥ ४ ॥
देऊनि अभयदान करें तो कुरवाळी । करीतसे सांवली पितांबरें ॥ ५ ॥
मुखीं नाममाळा कीर्तन श्रवणीं । लेवविलीं लेणीं नवविध ॥ ६ ॥
नयनीं अंजन सूदलें सांवळें । समाधान जालें सर्व अंग ॥ ७ ।
अच्युत अनंत सुवर्णाची पेटी । घातलिसे कंठीं निर्विकार ॥ ८ ॥
चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणि । प्रभा त्रिभुवनीं विराजित ॥ ९ ॥
मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरी । [4]पद्महस्त शिरीं स्थापितसे ॥ १० ॥
संत पायरज कपाळीं टिळका । नाहीं भय शंका कळिकाळा ॥ ११ ॥
सगुण साजिरा कटीं कडदोरा । अवर्ण दुर्भरा दृढ बोधू ॥ १२ ॥
काम क्रोधादिक करूनि पुतळे । पाईं जे घातले पायवट ॥ १३ ॥
वासनेचि दृष्टी लागेल त्या क्षणीं । उभा चक्रपाणि मागें पुढें ॥ १४ ॥
संतपायीं नामा शृंगार मंडितु । अखंड क्रीडतु महाद्वारीं ॥ १५ ॥

[४७२]

एक गोक्षीर धूम्र धवळा । एक तो सहज मेघ सांवळा ।
एक कंठीं रुंडमाळा । एक गळां वैजयंती ॥ १ ॥
एक तो वृषभारूढ जाण । एका साजे गरुडवाहन ।
एक स्मशानीं भस्मोद्धुळण । एका शयन क्षीरसागरीं ॥ २ ॥

अभंग ४७१--(पं.) व (शि.), ४७२--(आ.)
१ कोवळी (पं.) २ आठवितां (आ.), चिंतिताची (पं. व शि.) ३ लेवविली (आ.)
४ पिंपळवाण (पं.)

अनुक्रमणिका

एक भोळा कैलासीं चक्रवर्ती । एक तो वैकुंठाधिपती ।
एका सुरवर मुगुटीं बंदिती । एका अंगुष्टी गंगा वाहे ॥ ३ ॥
एकाचे चरणीं नेपुरें झणात्कारू । एका पायीं रुळे तोडरू ।
एका परिधान व्याघ्रांबरू । एका पीतांबरू कसियेला ॥ ४ ॥
एका नरकपाल खट्वांग डमरू त्रिशूळ । एका शंख चक्र गदा कमळ ।
एका अर्धांगी हैमवती बाळ । एका कमळा वामभागीं ॥ ५ ॥
एक त्रिपुर संघानीं लक्ष न चुके । एकबाणें वाळी वधिला कौतुकें ।
विष्णुदास नामा एक रूप देखे । हरिहर कौतुकें वर्णितसे ॥ ६ ॥

[ ४७३ ]

अपराधाविण बळी । घातला पाताळीं ।
सर्वेचि कणव उपजली । द्वार राखिसी तयाचें ॥ १ ॥
गाऱ्हाणें सांगावें कवणा । अगा केशव सुजाणा ।
कोणी आणिक तुजविणा । नाहीं दुसरा आम्हातें ॥ २ ॥
बाळमित्र सुदामा स्वें जेवी । धान्य जो मागे गांवोगांवीं ।
विपत्ति त्याची दूर व्हावी । म्हणून दिधली राणीव ॥ ३ ॥
तुझें नाम न तोंडीं । वसुदेव देवकी बांधोडी ।
कंसा केली धांगडी । ऐसी विपत्ति दाखवूनि ॥ ४ ॥
इंद्र वर्षे शिळाधारा । पर्वत केला सामोरा ।
इंद्रा लाविला दरारा । एवढी विपत्ति दाखवुनि ॥ ५ ॥
जोहरीं सुदले पांडवा । सर्वेचि उपजली कणवा ।
त्यासी केला त्वां रिघावा । आगीं पाहण्या धांवसी ॥ ६ ॥
सभा पिशुनाची दाटली । द्रौपदी काया आसुंडली ।
तिये वस्त्रें पुरविलीं । येव्हढी आपदा दाखवूनी ॥ ७ ॥
दैत्यें गांजिला प्रल्हादु । तुझ्या नामाचा प्रसादु ।
ऐसा करूनि विनोदु । तया दैत्या केला वधु ॥ ८ ॥
बिभीषण हाणितला लाथां । लंका दिधली त्या उचिता ।
कृपा करें रघुनाथा । समर्थ केला तये वेळीं ॥ ९ ॥
गजेंद्र पानेडी । धरिला यमदूत सुसरी ।
वैकुंठीहूनि घालिसी उडी । येवढी आपदा दाखवुनि ॥ १० ॥

अभंग ४७३—(पं.)

अनुक्रमणिका

आम्हां डिंगराचें बोलणें । अनाथनाथा परिसणें ।
विष्णुदास नामा म्हणे । शहाणें व्हावें यापरतें ॥ ११ ॥

[४७४]

दुरोनी ओळंगिल्या अविनाश देताहे । तो जवळीं जातां काय देईल नेणों ॥ १ ॥
ऐसा हा कृपाळू [1]लक्ष्मीकांत आहे । [2]साधन प्रवाहें वोळगती प्राणी ॥ २ ॥
सेवा माझा स्वामी वैकुंठनायक । भुक्तिमुक्तिदायक आणिक नाहीं ॥ ३ ॥
साधिलें नगर देऊनियां शिर । कष्ट दशशिरें एवढें केलें ॥ ४ ॥
तें दिलें बिभीषणा एका नमस्कारा । त्या माझ्या उदारा कां न भजा ॥ ५ ॥
मांडी बैसों नेदी सापत्न ते माता । म्हणे राज्यधुरूसुता नव्हसी तूं ॥ ६ ॥
हें ऐकोनि वना जाय तो तत्क्तां । सकळ देवा माथा वरिष्ट केला ॥ ७ ॥
दुर्योधनें भोजना बहु केले सायास । परि न घे ग्रास तया घरीं ॥ ८ ॥
विदुराचे घरीं न पुसतां जाय । भक्ति प्रिय होय स्वामी माझा ॥ ९ ॥
अर्जुनाचे काजीं सांडीं निज पैजा । सुदर्शन वोजा धरियलें ॥ १० ॥
आपण लटिका जाला भीष्म साच केला । काळाचा अंबुला स्वामी माझा ॥ ११ ॥
दीक्षित अवदान देती निज करीं । परि मुख न करी तयांकडे ॥ १२ ॥
सुदामा जो पोहे देत मुष्टीभरी । तयासी श्रीहरी पसरी हात ॥ १३ ॥
[3]म्हणउनि गावा हाचि मनिं घ्यावा । हाचि वो धरावा हृदयकमळीं ॥ १४ ॥
हरिगुण नाम हेंचि प्रिय आम्हां । कीर्ती गाय नामा होऊनि भाट ॥ १५ ॥

[४७५]

[4]स्तंभीं प्रगटलीसे हांक । कापिन्नले तिन्ही लोक ।
भेणें पळती शंखादिक । आणि कैलास आंदोळले ॥ १ ॥

---

अभंग ४७४ व ४७५—(पं) व (शि.)

१ लक्ष्मीचा कांत (आ.) २ कासया अंतरायें वोळगति प्राणि। (शि. व पं.), साध वाहे वोळगति प्राणि। (पं.) ३ म्हणोनि हा गावा म्हणूनिया घ्यावा । तोचि आराधावा हृदयकमळीं ॥ १४ ॥ (आ.) (पं.) प्रतीत चरण ७ व ८ हे वेगळे आहेत. ते असे—

तया आढळपद दिधलें त्या उदारें । म्हणोनि भजा रे पांडुरंगा ॥ ७ ॥
हाचि रे वर्णाक्या हाचि प्रिये आम्हां। किर्ती वर्णी नामा होऊनि भाट ॥ ८ ॥ (पं.)

४ काही प्रतींत हा अभंग—

अज्ञान बाळकें तुझा हाकारा केला । तेणें तये वेळीं स्वर्ग भेदिला ॥
ऐकुनी तो धाविन्नला । अहो देवी खेचरें ॥ (आ.)

या चरणांनी सुरू होतो, तर (पं.) आदि काही प्रतींत पहिले दोन्हीही चरण नाहीत.

आली त्रिभुवन देवता । ना भी ना भी रे म्हणतां ।
माझा प्रल्हाद केउता । तो कवणें रे गांजिला ॥ २ ॥
वदन पसरूनि विक्राळ । झरझरीत झरे लाळ ।
नेत्र जैसे वडवानळ । शोषूं पाहे जळविधि ॥ ३ ॥
संहार जाला नागकूळ । भ्याले अष्टहि लोकपाळ ।
स्वर्गी सुटली खळबळ । अमरावती इंद्रासी ॥ ४ ॥
मग दैत्यानें पाचारित । लोह खणखणा वाजत ।
'हाकीं अंबर गर्जत । तेणें कापे मेदिनी ॥ ५ ॥
कवटाळुनि चहूं हातीं । विदारिले चपेटघातीं ।
जैसा रूद्र प्रळयांतीं । तैसा हरी दिसतसे ॥ ६ ॥
दैत्य न मरे कवणे परी । मग तो धरिला जान्हुवरी ।
नखें उदर फाडोनि सत्वरी । अस्थि चूर्ण केलीया ॥ ७ ॥
भोजें नाचती देवता । मुक्ति दिल्ही दैत्यनाथा ।
नामया स्वामी वरदहस्ता । अभयदाता भक्तांसी ॥ ८ ॥

[४७६]

अणिमादि सिद्धी जयाचिया दासी । उणें तयापासीं काय आहे ॥ १ ॥
आणिकाचे द्वारीं सांडोवा पें होसी । धिग् धिग् न लाजसी अरे जना ॥ २ ॥
सुलभ सोपारा सेवा माझा स्वामी । म्हणतां जोडे नामीं एक वाचे ॥ ३ ॥
अजामेळ वैकुंठा एक नेला नामें । गणिका ²हें नामें स्वयें गेली ॥ ४ ॥
ऐसा हा कृपाळू आसनीं शयनीं । न विसंबावा मनीं भाग्यवंतीं ॥ ५ ॥
जटायु पक्षियाचें स्वयें जाला लेकरूं । त्याचा क्रियापारू केला रामें ॥ ६ ॥
शबरीचीं फळें उच्छिष्टें ही खाय । मा कैसी राम सोये विसरति ॥ ७ ॥
शाहाणिया द्वारपाळ म्हणतां लाज थोरी । जरी जाला भिकारी ते न साहे ॥ ८ ॥
तो बळीचा द्वारपालु सारथी पार्थाचा । तो गोसावी आमुचा देवराणा ॥ ९ ॥
गर्भवास यातना न साहावे जना । म्हणोनि लोक भजना प्रवर्तले ॥ १० ॥
अंबऋषिरायास पडले सायास । साहिला गर्भवास सकळ देवें ॥ ११ ॥
उच्छिष्ट हेंचि खातां प्रायश्चित असे । तो गोपाळाचें कैसें खाय हरी ॥ १२ ॥

अभंग ४७६—(पं.) व (शि.)
१ धाके (पं.) २ विमानें (आ.)

अनुक्रमणिका

[1]त्या सुख लाभासी सुरवर इच्छिती । ऐसा लक्ष्मीपति कां न सेवावा ॥ १३ ॥
म्हणोनि [2]सोइरा आन दुजा नाहीं । गुरु पिता पाहीं हाचि बंधु ॥ १४ ॥
सज्जन सांगती आणिक नाहीं आम्हां । कीर्ती [3]वर्णी नामा होऊनि भाट ॥ १५ ॥

[४७७]

देवा तूं जया होसी प्रसन्न । तया न लगे कर्मबंधन ।
निकें म्हणती सकळ जन । [4]नीच लोक वंदिती ॥ १ ॥
तुझी दृष्टी कृपावंता । जयावरी पडे अनाथनाथा ।
तया न बाधी संसारव्यथा । सर्वस्व त्याचें हरिसी ॥ २ ॥
माती धरिल्या होय कनक । भोग भोगिती परममूर्ख ।
नातळती महादोष । मुखीं नाम गर्जतां ॥ ३ ॥
धन्य धन्य ते संसारी । हो कां पुरुष अथवा नारी ।
दरिद्र नाहीं त्यांचे घरीं । तूं श्रीहरी सानुकूळ जालिया ॥ ४ ॥
ऋद्धि सिद्धि द्वारा वोळंगती । वैरी दास्यत्व करिती ।
विषें तें अमृत होती । तूं श्रीपति सानुकूल जालिया ॥ ५ ॥
येथूनि नेसील परते । नामा म्हणे वैकुंठातें ।
लक्षा नये चहूं वेदां तें । नाना मतें धांडोळितां ॥ ६ ॥

[४७८]

पांडव भाग्याची वर्णावया थोरी । शेषाची वैखरी न वर्णवे ॥ १ ॥
पीतांबर कास घालूनि वनमाळी । काढी उष्टावळी आवडीनें ॥ २ ॥
विधीचा जनक रमा ज्याची दासी । ध्यान अहर्निशीं करी शिव ॥ ३ ॥
रोमीं जयाचे ब्रह्मांडें अनंत । चारी वेदां अंत न कळे ज्याचा ॥ ४ ॥
नामा म्हणे राबे भक्तांचिये घरीं । भाव देखोनि हरि भुलतसे ॥ ५ ॥

[४७९]

नेणें साही शास्त्रें तुज केशिराजा । स्वरूपें कुबजा काय होती ॥ १ ॥
न मागें मी तैसा न मागें मी तैसा । न मागें मी तैसा कदा काळीं ॥ २ ॥

अभंग ४७७—(पं.) व (शि.), ४७८ व ४७९—(आ.)
१ त्या सुखा सुरवर जन्म इच्छितातो । त्या ऐसा लक्ष्मीपति कां न सेवावा (आ.) ॥
२ धायरा (पं. व शि.) ३ गाय (पं. व शि.) ४ विश्व (पं. व शि.)



अनुक्रमणिका

कौरवांचे काजीं घेसी गाढेपण । धर्मा घरीं पूर्ण घोडे धुसी ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्ही कीर्ती वाखाणावी । भक्तांसी गोसावी होसी देवा ॥ ४ ॥

[ ४८० ]

पाला खाऊनियां धाला बहिणी घरीं । भक्तिलागीं हरि वेडा जाला ॥ १ ॥
सुदाम्याचे पोहे कोरडेचि खाय । टकमका पाहे चहूंकडे ॥ २ ॥
विदुराच्या कण्या खाय धणीवरी । जाला बळिचे द्वारीं द्वारपाळ ॥ ३ ॥
नामा म्हणे हरिचे न कळती पवाडे । नेणों भक्तांपुढें वेडा जाला ॥ ४ ॥

[ ४८१ ]

काय वानूं आतां पायाचा महिमा । जेथें जाली सीमा बोलायाची ॥ १ ॥
विठोबाचे पाय आठवितां मनीं । गेलें हरपूनि भवभय ॥ २ ॥
पाय [१]नारदाचे हृदयीं धरितां । ब्रह्मांडीं मान्यता जाली त्याची ॥ ३ ॥
सनकादिकां लागीं पाय वज्रकवच । ब्रह्मादि देवांस पद जेणें ॥ ४ ॥
लागतांचि पाय शिळा दिव्य जाली । पाषाण तारिले उदकावरि ॥ ५ ॥
पाय ते रमेचे सौभाग्य साजिरें । योगी ऋषीवर थोर जेणें ॥ ६ ॥
नामा म्हणे मनीं पाय सर्वकाळ । म्हणोनि सुकाळ आनंदाचा ॥ ७ ॥

[ ४८२ ]

उभा भीमातीरीं कर कटावरी । राहे निरंतरीं भक्तांपुढें ॥ १ ॥
भक्तभाग्य थोर नव्हे कधीं प्राप्ती । जाणोनी श्रीपती गुज बोले ॥ २ ॥
गणिका गजेंद्र उद्धव नारद । आपण गोविंद मिळोनियां ॥ ३ ॥
समुद्रमंथनीं उभा करोनियां । लागतसे पायां नामा म्हणे ॥ ४ ॥

[ ४८३ ]

गगनीं ध्रुव तुवां अढळ पैं केला । तो बाळ धाकुला न म्हणसी ॥ १ ॥
अजामेळाचें तुवां चुकविलें संकट । ब्राह्मण तो नष्ट न म्हणसी ॥ २ ॥

अभंग ४८०—(पं.) व (शि.), ४८१—(आ.), ४८२ व ४८३—(पं.) व (शि.)
१ नारदानें (बा.)

अनुक्रमणिका

प्रल्हादाचा तुवां केला कैवारू । वैऱ्यांचा कुमरू न म्हणसी ॥ ३ ॥
गजेंद्र पशु सोडविला पानडिये । मगर बोढिये ऐसें न म्हणसी ॥ ४ ॥
रुक्मांगदाची तुवां उद्धरिली नगरी । विषयीं मुरारी न म्हणसी ॥ ५ ॥
ऐसे अपराधी न म्हणसी देवा । नामा तो केशवा विनवितसे ॥ ६ ॥

[४८४]

खगावरी स्वारी [1]करूनियां देवा । धांवसी केशवा भक्तांसाठीं ॥ १ ॥
रामा परशुरामा कृष्णा नारायणा । हरी संकर्षणा भक्तांसाठीं ॥ २ ॥
बिभीषण तारी रावणातें मारी । दावी माव हरी भक्तांसाठीं ॥ ३ ॥
नामा म्हणे भक्ताकारणें गोविंदा । घेऊनियां गदा उभा ठासी ॥ ४ ॥

[४८५]

कौस्तुभ सोज्वळ कंठीं शोभताहे । भक्तांसाठीं बाहें उभारिलीं ॥ १ ॥
[2]आन हितासाठीं करिसी धांवण्या । विदुराच्या कण्या गोड करी ॥ २ ॥
ब्रह्मचारी साक्ष सत्यत्वें करिसी । पुढें तूं धांवसी आवडीनें ॥ ३ ॥
वचना अंतर पडों नेदी सत्य । नामा म्हणे भृत्य होसी देवा ॥ ४ ॥

[४८६]

दर्दुराचें पिलूं म्हणे रामकृष्ण । नाहीं उदक उष्ण जालें तेथें ॥ १ ॥
कढईमध्यें बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावे वेगीं ॥ २ ॥
तये काळीं आज्ञा केली पावकासी । झणीं तापविसी तयालागीं ॥ ३ ॥
ऐसा तो कृपाळु आपुलिया दासा । आमुचा कोंवसा नामा म्हणे ॥ ४ ॥

[४८७]

देवा पांडुरंगा वासुदेवा हरी । गोविंदा मुरारी नारायणा ॥ १ ॥
नारायणा कृष्णा कमळलोचना । माधवा प्रद्युम्ना रावणारी ॥ २ ॥
रावणारि होसी जानकी टाकुनी । हिंडसी अंगणीं अर्जुनाच्या ॥ ३ ॥

---

अभंग ४८४ व ४८५—(पं.) व (शि.), ४८६ व ४८७—(आ.)
१ करूनि यादवा (पं.) २ जन (पं.)

अनुक्रमणिका

अर्जुनाच्या घरीं अंगें घोडे धुसी । लज्जा द्रौपदीची राखियेली ॥ ४ ॥
राखियेलीं द्वारें भक्ता बळिवंता । नामा म्हणे आतां काय सांगू ॥ ५ ॥

[४८८]

भरतें त्यागिली जननी । ख्याती जाली त्रिभुवनीं ॥ १ ॥
ऐसी भक्ति तुझी हरि । जगीं करंटा न करी ॥ २ ॥
बंधु अवज्ञीं बिभीषणा । प्रकट जाला रामराणा ॥ ३ ॥
प्रल्हाद पितृ अवज्ञा करी । स्तंभीं प्रगटला नरहरी ॥ ४ ॥
पति अवज्ञा ऋषिपत्न्यांसी । कृष्णदर्शन पूर्ण त्यांसी ॥ ५ ॥
नामा म्हणे भक्ती ते अवरोधी पाही । त्यासी त्याजिल्या दोष नाहीं ॥ ६ ॥

[४८९]

पंढरीचा देव बहुत कोंवळा । सगुण सांवळा सारथि हा ॥ १ ॥
सारथि सर्वांचा साक्षिभूत असे । संकटीं सायासें गजेंद्रासी ॥ २ ॥
गजेंद्रासी रक्षी गणिका उद्धरी । भिल्लीणीचे करीं फळें भक्षी ॥ ३ ॥
भक्षी सुदाम्याचे पोहे मुष्टिभरी । नामा म्हणे हरि गोड मानी ॥ ४ ॥

[४९०]

पंढरीचा देव पाहतां सगुण । प्रल्हादाकारणें सिद्ध जाला ॥ १ ॥
पंढरीचा देव पतित पावन । उभा नारायण विटेवरी ॥ २ ॥
पंढरीचा देव प्रत्यक्ष उदार । बाळया भोळया पार दावितसे ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा कीर्ति वानूं काय । आम्हांसाठीं सोय लावी बापा ॥ ४ ॥

[४९१]

सगुण तें ब्रह्म विटेवरी नीट । कोण्या प्राण्या कष्ट होऊं नेदी ॥ १ ॥
देऊनियां क्षेम देह पालटिसी । वृद्ध रूप होसी कर्णासाठीं ॥ २ ॥
भजन भक्तांचें मानिसी वचन । नाम नारायण म्हणे कां रे ॥ ३ ॥
उफराटी वदवी वालिमका नामाच्या । शतकोटी संख्या प्रविस्तार ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा भक्तीचें पैं पिसें । त्यालागीं हव्यासें होसी जाण ॥ ५ ॥

---

अभंग ४८८—(पं.), ४८९ ते ४९१—(आ.)

अनुक्रमणिका

[४९२]

शिशुपाळादिकां कोठें शुद्ध भाव । उद्धरी केशव उंच नीच ॥ १ ॥
काय कामा पुत्रा कोण आले जाणा । सेखीं त्या रावणा कैवल्यदानीं ॥ २ ॥
महादुष्ट शंखासुरें नेले वेद । शेवटीं गोविंदें सोडविलें ॥ ३ ॥
पित्याचिये हातीं पुत्र वध करी । कृपाळू बा हरी नामा म्हणे ॥ ४ ॥

[४९३]

पांडुरंगा नमूं परात्परा नमूं । सगुणासी नमूं साक्षीभूता ॥ १ ॥
समस्त संबंध साधियेले हरी । रावणादि वैरी उद्धरिले ॥ २ ॥
नामरूपातीता नाहीं [1]भेटाभेट । म्हटलें आहे नीट नामा म्हणे ॥ ३ ॥

[४९४]

सगुण समान भजती अंतरी । सर्व भूतांतरीं असे एक ॥ १ ॥
पहा कोळियाची काय सांगों कीर्ति । विद्या अभ्यासिती मूर्तीपुढें ॥ २ ॥
द्रौपदीचे घरीं होते उपवासी । देठहि लाविसी अकस्मात ॥ ३ ॥
नामा म्हणे जाण प्रारब्ध कारण । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ४ ॥

[४९५]

सहस्रनामाची घालितां लाखोली । तरला हा कोळी वाल्मिक तो ॥ १ ॥
पुराणप्रसिद्ध गोष्टी ह्या ऐकाव्या । प्रत्यक्ष देखाव्या कोणें ठायीं ॥ २ ॥
अंगें अनुभवा आपण आणाव्या । तरीच वानाव्या संतांपुढें ॥ ३ ॥
नाहीं तरी मज वाटे कानकोंडे । [2]सुधा म्हणे तोंडें चवी नेणें ॥ ४ ॥
नामा म्हणे असे पोटामध्यें भूक । तृप्तीचें तें सुख बोलों कैसें ॥ ५ ॥

[४९६]

प्रल्हादा रक्षिलें पांडवां प्रतिपाळिलें । तया उभें केलें पुंडलिकें ॥ १ ॥
बिभीषणा स्थापिलें ध्रुवासी अढळ केलें । तया उभें केलें पुंडलिकें ॥ २ ।

अभंग ४९२ व ४९३—(आ.), ४९४ व ४९५—(पं.) व (शि.), ४९६—(बा.)
१ भेदाभेद (बा.) २ क्षुधा (पं.)

चैद्यादि मर्दिले सुरवर तारिले । तया उभें केलें पुंडलिकें ॥ ३ ॥
अहिल्ये उद्धरिलें गजेंद्रा उद्धरिलें । तया उभें केलें पुंडलिकें ॥ ४ ॥
गयासुरा वधिलें बळिस पाताळीं घातलें । तया उभें केलें पुंडलिकें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा भक्तांचें ठेवणें । घेऊनि केंवि जाणें घडे तुज ॥ ६ ॥

[४९७]

एक अंजनीं उत्पन्न । एक खांबीं अवतरण ॥ १ ॥
ते पावले दोघेजण । नरसिंह हनुमंत आपण ॥ २ ॥
एक सिंहनाद करी । एक भुभु:कार करी ॥ ३ ॥
एक सीताशुद्धी करी । एक प्रल्हादा कैवारी ॥ ४ ॥
एक बाळ ब्रह्मचारी । एक अर्धांगी सुंदरी ॥ ५ ॥
एक रूद्राचा अवतारू । एक नामया दातारू ॥ ६ ॥

[४९८]

उचितानुचिता भजे पंढरीनाथा । न बोले सर्वथा वर्मे तुझीं ॥ १ ॥
बिभीषणा तुवां दिधली नगरी । कीर्ति चराचरीं वाखाणिती ॥ २ ॥
ध्रूव प्रल्हाद अंबऋषि नारद । हरिश्चंद्र मुचकुंद करोनियां ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां जन्मजन्मांतरीं । करीन ऋणि हरी तुज आतां ॥ ४ ॥

[४९९]

निरंतर नाम जपे । पिता प्रल्हादास कोपे ।
उदरा आला वैरिरुपें । म्हणवूनि घायीं त्रासला ॥ १ ॥
कोपें कोपला नरहरी । कवण तयातें सांवरी ।
खटखटा वाजती दांतोरी । दैत्यावरी उठावला ॥ २ ॥
हांक देऊनि अवचितीं । आंदोळली त्रिजगतीं ।
समुद्रपाणी उसळती । उलथों पाहाती गिरिवर ॥ ३ ॥
सिंहवदन प्रगटला । मगंजू अवचिता उतटला ।
भेणें वासुकी मोवाळला । गजबजिला पाताळीं ॥ ४ ॥

अभंग ४९७ व ४९८—(आ.), ४९९—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

जैसा प्रळयकाळिचा मेघु । तैसा गडगडिला वेगु ।
अरे मर्गजाच्या खांबी सवेगु । क्षणामाजीं प्रगटला ॥ ५ ॥
केला भक्ताचा कुडावा । शिक लाविली दानवा ।
नामया स्वामी वोळंगावा । नरहरि विसांवा भक्तांचा ॥ ६ ॥

[५००]

वैकुंठाहूनि केलें [1]धांवणें । भक्त प्रल्हादाकारणें ॥ १ ॥
नरहरि पावला पावला । महापापा पळ सुटला ॥ २ ॥
शंख चक्र पद्म गदा । ना भी ना भी रे प्रल्हादा ॥ ३ ॥
पावला गरुडध्वज । नामया स्वामी केशवराज ॥ ४ ॥[2]

[५०१]

तडक फुटला अंबरीं । आला प्रल्हाद कैवारी ॥ १ ॥
आला आला हांक देतु । सिंहनादें रे गर्जतु ॥ २ ॥
दैत्यां दचकु नरहरी । नामया स्वामी नरकेसरी ॥ ३ ॥

[५०२]

कायरे गडगडित दुमदुमीत । ब्रह्मकटाह उलथूं पहातें ॥ १ ॥
तो देव आला रे नरहरी । आतां कवण सांवरी ॥ २ ॥
प्रल्हादासी दिधलें जैत्य । हर्षें नामा गुढी उभारित ॥ ३ ॥

अभंग ५०० ते ५०२—(पं.) व (शि.)

१ पेणें (आ.) २ (शि.) प्रतीत पुढील चरण अधिक आहेत. तसेच काही (पं.) प्रतींतही हे चरण अधिक आढळतात—

आला आला रे नरहरी । भक्त प्रल्हादा कैवारी ॥
खांब तडतडला तडतडीला । [कडाडीला–(पं.)] त्रिखंड भूमी दणदणिला ॥
स्तंभामध्ये जाली हांक । कापिन्नले तिन्ही लोक ॥
सिंह वदन विशाळ । मुखीं रीघताति ज्वाळ ॥

एका (पं.) प्रतीत आणखीही वेगळेपणा आढळतो. तो असा—

(सनकादिकां) देव सनकासी आनंदु । प्रगटला परमानंदु ॥
आसुर धरिला ज्यानुवरी । नामया स्वामी नरकेसरी ॥

(शि.) मध्ये दोन वेळा हा अभंग आहे. दुसऱ्यात १ व ३ चरणांतील बदल सारखेच आहेत. हा अभंग चार चरणीच असून २ व ४ चरण हे छापील प्रमाणेच आहेत.

अनुक्रमणिका

[५०३]

पहाहो कडकडिलें गगनीं । भेणें कांपते मेदिनी ॥ १ ॥

तो देव दैत्या अंतकु । होय भक्तांसी पाळकु ॥ २ ॥[1]

भोजें प्रल्हाद नाचतु । नामया स्वामी रे अनंतु ॥ ३ ॥

[५०४]

वैकुंठिहूनि धांवत आला । खांबा आड उभा ठेला ॥ १ ॥

खांब गडगडिला गडगडिला । वीर नरसिंह पावला ॥ २ ॥[2]

पावला नामया स्वामी । जग उद्धरिलें त्याचे नामीं ॥ ३ ॥

[५०५]

अंबऋषि रुक्मांगद । नारद महामुनी प्रल्हाद ॥ १ ॥

मिळोनि सनकादिकां भारू । पांडुरंगीं हरि जागरू ॥ २ ॥

शंख भेरी नादाकार । नादें गर्जंत अंबर ॥ ३ ॥

योगनिद्रेसी पहुडला । आदिपुरुष उपवर जाला ॥ ४ ॥

देवी उतरोनी विमानीं । आदि क्षीरसागर भुवनीं ॥ ५ ॥

सुरवर ओळंगती जगन्निवास । गातो नामा विष्णुदास ॥ ६ ॥

[५०६]

पैल गरुडाचें वारिकें । गगनीं कृष्ण येतां देखे ॥ १ ॥

[3]दवडा दवडी हरि धांवतु । ना भी नामयातें म्हणतु ॥ २ ॥

वैकुंठाहूनि आले वेगीं । नामयाच्या [4]भक्तिलागीं ॥ ३ ॥

[५०७]

दिसंदिस कैसा जालासी शहाणा । गोवळांसी खेळसी पंढरीच्या राण्या ॥ १ ॥

विश्वामाजीं तुझें बोभाट मोठें । जन्ममरणाचे संकल्प तुटे ॥ २ ॥

---

अभंग ५०३ व ५०४—(पं.) व (शि.), ५०५—(शि.), ५०६ व ५०७—(पं.) व (शि.)

१ (पं.) मध्ये २ व ३ या चरणांच्यामध्ये एक चरण आहे. तो असा—
भक्त संकटीं धांवत । क्षणामाजीं केला मुक्त ॥

२ (पं.) मध्ये २ व ३ चरणांच्यामध्ये एक चरण आहे. तो असा—
भक्त हृदईचे प्रेम । एक जाणे घनश्याम ॥ ३ ॥

३ दुडवा दुडवी (आ.) ४ भेटीलागी (पं.)

अनुक्रमणिका

अकळ करणी नकळे लिहितां धरणी । सिंधुशिरोमणि करूनि नाम तुझें ॥ ३ ॥
नामा म्हणे कीर्ति काय वानूं देवा । भक्तांचा कुडावा ब्रीद तुझें ॥ ४ ॥

[५०८]

वेदां जन्मस्थान शास्त्रां समाधान । काय बुझावण दाखविसी ॥ १ ॥
जगादि अनंत अवतार घेसी । चरित्र दाविसी भक्तांपुढें ॥ २ ॥
पतितपावन तूंचि नारायण । सत्वर धांवणें दामोदरा ॥ ३ ॥
नामा म्हणे भवबंधविमोचका । वैकुंठ नायका पांडुरंगा ॥ ४ ॥

[५०९]

चोरूनि खादलें दहीं दुध लोणी । जिहीं चक्रपाणि खेळविला ॥ १ ॥
अखंड उन्मत्तें मतिमंद मूढें । गौळणीपाशीं रडे रूपें दावी ॥ २ ॥
शकुनीचा पुत्र शिव द्वेष करी । संकट मुरारी निवारिसी ॥ ३ ॥
उद्धरिल्या सर्व गोपगवळणी । लीला दाखवूनि नामा म्हणे ॥ ४ ॥

[५१०]

तुझिया कीर्तना कोण जाय आतां । सख्या भगवंता कृपा करी ॥ १ ॥
भीष्म पहुडला शरांचे पंजरीं । तया प्रश्न करी युधिष्ठिर ॥ २ ॥
महाभयेश्वरी विघ्नें निवारितां । सकळां देखतां दांत पाडी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझी भक्ति अघटित । पवाडे अनंत दाविना कां ॥ ४ ॥

[५११]

अगम्य सामर्थ्य नयेचि गणना । तारूनि पाषाणा केलें सम ॥ १ ॥
तारिसी वानर अवघेचि सेना । तोडिसी बंधना पांडुरंगा ॥ २ ॥
काय वनचर जाणती प्रत्यक्ष । परीक्षिती [1]साक्ष दिस सातां ॥ ३ ॥
कृतत्रेतद्वापारांचे आदि अंतीं । नामाचि ते ख्याति म्हणे नामा ॥ ४ ॥

---

अभंग ५०८ ते ५१०—(आ.), ५११—(पं.)
१ मोक्ष (पं.)

अनुक्रमणिका

[५१२]

सर्व देवांमाजीं विठ्ठल वरिष्ठ । बोलतसे स्पष्ट वेदशास्त्रीं ॥ १ ॥
अच्युता अनंता माधवा मुकुंदा । गोपाळा गोविंदा गोपवेषा ॥ २ ॥
कृष्णा कमलाक्षा कस्तुरीचा टिळा । नेसला पाटोळा खोंचे शिरीं ॥ ३ ॥
नामा म्हणे रामकृष्ण नारायण । तारिसी पाषाणां सिंधुमाजीं ॥ ४ ॥

[५१३]

[1]षड्गुणसंपन्न पंढरीच्या राया । आमुच्या स्वामिया केशिराजा ॥ १ ॥
रामकृष्ण हरी श्रीधरा मुकुंदा । सज्जनीं स्वानंदा सर्वातीता ॥ २ ॥
गोविंदा गोपाळा गोपवेषधारी । गोवर्धन धरी नखावरी ॥ ३ ॥
दुष्ट दुर्जनाच्या दुखाविना चित्ता । पावन पतिता नामा म्हणे ॥ ४ ॥

[५१४]

संतोषाकारणें सज्जन जीवासी । साह्यकारी होसी नारायणा ॥ १ ॥
समान करिसी सर्वां भूतीं जाण । पतीतपावन [2]भाक तुझी ॥ २ ॥
भक्ति भाव ज्यांचा भाग्यें आगळिया । होसी देवराया सर्वविध ॥ ३ ॥
समर्थपणासी कोणा विचारावें । नामा म्हणे भावें कारण हा ॥ ४ ॥

[५१५]

अलक्ष्या अच्युता सख्या भक्त राया । तूंचि देवराया पांडुरंगा ॥ १ ॥
परात्परतरा पार नेणें ब्रह्मा । तूंचि निजधामा स्वयें देसी ॥ २ ॥
विश्वामित्रासाठीं विलंब न करी । बळिचिया द्वारीं भृत्य होसी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझी माव नेणें कोणी । धांवे चक्रपाणि त्वरें नेटें ॥ ४ ॥

[५१६]

योगी मुनिजन तपस्वी याज्ञिक । ते तव पादुका वंदिती शिरीं ॥ १ ॥
हरिहर ब्रह्मा सूर्य चंद्रादिक । ओढवी मस्तक रजरेणु ॥ २ ॥

---

अभंग ५१२—(आ.), ५१३ व ५१४—(बा.), ५१५ व ५१६—(आ.)
१ सगुणसंपन्न (बा.) २ ब्रीद तुझें (बा.)

गंगा भागीरथी होती शुचिमंत । आणिकांची मात काय सांगों ॥ ३ ॥
नामा म्हणे नेणों पार तुझा देवा । कृपाळू केशवा केशीराज ॥ ४ ॥

[५१७]

भक्त पुंडलिका देखोनि निकटा । आलासी वैकुंठाहुनि आजी ॥ १ ॥
नारदवचन ऐकोनियां मनीं । सुखें चक्रपाणि सुखावला ॥ २ ॥
सुखरूप सदा देव दुरी ठेला । मुनीश्वर काला स्वयें दावी ॥ ३ ॥
नामा म्हणे तूज भक्ति पिसें फार । साधिलें नगर क्षणमात्रें ॥ ४ ॥

[५१८]

चातुर्यसागरा आमुची जननी । जाणते रुक्मिणी प्रेमकळा ॥ १ ॥
चरणींची प्रभा जाणे मणिग्रीव । नकुळ वैष्णव सखे माझे ॥ २ ॥
कुबेर गौतमवधू अहिल्या । चक्रपाणि तया मुक्त केलें ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे पायीं संजीवन । सदाशिव ध्यान तेंचि करी ॥ ४ ॥

[५१९]

चारी वेद गाती जयासी अखंड । नेणवे प्रचंड कीर्ति ज्याची ॥ १ ॥
तोचि भीमातीरीं उभा दिगंबर । ठेवी कटीं कर भक्तांसाठीं ॥ २ ॥
युद्धीं अर्जुनातें सांगितली गीता । सहस्रशा कांता केल्या ज्यानें ॥ ३ ॥
नामा म्हणे शिवा दिल्हें शिवपण । ब्रह्मया लागोन उपदेश ॥ ४ ॥

[५२०]

विश्वाच्या मोहना कपटनाटका । पंढरीनायका पांडुरंगा ॥ १ ॥
अवतार धरूनि होऊनि निमित्त । बुजविसी दैत्य सर्पखाणी ॥ २ ॥
गोपिकांचे घरीं कामासी लंपट । करिसी धीट गवळियांसी ॥ ३ ॥
भाव अभावांचा न करी कंटाळा । दावी बाळलीला म्हणे नामा ॥ ४ ॥

[५२१]

गोकुळीं गोपिका गोपाळ सकळ । मध्यें घननीळ क्रीडा करी ॥ १ ॥
करी खेळ मोठा स्थापिलें निशाण । स्वयें नारायण हांका मारी ॥ २ ॥

---

अभंग ५१७ (प्र.) व (शि.), ५१८ ते ५२१—(आ.)

अनुक्रमणिका

मारियेला कंस दुर्घट दुर्जना । पुरवीं वासना पांडवांची ॥ ३ ॥
पांडवांचें ध्यान धरूनि अंतरीं । नामा म्हणे हरि साह्य करी ॥ ४ ॥

[५२२]

सर्वांभूतीं नांदे सर्व नारायण । सर्व संस्थापन पांडुरंग ॥ १ ॥
अगा देववंद्या अगा गोपवेषा । पावन परेशा परमार्थी ॥ २ ॥
मूर्त अमूर्ताचा मुक्त परांगता । सर्व मायातीता साक्षिरूपा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवांदानवां जिंकिसी । ते भाकी आम्हांसी सांभाळावें ॥ ४ ॥

[५२३]

[1]प्रल्हादादिकांचें अंतरीचें ध्यान । तें पंढरीये निधान उभें असे ॥ १ ॥
सर्व जन जया नेणते जाहले । [2]सुख दाखविलें पुंडलिका ॥ २ ॥
वेदांचें जें सार श्रुतीचें जिव्हार । तेंचि कटीं कर उभें असे ॥ ३ ॥
ज्ञानाचें जीवन वैराग्या भूषण । तें सुख निधान विटेवरी ॥ ४ ॥
शुद्धबुद्ध मुक्त समाधीचें सुख । तें उभें प्रत्यक्ष [3]वाळवंटीं ॥ ५ ॥
हृदयीं धरूनि नामा निजबोधें निमाला । शिण हारपला संसारींचा ॥ ६ ॥

[५२४]

एक वाहूं तुळसीपत्र । तें देवासी प्रिय होत ॥ १ ॥
रखुमाइनें देव । सोडविला कृष्णराव ॥ २ ॥
नामा म्हणे पूर्ण होती । प्राप्त राधिकेचा पती ॥ ३ ॥

[५२५]

संतांची विश्रांती ज्ञानियांचें गुज । मुक्तिचें हें बीज मोक्षदानी ॥ १ ॥
कृष्णा विष्णु हरी मुकुंद मुरारी । अच्युता नरहरी नारायणा ॥ २ ॥
गोवर्धनधर गोपी मनोहर । भक्त करुणाकर पांडुरंगा ॥ ३ ॥
तूंचि हे सकळ आदि मध्य अंतीं । निजसुख संपत्ति सज्जनांची ॥ ४ ॥

अभंग ५२२ व ५२३—(पं.) व (शि.), ५२४—(पं.), ५२५—(आ.)
१ ब्रह्मादिकाचे (पं.) २ काये पुंडलीके दाखविले (पं.) ३ विटेवरी (पं.)

सकळ नारायण पातक भंजन । हरि जगज्जीवन परमानंद ॥ ५ ॥
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि देता घेता प्रेमसुख ॥ ६ ॥
नामदेव ऐसें नाम त्वां ठेविलें । येणें अनुभविलें प्रेमसुख ॥ ७ ॥
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा । सोडवी भवभ्रमा पासोनियां ॥ ८ ॥

[५२६]

[1]देऊनि भातुकें गळां घाली मिठी । सखा जगजेठी भक्तिभावा ॥ १ ॥
आधार करोनि राहिले पंढरीं । तेथें निरंतरीं प्रेम दावी ॥ २ ॥
[2]नामा म्हणे सेवा करोनियां शुद्ध । संसार संबंध नाहीं तया ॥ ३ ॥

[५२७]

[3]कोहळिये काय कोहळि जड । तैसें मी तुझें ळळेवाड ॥ १ ॥
आंधळें मुकें कानीं नायके । त्यासी काय जननी पोसूं न शंके ॥ २ ॥
नामा म्हणे केशव कृपेचा सागरू । जयाचा जारू तयासिच भारू ॥ ३ ॥

[५२८]

योगिये शिणती तुझिये प्राप्तिलागीं । नातुडसी जगीं कवणासी ॥ १ ॥
एक जटा नखें स्वयें वाढविती । दिगबर होती एक देवा ॥ २ ॥
त्यासी तुझी भेटी नव्हेचि कल्पांतीं । अखंड सिणती साधनानें ॥ ३ ॥
आमचे सन्निध सर्वदा राहसी । आमच्या भाग्यासी पार नाहीं ॥ ४ ॥
धन्य जालों आम्हीं तुझिया प्रसादें । नाचे तुझ्या छंदें नामदेव ॥ ५ ॥

[५२९]

मजसाठीं काय लाजतोसि देवा । तृणा आणि जीवा साच होसी ॥ १ ॥
ते काय पवाडे गमाविलीं ब्रीदें । ब्रह्मादिकें वृंदें ध्याती कैसीं ॥ २ ॥

अभंग ५२६—(पं.), ५२७—(पं.) व (शि.), ५२८—(धु.), ५२९—(आ.)
१ दाऊनि (पं.)
२ (पं.) प्रतीत पुढील चरण अधिक आढळतो—
मायबापासाठी डेंजारिले जेणें । सेवा कोडपणें सवें दावी ॥
३ कोल्हीं काय कोल्हीं होती जड । तैसें तुझें मज मिळालें असे वाड ॥ (आ.)

जाणतां नेणतां सर्वांसी उद्धार । भवसिंधु पार पावविसी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे उपकार ऐसे । दावी जगदीशा हेळामात्रें ॥ ४ ॥

[५३०]

उपमन्यु बाळा स्थापी क्षीरसिंधु । अनाथाचा बंधु नारायण ॥ १ ॥
तुझें नाम मुखीं जपे सर्वकाळ । दिधलें [1]अढळपद त्यासी ॥ २ ॥
अनेक वृत्तांत सांगों देवा । अन्याय केशवा कोण मानी ॥ ३ ॥
नामा म्हणे तैसें मी नाहीं मागत । ऐकोनियां मात आलों जन्मा ॥ ४ ॥

[५३१]

हरि गातां बरवा ऐकतां बरवा । हृदयीं ध्यातां बरवा बाइयांनो ॥ १ ॥
केशव पैं देणें केशव पैं घेणें । केशव करणें धंदा आम्ही ॥ २ ॥[2]
चंद्रबिंबाची कुरवंडी ओवाळूं श्रीमुखावरी । मदन हा जिव्हारीं लाजिन्नला ॥ ३ ॥
नामा म्हणे निवविलें सकळ इंद्रियातें । म्हणोन त्या केशवातें शरण जावें ॥ ४ ॥

[५३२]

आशा तृष्णा माया नाहीं लाथाडल्या । म्हणावा तो भला कासयानें ॥ १ ॥
अमृत सेवितां मृत्यू पळे दुरी । सुख होय तरी तेंचि नाम ॥ २ ॥
तेव्हां कोणी तरी धरावा सत्संग । होय पांडुरंग प्राप्ति सर्वां ॥ ३ ॥
अविश्वास नर सर्वस्व पतिता । तारिसी अनंता नामा म्हणे ॥ ४ ॥

[५३३]

केशव पैं मुक्ति केशव पैं [3]भक्ति । केशव विश्रांति पंढरीये ॥ १ ॥[4]
केशव लौकिकीं केशव व्यवहारीं । केशव निर्धारीं नाम तुझें ॥ २ ॥
नामा म्हणे आम्हां केशव बोळला । भावासि भुलला वाळुवंटीं ॥ ३ ॥

अभंग ५३०—(बा.), ५३१—(पं.) व (शि.), ५३२—(आ.) ५३३—(पं.) व (शि.)
१ ध्रुवा त्यासी (बा.) २ हा चरण (शि.) प्रतीत नाही. ३ मुक्ति (पं. व शि.)
४ यानंतर (पं.) व (शि.) मध्ये आणखी एक चरण आहे. तो असा—
केशव पैं देणें केशव पैं घेणें । केशव पैं करणें धंदा आम्ही ॥ (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[५३४]

वेदासी कानडा श्रुतीसी कानडा । विठ्ठल उघडा पंढरीये ॥ १ ॥
नाम बरवें रूप बरवें । दर्शन बरवें कानडीयाचें ॥ २ ॥
नामा म्हणे तुझें अवघेंचि बरवें । त्याहुनि बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

[५३५]

देवाधिदेवा सर्वत्रांच्या जीवा । ऐकें वासुदेवा दयानिधी ॥ १ ॥
ब्रह्मा आणि इंद्रा वंद्य सदाशिवा । ऐकें वासुदेवा दीनबंधू ॥ २ ॥
चवदा लोकपाळ करिती तुझी सेवा । ऐकें वासुदेवा कृपासिंधू ॥ ३ ॥
योगियांचे ध्यानीं नातुडसी देवा । ऐकें वासुदेवा जगद्गुरु ॥ ४ ॥
निर्गुण निराकार नाहीं तुज माया । ऐकें कृष्णराया कानडीया ॥ ५ ॥
वेडा अविचारी करी मजवर दया । ऐकें कृष्णराया शहाणिया ॥ ६ ॥
करुणेचा पर्जन्य शिंपी मजवरता या । ऐकें कृष्णराया गोजिरिया ॥ ७ ॥
नामा म्हणे जरी दाविसील पाया । तरी वदावया स्फूर्ति चाले ॥ ८ ॥

[५३६]

तुटोनि आकाश पडेलाहे शिरीं । न सोडीं मी हरी पाय तुझे ॥ १ ॥
तुझे पाय गोड तुझे पाय गोड । तुझे पाय गोड सर्वकाळ ॥ २ ॥
डोंगरा सांगातें कोण करी वाद । वाउगी उपाध आहे आम्हां ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें थोरपण काय । कायसे उपाय सांग आम्हां ॥ ४ ॥

[५३७]

निर्धन धनातें कीं आंधळे लोचनातें । मयूर घनातें जेंवि भावी ॥ १ ॥
पारधियें पाडस धरियलें वनीं । तें चिंती जननि रात्रंदिवस ॥ २ ॥
तैसा तुझा छंद लागो कां गा देवा । माझिया जीवा केशिराजा ॥ ३ ॥
सर्पे डंखिलें तें स्मरतो गारोडी । पुरी जातां सांगडी मन चिंती ॥ ४ ॥
रोगी वैद्यातें बोलावूं धाडी । पडिले बांदवडी सुटका इच्छी ॥ ५ ॥

---

अभंग ५३४—(पं.), ५३५ व ५३६—(आ.), ५३७—(पं.) व (शि.)

[1]बोळविली बाला ते मनीं वाहे कुवसा । कां रसज्ञ जैसा औषध गिवसी ॥ ६ ॥
धेनुकारणें व्याकुळ होय वत्स । तें दशदिशेस अवलोकितें ॥ ७ ॥
निचेतन देह प्राण असे अलक । घायवट उदक स्मरे वनीं ॥ ८ ॥
चकोरें मिळोनि चंद्रा जेविं ध्याती । [2]इंद्रियासि तृप्ती कें होईल ॥ ९ ॥
पक्षिणीचें पिलूं येऊनि द्वाराजवळें । मुख पसरी कोंवळें अलोहित ॥ १० ॥
नामा म्हणे· म्यां आन नाहीं जाणितलें । मज पुरें येतुलें केशिराजा ॥ ११ ॥

[५३८]

नवजावें तेथें लागे जाणें । न करावें तेंचि लागे करणें ।
न बोलावे त्यासि लागे बोलणें । पडणें मागणें नेदी तया ॥ १ ॥
कृष्णें देवकीये उदरा येणें । कंसा भेणें त्वां गोकुळासि जाणें ।
तेथें नंदाच्या गाई राखणें । [3]संगतीं असणें गोंवळचांच्या ॥ २ ॥
राम वानराची सेवा करी । पांडव किंकर विराटा घरीं ।
हरिश्चंद्र डोंबा घरीं पायकी करी । [4]हें अपूर्व परियेसा ॥ ३ ॥
रुद्रें अंजनी उदरा येणें । रामाची सेवा वानरपणें ।
प्रसंग पडे तैसें वर्तणें । रुसणें न लगे कवणासी ॥ ४ ॥
स्वामीनें सेवकाची सेवा करणें । नुपेक्षी कदान्न भक्षणें ।
म्हणवूनि अहंकार न धरणें । विषम संसार अरे जना ॥ ५ ॥
अवचट घडविती तुझिया भावा । घोर विस्मय होतो माझिया जीवा ।
विष्णुदास नामा विनवी केशवा । देवा तूं करिसी तें बरवें ॥ ६ ॥

[५३९]

सर्व पाप पुण्य हींचि दोन्हीं भांडीं । विवेक न सांडी येतां जातां ॥ १ ॥
तुझें नाम तारूं तुझें नाम तारूं । तुझें नाम तारूं श्रीविठ्ठला ॥ २ ॥
विष्णुदास नाम्यानें उभारिली शिडी । टाकावया पेढी वैकुंठींची ॥ ३ ॥

---

अभंग ५३८ व ५३९—(पं.) व (शि.)
१ बाळ परदेशांत मनीं· · · (पं. व शि.) २ इंद्रिया निवृत्ति· · · (आ.) ३ अखंड संगति गोवळयाची (शि.) ४ विषम संसार अरे जना (पं.)

अनुक्रमणिका

[५४०]

पंढरी ज्ञानिया ध्यातां लक्षा नये । आम्हां वाट पाहे अनाथांची ॥ १ ॥
जपकांचें जाप्य नानामंत्रमय । आम्हां भक्ति प्रिय भावें [1]सारी ॥ २ ॥
पुंडलिकासाठीं वोळला वोरसें । नेणों काय कैसें प्रेम त्याचें ॥ ३ ॥
नामा म्हणे जीवें करूं निंबलोण । क्षणीं नारायणा दिठावसी ॥ ४ ॥

[५४१]

नित्य आम्हां सुख तुझ्या पायापासीं । शरण कोणासी जाऊं [2]आम्ही ॥ १ ॥
सकाळीं उठोनि ऐकतों कीर्तन । तेणें समाधान मज होय ॥ २ ॥
उभा महाद्वारीं वैष्णव भेटती । सांखळ्या तुटती चौऱ्यांशींच्या ॥ ३ ॥
नामा म्हणे सदा पंढरी रहिवास । मागुता जन्मास येतो कोण ॥ ४ ॥

[५४२]

सगुण संपन्न पंढरीच्या राया । आमुच्या स्वामिया केशिराजा ॥ १ ॥
रामकृष्ण हरी श्रीधरा मुकुंदा । सज्जनीं स्वानंदा सर्वातीता ॥ २ ॥
गोविंद गोपाळ गोपवेशधारी । गोवर्धन धरी नखावरी ॥ ३ ॥
दुष्ट दुर्जनासी दुःख फार चित्तां । पावन पतितां नामा म्हणे ॥ ४ ॥

[५४३]

जय विठ्ठल श्री विठ्ठल । जय जय विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥
परब्रह्म विठ्ठल मूर्ति विठ्ठल । निरंजन विठ्ठल विठ्ठल ॥ २ ॥
जोचि नाम तोचि देवो । ऐसें म्हणों तरी नाहीं संदेहो ॥ ३ ॥
म्हणे विष्णुदास नामा । तो नेईल परत [3]धामा ॥ ४ ॥

---

अभंग ५४०—(बा.), ५४१—(पं.), ५४२—(आ.), ५४३—(बा.)
१ तारी (बा.) २ मग (पं.) ३ धामा (बा.)



[५४४]

कैलासींचा [1]देव भोळा चक्रवर्ती । पार्वतीचा पति योगिराज ॥ १ ॥
तयाचिया पायां माझे दंडवत । घडो आणि चित्त जडो नामीं ॥ २ ॥
जटाजूट गंगा अर्धचंद्र भाळीं । तिजा नेत्रज्वाळी जातवेद ॥ ३ ॥
कंठीं काळकूट डौर त्रिशूळ हातीं । सर्वांगीं विभूति शोभतसे ॥ ४ ॥
गळा रूंडमाळा खापर हस्तकीं । रामनाम मुखीं सर्वकाळ ॥ ५ ॥
व्याघ्रचर्मधारी स्मशानीं राहिला । संगें भूतमेळा विराजित ॥ ६ ॥
नामा म्हणे नामें नासोनियां पाप । करीं सुखरूप भक्तांलागीं ॥ ७ ॥

[५४५]

डंवरला गिरी कैलास ढवळा । सिंहासन ज्याला ढवळेंची ॥ १ ॥
पाहतां पाहतां निवाले लोचन । भव्य ज्याचें ध्यान एकरूप ॥ २ ॥
ढवळा सर्वांगीं देव तो आपण । लेईला भूषण तें हि तैसें ॥ ३ ॥
पर्वताची बाळा पार्वती ढवळी । अर्धांगी शोभली एकरूप ॥ ४ ॥
सर्वांगीं लाविली ढवळी विभूति । माळा विराजती स्फटिकांच्या ॥ ५ ॥
पांढरिया जटेमध्यें गंगा आहे श्वेत । गळयांत शोभत श्वेत सर्प ॥ ६ ॥
शंखपाळ श्रवणें कुंडलें ढवळीं । देखतां भूतळीं दुजा नाहीं ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसें दाऊनियां ध्यान । भाविकांचें मन तोषवित ॥ ८ ॥

[५४६]

एके दिनीं रत्नसिंहासनावरी । कैसा त्रिपुरारी शोभतसे ॥ १ ॥
सांगो जातां चाऱ्ही वाचा विसावती । तेथें माझी मति काय सांगों ॥ २ ॥
वामभागीं साजे सुंदरी भवानी । सिद्ध ऋषि मुनी करिती सेवा ॥ ३ ॥
नारद तुंबर गर्जती गायन । तेथें कर जोडोन उभे देव ॥ ४ ॥
गणेश सन्मुख ढाळिती चामरें । ऋद्धिसिद्धि द्वार राखिताती ॥ ५ ॥
नामाचा गजर मृदंगाची घाई । पाहाती नवाई ब्रह्मादिक ॥ ६ ॥
नामा हाडपे करी देतसे विडिया । लागोनियां पायां वारंवार ॥ ७ ॥

अभंग ५४४ व ५४५—(धु.), ५४६—(आ.)
१ राणा (धु.)

अनुक्रमणिका

[५४७]

तेव्हां प्रश्न करी पार्वती आदरें । शिवाप्रती कर जोडोनियां ॥ १ ॥
सांगावा जी स्वामी ऐसा इतिहास । गातां जोडे वास तुझे पायीं ॥ २ ॥
जाळोनियां पापें सुखाची उन्नति । विश्व सुखी होती जेणें योगें ॥ ३ ॥
नामा म्हणे सुटे काळासी दरारा । विश्वासिया नरा मुक्ति जोडे ॥ ४ ॥

[५४८]

ऐकोनियां वाणी । संतोषला शूळपाणि ॥ १ ॥
देवी चांगलें पुसिलें । तुझ्या बोलें चित्त धालें ॥ २ ॥
बोल नव्हती साचार । जड जीवाचां उद्धार ॥ ३ ॥
बोल तुझे गोडावले । जगीं सुदिन पाहिले ॥ ४ ॥
शिवरात्रीचे महिमान । नामा म्हणे ऐका जन ॥ ५ ॥

[५४९]

ऐका [1]सावधान कथा शिवरात्र । पावन पवित्र तिहीं लोकीं ॥ १ ॥
भाव धरोनियां आचरती जरी । वास शिवपुरीं घडे त्यासी ॥ २ ॥
उपवास आणि शिवाचें पूजन । रात्रीं जागरण विधि त्याचा ॥ ३ ॥
एक पसा पाणी एक बिल्वदळ । पूजन केवळ सोपें बहु ॥ ४ ॥
नामा म्हणे करा नामाचा गजर । मुखीं हरहर शब्द [2]मात्रें ॥ ५ ॥

[५५०]

शिव ऐसा शब्द कल्याणदायक । जाणती भाविक साधुजन ॥ १ ॥
तारक हें नाम भोळ्या भाविकांसी । नेणतें जाणत्यासी लाभ एक ॥ २ ॥
उपमन्यु बाळक दूध मागों गेला । क्षीराब्धि दिधला उचितासी ॥ ३ ॥
दुष्ट दुराचारी पतित तारिले । नाहीं अव्हेरिले दीनानाथें ॥ ४ ॥
नामा म्हणे शिव विष्णु एकरूप । ताराया अमूप अवतार ॥ ५ ॥

अभंग ५४७ ते ५४९—(धु.), ५५०—(आ.)
१ साधुजन (धु.) २ मंत्र (धु.)

अनुक्रमणिका

[५५१]

भेदवादी जन वदतसे भिन्न । नव्हे तें लक्षण भजनाचें ॥ १ ॥
विश्वीं विश्वंभर कोंदलासे एक । भेदाचें कौतुक कैसें सांगा ॥ २ ॥
ब्रह्मीं नाहीं ठाव एकपणाचाही । तेथें दुजें कांहीं सामावतें ॥ ३ ॥
आदि मध्य अंतीं खेळूनियां खेळ । उरलें तें निखळ अविनाश ॥ ४ ॥
हेमीं जैसें केलें तैसे होती नग । तरी तें अव्यंग सोनेपणीं ॥ ५ ॥
केली जैसी भक्ति शैव कां वैष्णव । पाहतां तो देव नाहीं दुजा ॥ ६ ॥
शिवविष्णु दोघे एकचि अवतार । वेदांनीं निर्धार हाचि केला ॥ ७ ॥
नामा म्हणे येथें दुजा नको भाव । विष्णु तोचि शिव शिव विष्णु ॥ ८ ॥

[५५२]

कांचीपुरीं राजा नामें सोमदत्त । तयाचे संपत्ती पार नाहीं ॥ १ ॥
पूर्वपुण्यबळें लाधलें तयासी । देतां उपमेसी उणा शुक्र ॥ २ ॥
पांचशतें तया कामिनी सुंदरा । करितां नाहीं पुरा जाला काम ॥ ३ ॥
ऋद्धि सिद्धि घरीं कामारि हिंडती । धैर्य शौर्य कीर्ति ज्याची जगीं ॥ ४ ॥
नामा म्हणे [1]जेथें उणें कांहीं नाहीं । [2]ऐसें असोनिही न सुटे भोग ॥ ५ ॥

[५५३]

भोगाची नव्हाळी [3]न सुटे कोणें काळीं । वासना बोंगळी तेचि करी ॥ १ ॥
वासनेचि थोरी सांगवेना कांहीं । न सुटिजे [4]कांहीं कोण्या [5]काळीं ॥ २ ॥
तारुण्याच्या भरें आवडी स्त्रियेची । वृद्धपण [6]तेंचि चिंता होये ॥ ३ ॥
म्हणतसे पोरें वांचतील कैसीं । हाचि अहर्निशीं ध्यास करी ॥ ४ ॥
मेलियाही पुढें तेंचि उभें राहे । जन्मोजन्मीं पाहे लागलेसें ॥ ५ ॥
मृगाचिया ध्यासे भरतां मृगपण । जन्मल्यावांचून सोडिना तें ॥ ६ ॥
नामा म्हणे जया जैसी जे वासना । जन्मकर्में जाणा तैसीं होती ॥ ७ ॥

---

अभंग ५५१—(आ.), ५५२ व ५५३—(धु.)
१ तेथें (धु.) २ ऐकावे सर्वांहि येक चित्ते । (धु.) ३ न पुरे (धु.) ४ पाहि (धु.)
५ बळें (धु.) ६ होय तेंचि पुढें (धु. व आ.)

अनुक्रमणिका

[५५४]

पंचशतांमाजीं दोघी पतिव्रता । जारिणी समस्त सर्व काळ ॥ १ ॥
करूनियां ऐसीं जाती नरकासी । नाडिलें पतीसी त्यांच्या पापें ॥ २ ॥
करिती ये वेळे झांकिती लोचन । शेवटीं बंधन यमाहातीं ॥ ३ ॥
नामा म्हणे बरें नव्हे हें कोणासी । घडेल तयासी जाच बहू ॥ ४ ॥

[५५५]

राष्ट्र करी पाप राजानें भोगावें । राजियाचें तें सर्व पुरोहितां ॥ १ ॥
बोले धर्मशास्त्र जाणती सर्वही । परी तें कोणाही न कळे वर्म ॥ २ ॥
शिष्यें केलें पाप भोगावें गुरूनें । स्त्रीनें केलें घेणें पुरुषासी ॥ ३ ॥
नामा म्हणे जन मायेंत गुंतले । सेखीं खाती झोले संसाराचे ॥ ४ ॥

[५५६]

ऐसें बहुत काळ लोटलियावरी । पुण्यासी सामुग्री हारपली ॥ १ ॥
मरोनियां जन्म हरणाचा पावला । पतिव्रता जाल्या कुरंगिणी ॥ २ ॥
प्रारब्धाचा भोग सुटेना कोणासी । केली जैसीं तैसीं घ्यावीं फळें ॥ ३ ॥
नामा म्हणे देव कृपा करील जरी । सुटेना तोंवरी भोग खरा ॥ ४ ॥

[५५७]

होऊनि हरण राहिला तो वनीं । दोघी त्या हरिणी स्त्रिया जाल्या ॥ १ ॥
जातीच्या स्वभावें करिती विहार । चित्त जालें स्थिर एकमेकां ॥ २ ॥
धाकुटीला दोन्हीं पाडसें गोजिरीं । दुजी गरोदरी पूर्ण मास ॥ ३ ॥
नामा म्हणे पुढें काय जाली गती । कथेची संगति ऐका बरी ॥ ४ ॥

[५५८]

देवलोकीं इंद्र सेवेसी सादर । भूतसेन चाकर होता तेथें ॥ १ ॥
सेवेसी चुकतां होय तूं किरात । ऐसें इंद्रें त्यातें शापियेलें ॥ २ ॥

अभंग ५५४ व ५५५—(आ.), ५५६—(धु.), ५५७—(आ.), ५५८—(धु.)

शेज सज्ज करितां अंतर पडिलें । म्हणोनि घडले भोग त्यासी ॥ ३ ॥
नामा म्हणे सेवा करणें हे कठीण । त्यानें व्हावें जाण सावधान ॥ ४ ॥

[५५९]

ऐकतांचि शब्द होऊनि किरात । राहिला निवांत एके ग्रामीं ॥ १ ॥
पाळणपोषण विषयांची बोढी । करितसे जोडी पातकांची ॥ २ ॥
चण्डभिल्ल नाम घेतलें ठेऊनि । दुष्टभाव मनीं वाढविला ॥ ३ ॥
कासेसी वाघुरा हातीं शूळ दंड । सामोग्री उदंड मेळविली ॥ ४ ॥
हिंडे नाना वन पर्वत शिखरें । मारीतसे फार जीवजंतू ॥ ५ ॥
जातीचा स्वभाव लागला तयासी । कष्टें अहर्निशीं म्हणे नामा ॥ ६ ॥

[५६०]

ऐसें असतां तो सरूं आला काळ । प्रारब्धाचें बळ कैसें पाहा ॥ १ ॥
हिंडतां हिंडतां फार कष्टी जाला । दृष्टीस तयाला न पडे कांहीं ॥ २ ॥
कडे दरी मोठ्या पर्वताचे वरी । रिघोनियां करी नाना युक्ति ॥ ३ ॥
जाली सांजवेळ न मिळे आमीष । होऊनि उदास राहिलासे ॥ ४ ॥
नामा म्हणे मग काय त्यानें केलें । ऐकावें निश्चळें साधुजनीं ॥ ५ ॥

[५६१]

मार्गीही राहिला जाऊं कोणीकडे । आमीष न जोडे काय कीजे ॥ १ ॥
चिंताज्वरें फार तापलें अंतर । क्षुधेचा आडदर पोटामध्यें ॥ २ ॥
रिक्त जाऊं तरी नाहीं कांहीं घरीं । वाट पाहे घरीं दारापुत्र ॥ ३ ॥
पाहूं जातां कांहीं नाठवे विचार । तेणें स्थिर स्थिर पाय टाकी ॥ ४ ॥
नामा म्हणे तेव्हां देखे सरोवर । कांहींसा विचार करूं लागे ॥ ५ ॥

[५६२]

भोंवतालें जाळें घालीं नेटें पाटें । हस्तकीं तिखट बाण धरी ॥ १ ॥
येतील उदकपानासी सावजें । पाहे त्याचे व्याजें रोखोनियां ॥ २ ॥

अभंग ५५९ ते ५६२—(आ.)

अनुक्रमणिका

तेथें एक बिल्ववृक्ष महाथोर । वेधोनियां वर बैसलासे ॥ ३ ॥
डोळधाआड आली म्हणोनियां तोडी । अंतरीं आवडी आमीषाची ॥ ४ ॥
बकाचियेपरी ध्यानस्थ राहिला । जीविंचा जिव्हाळा वेगळाची ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसी देवाची नव्हाळी । न करितां जाली देवपूजा ॥ ६ ॥

[५६३]

लक्षवरी बिल्व दळें माथा पाहे । आनंद न समाये महादेवा ॥ १ ॥[1]
बहुतां काळाचें तेथें एक लिंग । होतें भूमिभाग होउनियां ॥ २ ॥
भोळा महादेव तेणें संतोषला । म्हणे करिता जाला कोण पूजा ॥ ३ ॥
नामा म्हणे पाहे निमित्याची वाट । पुराणीं बोभाट असे त्याचा ॥ ४ ॥

[५६४]

पुराणीं पवाडे जयाचे अपार । ऐकतांचि फार सुख वाटे ॥ १ ॥
भोळा महादेव पाहे भोळा भाव । एक सरे जीव उद्धराया ॥ २ ॥
रावण मागों गेला पार्वतीकारणें । देते वेळें नेणें कैसें द्यावें ॥ ३ ॥
जातीची चांडाळी गोकर्णासी गेली । दरूशनें ते नेली कैलासासी ॥ ४ ॥
नामा म्हणे कैसें दैव या भिल्लाचें । आलें पूजनाचें फळ हातां ॥ ५ ॥

[५६५]

माथां पडतां पाला । सांब तेणें संतोषला ॥ १ ॥
होता प्राचीनाचा ठेवा । बहु दुर्लभ मानवा ॥ २ ॥
काय भक्तीचा जिव्हाळा । काय त्याचे अंगीं कळा ॥ ३ ॥
बहु केलीं दुष्ट कर्म । सेखीं तोचि जाला धर्म ॥ ४ ॥
नामा म्हणे भोळा देव । सांगायाचा हाचि भाव ॥ ५ ॥

[५६६]

इतुकियासाठीं । बहु तुष्टला धूर्जटी ॥ १ ॥
काय सांगावा विचार । दैव पारध्याचें थोर ॥ २ ॥

अभंग ५६३—(धु.), ५६४ ते ५६६—(आ.)
१ (धु.) प्रतीत चरणांचा क्रम बदललेला आहे.
बदललेला क्रम असा—२, ३, १, ४.

अनुक्रमणिका

जाली तीन प्रहर निशी । पूजा पावली देवासी ॥ ३ ॥
धाडियलें यमाला । सुखी कराया तयाला ॥ ४ ॥
आला तो धांवत । माग म्हणे अपेक्षित ॥ ५ ॥
त्याची विषयक भक्ति । पुढती जाली तया गती ॥ ६ ॥
जें जें याचकें मागावें । तें तें दातयानें द्यावें ॥ ७ ॥
काय मागितलें तेणें । तेचि नामा ऐका म्हणे ॥ ८ ॥

[५६७]

येऊनियां यम ठाकला पुढारीं । पाहे दुराचारी दुरोनियां ॥ १ ॥
घाबरला मनीं कोण असे नेणें । विचारितां मनीं भांबावला ॥ २ ॥
पुसों लागे त्याला कोण तूं आलासी । आणिक म्हणसी माग कांहीं ॥ ३ ॥
देव किंवा यक्ष राक्षस किन्नर । करितां निर्धार न पडे ठायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे मूर्ख पारधी तो खरा । देव त्याच्या घरा आलें जाण ॥ ५ ॥

[५६८]

जाणोनियां यम संतोषला मनीं । मंजुळ वचनीं काय बोले ॥ १ ॥
केली देवें कृपा पाठविलें मज । वरदान तुज द्यावयासी ॥ २ ॥
सर्वहीं जीवांचा नियंता मी यम । इच्छिसी तो काम पूर्ण करूं ॥ ३ ॥
शिवरात्री आजी उपवास केला । शंकर तोषला बिल्वदळीं ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें ऐकतां वचन । पारध्याचें मन सुखावलें ॥ ५ ॥

[५६९]

जोडोनियां हात वंदिला कृतान्त । म्हणे माझा हेत इतुकाची ॥ १ ॥
सर्व सुखाहुनि हेंचि वाटे गोड । संसाराची ओढ मोडवेना ॥ २ ॥
मृग पक्षीयाचें कळावें बोलणें । सर्व कांहीं येणें कार्यसिद्धी ॥ ३ ॥
इतुकी आहे हो माझी ही वासना । पुरवुनि स्वस्थाना जावें तुम्ही ॥ ४ ॥
नामा म्हणे ज्याची जे कांहीं वासना । तेचि पुढें जाणा उभी ठाके ॥ ५ ॥

---

अभंग ५६७ ते ५६९—(आ.)

अनुक्रमणिका

[५७०]

देऊनियां वर दंडपाणी गेला । ध्यास पारध्याला मृगाचाची ॥ १ ॥
लाऊनियां चित्त ऐके चळवळ । दृष्टीची तळमळ लक्ष तेथें ॥ २ ॥
उगवला दिन जाहला प्रकाश । मृग पक्षीयास दृष्टि जाली ॥ ३ ॥
तोचि मृग पाहा आला उदकासी । उड्डाण गगनासी साधीतसे ॥ ४ ॥
तृषाक्रांत भोठा चालिला निःसंग । प्रारब्धाचा भोग ओढवला ॥ ५ ॥
उदकाचिये हांवें दृष्टि जाली दुरी । पाश तो सामोरी देखेचिना ॥ ६ ॥
येऊनियां पडे जाळिया माझारीं । लोळे पृथ्वीवरी एकसरा ॥ ७ ॥
नामा म्हणे भिल्लें पाहातां लोचनीं । वोढोनियां गुणीं बाण लावी ॥ ८ ॥

[५७१]

धाव घालूं जातां देखिलें नवल । पाहातसे खळ दुष्टभावें ॥ १ ॥
परी तें होणार कदापि चुकेना । तैसीच वासना धांव घाली ॥ २ ॥
धाकुटी हरणी पाडसें धाकुटीं । सांडी उठाउठीं आली तेथें ॥ ३ ॥
पाहों जातां पाशीं गुंतला तो मृग । तेव्हां काय मग केलें तिनें ॥ ४ ॥
मुखांप्रती मुख लाऊनि चुंबिलें । हृदय फुटलें देखतांचि ॥ ५ ॥
सुख दुःख बोल बोलती ते वेळीं । म्हणती कपाळीं भोग होता ॥ ६ ॥
सोडवितां कोणी न दिसे ये काळीं । काळाची पडली उडी आतां ॥ ७ ॥
नामा म्हणे खळा कळे त्याची वाणी । ऐकाया लागूनि स्थिर जाला ॥ ८ ॥

[५७२]

धर्मशास्त्रीं ऐसें बोलताती बोलें । तेणें चोजवलें चित्त त्याचें ॥ १ ॥
आश्चर्याच्या डोहीं बुडाला पारधी । म्हणे कैसी बुद्धि याची पाहा ॥ २ ॥
रानींचीं रानवटें तया एवढें ज्ञान । प्रेमाचें जीवन वोसंडत ॥ ३ ॥
चाकाटली वृत्ति चित्त केलें स्थिर । दोघांचीं उत्तरें ऐकतसे ॥ ४ ॥
नामा म्हणे हरणीहरणाचा संवाद । ऐकतां भवबंध तुटतसे ॥ ५ ॥

अभंग ५७० ते ५७२—(आ.)

अनुक्रमणिका

[५७३]

बंधनीं गुंतला देखोनियां पती । उडालीसे वृत्ति हरणीची ॥ १ ॥
देहाची ते आस सांडोनि लवलाही । पडे रडे कांहीं [1]बोलवेना ॥ २ ॥
म्हणे तुम्ही आतां न जावें एकलें । संगें आम्हां नेलें पाहिजे जी ॥ ३ ॥
बहुतां जन्मांची तुम्हां आम्हां गांठीं । आतां कैसी तुटी पाडितसां ॥ ४ ॥
भोग जे भोगिले स्वप्नप्राय जाली । नाहीं ते पुरली वासना हे ॥ ५ ॥
नामा म्हणे विषयवासना वोंगळ । तेणें कोण्या काळें सुटिजेना ॥ ६ ॥

[५७४]

देखतांचि कांता दुःखी जाली फार । डोंगर तिजवर कोसळला ॥ १ ॥
बोलतां तियेसीं न निघती बोल । ऐसाचि तो वेळ अवधारी ॥ २ ॥
नको आतां पडूं मायेचिये भरी । जाये वो सुंदरी स्वस्थळासी ॥ ३ ॥
माझी गति मज तुझी गति तुज । काय काज व्यर्थ प्राण द्यावा ॥ ४ ॥
घरीं तुझीं बाळें गोजिरीं गोमटीं । जाऊनियां पोटीं धरीं त्यांसी ॥ ५ ॥
न लावी उशीर जाई वो माघारीं । जंव तो दुराचारी न देखतां ॥ ६ ॥
बाळा पाळणा हाचि स्त्रियांचा धर्म । सांगते वर्म जाई आतां ॥ ७ ॥
माझिया प्रारब्धीं होतें तैसें जालें । तूं कां येथें बळें प्राण देसी ॥ ८ ॥
नामा म्हणे ऐसें सांगें तिच्या हिता । परी तें नाइकतां कष्टी होय ॥ ९ ॥

[५७५]

नेत्रीं अश्रुधारा पडती अपार । तेणें पृथ्वीवर पूर वाहे ॥ १ ॥
म्हणे तुम्हांविण कैसा प्राण धरूं । वांचूनिया करूं काय आतां ॥ २ ॥
माझिया भारानें दाटेल मेदिनी । तुम्हां अव्हेरूनि गेलें जरी ॥ ३ ॥
सुखाचे सांगाती होतों दोघीजणीं । दुःख म्हणवूनि सांडी केली ॥ ४ ॥
सांडिलिया तुम्हां देवा न मानेल । वेदशास्त्र बोल हाकारिती ॥ ५ ॥
तुजविण क्षण कंठवेना काळ । मीना जैसें जळ तैसें आम्हां ॥ ६ ॥
तुजविण जिणें व्यर्थ या संसारीं । नामा म्हणे खरी गोष्ट बोले ॥ ७ ॥

---

अभंग ५७३—(धु.), ५७४ व ५७५—(आ.)
१ बोल बोले (आ.)

अनुक्रमणिका

[५७६]

चण्डभिल्ल तेणें ऐकिलें बोलणें । सावधान मनें करोनियां ॥ १ ॥
तेव्हां चित्तीं होती वासना जे खोटी । जिरऊनि पोटीं चाकाटला ॥ २ ॥
भीतील यालागीं वृक्षाआड जाला । ऐको जो लागला शब्द त्यांचे ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसा राहिला पारधी । ऐकावें ते संधि काय जालें ॥ ४ ॥

[५७७]

दुसरी जे होती गर्भिण कुरंगी । तेहि लागवेगीं आली तेथें ॥ १ ॥
आहा ऐसें काय केलें वो साजणी । नयेसी अजूनि कोंपटासी ॥ २ ॥
लहान पाडसें आक्रंदती भुकें । कैसी येथें सुखें राहिलीसी ॥ ३ ॥
जाई लवलाही त्यांसी स्तन देई । सांगूं आतां कांहीं बोलवेना ॥ ४ ॥
नामा म्हणे धन्य तयाचें सौजन्य । नाहीं भाव भिन्न कोणामाजीं ॥ ५ ॥

[५७८]

येरी म्हणे काय करूं वो सुंदरी । आतां आहे घरीं काय माझें ॥ १ ॥
प्राणनाथें पेणें केलें त्या लोकीं । जाईन मी देखा तयासंगें ॥ २ ॥
वडिलपणें तुम्ही लोभ असों द्यावा । सांभाळ करावा बाळकांचा ॥ ३ ॥
वागुरे माझारीं गुंतलासे कांत । कायसें जीवित विचारी पां ॥ ४ ॥
न लावीं उशीर जाई येच क्षणीं । असस‍ि गर्भिणि पूर्ण मास ॥ ५ ॥
जरी देसी प्राण पतन गर्भासी । होय तूं दोषासी पात्र होसी ॥ ६ ॥
पोसोनियां बाळें वाढवी वंशाला । द्यावें चित्त बोला माझ्या आतां ॥ ७ ॥
पळावया तुज नाहीं अंगीं बळ । न देखतां खळ जाईं वेगीं ॥ ८ ॥
नामा म्हणे ऐसीं उत्तरें ऐकिलीं । तेही घाबरली तये वेळीं ॥ ९ ॥

[५७९]

ऐकतांची जीव जाला कासावीस । म्हणे जालें कैसें अकस्मात ॥ १ ॥
आम्हां कपाळींचा भोग वोढवला । कांत तो निघाला सांडोनियां ॥ २ ॥

---

अभंग ५७६—(आ.), ५७७—(धु.), ५७८ व ५७९—(आ.)

अनुक्रमणिका

केंचीं बाळें कोण कोणाची सांगाती । पाहातां हे भ्रांति वाउगीची ॥ ३ ॥
ठायींची हे काया जायाची जाईल । वांचलिया फोल पतिविण ॥ ४ ॥
पतिविण सुख काय या संसारीं । दुःख कल्पवरी भोगावें कीं ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें चितोनियां मनीं । आली तत्क्षणीं हरणापाशीं ॥ ६ ॥

[५८०]

कपाळीं कपाळ लावी चुंबी रडे । आक्रंदोनी पडे पृथ्वीवरी ॥ १ ॥
आंवडीचें चिन्ह सांगवेना वाचे । जाणावे जयांचे त्यांचे त्यांनीं ॥ २ ॥
मानेवरी मान टाकूनि राहिली । वाचाही खुंटली बोलवेना ॥ ३ ॥
आम्ही तुजविण न राहूं क्षणभरीं । उदास न करीं चित्त आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मृगजन्म त्यांचा खरा । लक्षितां विचारा ज्ञानी बहु ॥ ५ ॥

[५८१]

पट्टाची मी राणी वडील मानाची । जे गति मृगाची तेचि मज ॥ १ ॥
जाईन सांगातें न सोडी संगती । निश्चय हा चित्तीं दृढ केला ॥ २ ॥
तुझीं बाळें घरीं कष्टती क्षुधेनें । जाई वेगीं स्तनें पान देई ॥ ३ ॥
बाळांकडे जाई पाहे कंठीं काळ । न करीं उतावीळ मन आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें संवादले फार । तियांचे अंतर एकविध ॥ ५ ॥

[५८२]

ऐशा दोघीजणी एकविध भावें । द्यावयासी जीव उभ्या ठेल्या ॥ १ ॥
धन्य धन्य त्यांचा संसार सुफळ । सत्वाचेंचि बळ अंगामध्यें ॥ २ ॥
जुनियां येई बाळकासी स्तन । आम्ही दोघेजण येथें असों ॥ ३ ॥
न टाका मजला सांगोनि निघाली । बिन्हाडासी आली लागवेगें ॥ ४ ॥
घेवोनियां अंकीं पाडसें तीं दोन्ही । लावूनिया स्तनीं शोक करी ॥ ५ ॥
एकमेकें सुखें राहावें अनन्य । तुटलें सौजन्य तुम्हां आम्हां ॥ ६ ॥
पति पाडिलासे फासीं सांडितसे प्राण । आम्हांलागीं जाणें त्याच्यासंगें ॥ ७ ॥

अभंग ५८० ते ५८२—(आ.)

हृदयीं धरोनी दिधलें चुंबन । तीं म्हणती कोण पोशी आम्हां ॥ ८ ॥
येऊं तुम्हासंगें देऊं आधीं प्राण । पुढील कारण तुम्ही पाहा ॥ ९ ॥
नामा म्हणे ऐसे पांचही ते एक । देखोनि कौतुक वाटतसे ॥ १० ॥

[५८३]

निघोनियां देखा आली त्या तटाका । जाली एकमेकां भेटी तेथें ॥ १ ॥
परस्परें दुःख देखतां वाढलें । धैर्यचिंचि बळ केलें त्यांनीं ॥ २ ॥
देहभाव कांहीं नाठवे तयांसी । गुंतोनी मोहासी जीव देती ॥ ३ ॥
नामा म्हणे देवें सोडवावें त्यासी । हें तो अनेकासी आटोपेना ॥ ४ ॥

[५८४]

पारधी तो झड घालोनी पातला । घालावया घाला एकसरें ॥ १ ॥
भयाभीत जालीं पांचही ते काळीं । वासना गुंतली एकमेकां ॥ २ ॥
वडील कुरंगी येऊनी त्यापाशीं । लागोनी पायांसी काय बोले ॥ ३ ॥
नको मारूं पति तृषेनें पीडिला । मारीं तूं मजला तयां आधीं ॥ ४ ॥
आहेवपणानें धाडी स्वर्गलोका । येतुल्यानें सुखा पात्र होशी ॥ ५ ॥
इतुकीयामाजीं दुसरीही आली । ती म्हणे उगली थांब आतां ॥ ६ ॥
तृषेनें पीडिलों पाजीं आधी पाणी । मग जैसें मनीं तैसें करी ॥ ७ ॥
नामा म्हणे भिल्ल विसरला घात । राहिला निवांत त्यांच्या बोलें ॥ ८ ॥

[५८५]

वडील कुरंगी काय बोले त्यासी । सांगते धर्मासी पूर्वीलिया ॥ १ ॥
बांधोनि मारितां घडे महादोष । पाजी उदकास सोडोनियां ॥ २ ॥
पिऊनियां जळ येऊं तुजपाशीं । मग सावकासी करीं काज ॥ ३ ॥
आमुचा विश्वास नाहीं तुजवरी । मागसी त्यापरी भाक देऊं ॥ ४ ॥
पर उपकारी पडतसे देह । लोभ आतां काय वांचुनियां ॥ ५ ॥
भुकेलिया अन्न तान्हेल्या जीवन । पुण्यासी कारण इतुकेंची ॥ ६ ॥
पांचजणी तुज वोपीयेले देह । यालागीं संदेह न धरावा ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसा प्रार्थितां किरात । द्रवला मनांत काय बोले ॥ ८ ॥

अभंग ५८३ ते ५८५—(आ.)

अनुक्रमणिका

[ ५८६ ]

होऊनियां तुम्ही वनींचीं वनचरें । बोलतसां सारें धर्माधर्म ॥ १ ॥
येणें कांहीं कांहीं द्रव आला मना । तुमची भावना कोण जाणे ॥ २ ॥
सोडिल्या पाण्यासी ठकवुनि आम्हांसी । गेलिया तुम्हांसी काय कीजे ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें बोलोनि किरात । करावया घात शस्त्र काढी ॥ ४ ॥

[ ५८७ ]

देखती तीं दोन्हीं पाडसें त्या काळीं । भिल्लापुढें आलीं लागवेगें ॥ १ ॥
सांभाळोनि हात ऐकावी विनंती । धरीं कृपा चित्तीं आमुचियां ॥ २ ॥
अतिथालागोनि चिलिया वोपी देहे । तेणेंचि तो लाहे परमधाम ॥ ३ ॥
मातापितरांसी न करावा घात । मारावें आमुतें आधीं आतां ॥ ४ ॥
कोंवळें शरीर गोड बहु मांस । लागो सार्थकास तुझे काजीं ॥ ५ ॥
नामा म्हणे [१]सत्त्व मोठें पांचांचें । होती कैलासींचे अधिकारी ॥ ६ ॥

[ ५८८ ]

हरणी सांगे कांहीं कर्मविपाकासी । ऐशा ऐशा दोषीं ऐसें होती ॥ १ ॥
ठकवुनियां आम्हीं तुज जाऊं जरी । अंधतमाभीतरीं वास पावों ॥ २ ॥
गुरु स्वामी द्रोही विश्वास घातकी । त्यास तो नरकीं वास सदा ॥ ३ ॥
पदद्रोही परनिंदेसी रतला । तो होय कावळा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥
पंक्तिभेदकेचीं मरतील पोरें । किंवा पती मरे बाळपणीं ॥ ५ ॥
सदासर्वकाळ दुष्ट कर्मीं रत । शूकरादि होत नीच योनी ॥ ६ ॥
अतिथ अभ्यागत पूजा नाहीं ज्याला । घूस [illegible] जिव्हाळीं होती ॥ ७ ॥
नामा म्हणे केलें तैसें तें भोगावें । सावधान व्हावें जाणत्यांनीं ॥ ८ ॥

[ ५८९ ]

पापिष्टाचें जिणें काय तें जियालें । गळां स्तन जाले शेळियेचे ॥ १ ॥
येथेंचि जो खोटा तेथें तो करंटा । व्यर्थ आला पोटा माउलीच्या ॥ २ ॥

---

अभंग ५८६ व ५८७--(बा.), ५८८--(आ.), ५८९--(पं.)
१ मोठें सत्त्व त्या पांचांचें। (बा.)



अनुक्रमणिका

तप्त ताम्र भूमि लोळविती नरा । लोटिती अघोरा नरकामाजी ॥ ३ ॥
लोहोचंचुकाग टोंचिती येवोनी । मारिताती घणीं माथां घाव ॥ ४ ॥
बांधोनियां गळां टांगिती उफराटें । हाणताती सोटे वरिच्यावरी ॥ ५ ॥
आसीपत्रावरी वोढिती धरोनी । लोटिती नेउनी कुंभपाकीं ॥ ६ ॥
जळतिया खांबा भेटविती बळें । खैराच्या इंगळें नाहाविता ॥ ७ ॥
प्रळय क्रूर सर्प झोंबविती कंठासी । ओढोनि जिव्हेसी खंडें करिती ॥ ८ ॥
नामा म्हणे ऐसी पापिष्टाची गती । जन्म लक्ष शतीं हेंचि फळ ॥ ९ ॥

[५९०]

न करूं आम्ही तैसें घेई आतां भाक । अंतरीं निःशंक जालों सर्व ॥ १ ॥
तुम्हां आम्हां साक्षी असे सदाशिव । येथें दुजा भाव धरूं नको ॥ २ ॥
पिऊनियां पाणी न येऊं तुजपाशीं । तरी घडे आम्हांसी सर्व पाप ॥ ३ ॥
जातीचा ब्राह्मण न करी ब्रह्मकर्म । तो जैसा अधम तैसे आम्ही ॥ ४ ॥
स्वामिद्रोही आणि विश्वासघातकी । तो पडे ज्या नरकीं तेथें पडों ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसी वाहोनियां आण । धरिले चरण पारध्याचे ॥ ६ ॥

[५९१]

पाराधियासी जेव्हां दाटला गहिंवर । लोटलें अपार प्रेम तेव्हां ॥ १ ॥
जीवदान दिलें जावें तुम्ही आतां । न करावी चिंता कांहीं येथें ॥ २ ॥
इंद्राचा मी दूत चुकलों सेवेसी । यालागीं जन्मासीं आलों जाणा ॥ ३ ॥
तुमचिया बोलें निवालें अंतर । [1]घात इतःपर न करी कांहीं ॥ ४ ॥
नामा म्हणे शुभ काळ त्याचा आला । म्हणवोनी जाला पश्चाताप ॥ ५ ॥

[५९२]

सोडोनियां गळां मुक्त केलें त्यासी । पिऊनि उदकासी आलीं मुढती ॥ १ ॥
क्षुधेलागीं फार न लावी उशीर । घेऊनियां शस्त्र हाणी वेगें ॥ २ ॥
घर तुझें दूर वाहावेना भार । आम्ही तेथवर येत असों ॥ ३ ॥

अभंग ५९०—(आ.), ५९१—(धु.), ५९२—(आ.)
१ तुमचा हो पार न कळे काही। (धु.)

सत्यत्व देखोनि म्हणितलें पारधी । तुम्हांसी न वधी जावें आतां ॥ ४ ॥
पाठोपाठीं त्याच्या घरालागीं आलीं । चरणीं घातली मिठी त्यांनीं ॥ ५ ॥
नामा म्हणे सत्त्व आगळें तयाचें । वर्णावया वाचे न ये शेषा ॥ ६ ॥

[५९३]

हरिश्चंद्र राजा सत्वनिष्ठ मोठा । स्त्रीपुत्र चोहाटामाजी विकी ॥ १ ॥
तैसेंचि येथें मृगाअंगीं सत्व । वोपियेला जीव पारध्यासी ॥ २ ॥
शिबीराजा अंग कापी नेटपाटें । सत्वासी पालट होऊं नेदी ॥ ३ ॥
ताम्रध्वजा शिरीं करवंत घातला । नाहीं पालटला मनोधर्म ॥ ४ ॥
नामा म्हणे मागें बहुती केली कीर्ति । तया ऐसी रीति येथें दिसे ॥ ५ ॥

[५९४]

आधींच कृपाळू भोळा महादेव । जाणितला भाव कुरंगीचा ॥ १ ॥
कृपा केलीं देवें मांडिला सन्मान । धाडिलें विमान दूता हातीं ॥ २ ॥
लखलखित टके पताका डोलती । तयामाजीं होती गीत नृत्य ॥ ३ ॥
नाना सुमनांची शय्या आरुवार । करिती उपचार [1]सिद्धि आठ ॥ ४ ॥
आले अकस्मात तयाचियेपाशीं । पाहतां सर्वांसी नवल वाटे ॥ ५ ॥
दिव्य देह [2]जाले पांचांचे ते काळीं । विमानीं बैसलीं लागवेगें ॥ ६ ॥
पारधी देखोनी तटस्थ राहिला । दूतीं तया केला उपदेश ॥ ७ ॥
शिवरात्रीं आजी जागरण उपवास । केला तेणें दोष सर्व गेला ॥ ८ ॥
करोनी पारणें होई शिवभक्त । आशापाशीं चित्त गोवुं नको ॥ ९ ॥
अखंड कीर्तन शिवनामाचें करी । तेणें मोक्षपुरीं पावशील ॥ १० ॥
पुढिल्या शिवरात्रीं नेऊं कैलासासी । सांगोनियां त्यासी गेले वेगीं ॥ ११ ॥
नामा म्हणे मोक्ष जाला त्या पांचाशीं । वस्ती चंद्रोपाशीं केली त्यांनीं ॥ १२ ॥

[५९५]

तेणें उपदेशें पारध्यासी ज्ञान । करी तो कीर्तन नाम घोषें ॥ १ ॥
संचिताचा नाश क्रियमाण बुडविलें । त्या सहज जोडलें मोक्ष सुख ॥ २ ॥

अभंग ५९३—(आ.), ५९४ व ५९५—(धु.)
१ शिवदूत (धु.) २ वाहिले (धु.)

अनुक्रमणिका

दुसऱ्या शिवरात्रीं पुजीलें शंकरा । करोनियां बरा भाव शुद्ध ॥ ३ ॥
विमानीं वाहोनि स्वस्थानीं स्थापिला । येथुनि संपला कथाभाग ॥ ४ ॥
नामा म्हणे शिवविष्णु एकरूप । जाणोनियां जप करा त्यांचा ॥ ५ ॥

[५९६]

शिवरात्री कथा धन्य जे ऐकती । इच्छिलें पावती सर्व कांहीं ॥ १ ॥
[1]पातकांचा नाश पुण्य वाढे फार । शेखीं विश्वंभर कृपा करी ॥ २ ॥
भोग जाय त्याचा करिति सन्मान । काळ करी चरण सेवा त्यांची ॥ ३ ॥
नामा म्हणे शिव अक्षरें हीं दोन्हीं । जपावीं सज्जनीं वारंवार ॥ ४ ॥

[५९७]

नामाचा महिमा कोण जाणे सीमा । चतुर्मुख ब्रह्मा नेणें कांहीं ॥ १ ॥
संसारा आलिया हेंचि आहे जोडी । अखंड घ्यावी गोडी हरिनामें ॥ २ ॥
सहस्रमुखें शेष वाखाणितां कीर्ती । नाहीं तया तृप्ति आजवरी ॥ ३ ॥
पशु पक्षी तृण कीटक अपार । नामें गेलें पार उतरोनि ॥ ४ ॥
[2]कापुराचे राशी पडे अग्निकण । तैसें नाम जाण पातकासी ॥ ५ ॥
नामाग्नीनें दोष जळती येकसरा । कैवल्य ये घरा बसले ठायीं ॥ ६ ॥
नामा म्हणे धन्य नामाचा प्रताप । ध्याती एकरूप देवभक्त ॥ ७ ॥

[५९८]

लिंगपुराणीं हा बोलिला इतिहास । तोचि म्यां तुम्हांस निवेदिला ॥ १ ॥
अनेक पुराणीं अनेक प्रकार । तारावया नरनारी लोक ॥ २ ॥
मुख्य हेचि कथा शिवरात्रीची जाणा । कैलासींचा राणा तोष पावे ॥ ३ ॥
नामा म्हणे मन करोनि निश्चळ । करा गदारोळ नामघोष ॥ ४ ॥

---

अभंग ५९६—(धु.), ५९७—(पं.), ५९८—(आ.)
१ क्रियामाण बुडविले । पुण्य घडे फार । शेखीं विश्वंभर कृपा करी ॥ (धु.)
२ कापूस (पं.)

[५९९]

अहो सदाशिवा । देसी भुक्ती मुक्ती भावा ॥ १ ॥

करावी ते तुम्ही सेवा । ऐसें धरावें या जीवा ॥ २ ॥

नामा म्हणे महादेवा । चुकवी चौऱ्यांशींचा हेवा ॥ ३ ॥

[६००]

बरवें गा शंकरा नाम तुझें । हरहर बरवें गा देवा नाम तुझें ॥ १ ॥

गाईल्या ऐकिल्या होय वैष्णवा गती । रामनामें तरले नेणों किती ॥ २ ॥

ऐसा सदा आनंद राऊळीं । विष्णुदास नामा पंढरपुरीं ॥ ३ ॥

[६०१]

साठीसहस्र विघ्नांवरी । शिवनाम पंचाक्षरी ॥ १ ॥

तो पर्वत राजा कें देखेन । जेथें असे मल्लिकार्जुन ॥ २ ॥

भक्तिभावाचें अंजन । साधावया निधान ॥ ३ ॥

मन मारूनि देईन बळी । साधावया चंद्रमौळी ॥ ४ ॥

भ्रांति पाटा फिटला । शिवमार्ग देखिला ॥ ५ ॥

[1]विष्णुदास नामा पायाळ भला । तेणें मलयानिळ देखिला ॥ ६ ॥

[६०२]

सदा सोमवारीं । विभूति लावूनि शिरीं । तुमच्या मंदिरीं । आलाप करीं ॥ १ ॥[2]

शंकर त्रिपुरारी । हरि नाम उच्चारी । म्हणती षडाक्षरी । पावें मज ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय । हरहर जयजय । नाहीं भवभय । तुझेनि नामें ॥ ३ ॥

करिती शिवरात्री । वाहाती बेलपत्री । प्रगट होऊनि गाती । भक्तिभावें ॥ ४ ॥

बोलती सत्कीर्ति । जिंतिले पवित्रीं । हरहर नाम मंत्रीं । तुज पूजिती ॥ ५ ॥

रुद्राक्षाच्या माळा । घालूनियां गळां । तो तुम्हां जवळां । सर्व मान्य ॥ ६ ॥

शिवशंभु भोळा । बहुतां पुण्यें जोडला । पावे जाश्वनीळा । म्हणे नामा ॥ ७ ॥

अभंग ५९९ व ६००—(आ.), ६०१ व ६०२—(पं.) व (शि.)

१ नामा पायाळ हो भला । तेणें मलयानिळ दाविला ॥ ६ ॥ (पं. व शि.)

२ एका (पं.) प्रतीत पुढील क्रमाने चरण येतात—

चरण १ ध्रुपद. चरण २ म्हणजे चरण १.

अनुक्रमें चरण ३, ४, ५, ६, ७ चे २, ३, ४, ५ व ६ असे होतील.

अनुक्रमणिका

[ ६०३ ]

[1]तुळसी पुष्पाहूनि आगळी । वृंदावनीं ती मिरवली ।
देवें मस्तकीं वंदिली । वंद्य जाली तीन्ही लोकां ॥ १ ॥
[2]तुळसी वंदावी माउली । अरे हे संतांची साउली ।
तुळसीपासीं वनमाळी । सदा रहात असे ॥ २ ॥
तुळसीदळ भूमिवरी पडिलें । तें जरी मस्तकीं वंदिलें ।
कोटी तीर्थस्नान केलें । एवढें फळ नामा म्हणे ॥ ३ ॥
तुळसीविण ज्याचें घर । तें तंव जाणावें अघोर ।
तेथें वसति यम किंकर । आज्ञा आहे म्हणोनी ॥ ४ ॥
तुळसीवृंदावन ज्याचे घरीं । त्यासी प्रसन्न श्रीहरी ।
तें वर्जिलें यम किंकरीं । आज्ञा आहे म्हणोनी ॥ ५ ॥
तुळसीचिया वृंदावना । जे करिती प्रदक्षिणा ।
अंतकाळीं होती स्मरणा । जन्म मरण त्यां नाहीं ॥ ६ ॥
तुळसी वृंदावन दर्शन । त्यासी वैकुंठीं गमन ।
त्यासी लटकें म्हणे कोण । त्यासी आण केशवाची ॥ ७ ॥
तुळसी माळां घाली गळां । त्यासी भेटेल सांवळा ।
चतुर्भुजसहित कमळा । केसीराज प्रत्यक्ष ॥ ८ ॥
तुळसी रोपा घाली उदक । त्याचे हारति महादोष ।
ब्रह्मादिकां नकळे निःशेष । जन्ममरण त्या नाहीं ॥ ९ ॥
तुळसीची देवा बहु प्रीती । आणिक पुष्पें न लगति ।
नामा म्हणे जी श्रीपति । हेचि भक्ति मज द्यावी ॥ १० ॥

[ ६०४ ]

उभें वृंदावन जयाचिये द्वारीं । होय तो श्रीहरि प्रसन्न त्या ॥ १ ॥
तुळसीचें रोप लावील जो आणोनि । तया चक्रपाणि न विसंबे ॥ २ ॥
तुळसीचें काष्ट जपमाळ करी । तयासि श्रीहरि प्रसन्न तो ॥ ३ ॥
तुळसीची कीर्ति अगाध पैं आहे । पंढरीसी पाहे म्हणे नामा ॥ ४ ॥

अभंग ६०३— (पं.) व (शि.), ६०४—(आ.)

१ असाच्या असा सबंध अभंग (शि.) प्रतीत मिळतो. म्हणून (आ.) प्रतीतील तिन्ही अभंग एकत्र करून एकच मानला आहे. २ तुळसी वंदा हे माऊली । अरे हे संताची साऊली ॥ असे ध्रुपद आहे.

अनुक्रमणिका

[ ६०५ ]

तुळसीची सेवा घडे । रंगमाळा घाला सडे ॥ १ ॥
दूत न येती तयाकडे । हरिनामाची घरटीं पडे ॥ २ ॥
नामा म्हणे हरिएवढें । ब्रह्म वृंदावनीं सांपडे ॥ ३ ॥

[ ६०६ ]

फुकाचिया तुळसी वहा रे । ध्रुवासारखें पद मागा रे ॥ १ ॥
एका विठ्ठला शरण जा रे । जन्म वायां कां दवडा रे ॥ २ ॥
नामा म्हणे हा पहा रे । विठ्ठल भक्तांचा ऋणिया रे ॥ ३ ॥

[ ६०७ ]

तुळसीचें हत्यार । वृंदावन द्रुम थोर ॥ १ ॥
तुळसीच्या दळीं । यम जिंकिला महाबळी ॥ २ ॥
नामा म्हणे वळि रे बळी । विठ्ठल [1]आमचा भुजबळी ॥ ३ ॥

[ ६०८ ]

उठोनियां प्रातःकाळीं । तुळस वंदावी माऊली ।
तुळस संतांची साउली । मुगुटीं वाहिली विष्णूनें ॥ १ ॥
तुळस असे ज्याचे द्वारीं । लक्ष्मी वसे त्याचे घरीं ।
येवोनि श्रीहरि । क्रीडा करी स्वानंदें ॥ २ ॥
तुळसीसी मंजुळा येतां । पळ सुटे यमदूतां ।
अद्वैत तुळस कृष्ण स्मरतां । नासे दुरित चित्तांचे ॥ ३ ॥[2]
जे जे तुळसीं घालिती उदक । ते नर पावती ब्रह्मसुख ।
नामा म्हणे पंढरिनायक । तुळसीजवळी उभा असे ॥ ४ ॥

---

अभंग ६०५ ते ६०७—(पं.) व (शि.), ६०८—(धु.)
१ भक्ताचा (शि. व पं.) २ हा चरण (धु.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

[६०९]

येई गे केशवे मज तुझी सवे । तुजविण नुगवे दिनू माये ॥ १ ॥
तूं माय जननी कांसवी कौसाळ । [1]दिन बहुसाळ मज पावे ॥ २ ॥
न मागे केवळ विषयाचें टवाळ । तूं माझी कृपाळ विठ्ठल माय ॥ ३ ॥
वोळली गगनीं केशव कामधेनु । लवतां लोचनु स्फुरे बाह्या ॥ ४ ॥
वाजवील वाद्य गोपाळांची मांदी । आल्हाद गोविंदीं नित्य माझा ॥ ५ ॥
नामा म्हणे केशव येई कामधेनु । तेणें माझी तनु तृप्त सदा ॥ ६ ॥

[६१०]

येई गे नारायणी अमृत संजीवनी । चिंतितां निर्वाणीं पावें वेगीं ॥ १ ॥
तूं माझें जीवन नाम नारायण । नित्य अनुष्ठान तुझ्या नामें ॥ २ ॥
बाह्य अभ्यंतरीं तूंचि सर्वांठायीं । तुजविण सृष्टि शून्य दिसे ॥ ३ ॥
चाल लवलाह्या [2]कृपाळु तूं माये । मज हें न साहे मोह जाळ ॥ ४ ॥
तुटेल बिरडें सुटतील गांठी । जंव तूं जगजेठी येशील माये ॥ ५ ॥
नामा म्हणे धन्य तुझें नाम साचे । उच्चारितां वाचे निवती अंगें ॥ ६ ॥

[६११]

येई गे माधवी पाजी प्रेमपान्हा । विषयाचा आंदणा नको करूं ॥ १ ॥
धांव तूं मधुकरे माधवे उदारे । येई तूं [3]सोइरे जननिये ॥ २ ॥
जंव तूं न येसि तंव कोणा पावे मज । माझें जीवीचें गुज कोण पुसे ॥ ३ ॥[4]
कष्टलों वेरझारी शीण दूर करी । येई तूं झडकरी माधवे वो ॥ ४ ॥
अनंता वो नामें पुराणें पढती । पावसी आकांतीं विठ्ठल वो ॥ ५ ॥
नामा म्हणे लाहो कराजा माधवे । माझेनि वो जीवें लाहे चाड ॥ ६ ॥

[६१२]

येई तूं गोविंदे नामामृतधारी । नित्य हें उच्चारि [5]गोविंदातें ॥ १ ॥
गोविंद नित्य हाचि छंद । पावे तूं हृदुगद आदिरूपें ॥ २ ॥

अभंग ६०९ व ६१०—(पं.) व (धु.), ६११—(पं.), ६१२—(पं.) व (धु.)
१ सीण (धु.) २ कुर्वाळित मोहें (धु.) ३ सागरे (पं.) ४ हा चरण (आ.) प्रतीत नाही.
५ गोविंद नाम (धु.)

अनुक्रमणिका

गोविंद हो ध्यानें निवती अष्टांगें । गोविंद गे वेगें वेष धरूं ॥ ३ ॥
गोविंद गोपाळ मुकुंद केशरी । येईं तूं लवकरी सांवळीये ॥ ४ ॥
गोविंद गे नाम जनीं वनीं वसे । प्रत्यक्ष ते दिसे पंढरीसी ॥ ५ ॥
वेणूनादें काला गोविंदें पैं केला । धांवतचि आला पेंद्यापाशीं ॥ ६ ॥
[1]ती हीच वो माय उभी बाळमूर्ति । नाम जे जपती पांडुरंग ॥ ७ ॥
नामा म्हणे पांग गोविंद हा दवडी । वेगें लवडसवडी करीत माये ॥ ८ ॥

[६१३]

विष्णु विष्णु हरि पावे लवकरी । ब्रिद चराचरी सांगे मुनी ॥ १ ॥
वैकुंठवासिनी कृष्णविष्णुदेव । नाम तें गौरव आम्हांलागीं ॥ २ ॥
धन्य हाचि दिनु विष्णुमाय पावे । गगनीं उगवे सूर्य जैसा ॥ ३ ॥
आदि ब्रह्मा हरी विष्णु कृष्णगंगा । भागिरथी पैं गा पदीं पावे ॥ ४ ॥
[2]गया ते प्रयाग काशी ते सर्वांग । विश्वेश्वर लिंग चराचर ॥ ५ ॥
विष्णुगंगाधर विष्णुनाम पाठ । उच्चारितां वाट वैकुंठींची ॥ ६ ॥
नामा म्हणे विष्णु भागिरथींमाजीं । पंढरीये माझी विठ्ठल माये ॥ ७ ॥

[६१४]

येईं तूं मधुकरे मदनसुंदरे । मज गे न धरे प्रेम पोटीं ॥ १ ॥
तूं माझी जननी मधुसूदन गाय । कामधेनु होय कांसवीची ॥ २ ॥
आनंद निजधने जुनाट मधुसूदनें । शुकस्तनपान पाजीं पान्हा ॥ ३ ॥
केशव कांसवी पद रानगाय । आत्माराम होय निःसंदेह ॥ ४ ॥
विठ्ठलमुकुंदें स्वरूपें गोमटीं । आकांतली सृष्टी मधुसूदनें ॥ ५ ॥
शंखचक्रांकित आयुधें मंडित । मुकुट शोभत तुझा शिरीं ॥ ६ ॥
भक्तवरदायिनी मधुसूदन गंगा । व्हावें तूं-वो वेगा कामधेनु ॥ ७ ॥
नामा म्हणे माये मधुसूदन गाय । ते संजीवनी होय आम्हालागीं ॥ ८ ॥

अभंग ६१३—(पं.) व (धु.), ६१४—(पं.)
१ तें हें वो पेखणे तुझेंचि चरित्र । (धु.)
२ विष्णु कृष्ण गंगा भिमरथि नदी । भागिरथी पदीं विष्णु पाये ॥ ५ ॥ (धु.)
(धु.) प्रतीमध्ये हा अभंग ८ चरणी आहे व वरील चरण हा त्यातील ५ वा चरण आहे.

अनुक्रमणिका

[६१५]
येई वो त्रिविक्रमे पूर्ण पान्हा देईं । कामधेनु होई विठ्ठलराजे ॥ १ ॥
त्रिविक्रमधरे येई तूं सांवळे । मुकुंद गोपाळे केशवे वेगीं ॥ २ ॥
तूं माझें निजधन त्रिविक्रमधरे । गंगानाममात्रें भंगी पाप ॥ ३ ॥
त्रिपदागायत्री त्रिविक्रममुखें । जनाची वो दुःखें हरती नामें ॥ ४ ॥
त्रिजटा त्रिफणी भागीरथी वेणी । प्रयाग वो धूनी पाप जाळी ॥ ५ ॥
त्रिस्थळीं त्रिमाये त्रिविक्रम होय । विश्वेश्वर दोहे तारक ब्रह्म ॥ ६ ॥
काशीकांति माये अयोध्या द्वारका । मथुरा अवंतिका तूंचि माये ॥ ७ ॥
नामा म्हणे माझी त्रिविक्रम गाय । भक्तिसी पान्हाये पंढरपुरीं ॥ ८ ॥

[६१६]
येंई वो वामने खुजीयखुजटे । पंढरीचे पेठे उभी राहे ॥ १ ॥
येई वो डोळसे सांवळें तेजसे । वामने बहु वसे ब्रह्मचारी ॥ २ ॥
अनंत विद्गदे अनंत अपारे । कैवल्य वोसरे पदकमळें ॥ ३ ॥
तुझें नाम धन्य वामन साजिरें । रूप हें गोजिरें बळिच्या द्वारीं ॥ ४ ॥
तुझ्या चरणीं तीर्थें उद्धरती सर्व । येई तूं सत्वर वामनाई ॥ ५ ॥
नामा म्हणे पावे वामन ब्रह्मांडें । स्वरूप वितंडे ब्रह्मचारें ॥ ६ ॥

[६१७]
येई वो श्रीधरे सर्व रूपसारे । कैवल्य उत्तरे अभिनव ॥ १ ॥
श्रीधर श्रीरंगे नाम पांडुरंगे । प्रगट वो सांगे पूर्णधन ॥ २ ॥
श्रीकरे श्रीधरे शोभे ते साचारें । चक्रांकित करें शंख तुझा ॥ ३ ॥
सुंदर श्यामळ नाम हें अढळ । मुखीं हो वेल्हाळ हस्त तुझे ॥ ४ ॥
प्रकाशें हा पूर्ण श्रीधरें पैं जाण । सांगितली खूण खेचरानें ॥ ५ ॥
नामा म्हणे माता श्रीधर उच्चारू । तरेन साचारू तिन्हीं लोकीं ॥ ६ ॥

[६१८]
येई हृषिकेशी दिव्य रूप दिसे । मन हें उल्हासे भेटीलागीं ॥ १ ॥
त्राहे हृषिकेशी नामें तरले संभ्रमें । नित्य रामनामें भवसिंधु ॥ २ ॥

अभंग ६१५ ते ६१८--(पं.)



अनुक्रमणिका

आराधनें धन ऋषिसी संपूर्ण । नाम कोटी यज्ञ जाले तया ॥ ३ ॥
पावन हृषिकेशी हेंचि ध्यान मन । नाम सनातन हृषिकेशी ॥ ४ ॥
विश्वा करी कळा विश्व जनलीळां । त्राहे वेळोवेळां हृषिकेशी ॥ ५ ॥
नामा म्हणे माय येई हृषिकेश । जालों कासावीस तुजवीण ॥ ६ ॥

[६१९]

येई वो पद्मनामें पंकजलोचनें । विश्व पूर्णधनें देखे तुज ॥ १ ॥
त्राहे पद्मनाभा वाचा सिद्ध पावे । मज हें नुगवे मायाजाळ ॥ २ ॥
पद्मांकित रेखा पद्म हें सुरेख । पावे वो निमिष्य एक माये ॥ ३ ॥
विचरे हे पृथ्वी नाम पद्मनाभ । स्वयंभावो बिंब विठ्ठलेसी ॥ ४ ॥
रिकामा मी नसे दिननिशीं निमिष्य । पद्मनाभ साक्ष हृदयीं भोगी ॥ ५ ॥
नामा म्हणे पद्मनाभ हेंचि हो नाम । जपतुसें प्रेम देई मज ॥ ६ ॥

[६२०]

येई वो दामोदरे पवित्र हे करे । मना हो नावरे प्रेमलोट ॥ १ ॥
पाहे कृपादृष्टी साहे जगजेठी । पूर्ण पान्हा घोटी ऐसें करी ॥ २ ॥
दामोदरें नाम मदन परिकरें । हाचि वो विचार मनें केला ॥ ३ ॥
येई तूं निर्धारें पावें तूं झडकरी । येई वो लवकरी दामोदरे ॥ ४ ॥
दामोदर माता पाहे वो समता । पावे वो निवांता पावें वेगीं ॥ ५ ॥
नामा म्हणे लोटूं प्रेमामृत निवटूं । नामेंचि वैकुंठे दामोदरे ॥ ६ ॥

[६२१]

येई तूं कृपाळे संकर्षण माते । पवित्र पूर्णभरिते गुणनिधि ॥ १ ॥
त्राहे त्राहे वेगीं पावे वो झडकरी । ब्रीद चराचरीं वर्णिताती ॥ २ ॥
संकर्षण गंगा सर्वांगीं तूं असे । जनीं वनीं दिसे रूप तुझें ॥ ३ ॥
कटावरी कर सांवळी सुंदर । मनाचा विचार इच्या चरणीं ॥ ४ ॥
निर्धारू सांगतां व माये वो घेतां । संकर्षण माता पाव वेगीं ॥ ५ ॥

अभंग ६१९ ते ६२१—(पं.)

अनुक्रमणिका

विष्णु संकर्षण नाम हें गहन । पतितपावन चरणरजे ॥ ६ ॥
नामा म्हणे माय संकर्षण गाय । हरिदासा पाल्हावे पंढरीसी ॥ ७ ॥

[ ६२२ ]

येई तूं शारंगे वासुदेवे त्वरें । वासुदेवे सारे गोपाळ वो ॥ १ ॥
त्राहे वासुदेवा पावे झडकरी । त्वरें वेगूं करी आर्त भेटीं ॥ २ ॥
वासुदेव नामें साधन सुगम । योगियां विश्राम स्थान जालें ॥ ३ ॥
द्वादश अक्षर जपिन्नला गुरू । तयासी साचार अढळपद ॥ ४ ॥
बळी भीष्मदेवी वासुदेवी भाव । रोहिणीची माव ऐसें जालें ॥ ५ ॥
नामा म्हणे भक्त वासुदेवीं रत । सायुज्य पावे तो एक्या नामें ॥ ६ ॥

[ ६२३ ]

येई तूं प्रद्युम्ने ध्यान तूं धरणें । माझिये कल्पने निर्धारिसा ॥ १ ॥
त्राहे झडकरी पावे वो लवकरी । प्रद्युम्ने फुल्कारी वेळोवेळां ॥ २ ॥
सांवळे सुंदरे वेणु वाहे करीं । ध्यान हे सुंदरी यमुना तटीं ॥ ३ ॥
प्रवाह प्रद्युम्ने नामघोष दाट । जिंकिले जुनाट पापराशी ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम धन्य हें प्रद्युम्न । होईल संपन्न नाम घेतां ॥ ५ ॥

[ ६२४ ]

येई वो अनिरुद्धे सांवळे प्रबुद्धे । विराटे गोविंदे पाव वेगीं ॥ १ ॥
त्राहे माउलीये मना तुझी सोय । चुकती अपाय नाम घेतां ॥ २ ॥
अनिरुद्ध पाठें जाईन वैकुंठे । पुंडलिक पेठे उभा असे ॥ ३ ॥
कटावरी कर सांवळी सुंदर । मनाचा विचार इच्या चरणीं ॥ ४ ॥
अनिरुद्धसार अनु नाहीं आधार । सर्वही विचार अनिरुद्धे ॥ ५ ॥
नामा म्हणे येई अनिरुद्धे माये । आणिक उपाय नलगे मज ॥ ६ ॥

[ ६२५ ]

येई तूं पुरुषोत्तम संजीवनी रामे । योगिया विश्रामे पुरुषश्रेष्ठा ॥ १ ॥
त्राहे मनोधर्म नाम पुरुषोत्तम । साधन आगम ऐसी माये ॥ २ ॥

अभंग ६२२ ते ६२५—(५)



अनुक्रमणिका

येई वो सांभाळी लवलाहे मनें । जुनाट हो जुनें पुरुषोत्तमें ॥ ३ ॥
तुझें नाम धन्य पुरुष हें सौजन्य । द्वैत हें अभिन्न अद्वैत हें ॥ ४ ॥
एकाक्षरी नाम पुरुष शुचिसम । नाम आत्माराम पुरुषोत्तम ॥ ५ ॥
नामा म्हणे पावे पुरुषोत्तम माते । सर्वत्र अद्वैत एकरूप ॥ ६ ॥

[ ६२६ ]

येई वो अधोक्षजे वैकुंठ विराजे । नाम गे सहजें अमृतरासी ॥ १ ॥
अधोक्षज नामें घालीन गोंधळ । रिता एक पळ जाऊं नेदी ॥ २ ॥
अधर हे रंगीं अधोर्ध्व सेवीन । सर्वत्र पाहीन अधोक्षज ॥ ३ ॥
अरिष्ट हें निरसी माये अधोक्षजे । ऐसी या पाविजे संकटीं त्वां ॥ ४ ॥
अरि हे मर्दन अधोक्षज जाणें । स्वीकारावें पूर्ण प्रगटतां ॥ ५ ॥
नामा म्हणे धांवे अधोक्षज पावे । दिशाद्रुम भावें तुज मग ॥ ६ ॥

[ ६२७ ]

येई वो केसरी नरसिंह उच्चारी । पवित्र साचारी तिहीं लोकीं ॥ १ ॥
नरसिंह वामन प्रल्हादरक्षण । आमुचें तें धन नाम तुझें ॥ २ ॥
शंखचक्र करीं पावे वो लवकरी । येई तूं केसरी लवलाहे ॥ ३ ॥
नरसिंह हें नाम नरसिंह हें प्रेम । उत्तम उत्तम तिन्हीं लोकीं ॥ ४ ॥
त्रिपुररक्षक दानवमर्दन । विकट वदन पंचाक्षरी ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि नाम नरकेसरी । नरसिंह उच्चारी तरती जीव ॥ ६ ॥

[ ६२८ ]

येई वो-अच्युते नामामृत रसे । सुंदर डोळसे जान्हवीये ॥ १ ॥
अमृताची खोटी अच्युत नाम पेठीं । पावे जगजेठी अच्युत सार ॥ २ ॥
अच्युत अच्युत नामें हेंचि सत्य । हें पियूष त्वरित उच्चारितां ॥ ३ ॥

अभंग ६२६ ते ६२८—(पं.)

अनुक्रमणिका

वैकुंठींची मूर्ति अच्युतनाम पाठे । प्रत्यक्ष वो भेटे विटेवरी ॥ ४ ॥
पुंडलिक दृष्टी नयनाची भेटी । निवारितां दृष्टी त्याहाळितां ॥ ५ ॥
नामा म्हणे अच्युत नाम हेंचि आम्हां । दिननिशीं राम जपतसें ॥ ६ ॥

[ ६२९ ]

येई जनार्दन जनवनसंपन्ने । माझे वो चिद्‌घने पांडुरंगे ॥ १ ॥
आहे जनार्दने पूर्णानंदघने । येई वो संपन्ने विश्वंभरे ॥ २ ॥
नाम हें दुर्लभ जनक जननी । राम जनार्दनीं विनटली ॥ ३ ॥
सांवळी डोळस रवि एकासनीं । तेज प्रकाशनी हिरियाची ॥ ४ ॥
जननी ते जननी निकट ते जीवनीं । जग प्रगटिणी हरीयाची ॥ ५ ॥
नामा म्हणे जन नाम जनार्दन । सनकादिक जाण सेवताती ॥ ६ ॥

[ ६३० ]

येई तूं उपेंद्रे विठ्ठल महिंद्रे । देवामाजी भद्रे सिंहासनीं ॥ १ ॥
आहे वो जननी शिणलों गे माये । तुजविण आहे कवण मज ॥ २ ॥
तूं माझें कारुण्य प्रत्यक्ष सौजन्य । विचारितां प्रवीण प्रबुद्ध हो ॥ ३ ॥
पावे वो तूं वेगीं उपेंद्रे गे माते । पुंडलिक सांगातें पंढरीसी ॥ ४ ॥
दीपकु लाविला दिन उगवला । दीपकें फळला पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम उपेंद्र ऐसें शम । पावेन विश्राम नाम घेतां ॥ ६ ॥

[ ६३१ ]

येई तूं हरिरूपें विठ्ठल स्वरूपे । कळिकाळ कांपे नाम घेतां ॥ १ ॥
नामें हरि हरि आहे वो झडकरी । शिणलों मी भारी जननीये ॥ २ ॥
हरिनामधन सर्व जनार्दन । हरी हें आठवण जिव्हे सदा ॥ ३ ॥
हरि हरि म्हणतां हरिरूप संतां । नाम हें अनंताक्षर विलसे ॥ ४ ॥
येई तूं हरि गंगे सांवळे सुरंगे । हरि हरि संगें रतलोंसे ॥ ५ ॥
नामा म्हणे हरी पांडुरंग माझा । [1]चरण हो भोज्या राज्यधरू ॥ ६ ॥

अभंग ६२९ व ६३०—(पं.), ६३१—(पं.) व (बा.)
१ विठ्ठल हा भोज्या राज्य धरु । (बा.)

अनुक्रमणिका

[ ६३२ ]

येई वो तूं कृष्णे हरी माझिये तृष्णे । दिननिशीं प्रष्णे वाट पाहें ॥ १ ॥
आहे कृष्णगंगे सांवळे सारंगे । नामस्मरण वेगें पुरे आम्हां ॥ २ ॥
राम-कृष्ण टाहो नामें लवलाहो । फिटला संदेहो संसाराचा ॥ ३ ॥
उद्धव अक्रूर यादव सादर । कृष्णातें अपार तयालागीं ॥ ४ ॥
अर्जुन द्रौपदी स्मरण गोविंदा । पावावें निजपदीं नामा म्हणे ॥ ५ ॥

अभंग ६३२—(आ.)

अनुक्रमणिका

[ ६३३ ]

वाचे म्हणतां गंगा गंगा । सकळ पापें जाती भंगा ॥ १ ॥
दृष्टी पडतां ब्रह्मगिरी । त्यासि नाहीं यमपुरी ॥ २ ॥[1]
कुशावर्ती करितां स्नान । त्याचें [2]वैकुंठीं राहणें ॥ ३ ॥[3]
नामा म्हणे प्रदक्षिणा । [4]त्यासि जन्म नाहीं पुन्हां ॥ ४ ॥

अभंग ६३३—(पं.) व (धु.)

१ (पं.) प्रतीमध्ये हा चरण तिसरा आहे. २ कैलासीं (धु.) व (पं.) ३ (पं.) प्रतीमध्ये हा चरण दुसरा आहे. ४ त्यांच्या पुण्या नाहीं गणना । (धु. व पं.)

• • •

[६३४]

नामाचा महिमा नेणेची पैं ब्रह्मा । म्हणोनियां कर्मा अनुसरला ॥ १ ॥
नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म । केशव हेंचि वर्म सांगितलें ॥ २ ॥[1]
नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या । नामाविणें वेद आणिक नाहीं ॥ ३ ॥[2]
करितां आचमन केशव नारायण । करिती उच्चारण आधीं हेंचि ॥ ४ ॥[3]
लग्नाचिये काळीं म्हणती सावधान । लक्ष्मीनारायण चिंतन करा ॥ ५ ॥
देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती । शेवटीं वदविती रामनाम ॥ ६ ॥
ऐसिया नामापरतें नाहीं सार । गिरिजेसी शंकर उपदेशी ॥ ७ ॥
करिती पितृश्राद्ध कर्म आचरती । शेवटीं म्हणती एको विष्णु ॥ ८ ॥
नामें होय गति नामें होय मुक्ति । नामयाचे चित्तीं रामनाम ॥ ९ ॥

[६३५]

म्हणतां वाचे नाम वंदी तया यम । काळादिकांसम तुज एका ॥ १ ॥
[4]ऋद्धि सिद्धि दासी अंगण झाडिती । उच्छिष्टें काढिती मुक्ति चारी ॥ २ ॥
[5]चारी वेद भाट होऊनि गर्जती । सनकादिक गाती कीर्ति तुझी ॥ ३ ॥
[6]सुरवरांचे भार अंगणीं लोळती । चरणरज क्षिति शिव वंदी ॥ ४ ॥
नामा म्हणे देव ऐसा हो कृपाळु । करी तो सांभाळू अनाथांचा ॥ ५ ॥[7]

[६३६]

नामें सदा शुद्धि प्राणिया होतसे । नामापाशीं असे भुक्तिमुक्ति ॥ १ ॥
नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं । नाम संजीवनी साधकांसी ॥ २ ॥
नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे । नामें सदा चढे मोक्ष हातां ॥ ३ ॥

---

अभंग ६३४—(पं.), (धु.) व (शि.), ६३५—(पं. व शि.), ६३६—(आ.)

१ हा चरण नाही. (धु.) २ हा चरण दुसरा आहे. (धु.) ३ हा चरण पाचवा आहे. (धु.) व हा चरण काही (धु.) प्रतींत नाही.

विविध प्रतींत हे चरण त्रिविध क्रमाने आले आहेत, पण बहुधा २ चा १, ३ चा २ ह्या क्रमाने आले आहेत.

४ ऐसें नाम श्रेष्ठ सकळांसी वरिष्ठ । उच्चारितां नीट वैकुंठ गाजे ॥ २ ॥ (शि. व पं.)
५ तो हा नाम महिमा वाखाणित ब्रह्मा । न चले तया उपमा आदि अंती ॥ ३ ॥ (शि. व पं.)
६ नामा म्हणे पाटे नामाचे नि वाटे । प्रत्यक्ष प्रगटे विठ्ठल हरी ॥ ४ ॥ (शि. व पं.)
७ हा चरण (पं. व शि.) प्रतींत आढळत नाही.

यज्ञ दान तप नामें आली हातां । नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥ ४ ॥
नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं । नाहीं याच्या तुकीं दुजा कोणी ॥ ५ ॥

[ ६३७ ]

नामें तो सरता नामें तो परता । नामें पंढरिनाथा भेटविलें ॥ १ ॥
नाम हेंचि तारी नाम भवसागरीं । उतरीं पैलतिरीं नाम तुझें ॥ २ ॥
नाम तें अंजन नामें बोधे मन । नामेंचि निधान चांगया जाला ॥ ३ ॥
मार्गी जातां तुम्ही उगेंचि नसावें । वाचेसि म्हणावें रामकृष्ण ॥ ४ ॥
रामकृष्ण हरी मुकुंदमुरारी । केशव नरहरी नारायण ॥ ५ ॥
ऐसा हा सतत आठव नामाचा । नामा म्हणे कैंचा दोष तया ॥ ६ ॥

[ ६३८ ]

चिंतातुर देहीं न साहे काजळी । नामाची पाजळी उभय दिवीं ॥ १ ॥
प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल । वैकुंठ जोडेल भजनभक्तीं ॥ २ ॥
नाहीं यातीवर्ण नाहीं हें वेदोक्त । नामेंचि संतृप्ति होती जीवा ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम हेंचि बीजसार । तुटेल येरझार भवबंधाची ॥ ४ ॥

[ ६३९ ]

गोक्षीर लाविलें अंधळिया मुखीं । तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥
तैसें देवा तुझें नाम निरंतर । जिव्हेसी पाझर अमृताचे ॥ २ ॥
सोलूनियां केळें साखरें घोळिलें । अंधारीं खादलें तरी गोड ॥ ३ ॥
द्राक्षफळां घड सेवितां चोखड । तयाहूनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥
आळूनियां क्षीर तुपाचिये आळे । कालविलें गुळें गोड जैसें ॥ ५ ॥
जाणोनियां नामा करी विनवणी । अमृताची खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

[ ६४० ]

नामचि हें आहे पंचतत्त्वा ठाव । नाहीं दुजा भाव देखावया ॥ १ ॥
देखणारा जाहाला कर्पुराची वार्ता । नामाग्नि विश्रांती ठाईं जाहाली ॥ २ ॥

अभंग ६३७ व ६३८--(नं.) व (गि.). ६३९--(आ.). ६४०--(धु.)

अनुक्रमणिका

द्वैताद्वैत तेथें नेणे जाणपण । गेलें हरपोन नामें सर्व ॥ ३ ॥
नामदेव म्हणे अनाम तें नाम । नाना नामभ्रम तेथें दुजा ॥ ४ ॥

[ ६४१ ]

हडबडलीं पातकें । घेतां रामनाम एक ॥ १ ॥
राम म्हणतां तत्क्षणीं । चित्रगुप्तें सांडिली लेखणी ॥ २ ॥
घेऊनि पूजेचा संभार । ब्रह्मा येतसे समोर ॥ ३ ॥
नामा म्हणे जरी हें लटकें । तरी हें भंगो मस्तक ॥ ४ ॥

[ ६४२ ]

असत्याचें [1]मूळ बैसलें ये वाचे । तें न फिटती साचे तीर्थोदकें ॥ १ ॥
हरीनामामृत प्रक्षाळी जिव्हेतें । पाणिये बहुतें काय करिती ॥ २ ॥
गंगासागरादी तीर्थें कोडीवरी । हरिनामाची सरी न पवती ॥ ३ ॥
हरिनाम गंगें सुस्नात पैं जाला । नाम्या जवळी आला केशिराज ॥ ४ ॥

[ ६४३ ]

वैष्णव तो बळी । सदाशिव चंद्रमौळी ॥ १ ॥
त्याचा भक्त तो रावण । मारूनि छेदिला अभिमान ॥ २ ॥
आणिक तो बाणासूर । छेदिला शिवासमोर ॥ ३ ॥
अनिरुद्धा समयीं ख्याती । केली तयाची फजिती ॥ ४ ॥
भस्मासुर भस्म जाला । जाळुनियां भस्म केला ॥ ५ ॥
मारुनियां मुक्त केलें । परि ते भक्त नाहीं जाले ॥ ६ ॥
नामा म्हणे देवाधिदेव । भजावया पंढरीराव ॥ ७ ॥

[ ६४४ ]

भक्ति करूनियां कोण वायां गेला । सांगा हो विठ्ठला निवडुनि ॥ १ ॥
द्वापाराचे अंतीं नामची सुकृत । अद्यापि निश्चित चालतसे ॥ २ ॥

---

अभंग ६४१--(पं.), (धु.) व (शि.), ६४२—(पं.), (धु.), (शि.) व (भा.), ६४३—(पं.) व (शि.), ६४४--(आ.)
१ नाम (आ.) २ मळ (आ.)

अनुक्रमणिका

नाम ऐकतां तरती निर्धारीं । व्याख्यान श्रीधरी टीकाकार ॥ ३ ॥
नामा म्हणे राम व्यापीं त्रिभुवन । नाम तें निधान कलियुगीं ॥ ४ ॥

[ ६४५ ]

देवाचें हें गुज सकळ मंत्रमय । जें कां नित्य ध्येय शंकराचें ॥ १ ॥
तें हें रामनाम सेवितां सर्वभावें । रामरूप व्हावें निश्चयेंसी ॥ २ ॥
नष्ट अजामेळाचें पतितत्व गेलें । दिव्य देह जाले वाल्मिकाचें ॥ ३ ॥
शरीरसंपत्ति बळीनें देऊनि सकळ । केला द्वारपाळ नारायण ॥ ४ ॥
कृष्णाविण दुजें नेणती कायावाचा । जाला पांडवांचा साहाकारी ॥ ५ ॥
नामा म्हणे केशव भावाचा लंपट । [1]भक्ताशीं निकट रतलासे ॥ ६ ॥

[ ६४६ ]

नामाचें सामर्थ्य नेणें वेदशास्त्र । शेषाचीं वक्त्रें मौनावलीं ॥ १ ॥
गंगा गणपति चंद्र सूर्य श्रेष्ठ । शंकर वरिष्ठ मौनावले ॥ २ ॥
भीष्म पराशर उद्धव अंगद । ब्रह्मा मुचकुंद मौनावले ॥ ३ ॥
नामा म्हणे येरे काय जाणे स्तुति । दाटोनि श्रीपती उभा केला ॥ ४ ॥

[ ६४७ ]

करीं घेऊनि ब्रह्मविणा । नारद वोळगे नारायणा ॥ १ ॥
हेंचि हेंचि तत्त्वसार । नाम म्हणे निरंतर ॥ २ ॥
आपण शिव आणि शक्ति । रामनाम ते जपती ॥ ३ ॥
गात नाचत प्रल्हाद वीर । खांबीं केलासे अवतार ॥ ४ ॥
कुंटिणी पक्षिया म्हणे रामा । तिसी नेलें निजधामा ॥ ५ ॥
अहल्येसी लागतां चरण । तिसीं आलें मनुष्यपण ॥ ६ ॥
अजामेळ पातकी अपार । नामें पावला पैलपार ॥ ७ ॥
गजेंद्रें केलें स्मरण । त्याचें तोडिलें बंधन ॥ ८ ॥
द्रौपदी स्मरे हृषिकेसी । वस्त्रें पुरविलीं तियेसी ॥ ९ ॥

अभंग ६४५--(प.), (धु.) व (शि.), ६४६ व ६४७--(प.) व (शि.)
१ भक्तीसी (शि., पं. व आ.)

परीक्षितासी घडलें स्मरण । त्यासी जाले सुलभ चरण ॥ १० ॥
नामा म्हणे निरंतरू । गगनीं अढळ केला धुरू ॥ ११ ॥

[ ६४८ ]

अग्नी जाळी तरी न जळती पांडव । हृदयीं माधव म्हणोनियां ॥ १ ॥
अग्नी जाळी तरी न जळती गोपाळ । हृदयीं देवकीबाळ म्हणोनियां ॥ २ ॥
अग्नी जाळी तरी न जळे हनुमंत । हृदयीं सीताकांत म्हणोनियां ॥ ३ ॥
अग्नी जाळी तरी न जळे प्रल्हाद । हृदयीं गोविंद म्हणोनियां ॥ ४ ॥
अग्नी जाळी तरी न जळे पैं सीता । हृदयीं रघुनाथ म्हणोनियां ॥ ५ ॥
लंकेसी उरलें बिभीषणाचें घर । हृदयीं सीतावर धरिला म्हणोनियां ॥ ६ ॥
नामा म्हणे तुम्ही स्मरावें गोविंदा । चुके भवबाधा संसाराची ॥ ७ ॥

[ ६४९ ]

नामाचा प्रताप जाणवेना कोणा । समुद्रीं पाषाण तारियेले ॥ १ ॥
आवडीनें कोणी चिंतितां उल्हास । काय तो तयास उपेक्षील ॥ २ ॥
कुंटिणी ते नीच राव्यासाठीं नेली । वैकुंठीं ठेविली सन्निधची ॥ ३ ॥
अजामिळ खळ पुत्राचिया मिषें । उद्धरिलें त्यास दीनानाथें ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें सांगों आतां किती । नामापाशीं मुक्ति उभी असे ॥ ५ ॥

[ ६५० ]

आणीक ही मंत्र मोक्षदानी खरे । अशौचाचा थार असू नये ॥ १ ॥
नाममंत्र कांहीं बाधेना कोणासी । जया अहर्निशीं रामकृष्ण ॥ २ ॥
तपाची मांडणी आकाशाचें खेव । इंद्रियांची हांव राहे तरी ॥ ३ ॥
यज्ञ तो आचार धनाचें सांकडें । तरी जाण द्वाड स्वर्गसुख ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम साधकाची माता । जैसें तैसें घेतां भक्ति जोडे ॥ ५ ॥

[ ६५१ ]

नामचि तो जाणे आन कांहीं नेणें । संसार नामाविणें जाईजेना ॥ १ ॥
नाम स्मरे त्यांसी संसारचि नाहीं । खुंटली ते पाही वेरझार ॥ २ ॥

अभंग ६४८—(पं.), (शि.) व (भा.), ६४९ व ६५०—(आ.), ६५१—(पं.) व (शि.)



अनुक्रमणिका

नामा म्हणे त्याचें जळो जालेंपण । आळसी वायांविण संसाराची ॥ ३ ॥
नामा म्हणे मज नामींच सौरसु । नाम स्मरे हृषिकेशु त्यासी पावे ॥ ४ ॥

[ ६५२ ]

साराचेंहि सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गातां वाचे ॥ १ ॥
कासया करावें आणिक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी ॥ २ ॥
दया शांति क्षमा हेंचि पैं भूषण । नामसंकीर्तन अर्हनिशीं ॥ ३ ॥
नामा म्हणे जप अखंड नामाचा । काळ हा सुखाचा सदोदित ॥ ४ ॥

[ ६५३ ]

दग्धही होतसे आलें जें आकारा । असोनि निर्धारा नाम नाहीं ॥ १ ॥[1]
नाम अनुभवे प्रपंचि हो ब्रह्म । जाहला सर्वोत्तम संत कृपें ॥ २ ॥
म्हणोनियां संतां जाऊनि शरण । साधावें निधान नाम ब्रह्म ॥ ३ ॥
नामदेव म्हणे संताचिया कृपें । माझीं नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

[ ६५४ ]

नांदतसे नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं घनदाट ॥ १ ॥
पाताळ फोडोनि किती आहे पुड । नाहीं आंत वाड नभ वरी ॥ २ ॥
चौऱ्यांशीं भोगिती दुर्मति पामर । नाहीं सारासार जाणत तें ॥ ३ ॥
नामदेव म्हणे नाम अविनाश । तेथें नाना वेष नाम सर्व ॥ ४ ॥

[ ६५५ ]

तरले तरतील हा भरंवसा । पुढती न येती गर्भवासा ॥ १ ॥
वाट सांपडली निकी । विठ्ठल नाम ज्याचे मुखीं ॥ २ ॥
तीर्थें इच्छिती चरणीचें । रज नामधारकाचें ॥ ३ ॥
प्रायश्चित्त सोडोनी प्रौढी । जाली दीन रूपें बापुडीं ॥ ४ ॥

---

अभंग ६५२ व ६५३—(धु.), ६५४—(आ.), ६५५—(पं.), (धु.) व (शि.)

१ हा अभंग काही प्रतींत पहिल्या चार चरणांपुरता वेगळा आढळतो—
भस्म तो होतसे आला जो आकारा । नासे प्रपंच सारा नाममय ॥ १ ॥
जाला अनुभव प्रपंचीच ब्रह्म । मना जाला निश्चय संतकृपें ॥ २ ॥

अनुक्रमणिका

ऋद्धी सिद्धी महाद्वारीं । मोक्ष बोळंगण करी ॥ ५ ॥
नामा म्हणे सुखनिधान । नाम पतित पावन ॥ ६ ॥

[६५६]

तीर्थ तपराशी जप हृषिकेशी । नाम अहर्निशीं रामराम ॥ १ ॥
तीर्थाचें पैं तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामें ॥ २ ॥
साधेल साधन तुटेल बंधन । वाचे जनार्दन सफळ सदा ॥ ३ ॥
नामा म्हणे हरी उच्चार तूं करी । उद्धरसी निर्धारीं इहलोकीं ॥ ४ ॥

[६५७]

तपें दानें व्रतें यज्ञाचिया कोडी । तुकितां जाली थोकडी हरिनामें ॥ १ ॥
न पुरे त्यांसी घातलीं त्रिभुवनींचीं तीर्थें । नयेचि पुरतें रामनामेंसी ॥ २ ॥
नाहीं या जीवांचें बोलणें शिवाचें । उपदेशिलें वाचे शक्तिप्रती ॥ ३ ॥
नाम नाहीं वाचे हाचि पैं निषेधु । विधी हा गोविंदु स्मरलिया ॥ ४ ॥
श्रेष्ठ सर्व नाम शिवाचें बोलणें । युक्ति अनुमानें न बोले कांहीं ॥ ५ ॥
नामेंचि भक्त ते पावले अपार । नामें पतित नर उद्धरले ॥ ६ ॥
नामें पशु गजेंद्राचा तो उद्धार । वाल्मिकें विचार हाचि केला ॥ ७ ॥
गगनीं ध्रुव केला अढळ नामें देखा । नामेंचि गणिका उद्धरली ॥ ८ ॥
नामें ते आपदा न बाधी प्रल्हादा । मुखीं नाम सदा उच्चारितां ॥ ९ ॥
कृपाळू नाम पैं मेघ हाचि सार । भीष्में युधिष्ठिरा उपदेशिलें ॥ १० ॥
हरिनामापरतें नाहीं विचारीतां । नवमाध्यायी गीता कृष्ण सांगे ॥ ११ ॥
सकल अमृत श्रीहरींचें नाम । त्यामाजीं उत्तम रामनाम ॥ १२ ॥
म्हणोनी सदाशिवें धरिलें मानसीं । हेंचि गिरिजेसी उपदेशिलें ॥ १३ ॥
तारक ब्रह्मंत्र रामनाम जाण । विश्वनाथ श्रवण करीतसे ॥ १४ ॥
कीर्तन श्रवण हेंचि पैं हो काशी । म्हणोनी मानसीं राम जपा ॥ १५ ॥
विरंची सकळ शास्त्र विचारितां । हरिनामापरता मंत्र नाहीं ॥ १६ ॥
कळिकाळा त्रास हरिनामकीर्तनें । पतितपावन प्राणी होय ॥ १७ ॥

अभंग ६५६ व ६५७—(पं.) व (शि.)



अनुक्रमणिका

कलियुगीं धर्म हरीचें हें नाम । म्हणोन शुकदेवें वाखाणिलें ॥ १८ ॥
नामयाचा स्वामी पंढरीचा रावो । रुखमाईचा नाहो गाऊं गीतीं ॥ १९ ॥

[६५८]

[1]चंद्रतारांगण नैऋति भास्कर । तटस्थ निर्धार ब्रह्मादिक ॥ १ ॥
ब्रह्मादि सकळ भजनीं तत्पर । तेव्हां हरिहर नाचतसे ॥ २ ॥
कृष्ण विष्णु नाम अच्युत अनंत । सगुण निश्चित स्मरा वेगीं ॥ ३ ॥
नामा म्हणे नको उदंड सायास । तोडी भवपाश रामनामें ॥ ४ ॥

[६५९]

सुखाचा सोहळा वाटतसे जीवा । भेटणें केशवालागीं आजी ॥ १ ॥
पाउलां पाउलीं याचिया वाटे । पताकांचे थाट दिसताती ॥ २ ॥
पैल तो कळसू पाहे पां साजणी । नामघोष कानीं पडतसे ॥ ३ ॥
नामा म्हणे नामीं पारणें जो करी । तयासि श्रीहरी उपेक्षिना ॥ ४ ॥

[६६०]

नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । ऐसें बोले वाणी वेदशास्त्रीं ॥ १ ॥
पहा विचारोनि अनुभव तो मनीं । नका आडरानीं झणीं भरो ॥ २ ॥
नामाविण कोणी तरले जे म्हणति । ते आधीं बुडती भवसागरीं ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम ॐकाराचें मूळ । ब्रह्म तें केवळ विटेवरी ॥ ४ ॥

[६६१]

कां करिसी सोस मायेचा असोस । नव्हे तुज सौरस नामेंविण ॥ १ ॥
नामचि हा मंत्र नामचि हो तंत्र । नामेंविण पवित्र न होसी देखा ॥ २ ॥
तिहीं लोकीं पाहतां नामेंविण सर्वथा । अच्युत म्हणतां पुण्य कोटी ॥ ३ ॥
नामा म्हणे ब्रह्म आदिअंतीं नेम । तें विटेवरी सम उभें असे ॥ ४ ॥

---

अभंग ६५८ व ६५९--(आ.), ६६०--(पं.) व (धु.), ६६१--(पं.) व (शि.)
१ चंद्रतारागण (बा.)

[६६२]

सार पैं सांगत उपनिषद तुम्हां । वाचे रामनामा जप करा ॥ १ ॥
हेंचि पैं मथित सांगोनियां गेले । उच्चारितां ठेले ब्रह्मरूप ॥ २ ॥
ज्योतिसी ते ज्योति भजन करील । आपणचि होईल हरी स्वयें ॥ ३ ॥
नामा म्हणे कैसें विपरीत करणें । भूतदया धरणें सर्वांभूतीं ॥ ४ ॥

[६६३]

अखंड मुखीं रामनाम । धन्य तयाचाचि जन्म ।
स्नान संध्येसी नेम । तो पुरुष महापवित्र ॥ १ ॥
धन्य धन्य तयाचा जन्म । रामार्पण अवघें कर्म ।
तोचि तरला हाचि नेम । रामकृष्ण उच्चारणीं ॥ २ ॥
अनंत जन्माचें सांकडें । तेणेंचि उगविलें कोडें ।
जप तप येणें नावडे । रामकृष्ण उच्चारणीं ॥ ३ ॥
नामा म्हणे नाममात्रें । अवघीं निवारलीं शस्त्रें ।
रामकृष्ण नाम वक्त्रें । उच्चारी तो धन्य ॥ ४ ॥

[६६४]

सहस्र दळांमधुन अनुहातध्वनि उठी । नामाचेनि गजरें पातकें रिघालीं कपाटीं ॥ १ ॥
जागा रे गोपाळांनों रामनामीं जागा । कळिकाळ एका नामें महादोष जाति भंगा ॥ २ ॥
दशमी एक व्रत दिंडीचें करा दर्शन । एकादशी उपवास तुम्ही करा जागरण ॥ ३ ॥
द्वादशी साधनें जळती पातकांच्या कोटी । नामा म्हणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ४ ॥

[६६५]

मायेचें भुररे रज तम सात्विक । रामनाम एक सोडवणें ॥ १ ॥
राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान । नामें घडती यज्ञ कोटी देखा ॥ २ ॥
न लगती साधन नाना मंत्राचा विवेक । रामनाम मुखें घेई कां रे ॥ ३ ॥
नामा म्हणे श्रीराम हेंचि वचन आम्हां । नित्य ते पौर्णिमा सोळा कळी ॥ ४ ॥

---

अभंग ६६२—(पं.) व (शि.), ६६३—(पं.), (धु.) व (शि.), ६६४—(आ.), ६६५—(पं.), (धु.) व (शि.)

अनुक्रमणिका

[ ६६६ ]

माझें मी करितां गेले हे दिवस । न धरीच विश्वास रामनामीं ॥ १ ॥
अंतीं तुज उद्धरती रामनाम हरी । राम पंचाक्षरी मंत्रसार ॥ २ ॥
कां करशील सांठा प्रपंच विस्तार । न तुटे वेरझार नामेंविण ॥ ३ ॥
नामा म्हणे कैसें रामनामीं पिसें । तो उद्धरेल अपैसे इहलोकीं ॥ ४ ॥

[ ६६७ ]

कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग । न लागे तुज उद्वेग करणें कांहीं ॥ १ ॥
समर्थ सोईरा राम हा निधान । जनीं जनार्दन एक ध्याई ॥ २ ॥
नामा म्हणे उच्चार रामकृष्ण सार । तुटेल वेरझार भवाब्धीची ॥ ३ ॥

[ ६६८ ]

स्मरण करितां रामनाम ध्वनी । ऐकतांची कर्णी पळती यम ॥ १ ॥
ऐसें पाठ करी रामनाम हरी । होतील कामारी ऋद्धिसिद्धि ॥ २ ॥
साध्य तेंचि साधी न करीं उपाधी । जन्मांतरीच्या व्याधि हरती नामें ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्व राम हाचि भाव । नाहीं आणिक देव रामेंविण ॥ ४ ॥

[ ६६९ ]

सर्वांभूतीं हरी आहे हेंचि साच । मायाजाळ न छळे भाविकांसी ॥ १ ॥
सर्व ब्रह्म ऐसें वेद बोले गाढा । ब्रह्मींचा पवाडा अगम्य तो ॥ २ ॥
जाणतां नेणतां हरीनाम उच्चार । मार्ग तो साचार सुफल सदा ॥ ३ ॥
नामा म्हणे कारण जिव्हा होय स्मरण । सर्व नारायण हरी दिसे ॥ ४ ॥

[ ६७० ]

जप तप अनुष्ठान हरी । एकचि तो नमस्कारी ।
भूतद्वेष कदा न करी । तप सामुग्री हेचि तुझी ॥ १ ॥

---

अभंग ६६६—(पं.) व (शि.), ६६७—(आ.), ६६८—(पं.) व (शि.), ६६९—(पं.) व (शि.), ६७०—(पं.), (शि.) व (भा.)

अनुक्रमणिका

हरी माधव यादवा । कृष्णा गोविंदा केशवा ।
येणें करोनियां जीवा । सर्वकाळ रंजवी ॥ २ ॥
स्मरतां हरीचें नाम । पळोनी जाति काळयम ।
तुटती नाना योनी जन्म । गर्भवासा मग नये ॥ ३ ॥
नामा जपे नामावळी । अखंड तप हेंचि सदाकाळीं ।
हरीनामें पिटोनि टाळी । हाचि तरणोपाय सकळांचा ॥ ४ ॥

[ ६७१ ]

सर्वकाळ हरी जप । हेंचि तपामाजीं तप ।
न लागती घालावे संकल्प । नाना मंत्राचे परियेसी ॥ १ ॥
मंत्रामाजीं मंत्रसार । रामकृष्ण हाचि उच्चार ।
नित्यानित्य निर्विकार । हाचि जोडेल साचा रे ॥ २ ॥
मागें कृतायुगीं सांगों । त्रेतायुगीं काय ओळगों ।
द्वापारीं कृष्णरंगे रंगो । परी कलीसाजी नामतारक ॥ ३ ॥
नामा म्हणे ग्रंथीं । पाहे पा यथा निगुती ।
नाम जपतांची तरती । हें व्यासाचें वचन ऐसें ॥ ४ ॥

[ ६७२ ]

नाम वाचे उच्चारितां । हरे संसाराची व्यथा ।
जाती दोषाचिया चळथा । रामकृष्ण उच्चारणीं ॥ १ ॥
हरी माधव गोविंद । याची नामाचा जया छंद ।
तोचि पावेल परमपद । निजभुवन वैकुंठीं ॥ २ ॥
जन्मजन्माची तपरासी । तेणें नाम आलें मुखासी ।
स्मरतां हरी हृषिकेशी । सकळ पूर्वजां उद्धार ॥ ३ ॥
नामा जपे ध्यानीं मनीं । अखंड विठ्ठल हरी कीर्तनीं ।
तेणें जपें ये मेदिनी । कोटी यज्ञ घडले ॥ ४ ॥

[ ६७३ ]

रूपाचें रूपस नाम हृषिकेश । पंढरी निवास जप करी ॥ १ ॥
विठ्ठल श्रीहरी मुकुंद श्रीहरी । नामेंचि बोहरी प्रपंचाची ॥ २ ॥

अभंग ६७१ ते ६७३—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

विठ्ठल नामामृत हेंचि जीवन होत । नाम हें मुखांत केशवाचें ॥ ३ ॥
नामा म्हणे देव अमृताचा लाठा । मुखामाजीं पेठा होत नामें ॥ ४ ॥

[ ६७४ ]

सर्वांग साजिरीं आहेती इंद्रियें । तंव सावध होय हरीकथे ॥ १ ॥
कीर्तन नर्तन वाचे जनार्दन । न पावसी पतन येरझारीं ॥ २ ॥
पूर्ण मनोरथ घडती एका नामें । दाटले सप्रेमें जीवन हेतु ॥ ३ ॥
नामा म्हणे विलास न करी तूं आणिक । सर्वी सर्वां येक नाम असे ॥ ४ ॥

[ ६७५ ]

ऐकतां कीर्तन होती जीवन्मुक्त । दाविसी अनंत नाममात्रें ॥ १ ॥
मृत्युलोकीं जो जन्म इच्छी नर । त्याच्या पुण्या पार कोण वाणी ॥ २ ॥
भक्तिसारामृत श्रेष्ठ कलियुगीं । उद्धरिले योगी ब्रह्मादिक ॥ ३ ॥
नामा म्हणे मज नाहीं चिंता भय । हृदयीं तुमचे पाय पुरे आतां ॥ ४ ॥

[ ६७६ ]

कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव । कोण तें वैभव वाणी आतां ॥ १ ॥
अंत्यज आणि जातिवंता । मुखीं नाम घेतां उडी घाली ॥ २ ॥
बैसोनी आसनीं आळवितां नाम । उभा सर्वोत्तम तयापुढें ॥ ३ ॥
प्रेमाचिया भरें उभ्यानें गर्जत । नाचे हा अनंत तयासवें ॥ ४ ॥
नामा म्हणे तया कीर्तनाची गोडी । घालीतसे उडी नेटपाटें ॥ ५ ॥

[ ६७७ ]

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंच नीच योनी हेंहि नसे ॥ १ ॥
धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥
कृपाळू कोंवसा सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥
नामा म्हणे फार सोपें हें साधन । वाचे नाम घेणें इतुकेंचि ॥ ४ ॥

अभंग ६७४—(पं.) व (शि.), ६७५ व ६७६—(आ.), ६७७—(धु.)

अनुक्रमणिका

[ ६७८ ]

गीता हेचि गंगा गुह्यभाव पैं गा । नाम हेचि [1]वेगा सोडवण ॥ १ ॥
सर्व ब्रह्म हरी सांगतसे मुरारी । विश्वरूप श्रीहरी आपण जाला ॥ २ ॥
उपदेश अर्जुना जनीं जनार्दना । अखंड भावना भूतदया ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्व आहे हाचि देव । उदार माधव सर्वांभूतीं ॥ ४ ॥

[ ६७९ ]

नामाचें चरित्र सदा अति गोड । तीर्थं काय चाड नाममात्रें ॥ १ ॥
ऐसा दृढ मनीं करावा विचार । नाम परिकर कलियुगीं ॥ २ ॥
नामा म्हणे नाम अनादि अक्षर । उभा कटीं कर भक्तांसाठीं ॥ ३ ॥

[ ६८० ]

नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम । नामरूप भिन्न नाहीं नाहीं ॥ १ ॥
देव आकारला नामरूपा आला । म्हणोनि स्थापिला नामवेदीं ॥ २ ॥
नामापरता मंत्र नाहीं हो आणिक । सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ भक्त भले ॥ ४ ॥

[ ६८१ ]

अनंत जन्में मेळवितां दुर्लभ । तो प्राणवल्लभ शंकराचा ॥ १ ॥
वेदशास्त्र मंथुनी काढियेलें सार । ब्रह्मादिकां पार रामनामें ॥ २ ॥
स्वर्गींचे देव चिंतिताती मानसीं । [2]भेटी आम्हां कैंसी पांडुरंगीं ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवाचें नाम उच्चारितां । विघ्नासी भंगिता नवल काय ॥ ४ ॥

[ ६८२ ]

विठ्ठलाचें नाम जे माऊलिचे ओठीं । विठो तिचें पोटीं गर्भवासी ॥ १ ॥
जयाचिये कुळीं पंढरीची वारी । विठो त्याचे घरीं बाळलीळा ॥ २ ॥
नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । असत्य केशवा वचन होतां ॥ ३ ॥

---

अभंग ६७८ व ६७९—(पं.) व (शि.), ६८०—(पं.) (धु.) व (शि.), ६८१—(पं.) व (शि.), ६८२—(पं.) व (शि.)

१ जगा (पं. व शि.) २ क्षणीं भेटी येई (आ.)

[ ६८३ ]

अनंत ब्रह्मांडें व्यापक तें नाम । अनादि निष्काम विश्वंभर ॥ १ ॥
तोचि कृष्ण परब्रह्म द्वारकेसी । पांडवां मानसीं ठसावला ॥ २ ॥
ठसावला तोचि पाहावा अनुभव । पांचालागीं ठाव मग कैसा ॥ ३ ॥
नामा म्हणे देव संपूर्ण आघवा । तयाचिया गांवा सींव नाहीं ॥ ४ ॥

[ ६८४ ]

ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नांवा । मग जावें गांवा तयाचिया ॥ १ ॥
या नामाचें मूळ त्या माजीं जो धाला । प्रपंच्याचा घाला मग नाहीं ॥ २ ॥
नाम गावें प्रपंच सर्व आहे नाम । ब्रह्मानंदें प्रेम घनदाट ॥ ३ ॥
नामदेव म्हणे नंदाचिया घरीं । होता एक हरि दुजें नाम ॥ ४ ॥

[ ६८५ ]

साधनांत सोपें नाम हें केवळ । याविण सकळ शीण वायां ॥ १ ॥
धरा रे धरा नाम विठोबाचें । तेणें अज्ञानाचें मूळ नासे ॥ २ ॥
नाम तारी फार पुराणीं वर्णिलें । नामचि केवळ आत्मसत्ता ॥ ३ ॥
नामा म्हणे नामीं रंगला सुरंग । अंगें स्वयमेव पांडुरंग ॥ ४ ॥

[ ६८६ ]

एकटी येकला सर्व हें सकळां । आपणची जाला विश्वहरी ॥ १ ॥
न कळे याची माव कैसा आहे भाव । सर्वभूतीं देव गीता सांगे ॥ २ ॥
भूतदया धरा भजावें श्रीधरा । नामा एक स्मरा विठ्ठल ऐसें ॥ ३ ॥
नामा म्हणे देव पंढरी पाटणीं । पावेल निर्वाणीं नाम घेतां ॥ ४ ॥

[ ६८७ ]

जीव शिव ग्रामीं मीतूंपण पाही । हा गौरव कांहीं नाहीं नामीं ॥ १ ॥
नाहीं चतुर्देह तूर्या हे उन्मनी । स्वयंभु ते खाणी निजनामाची ॥ २ ॥
नामीं जडे चित्त तेथें काय उणें । लज्जित साधनें नाना जहालीं ॥ ३ ॥
नामदेव म्हणे मीतूंपण नाहीं । नाहीं आन कांहीं सर्व तेंची ॥ ४ ॥

---

अभंग ६८३ व ६८४—(धु.), ६८५—(आ.), ६८६—(शि.), ६८७—(धु.)

अनुक्रमणिका

[६८८]

पवित्र परिकर नाम हा उच्चार । उद्धरण साचार जगायया ॥ १ ॥
गोविंद केशव उच्चार श्रीराम । न लगती नेम अमूप जप ॥ २ ॥
तें हें विठ्ठलरूप पिकलें पंढरीं । नाम चराचरीं विठ्ठल ऐसें ॥ ३ ॥
नामा म्हणे विठ्ठल सर्वांत सखोल । उच्चारितां मोल नलगे तुज ॥ ४ ॥

[६८९]

आकारिक नाम जीवानें ठेविलें । शिवानें तें केलें [1]निर्विकल्प ॥ १ ॥
जीव शिव दोन्ही विराले ज्यामाजीं । तें नाम सहजीं आद्य आहे ॥ २ ॥
तया नामाविण जावयासी ठाव । नाहीं दुजा भाव तिळभरी ॥ ३ ॥
नामदेव म्हणे नाम घनदाट । प्रपंच निघोट [2]नामापरी ॥ ४ ॥

[६९०]

कृष्णनाम श्रेष्ठ गाती देव ऋषी । नाम अर्हनिशीं गोपाळाचें ॥ १ ॥
हरी हरी हरी तूंचि बा श्रीहरी । वसे चराचरीं जनार्दन ॥ २ ॥
आदि ब्रह्मा हरि आळवी त्रिपुरारी । उमेप्रति करी उपदेश ॥ ३ ॥
नामा म्हणे ब्रह्म हा जप उत्तम । शंकरासी नेम दिननिशीं ॥ ४ ॥

[६९१]

भजन करा रे हरिहरा । नारायण शिवशंकरा ।
माझें बोलणें हें अवधारा । भेद न करा दोघांचा ॥ १ ॥
तुम्हां सांगेन सत्य वृत्तान्त । पाहें पां तेथींचा दृष्टान्त ।
नारायणें सेविलें अमृत । जाला श्वेत महादेव ॥ २ ॥
शंभूनें गिळिलें हलाहला । म्हणोनि विष्णु जाला निळा ।
देखत देख आंधळा । क्षणीं होसी गव्हरा ॥ ३ ॥
लक्ष्मी रूपें आपण हरू । देवें वरिला शारंगधरू ।
गरूडरूपें महेश्वरू । वहन जाला विष्णूचें ॥ ४ ॥

अभंग ६८८—(पं.) व (शि.), ६८९—(धु.), ६९० व ६९१—(पं.) व (शि.)
१ निर्विकार (धु.) २ नामा करी (धु.)

अनुक्रमणिका

शक्तिरूपें शारंगपाणि । नारायण जाला भवानी ।
शारंगधर नंदी होऊनि । सन्मुखासनीं बैसला ॥ ५ ॥
एक तो एक वेगळा नाहीं । दृष्टान्त तूं आगमीं पाहीं ।
नामा म्हणे एक केशव ध्यायीं । हरिहर पाहीं ज्याचे अवतार ॥ ६ ॥

[६९२]

म्हणतां नाम वाचे वैकुंठ जवळी । नित्य वनमाळी भक्तांसंगें ॥ १ ॥
होईल साधन विठ्ठलीं परिपूर्ण । निवती नयन मूर्ति पाहतां ॥ २ ॥
शंखचक्रांकित आयुधें शोभती । भाग्योदयीं दिसती भावशीळा ॥ ३ ॥
नामा म्हणे तें रूप पंढरीचें आहे । न सांडी ते सोय केशवाची ॥ ४ ॥

[६९३]

आपुली पदवी सेवकासी द्यावी । तो एक गोसावी [1]पांडुरंग ॥ १ ॥
भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥ २ ॥
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां दीनांचे माहेर । [2]तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

[६९४]

सोयरा सुखाचा विसावा भक्तांचा । विठोबा [3]निजाचा मायबाप ॥ १ ॥
कृपाळु दीनाचा बडिवार नामाचा । तोडर ब्रीदाचा [4]साजे तया ॥ २ ॥
काया मनें वाचा संग धरा त्याचा । अनंत जन्माचा हरेल शीण ॥ ३ ॥
[5]नामा म्हणे विठो अनाथा कुवासा । तारिल भरंवसा आहे मज ॥ ४ ॥

[६९५]

देव दयानिधि भक्तांचा कैवारी । नाममात्रें तारी सर्वांलागीं ॥ १ ॥
तया देवराया गावें हो आवडी । लागे मनीं गोडी सर्वकाळ ॥ २ ॥

---

अभंग ६९२––(पं.) व (शि.), ६९३––(पं.), (धु.) व (गं.), ६९४––(पं.), (शि.), (धु.) व (आ.), ६९५––(आ.)

१ रामराया (धु.) २ हृदयीं निरंतर न विसंबे (धु.) ३ निदानींचा (धु.) ४ साच तया (आ.), शोभतसे (पं. व धु.), साजे पाई (धु.) ५ नामा म्हणे न करा जाणिवेचा सीण। मन्ताची हे खूण जाणति सन्त ॥ ४ ॥ (धु.), नामा म्हणे आम्हां दीनांचे माहेर। हरी निरंतर न विसंबे ॥ ४ ॥ (आ.)

नाहीं यातिकूळ उंच नीच भेद। भाव एक शुद्ध पाहातसे ॥ ३ ॥
नामा म्हणे काय सांगावें नवल । अखंड दंडलें व्योमाकार ॥ ४ ॥

[६९६]

नाम फुकाचें चोखट । नाम घेतां नलगे कष्ट ॥ १ ॥
[1]पडशील ज्या सागरीं । रामनामें आत्मा तारी ॥ २ ॥
पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥
नामा हें महिमान जाण । घेतो विठ्ठलाची आण ॥ ४ ॥

[६९७]

साधावया स्वरूपसिद्धी । सिद्ध साधक समाधी ।
बैसोनी ध्यानबुद्धी । परी तो हरी न सांपडे ॥ १ ॥
धन्य धन्य वैष्णव संग । अखंड तेथें पांडुरंग ।
कीर्तनीं नाचतसे अभंग । अखंड काळ सर्वदा ॥ २ ॥
नाम घेतां धांवे विठ्ठल । नलगे तप नलगे मोल ।
कष्ट न लगती बहुसाल । हा कृपाळु दीनाचा ॥ ३ ॥
नामा म्हणे भक्तीचें कारण । भक्तीसी तुष्टे नारायण ।
याचें करितां कीर्तन । आपेंआप तुष्टेल ॥ ४ ॥

[६९८]

दया हेचि दाता मन करी उदार । सर्व हा श्रीधर ऐसें भावी ॥ १ ॥
तुटेल यातना होईल वैकुंठ । पंढरी [2]मूळपेठ सेवी कां रे ॥ २ ॥
इच्छिती अमर नित्य काळ नेमें । दाटताति प्रेमें सनकादिक ॥ ३ ॥
तें हें विठ्ठलनाम पवित्र चोखडें । अंतरीं माजिवडे नित्य करी ॥ ४ ॥
होतील कामारि ऋद्धिसिद्धी अपार । आपण श्रीधर कुरवाळील ॥ ५ ॥
नामा म्हणे येथें न लगेची मोल । विठ्ठल निमोल सर्वांभूतीं ॥ ६ ॥

---

अभंग ६९६--(आ.), ६९७--(पं.) व (शि.), ६९८--(पं.), (शि.) व (आ.)
१ पडसी भवाच्या (बा.) २ मूळ पीठ (आ.)

अनुक्रमणिका

[६९९]

पोसिशी शरीर इंद्रियांचा बांधा । सेखीं ते आपदा करील तुज ॥ १ ॥
नव्हे तुझें हित विषय पोषितां । हरी हरी म्हणतां उद्धरसी ॥ २ ॥
वायांच पाल्हाळ चरित्र सांगसी । परी राम हें न म्हणसी अरे मूढा ॥ ३ ॥
नामा म्हणे [1]हेंचि पंढरीये निधान । उच्चारितां जन तरले ऐसें ॥ ४ ॥

[७००]

कां करिसी हव्यास इंद्रियांचा सोस । वायां कासावीस कोण्या काजें ॥ १ ॥
सर्व ही लटिकें माया मोहबंधन । सत्य हें निधान विठ्ठल एक ॥ २ ॥
उगवेल प्रपंच सर्व हें आहाचें । रामकृष्ण वाचे बांध जिव्हें ॥ ३ ॥
नामा म्हणे करणी करावी पें ऐसी । जेणें त्या विठ्ठलासी पाविजेसा ॥ ४ ॥

[७०१]

नामाचा महिमा कोण करी सीमा । जपा श्रीरामा एक्याभावें ॥ १ ॥
न लगती स्तोत्र नाना मंत्र तंत्रें । वर्णिजें वक्त्रें श्रीराम नाम ॥ २ ॥
अनंत पुण्यरासी घडे ज्या प्राण्यासी । तरीच मुखासी नाम येत ॥ ३ ॥
नामा म्हणे राम हा जप परम । तो देह उत्तम मृत्युलोकीं ॥ ४ ॥

[७०२]

कासवीचे दृष्टीं जें होईजे भेटी । तें अमृताची सृष्टी घडे त्यासी ॥ १ ॥
तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान । वाचे नारायण अमृतमय ॥ २ ॥
धन्य त्याचें कुळ सदा पैं सकळ । दिननिशीं पळ रामनाम ॥ ३ ॥
नामा म्हणे चोखडा भक्त तो उत्तम । वाचेसी सुगम रामनाम ॥ ४ ॥

[७०३]

मी माझें भावितां न फिटे हें ओझें । कर्मकाण्ड दुजें आड येत ॥ १ ॥
न तुटे हें कर्म न चले हा धर्म । सर्वत्र हें ब्रह्म न कळे तया ॥ २ ॥

अभंग ६९९ व ७००—(पं.) व (शि.), ७०१—(पं.), (शि.) व (धु.), ७०२—(आ.), ७०३—(पं.) व (शि.)

१ 'हेंचि' आणि 'पंढरीये' ह्या दोन शब्दांच्यामध्ये 'पूर्ण' हा शब्द (पं.) प्रतीत अधिक आढळतो.

मी माझें हें ओझें अहंताची वाहे । परतोनी न पाहे मी कवण ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम स्मरे त्या कृष्णाचें । भय कळिकाळाचें नाहीं नाहीं ॥ ४ ॥[1]

[७०४]

उपदेश विव्हळ न कळे याचा अर्थ । वायांची हा स्वार्थ प्रपंचाचा ॥ १ ॥
सांडी हा प्रपंच मिथ्या लवलाहो । विठ्ठल हा टाहो नित्य करी ॥ २ ॥
हरी हरी भजन भज दयाशीळ । होसील [2]निर्मळ ब्रह्मरूप ॥ ३ ॥
सर्व हा आकार हरीचें शरीर । मायेचा विकार भुलों नका ॥ ४ ॥
आप तेजीं ब्रह्म हरी माझा सम । आदि अंतीं नेम विठ्ठल हरी ॥ ५ ॥
नामा म्हणे उपमा काय द्यावी यासी । नाम तारी सर्वांसी कलिमाजीं ॥ ६ ॥

[७०५]

धिग् तो ग्राम धिग् तो आश्रम । संत समागम नाहीं जेथें ॥ १ ॥
धिग् ते संपत्ति धिग् ते संतति । भजन सर्वांभूतीं नाहीं जेथें ॥ २ ॥[3]
धिग् तो आचार धिग् तो विचार । वाचे सर्वेश्वर नाहीं जेथें ॥ ३ ॥
धिग् तो वक्ता धिग् तो श्रोता । पांडुरंगकथा नाहीं जेथें ॥ ४ ॥[4]
धिग् तें गाणें धिग् तें [5]पढणें । विठ्ठल नाम वाणें नाहीं जेथें ॥ ५ ॥
नामा म्हणे धिग् धिग् त्यांचें जिणें । [6]एका नारायणें वांचूनिया ॥ ६ ॥[7]

[७०६]

सुख तें आपुलें चोरांशीं वांटिलें । पालटें घेतलें दुःख त्यांचें ॥ १ ॥
नित्य नवी त्याची सोसितां सोसिणा । नयेचि तुज अज्ञोनी वीट मना ॥ २ ॥
ऐसा तूं निर्लज्ज पाहे आत्मघातीं । कैसी तुझी खंती न वाटे तुज ॥ ३ ॥
लक्ष या चोऱ्यांशीं सोसितां यातना । भोगिसी पतना ज्यांच्या संगें ॥ ४ ॥

---

अभंग ७०४—(पं.) व (शि.), ७०५—(पं.), (धु.) व (शि.), ७०६—(पं.) व (शि.)
१ काही प्रतींत चौथा चरण आढळत नाही. २ निखळ (शि. व पं.) ३ (धु.) व (पं.) प्रतींत दुसरे कडवे नाही. ४ नामा म्हणे असावें भलते व्यापारीं । परी ते लक्ष परमेश्वरीं असों द्यावें ॥ ४ ॥ ५ नाचणें (धु.) ६ पंढरीनाथ जेणें देखिला नाहीं (धु.) ७ धिग् धिग् तें दान । धिग् धिग् तें पुण्य । नाही जो चिंतन । विठोबाचें ॥ ३ ॥ (पा.) प्रतीत हा चरण जास्त आहे.

त्यांतें [1]भजसी सांग पुढती कोण्या मोहें । विचारूनि पाहे तुझा तूंचि ॥ ५ ॥
सदा चितातुर होऊनि दीनरूप । संकल्प विकल्प करिसी किती ॥ ६ ॥
नाथिलाची छंदु नाहींत्या दुराशा । भोंवसी दाही दिशा तळमळीत ॥ ७ ॥
त्यांची इंद्रियें बापुडीं असती केविलवाणीं । विषया लागोनी लोलंगिती ॥ ८ ॥
[2]तूं हे आशा करिसी निरंतरीं । जालासी भिकारी कृपणाचा ॥ ९ ॥
आलें काळभय हाकीत टाकीत । मूढा तुझें हित कोण करी ॥ १० ॥
त्रिभुवनीं समर्थ बळी जगजेठी । रिघें त्याचे पाठीं म्हणे नामा ॥ ११ ॥

[ ७०७ ]

अभ्यासिले वेद जाला शास्त्रबोध । साधिल्या [3]विविध नाना कळा ॥ १ ॥
प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं । [4]तंव कैसा श्रीहरि करील कृपा ॥ २ ॥
हित ते [5]आचरा हित ते विचारा । नामीं भाव धरा जाणतेनों ॥ ३ ॥
प्रसंगीं पुराणें ऐकिलीं श्रवणीं । त्यांतील कोण मनीं धरील अर्थ ॥ ४ ॥
काय तें सांडिलें काय तें मांडिलें । काय तें दंडविलें प्रवृत्तीसी ॥ ५ ॥
अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं । यांतील कोण ध्यानीं प्रतिबिंबली ॥ ६ ॥[6]
स्वप्नींचिया परी देखसी अभ्यास । न धरीच विश्वास चित्त तुझें ॥ ७ ॥
वांझेचिये स्तनीं अमृताची धणी । मृगजळ पाणी तान्हा बोले ॥ ८ ॥
तरी प्रेमेंविण कळती क्रियाकर्में । हातीं येतीं वर्में विठोबाचीं ॥ ९ ॥
दृष्टीचें देखणें श्रवणीचें ऐकणें । मनाचें बैसणें एक होय ॥ १० ॥
नामा म्हणे तरी विठो येऊनि भेटे । कायाच पालटे कैवल्य होय ॥ ११ ॥

[ ७०८ ]

नामामृत गोडी आहे वैष्णवासी । येरां प्राकृतासी कळेनाची ॥ १ ॥
प्राकृत हे जन भुलले विषयीं । नामाचिया गांवीं कैसे जाती ॥ २ ॥

---

अभंग ७०७—(पं.), (धु.), (शि.) व (गं.), ७०८—(धु.)
१ भजसी स्वयें (पं.) २ त्याची आशा थोर करिसी निरंतरीं । (पं.) व (शि.)
३ विद्गद (शि. व धु.), वित्पत्ति (धु.) ४ तो हा श्रीहरी पाविजे कैसा (धु.) ५ करा (धु.)
६ (शि.) प्रतीत अभंग ७ चरणी आहे. पैकी १, २, ३, ४ सर्वांप्रमाणे. नंतर पुढचे तीन चरण खालीलप्रमाणे—

अनंत नाम उच्चारिसील वदनीं । त्यांत कोणता मनीं नेम धरिला ॥ ५ ॥
अनंत तीर्थी देह सुस्नात केलासी । निष्पाप जालासी कोठें ठाई ॥ ६ ॥
नामा म्हणे विश्वासतां विठो भेटे । कावल पालटे कैवल्य होय ॥ ७ ॥

तसेच (शि.) मधील सातवे कडवे (गं.) प्रतीतही आढळते.

नामीं चित्त व्हावें जावें तेव्हां गांवा । मग नाम गोवा तेथें कैंचा ॥ ३ ॥
नाम तेंचि जाहालें वर्णरूपातीत । अनाम स्वतंत्र स्वयंभ तो ॥ ४ ॥
नामदेव म्हणे नाम हें सुलभ । अभक्ता दुर्लभ नानापरी ॥ ५ ॥

[७०९]

अवघिया आचार निष्ठा । [1]चित्त जरी [2]जाय वैकुंठा ।
तरीच निस्तरिलें कष्टां । भवपाशापासोनी ॥ १ ॥
धन्य धन्य चित्तवृत्ति । विठ्ठल भक्तीसी पुढत पुढती ।
त्याचे पूर्वज उद्धरती । गीत गाती रामकृष्ण ॥ २ ॥
हेंचि जप तप ध्यान । हरी चरणीं ठेवूनि मन ।
साधले कार्याचें कारण । रामकृष्ण उच्चारणीं ॥ ३ ॥
नामा जपे ठेऊनि चित्त । अखंड चरणीं जाला रत ।
पुरले आमचे मनोरथ । सर्व कृतार्थ पैं जालों ॥ ४ ॥

[७१०]

सर्वांमाजीं सार नाम हें देवाचें । सर्व साधनांचें सार जें कां ॥ १ ॥
चार साहा आणिक आठरा वर्णिती । नामें निजप्राप्ती अर्धक्षणीं ॥ २ ॥
व्यासादिक नाम साधियलें दृढ । प्रपंच काबाड निरसेल ॥ ३ ॥
नामदेव म्हणे निजधाम ब्रह्म । घेतां नेम धर्म सर्व साधे ॥ ४ ॥

[७११]

मन करी आपुलें वासना ते वारी । सर्व हेंचि हरी भजत जाय ॥ १ ॥
ब्रह्मनाम गोविंद नाहीं भेदाभेद । तुटे भवबंध हरी नामें ॥ २ ॥
सांडी लगबग न करी तूं आळस । विठ्ठलीं विश्वास असों देणें ॥ ३ ॥
नामा म्हणे ब्रह्म हेंचि निरूपण । सर्व काम पूर्ण याच्या नामें ॥ ४ ॥

[७१२]

व्रत तप दान हवन पूजन । न लगे साधन नाम म्हणतां ॥ १ ॥
रामकृष्ण हरी मुकुंद मुरारी । [3]जिव्हे क्षणभरी न विसंबें ॥ २ ॥

---

अभंग ७०९—(पं.) व (शि.), ७१०—(आ.), ७११ व ७१२—(पं.) व (शि.)
१ चित्तीं (पं. व शि.) २ भजावें (पं. व शि.) ३ जीवें (पं.)



अनुक्रमणिका

कळिकाळ दारुण करीतसे विघ्न । परजी नारायण नाम जिव्हें ॥ ३ ॥
शरण [1]आलों जिव्हे तुवां नुपेक्षावें । नामा म्हणे [2]गावों हरिनाम ॥ ४ ॥

[७१३]

नित्य सर्वगत अखंड सगुण । केशवाचें ध्यान करी ब्रह्म ॥ १ ॥
ब्रह्मा सर्वकाळ सांगे साधूपाशीं । आणिक हे शेषीं तेंचि मानी ॥ २ ॥
मनीं जो मानसीं नामामृत सार । सेविती सादर नामा म्हणे ॥ ३ ॥

[७१४]

नामाचा धारक विष्णुरूप देख । वैकुंठीचें सुख रुळे पायीं ॥ १ ॥
निराकार देव आकारासी आला । भक्तीं पैं स्थापिला नामरूपा ॥ २ ॥
नाममंत्र बीज जोंवरी नाहीं जया । तोंवरी केशवदया नाहीं प्राप्त ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ हरीभक्त ॥ ४ ॥

[७१५]

सदा पैं परिपूर्ण जयाचें रूपडें । तेथेंचि माजीवडे मन करी ॥ १ ॥
होईल उद्धार सुटेल संसार । सर्व मायापूर दुरी होय ॥ २ ॥
कांठाळा कायेचा दुरावा मायेचा । हेंचि जप वाचा स्मरे नाम ॥ ३ ॥
नामा म्हणे करी सर्व हरी हरी । राम हें उत्तरीं वाखाणी पां ॥ ४ ॥

[७१६]

रकार मकार बांधी कां रे तुळीं । तापत्रय होळी होऊनि जाय ॥ १ ॥
गोविंद मुकुंद हरि परमानंद । कृष्ण केशव छंद नित्य वाचे ॥ २ ॥
जपे जगद्बंधु हरिकथा छंदू । बिघडे भवबंधु येणें मात्रें ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा न करी निर्वाण । माझा अभिमान आहे त्यासी ॥ ४ ॥

[७१७]

जन्माचें कारण रामनाम पाठें । जाईजें वैकुंठें एक हेळां ॥ १ ॥
रामनाम ऐसा जिव्हे उमटे ठसा । तो उद्धरेल अपैसा इहलोकीं ॥ २ ॥

अभंग ७१३—(आ.), ७१४ ते ७१७—(पं.) व (शि.)
१ आले (पं.) २ गावें (पं.)

अनुक्रमणिका

दो अक्षरीं राम हा जप परम । नलगे तुज नेम नाना पंथ ॥ ३ ॥
नामा म्हणे पवित्र श्रीरामाचें चरित्र । उद्धरसि गोत्र पूर्वजेंसी ॥ ४ ॥

[७१८]

गोविंद गोपाळ वाचेसि निखळ । तो उद्धरे तात्काळ कलिमाजीं ॥ १ ॥
नारायण नारायण हेंचि पारायण । उद्धरले जन इहलोकीं ॥ २ ॥
तुटती यातना कर्माच्या भावना । जड जीव उद्धरणा नाम स्मरा ॥ ३ ॥
नामा म्हणे राम हा जप परम । न लगती नेम नानाकोटी ॥ ४ ॥

[७१९]

शंभु उपदेशी भवानीसी । रामनाम जपे मानसीं ॥ १ ॥
दोन्हीं अक्षरें रसाळें । महा पातकां करी निराळें ॥ २ ॥
बीजमंत्र रामनाम । फळ शतकोटी रामायण ॥ ३ ॥
नामा विनवितो रघुनंदना । विनती परिसा दशरथनंदना ॥ ४ ॥

[७२०]

संसार पाल्हाळ [1]सांगसी परिकर । नाम तें श्रीधर न म्हणसी ॥ १ ॥
कैसें तुज उद्धरण होईल गव्हारा । भजन त्या हरीहरा करी वेगीं ॥ २ ॥
योनी नानाविधा पावसी आपदा । हाचि खेळ सदा स्मरतोसि ॥ ३ ॥
नामा म्हणे लटिकें प्रपंचासी मुके । राम हेंचि मुखें जप करी ॥ ४ ॥

[७२१]

नामावांचूनि कांहीं दुजें येथें नाहीं । वेगीं लवलाही राम जपा ॥ १ ॥
गोविंद गोपाळ वाचेसी [2]रसाळ । पावसी केवळ निजपद ॥ २ ॥
ध्रुव प्रल्हाद बळी अंबऋषि प्रबुद्ध । नामेंचि विदुगद पावले देखा ॥ ३ ॥
नामा म्हणे राम वाचे जया नाम । संसाराचे श्रम हरे नामें ॥ ४ ॥

[७२२]

गाणें गाती रे सुगडें । तया हांसति दुधडें ॥ १ ॥
नाम गोड नाम गोड । होय जन्माचा निवाड ॥ २ ॥

---

अभंग ७१८ ते ७२२—(पं.) व (शि.)
१ सागरीं (पं.) २ सरळ (शि. व पं.)

हांसे त्यासी हांसूं द्यावें । गात आपण असावें ॥ ३ ॥
नामा म्हणे जे हांसती । त्यांचीं कुळें नरका जाती ॥ ४ ॥

[७२३]

नाम एकचि तारक । रामनामें शुद्ध [1]मुख ।
येणें उद्धरती तिन्ही लोक । कुळांसहित वैकुंठ ॥ १ ॥
धन्य धन्य तें कुळ । रामनामें नित्य निर्मळ ।
जो उच्चारी सर्वकाळ । धन्य जन्म तयाचा ॥ २ ॥
एक हरी एक तत्त्व । तेथें धरोनियां शुद्ध सत्त्व ।
नाना काय करिसी कवित्व । राम नाम उच्चारी ॥ ३ ॥
नामा जपे नाम मंत्र । हातीं न घे आणिक शस्त्र ।
रामकृष्ण हें वक्त्र । उच्चार इतुकेचि पुरे आम्हां ॥ ४ ॥

[७२४]

तूं तंव नेणता परी हरि जाणता । [2]आहे तो समता सर्वांभूतीं ॥ १ ॥
सर्व ब्रह्म हरी येकचि निर्धार । होसील झडकरी ब्रह्म तूंचि ॥ २ ॥
अच्युत माधव अमृताच्या पाठें । लागतांचि वाटे वंदी यम ॥ ३ ॥
नामा म्हणे [3]होसील जिवलग विष्णूचा । दास त्या हरीचा आवडता ॥ ४ ॥

[७२५]

न लगती कथा व्युत्पत्ति उलथा । वाउग्या चळथा ग्रंथाचिया ॥ १ ॥
हरि हरि भजन जनीं जनार्दन । सर्वत्रीं समान भूतदया ॥ २ ॥
भावेंचि भजावें हरीतें पूजावें । नित्य हें सेवावें रामनाम ॥ ३ ॥
नामा म्हणे गोड नको तें हें वाड । विठ्ठलाचें वेड इतुकें पुरे ॥ ४ ॥

[७२६]

मंत्राचा पैं मंत्र [4]हरी हरी उच्चार । न लागे तो विचार करणें कांहीं ॥ १ ॥
सुफळ नाम गाढें वाचेसि उच्चारूं । केशव हाचि करूं सर्वांभूतीं ॥ २ ॥

---

अभंग ७२३—(पं.) व (शि.), ७२४—(पं.), (शि.) व (धु.), ७२५ व ७२६—(पं.) व (शि.)

१ सुख (शि. व पं.) २ कासया विषमता (धु.) ३ होसील श्री हरिचा जिवलग । (धु.)
४ हरिहर (पं.)

अनुक्रमणिका

नाहीं यासी पतन न होईल बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामें ॥ ३ ॥
नामा म्हणे भाव सर्वांभूतीं करा । आणिक पसारा घालूं नका ॥ ४ ॥

[७२७]

नाचतां उडतां रडतां पडतां । नाम्या अवचितां हातां आला ॥ १ ॥
येतां जातां हरि हरि हरि वाटे । नाम तें चोखटें स्मरा मुखीं ॥ २ ॥
हंसतां खेळतां घरीं दारीं पारीं । मुखीं हरि हरि म्हणे कां रे ॥ ३ ॥
खातां जेवितां अन्नतृप्ति सारी । सांडी मांडी हरी सर्व काळ ॥ ४ ॥
नामा म्हणे नामीं आस्ति नास्ति ठसा । केशव हरि सन्मुख तुम्हां दिसे ॥ ५ ॥

[७२८]

करितां हरिकथा नाम सुखरासी । उद्धार जीवाशीं एका नामें ॥ १ ॥
तें हें रामनाम जप तूं सप्रेम । जप हा सुगम सुफळ सदा ॥ २ ॥
[1]नामेंचि तरले नामेंचि तरले । नाम म्हणतां गेले वैकुंठासी ॥ ३ ॥
नामा म्हणे एक नामेंसी विनटे । ते वैकुंठीचे पेठे पावले देखा ॥ ४ ॥

[७२९]

हरिविण देह मळीण सर्वथा । मंगळाची कथा रामकृष्ण ॥ १ ॥
कथा करी कोणी ऐकती जे जन । वैकुंठभुवन हातां आलें ॥ २ ॥
वेदशास्त्रां सार नामाचा उच्चार । अंतीं पैल पार दाखवितो ॥ ३ ॥
जन्मोनियां जगीं अलिप्त असावें । नाम तें स्मरावें म्हणे नामा ॥ ४ ॥

[७३०]

विष्णुनाम श्रेष्ठ गाताती देवऋषी । नाम अर्हनिशीं गोपाळाचें ॥ १ ॥
हरि हरि हरि तूंचि वा श्रीहरी । वसे चराचरीं जनार्दन ॥ २ ॥
आदि ब्रह्म हरी आळवी त्रिपुरारी । उमेप्रती करी उपदेश ॥ ३ ॥
नामा म्हणे पूर्ण हा जप उत्तम । शंकरासी नेम दिननिशीं ॥ ४ ॥

अभंग ७२७—(आ.), ७२८—(बा.), (पं.) व (शि.), ७२९—(आ.), ७३०—(पं.)
१ नामेंचि पावले (बा.)

अनुक्रमणिका

[ ७३१ ]

सर्वकाळ पुण्याच्या राशी । हरिनाम आलिया जिव्हेसी ।
नित्य तप अनुष्ठानाच्या राशी । कोटी यज्ञासी लाभ जाला ॥ १ ॥
धन्य धन्य त्याचा वंश । जे जे रतले नामास ।
रामनामीं नित्य सौरस । ते विष्णुदास पवित्र ॥ २ ॥
पवित्र ते स्वधर्मी । ज्यांसी सर्वकाळ नामीं ।
तयाचें नाम पूर्णकामी । मनोरथ पुरतील ॥ ३ ॥
नामा जपे नाम हरीचें । सार्थक केलें संसाराचें ।
ओझें फेडिलें पूर्वजन्माचें । हरीस्मरण केलिया ॥ ४ ॥

[ ७३२ ]

नामीं नारायण । होय भक्तांचे आधीन ॥ १ ॥
न मागतां भक्ति । नामापासीं चारी मुक्ती ॥ २ ॥
भुलों नये जाण । नाम वैकुंठी निशाण ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे प्राणी । सम होती नारायणीं ॥ ४ ॥

[ ७३३ ]

सदा फळ सुफळ वाचेसी गोपाळ । वंदी कळिकाळ शास्त्र सांगे ॥ १ ॥
ब्रह्मांडनायक ऐसें जें कवतुक । तेंचि नाम एक श्रीकृष्ण ऐसें ॥ २ ॥
आदी अंत पाहतां नाहीं पैं सर्वथा । परिपूर्ण सरिता अमृताची ॥ ३ ॥
नामा म्हणे कां करिसी संकेत । [1]उद्धरिले पतित युगायुगीं ॥ ४ ॥

[ ७३४ ]

आतां आहे नाहीं पाहतां क्षण एक । [2]संपत्तीचें सुख विषय हा ॥ १ ॥
हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥ २ ॥
संपत्तीच्या बळें एक जाले आंधळे । वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं ॥ ३ ॥

---

अभंग ७३१—(आ.), ७३२—(धु.), ७३३—(पं.), (शि.) व (धु.), ७३४—(पं.), (धु.) व (शि.)

१ हा उद्धरे (धु.) २ स्वप्नीचे हे लेख विषय सुख । (धु.)

अनुक्रमणिका

एक. विद्यावंत जातीच्या अभिमानें । नेले तमोगुणें रसातळा ॥ ४ ॥
मिथ्या माया करोनि मोह ह्व्यास । वेचिलें आयुष्य वायांविण ॥ ५ ॥
नामा म्हणे कृपा करुनि ऐशा जीवा । सोडवी केशवा मायबापा ॥ ६ ॥

[७३५]

आम्ही विठोबाचे दूत । यम आणूं शरणागत ॥ १ ॥
मुखें नाम हातें टाळी । महापापा करूं होळी ॥ २ ॥[1]
करूं हरिनामाचा घोष । कुंभपाक पाडूं ओस ॥ ३ ॥
करूं हरीकथा कीर्तन । तोडूं यमाचें बंधन ॥ ४ ॥[2]
एवढा प्रताप नामाचा । रिघ नव्हे कळिकाळाचा ॥ ५ ॥
ऐसा नामा यशवंत । विठोबाचा शरणागत ॥ ६ ॥

अभंग ७३५—(पं.), (धु.) व (शि.)
१ दुसरे कडवे नाही. (धु.) २ चौथे कडवे नाही. (धु.) ३ पाचवे कडवे नाही. (धु.)

• • •

[७३६]

ज्यासी विन्मुख संसार । तो करी मोक्षाचा विचार ॥ १ ॥
आम्ही पंढरीचे लाठे । नवजो वैकुंठींचे वाटे ॥ २ ॥
सांडोनी पंढरीची वारी । मोक्ष मागतो भिकारी ॥ ३ ॥
जन्मोजन्मींचा आळसी । तो मुक्तीतें अभिलाषी ॥ ४ ॥
ताट ओगरिलें निकें । सांडोनी कोण जाय भिके ॥ ५ ॥
जो कां नेणे नामगोडी । तो मुक्तीतें चरफडी ॥ ६ ॥
नामा म्हणे विष्णुदासां । क्षणीं भ्याला गर्भवासा ॥ ७ ॥

[७३७]

हरिकथा श्रवण श्रवणाचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिलें ॥ १ ॥
[1]तीर्थाचें सुख [2]चरणाचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिलें ॥ २ ॥
पूजनाचें सुख कराचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिलें ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे जयाचे उपकार । तो विठ्ठल दातार विसरले ॥ ४ ॥

[७३८]

ब्राह्मण हो तुम्ही सर्व नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥
नामाविण गति न सरे आणिक । वैकुंठनायक बोले मुखें ॥ २ ॥
परि तेंचि नाम पहावें शोधुनी । चौऱ्यांशीची खाणी तेव्हां चुके ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां सद्‌गुरु वंदुनी । नाम घ्या शोधुनि सत्य मुक्त ॥ ४ ॥

[७३९]

ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥
लहान थोरांसी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥ २ ॥
सर्वांप्रति माझी हेचि पैं विनंती । आठवा श्रीपति आपुलें मनीं ॥ ३ ॥
केशव नारायण करावें आचमन । तेचि संध्या स्नान कर्म तया ॥ ४ ॥
नामा म्हणे हेंचि करा नित्य भजन । ब्रह्मार्पण साधन याचे पायीं ॥ ५ ॥

अभंग ७३६ व ७३७—(पं.) व (शि.), ७३८—(आ.), ७३९—(पं.), (शि.) व (धु.)
१ रुपाचे (पं. व शि.) २ नयना (पं. व शि.)

अनुक्रमणिका

[७४०]

नव्हे तुज हित विषय पोशितां । हरी हरी म्हणतां तरशील ॥ १ ॥
माधव श्रीहरी कृष्ण नरहरी । वेगीं हा उच्चारी लवलाही ॥ २ ॥
घडतील यज्ञ पापें होतील भग्न । प्रपंच सर्वज्ञ होईल ब्रह्म ॥ ३ ॥
नामा म्हणे हरिकथा हरी भवव्यथा । उद्धरसी सर्वथा भाक माझी ॥ ४ ॥

[७४१]

ब्राह्मण हो शूद्र वैश्य नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥
नामाविण गति नाहीं हो आणीक । वैकुंठनायक बोले मुखें ॥ २ ॥
परी तेंचि नाम पाहावें शोधून । चौऱ्यांशीं खाणी चुके तेव्हां ॥ ३ ॥
नामदेव म्हणे [1]सद्गुरुपासोनी । नाम घ्या शोधूनि [2]भावमुक्त ॥ ४ ॥

[७४२]

सदाशिवापुढें कोण अनुष्ठानी । अष्टांग लावूनि नमस्कारी ॥ १ ॥
नाम यज्ञ [3]जप ऋषीश्वर ध्याती । शीतळ ते होती काळकूट ॥ २ ॥
सर्वांमाजीं श्रेष्ठ नाम कलियुगीं । रामकृष्ण जगीं नामनौका ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम अखंडित स्मरा । पांडुरंग धरा भजा वेगीं ॥ ४ ॥

[७४३]

ब्रह्मांडनायक विश्वाचा गोसावी । तो केला पांडवीं म्हणियारा ॥ १ ॥
भावाचा लंपट भक्तां पराधीन । [4]सोडोनी अभिमान दास्य करी ॥ २ ॥
भाजीचिया पाना संतोषला हरी । जयाचे उदरीं चौदा भुवनें ॥ ३ ॥
जनक श्रुतिदेवें धरियेला करीं । दोघांचिये घरीं घेतो पूजा ॥ ४ ॥[5]
[6]पुंडलिकें वीट बैसावया नीट । तेथें भूवैकुंठ वसतें केलें ॥ ५ ॥
[7]नामा म्हणे शरण रिघतां एक्याभावें । कैवल्य भोगावें नाममात्रें ॥ ६ ॥

---

अभंग ७४०—(पं.) व (शि.), ७४१—(धु.), ७४२—(पं.) व (शि.), ७४३—(पं.) (धु.) व (शि.)

१ सद्गुरूवचनीं (धु.) २ नाना युक्ती (धु.) ३ जन (आ.) ४ साधी (शि. व पं.)
५ चौथे कडवे (धु.) प्रतीत नाही.
६ पुंडलिकें वैसों टाकियेली वीट । तेथेंचि वैकुंठ वसविलें ॥ ५ ॥ (आ.)
७ नामा म्हणे विठो वाचेसी उच्चारा । चरणीं तुम्हा थारा देईल देवा ॥ ६ ॥ (धु.)

[७४४]

केशव कैवल्य कृपाळ । नारायणें उद्धरिला अजामेळ ।
माधव मनीं धरा निश्चळ । गोविंद गोपाळ गोकुळींचा ॥ १ ॥

विष्णु विश्वाचा जिव्हाळा । मधुसूदन माउली सकळां ।
त्रिविक्रमें रक्षिलें गोवळा । वामनें पाताळीं बळी नेला ॥ २ ॥

श्रीधरें धरा धरिली पृष्ठीं । हृषिकेश उभा भीवरेतटीं ।
पद्मनाभ पुंडलिकासाठीं । दामोदरें गोष्टी पांडवांशीं ॥ ३ ॥

संकर्षणें अर्जुनासी संवाद केला । वासुदेवें अवचितां [1]वाळी वधिला ।
प्रद्युम्न समुद्रावरी कोपला । अनिरुद्धें छेदिला [2]सहस्रबाहो ॥ ४ ॥

पुरुषोत्तमें केला पुरुषार्थ । अधोक्षजें हिरण्यकश्यपा मारिली लाथ ।
नरहरि प्रल्हादा रक्षित । स्मरावा अच्युत स्वामी माझा ॥ ५ ॥

जनार्दनें रावणादि वधिले । उपेंद्रें [3]अहिल्येसी उद्धरिलें ।
हरि हरि म्हणतां दोष जळाले । कृष्णें तारिलें गणिकेसी ॥ ६ ॥

[4]या चोवीस नामांचें करितां स्मरण । जन्ममरणाचें होय दहन ।
विष्णुदास नामा करी चिंतन । चरण ध्यान मज देई ॥ ७ ॥

[७४५]

येऊनि संसारा । हित वेगीं विचारा ॥ १ ॥
स्मरा हृषिकेशी । तो नेईल परलोकासी ॥ २ ॥
गणिका नाम उच्चारी वाचे । जन्ममरण चुकलें तिचें ॥ ३ ॥
अजामेळ पापराशी । नामें पावला मोक्षासी ॥ ४ ॥
दूध मागों गेलें लेकरूं । तया दिधला क्षीरसागरू ॥ ५ ॥
सापत्नी धुरू दवडिला । तो अढळपदीं बैसविला ॥ ६ ॥
गजेंद्र स्मरत तांतडी । त्याचीं चुकविलीं सांकडीं ॥ ७ ॥
नामा म्हणे नामबळें । उद्धरती कोटी कुळें ॥ ८ ॥

---

अभंग ७४४—(पं.) व (धु.), ७४५—(पं.) व (शि.)
१ साबरु (धु.) २ बाणासूर (धु.) ३ उद्धरिला परिक्षिती (धु.)
४ ऐसीं सहस्र नामें जपतां अंतरी । ब्रह्मा इंद्र शेषे सीणला भारी ।
विष्णुदास नामा विनंती करी । तांचि आक्षी ध्यात जा ॥ ७ ॥ (धु.)

अनुक्रमणिका

[७४६]

हरीनाम गातां पवित्र । सेविती हरिहर ब्रह्मादिक ॥ १ ॥
नाम तारी नाम साहाकारी । नामें उच्चारी रूपें तुझीं ॥ २ ॥
ऐसीं अनंत नामें तुझीं न वर्णवती देवा । नामा म्हणे केशवा विनवितसे ॥ ३ ॥

[७४७]

नाम घेतां भगवंताचें । पाश तुटती भवाचे ॥ १ ॥
जे जे नामीं रत जाले । ते ते केशवीं तारिले ॥ २ ॥[1]
गणिका दुराचारी । नामें तारिली अहिल्या नारी ॥ ३ ॥
महापापी अजामेळ । तोही तारिला चांडाळ ॥ ४ ॥
नामें गजेंद्र तारिला । देवें मोक्षपदासी नेला ॥ ५ ॥
नाम घेतसे पांचाळी । उभा बाप वनमाळी ॥ ६ ॥
नामा सांगे भाविकांसी । नाम घ्यारे अहर्निशीं ॥ ७ ॥

[७४८]

कुटिल कुबुद्धि कुपात्र कठोरी । अंगिकारी हरी अश्वत्थामा ॥ १ ॥
अश्वत्थामा अंबऋषि दुर्योधन । शेवटीं अर्जुन हितकारी ॥ २ ॥
मानी भावभक्ति आश्चर्य सकळ । शंकर शीतळ होय नामें ॥ ३ ॥
नामा म्हणे आधीं नाममंत्र घोका । नाहीं भय धोका किमपिही ॥ ४ ॥

[७४९]

नामाचा प्रताप काय सांगूं वाचे । अक्षय सुखाचें स्थान दावी ॥ १ ॥
नामाविण कांहीं नाहीं नाहीं सार । साधावें सत्वर भले नोहे ॥ २ ॥
अजामेळ पाहा आजन्म पातकी । नामें गेला सेखीं वैकुंठासी ॥ ३ ॥
कुंटिणी जारिणी शुकामिसें गाय । वैकुंठासी जाय तत्क्षणीं ॥ ४ ॥
पाहा वाल्ह्या कोळी उफराटया नामें । भविष्य संभ्रमें वाखाणिलें ॥ ५ ॥
नामा म्हणे किती सांगावा निर्धार । साधन सोपारें नाम एक ॥ ६ ॥

---

अभंग ७४६—(आ.), ७४७—(पं.), (धु.) व (शि.), ७४८ व ७४९—(आ.)
१ (धु.) प्रतीत कडवी क्रमांक २ व ३ नाहीत.

[७५०]

नाम न म्हणे आवडी । व्यर्थ वाचे बडबडी ॥ १ ॥
जिव्हा नव्हे ती वाचक । भोगी आळसें नरक ॥ २ ॥
करी आरालिया निंदा । परी न म्हणे गोविंदा ॥ ३ ॥
असत्या आवडी । सदा वाचेसी रोकडी ॥ ४ ॥
निंदेवांचूनि पातक । सत्या जाणा माझी भाक ॥ ५ ॥
गर्जे नामाचे पवाडे । पायां कळिकाळ पडे ॥ ६ ॥
निज सहज चैतन्य । नामा म्हणे नाम जाण ॥ ७ ॥

[७५१]

जयासी लागली रामनामाची गोडी । त्यानें केली प्रौढी परमार्थाची ॥ १ ॥
कलिमाजीं नाम सुलभ सोपारें । यालागीं आदर नामीं धरा ॥ २ ॥
आणिक साधनें आहेती उदंड । सेवितां वितंड कष्ट तेथें ॥ ३ ॥
सोवळें ओवळें उंच नीच वर्ण । नाहीं येथें गुणदोष कांहीं ॥ ४ ॥
नामा म्हणे सर्व सिद्धांताचा भाव । प्राणियांचें दैव कोण जाणे ॥ ५ ॥

[७५२]

नाम जींही उच्चारण केलें । तींही वैकुंठ साधिलें ।
भवसागर पार पावले । उद्धरले हरिभक्त ॥ १ ॥
नाम दुर्लभ दुर्लभ । तारील हा पद्मनाभ ।
पुंडलिकें करोनियां स्वयंभ । केशव मूर्ति केली उभी ॥ २ ॥
ऐसें अगाध हरी रूपडें । प्रत्यक्ष पुंडलिकापुढें ।
भक्ती काज कैवाडें । भीमातीरीं उभा असे ॥ ३ ॥
वर्णाविया न पुरे शेष । वेदां न घालवे कास ।
तेथें शास्त्र काय घेती भाष । रूप वर्णाविया हरीचें ॥ ४ ॥
उद्धव अक्रूर द्वापारीं । त्यासवें खेळले हरी ।
मग ते उद्धरिले अवधारी । ज्ञान देऊनि श्रीकृष्णें ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें नाम । हरिकथेसी धरी प्रेम ।
तरी तुझा धन्य जन्म । मनुष्य जन्मीं असतां ॥ ६ ॥

अभंग ७५०—(पं.) व (शि.), ७५१—(आ.), ७५२—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[७५३]

हरिनाम पाठ हाचि भाव । हरी हरी हाचि देव ।
हरिविण न फिटे संदेह । सर्व जिवांचा जाण पां ॥ १ ॥
[1]हरितत्त्व ज्याचे देहीं । तोचि तरला येथें पाही ।
हरिविण या डोहीं । भवसागर कैसा तरेल ॥ २ ॥
रामकृष्ण वासुदेवा । हाचि सर्व जिवांचा विसावा ।
येथें पोकारूनियां धांवा । विठ्ठलनाम उच्चारी ॥ ३ ॥
नामा जपे हृदयीं सदा । रामकृष्ण हाचि धंदा ।
हरिराम परमानंदा । हाचि जप जपतसे ॥ ४ ॥

[७५४]

भवाब्धि [2]तारण रामकृष्ण नांव । रोहिणीची माव सकळ दिसे ॥ १ ॥
नाम हेंचि थोर नाम हेंचि थोर । वैकुंठीं बिढार रामनामें ॥ २ ॥
नाम हे निशाणी जपतांची अढळ । वैकुंठ तत्काळ तया जीवा ॥ ३ ॥
नामा म्हणे वैकुंठ नामेंचि जोडेल । अंतीं तुज पावेल नाम एक ॥ ४ ॥

[७५५]

पद तीर्थ दान हें सर्व कुवाडें । नाम एक वाड केशवाचें ॥ १ ॥
मुमुक्षु साधकीं सदा नाम गावें । तेणेंचिया व्हावें अखंडित ॥ २ ॥
विपत्तीचें बळें न होतां विन्मुख । नाममात्र एक धरा वाचे ॥ ३ ॥
जीवन्मुक्त शुक मुनि ध्रुवादिक । तयासी आणिक ध्यास नाहीं ॥ ४ ॥
नामयाची वाणी अमृताची खाणी । घ्यावी आतां धणी सर्वत्रांही ॥ ५ ॥

[७५६]

केशव नाम गाय [3]माधव नाम गाय । [4]विठ्ठल नाम गाय कामधेनु ॥ १ ॥
वेणुनादीं चरे पाणी पी भीवरें । ती गाय हंबरे भक्तालागीं ॥ २ ॥
भक्तीसुखें धाय प्रेमें तें पान्हाय । भुकेलिया खाय पातकासी ॥ ३ ॥
नामा म्हणे गाय पंढरीसी आहे । पापिया न साहे पाठीं लागे ॥ ४ ॥

---

अभंग, ७५३ व ७५४—(पं.) व (शि.), ७५५—(आ.), ७५६—(पं.) व (शि.)
१ हरिसत्य (शि. व पं.) २ तारक (शि. व पं.) ३ केशव (आ.) ४ केशव (आ.)

अनुक्रमणिका

[७५७]

आदरें जपतां केशवाचें नाम । वैकुंठ हें धाम पायां पडे ॥ १ ॥
आणिक सायास करूनि कदापि । चौऱ्यांशींच्या सिपीं गुंफीं नका ॥ २ ॥
याजसाठीं हरिनाम निरंतरीं । तारील निर्धारीं भाक माझी ॥ ३ ॥
भावभक्ती क्रिया नलगे आणिक । कीर्तन तारक म्हणे नामा ॥ ४ ॥

[७५८]

केशव म्हणतां क्लेश जाताती परते । त्याहुनि सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥
वेद कां पढसी शास्त्रें कां शिणसी । उदंड वाचेसी हरी म्हणा ॥ २ ॥
याहुनि पैं सार नाहीं हो दुसरें । भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ॥ ३ ॥
नामा म्हणे धरा केशवीं विश्वास । तुटे गर्भवास नामें एकें ॥ ४ ॥

[७५९]

शेतीं बीज नेतां थोडें । मोटे आणिताती गाडे ॥ १ ॥
एक्या नामें हरि जोडे । फिटे जन्माचें सांकडें ॥ २ ॥
बाळे भोळे जन । सर्व तरती कीर्तनें ॥ ३ ॥
नामा म्हणे नेणें मूढें । नाम स्मरावें साबडें ॥ ४ ॥

[७६०]

तोडीं हें बिरडें मोह ममता आधीं । विषय बाधा कधीं गुंफों नको ॥ १ ॥
असे घराश्रमीं भजे सर्वांभूतीं । मी माझें पुढतीं म्हणों नको ॥ २ ॥
तूं तंव लटिका आलासी कोठुनि । मी माझें म्हणोनि म्हणतोसी ॥ ३ ॥
नामा म्हणे मूळ राम परब्रह्म । जगाचा विश्राम त्यासी भजे ॥ ४ ॥

[७६१]

मी म्हणतां अहंता होईल पूर्णता । भजन सर्वथा न घडे येणें ॥ १ ॥
आपुलें आपण विचारावें धन । हरि हाचि पूर्ण भजें कारे ॥ २ ॥
हेंचि भजन थोर करी निरंतर । नाम हें सधर मनें गिळी ॥ ३ ॥
नामा म्हणे अपार नाम पारावार । श्रीराम सुंदर जप करी ॥ ४ ॥

---

अभंग ७५७ व ७५८—(आ.), ७५९ ते ७६१—(पं.) व (शि.)



अनुक्रमणिका

[७६२]

विषय खटपट आचार सांगसी । विठ्ठलीं न भजसी अरे मूढा ॥ १ ॥
पूर्णब्रह्म हरी विठ्ठल श्रीहरी । अंतीं हा निर्धारीं तारील सत्य ॥ २ ॥
न लगे सायास करणें उपवास । रामाचा विश्वास ऐसा धरी ॥ ३ ॥
नामा म्हणे प्रेम धरी तूं सप्रेम । विठ्ठल हाचि नेम दिननिशीं ॥ ४ ॥

[७६३]

एकांत एकला सर्व आहे हरी । ऐसेंचि अर्हनिशीं ध्यायिजे तूं ॥ १ ॥
सर्वांभूतीं विठ्ठल आहे आहे साचे । हें तंव वेदींचें वचन जाण ॥ २ ॥
मार्ग हाचि सोपा गेले मुनिजन । जनीं जनार्दन हाचि भावो ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम [1]मंत्र उच्चारण । सर्वही कारण होईल तुझें ॥ ४ ॥

[७६४]

उपदेश सुगम आईक रे एक । नाम हें सम्यक विठ्ठलाचें ॥ १ ॥
जनीं जनार्दन भावचि संपन्न । विठ्ठल उद्धरण कलीमाजीं ॥ २ ॥
साधेल निधान पुरेल मनोरथ । नामेंचि कृतार्थ होसी जना ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम घेई तूं झडकरी । पावसी निर्धारीं वैकुंठपद ॥ ४ ॥

[७६५]

एकचि क्षरलें एकचि देखिलें । ब्रह्म हें संचलें हरिनामें ॥ १ ॥
एक एकाकार सर्वही आकार । राम हा साकार सर्वांघटीं ॥ २ ॥
असोनी निराळा सुमनाचा वास । तैसा हृषिकेश जीवां सकळां ॥ ३ ॥
नामा म्हणे सुमन कळिकाळें एक । तेंचि निजसुख घेई जना ॥ ४ ॥

[७६६]

प्रसन्न वदन सदा विळ आहे । कां करिसी उपाव कर्म जाड ॥ १ ॥
मंत्रांचा पैं मंत्र बीज नाम हरीचें । तेंचि हें शिवाचें रामनाम ॥ २ ॥

---

अभंग ७६२—(पं.) व (शि.), ७६३—(शि.), ७६४—(पं.) व (शि.), ७६५—(शि.), ७६६—(पं.) व (शि.)
१ प्रेम (आ.)

अनुक्रमणिका

तुटेल भवकंद जासील निजपंथें । झणीं तूं दुश्चितें करिसी चित्त ॥ ३ ॥
नामा म्हणे भजन सर्व हरीचें करी । होईल बोहरी प्रपंचाची ॥ ४ ॥

[७६७]

एकतत्त्व हरी निर्धार तूं धरी । प्रपंच बोहरी एका नामें ॥ १ ॥
अच्युत गोविंद परमानंद छंद । नित्य तो आल्हाद हरिनामीं ॥ २ ॥
ऐसा तूं विनटें हरी नामपाठें । जासील वैकुंठें नश्वरता ॥ ३ ॥
नामा म्हणे तत्त्व नाम गोविंदाचें । हेंचि धरी साचें येर वृथा ॥ ४ ॥

[७६८]

शरीर संपत्ती मायेचें टवाळ । वायांची पाल्हाळ मिरवितोसी ॥ १ ॥
नाम हेंचि तारी विठ्ठल निर्धारीं । म्हणे हरी हरी एकी हेळा ॥ २ ॥
स्मरतां गोपाळनाम वंदील काळयम । न लगती नेम मंत्रबाधा ॥ ३ ॥
नामा म्हणे सार मंत्र तो उत्तम । राम हेंचि नाम स्मरें कां रे ॥ ४ ॥

[७६९]

सर्वांमाजीं सार नाम श्रीहरीचें । अखंडीत वाचे जप करी ॥ १ ॥
[1]निशिदिनीं हृदयीं ध्यातो शूळपाणि । पाविजे निर्वाणीं मोक्षपद ॥ २ ॥
[2]नामा म्हणे ऐसें स्मरे कां निधान । पावेल सदन वैकुंठींचें ॥ ३ ॥

[७७०]

विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये । विठ्ठलासी गाये सर्वकाळ ॥ १ ॥
विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें । चित्त वित्त मनें सर्वकाळ ॥ २ ॥
सबाह्य विठ्ठल दाटे घनवट । दशदिशा अफाट विठ्ठलचि ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही विठ्ठल होऊन । अभंग भजन करीतसां ॥ ४ ॥

अभंग ७६७—(शि.), ७६८—(पं.) व (शि.), ७६९—(पं.), (धु.) व (शि.), ७७०—(पं.) व (शि.)

१ च्यार सहा आणि अठराही वर्णिती । नामे निज प्राप्ती अर्धक्षणीं ॥ (पं.)
व्यासादिकीं नाम साधियलें दृढ । प्रपंच कवाड नीरसिलें ॥ (पं.)

२ नामदेव म्हणे निजब्रह्म नाम । घेतां नेमधर्म सर्व कळे ॥ (धु.)



अनुक्रमणिका

[७७१]

सार पैं नाम विठ्ठलाचें आहे । दिननिशीं सोय मना लावी ॥ १ ॥
गुंपेजेल मन जोडती पाउलें । तुटती घेतलें मायाजाळ ॥ २ ॥
नामचि कारण जप पैं सफळ । उद्धार निर्मळ सकळ जीवां ॥ ३ ॥
नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरिये । नाम अमृतमय चराचरीं ॥ ४ ॥

[७७२]

विठ्ठलनामीं आळस न करी गव्हरा । वायांचि वेरझारा शिणतोसी ॥ १ ॥
हरी उच्चारण [1]करी [2]हा विचार । नामचि साचार उद्धरण ॥ २ ॥
मी म्हणतां अहंता वाढे हे सर्वथा । परी [3]भजनापरता नाहीं मार्ग ॥ ३ ॥
मायाजाळ विषय तोडी तोडी सांठा । विठ्ठलनाम पाठा वोळगे जना ॥ ४ ॥
सर्व हें लटिकें मोहजाळ फिकें । [4]नामेंविण एके नाहीं दुजें ॥ ५ ॥
नामा म्हणे उपदेश भजे केशवास । वैकुंठनिवास वोळगे तुज ॥ ६ ॥

[७७३]

तुझें तुज सांकडें पडलें थोर कोडें । तें करी माजीवडें ब्रह्मार्पण ॥ १ ॥
ब्रह्म हरी ध्याई मन ठेवीं ठायीं । विठ्ठलाच्या पायीं दिननिशीं ॥ २ ॥
अनुभवग्रहणीं विठ्ठल मिशाणी । घडेल पर्वणी नित्यकाळ ॥ ३ ॥
नामा म्हणे सुघड मन करी वाड । इंद्रियांची चाड धरूं नको ॥ ४ ॥

[७७४]

नामाचेनि पाठें जातील वैकुंठें । तो पुंडलिक पेठे प्रगट असे ॥ १ ॥
विठ्ठल विठ्ठल मंत्र सांगतसे शास्त्र । आणिक नाहीं शस्त्र नामेंविण ॥ २ ॥
पुराण व्युत्पत्ति न लगती त्या श्रुती । हरिनाम पंथीं मुनि गेले ॥ ३ ॥
नामा म्हणे हरी नामेंचि उद्धरी । जन्माची वेरझारी हरे नाम ॥ ४ ॥

अभंग ७७१ व ७७२—(पं.) व (शि.), ७७३—(पं.), ७७४—(पं.) व (शि.)
१ न करी (पं.) २ (पं.) प्रतीत 'हा' शब्द नाही. ३ भजन पंथा (पं. व शि.)
४ रामेंविण (पं. व शि.)

[७७५]

ज्याचे मुखीं नाम तोचि एक धन्य । त्याचें शुद्ध पुण्य इये जनीं ॥ १ ॥
नामसंकीर्तन नित्य नाम वाचे । दहन पापाचें एका नामें ॥ २ ॥
ऐसा जो अखंड जपे रामनाम । नाहीं तयासम दुजें कोणी ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम विठ्ठलाचें जपा । हाचि मार्ग सोपा परब्रह्मीं ॥ ४ ॥

[७७६]

सकळ साधनांचें सार । रामकृष्ण हा उच्चार ॥ १ ॥
म्हणा गोविंद नरहरी । सकळ जीवां तोचि तारी ॥ २ ॥
नाम घेतां हरी माधव । तरताती सकळ जीव ॥ ३ ॥
नामा म्हणे केशव वाचे । धन्य जीवित वैष्णवांचें ॥ ४ ॥

[७७७]

रामकृष्ण माळ घालीं कां अढळ । तुटेल भवजाळ मायामोह ॥ १ ॥
होशील तूं साधु न पवसी बाध । पूर्ण ब्रह्मानंद पावेल तुज ॥ २ ॥
जपतां रामनाम पुरती सर्व काम । आदि अंतीं नेम साधेल तुज ॥ ३ ॥
नामा म्हणे कृतार्थ पूर्ण मनोरथ । न लगती ते अर्थ मायाफांसे ॥ ४ ॥

[७७८]

नको नको माया सांडी लवलाह्या । पुढील उपाया झोंबे कांरे ॥ १ ॥
रामनाम म्हणे तुटेल बंधन । भवबंधमोचन एका नामें ॥ २ ॥
स्मरतां पतित उद्धरले यथार्थ । नाम हाचि स्वार्थ तया जाला ॥ ३ ॥
नामा म्हणे जप करी तूं अमूप । नामें चुकली खेप इये जनीं ॥ ४ ॥

[७७९]

करी हें कीर्तन राम नारायण । जनीं जनार्दन हेंचि देखे ॥ १ ॥
जगाचा जनक रामकृष्ण एक । न करितां विवेक स्मरें राम ॥ २ ॥

---

अभंग ७७५ ते ७७८—(पं.) व (शि.) / ७७९—(पं.), (धु.) व (शि.)

तुटेल भवजाळ कां [1]करिसी पाल्हाळ । सर्व मायाजाळ इंद्रियबाधा ॥ ३ ॥
नामा म्हणे गोविंद स्मरें तूं सावध । नव्हे तुज बाध नानाविघ्नें ॥ ४ ॥

[७८०]

तपाचें पैं तप राम हें अमूप । करी कां रे जप रामनामीं ॥ १ ॥
रामकृष्ण म्हणे वाचे नारायण । तुटेल बंधन यमपाश ॥ २ ॥
साधेल साधन होती कोटी यज्ञ । नाम जनार्दन जप करी ॥ ३ ॥
नामा म्हणे जिव्हे नामस्मरण करी । म्हणे नरहरि एकभावें ॥ ४ ॥

[७८१]

म्हणा श्रीराम जयराम । भवसिंधु तारक नाम ॥ १ ॥
नाम पतितपावन । नाम जीवांचें साधन ॥ २ ॥
नाम शिवाचें ध्यान । नाम नारदा गायन ॥ ३ ॥
नामा म्हणे हरिचें नाम । नाम तारक परब्रह्म ॥ ४ ॥

[७८२]

सोपा हा सुगम उपावो परीस । धरीं तूं विश्वास नाममहिमें ॥ १ ॥
नाम हेंचि गंगा नाम हेंचि भीमा । अंतरीं श्रीरामा जपिजेसू ॥ २ ॥
अमृत सुरस रामनाम एक । वाचेचें वाचक मन करी ॥ ३ ॥
नामा म्हणे सुरस [2]सेवी सुधारस । ध्यायी केशवास दिननिशीं ॥ ४ ॥

[७८३]

भावेंचि भजन जनी जनार्दन । नित्य हें वचन रामनाम ॥ १ ॥
खुंटतील योनी तुटेल यातना । भक्ति नारायणा पावेल तुझी ॥ २ ॥
स्मरे सदा कांरे न लगती पाल्हाळ । वसिजे गोपाळ सर्वांभूतीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ब्रह्म सर्व हरि । येकु चराचरीं जनार्दन ॥ ४ ॥

अभंग ७८०—(पं.), (शि.) व (धु.), ७८१—(आ.), ७८२—(पं.), (शि.) व (भा.), ७८३—(आ.)

१ न करी (धु.) २ एक नाम रस (शि. व पं.), सर्वां सुधारस (भा.)

अनुक्रमणिका

[७८४]

सर्वांभूतीं भजन हेंचि पैं चोखडें । ब्रह्म माजीवडे करोनि घेई ॥ १ ॥
सफळ सर्वदा जप हा गोविंदा । न पावाल आपदा नाना योनी ॥ २ ॥
नाम संजीवनी अमृत सरिता । परिपूर्ण भरिता सिंधु ऐसा ॥ ३ ॥
नामा म्हणे चोखडें नाम हेंचि गाढें । [1]चुकवील कोडें जन्ममरण ॥ ४ ॥

[७८५]

जळाचा जळबिंदु जळींच तो विरे । तैसे हें विघरे पांचा ठायीं ॥ १ ॥
जिव शिव हे उच्चार नाम हें मधुर । जिव्हेसी उच्चार रामनाम ॥ २ ॥
रामनाम तारक शिव षडाक्षरी । तैसी वाचा करी अरे मूढा ॥ ३ ॥
नामा म्हणे ध्यान शिवाचें उत्तम । मंत्र हा परम रामनाम ॥ ४ ॥

[७८६]

निसुगा निदसुरा क्षणीं तूं बा होसी । नाम हृषिकेशी घालीं मुखीं ॥ १ ॥
गोविंद हरे कृष्ण विष्णु हरे । अच्युत मुरारे जनार्दन ॥ २ ॥
करितां नामपाठ चुकती भवजाळ । तुटेल तें जाळें मायामोह ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसा उपाव सुगम । दिननिशीं नेम राम म्हणे ॥ ४ ॥

[७८७]

केशवाचे प्रतापें गोसावी होसी । दास्यत्व करोनि सर्वस्व पोशी ॥ १ ॥
अर्जुनाचा सारथी बळीचा सांगाती । द्रौपदीच्या आकांतीं धांवोनि पावे ॥ २ ॥
चातका जलधरू मच्छा जीवन नीरू । प्रल्हादा कैवारू दास म्हणोनी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही न करा आळसु । नाम मंत्र दिवसु अभ्यासिजे ॥ ४ ॥

[७८८]

कां करितोसि शीण वाचे नारायण । जपतां समाधान होईल तुज ॥ १ ॥
रामकृष्ण हरी गोविंद गोविंद । वाचेसी हा छंद नामपाठ ॥ २ ॥

अभंग ७८४ ते ७८६ व ७८८—(पं.) व (शि.), ७८७—(आ.)
१ उगवील (पं. व शि.)

वंदितील यम कळिकाळ सर्वदा । न पवसी आपदा असतां देहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे बोळगे सीण जाला सांगें । प्रपंच वाउगे टाकी परतें ॥ ४ ॥

[७८९]

पांडुरंगें प्राप्त होईल सकळ । चरणकमळ ध्यारे मनीं ॥ १ ॥
मनीं मानसिक न करावा कधीं । नाम घ्यारे आधीं केशवाचें ॥ २ ॥
केशवाचें नाम पावन पवित्र । महाभाष्यसूत्र हेंचि सांगे ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्हीं करावें कीर्तन । पंढरीचें ध्यान चुकों नका ॥ ४ ॥

[७९०]

केशव नारायण हा जप आमुचा । सर्व हा मंत्राचा आत्माराम ॥ १ ॥
माधव गोविंद सर्वशास्त्रीं आहे । उभारूनियां बाहे वेदु सांगे ॥ २ ॥
नामाचेनि पाठें तरूं हा भवसागरू । आणिक विचारू नेणों आम्ही ॥ ३ ॥
विष्णू मधुसूदन हें दैवत आमुचें । नित्य पैं नामाचें सार आम्हां ॥ ४ ॥
त्रिविक्रम वामन सर्व ब्रह्मांडनायकु । हाचि जप सम्यकु आम्हां घटीं ॥ ५ ॥
श्रीधर हृषिकेष मंत्रराज जपा । पावाल स्वरूपा विष्णुचिया ॥ ६ ॥
पद्मनाभ दामोदर हा नामाचा विस्तार । करितां विचार तरले जीव ॥ ७ ॥
संकर्षण वासुदेव पंढरीचा राणा । सांगितल्या खुणा खेचररायें ॥ ८ ॥
प्रद्युम्न अनिरुद्ध दैवत कुळीचें । पुंडलिक तयाचें तपसार ॥ ९ ॥
पुरुषोत्तम अधोक्षज वैकुंठ निर्मळ । जपतां सकळ पापें जाती ॥ १० ॥
नरसिंह अच्युत नामाचें कवच । जपतां होय वेंच संसारासी ॥ ११ ॥
जनार्दन उपेंद्र नाम हें अमृत । शंकर निवांत जपे सदा ॥ १२ ॥
हरी कृष्ण विष्णू सर्व घटीं नांदें । तोचि पैं आल्हाद उच्चारजेसु ॥ १३ ॥
ऐसा नाम महिमा उपदेश गोमटा । नामेंचि वैकुंठा भक्त गेले ॥ १४ ॥
नामा म्हणे ते मूर्ति पंढरिये गोमटी । नामें उठाउठी भेटी देसी ॥ १५ ॥

[७९१]

माया पुरातनु तूंचि वो जननी । नाम संजीवनी विठ्ठल वो ॥ १ ॥
तेंचि हें बोळलें पूर्ण प्रेम आम्हां । लोलंगित ब्रह्मा पंढरीये ॥ २ ॥

अभंग ७८९ ते ७९१—(आ.)

धांव पाव वेगीं येई संभाळी तूं । नाम हा संकेतु पांडुरंगे ॥ ३ ॥
क्षुधा तृषा आशा तुजलागीं चिंतिती । जीवन हें मागुती नाम तुझें ॥ ४ ॥
अनंत अच्युत नाम हेंचि नित्य । तेणें कृतकृत्य प्राण माझा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा तूं जीवन आमुचें । आतां मज कैचें क्रियाकर्म ॥ ६ ॥

[७९२]

मायेचा कळवळा मायाची जाणे । तैसें मी तान्हें माऊलिये ॥ १ ॥
विठ्ठल श्रीरंग डोळस प्रसन्न । नित्य अमृतघन बोळला सदा ॥ २ ॥
जननी जनक तूंचि वो मुकुंद । नाम हें गोविंद शुद्धरसु ॥ ३ ॥
येई वो केशवे नित्य नामरूपें । मी तुज आलापें आळवित ॥ ४ ॥
माधवा श्रीधरा वेगीं येई त्वरें । मज वो नावरे प्रेमवेधु ॥ ५ ॥
नामा म्हणे तूं जीवन आमुचें । नित्य केशवाचें प्रेम मज ॥ ६ ॥

[७९३]

केशवासी पाहे केशवासी ध्याये । केशवासी गाये सर्वकाळ ॥ १ ॥
केशव पैं हाचि वृत्तीसहित मन । केशवासी ध्यान सर्वकाळ ॥ २ ॥
सबाह्यअंतरीं सांडिना कोणासी । जाणों अंतरासी साक्ष भूत ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्हीं केशव होऊनि । पंढरीं पाटणीं नांद बापा ॥ ४ ॥

[७९४]

वेदाचें महिमान जनीं जनार्दन । [१]आणिक वचन [२]तेथें नाहीं ॥ १ ॥
भूतीं दया धरा भक्तिभाव करा । भजन हरिहरां वेद सांगे ॥ २ ॥
सर्व हेंचि सार ब्रह्ममय खरें । आणिक दुसरें न दिसे आम्हां ॥ ३ ॥
नामा म्हणे समर्थ वेद तो आमुचा । सांगे नित्य जपा रामकृष्ण ॥ ४ ॥

[७९५]

पाहतां ये परिपाठी आणिक नाहीं सृष्टि । नामेंविण दृष्टि न दिसे माझे ॥ १ ॥
नामचि समर्थ नामचि मथित । शंकरासी हेत रामनामीं ॥ २ ॥

---

अभंग ७९२ व ७९३—(आ.), ७९४—(पं.) व (शि.), ७९५—(पं.), (शि.) व (बा.)
१ नित्य (पं.) २ रामनाम (पं.)

अनुक्रमणिका

पुरती सर्व काम वाचे रामनाम । न लगती ते नेम कर्मजाळ ॥ ३ ॥
[1]नामा म्हणे उच्चार न करी तूं विचार । तुटेल येरझार नाना योनी ॥ ४ ॥

[७९६]

साधन साधितां होताती आपदा । म्हणोनि गोविंदा स्मरे कां रे ॥ १ ॥
कृष्णकथा सार सांगे कां सधर । तुटेल येरझार जन्ममरणा ॥ २ ॥
निष्फळ निखळ भावीं तूं सफळ । भजन केवळ सर्वांभूतीं ॥ ३ ॥
नामा म्हणे भक्ति होईल विरक्ति । तुटेल यातायाती जन्ममरण ॥ ४ ॥

[७९७]

भवसिंधुचा पार तरे तो पोहणार । बळिया परम धीर भजनशील ॥ १ ॥
नामची सांगडी लावूनि कासे । दृढ प्रेमरस वोसंडती ॥ २ ॥
सत्वाचा सुभट असंग एकट । वैराग्य उद्‌भट निर्वासन ॥ ३ ॥
कामक्रोध जेणें घातले तोडरीं । निर्दाळिले वैरी लोभदंभ ॥ ४ ॥
रजतमाचे जेणें तोडिले अंकुर । केला अहंकार देशधडी ॥ ५ ॥
नामा म्हणे जया [2]नामीं अनुसंधान । तोचि परम धन्य त्रिभुवनीं ॥ ६ ॥

[७९८]

भवसिंधुचा पार तरावयालागीं । साधन कलियुगीं आणिक नाहीं ॥ १ ॥
अहर्निशीं नाम जपा श्रीरामाचें । सकळ धर्माचें मुगुटमणी ॥ २ ॥
न चले वर्णाश्रम धर्म आचरण । न घडे व्रत दान तप कोणा ॥ ३ ॥
नव्हे तीर्थाटन पुराण श्रवण । नव्हे ब्रह्मज्ञान शास्त्रबोध ॥ ४ ॥
नव्हे ध्यान स्थिती भावेंविण वोजा । न घडे देवपूजा एकनिष्ठ ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम राघोबाचें गातां । ब्रह्म सायोज्यता घर रिघे ॥ ६ ॥

[७९९]

तुटे मायाजाळ विघडे भवसिंधू । जरी लागे छंदू हरिनामाचा ॥ १ ॥
येर कर्मधर्म करितां या कलीं । —माजी कोण बळी तरला सांगा ॥ २ ॥

अभंग ७९६—(पं.) व (शि.), ७९७—(पं.), (शि.) व (धु.), ७९८—(पं.), (धु.), (शि.) व (गं.), ७९९—(पं.) व (शि.)

१ नामा म्हणे उच्चार करी तू वारंवार (बा.) २ नेमि (धु.)

अनुक्रमणिका

न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ ३ ॥
नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्णकथा ॥ ४ ॥
न साधे हा योग न करवे वैराग्य । साधा भक्ति भाग्य संतसंगें ॥ ५ ॥
नामा म्हणे साधन न लगे आणिक । दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ६ ॥

[८००]

पंढरीचा राजा उभा भक्तकाजा । उभारूनि भुजा वाट पाहे ॥ १ ॥
घ्यारे नाम सुखें प्रेमें अलौकिक । साधनें आणिक करूं नका ॥ २ ॥
मनाचेनि मनें हृदयीं मज धरा । वाचेनें उच्चारा नाम माझें ॥ ३ ॥
बोलोनियां ऐसा उभा भीमातीरीं । नामा निरंतरीं चरणापाशीं ॥ ४ ॥

[८०१]

हरिहर ब्रह्मा इंद्रादिक देव । इच्छिताती सर्व पायधुळी ॥ १ ॥
यांवरी गोपाळ आनंदें नाचती । भूषणें श्रीपती शोभायमान ॥ २ ॥
पाहोनियां सुख आले सर्व देव । पंढरीचा राव पाहावया ॥ ३ ॥
नामा म्हणे मिषें गोपाळकाल्याचे । निरंतर वाचे घेत नाम ॥ ४ ॥

[८०२]

वदनीं तुझें नाम अमृत संजीवनी । असतां चक्रपाणि भय कवण ॥ १ ॥
या जन्ममरणाची कायसी मग चिंता । तुझिया शरणागता पंढरीनाथा ॥ २ ॥
हृदयीं तुझें रूप बिंबलें साचार । तेथें कवण पार संसाराचा ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें नाम वेळोवेळ । म्हणतां कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

[८०३]

नाहीं भक्ती नामीं चांडाळ पातकी । तोचि जाणावा लोकीं दुष्ट नष्ट ॥ १ ॥
प्रपंचीं कर्दमीं गढोनियां ठेले । न निघती बोले संताचिया ॥ २ ॥
काढितां त्या वाटे प्रपंचाचें दुःख । विषयाचें सुख हर्ष बहु ॥ ३ ॥

---
अभंग ८००—(आ.), ८०१—(पं.), ८०२—(पं.) व (शि.), ८०३—(धु.)

अनुक्रमणिका

पुत्र वित्त कांता मानी भरंवसा । पडे मोह फांसा जन्मवरी ॥ ४ ॥
नामदेव म्हणे अंतीं आहे कोण । कळा नामाविण नानापरी ॥ ५ ॥

[८०४]

नाम हें अमृत भक्तांसी लाधलें । आपण घेतलें वौध्यरूप ॥ १ ॥
नाम हें आळवा नाम हें आळवा । होईल दोहावा कामधेनु ॥ २ ॥
न बाधेल विघ्न प्रपंच हें भान । नाम हेंचि खूण वैकुंठींची ॥ ३ ॥
नामा म्हणे जीव ब्रह्म असे सर्व । हा गीतेमाजीं भाव सांगितला ॥ ४ ॥

[८०५]

आलिया संसारीं आत्माराम मुखीं । घेतलिया सुखी त्रिभुवनीं ॥ १ ॥
जपोनियां नाम आपुलेंचि आधीं । मग सोहंसिद्धि सर्व साधे ॥ २ ॥
सर्व हरी मग नाहीं दुजा भाव । प्रापंचिक गर्व दिसेचिना ॥ ३ ॥
नामदेव म्हणे सर्वही साधनें । भासे जन वन परब्रह्म ॥ ४ ॥

[८०६]

व्यापक तें नाम तेव्हांच होईल । जेव्हां ओळखेल मीपणासी ॥ १ ॥
आपुलेंचि नाम न ओळखिलें । व्यापक साधिलें जायेचिना ॥ २ ॥
आपुलीच ओळख आपणासी पडे । मग सर्वत्र जोडे नाम तेव्हां ॥ ३ ॥
नामाविण नाम तेंचि होय विभ्रम । नामदेव म्हणे संतां पुसा ॥ ४ ॥

[८०७]

आसनीं शयनीं जपतां चक्रपाणि । लाविली निशाणी वैकुंठींची ॥ १ ॥
[1]नाहीं रे बंधन आम्हां हरिभक्तां । गीतीं गुण गातां राघोबाचि ॥ २ ॥
भवसिंधूची जिवा जाली पायवाट । जे गर्जती उद्धट नामघोष ॥ ३ ॥
प्रेमें वोथरत हर्षें पिटूं टाळी । [2]नाम हृदयकमळीं विठोबाचें ॥ ४ ॥

अभंग ८०४—(पं.) व (शि.), ८०५ व ८०६—(धु.), ८०७—(पं.), (धु.) व (शि.)
१ पातक कलमषासमुळाचा छेदु । मज परमानंदु तुझे नामीं ॥ २ ॥ हा (पं.) प्रतीत आढळतो.
२ ध्यान (शि.)

अनुक्रमणिका

नाहीं काया क्लेश न करी सायास । दृढ धरी विश्वास हरीनामीं ॥ ५ ॥[1]
नामा म्हणे साधन न लगे अनेक । दिली मज भाक पांडुरंगें ॥ ६ ॥

[८०८]

राम मंत्राचिया आवर्ती । घडती जयासी पुढतोपुढती ।
त्याचा जन्म धन्य ये क्षितीं । सर्व कुळाशीं तारक ॥ १ ॥
राममंत्र आवडे जीवा । हाचि उद्धार सर्व जीवां ।
शिवासही विसावा । पार्वती सहित ॥ २ ॥
रामकृष्ण उच्चारे । तरती जड पामरें ।
ऐसें हें व्यासें निर्धारिं । नानाग्रंथीं सांगितलें ॥ ३ ॥
नामा जपे नाम मंत्र । [2]आणिक नेणे नाना शास्त्र ।
रामनामें नित्य वक्त्र । हरी रंगें रंगलें ॥ ४ ॥

[८०९]

हाचि नेम सारी साधेल तो हरी । नाम हें मुरारी अच्युताचें ॥ १ ॥
गोविंद हरे गोविंद हरे । यादव मुरारे रामनाम ॥ २ ॥
न लगती कथा नानाविध वार्ता । राघवाचें स्मरतां नाम वाचे ॥ ३ ॥
नामा म्हणे राम आम्हां हाचि नेम । नित्य तो सप्रेम जप आम्हां ॥ ४ ॥

[८१०]

विठोबाचे पाय जन्मोनि जोडावे । संबंधी तोडावे कामक्रोध ॥ १ ॥
ऐक्य सुख घ्यावें एकविध भावें । प्रेम न संडावें आवडीचें ॥ २ ॥
अनंत जन्मा यावें ऐसें भाग्य व्हावें । एक वेळां जावें पंढरीसी ॥ ३ ॥
वृत्तिसहित मन पायींच ठेवावें । अद्वैत भोगावें प्रेमसुख ॥ ४ ॥
देहीं देहभाव प्रकृति दंडावें । सांडणें सांडावें ओवाळुनी ॥ ५ ॥
नामा म्हणे [3]ऐसें घेतलें माझ्या जिवें । विठोबा पुरवावें आर्त माझें ॥ ६ ॥

---

अभंग ८०८—(पं.), ८०९—(पं.) व (शि.), ८१०—(पं.), (शि.), (भा.) व (बा.)
१ हे कडवे काही (धु.) व (पं.) प्रतींत नाही. २ आणिक ने घे हाती शस्त्र। (पं.)
३ ऐसा हेतू (बा.)

[८११]

तुझाचि अहंकार तुजचि नाडील । मागुता मांडील संसारू हा ॥ १ ॥
सांडी सांडी मोहो विषय टवाळ । वाचेसी गोपाळ उच्चारी रे ॥ २ ॥
सर्व हे भुररे मायेचें घरकुलें । अहंकारें नाथिलें नानायोनी ॥ ३ ॥
नामा म्हणे भजन हरीचें करीन । नित्य ते सेवीन चरणरज ॥ ४ ॥

[८१२]

देहधर्म विहित करी । द्वैतभाव चित्तीं न धरी ।
सर्वाभूतीं नमस्कारी । एक आत्मा म्हणोनियां ॥ १ ॥
एक तत्त्व एक हरि । एकचि तो नमस्कारी ।
आदि अंतींचा नरहरि । सकळ कुळांसी तारील ॥ २ ॥
पवित्र त्याचेंचि कुळ । आचार त्याचाचि सुशीळ ।
अखंड जपे सर्वकाळ । रामकृष्ण नरहरि ॥ ३ ॥
नामा जपे नाम मंत्र । अखंड हरि नाम सहस्त्र ।
हाचि आमुचा निज मंत्र । रामकृष्ण गोविंद ॥ ४ ॥

[८१३]

सुलभ सोपारें नाम केशवाचें । आठवितां वाचे दोष जाती ॥ १ ॥
अनाथाचा सखा उभा नामापासीं । ऐसा तो प्रेमासी भुललासे ॥ २ ॥
जातिवंत आम्ही वेदाचे पाठक । तरी सर्व फिकें नामाविण ॥ ३ ॥
नामा म्हणे नामीं रंगलों सतत । म्हणोनि अनंतें दिधली भेटी ॥ ४ ॥

[८१४]

विसावा विश्वाचा जो प्राण जीवाचा । तोचि नित्य वाचा जपों आम्ही ॥ १ ॥
गोविंद वामन भावयुक्त भजन । सर्व जनार्दन हाचि भाव ॥ २ ॥
चैतन्य [१]अचित्य नाम हेंचि सत्य । नित्यता कृतार्थ विठ्ठलनामें ॥ ३ ॥
नामा म्हणे उद्धरण आणिक नाठवे । केशवचि सर्वे पुरे आम्हां ॥ ४ ॥

अभंग ८११—(पं.), ८१२ व ८१३—(वा.), ८१४—(पं.), (शि.) व (आ.)
१ अचेतन (आ.)

[८१५]

राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान । रामें घडे यज्ञ कोटी देखा ॥ १ ॥
न लगती साधनें नाना मंत्र विवेक । रामनामीं सुख रंगीं कां रे ॥ २ ॥
नामा म्हणे नाम हेंचि वचन आम्हां । नित्य ती पौर्णिमा सोळा कळी ॥ ३ ॥

[८१६]

शास्त्राचें हें सार वेदाचें गव्हर । उतरावया पार आणिक नाहीं ॥ १ ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होईल तुम्हां ॥ २ ॥
न करावें खंडन खंडन उच्चारण । तप अनुष्ठान न लगे तुम्हां ॥ ३ ॥
सिद्धीचें हें सार मुक्तीचें माहेर । उतरावया पार दुजें नाहीं ॥ ४ ॥
विठ्ठलापरतें काय करिसी दैवत । परब्रह्म निरुतें पंढरीये ॥ ५ ॥
सिद्धीचें [1]सहज भक्तीचें हें बीज । केशवीं दिलें मज म्हणे नामा ॥ ६ ॥

[८१७]

[2]मुक्तिप्रद आहे एक विठ्ठल नाम । आतां क्रियाकर्म कवणालागीं ॥ १ ॥
राहें राहें तूं मना निवांत । ध्याई अखंडित नारायणा ॥ २ ॥
संतसमागम साधी हें साधन । पावसी निर्वाण [3]नित्य सुख ॥ ३ ॥
नामा म्हणे भज श्रीगुरुच्या पायीं । तरी वर्म ठायीं पडेल जाण ॥ ४ ॥

[८१८]

करितां हे वेदाध्ययन ज्योतिष । नामाचा तो लेश न ये हातां ॥ १ ॥
बहुत व्युत्पत्ति सांगति पुराण । व्यर्थ तें स्मरण नाम नव्हे ॥ २ ॥

---

अभंग ८१५—(पं.), ८१६—(पं.), (शि.) व (गं.), ८१७—(पं.), (शि.) व (बा.), ८१८—(धु.)

१ निज मुक्तीचे (पं. व शि.) २ श्री. बारटक्के ह्यांच्याकडील हस्तलिखितात १ ले व ४ थे कडवे वेगळे आहे व मुळातील १ ले कडवे नाही.

बारटक्के प्रत :

१ ले कडवे—

उत्कट तें तप एक विठ्ठलनाम । आतां क्रियाकर्म कवणालागीं ॥ १ ॥

४ थे कडवे—

नामा म्हणे तूं सहज सुखरूप । होऊनि निर्विकल्प विचारी पां ॥ ४ ॥

३ निज (बा.)

अनंत हें नाम जयांतुनि आलें । त्यांतचि [1]विरालें जळीं जळ ॥ ३ ॥
तें नाम सद्‌गुरुकृपेविण कोणा । साधितां साधेना जपें तपें ॥ ४ ॥
नामदेव म्हणे स्वतःसिद्ध नाम । गुरुविण वर्म हातां न ये ॥ ५ ॥

[८१९]

ज्ञान ध्यान जप तप साधन तें । नाम प्रत्ययातें न ये कोणा ॥ १ ॥
गुरुपदीं जावें आधीं हो शरण । मी हें माझें ओळखुन घ्यावें नाम ॥ २ ॥
तयाचें तें मूळ पाहोनियां त्यांतें । मिळवावें द्वैत अद्वैतातें ॥ ३ ॥
द्वैत द्वैतातीत स्वयंभ संचलें । तेंचि नाम आलें त्रिभुवनीं ॥ ४ ॥
नामदेव म्हणे परब्रह्म नाम । द्वैत क्रियाकर्म नाहीं तेथें ॥ ५ ॥

[८२०]

सद्‌गुरुवांचुनी नाम न ये हातां । साधन साधितां कोटी गुणें ॥ १ ॥
जैसा कांतेविण करणें संसार । तैसा हा व्यापार साधनांचा ॥ २ ॥
जंव सद्‌गुरु नाहीं केला भ्रतार । साधनविचार व्यर्थ गेला ॥ ३ ॥
नामदेव म्हणे सद्‌गुरुपासोनी । नाम घ्या जाणोनी नाना कांहीं ॥ ४ ॥

[८२१]

चंद्रभागातीरीं उभा राहिलासी । भक्तांचे मानसीं भाव मात्र ॥ १ ॥
काय पुंडलिकें केल्या तपरासी । जाणोनि मानसीं भावमात्रें ॥ २ ॥
भावेंविण देवा सर्वथा नातुडे । नेणती बापुडे बद्धजन ॥ ३ ॥
नामा म्हणे माझें माहेर पंढरीं । भेटती महाद्वारीं संतजन ॥ ४ ॥

[८२२]

देवाचे हे आत्मे ते जाणावे संत । त्यांचे पदीं रत सर्वभावें ॥ १ ॥
श्रीहरीची भेटी सहजचि होय । श्रम लया जाय जाला आधीं ॥ २ ॥

अभंग ८१९ व ८२०—(धु.), ८२१—(शि.), ८२२—(धु.)
१ विराले आलें जेवि (धु.)

पापाचे पर्वत भस्म नामाग्नीनें । अभक्तासी हाण नामाविण ॥ ३ ॥
नामदेव म्हणे नामाग्नीच्या पोटीं । नाना पाप कोटी दग्ध होती ॥ ४ ॥

[८२३]

अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे । अवघे कुळ त्यांचें पुण्यवंत ॥ १ ॥
अवघेचि संसारीं जाणावे ते धन्य । ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥
अवघा विठ्ठल भोगिती दिनरातीं । बोळगे किंकरवृत्ति नामा त्यांतें ॥ ३ ॥

[८२४]

सर्वाभूतीं भज नमन करी संतां । नित्य त्या अच्युता स्मरण करी ॥ १ ॥
ऐसें भजनीं विनट सांपडेल वाट । रामकृष्ण नीट वैकुंठींची ॥ २ ॥
न लगती साधनें वायांचि बंधनें । एक नामें होणें चतुर्भुज ॥ ३ ॥
नामा म्हणे थोर नामेंचि सधर । वैकुंठीं बिढार तयां भक्तां ॥ ४ ॥

[८२५]

म्हणतां वाचे नाम वंदी तया यम । काळादिका सम वंदी तया ॥ १ ॥
ऐसें नाम श्रेष्ठ सकळांसी वरिष्ठ । उच्चारितां नीट वैकुंठ गाजे ॥ २ ॥
तो हा नाममहिमा वाखाणित ब्रह्मा । न कळे तया उपमा आदि अंतीं ॥ ३ ॥
नामा म्हणे पाठें नामाचेनि वाटे । तरी प्रत्यक्ष प्रगटे विठ्ठल हरि ॥ ४ ॥

[८२६]

म्हणे दीनबंधू तुम्ही सावध व्हावें । संतांशीं नमन नाम वाचें जपावें ॥ १ ॥
नामाविण साधन नाहीं या कलियुगीं । व्यर्थ श्रम होती पाहतां मत्तें ॥ २ ॥
मताभिमान करोनि तुम्ही जाल आड वाटां । अभिमानें ठकविले नारदादि श्रेष्ठा ॥ ३ ॥
आलिया जन्मास आतां न करी आळस । नामदेवालागीं सांगे जगन्निवास ॥ ४ ॥

अभंग ८२३—(आ.), ८२४ ते ८२६—(पं.) व (शि.)

[८२७]

सकळ संतजन देखोनि नयनीं । टाळिया पिटोनी गाती नाम ॥ १ ॥

म्हणती धन्य भक्त निधडा वैष्णव । ब्रह्मादिकां माव न कळे याची ॥ २ ॥

कैसा ऋणिया केला पंढरीनाथ । आहे सदोदित याचेजवळी ॥ ३ ॥

पूर्वी तो प्रल्हाद श्रवणीं ऐकिला । किंवा हा देखिला संतामधीं ॥ ४ ॥

नामा येऊनियां चरणासी लागला । हृदयीं आलिंगिला भक्तराज ॥ ५ ॥

अभंग ८२७—(पं.) व (शि.)
हा अभंग गोरा कुंभाराच्या चरित्रात सापडतो.

● ● ●

अनुक्रमणिका

[८२८]

[1]ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीनजनां ॥ १ ॥
ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी । नाम घे वदनीं दोष जाती ॥ २ ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो ॥ ३ ॥
अखंडित नामा त्याचा वास पाहे । निशिदिनीं ध्याय [2]सत्संगती ॥ ४ ॥

[८२९]

संतांचा महिमा कोण जाणे सीमा । सीणला हा ब्रह्मा बोलवेना ॥ १ ॥
संतांची हे कळा पाहतां न कळे । खेळोनियां खेळ वेगळाची ॥ २ ॥
संतांचिया पारा नेणें अवतारा । म्हणती याच्या पारा कोण जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे धन्य धन्य भेट जाली । कल्पना निमाली संतापायीं ॥ ४ ॥

[८३०]

कर्दळी फळ कर्पूर परिमळें भिन्न । परि दोहींचे जन्म ते एकत्र जाण ।
आत्मा कीं परमात्मा अभेद कीं भिन्न । चंद्र सोमकांत शून्य महाशून्य ॥ १ ॥
सूर्य सूर्यकांतु प्रकाश एकु । साधुसंत आरति रावो ना रंकु ॥ २ ॥
भ्रमरांच्या रुंजी मकरंद उधळती । असाध्य साधनीं लागल्या ज्योती ।
लयाचें लक्ष हरपली स्थिति । म्हणोनि साधुचरणीं नित्य पंचारती ॥ ३ ॥
गोदेचा उगमु तो ठाईंच्या ठाईं । आणिकें उदकें तीं चाली प्रवाहीं ।
तैसी साधुसंत कृपा उन्मत्त देहीं । सागरा भेटली क्षीरसिंधु तेही ॥ ४ ॥
सागराचें उदक जगा विनवित । निवळुनि मागुतें पूर्ण भरित ।
तैसें अंतरीचें नीर ओघें हे साधुसंत । परि सागरा अंतरीं न वर्णवे मुक्त ॥ ५ ॥
तेथें अनुपम्या ऐकिजे शब्दाचि रचना । हें जाणतेनो जाणा अमृतखुणा ।
हें रत्न कीं माणिक ऐसें अनुमाना । तें पानबुडिया परसोबा लाधले निधाना ॥ ६ ॥
दुधावरील साय वरी साखर मेळवणी । जैसी जिव्हा लोधली मधु लागुनि ।
तेथील गौलता तें रहस्य लागलें ध्यानीं । तें परसोबा लाधलें येरां मूर्खां भुलवणी ॥ ७ ॥
तापलें लोहो तेणें शेखियेलें जीवन । तैसें अंतरीं निवालें आपोआप आपण ।
परसा भागवत हें सकळांचें जीवन । विष्णुदास नामा त्याचे चरणीचे रजरेण ॥ ८ ॥

---

अभंग ८२८—(पं.), (धु.) व (शि.), ८२९ व ८३०—(आ.)
१ ब्रह्म मूर्तिमंत (पं.) २ त्याची वाट (धु.)

अनुक्रमणिका

[८३१]

वैष्णवा घरीं सर्वकाळ । सदा झणझणिती टाळ ॥ १ ॥
कण्या भाकरींचें खाणें । गांठीं रामनाम नाणें ॥ २ ॥
बैसावयासी कांबळा । द्वारीं तुळसी रंगमाळा ॥ ३ ॥
घरीं दुभे कामधेनु । तुपावरी तुळसीपानु ॥ ४ ॥
फराळासी पीठ लाह्या । वेळोवेळां पडती पायां ॥ ५ ॥
नामा म्हणे नलगे कांहीं । चित्त रंगलें हरीचे पायीं ॥ ६ ॥

[८३२]

रविरश्मि धरोनि [1]स्वर्गीं जाऊं येईल । [2]परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ १ ॥
वैतरणी उतरोनि वैकुंठा जाऊं येईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ २ ॥
स्वप्नींचा ठेवा साचहि होईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ ३ ॥[3]
मायबाप बंधू भगिनी मिळे योनी । [4]परि साधुची मिळणी भाग्ययोगें ॥ ४ ॥
तपें व्रतें दानें गोविंद पैं भेटे । परि साधु तंव न भेटे भाग्येंविण ॥ ५ ॥[5]
नामा म्हणे केशवा बरा साधुसंग । या वेगळा भवरोग न तुटे न तुटे ॥ ६ ॥

[८३३]

आजी महासुखें सृष्टी भरली भाग्यवंती । जालीसे विक्ती पापा तापा ॥ १ ॥
चालिले देखोनि वैष्णव जगजेठी । उभविती वैकुंठीं गुडिया देव ॥ २ ॥
आले आलेरे हरीचे डिंगर । वीर वारीकर पंढरीचे ॥ ३ ॥
ज्याची चरणधुळी उधळे गगनपंथें । ब्रह्मादिकां तेथें जाली दाटी ॥ ४ ॥
एकमेकांपुढें उडविती माथें । म्हणती आम्हातें लागो रज ॥ ५ ॥
भक्ति प्रेमभाव भरले ज्यांच्या अंगीं । नाचती हरिरंगीं नेणताती लाजू ॥ ६ ॥
हर्षें निर्भर चित्तीं आनंदें डोलती । हृदयीं कृष्णमूर्ती भेटों आली ॥ ७ ॥
कोंदलें हरिरूप देखती विश्वाकार । सुटले पाझर नयन कमळीं ॥ ८ ॥
गुढिया रोमांकुरीं सात्त्विकें दाटले । गर्जती विठ्ठले नामघोष ॥ ९ ॥

अभंग ८३१ व ८३२—(पं.) व (शि.), ८३३—(आ.)
१ गगना (शि.) २ परी साधु न भेटेल भावेंविण (शि.) ३ तिसरे कडवे (शि.) प्रतीत नाही.
४ परी साधु निर्वाणीं न मिळती कोठें (शि.) ५ पाचवे कडवे (शि.) प्रतीत नाही.

मोरपिसा कुंचे भाट गरुड टके । भार ते नेटके मिरविताती ॥ १० ॥
तेथें केशवाचें नामें तनु हे तुळिका केली । पायघडी घातली हरिच्या दासा ॥ ११ ॥

[८३४]

ध्वजा कुंचे गरुडटके । वैष्णव चालिले नेटिकें ॥ १ ॥
आलें वैष्णवांचें दळ । भेणें पळे कळिकाळ ॥ २ ॥
तुळसी मंजरीचे भाले । देखोनि यमदूत पळाले ॥ ३ ॥
ऐकोनी नामाचा गजर । प्रेमें डुल्लतसे शंकर ॥ ४ ॥
नामा म्हणे भक्ति गाढी । सेवा न सोडी अर्ध घडी ॥ ५ ॥

[८३५]

आला वैष्णवांचा मेळ । पळाला हो कळिकाळ ॥ १ ॥
आले आले हरिदास । कळिकाळावरी घाला कास ॥ २ ॥[1]
कलमशा पडियेला धाक । तो हि देऊं न शके हांक ॥ ३ ॥
पैल नामा केशवाचा । [2]सवें मेळू वैष्णवांचा ॥ ४ ॥

[८३६]

भक्त केशवाचे आले । दूत यमाचे पळाले ॥ १ ॥
भक्त हरीचे चालिले । हातीं हरिनामाचे भाले ॥ २ ॥
तळपे शांतीचें ओढण । घेती स्वानंदें उड्डाण ॥ ३ ॥
नामा म्हणे निजदास । कळिकाळाचे भरंवसे ॥ ४ ॥

[८३७]

यम सांगू गेला वैकुंठा । देवा सांभाळा जी आपुल्या मठा ।
आम्ही नवजाऊं तयाचिया वाटां । वैष्णव दूत नागवती ॥ १ ॥
कुंभिपाक पडला ओस । दूतां लागला त्रास ।
देवा कोपेल महेश । म्हणोनी सांगावया आलों ॥ २ ॥

---

अभंग ८३४ व ८३५—(पं.) व (शि.), ८३६ व ८३७—(आ.)
१ दुसरा चरण (पं.) व (शि.) प्रतीत नाही. २ संगे भार (पं. व शि.)

देवा तुम्ही एक वोखटें केलें । गंगेसि मृत्यूलोकासी पाठविलें ।
तेणें थोर कार्य नाशिलें । हा प्रसाद गौतमाचा ॥ ३ ॥
ऐसें वैष्णवदूतीं गांजिलों । तुजप्रति सांगावया आलों ।
देवें पाहिजे मना आणिलों । माझें साह्य करावें स्वामी ॥ ४ ॥
विशेष शिंपी नामा । तो पंढरीये पुरुषोत्तमा ।
हाचि बोल ऐकूनि प्रेमा । त्याच्या शिवाणा न जावें ॥ ५ ॥

[८३८]

यम सांगे दूतां कानीं । तुम्ही जातां मेदिनी ।
विष्णुभक्त चुकवुनि । येर बांधोनि आणा ॥ १ ॥
दूत सांगतां यमा । दिंडीपुढें चाले नामा ।
ते नागविती आम्हां । विष्णुदूत म्हणोनी ॥ २ ॥
जे नेणती धर्मवेळा । वाचे न उच्चारिती गोपाळा ।
तयांसि जाचवावें वेळोवेळां । एकविस कुळांसहित ॥ ३ ॥
जे न करिती हरिची भक्ती । तयांसीं जाचवावें पुढतां पुढतीं ।
रघुनाथनाम ज्याच्या कंठीं । त्याच्या वाटे नवजावें ॥ ४ ॥
दिंडी पताका गजर टाळघोषांचा । नाद उमटतो अंबरींचा ।
तेथें पाड नाहीं काळाचा । शिंपी नामा तळपतो केशवरायाचा ॥ ५ ॥

[८३९]

सांडोनि नित्य नेम कर्म । बोलती कळिकाळाचें वर्म ॥ १ ॥
नामधारक नामाचे । जाले डिंगर केशवाचे ॥ २ ॥
टाळ मृदंग वाजती । टके पताका शोभती ॥ ३ ॥
कंठीं तुळसीच्या माळा । वज्र पंजराचा टिळा ॥ ४ ॥
शंख चक्र मुद्रा धरणें । अंगीं मिरवती भूषणें ॥ ५ ॥
संतरज उधळलें । तेणें सर्वांग डवरलें ॥ ६ ॥
सहस्रनामें गर्जित । तेणें पळाले यमदूत ॥ ७ ॥
नामा म्हणे ते माझे सखे । स्वामी विठोबासारखे ॥ ८ ॥

अभंग ८३८—(आ.), ८३९—(पं.)

[८४०]

वैष्णवांचे घरीं मांडिला पाहुणेर । नामाचा बोगर वाढियेला ॥ १ ॥
व्यारे ताटभरी जेवा धणीवरी । आनंद गजरीं रामनाम ॥ २ ॥
होईल पाईरव दुर्जना न सांगावें । एकांति सेवावें नामा म्हणे ॥ ३ ॥

[८४१]

सर्वांभूतीं पाहे एक वासुदेवं । पुसोनियां ठाव अहंतेचा ॥ १ ॥
तोचि संतसाधु ओळखावा निका । येर ते ऐका मायाबद्ध ॥ २ ॥
देखिलिया धन मृत्तिकेसमान । नवविधा रत्नें जैसे धोंडे ॥ ३ ॥
काम क्रोध दोघे घातले बाहेरी । शांति क्षमा घरीं राबवित ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे । विसंबेना त्याचे क्षणमात्र ॥ ५ ॥

[८४२]

नावडे निजांगना शेजेवरी रुचेसी । कीं पतिसेजे जेविं व्यभिचारिणी अप्रीत जैसी ॥ १ ॥
गांधी विष संग्रहीत भक्षणाची नाहीं प्रीत । चकोरा देखत सिद्धी अमावस्या ॥ २ ॥
याचपरी संत वर्ते प्रपंच देह कर्मीं । समुळ बुडे ब्रह्मीं ब्रह्मपणें ॥ ३ ॥
पोसणा पुत्र लटकेंचि बाबा म्हणे । स्वपितयातें अंतरूनि पिंडदान करणें ॥ ४ ॥
बहुरूपी स्त्रियेचे कटाक्ष इतरां दावी । आपण जाणत जीवीं हें मी नव्हे ॥ ५ ॥
शत्रुसभे नाना उपचार होती । ते न लगती कांहीं चित्तीं भूपा ॥ ६ ॥
नामा म्हणे हृदयभानीं योगी निरंजन मनीं । मिथ्या विनोद कानीं क्षणिक जैसा ॥ ७ ॥

[८४३]

आशा नाहीं ज्याला । देव कां मारी तयाला ॥ १ ॥
जेव्हां सुखाची उन्नति । मोह पायासी लागती ॥ २ ॥
सर्वां चित्तीं समभाव । सर्व मानीं वासुदेव ॥ ३ ॥
नामा म्हणे अंगीं प्रेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ ४ ॥

---

अभंग ८४०—(पं.) व (शि.), ८४१ ते ८४३—(आ.)

अनुक्रमणिका

[८४४]

धन्य महाराज जन्मले संसारीं । जे ध्याती अंतरीं नारायणा ॥ १ ॥
नारायण गाय नारायण ध्याय । धन्य त्यासी माय प्रसवली ॥ २ ॥
प्रसवली तया कुळाचा उद्धार । तो तरे निर्धार नामा म्हणे ॥ ३ ॥

[८४५]

प्रतिदिनीं स्वधर्म करी । हरिमूर्ति नमस्कारी ।
भावें भजन वसे शरीरीं । तोचि भक्त हरीचा ॥ १ ॥
अनंत जन्मींचे कांट । तेणेंचि केलें सपाट ।
स्वधर्में करोनियां नीट । शुद्धपक्ष हरि हरि ॥ २ ॥[1]
तेंचि तापसा सामर्थ्य । तेणेंचि जोडिलें तीर्थ ।
त्याचे धरोनि मनोरथ । हरिभजन पथीं लागला ॥ ३ ॥
देवो त्याचा अंकिला । सत्वा न ढळे तो कष्टविला ।
[2]अकर्मी तोचि भला । त्याचें धन्य जीवित्व ॥ ४ ॥
तोचि सफळ सकळीं । सदा निर्मळ सर्वकाळीं ।
जो हरिनामें वाजवी टाळी । तोचि समर्थ त्रिभुवनीं ॥ ५ ॥
नामा हरिरंगीं रंगला । संत चरणीं अनुरंगला ।
तेणें विठ्ठल संतोषला । येऊनि राहिला हृदयकमळीं ॥ ६ ॥

[८४६]

वैष्णवांमाजीं एक बळी । [3]पृथु जाला दुजा महीतळीं ।
हरि नांदे प्रल्हादाजवळी । नारदें वनमाळी दान घेतला ॥ १ ॥
बिभीषणें पूजिला लंके हरी । भीष्में देखिला द्वारकेभीतरीं ।
अर्जुनें केला साह्यकारी । सारथि हरि पांडवांचा ॥ २ ॥
उद्धवें तप केलें समर्थ । अक्रूर नित्य वंदनार्थ ।
गाई गोपिका गोपाळांत । तो स्तन पीत यशोदेचें ॥ ३ ॥

---

अभंग ८४४ ते ८४६—(पं.) व (शि.)

१ हा चरण (पं.) प्रतीत पुढीलप्रमाणे आढळतो—
तेणें मागिल सरस पाठा । पुढें शुद्ध पथ हारीचा ।

२ सत्कर्मी चांगला (पं.) ३ पृथु राजा महीतळीं (पं. व शि.)

अनुक्रमणिका

नंदा वसुदेवा लाधलें । बळि देवें ऐसेंचि पुण्य केलें ।
उग्रसेनें तप साधिलें । रत्न साधिलें रुक्मिणीनें ॥ ४ ॥
गरुड हनुमंत शेषादिक । नित्य जाले हरिचे सेवक ।
चरणींच्या उदका शिवादिक । नित्य मस्तक खालाविती ॥ ५ ॥
ऐसा दुर्लभ हरिराजा । वर्णितां होती चतुर्भुजा ।
जड जीवां तारिल केशवराजा । उभारोनि भुजा सांगे नामा ॥ ६ ॥

[८४७]

सदा विचरती जनीं वनीं रानीं । मुखीं चक्रपाणि जपतसे ॥ १ ॥
विरक्तीची मात असे कोण्या गुणें । नामाचें चिंतन योगिराज ॥ २ ॥
तेव्हां योगियासी कीर्तनाचे ध्यास । मुक्ती चारी त्यास हात जोडी ॥ ३ ॥
पंढरीस उभा राहे पांडुरंग । तीर्थ चंद्रभागा नामा म्हणे ॥ ४ ॥

[८४८]

जयाचेनि तीर्थां आलें तीर्थपण । केली सांठवण हृदयीं ती ॥ १ ॥
नवल महिमा हरिदासां जीवीं । तीर्थें उपजवी त्यांचे कुसीं ॥ २ ॥
वाराणसी प्राणी मरे अंतीं कोणी । तया चक्रपाणि नामें तारी ॥ ३ ॥
नामा म्हणे तीर्थें तया येती भेटी । वोळंगती दृष्टी त्रिभुवना ॥ ४ ॥

[८४९]

सत्वसमाधानी कर्मनिष्ठ जाण । अखंडित ध्यान रामकृष्ण ॥ १ ॥
सत्संग सर्वदा साक्ष सर्व देहीं । सर्वांभूतीं पाही अंशमात्रें ॥ २ ॥
आपणासमान सर्वत्र पाहाती । अन्य सर्वांभूतीं रामविष्णु ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें सकळिकें संमत । नामीं सदोदित भक्तिमार्ग ॥ ४ ॥

[८५०]

गौतम वसिष्ठ आणि विश्वामित्र । भारद्वाज अत्रि कश्यपादि ॥ १ ॥
बळी हनुमंत बिभीषण नळ । दुष्ट अजामिळ वाल्हा श्रेष्ठ ॥ २ ॥

अभंग ८४७ ते ८४९—(आ.), ८५०—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

उद्धव अर्जुन अंगद अगस्ति । सर्वांभूतीं भक्तिभाव ऐक्य ॥ ३ ॥
नामा म्हणे सदा साधु संत जन । जनीं जनार्दन आत्मा एक ॥ ४ ॥

[८५१]

तोचि पुराणिक जो होय कृतार्थ । विषयीं विरक्त विधि पाळी ॥ १ ॥
मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास । सर्वस्वें उदास देहभावो ॥ २ ॥
नामा म्हणे ऐसे संत भेटावे [1]गा देवा । त्यालागीं केशवा हृदय फुटे ॥ ३ ॥

[८५२]

पत्रावळी काढी वैकुंठनायक । धांवुनियां शुक आला तेथें ॥ १ ॥
दाटी पाहुनि द्वारीं मानसीं विचारी । जावया भीतरीं काय काज ॥ २ ॥
हा वाहे प्रसाद स्वहस्तें अनंत । वेचोनियां शीत घाली मुखीं ॥ ३ ॥
घंटानाद वाजे लक्ष द्विजपंक्ती । अक्षयीं वाजती वेळोवेळां ॥ ४ ॥
ऐकोनि विस्मित ऋषिसमुदाव । पुसे धर्मराव देवाजीसी ॥ ५ ॥
सांगतसे खुण वैकुंठनायक । ब्रह्मनिष्ठ एक आला तेथें ॥ ६ ॥
येथुनी उठले धर्म नारायण । बाहेर येऊन पाहताती ॥ ७ ॥
शुकाचिया मिषें व्यासाचा नंदन । सांगतसे खूण जगदीश ॥ ८ ॥
धरुनियां करीं नेला तो भीतरीं । नामा म्हणे करी पूजा त्याची ॥ ९ ॥

[८५३]

नित्य सर्वकाळ पुण्याचिया राशी । हरिनाम आलिया जिव्हेसी ।
नित्य तपानुष्ठानाच्या राशी । कोटि यज्ञासी लाभ जाला ॥ १ ॥
धन्य धन्य त्यांचा वंश । जे जे रतले नामास ।
रामनामीं नित्य सौरस । ते विष्णुदास पवित्र जाणा ॥ २ ॥
पवित्र ते स्वधर्मी । ज्यासीं सर्वकाळ नेम नामीं ।
तयाचें नाम पूर्णकामीं । मनोरथ पुरतील ॥ ३ ॥
नामा जपे नाम हरीचें । सार्थक केलें संसाराचें ।
ओझें फेडिलें पूर्वजन्मींचें । हरि स्मरण केलिया ॥ ४ ॥

अभंग ८५१—(पं.), (धि.) व (बा.), ८५२—(आ.), ८५३—(पं.) व (शि.)
१ गांवां (बा.)

अनुक्रमणिका

[८५४]

एक भानू अवघा सृष्टीचा सोहळा । व्यापूनि सकळा आकाशासी ॥ १ ॥
पवनसिंधुवरी मन वेगें पांखरी । मार्गु पटचक्रीं वैकुंठासी ॥ २ ॥
तोचि भोगी [1]सुख चिदानंदी वासू । संतसंगें प्रकाशु सफळ मग ॥ ३ ॥
नामा म्हणे यासी गुरुकृपा पाहिजे । संतसंगें पाविजे केशवचरण ॥ ४ ॥

[८५५]

धन्य नरदेहीं संतसंग करी । त्रैलोक्य उद्धरी हेळामात्रें ॥ १ ॥
नेणे सुख दुःख शरीराचें भान । अखंड भजन केशवाचें ॥ २ ॥
कर्म करूनियां होय शुचिष्मंत । नामामृतीं प्रीत सर्वकाळ ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें वर्ते देहभावीं । मूढजनां दावी भक्तिमार्ग ॥ ४ ॥

[८५६]

धन्य तोचि देश जेथें संतवास । तापत्रयदोष जाती सत्य ॥ १ ॥
धन्य मातापिता उभयकुळशुद्धता । तोचि भजे संतां निर्धारेंसी ॥ २ ॥
तीर्थरूपीं जळ विलंबें करी निर्मळ । संतदर्शनें तत्काळ शुद्ध होती ॥ ३ ॥
धातुमय मूर्ति चिरकाळें फळती । संतांचे संगतीं निजस्वार्थ ॥ ४ ॥
नामा म्हणे मुक्ति जे नर इच्छिती । संतांचे संगतीं धरती भाव ॥ ५ ॥

[८५७]

कपटाचें कुपथ्य जालें तुझें पोटीं । स्मरावा जगजेठी कृपाळु तो ॥ १ ॥
नाम औषध घ्यावें नाम औषध घ्यावें । संतांचे लागावें समागमीं ॥ २ ॥
त्यापाशीं औषध आहे नानाविध । रामकृष्ण गोविंद म्हणती वाचे ॥ ३ ॥
पुत्रस्नेहें कैसा अजामेळ स्मरला । तेणें तो उद्धरला क्षणमात्रें ॥ ४ ॥
राम राम म्हणतां तारिली कुंटिणी । वैकुंठभुवनीं तये वासु ॥ ५ ॥
तेंचि हें औषध प्रल्हादें घेतलें । तें तूं घे उगलें म्हणे नामा ॥ ६ ॥

अभंग ८५४—(शि.), ८५५ ते ८५७—(पं.) व (शि.)
१ चिदानंदी आनंद निवासु। (शि.)

[८५८]

संतांपायीं माथा धरितां सद्भावें । तेणें भेटे देव आपेंआप ॥ १ ॥
म्हणवूनि संतां अखंड भजावें । तेणें भेटे देव आपेंआप ॥ २ ॥
साधुपाशीं देव कामधंदा करी । पीतांबर धरी वरी छाया ॥ ३ ॥
नामा म्हणे देव इच्छी संतसंग । आम्हां जिवलग जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

[८५९]

बहुरुप्या ब्राह्मणा पडियेलें मित्र । दोहींचें तें गोत्र एक जालें ॥ १ ॥
वेश्या पतिव्रते पडियेला शेजार । दोहींचा आचार एक जाला ॥ २ ॥
संग तोचि बाधी संग तोचि बाधी । कुसंग तो बाधी नारायणा ॥ ३ ॥
नामा विष्णुदास सत्संगति बोधला । आत्मा हा लाधला पांडुरंग ॥ ४ ॥

[८६०]

जायाचें [1]सोंवळें जायाची ही चोळी । जायाची गरसोळी तीहि जाय ॥ १ ॥
जिणें हें जायाचें जिणें तें जायाचें । तें पैल कोणाचें देणें आहे ॥ २ ॥
जायाचा आचार जायाचा विचार । जायाचा भ्रतार क्षणभरी ॥ ३ ॥
नामा म्हणे अवघें जिणें तें जायाचें । संतसंगतीचें सुख घ्यावें ॥ ४ ॥

[८६१]

संतसंगतीचें काय सांगूं सुख । आपण पारिखें नाहीं तेथें ॥ १ ॥
साधु थोर जाणा साधु थोर जाणा । साधु थोर जाणा कलियुगीं ॥ २ ॥
इहलोकीं तोचि सर्वांभूतीं सम । शरीराचा श्रम नेणे कदा ॥ ३ ॥
नामा म्हणे गाय दूध एक सरे । साधु निरंतर वर्ते तैसा ॥ ४ ॥

[८६२]

भोळ्या भाविकांचें वचन नुल्लंघी । फिरतसे संगें तयामागें ॥ १ ॥
मी एक अभक्त मी एक अभक्त । मी एक अभक्त पापराशी ॥ २ ॥

---

अभंग ८५८—(पं.) व (बा.), ८५९ व ८६०—(पं.) व (शि.), ८६१ व ८६२—(आ.)
१ साऊळें (शि. व पं.)

अनुक्रमणिका

नाममाळा दृढ न करी जतन । परि जाणे वर्मखूण संतसंगें ॥ ३ ॥
नामा म्हणे नाहीं तुम्हांसी उपमा । आमुचे स्वधर्म शुद्ध नाहीं ॥ ४ ॥

[ ८६३ ]

परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ १ ॥
कीटकी ध्यातां भृंगी जाला तोचि वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ २ ॥
वनस्पति परिमळु चंदन जाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ३ ॥
अग्निस मिळे तें न ये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ४ ॥
सरिता ओघ जाय सिंधूसी मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा मज देई संतसंग । आणिक कांहीं तुज न मागे बापा ॥ ६ ॥

[ ८६४ ]

येतां जातां थोर कष्टलों गर्भवासीं । पडिलों गा उपवासी प्रेमेंविण ॥ १ ॥
बहुतांचा सेवकु जाला काकुळती । न पावे विश्रांति कधीं काळीं ॥ २ ॥
ऐसें माझें मन सिणलें नानापरी । घालीन आभारी संतांचियां ॥ ३ ॥
वियोगें संतांच्या व्याकुळ चिंतातुर । हिंडे दारोदार दीन रूपें ॥ ४ ॥
परि कोणी संतांच्या न घालिती चरणीं । तळमळी अनुदिनीं श्रांत सदा ॥ ५ ॥
माझें माझें म्हणवूनि जया घाली मिठी । दिसें तेचि दिठी नाहीं होय ॥ ६ ॥
तया शोकानळें संतप्त आंदोळे । गेलें तें न मिळे कदा काळीं ॥ ७ ॥
न देखत ठायीं देखावया धांवें । भ्रांति भुले भावें नाना मार्गी ॥ ८ ॥
तुझा स्वरूपानंदु नाहीं ओळखिला । जाहली विठ्ठला हानि थोर ॥ ९ ॥
लोहाचा कवळु लागला परिसातें । पढिये सवतिं होय जेंवी ॥ १० ॥
नामा म्हणे तैसी भेटी संतचरणीं । करूनि त्रिभुवनीं होईन सरता ॥ ११ ॥

[ ८६५ ]

सुख सांगावें संतांपुढें । [1]जेणें सुख [2]अधिक [3]वाढे ॥ १ ॥
आणिक न करावें शहाणें । प्रेम दिठावले झणें ॥ २ ॥

अभंग ८६३--(आ.), ८६४--(पं.), ८६५--(पं.) व (शि.)
१ 'जेणें' व 'सुख' ह्या शब्दांमध्ये 'संगे' हा शब्द अधिक आहे. (पं. व शि.) २ 'अधिक' हा शब्द नाही. (पं. व शि.) ३ जोडे (शि.)

अनुक्रमणिका

खंडितां कल्पनेचा लाग । त्यासि असावा अनुराग ॥ ३ ॥
तोडितां वासनेचा तंतु । त्यासि असावा एकांतु ॥ ४ ॥
गिळी अहंतेचें बीज । त्याचें व्हावें चरणरज ॥ ५ ॥
नामा म्हणे त्याचे संगतीं । चित्ता आपेंआप येईल निवृत्ति ॥ ६ ॥

[८६६]

वासनेविरहित होवोनि एकवट । असावें निकट संतसंगें ॥ १ ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । करावें दास्यत्व हरिभक्तांचें ॥ २ ॥
नामा म्हणे केशवा तरीच शरणांगत । नाहीं तरी पतित म्हणा मातें ॥ ३ ॥

[८६७]

संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निबलोण उतरावें ॥ १ ॥
तेथेंचि निश्चळ राहे माझ्या मना । मग तुज यातना नव्हती कांहीं ॥ २ ॥
संतांचे द्वारींचा होई द्वारपाळ । तुटे मायाजाळ मोहपाश ॥ ३ ॥
संतांचे प्रसाद सेविसी उरले । आयुष्य सरलें दुणावेल ॥ ४ ॥
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तिबोधु प्रेमसुख ॥ ५ ॥

[८६८]

आपुलें शरीर घालूनियां पुढें । पडे वाडेंकोडें सर्वभावें ॥ १ ॥
नाम आवडती नानाभूत सृष्टि । देखेन मी दृष्टि ब्रह्मरूप ॥ २ ॥
विष्णुरूप सर्व भवीं अखंडित । मानी सर्वभूत आत्मा माझा ॥ ३ ॥
नामा म्हणे सत्य सत्य जे बोलती । ज्यांचे पायींची माती इच्छितसें ॥ ४ ॥

[८६९]

संतांचें लक्षण ओळखावया खूण । जो दिसे उदासीन देहभावा ॥ १ ॥
सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा । वाचे वसे चाळा रामकृष्ण ॥ २ ॥
त्या संतांचे चरण देखिले मी दृष्टीं । जळती कल्प कोटी पापराशी ॥ ३ ॥

अभंग ८६६—(आ.), ८६७—(पं.) व (शि.), ८६८ व ८६९—(आ.)

अनुक्रमणिका

जयाच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा । जीवें भावें गोपाळा न विसंबती ॥ ४ ॥
त्याचे अंगणींचा होईन सांडोवा । मग तूं केशवा नुपेक्षिसी ॥ ५ ॥
तुझ्या ध्यानीं ज्यांचें सदा भरलें मन । विश्व तूंचि म्हणोन भजती भावें ॥ ६ ॥
त्याच्या उष्टावळीचा होईन मागता । तरीच पंढरीनाथा भेटी देसी ॥ ७ ॥
ऐसे नित्यानंदें बोधें जे निवाले । ते जीवावेगळे न करी नाम्या ॥ ८ ॥

[ ८७० ]

माझे मायबाप साधुसंतजन । माझे जीवप्राण अंतरीचे ॥ १ ॥
भवभयाहूनि तारियेलें मज । बाळेभोळे गुज प्रेम दावी ॥ २ ॥
रंकाहूनि रंक जालों मी सेवक । ब्रह्मादिक [1]देख इच्छिती सुख ॥ ३ ॥
नामा म्हणे संतभाग्य अलौकिक । [2]शुद्ध निष्कलंक पुण्यरूप ॥ ४ ॥

[ ८७१ ]

आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥
[3]कल्पनेची बाधा [4]न हो कोणे काळीं । हे [5]संत मंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥
[6]नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥[7]

अभंग ८७०--(शि.) व (पं.), ८७१--(पं.), (शि.), (धु.) व (बा.)
१ देव (शि. व पं.) २ विष्णुदास नामा कीर्ति वाखाणित ॥ (पं.) ३ वासनेची (धु.) ४ नव्हे कदा (पं. व धु.) ५ भक्त (धु.) ६ शरीर प्राणांची करीन कुरवंडी। क्षण एक न संडी संग त्याचा ॥ हा चरण (बा.) प्रतीत मिळतो. ७ नामा म्हणे माझी खेचर माऊली। कृपेची साऊली केली मज ॥ हा चरण (धु.) प्रतीत अधिक मिळतो.

• • •



अनुक्रमणिका

[ ८७२ ]

जगत्रयजीवन अंतर्निष्ठ ज्ञान । तरी संतासीं शरण रिघिजे भावें ॥ १ ॥
हेचि भक्ति ज्ञान वैराग्याचे निधी । विवेकेंसीं बुद्धि नांदे माझी ॥ २ ॥
हे श्रवणाचे श्रवण मननाचे मनन । हेचि निजध्यासन वैराग्याचे ॥ ३ ॥
म्हणोनि बैसलों संतांचे संगतीं । गोविंदा विश्रांति गहिनीनाथ ॥ ४ ॥

[ ८७३ ]

बैसोनि एकांतीं गुरुगम्य गोष्टी । वेदांत परिपाठी शास्त्र बोध ॥ १ ॥
नित्यशुद्धबुद्ध निर्विकार पूर्ण । उमेसी जें ज्ञान शिव सांगे ॥ २ ॥
तेंचि सच्चिदानंद साकार जीव प्राण । शरीर जाय क्षीण जयापरी ॥ ३ ॥
तेंचि हें 'सर्व विठोबाचें नाम । निराईस प्रेम गहिनीनाथीं ॥ ४ ॥

[ ८७४ ]

बैसलियां दोघें भ्रतारवल्लभें । उदरींचा गर्भ तेंचि ध्यान ॥ १ ॥
भक्ति नवमास भरले पूर्ण दिवस । आलें वैराग्य डोळस मूर्तिमंत ॥ २ ॥
विठ्ठल आवडी ठेवियेलें नाम । निराईस प्रेम गहिनीनाथीं ॥ ३ ॥

[ ८७५ ]

व्रतबंधदीक्षा उपदेश गायत्री । ॐकार मूळमंत्री स्वर सोळा ॥ १ ॥
केलें वेदपठण काव्य आणि व्याकरण । जालासे निपुण शास्त्रवक्ता ॥ २ ॥
मग पुष्करादि तीर्थें पाहावीं समस्तें । अनुताप चित्तें धरियेला ॥ ३ ॥
वैराग्यपुतळा ज्ञानगम्य मूर्ति । निघालासे भक्ति तीर्थाटणा ॥ ४ ॥
विठ्ठलें वंदुनी मातापिता दोन्हीं । मग तीर्थाटणीं मुहूर्त केला ॥ ५ ॥

[ ८७६ ]

आला द्वारावती पाहिली कृष्णमूर्ति । जे मोक्ष विश्रांति मुमुक्षूंची ॥ १ ॥
धरी मछावतार केला शंखोद्धार । देव मुक्तिमाहेर पांथिकांचें ॥ २ ॥
तेथोनि सत्वर आला पिंडारका । मंगळहडीहुनी द्वारका देखियेली ॥ ३ ॥

अभंग ८७२—(तं.), (भा.) व (ज.), ८७३—(तं.) व (बा.), ८७४—(तं.), (भा.) व (ज.), ८७५—(ज.), ८७६—(पं.), (तं.), (भा.), (घु.) व (ज.)

१ सर्वत्र (बा.)

सुवर्णाची नगरी ब्राह्मणा दिधली । ते पुरी पाहिली सुदामयाची ॥ ४ ॥
मंडपाकार शोभे तो माधव । रुक्मिणी विवाहो जाला जेथें ॥ ५ ॥
संपादुनी गेला अवतारकृत्य । तें भालुकातीर्थ देखियेलें ॥ ६ ॥
पश्चिमे प्रभासलिंग देखियेलें । सोरटी वंदिलें सोमनाथा ॥ ७ ॥
मुचकुंदाची गुंफा काळयवन उभा । विश्रांती पद्मनाभा धवलपुरीं ॥ ८ ॥
मार्गींचीं तीर्थें करूनी समस्तें । आला शक्ति जेथें सप्तशृंगा ॥ ९ ॥
अरुणा वरुणा प्राची गोदावरी । ते कपाळेश्वरीं पूजा केली ॥ १० ॥
पुढें ज्योतिर्लिंग देखिलें त्र्यंबक । कुशावर्ती उदक स्वीकारिलें ॥ ११ ॥
वंदूनिया गंगाद्वार सव्य ब्रह्मगिरी । मग भीमाशंकरीं आनंदला ॥ १२ ॥
देखोनियां भीमा आठवे पंढरी । विठ्ठला अंतरीं पांडुरंग ॥ १३ ॥

[ ८७७ ]

ऐसा नित्यानित्य चालतां सुपंथीं । पदोपदीं कीर्ति नामघोष ॥ १ ॥
आला आळंकापुरीं इंद्रायणी-तीरीं । स्नानसंध्या करी देवपूजा ॥ २ ॥
देखोनी सुब्राह्मण केलेंसे नमन । वंदिले चरण सिदोपंतीं ॥ ३ ॥
कोण तुमचा गांव आलेति कोठुन । काय अभिधान गमन कोठें ॥ ४ ॥
विठ्ठलाचें नाम रामेश्वरीं भाव । वृत्ति आपेगांव गोदातीरीं ॥ ५ ॥
मातापिता वृद्ध वसताती तेथें । द्वारकादि तीर्थें करुनी आलों ॥ ६ ॥
आजि धन्य भाग्य स्वामीचें आगमन । आश्रम पावन कीजे माझा ॥ ७ ॥
आणुनी मंदिरीं सारुनी भोजन । निद्रा करविली पूर्ण तया हातीं ॥ ८ ॥
तंव स्वप्न अवस्थेमाजी येउनि पंढरीनाथ । म्हणे कन्या सालंकृत द्यावी यासी ॥ ९ ॥
प्रातःकाळ जाला नित्यनेमु सारिला । मग नमस्कार केला सिदोपंतीं ॥ १० ॥
वंदोनियां चरण सांगितलें स्वप्न । कन्यापाणिग्रहण कीजे तुम्ही ॥ ११ ॥
हांसोनी उत्तर बोले पैं सारांशें । आज्ञा श्रीनिवासें केली नाहीं ॥ १२ ॥
आजिचा सुदिन स्वस्थ करुनी मन । वंदिले चरण सिदोपंतीं ॥ १३ ॥
ऐसे सुसंकल्प हेलावती मनीं । तुळसीवृंदावनीं निद्रा केली ॥ १४ ॥
मग विश्वीं विश्वंभर व्यापुनियां स्थानीं । येऊनियां स्वप्नीं काय बोले ॥ १५ ॥
भक्ति आणि ज्ञान वैराग्य आवडी । हे वसती उघडीं तुझ्या अंगीं ॥ १६ ॥
मूर्तिमंत चारी जन्मती इच्या उदरीं । म्हणोनि स्वीकारी आज्ञा माझी ॥ १७ ॥

अभंग ८७७—(ज.), (तं.), (भा.) व (धु.)

अनुक्रमणिका

उठोनि विठ्ठलें स्वप्न सांगितलें । हरूषें वंदिले सिदोपंतीं ॥ १८ ॥
पाचारोनी जोशी घटितार्थ पाहिले । गुण उतरले छत्तीसही ॥ १९ ॥
निर्धारिलें लग्न मिळाले ब्राह्मण । निर्विघ्न पूजन केलें आधीं ॥ २० ॥
देवकप्रतिष्ठा ब्राह्मणपूजन । घटिका जाली पूर्ण म्हणती द्विज ॥ २१ ॥
कुळदेवस्मरण म्हणती सावधान । उभयतांचें मन पांडुरंगीं ॥ २२ ॥
जालें पाणिग्रहण विधीसी अर्पण । वंदिले चरण सिदोपंतीं ॥ २३ ॥
पांडुरंगक्षेत्रा मिळालीसे यात्रा । आले पंढरपुरा भक्तराज ॥ २४ ॥
गरुडटके पताका मृदंग वाजती । वैष्णव गर्जती जयजयकारें ॥ २५ ॥
गरुडपारीं उभे दाटी वैष्णवांची । उपमा वैकुंठीची पंढरीये ॥ २६ ॥
राऊळाभीतरीं प्रवेशलीं दोघें । देखियेले उभे पांडुरंग ॥ २७ ॥
कायावाचामनीं पारूषले नयनीं । मस्तक चरणीं ठेवियेला ॥ २८ ॥
विठ्ठलासी ध्यान रामकृष्णमाळा । हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति राया ॥ २९ ॥

[ ८७८ ]

आश्रमविधि करावें पालन । परी विठ्ठलाचें मन तीर्थाटणीं ॥ १ ॥
जाणोनि अंतर म्हणे सिदोपंत । आपुले मनींचा हेत पुरता कीजे ॥ २॥
जावें हो सत्वर यावें स्वस्ति क्षेम । पावले आश्रम सिदोपंत ॥ ३ ॥
विठ्ठलें गमन केलें तेव्हां तीर्थाटणा । मुख्य मुख्य स्थाना अनुक्रमें ॥ ४ ॥

[ ८७९ ]

पाहिलें श्रीशैल्य निवृत्ती संगम । पापराशी भस्म देखतांचि ॥ १ ॥
चालतां सुपंथीं हृदयीं विठ्ठलमूर्ति । मुखीं नामकीर्ति गात चाले ॥ २ ॥
अभोळ नरसिंह श्रीवासुदेव । सकळ देवराव व्यंकटाद्री ॥ ३ ॥
गेला अरुणाचळा करूनी नमन । चिदंबरा दक्षिणमथुरा कावेरी ॥ ४ ॥
वंदुनी जनार्दन गेला रामेश्वरा । हेत जाला पुरा विठ्ठलाचा ॥ ५ ॥

[ ८८० ]

जानकीची शुद्धी करावया गेला । हनुमंत उडाला जेथुनियां ॥ १ ॥
आनंदभरित चालतसे मार्ग । हृदयीं अनुराग आवडीचा ॥ २ ॥

अभंग ८७८ व ८७९—(तं.), (धु.) व (ज.), ८८०— (तं.), (भा.), (धु.) व (ज.)

अनुक्रमणिका

तें स्थान वंदुनी पावला गोकर्ण । हाटकेश्वरीं स्नान करूनियां ॥ ३ ॥
आला कोल्हापुरा लक्ष्मी दरुषणा । पंचगंगे स्नान करूनियां ॥ ४ ॥
प्रीतीचा संगम देखिला कऱ्हाटकीं । थोर जाला सुखी अंतरींचा ॥ ५ ॥
कृष्णेचिया स्नानें कृतकृत्य जाला । माहुली देखिला संगम डोळां ॥ ६ ॥
आला आळंकावती हर्षयुक्त चित्तीं । दिधलें सिदोपंतीं आलिंगन ॥ ७ ॥
विठ्ठल अंतरीं मातापिता पाहावी । आज्ञा म्हणे द्यावी सिदोपंतां ॥ ८ ॥

[८८१]

कुटुंबासहित जावें जी दरुषणा । केलीसे प्रार्थना सिदोपंतीं ॥ १ ॥
सहज बोळवण संतांचें दरुषण । म्हणे केलें मान्य शीघ्र चला ॥ २ ॥
मग विठ्ठलानें मातापिता वंदियेली । स्थिति सांगितली सिदोपंतीं ॥ ३ ॥
चिरंजीव नांदा म्हणती मातापिता । सुख आमुच्या चित्ता थोर जालें ॥ ४ ॥
वस्त्रें अलंकार सिदोपंता दिधले । मग गमन केलें सिदोपंतीं ॥ ५ ॥

[८८२]

असतां सुखरूप मातापिता वृद्ध । वैकुंठा स्वानंदें निघोनी गेलीं ॥ १ ॥
संसाराची चिंता नाहीं विठ्ठलासी । अखंड वृत्तीसी समाधान ॥ २ ॥
जालें वर्तमान ऐकिलें सिदोपंतीं । परम तेणें चित्तीं खेद केला ॥ ३ ॥
येउनी परामर्ष घेतला दोघांचा । म्हणे सांभाळ तुमचा करितो देव ॥ ४ ॥
उदासीन वृत्ति तुमची सर्वकाळ । पदार्थ सकळ पाहिजे तो ॥ ५ ॥
दया करोनी मज आतां सांभाळावें । आळंकापुरीं राहावें सुखरूप ॥ ६ ॥
पुत्रसंतती कांहीं होईल तुम्हांसी । मग येईल चित्तासी तें करा सुखें ॥ ७ ॥
मग मानुनी वचन विठ्ठलें तयाचें । म्हणे हें देवाचें करणें हो ॥ ८ ॥

[८८३]

येऊनि आळंकावती केला क्षेत्रवास । देऊनी चित्तास समाधान ॥ १ ॥
नित्य हरिकथा नामसंकीर्तन । संतांचें दरूशन सर्वकाळ ॥ २ ॥
पंढरीची वारी आषाढी कार्तिकी । विठ्ठल येकाकी सुखरूप ॥ ३ ॥

---

अभंग ८८१ ते ८८३—(तं.), (भा.), (धु.) व (ज.)

अनुक्रमणिका

ऐसा बहुत काळ क्रमिलियावरी । पुत्र अपत्य उदरीं होतां न दिसे ॥ ४ ॥
विठ्ठल म्हणे अवो ऐकतेसी कांते । मज ऐसें वाटतें संन्यास घ्यावा ॥ ५ ॥
देसी आज्ञा तरी जाईन वाराणसी । ऐसें रखुमाईसी म्हणितलें ॥ ६ ॥

[८८४]

रखुमाई म्हणे ऐकतां जी ताता । संन्यास घ्यावा आतां म्हणताती ॥ १ ॥
संतती वांचूनि न घ्यावा संन्यास । ऐसें सांगावें त्यांस म्हणितलें ॥ २ ॥
निरोपाची वाट पाहे भलत्या मिसें । रखुमाई असे सावधान ॥ ३ ॥
असतां दुश्चितपणें निरोप पुसिला । जा जा म्हणे दिधला अवसरु ॥ ४ ॥
जाऊनि विठ्ठलें घेतला संन्यास । चिंता रखुमाईस पडली भारी ॥ ५ ॥

[८८५]

करावें सार्थक रखुमाईनें तेव्हां । आरंभिली सेवा अश्वत्थाची ॥ १ ॥
जाणोनी पैं देवें उग्र अनुष्ठान । तेथें जालें येणें श्रीपादाचें ॥ २ ॥
देखोनि सत्पात्र केला नमस्कार । सारांश उत्तर बोलियेलें ॥ ३ ॥
पुत्रवती होई दिधला आसीर्वाद । रखुमाईसी विनोद वाटियेला ॥ ४ ॥
माते तूं हांससी श्रीपाद पुसती । स्वामी पुत्र कैसे होती पतीविण ॥ ५ ॥
भ्रतारें जाऊनी घेतला संन्यास । स्वामीन्चे वचनास नलगे बोल ॥ ६ ॥
पुसतां खाणखूण निश्चयो बाणला । श्रीपाद बोलिला सत्य सत्य ॥ ७ ॥
रखुमाईसी पुसे असे तुझें कोणी । येरी कर जोडोनी बोलियेली ॥ ८ ॥

[८८६]

मातापिता घरीं आहेती समस्तें । वर्तमान तयातें श्रुत करूं ॥ १ ॥
कृपा करूनी यावें तुम्हीं आश्रमासी । सनाथ करावयासी कृपादृष्टि ॥ २ ॥
नेऊनी आश्रमा दिधलें आसन । केलें श्रुत वर्तमान सिदोपंतीं ॥ ३ ॥
अर्घ्यपाद्यपूजा भोजन सारिलें । मग वर्तमान पुसिलें सिदोपंतीं ॥ ४ ॥
श्रीपाद म्हणती रामेश्वरीं भाव । तंव येथें हा अभिप्राव जाला ऐसा ॥ ५ ॥
आतां फिरोनियां जाणें वाराणसी । घेऊनी रखुमाईसी तुम्ही यावें ॥ ६ ॥

---

अभंग ८८४ ते ८८६—(है.), (तं.), (भा.), (धु.) व (ज.)

[८८७]

श्रीपाद म्हणती याच्या दोषास्तव । माझें पुण्य सर्व लया जातें ॥ १ ॥
मिदोपंत म्हणत तुम्ही दयावंत । सीघ्र गमनार्थ कीजे स्वामी ॥ २ ॥
जाउनी वाराणसीं मठीं प्रवेशले । मग पाचारिलें चैतन्यासी ॥ ३ ॥
तुझें कोणी होतें सत्य सांग आतां । अन्यथा बोलतां उरी नाहीं ॥ ४ ॥
चैतन्यें चरणीं ठेवियेला माथा । म्हणे त्यागुनी कांता आलों स्वामी ॥ ५ ॥
उठवोनी श्रीपादें दिधलें आश्वासन । म्हणतां करी पाणिग्रहण इचें आतां ॥ ६ ॥
अविधि कर्माचें न धरावें भय । यासी आहे साह्य जगदीश ॥ ७ ॥
स्वदेशा जाउनी करावा आश्रमु । सुखरूप स्वधर्मु चालवावा ॥ ८ ॥
श्रीपादें मस्तकीं हात ठेवियेला । निरोप दिधला चैतन्यासी ॥ ९ ॥

[८८८]

चैतन्याश्रम संन्यासी जाले गृहवासी । मुळींच्या प्रकृतीसी ऐक्य केलें ॥ १ ॥
हासिन्नले लोक बरवा हा संन्यास । करिती उपहास [१]दर्शनाचा ॥ २ ॥
द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेलें । सेखीं उपेक्षिलें आप्तवर्गी ॥ ३ ॥
ऐसी बारा वरुषें क्रमिलीं निगुती । तंव जालीसे संतती चौघेंजण ॥ ४ ॥
निवृत्ती ज्ञानेश्वर सोपान मुक्ताबाई । हांसती सकळही ऐकोनि नांवें ॥ ५ ॥
जालीं उपवरें व्रतबंधा योग्य । उभयतां उद्वेग चिंतातुरें ॥ ६ ॥
जातिकुळावेगळी पडियेली निराळी । माझी वंशावळी प्रायश्चित्त ॥ ७ ॥
मेळविले द्विज केली ब्रह्मसभा । क्षमा अपराधा करा दीना ॥ ८ ॥
निबंधीं निर्णय पाहती धर्मशास्त्रीं । तुम्हीं अति श्रौती परायण ॥ ९ ॥
सांगाल तें मान्य म्हणती साहीजणें । शुची हें करणें पतितांसी ॥ १० ॥
निवृत्ती म्हणे तुम्ही भूदेव प्रत्यक्ष । दर्शनेची मोक्ष जडमूढा ॥ ११ ॥

[८८९]

पाहतील ग्रंथ सभाश्रेष्ठ महाजन । वैदिक शास्त्रज्ञ पुण्यश्लोक ॥ १ ॥
देहान्त प्रायश्चित्त असे या बोलिलें । विचारूनि भलें हित करा ॥ २ ॥

अभंग ८८७ ते ८८९—(है.), (त.), (भा.), (धु.) व (ज.)
१ दुर्जनाचा (भा.)

अनुक्रमणिका

म्हणती द्विजवर आणिक नाहीं उपाव । संस्कारें देह करा शुद्ध ॥ ३ ॥
श्रीपाद म्हणती अवश्य करीन । देह हे दंडीन अनुतापें ॥ ४ ॥
त्रिवेणी संगमीं घालीन कर्वती । गेला पूर्वस्थिती वीतरागें ॥ ५ ॥
दारापुत्रगृह त्यजुनी निघाला । नमस्कार केला द्विजवृंदा ॥ ६ ॥
झडझडां जाती परतोनी न पाहती । नाहीं पुनरावृत्ति म्हणती द्विज ॥ ७ ॥
त्याग आणि वैराग्य हेंचि प्रायश्चित्त । मग जाला शुचिर्भूत गुरुकृपें ॥ ८ ॥
निवृत्ती म्हणती आम्हां कवण गती । सांगावें [1]श्रीमंतीं विचारूनी ॥ ९ ॥

[ ८९० ]

म्हणती सकळ द्विज जावें प्रतिष्ठाना । तेथुनी पत्र आणा तें वंद्य करूं ॥ १ ॥
नाहीं जाती कुळ वर्ण अधिकार । क्षेत्रीं वैश्य शूद्र द्विज नव्हों ॥ २ ॥
नव्हों देवगण यक्ष ना किन्नर । ऋषि निशाचर तेही नव्हों ॥ ३ ॥
ते आम्ही अविनाश अव्यक्त जुनाट । निजबोधें इष्ट स्वरूप माझें ॥ ४ ॥
नव्हों आप तेज वायू व्योम मही । महत्तत्व तेंही विराट नव्हों ॥ ५ ॥
नव्हें मी सगुण नव्हें मी निर्गुण । अनुभूतीं भजन होउनी नव्हें ॥ ६ ॥
निवृत्ति म्हणतसे ऐकें ज्ञानेश्वरा । माझी परंपरा ऐसी आहे ॥ ७ ॥

[ ८९१ ]

विधी वेद विरुद्ध संपर्क संबंध । नाहीं भेदाभेद स्वस्वरूपीं ॥ १ ॥
अविधि आचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला ॥ २ ॥
स्वधर्म अधिकार जातीपरत्व भेद । उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥ ३ ॥
म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें । जनां दाखवावें वर्तोनियां ॥ ४ ॥
कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ॥ ५ ॥
प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां । पावन अवस्था जरी जाली ॥ ६ ॥
ज्ञानदेव म्हणे ऐकाजी निवृत्ति । बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ॥ ७ ॥

---

अभंग ८९०—(तं.), (भा.), (धु.) व (ज.), ८९१—(है.), (तं.), (भा.), (धु.) व (ज.)
१ संतीं (भा.)

अनुक्रमणिका

[८९२]

हेंचि आम्हां श्रेष्ठ बोलिले 'परनिष्ठ । असतां दुर्घट परी सेव्य ॥ १ ॥
पांडवांचें कुळ शोधितां 'निर्मळ । कुंड जार गोळ बुद्धिकांसी ॥ २ ॥
भक्ति हे सरती जाति न सरती । ऐसी आत्मस्थिती स्वसंवेद्य ॥ ३ ॥
दुर्वास वसिष्ठ अगस्ति गौतम । हे ऋषि उत्तम कुळींचे कैसे ॥ ४ ॥
व्यास आणि वाल्मिक कोण कुळ तयांचें । तैसेंचि आमुचें सोपान म्हणे ॥ ५ ॥

[८९३]

देऊनियां पत्र निघालीं सत्वर । करूनि नमस्कार सकळांसी ॥ १ ॥
जाउनी राहिले भोगावती तीरीं । तीर्थयात्रा बरी 'संपादिली ॥ २ ॥
अनाथें पतितें शरणागत दीनें । अनाथ करणें कृपादृष्टि ॥ ३ ॥
केली ब्रह्मसभा बैसले वरिष्ठ । होतें तैसें स्पष्ट निवेदिलें ॥ ४ ॥
पत्र वाचुनियां सकळां जालें श्रुत । संन्याशाचे पुत्र कळों आलें ॥ ५ ॥
नाहीं प्रायश्चित्त उभयतां कुळभ्रष्ट । बोलियेले श्रेष्ठ पूर्वापार ॥ ६ ॥
या एक उपाय असे शास्त्रमतें । अनन्यभक्तीतें अनुसरावें ॥ ७ ॥
तीव्र अनुतापें करावें भजन । गो खर आणि श्वान वंदुनियां ॥ ८ ॥
वंदावें अंत्यज ब्रह्मभावनेसीं । ऐसे पद्धतीसी बोलियेले ॥ ९ ॥
ऐकोनि निवृत्ती संतोषला चित्तीं । धन्य तुमची वदंती तीर्थरूप ॥ १० ॥
ज्ञानदेव म्हणे सांगाल तें मान्य । मुक्ताई सोपान आनंदिलीं ॥ ११ ॥

[८९४]

ऐकोनि ऐसीं नांवें हासिन्नले ब्राह्मण । नामांचें अभिधान सांगा आम्हां ॥ १ ॥
येक म्हणती नामापाशीं काय आहे । ज्ञाना वाहात आहे पखालीसी ॥ २ ॥
ज्ञानदेव म्हणे तोही माझा आत्मा । वेगळिक आम्हां तया नाहीं ॥ ३ ॥
मारिती आसुड म्हैशियाचे पाठीं । तोचि वळ उठे ज्ञानदेवा ॥ ४ ॥
म्हणती द्विजवर अहो ज्ञानदेवा । यापासोनी उच्चारावा वेदध्वनी ॥ ५ ॥
तरीच तुमची समता आम्हां येईल कळों । नाहीं तरी बोलों नका कांहीं ॥ ६ ॥
ज्ञानदेव म्हणे बोल रे ऋग्वेद । ओंकार मूळशब्द प्रणवाचा ॥ ७ ॥

अभंग ८९२—(है.), (तं.), (भा.), (धु.) व (ज.), ८९३—(है.), (तं.), (धु.) व (ज.), ८९४—(है.), (तं.), (भा.) व (ज.)

१ परमनिष्ठ (भा.) २ निर्मुळ (ज., भा. व आ.) ३ विधि संपादिला (तं.)

[८९५]

मग वेदाचा आरंभ करिता जाला पशू । विधी उपन्यासू मांग पढे ॥ १ ॥

करिती आश्चिर्य सकळ द्विजवर । हे तीही अवतार तीन देवांचे ॥ २ ॥

आदिमाया मुक्ताई मुक्तपणें अवतरली । आम्हांपासुनि जाली थोर चुकी ॥ ३ ॥

कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धि । गोवियेलों विधि [1]निषेधाच्या ॥ ४ ॥

नेणों भक्तिज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होऊनि ठेलों ॥ ५ ॥

आणिकांसी सांगों आपण नाचरों । लटिकेच हुंबरों प्रतिष्ठेसी ॥ ६ ॥

धन्य यांचा वंश धन्य यांचें कुळ । धन्य पुण्यशील अवतार हे ॥ ७ ॥

सकळ द्विजवर करिती नमस्कार । आनंदें जयजयकार करिताती ॥ ८ ॥

ज्ञानदेव म्हणे तुमच्या पायांचा महिमा । सामर्थ्य हें आम्हां अंगीं नाहीं ॥ ९ ॥

[८९६]

तुम्हीं वेदरूप भूदेव प्रत्यक्ष । दरुषणेंचि मोक्ष जडमूढां ॥ १ ॥[2]

सकळही तीर्थें तुमच्या वसती पायीं । तेथें आमुचे कायीं उरती दोष ॥ २ ॥

धन्य दिवस आजी जालों कृतकृत्य । भेटलेती संतब्रह्मवृंद आम्हां ॥ ३ ॥

ज्ञानदेवा ध्यान ब्राह्मणाचे चरण । कलिमलछेदन निवृत्ति म्हणे ॥ ४ ॥

[८९७]

जयाचें दरुषण होतांची दुरूनी । सर्व जाय पळोनी पाप ताप ॥ १ ॥

तीर्थांसी पावन कलिमलछेदन । देवाचें कल्याण जयाचेंनी ॥ २ ॥

ते पाय सादृश्य देखिले आजि दृष्टी । याग सहस्र कोटी न तुकती ॥ ३ ॥

जयांच्या हृदयीं वेदांचा निवास । शास्त्रें रहिवास केला होय ॥ ४ ॥

जयांच्या वचनें देवपितर तृप्त । स्वाहा स्वधा होत ज्यांच्या मुखें ॥ ५ ॥

जोडोनियां कर विनवितो सोपान । निश्चयें वचन द्यावें आम्हां ॥ ६ ॥

शेष उच्छिष्टा करावें विभागी । बटुपणालागीं अधिकारी ॥ ७ ॥

अध्यात्मग्रंथ पाहती पैठणीं । गीतासंबोधिनी जवळी असे ॥ ८ ॥

---

अभंग ८९५—(है.), (तं.), (भा.), (ज.) व (आ.). ८९६—(है.), (तं.), (भा.) व (ज.). ८९७—(है.), (तं.), (भा.), (घु.) व (ज.)

१ निःसंदेह (आ.) २ मूळ (आ.) प्रतीत हा अभंग तीन ठिकाणी वेगवेगळा होतो. असा तोडलेला अभंग (तं.), (भा.) व (ज.) प्रतीत मिळतो.

अनुक्रमणिका

भोगावतीं स्नान कालिका दरुषण । वेदांत व्याख्यान परिमिती ॥ ९ ॥
धन्य हा सोपान धन्य ज्ञानदेव । धन्य निवृत्तिराय ब्रह्मरूप ॥ १० ॥
सांगती पुराण रात्रीं हरिकीर्तन । पैठणींचे जन वेधियेले ॥ ११ ॥
तव [1]कव्ययज्ञ जाला गृहस्थाचे घरीं । पितर मंत्रोच्चारीं आव्हानिले ॥ १२ ॥
अवघे द्विजवर म्हणती धन्य धन्य । यासारिखे ब्राह्मण नाहीं कोणी ॥ १३ ॥
उपनिषद्भाग पढिन्नलों वेदांत । परि हें सामर्थ्य नाहीं आम्हां ॥ १४ ॥
नाहीं ऐकिलें ना कोठें वर्तलें । सृष्टीं तेंचि आजि दृष्टीं दाखविले ॥ १५ ॥[2]
पशुमुखें वेद दृश्य इतर लोक । थोर हें कवतुक दाखविलें ॥ १६ ॥
मिळोनि समस्त [3]सोडियेलें शास्त्र । विचारोनी पत्र लिहियेलें ॥ १७ ॥
हें परलोकीचें तारू देवत्रय कोणी । प्रायश्चित्त काय द्यावें कोणी ॥ १८ ॥
लिहोनियां पत्र दिधलें तया हातीं । समस्तांसी निवृत्ति नमस्कारिलें ॥ १९ ॥

[८९८]

घेऊनियां पत्र केली प्रदक्षिणा । साष्टांगीं ब्राह्मणां नमन केलें ॥ १ ॥
मागोनियां म्हैसा नेवाशासी आले । प्राकृत पैं केली गीतादेवी ॥ २ ॥
निवृत्ती म्हणती ऐकें ज्ञानदेवा । अनुभव करावा अमृता ऐसा ॥ ३ ॥
आदिशक्तिमाता वंदुनियां म्हाळसा । मग तेथुनी सरिसा चालियेले ॥ ४ ॥
क्रमिताती मार्ग अनुभव कुशळ । हरिनाम सकळ कवित्वकळा ॥ ५ ॥
येउनी उतरली आळाचिये वनीं । पशु तये स्थानीं शांत जाला ॥ ६ ॥
करूनी तया पूजन सेंदूर तेलें लेपून । आळंकावती निजस्थान प्रवेशली ॥ ७ ॥
साने थोर सकळ तेथील निवासी । निवृत्ति तयांसी नमस्कारिलें ॥ ८ ॥

[८९९]

तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकाशले ॥ १ ॥
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ २ ॥

अभंग ८९८—(है.), (तं.), (भा.), (धु.) व (ज.), ८९९—(पं.), (धु.), (शि.), (है.), (तं.) व (आ.)

१ पितृयज्ञ (भा.)

२ ऐसें ऐकिलें। ना कोठें देखिलें। ये सृष्टींत दाखविलें। आजि दृष्टी॥ (भा.)
ना आइकिले। ना कोठें वर्तले। ये सृष्टीं देखिलें। आजिं दृष्टी॥ (आ.)

३ सोधियलें शास्त्र। (भा.)

अनुक्रमणिका

उपजतांचि ज्ञानी हें वर्म जाणौनि । आले लोटांगणीं चांगदेव ॥ ३ ॥
प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । बोलविला वेद म्हैसीपुत्रा ॥ ४ ॥
[1]संस्कृताच्या सोडोनियां गांठी । केलीसे मराठी गीता देवी ॥ ५ ॥
नामा म्हणे सर्व सुख लाहिजे । एक वेळां जाईजे अळंकावती ॥ ६ ॥[2]

[ ९०० ]

गीता गीता गीता त्रिवार बोलतां । पाप जाय तत्त्वतां मोक्ष जोडे ॥ १ ॥
गीतेचा महिमा बोलवेना वाचे । बंधनें जीवाचीं दूर होती ॥ २ ॥
येक येक अक्षर कोटी अश्वमेध । फळ हें प्रसिद्ध पुराणोक्त ॥ ३ ॥
येकचि तो श्लोक वाचिलिया नेमें । अंतीं परमधाम प्राप्त होय ॥ ४ ॥
नामा म्हणे गीता संपूर्ण वाचितां । लाभ त्याच्या हाता बोलवेना ॥ ५ ॥

[ ९०१ ]

गीता गीता म्हणतां पाप होय नाश । कैवल्यही त्यास प्राप्त होय ॥ १ ॥
गीतेचीं अक्षरें पडतां श्रवणीं । [3]जाय तत्क्षणीं भवभय ॥ २ ॥
येका येका श्लोकीं कोटी अश्वमेध । पुण्यही अगाध म्हणतां गीता ॥ ३ ॥
नामा म्हणे गीता नित्य जो वाचिता । तयाच्या सुकृता पार नाहीं ॥ ४ ॥

[ ९०२ ]

ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्लि प्रगट केली ॥ १ ॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्म विद्येचें दाविलेंसें रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें बैसावें येउनी । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ॥ ६ ॥

---

अभंग ९०० व ९०१—(धु.), ९०२—(आ.)

१ सोहंकृताच्या (आ.) २ खालील ओळी (तं., गो. व है.) प्रतींत अधिक आहेत—
पंढरीहुनि हें सोपें। जनाची हरावया पापें॥
कळिकाळ कोपलिया कोपें। न चळे त्याचे अळंकावतीसी॥

३ तुटे तत्क्षणीं भवव्यथा॥ (धु.)

• • •

अनुक्रमणिका

[ ९०३ ]

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले । लोटांगण घातलें नामदेवें ॥ १ ॥
देऊनि आलिंगन प्रीती पडिभरें । पूजिलें आदरें यथाविधी ॥ २ ॥
धन्य तो अवसरु संत समागमु । करीतसे संभ्रमु आवडीचा ॥ ३ ॥
नामदेव म्हणे सुफळ माझें जिणें । स्वामीच्या दर्शनें धन्य जालों ॥ ४ ॥

[ ९०४ ]

पूर्व पुण्य माझें [1]फळोन्मुख जालें । प्रत्यक्ष भेटले पांडुरंग ॥ १ ॥
संसारीं आसक्त मायामोहें रत । तापत्रयीं संतप्त जाले जीव ॥ २ ॥
ऐसिया पतिताचा करावया उद्धार । यालागीं अवतार तुमचा जगीं ॥ ३ ॥
तरी मी एक दीन मूढ मतिहीनु । चरणींचा रजरेणू संतांचिया ॥ ४ ॥
म्हणोनि पंढरीनाथ पाळितसे मातें । प्रेमजीवन भातें देवोनियां ॥ ५ ॥
आजि स्वामींनीं पाहिलें कृपादृष्टि । केली सुखवृष्टि अनिवार ॥ ६ ॥
नामा म्हणे तुमच्या चरणाचा आधार । ठाकिन पैलपार भवनदीचा ॥ ७ ॥

[ ९०५ ]

ज्ञानदेव म्हणे तूं भक्तशिरोमणी । जोडिले जन्मोनि केशवचरण ॥ १ ॥
प्रेमसुख गोडी तुजची फावली । वासना मावळली [2]सकळ तुझी ॥ २ ॥
धन्य तुझें जन्म धन्य तुझें कुळ । धन्य तुज राऊळ जवळीं असे ॥ ३ ॥
भक्तिप्रेम धन्य साधिलें तुवां सार । केला पैं संसार देशधडी ॥ ४ ॥
क्षणएक एकांती बैसोनी सहज । अंतरींचें गुज बोलों कांहीं ॥ ५ ॥
जीवन्मुक्त ज्ञानी जरी जालें पावन । तरि देवतीर्थभजन न संडिती ॥ ६ ॥
भक्तशिरोमणी धन्य तूं संसारीं । परि एक अवधारी वचन माझें ॥ ७ ॥
भूतळींची तीर्थें पहावीं नयनीं । असे आर्त मनीं आहे मज ॥ ८ ॥
तुझिये संगतीचें नित्य सुख घ्यावें । सार्थक करावें संसाराचें ॥ ९ ॥
ऐसी उत्कंठा बहुत माझे पोटीं । भाग्यें जाली भेटी तुजसी आजी ॥ १० ॥
ज्ञानदेव म्हणे पुरवी मनोरथ । करावा मुहूर्त प्रयाणासी ॥ ११ ॥

---

अभंग ९०३ त ९०५—(है.), (पा.) व (धु.)
(आ.) प्रतीत ९०३ व ९०४ मिळून एकच अभंग होतो.
१ फळासि हें आलें। (आ.) २ समूळ (आ.)

[९०६]

ऐसें ऐकोनी नामा विचारी मानसीं । काय द्यावें यासी प्रतिवचन ॥ १ ॥
विठोबाचे पाय आठविले मनीं । बोले अमृतवचनीं तयाप्रति ॥ २ ॥
सर्व सुख मज आहे पांडुरंगीं । जावें कवणा लागीं [1]कोण्या तीर्था ॥ ३ ॥
आहिक्य परत्रीं मज चाड नाहीं सर्वथा । न लागती पुरुषार्था मुक्ति चारी ॥ ४ ॥
रंक होऊनियां पंढरी चोहटा । राखेन दारवंटा महाद्वारीं ॥ ५ ॥[2]
या सुखाकारणें [3]शरीर कवंतीं [4]फाडिलें । दुर्जय तोडिलें मायाजाळ ॥ ६ ॥
त्रिभुवनींचें वैभव सांडोनियां दुरी । जालोंसे भिकारी पंढरीचा ॥ ७ ॥
कल्पतरूच्री छाया कामधेनूचें दुभतें । संपूर्ण आईतें सर्वकाम ॥ ८ ॥
विठोबाचे पायीं मज काय उणें । परि वासनाचि मनें गिळिली माझी ॥ ९ ॥
जन्मोनी पाळिलों पोशिलों जयाचा । विकिलों कायावाचामनें त्यासी ॥ १० ॥
नामा म्हणे स्वामी विठोबासी पुसा । आज्ञा देईल शिरसा धरीन त्याची ॥ ११ ॥

[९०७]

ज्ञानदेव म्हणे भला भक्तराज । कळलें गौप्यगुज सर्व तुझें ॥ १ ॥
धीर आणि चतुर सर्वस्वें उदार । साजे तुज अधिकार प्रेमभक्ति ॥ २ ॥
धन्य तूं संसारीं भक्तभावशीळ । साधिलें तुवां केवळ प्रेमसुख ॥ ३ ॥
देउनी आलिंगन नामा धरियेला करीं । वंदियेलें शिरीं चरणरज ॥ ४ ॥
राउळा भीतरीं चला जाऊं वेगें । आज्ञा मागों दोघे तीर्थयात्रे ॥ ५ ॥
सत्वर उठोनी आले स्वामी जवळी । मस्तकें ठेवियेलीं चरणावरीं ॥ ६ ॥
जीवींचा निजभावो सांगे ज्ञानदेवो । ऐकोनी पंढरीरावो हासिन्नले ॥ ७ ॥
म्हणे तूं ज्ञानशीळ चिद्रूप केवळ । सबाह्यनिर्मळ स्फटिक जैसा ॥ ८ ॥
[5]सहज तीर्थरूप तूंचि निरंतर । असतां हा विचार काय करिसी ॥ ९ ॥
येरु म्हणे स्वामी बोलिलेती बरवें । परि सार्थक करावें देहाचें या ॥ १० ॥
प्रसंगें नामयाचें संगति सुख घ्यावें । म्हणोनी ज्ञानदेवें धरिले चरण ॥ ११ ॥

---

अभंग ९०६ व ९०७—(है.), (पा.) व (धु.)

१ कवण्या ठाया (आ.) २ (है.) प्रतीत पाचवा व सहावा चरण मिळत नाहीत व मूळ चौथा चरण नवव्या चरणाच्या नंतर आला आहे. ३ शीर (पा. व धु.) ४ फोडिलें (आ.) ५ स्वयें (धु.)

अनुक्रमणिका

[९०८]

हांसोनी पंढरिनाथ पाहे नाम्याकडे । म्हणे नवल केवढें भाग्य तुझें ॥ १ ॥
प्रत्यक्ष परब्रह्म मूर्ति ज्ञानेश्वर । करीतसे आदर संगतीचा ॥ २ ॥
ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें । तरीच जन्मा यावें विष्णुदासा ॥ ३ ॥
जावें स्वस्ति क्षेम यावें शीघ्रवत । करावें स्वहित कळेल तैसें ॥ ४ ॥[1]
सर्वभावें आमचा विसरु न पडावा । लोभ असों द्यावा मजवरी ॥ ५ ॥
परियेसीं ज्ञानराजा बोले जगजीवनु । तूं तंव सर्वज्ञु सुखमूर्ति ॥ ६ ॥
परि एक मागणें आहे तुजप्रती । आठवण चित्तीं असों द्यावीं ॥ ७ ॥
हें कृपेचें पोसणें माझें आवडतें । क्षण जीवापरतें न करीं कदा ॥ ८ ॥
परी तुवां सांकडें घातलें सर्वथा । दाटलें अवस्था हृदय माझें ॥ ९ ॥
आरुष साबडें नामें माझें वेडें । मार्गीं मागें पुढें सांभाळावें ॥ १० ॥
ताहान भूक तुवां जाणावी जीवींची । मज चिंता याची थोर वाटे ॥ ११ ॥
मग नामयाचा हातु धरोनी श्रीपती । देतु असे हातीं ज्ञानदेवा ॥ १२ ॥
रानीं वनीं जनीं ख्रिसंबसी झणीं । धाडितों देखोनी आर्त तुझें ॥ १३ ॥
चरणीं ठेवुनी माथा निघते जाले दोघे । आले चंद्रभागे केलीं स्नानें ॥ १४ ॥
पुंडलिकाचे चरण वंदूनियां माथा । उतरले भीमा पैल तीरीं ॥ १५ ॥

[९०९]

तीर्थयात्रेप्रति बोळविला नामा । आले निजधामा देवरावो ॥ १ ॥
चरण प्रक्षाळाया रुक्मादेवी आली । श्रीमुख न्याहाळी भरोनी दृष्टी ॥ २ ॥
तें निडारले नयन स्वेदें भिजलें वदन । हृदय जालें पूर्ण करुणारसें ॥ ३ ॥
बाप कृपेचा सागरु सुखाचा सुखतरु । आर्त लोभापरु दीनालागीं ॥ ४ ॥
चरणीं ठेवुनी माथा पुसे जगन्माता । आजी कां अवस्था विपरीत देखों ॥ ५ ॥
[2]म्हणे वाटतें जडभारी नाम्याच्या वियोगें । दाटलें उद्वेगें चित्त माझें ॥ ६ ॥
कवण्या सुखें स्थिर न राहे माझें मन । कैं डोळां देखेन प्राण माझा ॥ ७ ॥

---

अभंग ९०८—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.), ९०९—(धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ चौथ्या चरणापासून पुढील सर्व अभंग (धु.) प्रतीत नाहीत.
२ देव म्हणती आजी नाम्याच्या वियोगें। व्यापिलें उद्वेगें हृदय माझें ॥ (है.)

[1]इष्टमित्र बंधु मायबाप सखा । हीं नामें मज देखा ठेविलीं तेणें ॥ ८ ॥
तो कैसा मजवीण राखिल आपुला प्राण । हे चिंता दारुण वाटे मज ॥ ९ ॥
तव ती महामाया म्हणे जी यादव राया । क्षणीं तुमच्या नामया दिठी लागे ॥ १० ॥
शोक मोह दुःख क्षणामाजीं जाळी । तें जीवन त्याजवळीं नाम तुमचें ॥ ११ ॥

[९१०]

माझे भक्त मज अनुसरले चित्तें । त्याहुनि पढियंते मज आणिक नाहीं ॥ १ ॥
व्यक्ति येणें घडे त्याची या आवडी । युगायुगीं प्रौढि हेचि मिरवी ॥ २ ॥
त्याचेनि कृतार्थ असें मी पूर्णकाम । ते माझे परम प्राणसखे ॥ ३ ॥
ते माझे आश्रम मी त्यांचा विश्राम । जीहीं रूपनाम केलें मज ॥ ४ ॥
मी त्यांचा सोयरा ते माझे सांगाती । करी त्यांसी एकांति सुखगोष्टी ॥ ५ ॥
जीहीं तनुमन प्राण लाविला मजकडे । मी तयां आवडे जीवाहुनि ॥ ६ ॥
ते माझ्या भाग्याचे अधिकारी विभागी । वैकुंठ त्या लागीं वसतें केलें ॥ ७ ॥
त्यांचे गुज गौप्य [2]मीची एक जाणें । माझी प्रेमखूण कळली तयां ॥ ८ ॥
मनाची साउली करोनियां माते । भोगिती आतां ते प्रेमसुख ॥ ९ ॥
आपुलियाचीं किरणें विराजे गभस्ती । परी किरणें तीं नव्हती आन जेंवीं ॥ १० ॥
तैसे माझे दास मजमाजीं उदास । असती समरस दुजेनविण ॥ ११ ॥
मी तो भक्तरूप भक्त माझें स्वरूप । प्रभा आणि दीप जयापरी ॥ १२ ॥
हे खूण अनुभवी जाणती ते ज्ञानी । ज्या नाहीं आयणी कासयाची ॥ १३ ॥
त्यांचिये चरणींचें रजरेणु माझें नामें । जें सांडिलें रजतमें सत्वशीळ ॥ १४ ॥
त्यांचे भेटीलागीं हृदय माझें कळवळे । कें देखेन डोळे निवती माझे ॥ १५ ॥

[९११]

तंव ते आवडते भक्त अंतरंग आपुले । देवें बोलाविलें एकांतासी ॥ १ ॥
म्हणे ह्या नाम्यापरतें मज दुजें नावडे । सांगे तयापुढें केशीराजु ॥ २ ॥

अभंग ९१० व ९११—(धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ इष्टमित्र बंधु सोयरा सज्जन । तो मज वांचून न मनी कोणा ॥
मायबाप बंधुपुत्र मीच सखा । ये नामें मज येका ठेविलीं तेणें ॥ (है.)
२ मीच जाणे सर्व (है.) क्रमांक ८ ची ओवी (है.) प्रतीत क्रमांक ५ च्या ओवीनंतर आली आहे.

अनुक्रमणिका

त्या देखतांची दृष्टी मन माझें निवे । वाटे त्या घालावें हृदयामाजीं ॥ ३ ॥
त्याचेनि लोभें मन माझें मोहिलें । अखंड राहिलें त्याचेपाशीं ॥ ४ ॥
मजपरतें दुजें नेणे तो नामा । नित्य माझा प्रेमा पढिये त्यासी ॥ ५ ॥[1]
मी भक्तकाजकैवारी म्हणवितां वाटे लाज । परि म्यां कांहीं नाहीं काज केलें त्यांचें ॥ ६ ॥
धर्म अर्थ काम त्या नाहीं दिधलें । जन्मोनि बांधलें सेवाॠणें ॥ ७ ॥
तेणें आपुलेनि पुरुषार्थें जिंकिला संसार । केला मदमत्सरं देशधडी ॥ ८ ॥
लोभ दंभ दुरळ माया मोह वैरी । घातलें तोडरीं कामक्रोध ॥ ९ ॥
तो न मनीं आणिका देवा न करी त्यांची सेवा । मजपरता विसांवा नाहीं त्यासी ॥ १० ॥
तें मार्गीं शिणलें असेल कोमाईलें । सुखदु:ख आपुलें सांगेल कवणा ॥ ११ ॥
त्याचिया जीवींचें मीच जाणे सर्व । हा माझा अनुभव आहे त्यासी ॥ १२ ॥
तें माझें [2]दास आवडतें अंतरंग । त्यजिला सर्वसंग मजसाठीं ॥ १३ ॥[3]
देखोनी ते आवडी अभिन्नव वाटलें । सप्रेमें दाटले सकळ भक्त ॥ १४ ॥
परसा भागवत आनंदें नाचत । लोटांगणीं येत गरुडपारीं ॥ १५ ॥

[९१२]

ऐसे सुखरूप दोघे चालताती मार्गीं । परी चित्त पांडुरंगीं नामयाचें ॥ १ ॥
क्षणाक्षणा वास परतोनी पाहे । वियोग न साहे पंढरीचा ॥ २ ॥
म्हणे कां गा केशीराजा मोकलिलें मातें । न येसीच सांगातें सांभाळीत ॥ ३ ॥
चिंतातुर थोर पडिलों ये परजनीं । न दिसे माझे कोणी जिवलग ॥ ४ ॥
फुटोनी हृदय होती दोन्ही भाग । बहु मज उद्वेग वाटताती ॥ ५ ॥
तूं माझी जननी तूं माझा जनिता । तूं बंधु चुलता पंढरीराया ॥ ६ ॥
इष्टमित्र तूंचि तूंचि गणगोत । तूंचि कुळदैवत आवडतें ॥ ७ ॥
तूंचि माझें व्रत तूंचि माझें तीर्थ । तूंचि धर्म अर्थ काम देवा ॥ ८ ॥

---

अभंग ९१२––(धु.), (है.) व (पा.)

१ पाचव्या चरणाऐवजी (धु.) मध्ये पुढील ओवी आहे––
मजविण त्यासी कांहींच नावडे। म्हणउनि वोढे चित्त त्याचें ॥

२ आवडते दास (पा.)

३ तेराव्या चरणाऐवजी (है.) प्रतीत पुढील ओळ आहे––
तो माझा मजविण राखिल कैसा प्राण । हे चिंता दारुण कवणा सांगों ॥

अनुक्रमणिका

तूंचि ज्ञानचक्षु तूंचि माझा लक्षू । तूंचि माझा साक्षु स्वभावासी ॥ ९ ॥
साच कीं लटिकें हें माझें बोलणें । तुजवांचुनि जाणें कवण दुजा ॥ १० ॥
नामा म्हणे आपुलें अनाथ सांभाळीं । येऊनी हृदयकमळीं राहे माझ्या ॥ ११ ॥

[ ९१३ ]

ज्ञानदेव म्हणे परियेसी विष्णुदासा । तूं सुखसंतोषा पात्र होसी ॥ १ ॥
प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयीं आला । तूं कां वेळोवेळां खंती करिसी ॥ २ ॥
विचारी सावध होवोनि भक्तराजा । सुखानंदु तुझा तुजची जवळी ॥ ३ ॥
मी नेणें ज्ञानगती नेणें योगयुक्ति । न देखें विश्रांति एकेविण ॥ ४ ॥
सर्वभावें मज तेंचि रूप आवडे । जें पुंडलिकापुढें उभें असे ॥ ५ ॥
तो माझा विठ्ठल [1]दावा दृष्टी भरी । आस मी न करी आणिकांची ॥ ६ ॥
व्यापकु विठ्ठलु आहे सर्व देशीं । जरी सांडोनियां पाहसी भेदभ्रमु ॥ ७ ॥
तो नाहीं ऐसा ठाव उरलासे कवण । [2]सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ८ ॥
काया वाचा मनें मज तोचि व्हावा । गीतीं गातां जीवा सुख वाटे ॥ ९ ॥
ऐकावा श्रवणीं पाहावा तोचि नयनीं । नवजावा जवळोनी दूर कोठें ॥ १० ॥
जें अक्षर अव्यक्त देशकाळरहित । ज्ञानी उपासित सोहंभावें ॥ ११ ॥
सर्वेंद्रियांसहित आवरोनि चित्त । भोगिती अद्वैत नित्य सुख ॥ १२ ॥
सर्व सुख मज आहे त्याच्या पायीं । आणिकांच्या वाहीं न पडे कदां ॥ १३ ॥
तेथें माझें मन रंगलेंसें भावें । सुख येणें जीवें देखिलें डोळां ॥ १४ ॥
सर्वगत संपूर्ण सर्वकाळ असणें । होणें आणि जाणें नाहीं जया ॥ १५ ॥
तें तुज माझारीं तूं तयाभीतरीं । अनुभवी निर्धारीं ठेवुनी मन ॥ १६ ॥
मी न मनीं न मनीं लटिकी हे कहाणी । जळधरावांचोनि चातक जैसा ॥ १७ ॥
तैसें माझें मन स्मरे रात्रंदिवस । पंढरीनिवास जीवन माझें ॥ १८ ॥
ऐसें ऐकोनि बोलणें म्हणे ज्ञानदेव । धन्य तुझा भाव एकविध ॥ १९ ॥
नामा म्हणे माझ्या सुखाचा विसावा । आवडे या जीवा पंढरीरावो ॥ २० ॥[3]

अभंग ९१३—(धु.), (पा.), (है.) व (आ.)
१ दावीं (आ.) २ सर्वज्ञ (पा.) ३ (धु.) प्रतीमध्ये चरण १ ते ८ नंतर ८, १३, १४, १५, १६, १७, १८, ११, ९, १०, १९ व २० असा चरणक्रम आहे. १२ वा चरण नाही.

अनुक्रमणिका

[९१४]

ऐसें नित्यानंदभरित [1]क्रमिताती मार्गु । हृदयीं तो अनुरागु आवडीचा ॥ १ ॥
प्रेमें वोसंडत करिती स्वहितगोष्टी । द्राविती कसोटी अनुभवाची ॥ २ ॥
[2]बाप तें सुख वृष्टि होतसे अनिवार । ब्रह्मरसें पूर वोसंडत ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे परियेसी नामया । अद्वैत आतमया प्रेममूर्ती ॥ ४ ॥
भक्तिभाग्य तुवां जोडिलें अविनाश । सांग पां सविलास मार्ग त्याचा ॥ ५ ॥
कैसा तो साधावा सांग भजनविधि । कैसी नमनबुद्धि सत्वशील ॥ ६ ॥
कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार । हा सर्व विचार सांगे मज ॥ ७ ॥
कैसें तें श्रवण कैसें तें मनन । कैसें निजध्यासन दृढ होय ॥ ८ ॥
कवण तें भक्ति कवण तें धृति । कवण तें विश्रांति दावी मज ॥ ९ ॥
बहु उत्कंठित या सुखा कारणें । तें मज पारणें करवीं आजी ॥ १० ॥[3]
सांगे हा अनुभवो साधन उपावो । विनवी ज्ञानदेवो नामयासी ॥ ११ ॥

[९१५]

परिसुनी ते गोष्टी घाली चरणीं मिठी । दाटलासे कंठीं सद्गदित ॥ १ ॥
कृपेचें पोसणें मी पंढरीरायाचें । येवढें भाग्य कैचें मज जाणिवेचें ॥ २ ॥
नव्हे बहुश्रुत नव्हे ज्ञानशील । दास मी दुर्बळ वैष्णवांचा ॥ ३ ॥
नेणतें नेणतें कांहींच मी नेणतें । म्हणोनि देवें तुम्हांतें निरविलें ॥ ४ ॥
येतां माझा हात दिधला तुमच्या करीं । घातलें आभारीं मायबापें ॥ ५ ॥
याचेनि कृपावसें येईल वाचेसरिसें । कळेल कांहीं तैसें निवेदीन ॥ ६ ॥
परी भानूसी देखणें करिजे अनुतेजें । तैसें ज्ञान माझें स्वामीप्रती ॥ ७ ॥
कल्पतरु [4]याचक कृपणाचे द्वारीं । कां दैन्य भाकी थोरी कामधेनु ॥ ८ ॥
तैसी तुमची यांच्या मज दीनाप्रती । नकळे काळगति समर्थाची ॥ ९ ॥
मातेचिया स्नेहें बाळक बोबडें । खेळे लाडें कोडें नेणे लाजो ॥ १० ॥
नामा म्हणे तैसें तुम्हीं माझें कवतुक । करुनी सुखें सुख वाढवितां ॥ ११ ॥

---

अभंग ९१४—(धु.), (है.), (पा.), (तं.) व (आ.), ९१५—(धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ चालतां तीर्थमार्ग (तं.) २ व्यापक तें सुख वृष्टि होतसे अनिवार। (आ.) ३ दहावा चरण (तं.) मध्ये नाही. ४ छाया (धु.)

[९१६]

ज्ञानदेव म्हणे शंका न धरिजे मनीं । दृष्टि दुजेपणीं न ठेवावी ॥ १ ॥
सुखें सुख घ्यावें अनुभवोनी अनुभवावें । आहे तें आघवें ब्रह्मरूप ॥ २ ॥[1]
[2]तो सुखाचा अनुवाद करी रे सुखरूपा । सुख वस्तुच्या दीपा नामदेवा ॥ ३ ॥
सुखाचिये ताटीं सुखची बोगरी । तृप्ती होईल थोरी क्षुधातुरा ॥ ४ ॥
पंढरीरायाचा तूं प्रेमभांडारी । आस पूर्ण करी मज याचकाची ॥ ५ ॥
विश्रांतीसी पात्र तूंचि विष्णुदासा । हा मज भरंवसा आहे तुझा ॥ ६ ॥
म्हणोनी तुझा संग धरिली थोर आस । क्षणीं होसी उदास भक्तराया ॥ ७ ॥
सिंधुहुनी सखोल सुरस तुझे बोल । आनंदाची बोल नित्य नवी ॥ ८ ॥
ते मज सादर ऐकवी सत्वर । श्रवण क्षुधातुर जाले माझे ॥ ९ ॥
जाणीव शहाणीव तरीच शोभे सर्व । जरी होय आविर्भाव वैराग्याचा ॥ १० ॥
ज्ञानदेव म्हणे तूं भक्त अंतरंग । नलगे तुज पांग बहुश्रुतेचा ॥ ११ ॥[3]

[९१७]

ऐसें ऐकोनियां [4]प्रेमा आला पोटीं । म्हणे बोलावी ते गोष्टी अनुभवाची ॥ १ ॥
येर ते कर्मधर्म सर्वही पाल्हाळ । श्रमुचि केवळ जाणिवेचा ॥ २ ॥
ऐसा संत भेटे विरळा भाग्ययोगें । जो आथिला वैराग्यें सप्रेमळू ॥ ३ ॥
सर्वभूतीं दया सर्वभावें करुणा । जेथें मीतूंपणा मावळला ॥ ४ ॥
भजन तयां नांव वाटे मज गोड । येर ते काबाड वायांविण ॥ ५ ॥
नमन ते नम्रता न देखें गुणदोष । अंतरीं प्रकाश आनंदाचा ॥ ६ ॥
येर ते दांभिक जाणावे मायावी । विश्वास मी जीवीं न धरी त्यांचा ॥ ७ ॥
ध्यान तया नांव निर्विकार निकें । जें विश्वीं माझ्या देखें विठोबासी ॥ ८ ॥
अखंड हृदयीं तेचि आठवण । साजिरे समचरण विटेवरी ॥ ९ ॥
नादीं लुब्ध जैसें आसक्त हरिण । जाय विसरोन देहभाव ॥ १० ॥
यापरि तल्लीन दृढ राखें मन । या नांवें श्रवण आवडीचें ॥ ११ ॥

---

अभंग ९१६—(धु.), (है.), (पा.) व (तं.), ९१७—(धु.), (पा.), (तं.) व (आ.)
१ (तं.) प्रतीत दुसऱ्या चरणाच्या अर्धाची उलटापालट आहे. २ त्या सुखाच्या अनुभव करी सुखरूपा । (आ.) ३ (तं.) व (है.) प्रतींत १ ते ५ व ८, ९, ६, १०, ११ असा क्रम आहे.
४ उत्तरें,प्रेमा जाला पोटीं । (आ.)

व्यवसायीं चित्त ठेवुनी कृपण । लाभाचें चिंतन सर्वकाळ ॥ १२ ॥
यापरि अखंड स्वहित विचारण । करिजे तें मनन सत्वशीळ ॥ १३ ॥
परपुरुषीं जैसी आसक्त व्यभिचारिणी । न लागे तिच्या मनीं [1]कामधाम ॥ १४ ॥
कीटकीं भृंगुटिये जैसें अनुसंधान । निकें निजध्यासन एकविध ॥ १५ ॥
सर्वभावें एक विठ्ठलुचि ध्याये । सर्वांभूतीं पाहे रूप त्याचें ॥ १६ ॥
सर्वांहूनि निराळा रजतमावेगळा । भोगीं प्रेमकळा तेचि भक्ति ॥ १७ ॥
सत्वाचा सुभटु असंग एकटू । वैराग्य उद्‌भटू एकनिष्ठ ॥ १८ ॥
प्रारब्धाचा भोगी नेणें देहस्मृती । अखंड ते धृति निर्विकार ॥ १९ ॥
निर्वासना मन निजलाभें संपूर्ण । नेणें स्वरूपज्ञान विकल्पाचें ॥ २० ॥
अनुरागें गोविंद ध्यायिजे एकांतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ २१ ॥
कायावाचामनें हा माझा अनुभव । सांगितला सर्व आवडीचा ॥ २२ ॥
नामा म्हणे हेंहि बोलविलें तेणें । उदार सर्वज्ञें पांडुरंगें ॥ २३ ॥

[ ९१८ ]

भक्त भागवत बहुसाल ऐकिले । बहु होऊनि गेले होती पुढें ॥ १ ॥
परि नामयाचें बोलणें नव्हे हें कवित्व । हा रस अद्‌भुत निरूपमु ॥ २ ॥
हे सुखविश्रांति नाहीं हो कल्पांतीं । विचारावें संतीं दूरदृष्टि ॥ ३ ॥
होतू शास्त्रवक्ते व्युत्पत्तीचे माथे । होतू बहु श्रोते बुद्धिवंत ॥ ४ ॥
होतू कर्मनिष्ठ [2]विधीचे उद्‌भट । होतू सर्वश्रेष्ठ पूज्य लोकां ॥ ५ ॥
होतू कलावंत कवित्व कुशल । होतू का वाचाळ चतुरतेचे ॥ ६ ॥
होतू कां पाठक होतू कां साधक । होतू कां वाचक ग्रंथकार ॥ ७ ॥
होतू आत्मज्ञानी होतू निजध्यानी । होतू वज्रासनीं बैसकेचे ॥ ८ ॥
होतू योगयुक्त होतू जीवन्मुक्त । होतू कां विरक्त सर्व संगीं ॥ ९ ॥
ऐसे होतू का सभाग्य संपन्न सर्वज्ञ । परि मी न मनीं तुजविण विष्णुदासा ॥ १० ॥
हे खूण जाणतां एक पंढरीरावो । रुक्मादेवी नाहो श्रीविठ्ठल ॥ ११ ॥

[ ९१९ ]

पश्चिमे प्रभास आदि करोनी द्वारका । पाहिल्या सकळिकां [3]मोक्षपुऱ्या ॥ १ ॥
पंथीं पावन तीर्थें करूनि सकळिकें । प्रक्षाळलीं पातकें वासनेचीं ॥ २ ॥

---

अभंग ९१८—(धु.), (है.), (पा.) व (तं.), ९१९—(पं.), (धु.), (है.) (पा.) व (तं.)
१ घराचार (तं. व धु.) २ विधेचे उत्कृष्ट (है.) ३ सप्तहि पुऱ्या (तं.)

परी पंढरीचें प्रेम नामयाचे जीवीं । माउली आठवी पांडुरंग ॥ ३ ॥
जीवन्मुक्त दोन्हीं भक्त आणि ज्ञानी । [1]परतोनि तेथोनि येती मार्गी ॥ ४ ॥
तृषाक्रांत वनीं होतसे पीडणी । पडलें चिंतवणीं जीवनालागीं ॥ ५ ॥
तंव दृष्टि एक कूप देखिला अवचिता । उदक तेथें पाहतां न लगे अंतु ॥ ६ ॥
कवणेपरी येथें करूं रिघवणी । प्राण संतर्पणीं वांचवावे ॥ ७ ॥
मग त्या नाम्याप्रती बोले ज्ञानदेवो । मज एक उपावो साध्य असे ॥ ८ ॥
लघिमेचे लाघव करूनि ते अवसरीं । उतरोनि भीतरीं घेतलें उदक ॥ ९ ॥
घेऊनि उदक निघाला बाहेरी । मग म्हणे अवधारी नामदेवा ॥ १० ॥
आणोनि उदक देईन तुझ्या हातीं । [2]न दिसे अनुगति आणिक कांहीं ॥ ११ ॥
पडिल्या संकटीं विचारावें मनीं । सांडावी आयनी अभिमानाची ॥ १२ ॥
आत्मा तो विठ्ठल सर्व निरंतरीं । आज्ञा दे झडकरि वेळु जाला ॥ १३ ॥
[3]आत्मा तो विठ्ठलु असतां सर्व देहीं । माझी काय नाहीं चिंता त्यासी ॥ १४ ॥
नामा म्हणें धीर करावा नावेक । दावीन कवतुक स्वामीजवळी ॥ १५ ॥

[९२०]

मग लावूनियां नेत्र निर्धारु पैं केला । हृदयीं आठविला केशीराज ॥ १ ॥
तूं इष्ट मित्र बंधु सोयरा जननी जनकु । नेणें मी आणिकु तुजवांचोनी ॥ २ ॥
येई पंढरीराया मजलागीं धांवतु । क्षणीं पाहासी अंतू कृपाळुवा ॥ ३ ॥
तुझिये भेटीची बहु खंती वाटली । आसुवें दाटलीं नेत्रकमळीं ॥ ४ ॥
धीर न धरवे जीवा पोकारितो धांवा । ये माझ्या केशवा मायबापा ॥ ५ ॥
कायावाचामनें विनटलों चरणासी । तो मी शरण आणिकांसी जाऊं कोणा ॥ ६ ॥
जन्मोनी पोसणा तुझाची म्हणती । मोकलितां अंतीं लाज कोणा ॥ ७ ॥
अनाथा कैवारी नामाची आयणी । वर्णिजे पुराणीं कीर्ति तुझी ॥ ८ ॥
तें काय लटकी वाणी करशील आजी । अजुनी तुज माझी करुणा न ये ॥ ९ ॥
गजेंद्राकारणें ज्या वेगीं धांवणें । केलें तंव स्मरणें कळवळोनी ॥ १० ॥
द्रौपदीचे आकांतीं येसी सोडविणें । तें मजकारणें विसरलासी ॥ ११ ॥

---

अभंग ९२०—(धु.), (है.), (पा.) व (तं.)

१ येंताति परतोनि निजधामा। (है.) २ न दिसे आनयुक्ति। (धु.) ३ व्यापक विठल आहे सर्वदेशीं। (है. व पं.)

येतां निरविलें ज्ञानदेवाप्रती । दिधला त्याचे हातीं हात माझा ॥ १२ ॥
तो तूं कैसा मजलागीं करशील उदास । धांव कासावीस थोर जालों ॥ १३ ॥
सर्वभावें तूं मजलागीं लोभापर । मी तुझा डिंगर आवडता ॥ १४ ॥
नामा म्हणे हांसे [1]जालें पिसुणाचें । न करी मज दीनाचें अव्हेरण ॥ १५ ॥

[९२१]

तंव निजभुवनीं सुखें पंढरीनाथ । नित्य जीवीं आर्त निजभक्तांचें ॥ १ ॥
कृपेचा वोरसु होता देवापोटीं । तेचि करी गोष्टी रुक्माईसी ॥ २ ॥
क्षेम माझा नामा यावा एक वेळां । मग मी जीवावेगळा जाऊं नेदी ॥ ३ ॥
आजि माझा डावा कां लवतो लोचन । करितसे स्फुरण वामबाहू ॥ ४ ॥
उद्वेग उपसर्ग वाटती ज़ीवाशीं । [2]कवणा जिवलगाशीं कष्ट होती ॥ ५ ॥
वाजतां पें वारा न लागावा राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकासी ॥ ६ ॥
वाटे तानभूक जाली त्या पीडणी । तरीच माझ्या मनीं ऐशी दशा ॥ ७ ॥
तंव ती विश्वमाता विचारी नावेक । अवचिता शोक पडिला कानीं ॥ ८ ॥
म्हणे तृषाक्रांत नामा करितसे धांवा । वेगीं जाऊनि देवा सांभाळावें ॥ ९ ॥
तंव तो आर्तबंधु ऐकोनि वचन । मनाचेनि मनें वेगू केला ॥ १० ॥
तंव गडगडित कूप उदकें वोसंडला । कल्पांतीं खवळला सिंधु जैसा ॥ ११ ॥[3]
ज्ञानदेव म्हणे जालें अभिन्नव । कैसा ऋणिया देव केला येणें ॥ १२ ॥
सावध करोनियां दिलें आलिंगन । जीवें निंबलोण उतरिलें ॥ १३ ॥
तो येरें चरणावरी ठेवियेला माथा । म्हणे माझी आहे चिंता विठोबासी ॥ १४ ॥
नामा म्हणे माझे बहु लळे पुरविले । कैं देखेन पाउलें विटेवरी ॥ १५ ॥

[९२२]

योगी परम ध्यानीं बैसलिया जाणा । कांहीं या रे मना विश्रांति नुपजे ॥ १ ॥
तुजवीण दुसरें कांहींच नाठवे । लागली तुझी सवे विष्णुदासा ॥ २ ॥
कवण कुळीं तूं जन्मलासी नामा । केशव परमात्मा तुज जवळी ॥ ३ ॥

---

अभंग ९२१—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.), ९२२—(धु.), (पा.) व (है.)
१ होईल (है. व तं.) २ कोण जिवलगा जाले कष्ट। (पा.) ३ अकराव्या चरणाच्या मध्यापासून पुढील चरण (तं.) प्रतीत नाहीत.

अनुक्रमणिका

धेनु वसे वनीं वत्स असे घरीं । चित्त तयावरी ठेवुनी चरे ॥ ४ ॥
ते तया देखोनी संतोषली मनीं । तैसा तुझ्या गुणी बोल्हावलों ॥ ५ ॥
तीर्थयात्रे जाणें न लगे कांहीं करणें । ऐकोनी तुझें गाणें सुखरूप ॥ ६ ॥
वेडावल्या श्रुतिस्मृति आणि पुराणें । योगियांची ध्यानें विसर्जिलीं ॥ ७ ॥
तुझें प्रेम [1]सांडावें आणि मनें कोठें जावें । जावोनियां पाहावें काय कोठें ॥ ८ ॥
समाधिसोहळा लय लक्ष वैराग्य । आम्हांलागीं भाग्य आणियेलें ॥ ९ ॥
ऋषि गणगंधर्व ब्रह्मादिक सर्व । लक्षिताती ठावो अरूपाचा ॥ १० ॥
तो तुवां आम्हां सन्मुख उभा केला । चरणासी लागला ज्ञानदेव ॥ ११ ॥

[ ९२३ ]

तीर्थें करोनी नामा पंढरीये आला । जिवलगा भेटला विठोबासी ॥ १ ॥
सद्गदित कंठ वोसंडला नयनीं । घातली लोळणी चरणावरी ॥ २ ॥
शिणलों पंढरिराया पाहें कृपादृष्टी । थोर जालों हिंपुटी तुजविण ॥ ३ ॥
अज्ञानाचा भाग होता माझे मनीं । हिंडविलें म्हणोनि देशोदेशीं ॥ ४ ॥
परि पंढरीचें सुख पाहतां कोटि वाटे । स्वप्नींही परि कोठें न देखेंची ॥ ५ ॥[2]
उदंड तीर्थांची ऐकों जाय प्रौढी । परि चित्त माझें बोढी [3]चंद्रभागा ॥ ६ ॥
म्हणोनि चरणांची ठाकोनि साउली । आलों मज सांभाळीं मायबापा ॥ ७ ॥
तया देवाची वास न पाहती माझे नयन । न करिती पूजन कर त्यांचें ॥ ८ ॥
तेणें पंथें माझे न चलती चरण । नाइकती श्रवण कीर्ति त्यांची ॥ ९ ॥[4]
कटी तटीं जेणें कर नाहीं ठेविले । न देखें पाउलें विटेवरी ॥ १० ॥
त्यांतें म्हणतां देव लाजे माझें मन । ते कष्ट दारुण कवणा सांगू ॥ ११ ॥
जये गांवीं नाहीं वैष्णवांचा मेळु । न देखे सुकाळु हरिकथेचा ॥ १२ ॥
कुंचे गरुड टके न देखों पताका । त्या देवाची शंका वाटे थोर ॥ १३ ॥
हें जेथें न देखें तेथें खंती वाटे जीवीं । ते वेळीं आठवीं रूप तुझें ॥ १४ ॥
इष्ट मित्र बंधु तूं कुळदेवता । नामा म्हणे आवडता प्राण माझा ॥ १५ ॥

---

अभंग ९२३—(पं.), (धु.), (पा.) व (है.)

१ तोडावें (पा.) २ पाचव्या ओवीनंतर (धु.) मध्ये पुढील ओवी आहे—

शिणभाग हरला तुजलागिं देखतां । आनंद माझे चित्ता देखिलियां ।

३ पंढरीये (है.) ४ (है.) व (धु.) प्रतींत 'न करिती पूजन' ही ओळ येथील नवव्या ओवीचा दुसरा चरण आहे व 'नायकती श्रवण' ही ओळ आठव्या ओवीचा दुसरा चरण आहे.

अनुक्रमणिका

[९२४]

केशव म्हणे नाम्या खंती वाटे माझ्या मनीं । निद्रा न लगे नयनीं पाहतां वाट ॥ १ ॥
तुजविण उदास वाटे ही पंढरी । न पडे क्षणभरी विसरु तुझा ॥ २ ॥
डोळियां वेगळा नवजें कोठें दुरी । चित्त मजवरी ठेवुनि राहे ॥ ३ ॥
तुज माझी सवे मज तुझी आवडी । गुळासी न सोडी गोडी जैसी ॥ ४ ॥
तैसे तुम्ही आम्ही एकमेकांमाजीं । विचारितां सहजीं दुजें नाहीं ॥ ५ ॥
येतया जातया पुसे तुझी गोष्टी । म्हणे माझें नामें दृष्टि पडिलें होतें ॥ ६ ॥
वाटे तहानभूक पीडिल्या जाणें कोण । एका मजविण गूज त्याचें ॥ ७ ॥
रात्रंदिवस खेद करुनि आपुल्या जीवा । असेल माझा धांवा पोकारीत ॥ ८ ॥
मजवीण कोणाचिये साउलीं बैसेल । कोण त्या पूसेल शीणभागु ॥ ९ ॥
संतांपासीं सांगे शिणले मजविण । कंठीं धरिला प्राण मजलागीं ॥ १० ॥
धरुनी [1]हनुवटी दिधलें आलिंगन । कुरवाळोनी वदन नेत्र पुशी ॥ ११ ॥
मग काढोनी कंठीची सुमनतुळशीमाळा । घातलिसे गळां नामयाच्या ॥ १२ ॥
सर्वांगसुंदर पाहे कृपादृष्टी । पुसे जीवींची गोष्टी कृपासिंधू ॥ १३ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान खेचर । नरहरि सोनार आदिकरोनी ॥ १४ ॥
समस्त भक्त मिळोनी लोटांगणीं येती । आलिंगन देती नामयासी ॥ १५ ॥
अनिवार सुमनें वर्षती सुरवर । गगनीं जयजयकार शब्द होती ॥ १६ ॥
ऋषिगण गंधर्व मिळोनि सकळिक । येती दृष्टिसुख घ्यावयासी ॥ १७ ॥
रुक्माई आरती घेऊनी आली वेगें । ओंवाळिले दोघे देवभक्त ॥ १८ ॥
कवतुकें नाम्याची धरिली हनुवटी । पाहे कृपादृष्टी घडिये घडिये ॥ १९ ॥

[९२५]

केशव म्हणे नाम्या धन्य तुज फावलें । बरवें तुवां केलें आत्महित ॥ १ ॥
पुण्यपावन तीर्थें पाहिलीं सकळिक । प्रक्षाळिलीं पातकें वासनेचीं ॥ २ ॥
धन्य तुवां केलें जन्मोनि सार्थक । [2]शोक मोह दुःख निवारिलें ॥ ३ ॥
तीर्थयात्रा सफळ व्हावया संपूर्ण । करी का उद्यापन विधियुक्त ॥ ४ ॥

---

अभंग ९२४—(पं.), (धु.), (पा.) व (है.), ९२५—(पं.), (धु.), (शि.), (पा.) व (है.)
१ बाहुवटी (है.) २ संसार आशेष विध्वंसिला । (है. व धु.)

केलिया कष्टाचें होईल सार्थक । सांगेन तें ऐक वचन माझें ॥ ५ ॥
महा मुक्तिक्षेत्र वैकुंठ महीवरी । विख्यात पंढरी भूवैकुंठ ॥ ६ ॥
एक शीत अन्न अर्पे द्विजामुखीं । राहे सदा सुखी कल्पवरी ॥ ७ ॥
क्षेत्रवासी भावें पूजावे ब्राह्मण । षड्रस भोजन द्यावें त्यांसी ॥ ८ ॥
सुगंध चंदन सुमन तुळसीमाळा । समर्पी तांबुला सदक्षिणा ॥ ९ ॥
ऐसें बोलोनियां देवें नामा धरियेला करीं । राउळाभीतरीं घेउनि गेले ॥ १० ॥
मग रुक्माईसी सांगे वैकुंठीचा राणा । आजी आराधना नामयाची ॥ ११ ॥

[९२६]

तंव ते जगन्माता म्हणे जी कृपावंता । कर्ता करविता कोण याचा ॥ १ ॥
हा तुमचा दास आहे अंतरंग । काय या उद्वेग करणें असे ॥ २ ॥
सर्व भार याचा लागे चालवणें । ऋणवई केलें येणें जन्मोजन्मीं ॥ ३ ॥
तुम्हांपरतें यासी जिवलग सोयरे । कोण आहेत दुसरे लोभापर ॥ ४ ॥
दृढ चरण धरोनि राहिला अंतरीं । जालासे अधिकारी सर्वस्वाचा ॥ ५ ॥
जन्मोनियां येणें जोडिलें जें कांहीं । तितुकें तुमच्या पायीं निक्षेपिलें ॥ ६ ॥
म्हणोनि याचें कोड करावें परिपूर्ण । व्हावें पैं उत्तीर्ण ऋणियाचें ॥ ७ ॥
मायबापें याची सखी जिवलग । सांडोनि तुमचा संग धरिला सुखें ॥ ८ ॥
म्हणोनि याचें हित लागे विचारावें । उचित करावें देवराया ॥ ९ ॥
आपुल्या दासाचा संभ्रम सोहळा । करणें हे गोपाळा ब्रीद तुमचें ॥ १० ॥
रुक्माई म्हणे हा भाग्यवंत नामा । न कळे याचा प्रेमा नित्य नवा ॥ ११ ॥

[९२७]

आतां जावें वेगीं नामया घेऊनि । सांगावीं आवंतणी ब्राह्मणांसी ॥ १ ॥
सकळकामपूर्ण असती तुमच्या पायीं । विचारावें कांहीं न लगे देवा ॥ २ ॥
काय काय न लभे तुमचे कृपादृष्टी । सदा सुखवृष्टी हरिच्या दासां ॥ ३ ॥
नामयाचा हात धरोनि पंढरीनाथ । निघाले अक्षत द्यावयासी ॥ ४ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर जनमित्र सोपान । सांवता जाल्हण घेऊनि सरिसे ॥ ५ ॥

अभंग ९२६ व ९२७—(पं.), (धु.), (पा.) व (है.)

अनुक्रमणिका

चोखामेळा बंका काठीकर पुढें । दोन्हीं बाहीं देव्हडे सनकादिक ॥ ६ ॥
नामयाचे पाठीं चाले केशीराज । लागावया रज चरणींचे ॥ ७ ॥
आपुल्या दासाचा सिद्धि न्यावा पणु । म्हणोनि यजमानु जाला देव ॥ ८ ॥
तेणें मिसें करितसे क्षेत्रप्रदक्षिणा । प्रार्थित ब्राह्मणां परम प्रीति ॥ ९ ॥
ऐसा अनाथांचा नाथ दीनाचा गोसावी । आवडी नित्य नवी सेवकाची ॥ १० ॥
तो या नामयाचा सुखाचा शृंगारु । रुक्मादेविवरु श्रीविठ्ठल ॥ ११ ॥

[९२८]

तंव अध्यात्मिक पंडित अग्निहोत्री । एक म्हणविती श्रोत्री सदाचार ॥ १ ॥
आम्हांसी तें नाहीं तुमचें स्वरुपज्ञान । अपूर्व दर्शन देखिलें आजी ॥ २ ॥
सुखाचें पारणें करविलें या रूपें । तेणें त्रिविधताप निवारले ॥ ३ ॥
कवण वृत्ति काय चालविजे व्यापार । योजिलें बिढार कवणें ठायीं ॥ ४ ॥
आजिचें निमित्त काय उपस्थित । ऐकोनि पंढरीनाथ बोलते जाले ॥ ५ ॥
माझी कुळवृत्ति हरिदासां ठाउकी । मज यासी ओळखी निकट असे ॥ ६ ॥
मज असंगा संगु सर्वकाळीं याचा । अनंत जन्मांचा ऋणानुबंध ॥ ७ ॥
साक्ष तुमचे चरणा करुनि बोले वाचा । मी मैत्र नामयाचा अंतरंगु ॥ ८ ॥
करोनियां स्नानविधी यावें शीघ्रवत । करावें सनाथ कृपादृष्टीं ॥ ९ ॥
बिढार तरी असे राउळाभीतरीं । नांव सांगों तरी अनंत जाणा ॥ १० ॥
जीवींचें गुजगौप्य संतांसीं पुसावें । निःसंदेह यावें भोजनासी ॥ ११ ॥
ऐसी ते अमृतवाणी ऐकोनि श्रवणीं । आनंदले मनीं भूदेव ते ॥ १२ ॥
आज्ञा देती देवा जावें निजमंदिरा । शीघ्रवत करा पाकसिद्धी ॥ १३ ॥
मग रुक्माईसी सांगे सकळ विवंचना । प्रार्थिले ब्राह्मणां सकळिकांसी ॥ १४ ॥
कर्मठ अभिमानी नोळखती मज । देखोनियां चोज वाटे त्यांसीं ॥ १५ ॥
कुळवृत्ति नाम पुशिलें मज तिहीं । सांगितलें म्यांही सर्व त्यांसी ॥ १६ ॥
सांगाती संतांचा मी मैत्र नामयाचा । अनंत जन्मांचा निकट म्हणोनी ॥ १७ ॥
बिढार तरी असे राउळाभीतरीं । सांगे खूण परी न कळे त्यांसी ॥ १८ ॥
नाम तरी अनंत दाविला संकेत । परी नेघे त्यांचें चित्त आठवण ॥ १९ ॥

अभंग ९२८--(पं.). (धु.). (पा.) व (है.)
अभंग क्र. ९२८ चा (है.) प्रतींत चरणांचा क्रम ८, ११, १०, ९ व १३ असा आहे.



अनुक्रमणिका

तंव ते विश्वमाता म्हणे जी कृपानिधी । सदा भेदबुद्धि त्यांचे ठायीं ॥ २० ॥
विद्या वयसा जाती कुळाचा अभिमान । त्या कैंचे चरण प्राप्त तुमचे ॥ २१ ॥
उदार चक्रवर्ती भक्तांचा विसावा । त्याच्या निजभावा वेळाईतु ॥ २२ ॥
तो भाग्यें जोडला वैकुंठीचा ठेवा । उजरीं जाली दैवा नामयाच्या ॥ २३ ॥

[९२९]

तंव अणिमादि सिद्धि उभ्या महाद्वारीं । तिहीं सर्व सामोग्री सिद्ध केली ॥ १ ॥
सडासंमार्जनें गुढिया तोरणें । शृंगारिलीं भुवनें परिचारिकीं ॥ २ ॥
म्हणती काय पुण्य केलें येणें विष्णुदासें । देवा लोभ पिसें लावियेलें ॥ ३ ॥
द्वारीं दिपावळी चौकरंग माळा । अभिनव सोहळा आरंभिला ॥ ४ ॥
हरुषें मंगळ तुरे वाजती विनोदें । भक्त जयजय शब्दें गर्जताती ॥ ५ ॥
मंगळ मार्जन नामयातें करविलें । मग तें आरंभिलें पुण्याहवाचन ॥ ६ ॥
देवें अंगवस्त्रें आपुलेनी हातें । वाहिलीं अनंतें विष्णुदासा ॥ ७ ॥
सत्यभामा राही रुक्माई जननी । वेगीं अक्षवाणी घेऊनि येती ॥ ८ ॥
आनंदें नरनारी कवतुक पाहती । जीवें ओवाळिती नामयासी ॥ ९ ॥
आपुलिया दासाचा करी समारंभु । दीनानाथ प्रभु कृपासिंधु ॥ १० ॥
धन्य हा नामा म्हणती सकळ लोक । नेणती याचें सुख ब्रह्मादिक ॥ ११ ॥

[९३०]

मग जाला स्वयंपाक स्नानविधि सारा । सकळां हांकारा जाणविला ॥ १ ॥
आले महाद्वारीं दिधलीं आसनें । पूजा नारायणें आरंभिली ॥ २ ॥
तंव ठकलों म्हणती देव पहा हो कैसें जालें । सर्व सुख नेलें इहीं भक्तीं ॥ ३ ॥
रत्नजडित पाट सत्वरीं आणिले । वरी द्विज बैसविले पृथक्कारें ॥ ४ ॥
प्रक्षाळोनि चरण पुसिले पीतांबरें । मस्तकीं आदरें तीर्थ वंदी ॥ ५ ॥
कस्तुरीचे टिळे दिव्य चंदन उटी । घातलिया कंठीं तुळशीमाळा ॥ ६ ॥
दशांग धूप रत्नाचा दीपक । ओवाळी नायक वैकुंठींचा ॥ ७ ॥
दोहीं बाहीं पंक्ति मांडिल्या देव्हडी । राही रुक्माई परवडी वाढितसे ॥ ८ ॥
चतुर्विध अन्नें आथिलीं बहुगुणें । षड्रस पक्वान्नें सर्वांठायीं ॥ ९ ॥

---

अभंग ९२९ व ९३०--(पं.), (धु.), (पा.) व (है.)

अनुक्रमणिका

मग संकल्प सोडिला नामयाचे करें । भक्त जयजयकारें गर्जिन्नले ॥ १० ॥
भोक्ता नारायण लक्ष्मीचा पती । म्हणोनि प्राणाहुती घेतल्या वेगीं ॥ ११ ॥
भर्ता भोक्ता कर्ता करविता आपण । सहज तेथें पूर्ण सकळ काम ॥ १२ ॥
विश्वंभर कृपादृष्टि न्याहाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ १३ ॥
देखोनि तें समृद्धि हरिखले द्विज । जाले नवल चोज पहा कैसें ॥ १४ ॥
कोण हा गृहस्थु केव्हडा भाग्यवंतु । नेणवे अद्‌भुतु महिमा याचा ॥ १५ ॥
ऐसे जेविले आनंदें धाले परमानंदें । मुखशुद्धि गोविंदें दिधली करीं ॥ १६ ॥
कर्पूरेंसहित सर्मपिले विडे । कर जोडोनी पुढें विनवीतसे ॥ १७ ॥
ऐसा भक्तजन कृपाळु दीनाचा दयाळु । आनंदें गोपाळु उभा असे ॥ १८ ॥[१]
तया नामदेवें भुलविलें लोभें । वेडावले उभे चिदानंद ॥ १९ ॥

[ ९३१ ]

सकळिकां नमस्कार करुनी यादवरावो । सांगे जीवींचा भावो तयांप्रती ॥ १ ॥
तुमचे कृपादृष्टि करावें भोजन । येणें होईल संपूर्ण व्रतसिद्धी ॥ २ ॥
हेचि आवडी आहे बहु माझ्या जीवीं । ते आजी गोसावी पूर्ण कीजे ॥ ३ ॥
क्षण एक बैसावें स्वस्थ अंतःकरणें । संकल्पिलें नारायणें तुळसीदळ ॥ ४ ॥
संतुष्ट मानसें यातें अंगिकारा । मग निजमंदिरा जावें स्वामी ॥ ५ ॥
आजि तुमचा लाभु जाला भाग्य योगें । नामयाच्या प्रसंगें घडली सेवा ॥ ६ ॥
तुम्ही ब्रह्मबीज ब्रह्मादिकां पूज्य । सांभाळिलें मज कृपादृष्टी ॥ ७ ॥
मज निरालंबासी करोनी अवलंबन । निष्कामासी पूर्ण केलें काम ॥ ८ ॥
अकर्ता असंगु तुमचेनि कृतार्थ । जालों पें यथार्थ वचन माझें ॥ ९ ॥
मग ते चतुर्विधा महामंत्रस्वरें । द्विज जयजयकार करिताती ॥ १० ॥
विजय सर्वकाळ व्हावें पुढतो पुढतीं । आशिर्वाद देती मंत्राक्षता ॥ ११ ॥
पितांबराचे अचळीं घेउनी मंत्राक्षता । घांलितसे माथा नामयाच्या ॥ १२ ॥

---

अभंग ९३१—(पं.), (धु.), (पा.) व (है.)

१ अठराव्या चरणाऐवजी (है.) प्रतीत पुढील चरण आहे—
या भक्ताचें हें भाग्य जालें मूर्तिमंत । कीं रूपां आलें आर्त आवडीचें ॥
अठराव्या चरणाऐवजी (धु.) प्रतीत पुढील चरण आहे—
भक्ताचें भाग्य कैसे मूर्तिमंत । कीं प्रेम वोसंडत आवडीचें ॥



अनुक्रमणिका

हेंचि तुझें प्रेम राहो हें चिरंतन । मुखीं नाम ध्यान हृदयीं सदा ॥ १३ ॥
तंव म्हणती धरामर तुम्हीं श्रमलेति थोर । लागला उशीर भोजनासी ॥ १४ ॥
सर्वां ठाईं तुम्ही सर्वच होउनी एक । कारण सार्थक केलें निकें ॥ १५ ॥
स्वामीचा आदर सांगतां अभिनव । नम्रता गौरव निरुपम ॥ १६ ॥
अकल्प आयुष्य चिरंजीव व्हावें । आम्हां सांभाळावें पुढतापुढतीं ॥ १७ ॥
आतां संतांचिया पंक्ती सारावें भोजन । करावें परिपूर्ण जीवींचें कोड ॥ १८ ॥
उच्छिष्ट प्रसाद द्यावा नामयातें । आस करूनि पाहात वास तुमची ॥ १९ ॥

[९३२]

सुवर्णाचें [1]ताट वोगरुनी परिकर । रुक्माईनें सत्वर आणियेलें ॥ १ ॥
कनक कळस घेऊनि सत्यभामा आली । आपोशन घाली देवराया ॥ २ ॥
सुखाचा सुरतरू भक्त चिंतामणी । पुरवितो आयणी निजभक्ताची ॥ ३ ॥
तेथें उद्धव अक्रुर नारद तुंबर । आणिक अपार भक्त येती ॥ ४ ॥
महाद्वारीं होतां उभा नामा ठेला । तो जवळी वोलाविला केशिराजें ॥ ५ ॥
देवाचा वोरसु देखोनी गौरव । देहीं देहभाव विसरला ॥ ६ ॥
निजबोध निवृत्ति राहिली निवांत । हृदयीं वोसंडित प्रेमरसें ॥ ७ ॥
देखोनि पंढरीनाथ धाविन्नला वेगीं । जैसी वत्सालागीं [2]तान्हें धेनू ॥ ८ ॥
उचलोनि चहूंभुजीं दिलें आलिंगन । आणिलें उमजून देहावरी ॥ ९ ॥
धरोनि बाहुवटीं बैसविला ताटीं । स्फुंदतां हिंपुटी होत असे ॥ १० ॥
कुर्वाळोनि माथा घास घाली मुखीं । तंव तो परलक्षी तन्मय होतु ॥ ११ ॥
अंतरींचें गुज बोले कृपासिंधु । करूनि सावधु नामयासी ॥ १२ ॥
म्हणे जिवलगा बोलें सुख गोष्टी । आर्त आहे पोटीं बहु दिवसांचें ॥ १३ ॥
अंतरींचें सुख बाहेरी तूं पाहे । गगना काय आहे पाठीपोट ॥ १४ ॥
तैसा तूं आनंदु आहे पैं निर्मळ । चिद्रूप केवळ सदोदित ॥ १५ ॥
तुझें तेंचि माझें माझें तेंचि तुझें । आहे सहजीं सहजें एकविध ॥ १६ ॥
परतोनियां दृष्टि घाली मजवरी । मी तो निरंतरीं तूंचि होसी ॥ १७ ॥
हा तुझा सोहळा पाहें उघडा डोळां । मी आहे तुज जवळां ज्ञानदीपू ॥ १८ ॥

अभंग ९३२—(पं.), (धु.), (पा.) व (है.)
१ ताटे (पं. व है.) २ कामधेनू (है.)

अनुक्रमणिका

आर्त तुझिये भेटी आले भक्तराणे । सुखाचें पारणें करवी त्यांसी ॥ १९ ॥
परमानंद मूर्ति धन्य हा निवृत्ति । सुखाचा सांगाती ज्ञानदेव ॥ २० ॥
पवित्र हा सोपान परलोकींचें तारू । करी याचा आदरू भाग्यवंता ॥ २१ ॥
म्हणोनि पंढरीनाथें आश्वासिलें करें । मिठी दिली येरें चरणकमळीं ॥ २२ ॥
नामा म्हणे तुझे कृपेचा वोल्हावा । विश्रांति या जिवा जाली असे ॥ २३ ॥[१]

[९३३]

नामयाचे मुखीं घालुनी कवळु । पुसतसे गोपाळु शिणभागु ॥ १ ॥
जें करकमळ सनकादिकां शिरीं । नामा तिहीं करीं कुरवाळिला ॥ २ ॥
म्हणे सांडी सर्व खंती जीवींची काजळी । विश्रांति मजजवळी आहे तुज ॥ ३ ॥
वियोगाचेनि शोकें शिणलासी मार्गीं । देह मजलागीं वाळविला ॥ ४ ॥
कोमाईलें वदन निडारला नयनीं । नेणें कोणी तुझी तानभूक ॥ ५ ॥
गेलासी जवळुनी ज्या दिवसापासोनी । न दिसे माझें कोणी आवडतें ॥ ६ ॥
धीर न धरवे जीवा पाहें दाही दिशा । माझा विष्णुदास येईल केव्हां ॥ ७ ॥
तुज पाहे गरुडपारीं पाहे महाद्वारीं । पाहे भीमातीरीं चंद्रभागे ॥ ८ ॥
पाहे पद्मतीर्थीं पाहे वेणूनादीं । नलगे तुझी शुद्धी खंत वाटे ॥ ९ ॥
अनुदिनीं भोजन करितां उदकपान । तेव्हां आठवण होय तुझी ॥ १० ॥
मी म्हणे धांवत येसी न धरत । प्रसादाचें आर्त बहु तुज ॥ ११ ॥
धांवोनियां येसी आलिंगन देसी । पुसेन सांगसी सुख गोष्टी ॥ १२ ॥
तेणें हर्षें निघती डोळियासी दोंदें । हृदय माझें कोंदे करुणारसें ॥ १३ ॥
आवडतें आळुकें जननियेचें बाळ । जाण तें कृपाळ भूक त्याची ॥ १४ ॥
तैसा पंढरीनाथ मोहें वोसरला । नाम्यातें पाजिला प्रेमपान्हा ॥ १५ ॥

[९३४]

ऐसी ते जेवणी ब्रह्मरसधणी । पुरविली आयणी निजभक्तांची ॥ १ ॥
नाम्याचें उच्छिष्ट स्वीकारिलें देवें । कवतुक अवघें पाहती द्विज ॥ २ ॥

अभंग ९३३ व ९३४—(पं.), (धु.), (पा.) व (है.)
१ तेविसाव्या चरणाऐवजी (है.) प्रतीत पुढील चरण आढळतो—
नामा म्हणे जन्मोनियां द्यावें मज । प्रेम तुझें निज केशीराजा ॥

अनुक्रमणिका

म्हणती आम्हां येणें कैसी केली माव । बुडविलें सर्व क्रियाकर्म ॥ ३ ॥
नेणवे हा कोण दिसे सुलक्षण । नव्हे क्षत्रिय ब्राह्मण वैश्य शूद्र ॥ ४ ॥
चहूंवर्णा वेगळी दिसे याची लीला । विस्मृति सकळां पडली कैसी ॥ ५ ॥
निर्धारें नाम्याचा होय मायबापु । सोडविलें संकल्पू त्याच्या हातीं ॥ ६ ॥
कायावाचामनें लोभ याचेवरी । घातलिया शिरीं मंत्राक्षता ॥ ७ ॥
एक म्हणती जाले होते ते निर्माण । आतां आपुलें आपण गौप्य करा ॥ ८ ॥
लौकिकीं ही मात प्रकट करा झणीं । न बोलावी कोणी कोणापाशीं ॥ ९ ॥
एक म्हणती आतां यासीच वाळावें । आपुलें टाळावें लोकनिंद्य ॥ १० ॥
अज्ञानासी दोष नाहीं प्रत्यवाय । शास्त्रीं हा उपाय सिद्ध असे ॥ ११ ॥
आत्मशुद्धिलागीं करा विचारणा । करा मंत्रस्नाना त्रिपदा जप ॥ १२ ॥
म्हणोनि सत्वर चालिले अवघे । प्रार्थुनियां देवें बोलाविलें ॥ १३ ॥
संकोचित मनें दिसती कवण्यागुणें । कोमाईलीं वदनें सकळिकांची ॥ १४ ॥
काय शंका वाटे तुमच्या मनीं स्वामी । ते कृपा करूनि सांगा मज ॥ १५ ॥
मनाचें मवाळ तुम्ही ब्रह्मबीज । गौप्य नये गुज करूं कांहीं ॥ १६ ॥
मी तुम्हां सकळांचें असे कृपापात्र । सांगा जीवीचें आर्त करीन पूर्ण ॥ १७ ॥
मग समर्पोनि दक्षिणासहित तुळशीदळ । वरी त्या पुण्यजळ प्रोक्षूनियां ॥ १८ ॥
चरणावरी नामा घालोनि निरवी । म्हणे कृपा असों द्यावी याजवरी ॥ १९ ॥

[९३५]

जातीचे हे शिंपी विश्व जाणे यातें । प्रत्यक्ष सांगाते जेवविलें ॥ १ ॥
उच्छिष्ट निजमुखीं स्वीकारिलें याचें । उरलें तें तुम्हां कैचें क्रियाकर्म ॥ २ ॥
न कळे हा निर्धार भ्रांति वाटे आम्हां । काय तुमचा नामा अंगभूत ॥ ३ ॥
नवल हे आवडी लौकिका वेगळी । बुडविले सकळीं समूळ धर्म ॥ ४ ॥
कोणा लोभें तुम्हां लावियेला चाळा । कृपेचा कळवळा निरोपमु ॥ ५ ॥
विचारितां तुम्ही आहां वेषधारी । लीला वोडंबरी दिसे तुमची ॥ ६ ॥
वर्णाश्रमधर्म न दिसे तुमच्या ठायीं । निर्धारुचि कांहीं न कळे आम्हां ॥ ७ ॥
वंद्य निंद्य तुम्हां न दिसेचि कोणी । दृष्टी दुजेपणीं न पडे तुमची ॥ ८ ॥

अभंग ९३५—(पं.), (धु.), (पा.) व (है.)

विश्व आपरूप दिसे तुम्हां सर्व । नेणवे हे भाव ब्रह्मादिकां ॥ ९ ॥
आम्हीं विश्वासलों वरवेषा तुमच्या । परी भाव अंतरींचा न कळे कांहीं ॥ १० ॥
आपुलें स्वहित देखोनि आपण । पाप अथवा पुण्य विचारावें ॥ ११ ॥
सर्वभावें करुनि विधीतें पाळावें । सर्वी सांभाळावें वेदवचन ॥ १२ ॥
वर्णाश्रमपरत्वें बोलिले जे धर्म । तें तें विहितकर्म आचरावें ॥ १३ ॥[1]
स्वामींचे वचन स्वामींनीं पाळावें । यश मिरवावें उभयलोकीं ॥ १४ ॥
तरी हा तुमचा जिवलग नामा । निर्धारितां आम्हां कळों आलें ॥ १५ ॥

[ ९३६ ]

नामयातें आम्हीं जेवविलें सांगातें । हा दोष आम्हांतें ठेवा ह्मणीं ॥ १ ॥
सर्वत्र चाळक एकचि चैतन्य । वंद्य निंद्य कोण म्हणे स्वामी ॥ २ ॥
पुण्यपाप बाधा आम्हां नाहीं कदा । असो शुद्धबुद्धा निरंतर ॥ ३ ॥
देह म्हणाल जरी बोडबर पांचांचें । अंबरीं आभासाचें अभ्र जेवीं ॥ ४ ॥
नामा ऐसें नाम कवणिया अवयवां । सांगा तुम्हीं देवा साच करोनी ॥ ५ ॥
तेजीं कीं जीवनीं गगनीं कीं पवनीं । कीं दोष धरणीमाजीं होता ॥ ६ ॥
तो तुम्हांसी गोचरु जाला कवणें युक्ती । हे ह्मूण निरुती सांगा मज ॥ ७ ॥
तुम्हीं वेदवक्ते सर्वशास्त्र द्रष्टे । परि नाहीं आत्मनिष्ठे पावलेती ॥ ८ ॥
भेदभ्रम तुमचा नाहीं मावळला । भ्रमुची उरला संदेहेसी ॥ ९ ॥
जे वेळीं संकल्प सोडिला पैं येणें । तुम्ही आपोशनें घेतलीं कैसीं ॥ १० ॥
ते वेळीं नाहीं केली ही विचारणा । अधिकार अन्ना आहे कीं नाहीं ॥ ११ ॥
याचिलागीं तुम्हां प्रार्थुनी ह्मूण सांगे । नामयाच्या प्रसंगें घडली सेवा ॥ १२ ॥
आशिर्वाद तुम्हीं दिल्या मंत्राक्षता । त्या त्याचे माथा टाकियेल्या ॥ १३ ॥
मज निरालंबासी तुम्हीं करोनि अवलंबन । निष्कामासी पूर्ण केलें काम ॥ १४ ॥
हें माझें बोलणें तुम्हीं ऐकोनि सकळिकीं । परी अझुनी ओळखी न धरा माझी ॥ १५ ॥
निःसंदेह भोजन केलें आधि तुम्हीं । उरलें शेष आम्हीं स्वीकारिलें ॥ १६ ॥
यासी विधियुक्त कोण प्रायश्चित्त । सांगा कोण ग्रंथ साच करूनी ॥ १७ ॥

अभंग ९३६—(पं.), (धु.), (पा.) व (है.)
१ तेरावा चरण (धु.) मध्ये पुढीलप्रमाणे आहे—
वर्णाश्रमनेम नित्य नैमित्तिक कर्म । ते ते विहित धर्म आचरावे ॥
२ आतां स्वामीचें जें उचित स्वामीनें करणें । बरवीं विचारणें आत्मश्रुति ॥ (है., पा. व धु.)

अनुक्रमणिका

या हरिदासाचे रज आणि तुमचें चरणतीर्थ । तेणेंचि पुनीत तनु माझी ॥ १८ ॥
येरु तुमचा भावो तोचि फळला तुम्हां । नामा तरी आम्हां निष्कलंकु ॥ १९ ॥

[९३७]

मग केशव म्हणे माझें परिसा वचन । गुज मी सांगेन अंतरीचें ॥ १ ॥
व्रत तप दान सकळ कर्मक्रिया । एक भूतदया असे जेथें ॥ २ ॥
तोचि सत्य मानी भक्त आणि ज्ञानी । न विसंबे निर्वाणीं जीवें त्यासी ॥ ३ ॥
ज्ञानाचें सौभाग्य भक्ति आणि वैराग्य । तयाचें आरोग्य प्रेमरस ॥ ४ ॥
त्यासी संजीवनु सदा संत संगू । त्यावरी अनुरागू वज्रकवच ॥ ५ ॥
धर्मअर्थकाममोक्ष दृष्टि नाणी । वोळगती आंगणीं मुक्ति चारी ॥ ६ ॥
अनुहात गजरू होतसे नामाचा । दीप अलक्षाचा पाजळितु ॥ ७ ॥
इंद्रपदादिकें नाशिवंत होती । म्हणोनि आसक्ती न धरावी त्यांची ॥ ८ ॥
हे जाणोनि साच न धरावी त्यांची आस । अखंड माझा वास हृदयीं त्यांच्या ॥ ९ ॥
कामक्रोध वैरी दुराविले दुरी । मज हृदयमंदिरीं सांठविलें ॥ १० ॥[१]
तेणें त्याच्या उच्छिष्टा जालोंसे अधिकारी । ब्रह्मरसा सरी न पवी जेथें ॥ ११ ॥
म्हणोनि ये संसारीं धन्य एक नामा । जेणें माझा प्रेमा अनुभविला ॥ १२ ॥[२]

[९३८]

महा मुक्ति क्षेत्र तीर्थाचें तारक । उपमेसि आणीक नाहीं दुजें ॥ १ ॥
तें हें पंढरपूर प्रेमाचें भांडार । नामें निरंतर गर्जतसे ॥ २ ॥
येवढें तीर्थ जवळी असतां पैं समर्थ । कोण भाग्यहत दैन्य भाकी ॥ ३ ॥
जीवन्मुक्त ज्ञानी येथें पुंडलिक मुनि । बैसलासे ध्यानीं परलक्षी ॥ ४ ॥
योग्यांचे हृदयींचें निजध्यान नेटकें । तें जयाचेनि सुखें वेडावलें ॥ ५ ॥
पुण्यपावन भीमा दक्षिणवाहिनी । अमृत संजीवनी पुण्यराशी ॥ ६ ॥
आनंदरसकुपिका प्रत्यक्ष चंद्रभागा । दर्शनें न या गा गर्भवासा ॥ ७ ॥
स्वर्गी मंदाकिनी लाजोनि राहिली । पाताळीं प्रवेशली भोगावती ॥ ८ ॥

---

अभंग ९३७--(पं.), (धु.), (पा.) व (है.), ९३८--(पं.), (धु.), (शि.), (पा.) व (है.)
१ (है.) प्रतीत १० वा चरण नाही. २ (है.) प्रतीत चरणक्रम ८, ९, १२ व ११ असा आहे.

सहस्रभाग भेणें होउनी भागीरथी । सागरा मिळती जाली वेगीं ॥ ९ ॥
भक्तजन भाग्याची कीं सुख आरोग्याची । जें कां वैराग्याची जन्मभूमी ॥ १० ॥
तेथें हरिखे निर्भर नामा संतांचें संगतीं । गीतीं गाय कीर्ति विठोबाची ॥ ११ ॥

[९३९]

सकाम निष्काम वाचे जपे नाम । तो माझा परम प्राणसखा ॥ १ ॥
जीवाहूनि आवडता न करी जीवापरता । पूजी परम देवता भावें त्यासी ॥ २ ॥
हे माझी प्रसिद्धि जगीं ब्रीदावळी । हरिदासाचे कुळीं बोळंगे सदा ॥ ३ ॥
जन्मोनि ज्याचे कुळीं एक हरिदास । धन्य त्याचा वंश पुण्यशीळ ॥ ४ ॥
काया वाचा मनें न विसंबे त्यासी । [1]ते माझ्या दैवासी दैव जाले ॥ ५ ॥
नामधारकाचें उच्छिष्ट जेथें पडे । उभा राहोनि पुढें झेली मुखें ॥ ६ ॥
तें मज गोमटें सेवितां सुख वाटे । म्हणोनि धाटें मोठें शरीर माझें ॥ ७ ॥
[2]वहु कांति पुष्टि यश कीर्ति प्रभा । नित्य नवी शोभा होय तेणें ॥ ८ ॥
ते संत सोयरे भेटती जे वेळीं । ते माझी दिवाळी दसरा सण ॥ ९ ॥
म्हणोनी नामयातें जेवविलें सांगातें । बहु दिवस होतें आर्त पोटीं ॥ १० ॥
जालें तें सर्वथा नोहे पैं अन्यथा । पुढतीं सांगा आतां काय करणें ॥ ११ ॥

[९४०]

तंव म्हणती द्विज परियेसी गुणनिधी । प्रतिपादिले वेदीं जे जे धर्म ॥ १ ॥
ते ते आचरावे विहित क्रियाकर्म । जें जें वर्णाश्रमें आलें जया ॥ २ ॥
तेचि एक धन्य जगीं देहधारी । असतां संसारीं जीवन्मुक्त ॥ ३ ॥
आचार प्रथम ब्राह्मणांचा धर्म । शौच नित्यनेम सत्यवाणी ॥ ४ ॥
तप शम दम भूतदया पूर्ण । अखंड अनुसंधान स्वस्वरूपीं ॥ ५ ॥
स्नानसंध्या जप होम अध्ययन विधि । देवतार्चन सिद्धि करुनी भावें ॥ ६ ॥
वैश्वदेव आणि अतिथीपूजन । नववें ब्रह्मयज्ञ आवश्यक ॥ ७ ॥

---

अभंग ९३९ व ९४०--(पं.), (धु.), (पा.) व (है.)
१ तो महादैवासी दैव जाला। (धु.) २ बाळ कांति संतुष्टि अतिशयें शोभा । नीच नवी प्रभा होय जेणें ॥ (धु.)

संपादुनि हे विधि सारावें भोजन । त्यावरी श्रवण पुराणांचें ॥ ८ ॥[1]
सर्व काळ व्हावें संतुष्ट मानस । असावा विश्वास वेदवचनीं ॥ ९ ॥[2]
तुम्हीं तंव सर्वज्ञ संपन्न चतुर । देखावा विचार विशुद्धीचा ॥ १० ॥
सांडुनि अभिमान व्हावें शुद्धमती । जोडावी ते कीर्ति उभय लोकीं ॥ ११ ॥
जावें चंद्रभागे करावें मंत्रस्नान । द्यावें हेमदान सत्वशुद्धी ॥ १२ ॥
पुण्यजना एकी क्षेत्रप्रदक्षिणा । [3]करावीं पावन उभयकुळें ॥ १३ ॥
ऐकोनि पंढरिरावो बोलते जाले वाचा । आज्ञा ते शिरसा स्वामियांची ॥ १४ ॥
परी काया वाचा मनें मागेन तें द्यावें । माझ्या सांभाळावें नामयासी ॥ १५ ॥

[९४१]

तुम्ही सदाचार [4]महंत ब्रह्मवादी । तुमची वाग्नदी ब्रह्मरूप ॥ १ ॥
सत्य वचन जळ पवित्र तें निर्मळ । कृतार्थ तेणें केवळ जालोंसे मी ॥ २ ॥
हा तुमचा विश्वास दृढ आहे मज । तुम्ही माझे पूज्य परम देव ॥ ३ ॥
स्नानाचा प्रकार आहे पंचविध । सांगेन विद्गद भाव त्याचा ॥ ४ ॥
अर्थीं ठेवुनी दृष्टी विवेक घ्यावा पोटीं । प्रत्यया येईल गोष्टी अनुभवाची ॥ ५ ॥
उत्तमाहुनी उत्तम सत्य वाग्स्नान । यापरतें पावन आणिक नाहीं ॥ ६ ॥
काया वाचा मनें हें दृढ धरिजे । हेळाची तरिजे भवसागरु ॥ ७ ॥
बाहेजु भीतरीं शुद्ध सर्वकाळ । हें दुजें निर्मळ शुद्धस्नान ॥ ८ ॥
हें जया सदैवा घडे भाग्ययोगें । मग तया न लगे साधन कांहीं ॥ ९ ॥
सकळ इंद्रियांचा करोनि निग्रहो । दंडावा विग्रहो वासनेचा ॥ १० ॥
हें तिजें निर्मळ घडे जया स्नान । न लगे अनुष्ठान करणें त्यासी ॥ ११ ॥
सर्वांभूतीं करुणा हेंचि पैं चवथें स्नान । साधितो सज्जन विरळा कोणी ॥ १२ ॥
त्याचेनि दर्शनें जळती पापराशी । तो सर्वां तीर्थांसी तीर्थरूप ॥ १३ ॥
पांचवें स्नान काया प्रक्षाळावी जळीं । करणें ते आंघोळी लौकिकाची ॥ १४ ॥

अभंग ९४१—(पं.), (धु.), (पा.) व (हे.)
१ आठव्या चरणानंतर (धु.) प्रतीमध्ये पुढील चरण आहे—
यैसी क्रिया बुधि करावी आत्मसुधि । पावावे तप्तसीळ वकरी ॥
२ नववा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही.
३ करुनियां जाणा पवित्रकुळ ॥ (आ.) ४ अहं ब्रह्मवादी (धु.)

अनुक्रमणिका

काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । हे दोष दुर्धर देहामाजीं ॥ १५ ॥
[1]विवेक वैराग्य धरावें मानसीं । रहावें संगतीसी संतांचिया ॥ १६ ॥
अनंत जन्माचें हेंचि प्रायश्चित्त । ज्याचे वाचे नित्य रामकृष्ण ॥ १७ ॥
शांति क्षमा दया निजबोध निवृत्ती । अखंड खेळती जयापाशीं ॥ १८ ॥
तो एक संसारीं धन्य शिपी नामा । आवडता आम्हां जीवाहोनी ॥ १९ ॥

[ ९४२ ]

प्रार्थूनि सकळां बोले देवरावो । फेडावा संदेहो वासनेचा ॥ १ ॥
स्नानविधीलागीं जावें चंद्रभागे । संताचेनि संगें आम्ही तुम्ही ॥ २ ॥
बाप भक्तप्रिय कैवारिया मुरारी । लीला वोडंबरी खेळ खेळू ॥ ३ ॥
नामयाचा हात धरोनि करकमळीं । चाले वनमाळी समारंभें ॥ ४ ॥
नरनारी कवतुक पाहती सकळिक । स्वर्गी ब्रह्मादिक ठकले ठेले ॥ ५ ॥
सकल संतमेळासहित शारंगधरु । पाठी दळभारू ब्राह्मणांचा ॥ ६ ॥
आले चंद्रभागे हरिनाम गर्जत । केला प्रणिपात पुंडलिकासी ॥ ७ ॥
प्रक्षाळोनि चरण केले प्राणायाम । बाप सकळ धर्म जनिता स्वयें ॥ ८ ॥
समस्त द्विजकुळां करोनी प्रदक्षिणा । आरंभिले स्नानविधि देवें ॥ ९ ॥
चाचर कुरळ केश रुळती पाठीवरी । पितांबरधारी शामतनू ॥ १० ॥
सुंदर कमळनयन मुख प्रभाराशी । तें ध्यान मानसीं सनकादिकां ॥ ११ ॥
गोमयमृत्तिका आणोनियां देखा । प्रक्षाळुनी उदका वेदमंत्रें ॥ १२ ॥
करुनि प्रयोग सारियेलें स्नान । केला परिधान सोनसळा ॥ १३ ॥
ब्राह्मणाचें तीर्थ मस्तकीं वंदिलें । अभिवंदन केलें हरिच्या दासा ॥ १४ ॥
सारोनियां संध्या नित्य नेम सर्व । पुजिले भूदेव दिधलीं दानें ॥ १५ ॥
म्हणे कृपादृष्टीं मज केलें सनाथ । पुरविलें आर्त हृदयीचें ॥ १६ ॥
येथुनी संशयो न धरावा मानसीं । मानावें आम्हांसी आत्मरूप ॥ १७ ॥
चालिले त्वरित आले महाद्वारां । आज्ञा द्विजवरां दिधली देवें ॥ १८ ॥
तेथें हरिखे निर्भर नामा निजबोधें । नाचतो आनंदें गरुडपारीं ॥ १९ ॥

अभंग ९४२—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.)
१ विवेकें वैराग्यें निवटावे हे आधीं । करावी चित शुद्धी संतसंगें ॥ (है. व धु.)

अनुक्रमणिका

[९४३]

समस्त भक्तमंडळीसहित वनमाळी । प्रवेशले राउळीं परमानंदें ॥ १ ॥
राही रखुमाई सत्यभामा वेगीं । देवातें अष्टांगीं नमस्कारिती ॥ २ ॥
बाप सुखसिंधु स्वामी आर्तबंधु । प्रीति परमानंदु निजभक्तां ॥ ३ ॥
सत्यभामेनें केलें प्रक्षाळण चरणां । रुक्माई विंजना जाणविती ॥ ४ ॥
विडा देती राही उभी उजव्या बाही । दृष्टी ठेवुनि पायीं कवळी मनें ॥ ५ ॥
शुक सनकादिक नारद तुंबर । करती जयजयकार नामघोषें ॥ ६ ॥
आले बंदीजन पढती ब्रीदावळी । ध्यान हृदयकमळीं चंद्रचूडा ॥ ७ ॥
निवृत्ती ज्ञानदेव सोपान सांवता । जवळी त्या जनमित्रा बोलाविलें ॥ ८ ॥
[१]सकळिक संतां परमानंदें तृप्ती । सारोनि श्रीपति आरोगणा ॥ ९ ॥
बैसोनि एकांतीं पंढरीचा राणा । करितसे विचारणा निजभक्तांसी ॥ १० ॥
सकळिक ब्राह्मण आणावे भोजना । निरसावी वासना संदेहाची ॥ ११ ॥
उठोनि प्रातःकाळीं यावें शीघ्रवत । द्यावया अक्षत ब्राह्मणांसी ॥ १२ ॥
निजबोधें [२]आनंदें हर्षे खेळेमेळे । भोगावे सोहळे स्वानंदाचे ॥ १३ ॥
फेडवी तयांची भेदभ्रमदृष्टी । द्यावी तयां भेटी निजरूपाची ॥ १४ ॥
संतसंगतीचा प्रगट व्हावा महिमा । द्यावा भक्तिप्रेमा नामयासी ॥ १५ ॥

[९४४]

सुख सेजेवरि देव विश्रांति पहुडले । विश्रांतीसी गेले सकळ भक्त ॥ १ ॥
ब्रह्मवीणा करीं घेऊनि ब्रह्मसुत । जाणवी एकांत [३]नारदमुनी ॥ २ ॥
बाप पंढरीनाथ सुखाचा सुखसिंधु । नित्य नवा आनंदु सोहळा करी ॥ ३ ॥
विश्रांति विसांवा जें विश्वमंगळ । तें नाम निर्मळ विठोबाचें ॥ ४ ॥
तो भक्तशिरोमणी वैराग्य पुतळा । गातो प्रेमकळा धरुनी कंठीं ॥ ५ ॥
तेणें श्रवणामृतें हृदय कोंदाटलें । प्रेमाचे सुटले पाझर नयनीं ॥ ६ ॥
हर्षे निर्भर [४]दोनी देव नारदमुनी । प्रीति आलिंगनीं एकमेकां ॥ ७ ॥
जाती चंपक सुमनें माजीं तुळसीमिश्रित । दिधल्या त्या उचित कंठीं माळा ॥ ८ ॥

अभंग ९४३, ९४४—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.)
१ सकळिकांची पंक्ति (धु. व तं.) २ विनोदें (धु., है. व तं.) ३ नादब्रह्मीं (तं.)
४ मनीं (पं.)

अनुक्रमणिका

नमस्कार करुनि केलें विसर्जन । भरल त्रिभुवन ब्रह्मरसें ॥ ९ ॥
मग चालिले तेथोनि ऋषी नारदमुनी । हृदयीं संजीवनी कृष्णनाम ॥ १० ॥
तेणें त्या विश्रांती नित्य तृप्ती मनीं । नामा जीवें चरणीं विनटला ॥ ११ ॥

[९४५]

जीवींचें गुज राही रुक्माईसी पुसे । न धरवे मज हांसे नवल वाटे ॥ १ ॥
काय अभिश्राप आला देवराया । केली आपणया आत्मशुद्धी ॥ २ ॥
हें मज वाई सत्य सांगा वाणी । कवणें चक्रपाणि भुलविलें ॥ ३ ॥
सूर्य आणि अंधारू वर्ते एके ठायीं । हें भूतभविष्य नाहीं वर्तमान ॥ ४ ॥
ऐसें हें अघटित जरी घडेल प्रसंगीं । तरीच दोष संसर्गी देवराया ॥ ५ ॥
अग्निमाजीं बीजें पाल्हेजती सुरवाडें । कीं बुडालें सांपडे लवण जळीं ॥ ६ ॥
ऐसें हें अभिनव जरी घडेल प्रसंगीं । तरीच संसर्गी पडती देवो ॥ ७ ॥
ज्योतीसी अळूमाळु मिळाल्या कर्पुरी । पुढती त्यासी उरीं उरे जरी ॥ ८ ॥
ऐसें होय जरी या त्रिभुवनामाझारीं । तरीच [1]केशिराजीं वसती दोष ॥ ९ ॥
तरी हें न कळे माते सांगावें साचार । सर्वज्ञ चतुर वडील तुम्ही ॥ १० ॥
रुक्माई म्हणे या नामयाचे चाडे । अनंत पवाडे केले देवें ॥ ११ ॥

[९४६]

रुक्माई म्हणे परियेसी वो आरजे । सांगेन [2]सकळ जें वर्म तुज ॥ १ ॥
अनाथा माहेर एक चक्रपाणि । बहु दिनालागोनी लोभापर ॥ २ ॥
म्हणोनि भुलला देव नाम्याचेनि लोभें । कर्में शुभाशुभें अंगिकारी ॥ ३ ॥
आवडीचा वोरसु न करी कायकाय । हा प्रसिद्ध अनुभव आहे [3]लोकां ॥ ४ ॥
विषम विषयसुख विषयाचें गळालें । तयाचे सोहळे करिती लोक ॥ ५ ॥
आंधळे पांगुळे मुके अनर्गळ । परी जीवापरिस बाळ पढियें मातें ॥ ६ ॥
अंतरीच्या कळवळें खेळवी लाडेंकोडें । परि विलासाचे नावडे चोख चांग ॥ ७ ॥
प्रीतीच्या पडिभरें नेघे पैं विकृती । देखोनि विश्रांति थोर मानी ॥ ८ ॥
म्हणे माझे आळीकर दिठावेल झणीं । इडापीडा घेउनी वदन चुंबी ॥ ९ ॥

---

अभंग ९४५ व ९४६—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.)
१ श्रीहरीं (आ.) २ तुज वर्म स्वामियाचें (है. व तं.) ३ लोकांचारी (पा.)

अनुक्रमणिका

स्नेहाच्या संभ्रमें नेणे लोकलाज । उचलोनि भुज घाली कंठीं ॥ १० ॥
तनुमनप्राणांची करूनी ओंवाळणी । जावें हें माझेनि म्हणे जीवें ॥ ११ ॥
तैसीच परी आहे या विठ्ठलाच्या ठायीं । चित्त याच्या पायीं ठेविलें जेणें ॥ १२ ॥
न पाहे तयाचें जाती कुळ कर्म । [1]वर्णाश्रमधर्म शुद्ध वाणी ॥ १३ ॥
अनंत जन्मांचा कायामनेंवाचा । आहे या दोघांचा ऋणानुबंधु ॥ १४ ॥
[2]तो नकळे न सुटे कोणिये कल्पांतीं । जिवलग सांगाती जाला नामा ॥ १५ ॥

[ ९४७ ]

मग नारदातें पुसे सत्यभामा देवी । विस्मयो माझ्या जीवीं अति वाटे ॥ १ ॥
सांडोनियां थोरी देव मुगुटमणी । नाचतो कीर्तनीं संतांपुढें ॥ २ ॥
तरी कोणिये जन्माचें काय काय याचें । घेतलें नाम्याचें ऋण देवें ॥ ३ ॥
एका पुंडलिकाचेनि पांगें येणें हो श्रीरंगें । अठ्ठावीस युगें उभ्या गेलीं ॥ ४ ॥
न पाहे परतोनी अझुनी पाठिमोरा । न बोले निष्ठुरा वचन कांहीं ॥ ५ ॥
तरी कोण प्रीति देवा कोण्या ऋणानुबंधें । राखितो आनंदें बळिचें द्वार ॥ ६ ॥
विकिला पायिक कायामनें वाचा । जाला पांडवांचा वेळाइतु ॥ ७ ॥
जें जें जया आवडे तें तें धरोनी रूप । पाववी संकल्प सिद्धी त्यांचे ॥ ८ ॥
एकला एकटु एकलेनि जीवें । भक्तांचें करावें सकळ काज ॥ ९ ॥
ऐसे भक्त अपार आहेत भूमंडळीं । किती लागावळी असेल त्यांची ॥ १० ॥
म्हणोनि माझ्या जिवीं वाटे थोर खंती । स्वामीतें शिणविती युगायुगीं ॥ ११ ॥
भक्तांचे आवडी त्यजिलें वैकुंठभुवन । चित्तीं अमृतपान न वाटे गोड ॥ १२ ॥
अखंड आवडे संतांची संगती । बैसोनि एकांतीं घेती सुख ॥ १३ ॥
ऐसी इहीं चाळविलें वैष्णवीं । आमुचें घर गोसावी भुलविलें ॥ १४ ॥
त्यां सकळांहुनि पढियंता देवा एकु नामा । भक्तिभावें प्रेमा दिधला त्यासी ॥ १५ ॥

[ ९४८ ]

तंव म्हणती नारदमुनि परियेसी वो माते । सांगेन मी तूतें सत्य मानी ॥ १ ॥
हा निर्विकल्प देव येतसे रूपा । करावया कृपा भक्तजनां ॥ २ ॥

---

अभंग ९४७ व ९४८—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.)
१ मानी प्रियतम जीवाहुनि ॥ (है.), मानी पुरुषोत्तम आपणाहुनि ॥ (तं.)
२ तो न तुटे, न बुडे न ढळे कल्पांतीं । (है.)

अनुक्रमणिका

हा शरणांगता वत्सलु अनाथा कृपाळु । मिरवी दीनदयाळु ब्रीद जगीं ॥ ३ ॥
जो शब्दब्रह्मजनिता सकळ विधिकर्ता । धर्माचा पाळिता पक्षपाती ॥ ४ ॥
म्हणोनि जन्मकर्मे असंख्यात जगीं । केलीं याचलागीं नारायणें ॥ ५ ॥
अंबऋषीचें येणें सोसले गर्भवास । राखितो उदास बळिचें द्वार ॥ ६ ॥
विकिला पाइकु कायामनें वाचा । जाला पांडवांचा मोलेंविण ॥ ७ ॥
गोकुळीं नंदाची राखिलीं गोधनें । प्रीति उच्छिष्ट खाणें गौळियांचें ॥ ८ ॥
विघ्न पडे तेथें आपणा वोडवी । संकटीं सोडवी माझी म्हणोनी ॥ ९ ॥
सांडोनि अभिमान न्यून कामें करी । जालासे अधिकारी दास त्याचा ॥ १० ॥
आज्ञा वाहे शिरीं जीवीं जतन करी । मानिलीं सोयरीं जिवलगें ॥ ११ ॥
एके अपमानिती दावेवरी बांधिती । उपहास करिती हर्ष मानी ॥ १२ ॥
केले अपराध नेघे अपुले चित्तीं । दुणाविती प्रीति नित्य नवी ॥ १३ ॥
ऐसे ब्रह्मांडनायकु देवा मुगुटमणी । हे त्याची करणी ख्याती जगीं ॥ १४ ॥
आम्ही सकळ भक्त याचे पूर्ण अंशु । [1]चरणींचा सौरसु नामयासी ॥ १५ ॥

[ ९४९ ]

निज गुज रुक्माई पुसे पंढरीनाथा । ठेवुनियां माथा चरणावरी ॥ १ ॥
सर्वांहुनि पढियंते काय स्वामियातें । तें मज निरुतें सांगा स्वामी ॥ २ ॥
हे माझ्या जीवींचि फेडावी आशंका । ब्रह्मांडनायका कृपाळुवा ॥ ३ ॥
[2]न रिगे तुमचें चित्त योगियांचे ध्यानीं । वैकुंठभुवनीं प्रीति नाहीं ॥ ४ ॥
तेथिंचे सुखभोग सकळ विलास । नावडती उदास कवण्या गुणें ॥ ५ ॥
सायोज्यता मुक्ति आपुली देऊनी । ज्ञानी ते निर्गुणीं बुडविले ॥ ६ ॥
त्याहुनि जिवलग कोण तुमचे सखे । जे त्याचेनि पैं सुखें [3]वेडावलेती ॥ ७ ॥
चतुरानना ऐसा स्तवितां चतुरपणें । अठराही पुराणें वेद चारी ॥ ८ ॥
परि तेही उवगलीं म्हणती नेती नेती । शिणलीं वेवादती साहीजणें ॥ ९ ॥
ऐकुनि पंढरीनाथ बोले रुक्माईसी । तूं कां वो नेणसी गुज माझें ॥ १० ॥
कायावाचामनें सर्व निरंतरीं । आहे नाम्यावरी लोभ माझा ॥ ११ ॥

अभंग ९४९—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ म्हणौनि धरिला वेष नाम्यालागीं । (है.)
२ न रंगे (धु., तं. व पा.), न लगे तुमचें चित्त (है.)   ३ लांचावलेनि (तं. व है.)

[ ९५० ]

जीवींचें गुजगौप्य सांगेन वो तूतें । ऐक एकचित्तें मनोधर्में ॥ १ ॥
आवडते हे माझे भक्त परम सखे । जे सबाह्य सारिखे सप्रेमळ ॥ २ ॥
त्यापरिस [1]थोर नाहीं मन दुजें । मज त्याचेनि काजें नांवरूप ॥ ३ ॥
भक्त सर्वांहोनि पढियंते माझिया हो जीवा । भक्त हा विसावा ज्ञानियांचा ॥ ४ ॥
भक्त योगियांच्या सुखाचा श्रृंगारु । भक्त अलंकारु वैराग्याचा ॥ ५ ॥
भक्त वो माझिया जीवीचें निजध्येय । भक्त परमप्रिय कुळदैवत ॥ ६ ॥
भक्तसंगेंसुखें विश्रांति विसांवा । भक्त माझा ठेवा सर्व धन ॥ ७ ॥
भक्त हे माझिया भाग्याचें भूषण । भक्त ते निधान निक्षेपीचें ॥ ८ ॥
भक्त यश कीर्ति भक्त सुख मूर्ति । भेटे तरी पुरती सकळ काम ॥ ९ ॥
भक्त माझ्या सर्व सुखाचा अधिकारी । भक्ताचिया घरीं वस्ती माझी ॥ १० ॥
मज आणि भक्तां नाहीं वेगळिक । घ्यावें सर्व सुख भक्तें माझें ॥ ११ ॥
भक्तें नाम घ्यावें भक्तें रूप घ्यावें । भक्तें मुख पहावें घडिये घडिये ॥ १२ ॥
भक्तें हृदयीं माझे चिंतावे चरण । भक्तें आलिंगन द्यावें मज ॥ १३ ॥
धर्मअर्थकाममोक्ष मुक्ति चारी । देतां न धरी करीं भक्त माझा ॥ १४ ॥
भक्त न मागे कांहीं न घाली मज भार । मजहुनि उदार भक्त माझा ॥ १५ ॥
पत्रपुष्प फळ जळ तें सर्वभावें । भक्ताचें मज व्हावें भलतैसें ॥ १६ ॥
आस करुनी वास पाहे घडिये घडिये । भक्ताचें तें पढिये सर्व मज ॥ १७ ॥
तरी मी भक्तांचा कीं भक्त आमुचे । सोईरे निजाचे एकमेक ॥ १८ ॥
म्हणोनि नामयाचे आर्त थोर जीवा । जवळोनि नवजावा दूर कोठें ॥ १९ ॥

[ ९५१ ]

तंव ते सकळ भक्त आले शीघ्रवत । आनंदें गर्जत नामघोषें ॥ १ ॥
प्रेमें उचंबळत अंतरीं बोधले । सप्रेमें लोटले चरणांवरी ॥ २ ॥[2]
त्या सुखाचा आनंदु न वर्णवे वाचे । एवढें भाग्य कैचें बोलावया ॥ ३ ॥
आलिंगोनि देवें धरिलें हृदयकमळीं । सादर सांभाळी कृपादृष्टी ॥ ४ ॥

---

अभंग ९५० व ९५१—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ सोयरें (तं.) २ दुसरी ओवी (धु.) प्रतीमध्ये पुढीलप्रमाणे आहे—
ध्यानीं मनीं भेटले स्वस्वरुप अंतःकरणीं । घातली लोळणी पायावरी ॥

अनुक्रमणिका

श्रीमुखाची वास पाहती वेळोवेळा । जाला एकवळा आनंदाचा ॥ ५ ॥
मग उदार चक्रवर्ति सर्वज्ञाचा रावो । सांगे [1]जीवींचा भावो रुक्माईसी ॥ ६ ॥
केला चंद्रभागें संकल्प संपूर्ण । तो व्हावा उत्तीर्ण सर्वभावें ॥ ७ ॥
क्षेत्रवासी द्विज सुशील सदाचार । जे पुण्यसागर भूदैवत ॥ ८ ॥
ज्यांचेनि दर्शनें पाप ताप जाय । यशकीर्ति होय [2]चरणतीर्थें ॥ ९ ॥
तरी ते प्रार्थुनियां आजी आणावे [3]त्रिभुवना । द्यावें त्या भोजना भक्तिभावें ॥ १० ॥
तेणें सकळ काम होतील परिपूर्ण । घ्यावें आशीर्वचन ब्राह्मणांचें ॥ ११ ॥
तंव म्हणे रुक्माई ब्रह्मांडनायका । अक्षत सकळिकां द्यावी देवा ॥ १२ ॥
सकळहि सिद्धि असती सदोदित । कर जोडुनि तिष्ठत सकळ काम ॥ १३ ॥
हांसोनि पंढरीनाथ बोले कवतुकें । जिवलगा आईके विष्णुदासा ॥ १४ ॥
पुढती कवतुक करणें तुजलागीं । [4]नामयासी वेगीं कळली खूण ॥ १५ ॥

[ ९५२ ]

केशव म्हणे नाम्या सुखाच्या निधाना । दे रे आलिंगना आवडत्या ॥ १ ॥
जिवलगा जवळोनि नवजे कोठें दुरी । वाटे तुज अंतरीं घालावासी ॥ २ ॥
न पुरे माझें आर्त घेतां तुझें सुख । मज नित्य तृप्ति भूक वाटे थोरी ॥ ३ ॥
उत्कंठित चित्त अखंड तुजकारणें । तुज देखिल्या पारणें होय नयना ॥ ४ ॥
अनंत जन्माचा हा ऋणानुबंधू । तरीच प्रीतिवादु न तुटे तुझा ॥ ५ ॥
तुवां मजलागोनि देह कर्वती दिधले । उग्र तप साधिलें जन्मोजन्मीं ॥ ६ ॥
त्यजोनि सर्व माया चित्त निरोधिलें । हृदयीं मज बांधिलें वश्य करोनी ॥ ७ ॥
तुज काय देईजे उतराई होईजे । ऐसें न देखिजे त्रिभुवनीं ॥ ८ ॥
शरीर प्राणाचें त्वां देऊनि बळिदान । केलें पै निर्वाण भक्तराया ॥ ९ ॥
करावें म्यां दास्यत्व आपुलेंनि अंगें । तुज तरी कांहीं नलगे देणें घेणें ॥ १० ॥
नामा म्हणे देवा तूं दीनाचा कैवारी । म्हणोनि मजवरी करिसी मोहो ॥ ११ ॥

[ ९५३ ]

भक्तजनवत्सल सुखसिंधुराशी । निर्भर मानसीं परमानंदें ॥ १ ॥
सरिसे सकळ भक्त घेउनि पंढरिनाथ । चालिले अक्षत द्यावयासी ॥ २ ॥

---

अभंग ९५२—(पं.), (धु.), (शि.), (है.), (पा.) व (तं.), ९५३—(पं.), (धु.), (है.) (पा.) व (तं.)

१ निजभावो (धु.) २ आयुष्मति (है. व पा.) ३ निजभुवना (धु., पं. व पा.)
४ नामा म्हणे खुण कळली देवा। (धु., तं. व है.)



अनुक्रमणिका

बाप तो कवतुकीं अनाथाचा नाथ । भोगिया श्रीमंत खेळू खेळे ॥ ३ ॥
तंव ते उदित भाग्य भाग्यवंत । दर्शनाचें आर्त होतें त्यासी ॥ ४ ॥
सकळही मिळोनि गेले कुंडलतीर्थी । तंव आले कमळापति दर्शनासी ॥ ५ ॥
तेथें देखोनियां सकळांचा मेळा । केला द्विजां सकळां प्रणिपातु ॥ ६ ॥[1]
सांडोनि देहबुद्धि निःसंदेह व्हावें । कृपा करोनि यावें भोजनासी ॥ ७ ॥
पाळावें आपुल्या दिधल्या सत्यवचना । करावी वासना तृप्त माझी ॥ ८ ॥
स्नानसंध्या विधि सारोनि समस्त । यावें शीघ्रवत नैवेद्यासी ॥ ९ ॥
ते निवाले दर्शनें तृप्त जाले मनें । परिसोनि वचनें अमृतोपम ॥ १० ॥
आम्ही तरी आश्रित हेंचि जाणा सत्य । आशिर्वाद नित्य देतों तुम्हां ॥ ११ ॥
सर्वभावें आमुचा करावा सांभाळ । स्वामी दीनदयाळ विश्व बोले ॥ १२ ॥
तुम्ही महाराज राजराजेश्वर । पाहावें निरंतर कृपादृष्टी ॥ १३ ॥
तुमचा हा आदर निरुपम सर्वथा । दिधलीसे मान्यता वेदवचना ॥ १४ ॥
तें भाग्य आपुलें जतन सर्वभावें । [2]साक्ष करुनी द्यावें प्रेम नाम्या ॥ १५ ॥

## [९५४]

बाप आर्तबंधु सकळ जीवनकंदू । भक्तांचा सुखसिंधु पंढरिरावो ॥ १ ॥
हर्षें निर्भर चित्तीं आले निजभुवना । सांगे विवंचना रुक्माईसी ॥ २ ॥
धन्य दिवस [3]जाला आजि सोनियाचा । सोहळा भक्तांचा आरंभिला ॥ ३ ॥
प्रार्थिले ब्राह्मणां भोजनालागुनी । येताती सारोनि स्नानविधी ॥ ४ ॥
आजीचें कवतुक पाहावें अभिन्न । हांसोनियां देव बोलते जाले ॥ ५ ॥
तंव म्हणे रुक्माई अहो जी पूर्णकामा । स्वामी मेघश्यामा कृपानिधी ॥ ६ ॥
त्यांचें पूर्व पुण्य आजि आलें फळा । देखिले गोपाळा चरण तुमचे ॥ ७ ॥
तंव ते नित्य नेम सारोनि आपुले । वेगीं द्विज आले राउळांगणा ॥ ८ ॥
नमस्कारुनि देवें बैसविलें आसनीं । पूजा चक्रपाणि आरंभिली ॥ ९ ॥
चरण प्रक्षाळुनी गंध तुळसीमाळा । घातलिया गळां ब्राह्मणाच्या ॥ १० ॥

अभंग ९५४—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)

१ सहावी ओवी (है.), (तं.) व (धु.) या प्रतींत पुढीलप्रमाणे आहे—
बाप ब्रह्मण्य देवपर ब्रह्मपुतळा । केला द्विजकुळा प्रणिपात ॥

२ करुनि प्रेम द्यावें नामयासी (है., तं. व धु.) ३ पाहिला (है.)

अनुक्रमणिका

उजळोनि दीपक ओंवाळिले प्रीति । मग ते पात्रपंक्ति मांडियेल्या ॥ ११ ॥
रत्नजडित सकळां सुवर्णाचीं ताटें । षड्स बरवंटे तयामाजीं ॥ १२ ॥
विस्तारोनि वेगीं [1]ओगरिलीं चांगें । संकल्प श्रीरंगें सोडियेला ॥ १३ ॥
देउनि आपोशन अमरचूडामणी । प्रार्थितो जोडोनि करकमल ॥ १४ ॥
कवळोकवळीं घ्यावें नाम अच्युताचें । भोजन भक्ताचें सुखरूप ॥ १५ ॥
[2]ऐसे जेविले आनंदें धाले परमानंदें । मुखशुद्धि गोविंदें समर्पिली ॥ १६ ॥
रत्नाचे दीपक उजाळोनि आरती । साष्टांग श्रीपति नमस्कारिलें ॥ १७ ॥
जोडोनि दोन्ही कर विनवितो श्रीरंग । आजीचा प्रसंग पुण्यकाळ ॥ १८ ॥
आम्हां तुम्हां भेटी जाल्या सुखगोष्टी । भरली सकळ सृष्टी परमानंदें ॥ १९ ॥
अवघे संतजन आमुचे सांगाती । जेवूं एका पांती सरिसे आम्ही ॥ २० ॥
म्हणोनि सकळिकां पाचारिलें देवें । कवतुक अवघे पाहाती द्विज ॥ २१ ॥
ब्रह्मादिक देव तिष्ठत पाहाती व्योमीं । वंचलों रे आम्ही भक्ति सुखा ॥ २२ ॥
सर्वप्रेम देउनि निवविला नामा । ऐसें भाग्य आम्हां कैंचें आतां ॥ २३ ॥

[९५५]

निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान सांवता । जनमित्र पढियंता जिवलगू ॥ १ ॥
आसंद सुदामा विसोबा खेचर । नरहरी सोनार आदिकरुनि ॥ २ ॥
बाप आर्तबंधु कृपाळू दीनाचा । अभिमान भक्तांचा न संडी कदा ॥ ३ ॥
[3]चोखामेळा बंका भक्तवत्सल लाडका । तो बोलविला देखा आरोगणें ॥ ४ ॥
वैराग्याचा मेरु तो गोरा कुंभारु । आवडता डिंगरु केशवाचा ॥ ५ ॥
ऐसें थोरसानें सकळ भक्त राणे । देवें आरोगणें बोलावले ॥ ६ ॥
सधूप आणि दीप तुळशीच्या माळा । पूजिलें सकळां देवरायें ॥ ७ ॥
तंव राही रखुमाबाई सत्यभामा सती । विस्तारोनि आणिती विविध बोणी ॥ ८ ॥
भोंवती भक्तमंडळी मध्यें वनमाळी । शोभे नभमंडळीं चंद्र जैसा ॥ ९ ॥
सकळांमुखीं कवळ देतसे निजकरें । उच्छिष्ट पितांबरें सांवरितो ॥ १० ॥

अभंग ९५५—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ लेहें पेहें चांगें (है. व पा.), लेह्यपेह्य (तं. व धु.)
२ जेविलें आनंदें तृप्ति जालें सकळ । मग करी तांबोल दिधलें देवें ॥ (है.)
करशुद्धि तांबोळ ॥ (तं.), मुखशुद्धि तांबोळ ॥ (धु.)
३ जनक प्राणसखा काठिकर परसा भागवत । (तं.)

त्या सुखाचा पारु देखोनी वैकुंठीं । होती लूलूमिठि सुखराशी ॥ ११ ॥
ऐसें तें भोजन जालें खेळेंमेळें । ब्रह्मरसें धाले सकळ भक्त ॥ १२ ॥
[1]तंव विमानें आकाशीं दाटले सकळ । करिती कल्लोळ पुष्पवृष्टी ॥ १३ ॥
तें देखोनी द्विजवर पडिले चिंतवणी । म्हणती पैं जाली हानी जीवित्वाची ॥ १४ ॥
नव्हे हा ज्ञानमार्ग नव्हे हें वैराग्य । नवल भक्तिभाग्य आवडीचें ॥ १५ ॥
एक म्हणती हा पांडुरंग होय साचें । येव्हढें भाग्य कैचें मानवियां ॥ १६ ॥
हा नव्हे गुणिवंतु क्रियाकर्मातीतु । यासी प्रायःश्चितु काय घडे ॥ १७ ॥
नाहीं यासी आप नाहीं यासी पर । नाहीं या आचार जातिकूळ ॥ १८ ॥
षड्मार्गं संबंध नाहीं याच्या ठायीं । विकल्पाचें नाहीं वळण कदां ॥ १९ ॥
कृपेचा कोंवळा सोयरा दीनांचा । उदार मनाचा लोभापर ॥ २० ॥
अनुसरे त्याचें मायाजाळ तोडी । बैसणें तो मोडी संसाराचें ॥ २१ ॥
या नामयाची माता आम्हां तुम्हां देखतां । शिणली वेवादतां नानापरी ॥ २२ ॥
नेदी तिच्या हातीं घातिला पाठीसी । धरिला जीवेंसी माझा म्हणुनी ॥ २३ ॥
देहाचा विसरु याच्या रुपाच्या दर्शनें । चरणाचेनि स्मरणें चित्त निवे ॥ २४ ॥
सुख गोष्टी यासी केलिया एकांत । तेणें पुरतसे आर्त जन्ममरणा ॥ २५ ॥
ऐसें त्याचें बोलणें ऐकोनि पंढरिनाथें । दिलें सकळिकांतें अभयदान ॥ २६ ॥
मग निजरूप दाविता जाला तयावेळीं । नामा हृदयकमळीं आलिंगिला ॥ २७ ॥

### [ ९५६ ]

तंव दिव्य रत्नमणि मस्तकीं किरीटी । मळवट लल्लाटीं कस्तुरीचा ॥ १ ॥
माथां मोरपिसावेठीं कुंडलें गोमटीं । पाहात कृपादृष्टी निजभक्तां ॥ २ ॥
तो पुंडलिकाचा ठेवा पूर्वपुण्यराशी । वैकुंठनिवासी [2]देवरावो ॥ ३ ॥
वदन निर्मळं भाव सुस्मित वेल्हाळ । दर्शनीं रत्नकीळ तेज फांके ॥ ४ ॥
त्या सुखाचे अधिकारी भक्त सप्रेमळ । हृदयीं सर्वकाळ हरिचें ध्यान ॥ ५ ॥
कौस्तुभ वैजयंती पदक हृदयावरी । शोभत साजिरी तुळसीमाळा ॥ ६ ॥

---

अभंग ९५६—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)

१ तंव विमानीं आकाश जाले पैं सकळ । करिती नीलोत्पल वृष्टि देव ॥ (धु.)
तंव विमानीं आकाश जाले पैं सकळ । करिती नीलोत्पल पुष्पवृष्टि॥ (तं.)

२ आदिदेवो (है.), आदिदेव (धु.)

श्रीवत्सलांछन प्रीतीचें भूषण । चर्चिला चंदन श्यामतनु ॥ ७ ॥
शंखचक्र करीं ते कर कटावरी । पितांबरधारी जलदनील ॥ ८ ॥
समचरण स्वयंभ उभा विटेवरी । रुळती तोडरी दानव दैत्य ॥ ९ ॥
तेणें दिव्य तेजें ब्रह्मांड धवळलें । प्रकाशें लोपलें दिग्मंडळ ॥ १० ॥
सकळ संत द्विज देखती चतुर्भुज । शंख चक्रांबुज गदापाणि ॥ ११ ॥
कीटकपक्षी पशुपाषाण तरुवर । देखती द्विजवर विठ्ठलरूप ॥ १२ ॥
परमानंद बोधें निवाले आनंदें । भेदाभेद द्वंद्वें विसरोनि गेलीं ॥ १३ ॥
एकाविण दुजें तेथें न दिसे पैं आन । नाहीं आठवण देहभावा ॥ १४ ॥
सबाह्य कोंदली अवघी विठ्ठलमूर्ति । सुखाची विश्रांति योगियांच्या ॥ १५ ॥
प्रेमें बोसंडत सकळ भक्तजन । देती आलिंगन एकमेकां ॥ १६ ॥
हर्षे निर्भर चित्तीं [1]आनंदें गर्जती । पावले विश्रांति सकळ द्विज ॥ १७ ॥
ऐसा ब्रह्मानंद सोहळा भोगवी सकळां । आपुल्या प्रेमळा निजदासा ॥ १८ ॥
करोनि सावध वैकुंठींचा राणा । नामा घाली चरणावरी त्यांच्या ॥ १९ ॥

[ ९५७ ]

बाप भक्तप्रिय पाहे कृपादृष्टी । करितसे सुखगोष्टी ब्राह्मणांसी ॥ १ ॥
सर्वभावें शरण सर्वकाळीं मज । ते हे भक्तराज सखे माझे ॥ २ ॥
याचेनि उपकारें दाटलों संपूर्ण । भक्तपराधीन जालों तेणें ॥ ३ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर आणि हा सोपान । हे मुगुटमणी जाण सत्वमूर्ति ॥ ४ ॥
सर्वभूतीं भजती सर्वभावें सर्वथा । केला पैं अपैता त्याचे बुद्धी ॥ ५ ॥
हा जनमित्र जिवलग आमचा सोयरा । सांडिला संसारा ओवाळुनी ॥ ६ ॥
माझे नामीं दृढ धरोनि विश्वास । अखंड उदास देहभावीं ॥ ७ ॥
जिवाहोनी पढियंता हा भक्त सांवता । निर्धार सांगतां नवलाव याचा ॥ ८ ॥
हृदय विदारोनि आपुलेनि हातें । ठाव दिला मातें लपावया ॥ ९ ॥
बारा दिवसांचा हा भक्तवत्सला । माये सांडियेला वेणुनादीं ॥ १० ॥
[2]म्हणती वो माझा त्या दिवसापासोनि । नेणें मजवांचून आणिक कांहीं ॥ ११ ॥
हा विसोबा खेचर आणि नरहरि सोनार । हा गोरा कुंभार अंतर्निष्ठ ॥ १२ ॥

अभंग ९५७—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ हरिनामें (है.), हरिनामें डुलती (तं.) २ म्हणविती (बा.)

समाधिस्थ सदा निवालें पैं चित्त । सबाह्य देखत मजलागीं ॥ १३ ॥
सुखाचा सुजाण आसंद सुदामा । हा माझा आत्मा आवडता ॥ १४ ॥
घरदार संसार त्यजिला मजकारणें । तोडिलें पैं येणें मायाजाळ ॥ १५ ॥
चोखामेळा बंका भक्त परमसखा । विसोबा हा देखा प्राण माझा ॥ १६ ॥
त्यजुनि सर्व संग एकविध भावें । अनुसरले जिवें माझे ठायीं ॥ १७ ॥
ऐसें या भक्तांचे सांगतों उपकार । आहेत बहुत फार कल्पकोडी ॥ १८ ॥
त्या सकळांच्या चरणींचा रजरेणु माझा नामा । भक्तिभाव प्रेमा दिधला त्यासी ॥ १९ ॥

[९५८]

तंव ते भाग्याचे सागर विनविती द्विजवर । म्हणती तूं माहेर जोडलासी ॥ १ ॥
चरणींचा वियोग न व्हावा सर्वथा । तोडावी ममता प्रपंचाची ॥ २ ॥
नलगे मोक्षमुक्ति नलगे धनसंपत्ती । देई सत्संगती जन्मोजन्मीं ॥ ३ ॥
वेदशास्त्रपठणें बहिर्मुखवनें । केली अभिमानें छळणबुद्धी ॥ ४ ॥
धिक् तें जाणपण धिक् तो सन्मान । नाहीं प्रेमखूण कळली तुझी ॥ ५ ॥
कुळाचेनि अभिमानें अंतरलों गा तेणें । पूर्ण देहाभिमानें भुलोनियां ॥ ६ ॥
हें सकळ तुझी माया भुललों पंढरिराया । म्हणोनि जन्म वायां गेलें होतें ॥ ७ ॥
अपराधांच्या कोडी घडल्या पैं आमुतें । [1]निषेधिलें तूतें मायबापा ॥ ८ ॥
परी त्वां दीनानाथें ब्रीद सत्य केलें । आम्हां तारियेलें पतितांसी ॥ ९ ॥
नकळे काय होतें संचित आमुचें । अनंत जन्माचें पूर्वपुण्य ॥ १० ॥
तें आजि फळलें तुझिया कृपादृष्टी । भाग्यें जाली भेटी संतजनां ॥ ११ ॥
दुर्जय तोडिले माया मोहपाश । केला पैं सौरस आपुल्या रूपीं ॥ १२ ॥
तापत्रय वणवा विझविला अवचिता । दिलें प्रेमामृता जीवन आम्हां ॥ १३ ॥
[2]आतां सर्वकाळ अविट हे दृष्टी । यासाठीं संतभेटी निरंतर ॥ १४ ॥
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । मग होत कल्पकोडी गर्भवास ॥ १५ ॥
करता करविता तूंचि पैं एक । ब्रह्मांडनायक सर्वगत ॥ १६ ॥
आमुचे अवगुण न धरावे मानसीं । निरवावें संतांसी माझे म्हणुनी ॥ १७ ॥

---

अभंग ९५८—(पं.), (धु.), (है.), (पा.) व (तं.)
१ निरोधिलें (धु.)
२ सर्वकाळ असावें हेंचि रुप दृष्टि । या संतांची भेटी निरंतर ॥ (तं.)

तुझिया दासाचें द्यावें पैं दास्यत्व । तयाची वंदावी चरणधुळी ॥ १८ ॥
हेंचि व्रततीर्थ क्रियाकर्म आम्हां । द्यावा नित्य प्रेमा नामयासी ॥ १९ ॥[1]

[९५९]

कृपेच्या सागरें भक्तकरुणाघनें । देऊन आलिंगनें निवविलें तयातें ॥ १ ॥
[2]सर्वज्ञाचा रावो आत्मा ज्ञानदेवो । सांगेल अनुभवो तुम्हांप्रती ॥ २ ॥
[3]ते खूण अंतरीं धरा सर्वभावें । दृढ धरोनि जीवें जतन करा ॥ ३ ॥
न लगे तीर्थाटन काया क्लेश जाण । न लगे अनुष्ठान करणें बहू ॥ ४ ॥
न लगती सायास करणें उपवास । धरावा विश्वास संतसंगें ॥ ५ ॥
न लगे वज्रासनीं बैसावें नेहटीं । न लगे गिरिकपाटीं करणें वास ॥ ६ ॥
न लगे उग्रतप नानामंत्र जप । [4]भेणें जाय पाप संतसंगें ॥ ७ ॥
न लगे भस्म उधळणें वाहणें जटाभार । न घालावा पसार लोकाचारीं ॥ ८ ॥
सर्वभूतीं करुणा जिव्हे नामस्मृती । मन येईल [5]निवृत्ति आपेंआप ॥ ९ ॥
क्रियाकर्मधर्म प्रेमेंविण खटपटा । करितां आला वीट दीर्घ दोषाचा ॥ १० ॥
साधनावांचुनी मार्ग सोपा जाण । करावें कीर्तन रामकृष्ण ॥ ११ ॥
सर्वकाळ कथा संतांची संगती । वाचे नाम कीर्ति सर्वकाळ ॥ १२ ॥
तो हा राजमार्ग सर्वांहोनी चांग । सदा संतसंग वाचें नाम ॥ १३ ॥
संकल्प विकल्प न धरावे मानसीं । मनोभावें संतांसीं शरण जावें ॥ १४ ॥
ज्ञानदेव म्हणे पुढती ऐका एक । सांगेन प्रत्यक्ष अनुभव सिद्ध ॥ १५ ॥

[९६०]

परमामृत सागरु मथुनियां पुरता । काढिला तत्त्वतां ज्ञानबोधु ॥ १ ॥
या सुखाचा पारू जाणते विरळे । घेताती गळाळे संतजन ॥ २ ॥
प्रेमाचिये ताटीं वोगरू सुखामृत । हें सुख त्वरित सेवा आधीं ॥ ३ ॥

अभंग ९५९—(पं.), (धु.), (शि.), (है.), (पा.) व (तं.), ९६०—(पं.), (धु.), (है.) व (पा.)

१ 'इतिश्रीसंततीर्थावळी संपूर्णमस्तु' असे (है.) प्रतीत या चरणानंतर म्हटले आहे.
२ सर्वज्ञाचा रावो आम्हा ज्ञानदेवो । सांगेल अनुभव परियसा ॥ (है.)
३ तें सुख अंतरीं सुलभ सर्वभावीं । (है. व तं.) ४ क्षणें (है.) ५ निजवृत्ति (धु.)

[1]हें सुख सेवितां परमानंद धणी । कृपा संतजनीं केली पूर्ण ॥ ४ ॥
ज्ञानाचें अंज्न लेईले संतजन । जनीं जनार्दन देखती सदा ॥ ५ ॥
नाहीं भिन्न भेद सर्व ब्रह्म एक । ब्रह्मांडनायक अनंत कोटी ॥ ६ ॥
दीपांचा दीपक हृदय आत्मज्योती । विश्वीं विठ्ठलमूर्ती देखती सदा ॥ ७ ॥
हें सुख दिधलें भक्तांसी विश्रांति । नामाची हे [2]ख्याती परमानंद ॥ ८ ॥
पढतां नाम मंत्र ब्रह्मचि अवघे । पाहतां अनुभवें वेदमतें ॥ ९ ॥
तें हें विठ्ठलनाम वेदाचें गव्हार । जाणती साचार संतजन ॥ १० ॥[3]
युगें अठ्ठाविस विठ्ठलनामें जपतु । हा पुंडलीक भक्तु महामुनी ॥ ११ ॥
उघडली मांदूस भक्तिभाव तारूं । विठ्ठल उद्धारू कलियुगीं ॥ १२ ॥
न लगती सायास करणें उपवास । विठ्ठलनामें पाश तुटती जाणा ॥ १३ ॥
आदि ब्रह्म जुनाट जपती सिद्ध मुनी । तें दिलें मंथोनि पुंडलिकें ॥ १४ ॥
केशवनाम मंत्र नामया सांगितलें । विस्तारोनि केलें मंथन ऐसें ॥ १५ ॥

[९६१]

वेदाचें हें सार वैराग्याचें जीवन । चिदाकाशींची खूण परम गुज ॥ १ ॥
जें शुद्धज्ञान गुह्य मोक्षमुक्ति बीज । सकळ मंत्रराज मंगलनिधी ॥ २ ॥
तें या नामयाचें होतें हृदयकमळीं । कथा भूमंडळीं प्रकट केली ॥ ३ ॥
तें हें विठ्ठलनाम साराचें पैं सार । कलियुगीं उद्धार सकळ जनां ॥ ४ ॥
जें श्रवणाचें श्रवण मननाचें मनन । जें निजध्यासन निजध्यासाचें ॥ ५ ॥
[4]जें विचाराचें सार वृत्तीचा निर्धार । स्वरूप साक्षात्कार उघडा केला ॥ ६ ॥
[5]जें भक्तीचें सौभाग्य ज्ञानाचें आरोग्य । शास्त्राचें तें चांग मथित नाम ॥ ७ ॥
नामापरतें थोर नाहीं पैं आणिक । जनांसि तारक हेंचि एक ॥ ८ ॥
जें सकळ धर्म जनक [6]पवित्राचें पावन । जें कां अधिष्ठान आनंदाचें ॥ ९ ॥
जें योगसिद्धीचें जीवन पीयुष । जेणें पूर्ण आयुष्य कामनेचें ॥ १० ॥
पुण्यपावन देवा भक्तांचे सोहळे । प्रत्यक्ष गळाले आनंदाचे ॥ ११ ॥

अभंग ९६१—(धु.), (है.), (पा.), (तं.) व (बा.)
१ हे सुख सांगत ब्रह्मांडनायक । संतांचा विवेक विठ्ठलराजा ॥ (है.) २ व्याप्ति (है.)
३ दहावा चरण (है.) प्रतीत नाही. ४ जो विवेकाचा विचार धृतीचा निर्धार । (तं.)
५ जें भक्तीचें सौभाग्य शास्त्राचें प्रकाश । कीर्तीचा विचार परत्रीचें ॥ (है.) ६ परत्रींचें पावन (है.)

भक्तिभावें [1]याचें करितां श्रवण । मग नाहीं [2]दर्शन गर्भवासा ॥ १२ ॥
म्हणोनि कीर्तन करावें आवडी । घ्यावी अर्थगोडी अनुभवें ॥ १३ ॥
नव्हे हें प्राकृत पाठांतर कवित्व । हा उपनिषद मथितार्थ ब्रह्मरस ॥ १४ ॥
जाणीव शहाणीव न करावी सर्वथा । न पहावी योग्यता व्युत्पत्तीची ॥ १५ ॥
हें सात्विकाचें धन भोक्ते संतजन । [3]नामदेवें पूर्ण ग्रंथ केला ॥ १६ ॥[4]

[९६२]

ज्ञानदेव आले काशी । विश्वेश्वर आडवे येती ॥ १ ॥
रामनगरा वेशीपाशीं । भेटी जाल्या उभयतांसी ॥ २ ॥
परस्परें आलिंगन । नामा वंदी उभयचरण ॥ ३ ॥

[९६३]

पुढें उभे वेशीपाशीं । त्याला लोटांगण काशी ॥ १ ॥
स्वर्गीं देवा जाल्या भेटी । भोंवत्या पताकांच्या थाटी ॥ २ ॥
नामा म्हणे विठ्ठल बोला । ज्ञानोबासी म्हणे चला ॥ ३ ॥

[९६४]

ज्ञानोबाचा हात । प्रेमें धरी विश्वनाथ ॥ १ ॥
ऐसें बोलत चालत । दोघे आले गंगे आंत ॥ २ ॥
ज्ञानोबाचे पायीं । मिठी घाली गंगाबाई ॥ ३ ॥
नामा म्हणे सोडा बाई । ज्ञानदेव सर्वांठायीं ॥ ४ ॥

---

अभंग ९६२ ते ९६४—(आ.)

१ नित्य करितां श्रवण। (बा.) २ येणें (है.) ३ केलें ग्रंथकथन ज्ञानदेवें। (तं.), ज्ञानदेवें पूर्णग्रंथन केलें। (धु.) ४ (तं.) व (है.) प्रतींत चवथा व आठवा चरण नाही. (पा.) प्रतीमध्ये तिसरा चरण नाही. (पा.) व (धु.) प्रतींत या अभंगानंतर तीर्थावळी संपते.

• • •

[९६५]

ज्ञानदेवो म्हणे विठ्ठलासी । समाधान तूंचि होसी ।
परि समाधि हे तुजपासीं । घेईन देवा ॥ १ ॥

नलगे मज मुक्ति । नलगे मज मुक्ति ।
तुझां चरणीं आर्ती । थोर [१]आथी ॥ २ ॥

विठोजी म्हणे ज्ञानदेवा । ज्ञानसागरा [२]अनुभवा ।
वचनेंचि विसांवा । जाला मज ॥ ३ ॥

ऐकें ज्ञानचक्रवर्ती । तूं तंव ज्ञानाचीच मूर्ती ।
परि पुससी जे आर्ती । ते कळली मज ॥ ४ ॥

येक येक अनुभव कृपा । पद पदांतरें केला सोपा ।
परि यांत माझिया कृपा । सकळही बोळली ॥ ५ ॥

ज्ञानदेवें चरणीं मिठी । मनेंसी पडली एके गांठी ।
[३]दृश्यादृश्य जाली एक दृष्टी । प्रत्यक्ष [४]भेटविलेंसी ॥ ६ ॥

कर ठेउनी कुरवाळी । सर्वांग न्याहार न्याहळी ।
म्हणे तुवां घेतली जे आळी । ते सिद्धितें पावेल ॥ ७ ॥

नामा उभा असे सन्मुख । ऐकतां थोर खेद दुःख ।
म्हणे ज्ञानांजन महासुख । समाधि घेतसे ॥ ८ ॥

[९६६]

ज्ञानदेव उभा जोडोनि हस्त । भक्त पाहती समस्त ।
विठोजी म्हणे सकळा स्वार्थ । या ज्ञानांजनांचा ॥ १ ॥

कैसे बोळले त्वां ज्ञाना । [५]समाधान तया ध्याना ।
मन नाठवें मीतूंपणा । समाधि खुणा ज्ञानासी ॥ २ ॥

मग म्हणे विठोजी दातार । समाधि तुज निरंतर ।
आतां प्रस्थान करी साचार । मज निरंतर आठवी ॥ ३ ॥

कैसे परिपूर्ण बोळले । आपण समाधिरूप जाले ।
मनातें मन समरसलें । विठ्ठलरूपीं ॥ ४ ॥

---

अभंग ९६५—(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (शि.), ९६६—(धु.), (पा.), (है.) (तं.) व (ह.)

१ मज (शि.) २ स्वानुभवा (पं. व आ.) ३ दृष्टादृश्य जाली एक दृष्टी। (गों.) ४ भेटी विठ्ठलेंसीं (तं. व शि.) ५ समाधिघन (तं.)

अनुक्रमणिका

दशमी प्रस्थानाचा समयो । येकादशी जागर उत्सावो ।
द्वादशी क्षीरापती महोत्सवो । ज्ञानदेवें केला ॥ ५ ॥
त्रयोदशीं म्हणे पांडुरंग । कांहीं न करीं गा उद्वेग ।
आळंकापुरीं समाधि प्रसंग । करीं करीं लवलाह्या ॥ ६ ॥
माता रुक्मिणी वाढी ताटीं । विठोजी म्हणे उघडी दृष्टी ।
तुज मज आहे नित्य भेटी । येई पंढरीये ॥ ७ ॥
नामा म्हणे ज्ञानउदयो । आळंकापुरीं सिद्ध समयो ।
परी विठ्ठलीं मुराला भावो । या ज्ञानदेवाचा ॥ ८ ॥

[९६७]

विठोजी म्हणे ज्ञानदेवा । तुझी विश्रांति [1]मन ठेवा ।
ते मुराली आमुचिया भावा । निःसंदेहें ॥ १ ॥
कैसें समाधान ज्ञानदेवा । आळंकापुरीं समाधि ठेवा ।
विठ्ठल ओळला वोल्हावा । नित्यरूपसमाधि ॥ २ ॥ धृ० ॥
संत करिती महा खेद । म्हणती ज्ञानांजन [2]उद्बोध ।
मग चालिले विद्गद । आळंकापुरीसी ॥ ३ ॥
महावल्ली वृक्ष अजान । तो निक्षेपिला पूर्णधन ।
मग विठोजी म्हणे आपण । ज्ञानदेवासी ॥ ४ ॥
धन्य धन्य ज्ञानेश्वरा । पुण्यभूमि समाधि स्थिरा ।
कृष्ण-पक्षीं तुज निर्धारा । भेट देत जाईन ॥ ५ ॥
कार्तिक मास शुद्ध एकादशी । पंढरीयात्रा होईल सरिशी ।
दुसरी कृष्णपक्षीं निर्धारिंसी । तुज दिधली असे ॥ ६ ॥
हें ऐकोनि संत-जनीं । जयजयकार केला ध्वनी ।
दिंड्या पताका मेळ गगनीं । देव सुमनें वर्षताती ॥ ७ ॥
नामा म्हणे आले वैष्णव । आळंकापुरीं मिळाले [3]सर्व ।
समाधि सुखी ज्ञानदेव । बैसते जाहले ॥ ८ ॥

[९६८]

महा उत्साव त्रयोदशी । केला त्या ज्ञानदेवासी ।
मग नामा म्हणे विठोबासी । चरण धरूनियां ॥ १ ॥

अभंग ९६७—(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (शि.), ९६८—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ मज, मन (पं., शि., गों. व तं.) २ सिद्ध (पं. व आ.) ३ देव (आ.)

अनुक्रमणिका

[1]समाधिसुख दिधलें देवा । ज्ञानांजन आळंकापुरीं ठेवा ।
आजानवृक्षीं बीज वोल्हावा । या [2]ज्ञानांजनासी ॥ २ ॥
कृपा आली विठ्ठलासी । म्हणे ज्ञानदेवा परियेसी ।
तीर्थ भागीरथी अर्हनिशी । तुज नित्य स्नानासि दिधलीसे ॥ ३ ॥
इंद्रायणी दक्षिणवाहिनी । भागीरथी मणिकर्णिका दोन्ही ।
इया मिळालिया त्रिसंगमीं । पुण्यभूमि तुझिये ॥ ४ ॥
येथें जरी नित्य स्नान घडे । तरी नित्य वैकुंठवास जोडे ।
तुज नाहीं नाहीं रे कुवाडे । मीं वाडें-कोडें उभा असे ॥ ५ ॥
येथें हरिकथा नाम वाचे । जो उच्चारिल विठ्ठलाचे ।
तयासी पेणें वैकुंठीचें । दिधलें साचें तिअक्षरीं ॥ ६ ॥
आणिक ऐके रे ज्ञानराजा । जो या सिद्धेश्वरीं करील पूजा ।
तो अंतरंग [3]सखा माझा । मुक्ति सहजा जाली त्यासी ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसें अंतरंग । कैसा वोळला पांडुरंग ।
ज्ञानदेवीं समाधि सांग । हरिपाठ कीर्तनें ॥ ८ ॥

[९६९]

सनकादिकीं मंत्रघोष । केले विधिपूर्वक पांच दिवस ।
[4]मग पांडुरंग यथावकाश । भक्ता वास महिवरी ॥ १ ॥
धन्यभूमि आळंकापुरी । ज्ञान समाधि खेचरी ।
पूर्ण परिपूर्ण श्रीहरी । स्वयें आपण उभा असे ॥ २ ॥ धृ० ॥
संत भागवत देव्हडे । अमर उभे चहुंकडे ।
नारद तुंबर पुढें । वीणा वाजविती ॥ ३ ॥
एकीं केला जयजयकार । ज्ञानदेवीं धरूनियां कर ।
विठ्ठल चरणा समोर । निकट बैसते जाले ॥ ४ ॥
करें कुरवाळिलें ज्ञाना । कांसवी अवलोकिला पान्हा ।
आंसुवें येताती नयना । तया ज्ञानदेवाचिया ॥ ५ ॥
विठोजी म्हणे ज्ञानांजना । तुझेनि कवित्वें हरे दारुणा ।
उच्चारितां महाविघ्ना । सकळै पळतील ॥ ६ ॥

---

अभंग ९६९—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ 'समाधि ठेवा ' हा पाठ पुष्कळ ठिकाणी सापडतो. २ भक्तजनासि (आ.) ३ भक्त पैं (गों.)
४ मग पांडुरंगें यथा सावकाश । भक्ता वास महिवरी ॥ (पं.)

तुज आठविल जो भक्त । तो होईल विरक्त ।
ऐसें विठोजी बोलत । येरू चरणीं रुळे ॥ ७ ॥
नामा म्हणे सकळ तीर्थराज । तया कृपा कैसी केली सहजा ।
एकादशीं दिधली पूजा । तया ज्ञानदेवासी ॥ ८ ॥

[ ९७० ]

स्नानविधि केलियां भक्तीं । नाममंत्राचिया आवृत्ति ।
मग प्रत्यक्ष पूजिली मूर्ति । विठोबाची ॥ १ ॥
धन्य धन्य तो देव ज्ञान । राजा निवृत्ति निधान ।
विठोजी आपण । भक्तां साह्ये ॥ २ ॥
मग सकळहि भक्तमेळीं । सहित वनमाळी ।
बैसले तये पाळीं । इंद्रायणीचे ॥ ३ ॥
एकीं केलें स्तुतिस्तोत्रें । एक जपताती [1]नाममंत्रें ।
एक गाताती वेदस्तोत्रें । विठोबासी ॥ ४ ॥
तंव पुढारा जाला नारा । तो नामयाचा पुत्र सैरा ।
तो पुसतसे विचारा । नामयासी ॥ ५ ॥
ये संतसभेमाजीं । राऊळ बैसले असे सहजीं ।
यातें पुसि जो कां जी । कवण क्षेत्र म्हणोनी ॥ ६ ॥
उठिला नामा प्रेमें डुले । वंदिलीं विठ्ठल पाउलें ।
मग करद्वयें जोडुनि बोले । साशंकित ॥ ७ ॥
नामा म्हणे पूर्णब्रह्म । तें कैसें सभासदीं मन ।
तें बोलतसे परम । ज्ञानदेवा भाग्यें ॥ ८ ॥

[ ९७१ ]

मग सकळ प्रेम पुतळे । बैसले माजीं ब्रह्ममेळे ।
तेथें नामा वचन बोले । स्वामीप्रति ॥ १ ॥
बोळलें चैतन्य सतरावें । पूर्ण बोध नामा विठ्ठलदेवें ।
पव्हे घालुनी ज्ञानदेवें । जग तारिलें कीर्तनें ॥ २ ॥

अभंग ९७० व ९७१--(धु.), (पा.), (है.), (त.) व (ह.)
१ चरित्रें (त.)

अनुक्रमणिका

नामा म्हणे स्वामी सर्वज्ञ । परि आमुचें मन निमग्न ।
चरणरजें पापभग्न । पवित्र जालों ॥ ३ ॥

तरी स्वामिराजा विनंति । परियेसी या माझी पुढती ।
हे आळंकापुरीं होती । कवणियें युगीं ॥ ४ ॥

हें सांगिजे जी समर्था । कवण क्षेत्र कवण तीर्था ।
येथें क्षेत्रज्ञ हा सर्वथा । कवण धर्म असे ॥ ५ ॥

तूं आत्माराम संपन्न । [1]जुगा जुनाट नारायण ।
तुजप्रति हें वचन । न साहे माझें ॥ ६ ॥

कासवीचा [2]तुषार गाढा । तैसा तुझा पवाडा ।
हें पुसणें कवणियां चाडा । [3]तें तूंचि जाणसि ॥ ७ ॥

नामा उभा तिष्ठत प्रेमें । संत दाटले सप्रेमें ।
आपण [4]तें तें अनुक्रमें । सांगतसे देव ॥ ८ ॥

[ ९७२ ]

देवासी कळलें गौप्यगुज । म्हणे रे नामया हेंचि चोज ।
तो निजभाव सहज । प्रगट सांगूं आतां ॥ १ ॥

कृतयुगीं क्षेत्र आदि । ज्ञानदेवा तेथें समाधि ।
देव सांगतसे शुद्धी । योगबुद्धी जुनाट ॥ २ ॥

ऐकें भक्तजनश्रेष्ठा । भूमितामें वैकुंठपीठा ।
तें हें आळंकापुरीं श्रेष्ठा । आदि वरिष्ठा पीठा आठरा ॥ ३ ॥

आणिक ऐकरे वचन । [5]हे पंचक्रोशी पुरातन ।
यासी युगें सांगता संपन्न । चतुरानन जाणतसे ॥ ४ ॥

कांहींएक किंचित सांगों । युगसंख्या मार्गीत रिघों ।
तरी वैवस्वत हाचि मागो । पूर्ण वोळंगो यापासोनी ॥ ५ ॥

मनु सहस्र युगें संख्या । तें आळंकापुरीं आदि लक्षा ।
कोटी याग असंख्या । सहस्र दक्ष येथें जाले ॥ ६ ॥

आदि क्षेत्र संख्यारहित । ऋषिमुनी तपती सप्त ।
आणि नारदमुनि असे [6]जाणत । हेचि पुरी पुरातन ॥ ७ ॥

---

अभंग ९७२—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ जुगादि जुनाट (ह.) २ तूं सार गाढा (पं. व आ.) ३ तें ही तूं जाणता (तं.), ते तूंचि जाणसी (गों.) ४ तेथे (ह., पं. व आ.) ५ संपूर्ण (ह.) ६ सांगत (आ.)

नामा म्हणे कैसें दिधलें । हें ज्ञानासीं सिद्ध लाधलें ।
हेंचि आम्हासी जोडलें । पूर्ण लाधलें पीयूष ॥ ८ ॥

[९७३]

देव म्हणे नामया । ऐकें येथें चित्त देउनियां ।
एक एक तीर्थ सांगावया । हें तों पुराणीं असे ॥ १ ॥ धृ० ॥
नकळे देवाची थोरी । कैसें पुढारिले मुरारी ।
गौप्यगुज श्रीहरी । सांगतसे नामया ॥ २ ॥
पुराण म्हणसी कोण कथा । तरी ऐकें गा तूं सकळार्था ।[1]
शैवशास्त्र हा ग्रंथ सर्वथा । सिद्धमार्ग असे ॥ ३ ॥
जें जें जुनाट क्षेत्रतीर्थ । जें जें ब्रह्मनामें परमार्थ ।
तो तो सांगितला हेत । चतुराननें ॥ ४ ॥
ऐसें देवमुखीचें वचन । ऐकतां संतोषले पूर्ण ।
मग देताति आलिंगन । येकमेकांसी ॥ ५ ॥
जयजयकाराचा ध्वनी । विठ्ठलनामें गर्जे वाणी ।
प्रेम ओसंडत नयनीं । स्फुंदन रोमांचित दाटले ॥ ६ ॥
स्फुंदत नामा नाचे गाये । परिसा म्हणे बोळली माये ।
तो ज्ञानासी पान्हा होये । पूर्ण बोधाचा ॥ ७ ॥
नामा म्हणे सकळ संतमेळीं । कथा सांगितली रसाळीं ।
तंव ज्ञानदेवा करतलामळीं । समाधि शेज घातली ॥ ८ ॥

[९७४]

मग म्हणे सर्वज्ञ विठ्ठल । न लावावा वाढवेळ ।
मग पातले निर्मळ । सिद्धेश्वरलिंगीं ॥ १ ॥
धन्य धन्य हरिदिवस । धन्य धन्य हा निवास ।
आपण हृषिकेश । भक्ता साह्य ॥ २ ॥
वैष्णव मिळाले संपन्न । गाती हरिनाम कीर्तन ।
तंव पातले सोपान । प्रेमें वोसंडत ॥ ३ ॥

अभंग ९७३—(धु.), (शि.), (पा.), (है.), (तं.) व (ह.), ९७४—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ (पं.) प्रतीत हा चरण मिळत नाही.

अनुक्रमणिका

चरणीं घातली मिठी । विठोजी म्हणे उठी उठी ।
लवलाहें उघडी दृष्टी । भेटे ज्ञानदेवा ॥ ४ ॥

येरू म्हणे मी कृतकृत्य । नामस्मरण तुझें नित्य ।
तेणें सकळ हित । आमुचें जालें ॥ ५ ॥

तूंचि गा जनकजननी । तूंचि एक त्रिभुवनीं ।
पाहतां नित्य उन्मनीं । लागे आम्हां ॥ ६ ॥

समाधि शेज ज्ञानेंसी । घातली अहर्निशीं ।
ते कर्णीं परिसत जिवेंसी । तुवां चरण धरित आलों ॥ ७ ॥

नामा म्हणे ज्ञान सोपान । एक जाले जनीं जनार्दन ।
समाधिसंगें संजीवन । आळंकापुरीं आले ॥ ८ ॥

[९७५]

तंव निवृत्तीसी उन्मनीं । बैसका होती सप्तदिनीं ।
ते पालटोनि तत्क्षणीं । मूर्तीतें न्याहाळी ॥ १ ॥

निवृत्तिनिधान । सोपान निजधन ।
ज्ञानदेव आपण । तिन्ही मूर्ती ॥ २ ॥

कोण भाग्याचे संतुष्ट । जेथें प्रगटलें वैकुंठ ।
विठ्ठलनामें पूर्ण पाठ । आळंकापुरीसी ॥ ३ ॥

आदि क्षेत्र जुनाट । युगें सांगतां उद्भट ।
जें कां पुण्यरूप प्रगट । सांगतसे महिमा ॥ ४ ॥

ऐसा उत्साह गमला । निवृत्ति ध्यानीं निवाला ।
सोपान आळंगिला । ज्ञानराजें ॥ ५ ॥

निवृत्ति पाहे ज्ञानाकडे । येरू धांवे लवडसवडें ।
तंव चरणरजामाजीं बुडे । मन निमग्न केलें ॥ ६ ॥

तिन्ही देव एकत्र । सत्वरजतमादि मंत्र ।
हे गाताती नर जे स्तोत्र । ते उद्धरती सर्वथा ॥ ७ ॥

नामा म्हणे तिन्ही देव । मिळाले गुण [1]सागर [2]वैभव ।
समाधि सेज माधव । देतु असे ज्ञानदेवा ॥ ८ ॥

---

अभंग ९७५--(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.), (शि.) व (गों.)
१ गुजसागर (पं.) २ सांग वैभव (ह., गों. व शि.)

[९७६]

हस्तक ठेविला माथया । ज्ञानदेव लागे पायां ।
विठोजी म्हणे लवलाह्या । समाधीस बैसावें ॥ १ ॥
इंद्र चंद्र देव येती । ब्रह्मादिक गीती गाती ।
यमवरुणबृहस्पति । विमानें दाटती अंतरिक्षीं ॥ २ ॥
तंव पातले गरुडदेव । रुक्मिणी सत्यभामा भाव ।
राही माता गोपी सर्व । समाधि ज्ञानदेव पहावया ॥ ३ ॥
ब्रह्माइंद्रप्रजापति । सर्व अंतरिक्षीं पाहती ।
आळंकापुरीं ये श्रीपती । हरुष चित्तीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥
रूषिमुनी गणगंधर्व । पिशाच्च-गुह्यक सर्व ।
धृव-अंबऋषि माधव । चित्तीं भाव पहावया ॥ ५ ॥
ऐसी दाटलीं विमानें । संतीं जाणितलें ज्ञानें ।
ज्ञानदेव ब्रह्म होणें । हें विदान विठ्ठलाचें ॥ ६ ॥
जयजय शब्दें ध्वनि गर्जे । तेणें स्वर्गमृत्युपाताळ गाजे ।
पाताळीं शेष म्हणे भुंजे । प्रेमें फुंजे न समाये ॥ ७ ॥
नामा म्हणे शिवादिक । सिद्धेश्वरीं मिळाले सकळिक ।
पाहाती विठ्ठलकौतुक । ज्ञानदेव समाधीचें ॥ ८ ॥

[९७७]

वेदध्वनि केलिया मुनी । गंधर्वगायनें होती गगनीं ।
ब्रह्मादिक इंद्र विमानीं । इंद्रायणी ज्ञानदेवी ॥ १ ॥
लागलिया मंगळतुरे ध्वनि । तीर्थें उभी असती कर जोडुनी ।
विठ्ठलदेव ज्ञान संजीवनीं । नयनीं न्याहाळिती ॥ २ ॥
राही रखुमाई माता । सत्यभामा गोपी समस्ता ।
आरतिया ओवाळिती निभ्रांता । ब्रह्म त्वरिता ज्ञानदेवा ॥ ३ ॥
देवऋषिगण सकळ । जयजयकार ध्वनि मंजुळ ।
स्तुतिस्तोत्रें सकळ । नक्षत्रादिक गाती ॥ ४ ॥
वरूषति दिव्यसुमनें । निवृत्तिसोपान नारायणें ।
संमोखिलें संजीवनें । नित्य पारणें हरिपाठें ॥ ५ ॥

अभंग ९७६ व ९७७—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

अनुक्रमणिका

परिसा भागवत डुलत । विठ्ठलीं जाला कृतकृत्य ।
नामा असे शोकाकुलित । चरणीं रत विठ्ठलाचे ॥ ६ ॥
शेज घालुनी सुमनीं । विठ्ठल पाहे रुक्मिणी ।
ज्ञानदेवाचे गुण मनीं । आठवती म्हणे हरी ॥ ७ ॥
नामा जाला भयभीत चित्तें । ज्ञानासारखें रत्न मागुते ।
न देखों ऐसें विठ्ठलातें । पुसे त्वरित रुक्मिणी ॥ ८ ॥

[ ९७८ ]

देवो म्हणती रुक्मिणी । [1]हा येचि युगीं देखिला नयनीं ।
हेंचि ज्ञानसंजीवनी । जाण त्रैलोक्यासीं ॥ १ ॥
धन्य धन्य धरातळीं । जो यातें दृष्टीं न्याहाळी ।
तो [2]वात येईल टाळी । वैकुंठ भुवनासी ॥ २ ॥
जो करील याची यात्रा । तो तारील सकळ गोत्रां ।
सकळही कुळ पवित्रा । याचेंनि दरुषणें होती ॥ ३ ॥
आळंकापुरी हें शिवपीठ । पूर्वीं येथें होते नीळकंठ ।
ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ । येथेंचि पैं केलें ॥ ४ ॥
इंद्र येऊनियां भूमीसी । याग संपादिले अहर्निशीं ।
इंद्रायणीं इंदोरिसी । या पासोनि पंचक्रोशी ॥ ५ ॥
येथें त्रिवेणी गुप्त वसे । भैरवापासूनि भागीरथी बसे ।
पूर्ववटि माया दिसे । ते प्रत्यक्ष जाण पार्वती ॥ ६ ॥
भोवतें वनवल्लिवृक्ष । येथें देव येउनी होताती पक्ष ।
हे असे नित्य साक्ष । अस्थी नासती उदकीं ॥ ७ ॥
पंढरीहुनी हें सोपें । जनाचीं हरावया पापें ।
कळिकाळ कोपलिया कोपें । त्याचें न चले आळंकापुरीसी ॥ ८ ॥
ऐसें सांगतां हरिसी । प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी ।
म्हणे धन्य धन्य जयाचे कुसीं । ज्ञानदेव जन्मले ॥ ९ ॥
नामा म्हणे माझा स्वामी । सवें संतसमागमीं ।
ऐसें सांगितलें ग्रामीं । आळंकापुरीसी ॥ १० ॥

अभंग ९७८—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ हा एकचि योगी देखिला नयनीं। (गों. व आ.)
२ पिटीत (पं.)

[ ९७९ ]

तंव पुसती होय माता । तुम्हीं झणें खेद करा चित्ता ।
तरी ज्ञानासारिखा कां आतां । समाधीसी बैसवितां ॥ १ ॥
हें सांगावें सविस्तर । याचे कोण कोण अवतार ।
बंधु त्रिवर्ग हे साचार । आणि ते भगिनी ॥ २ ॥
देव म्हणती ब्रह्मा होय । सोपान देव नेणसी काय ।
निवृत्ति शिव ज्योतिर्मय । ज्ञानदेव ब्रह्म निघोंट ॥ ३ ॥
ऐसे ब्रह्मा विष्णु हर । मुक्ताई ते [1]मूळमाता साचार ।
तारावया चराचर । कलिमाजीं अवतरले ॥ ४ ॥
रुक्मिणी पुसे देवासी । कां कलिमाजीं जन दोषी ।
हे घातली देवा पुसी । ते सांगती महाविष्णु ॥ ५ ॥
तरी ऐके हो साचार चित्तें । तूं काय नेणसी त्या व्यासातें ।
ग्रंथीं सांगितलें भारतें । कलिमाजीं जन दोषी ॥ ६ ॥
कृष्ण अवतार जाला । पांडवी निजठाव ठाकिला ।
तेथून एक शकु जाला । जनमेजयापासूनि ॥ ७ ॥
तया मागें विक्रमशक । पुण्यपवित्र सकळ लोक ।
कलियुगीं पुण्यश्लोक । उज्जनिये नांदती ॥ ८ ॥
तेणें एक शत पंचतीस । हरिले कळिकाळदोष ।
पुढें शालिवाहन होवयास । अवतार जाण पैठणीं ॥ ९ ॥
तो हा शालिवाहन । अठरा हजार जाण ।
तें क्षेत्र प्रतिष्ठान । गंगातीरीं प्रत्यक्ष ॥ १० ॥
या शकामाजीं प्रथम । राजा भोज उत्तम ।
मग पुण्यपुरुष जन्म । थोडे घेती कलियुगीं ॥ ११ ॥
राजे भ्रष्ट यवन जाले । ठायीं ठायीं दोष घडले ।
मग इहीं अवतार घेतले । कलिदोष हरावया ॥ १२ ॥
रुक्मिणी म्हणे स्वामी । सत्य सांगितलें तुम्ही ।
पुराणप्रसिद्ध आम्ही । अवतार चरित्र जाणतसों ॥ १३ ॥
नामा म्हणे पुढें हे जन । यवनसंसर्गें कठिण ।
होतां [2]गातां हरीचे गुण । ते उद्धरती सर्वथा ॥ १४ ॥

अभंग ९७९—(पं.), (धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ माया (गों.)   २ गाती (तं. व है.)

अनुक्रमणिका

[९८०]

पुष्पक विमानातळीं । हरि उतरले भूतळीं ।
तंव उदयो पूर्वमेळीं । सूर्याचा जाला ॥ १ ॥
धन्य धन्य प्रश्नोत्तर । धन्य धन्य ते तरूवर ।
धन्य ज्ञानदेव अवतार । तिन्ही देव प्रगटले ॥ २ ॥
संत सनकादिक देव । आणि भक्त आले सर्व ।
स्नानें करूनियां भाव । हरिचरणीं ठेविला ॥ ३ ॥
विलाप मांडियेला भक्तीं । खंति करिती त्रिजगतीं ।
ज्ञानदेवासारिखी मूर्ति । न देखो म्हणती देवराया ॥ ४ ॥
देव म्हणती निवृत्ति । तूं प्रत्यक्ष शिवमूर्ति ।
तारावया क्षितीं । अवतार धरियेला ॥ ५ ॥
सोपानें घातलें लोटांगण । मुक्ताया धरिले चरण ।
संत करिताती स्तवन । पांडुरंगरायाचें ॥ ६ ॥
मग संबोखोनियां हरी । सोपानदेवा धरिला करीं ।
निवृत्ति मस्तकावरी । करकमळ हरि ठेवितसे ॥ ७ ॥
नारा विठा पुढें चाले । ऐसे इंद्रायणीस आले ।
सौंदडीवृक्षातळी बैसले । सपरिवारें सकळें भक्त ॥ ८ ॥
न्याहाळिती कांसवदृष्टी । ऐसा हरि चालत सृष्टी ।
नामा होतसे हिंपुटी । ज्ञानदेवाकारणें ॥ ९ ॥

[९८१]

तंव अंतरिक्ष गगनीं । अवचिती जाली वाणी ।
भक्त तरतील मेदिनी । ज्ञानदेव दरुषणें ॥ १ ॥
ऐसी खवाणी वदली । जयजयकारें टाळी पिटली ।
तंव स्नानसंध्या सारिली । देवभक्तीं सकळिकीं ॥ २ ॥
धन्य धन्य वृक्ष अजान । धन्य धन्य सिद्धेश्वरस्थान ।
ज्ञानदेवा समाधान । धन्य आळंकापुरी ॥ ३ ॥
मग पाहोनियां शुभदिन । देवें करूं आदरिलें प्रयाण ।
नामा होतसे खेदक्षीण । ज्ञानदेवाकारणें ॥ ४ ॥

---

अभंग ९८०—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.), ९८१—(आ.)

अनुक्रमणिका

[९८२]

मग प्रश्न आदरिला । नामा फुंदों जो लागला ।
कां गा ज्ञानदेवो गेला । मज सांडुनियां ॥ १ ॥

कैसा होय तुझा दास । कैसी पाहों तुझी वास ।
ज्ञानाकारणें कासाविस । जीव माझा होतसे ॥ २ ॥

देव म्हणे नामयासी । तूं झणीं कासाविस होसी ।
तूं रे तयातें नेणसी । तें कैसें आईक पां ॥ ३ ॥

ज्ञानदेव ज्ञानसागरू । ज्ञानदेव ज्ञानागरू ।
ज्ञानदेव भवसिंधुतारूं । प्रत्यक्ष रूपें पैं असे ॥ ४ ॥

ज्ञानदेवीं ज्ञानगम्य । ज्ञानदेवीं ज्ञानधर्म्य ।
ज्ञानदेवीं ज्ञाननेम । सर्वथैव पैं असे ॥ ५ ॥

ज्ञानदेव हाचि देव । ज्ञानदेवीं धरलिया भाव ।
ज्ञान होईल जीवां सर्व । यासी संदेह नाहीं ॥ ६ ॥

ज्ञानदेवीं धरितां ध्यान । ध्याता होय समाधान ।
जीव शिवीं परिपूर्ण । [1]एके रात्रीं कीर्तन केलिया ॥ ७ ॥

झणें तूं व्याकुळ होसी चित्तें । मनीं आठवी गा मातें ।
नामस्मरणें एका चित्तें । रामकृष्ण गोविंद ॥ ८ ॥

नामा म्हणे तूं [2]समर्थ होसी । अर्जुनीं प्रीति करिसी ।
हें सांगितलें व्यासीं । एकादशाध्यायीं ॥ ९ ॥

तैसा पावे तूं विश्वेशा । विश्वरूपा जगन्निवासा ।
मी होतसे कासाविसा । ज्ञानदेवाकारणें ॥ १० ॥

तरी तूं गा युगानयुगीं । असशी भक्तांचिया संगीं ।
आम्ही विनटलों पांडुरंगीं । रंगारंगीं विठ्ठलीं ॥ ११ ॥

एक वेळ माझा शोक । दुरी जाय हरे विख ।
तें करी निर्विशेष । नामा येतसे काकुळती ॥ १२ ॥

[९८३]

तंव नावेक श्रीहरी । तटस्थ घटिका चार्‍ही ।
ध्यान धरूनी अंतरीं । निश्चळ राहिला ॥ १ ॥

---

अभंग ९८२ व ९८३—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ एकरातीं (ह.) २ सर्वज्ञ (पं., ब. व ह.)

जयजयशब्द नामा बोभाये । केशवा आहे आहे ।
मी व्याकुळ होत आहें । ज्ञानदेवाकारणें ॥ २ ॥

नारायणा आहे आहे । कृपादृष्टी तूं रे पाहे ।
मी व्याकुळ होत आहें । ज्ञानदेवाकारणें ॥ ३ ॥

तुझेनि दर्शनें । ज्ञानाचेनि अवलोकनें ।
मज पंढरीस असणें । तुझे चरणीं गा विठ्ठला ॥ ४ ॥

आतां मज तूं सांभाळी । ज्ञानदेवेंवीण सदाकाळीं ।
मज न कंठे भूमंडळी । भानुसहित वर्तता ॥ ५ ॥[1]

तूं माझी जनक जननी । परि ज्ञानदेवेंविण मेदिनी ।
[2]शून्य वाटे हे धरणी । जैसे मत्स्य जीवनेंविण ॥ ६ ॥

तूं रक्षिता सर्व जीवांसी । तरी कां दुःख दिधलें आम्हांसी ।
तूं जवळी असतां हृषिकेशी । ऐसी दशा हे प्राप्त ॥ ७ ॥

नामा खेदें क्षीण जाला जीवें । तंव नेत्र उघडिले देवें ।
आलिंगला केशवें । चाऱ्ही भुजा पसरूनी ॥ ८ ॥

[ ९८४ ]

नामा न राहे खेद करूं । केशव ठेवी अभय करू ।
म्हणे तूं दुःखिया होसी थोरू । ज्ञानदेवाकारणें ॥ १ ॥

धन्य धन्य तुम्ही भक्त । नित्य विष्णुचरणीं रत ।
पुण्यशील [3]भागवत । ज्ञानदेव नामया ॥ २ ॥

तुमचेनि [4]जग हें कृतार्थ । कवित्वें तरेल हें सत्य ।
मायामोहो निरसे समस्त । नामस्मरणें तुमचेनी ॥ ३ ॥

धन्य ज्ञानदेव ज्ञानशीळ । ज्ञानदेवा ऐसा सुढाळ ।
मी न देखें भूमंडळ । सकळही पाहतां ॥ ४ ॥

तूं करिसी खेद त्याचा । [5]तरी तो आत्मा माझा साचा ।
भाव सांडी सांडी द्वैताचा । [6]निखळ स्वरूप पाहे पां ॥ ५ ॥

---

अभंग ९८४—(धु.), (पा.), (हे.), (तं.) व (हु.)

१ पुढील संपूर्ण चरण (ब.) प्रतीतील आहे—
मज न कंठे निशी । मंडळी भानुसहित वर्तता ॥ (आ.)

२ शून्य वाटे मजलागुनी। (आ.) ३ भाग्यवंत (पं. व आ.) ४ जन (ह.)

५ तरी तो माझा आत्मा हे वाचा। (तं.) ६ निखळरूपें पाहे पां। (पं. व आ.)

तुम्ही भक्त अवघे आवडते । तुमचेनि साजिरे पूर्णचित्तें ।
मज पंढरिये येणें आवडतें । नाम गाताती ये प्रीतीं ॥ ६ ॥

पुंडलिक माझा भक्त सखा । परी प्रेमळ तुम्ही विशेषा ।
तुमचेनि सर्व दुःखा । हरणें मी हें जाणावें ॥ ७ ॥

नामा म्हणे ज्ञानदेवाचें । मज दरूषण होईल साचें ।
तरीच रंगणीं मी नाचें । हरिकीर्तनीं पंढरिये ॥ ८ ॥

[९८५]

ऐसें परियेसिलें विठ्ठलें । तंव रुक्मिणीनें विनविलें ।
याचें करिजो जी म्हणितलें । हाकारिजो पुंडलिका ॥ १ ॥

धन्य धन्य धरातळीं । बोळले बोळले वनमाळी ।
वैष्णवीं पिटली टाळी । जयजय शब्दें करूनियां ॥ २ ॥

गरुडासी सांगे केशव । कैसा भेटे यासी ज्ञानदेव ।
पुंडलिकासी जाऊनी सर्व । वृत्तांत सांगे येथींचा ॥ ३ ॥

तेणें नमस्कारूनि हरी । निघाला पक्षाच्या फडात्कारीं ।
भेटला पुंडलिका झडकरी । यथाविधि सांगितलें ॥ ४ ॥

पुंडलिकें विस्मित चित्तीं । म्हणे धन्य धन्य ज्ञानमूर्ती ।
ज्या कारणें वैकुंठपती । आळंकापुरीसी गेले ॥ ५ ॥

धन्य धन्य विठोबाचे चरण । धन्य धन्य माझे नयन ।
धन्य नामा रूपीं संपन्न । विष्णु भक्त सखा माझा ॥ ६ ॥

मग गरुडासि [1]पूजिलें । ज्ञानदेवा हाकारिलें ।
दिव्य विमानीं बैसविलें । चला म्हणितलें आळंकापुरीसी ॥ ७ ॥

नामा असे खेद करीत । केशव तयासी संबोखित ।
तुम्हा दोघांचा येकांत । माझेनि संगें पुरेल ॥ ८ ॥

[९८६]

पुढें चालिला गरूड । आक्रमित अवघें ब्रह्मांड ।
विमान शुभ्र चंड । पुंडलिक आणितसे ॥ १ ॥

अभंग ९८५ व ९८६—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ पुसिलें (ह. व आ.)

धन्य हरिभक्तांचा मेळ । धन्य धन्य तो गोपाळ ।
धन्य धन्य आळंकापुरी सुढाळ । ज्ञानदेव येतसे ॥ २ ॥

दुरोनी लक्षित रुक्मिणी । हरूषें सांगे चक्रपाणि ।
पैल विमान येतसे गगनीं । दाखविजे नामया ॥ ३ ॥

मग नामयासी सावध । करूनियां तो गोविंद ।
म्हणे तुझा पुरविला रे छंद । पैल ज्ञानदेव येताहे ॥ ४ ॥

नेत्र विकसित पाहे । तंव गगनीं विमान दिसताहे ।
पुंडलिक गरूड आहे । दिव्य देहीं दिव्य विमानीं ॥ ५ ॥

ऐसा जंव तटस्थ घटिका । 'तंव उतरलें निमिष्य एका ।
नामा पावला संतोषा । ज्ञानदेवा देखोनी ॥ ६ ॥

विमानघंटी गर्जत । नामा पुढारां चालत ।
जी जी रुक्मिणी म्हणत । वेगु कीजे ज्ञानदेवा ॥ ७ ॥

नामा ज्ञानदेव भेटले । पुंडलिकें विष्णु नमस्कारिले ।
भक्तीं जयजय शब्द केले । देवीं पुष्पवृष्टि केलिया ॥ ८ ॥

[९८७]

आलिंगन पडिलें दृढ । मिठी पडिली न सुटे गूढ ।
पुंडलिक म्हणे मज चाड । या विठ्ठल चरणाची ॥ १ ॥

तुझे दरूषण माझा लाभ । जैसा ज्ञानदेवावरी लोभ ।
नामयावरी स्वयंभ । तैसाचि करी विठ्ठला ॥ २ ॥

नामदेवें आळंगुनी प्रीतीं । शिर चरणावरी अवचितीं ।
ज्ञानदेवाच्या ठेवी पुढतीं । म्हणे धन्य क्षितीं मी एक ॥ ३ ॥

पुंडलिक म्हणे नामया । धन्यधन्य तुझा थाया ।
क्षितीं आणिलें वैकुंठराया । ज्ञानदेवाचेनि स्मरणें ॥ ४ ॥

धन्य युगान्युगीं तुम्ही । धन्य देखिलें तीं आम्ही ।
धन्य आळंकापुर जन्मीं । उपजोनी जो देखेल ॥ ५ ॥

पंढरीहुनी हें मूळपीठ । जुनाट पैं वैकुंठ ।
पूर्वीं येथें होते नीळकंठ । ब्रह्माविष्णुरुद्रइंद्र ॥ ६ ॥

---

अभंग ९८७—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ तंव विमान उतरलें (ह.)

तें हें शिवक्षेत्र प्रत्यक्ष । पूर्वे मातुलिंग साक्ष ।
तेथेंही केशव प्रत्यक्ष । चतुर्भुजरूपें असे ॥ ७ ॥
दक्षिणे पुण्येश्वर देवो । पुण्यस्थळ महादेवो ।
मूळपीठीं नागेंद्रीं पाहा हो । त्रिवेणीरूपीं वाहातसे ॥ ८ ॥
पश्चिमे इंदोरिये देवो । ब्रह्मेश्वर उत्तम ठावो ।
उत्तरे सिद्धेश्वर देवो । खेटकग्रामीं भागीरथी ॥ ९ ॥
मध्यस्थळीं हे इंद्रायणी । [1]सरसी भागीरथी वाहिनी ।
सिद्धेश्वर शोभे स्थानीं । ज्ञानदेवो सहित ॥ १० ॥
ऐसिये दक्षिण वाहिनीसी । स्नान घडतां अर्हनिशीं ।
कोटि तीर्थें प्रयाग काशी । प्रसन्न होती हरिहर ॥ ११ ॥
ऐसिये तीर्थीं देवा । समाधि दिधली ज्ञानदेवा ।
पुंडलिक विनवितसे केशवा । धन्य भाग्य नामयाचें ॥ १२ ॥

[९८८]

स्वर्ग मृत्यु पाताळ तिन्हीं ताळे उदर । विराटले थोर विश्वरूप ॥ १ ॥
समाधिसंजीवन निवृत्ती फावले । तें निधान देखिलें आम्ही तुम्ही ॥ २ ॥
निवृत्ति सोपान ज्ञानदेव निधी । मुक्ताई सिद्धि आळंकापुरीं ॥ ३ ॥
पंढरी प्रत्यक्ष [2]केली ज्ञानदेवें । उभारूनि बाहे सांगे आम्हां ॥ ४ ॥
कळिकाळासीं त्रास विठ्ठल उच्चारीं । हरी चराचरीं [3]भरला असे ॥ ५ ॥
सर्वत्र सबाह्य अंतरंग रूपडें । तें रूप फाडोवाडें पारखिलें ॥ ६ ॥
चिंतामणीचें सार कल्पतरू उघड । दावुनियां मूढ तारियेले ॥ ७ ॥
सुवर्णाचा पिंपळ [4]तिहीं केला ठाऊका । त्या समीप देखा कल्पतरू ॥ ८ ॥
[5]सिद्धेश्वरलिंग सिद्धिबुद्धि दाता । जड जीवा मुक्तता देतु हरी ॥ ९ ॥[6]
ऐसिये स्थानकीं ज्ञानदेव राहिले । राहुनी तारिले मूढजन ॥ १० ॥
नामा म्हणे ज्ञानदेवें हा दातार । जडजीवां उद्धार विठ्ठल हरी ॥ ११ ॥

[९८९]

तंव तेथें नवल वर्तलें । आकाश असे विमानीं दाटलें ।
म्हणती मूळपीठ वैकुंठ देखिलें । पुंडलिकासगट ॥ १ ॥

अभंग ९८८ व ९८९—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ समरसे (तं. व ह.) २ आणिली (ह.) ३ क्षरला (पं., ह., तं. व आ.) ४ तिहीं लोकां ठाऊका (पं. व ह.) ५ लिंगी (पं.) ६ नववी ओवी (पं.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

पंढरीहुनि आलें कैसें । पुंडलिक देव सरिसे ।
ज्ञानदेवासवें नामा असे । आणि विष्णुभक्त अपार ॥ २॥

राही रुखमाई सत्यभामा । गाई गोपाळ मेघःश्यामा ।
म्हणती [1]पाहाहो महिमा । या विष्णुभक्तांचा ॥ ३॥

सवें ध्रुव प्रल्हाद अंबऋषी । रूक्मांगद सूर्यवंशी ।
आणि ऋषीमुनी तापसी । ऐसिया समवेत वनमाळी ॥ ४॥

बळी भीष्म नारद । उद्धव अक्रुर [2]विद्गद ।
आणि बिभीषण सुबुद्ध । हनुमंतादि करूनि ॥ ५॥

हा हा हु हु गंधर्व गाती । रुणुझुणु रुणुरुणु विणे [3]वाजती ।
देवांगना आरतिया ओवाळिती । देवभक्तासहित ॥ ६॥

ऐसा शुभ काळ समयो । जाला भाग्याचा उदयो ।
ज्ञानदेव नामदेव पाहाहो । धन्य धन्य धरातळीं ॥ ७॥

नामा [4]नुघडी दृष्टीसी । हृदयीं ध्यातुसे हृषिकेशी ।
ज्ञानदेवो निजमानसीं । विष्णुमूर्तीसी लीन जाला ॥ ८॥

[९९०]

तंव बोलत उद्धव । धन्य धन्य हा देवाधिदेव ।
धन्य धन्य ज्ञानदेव । [5]निजभक्त आवडता ॥ १॥

धन्य तीर्थ इंद्रायणी । धन्य प्रत्यक्ष शूळपाणि ।
तारक ब्रह्म त्रिवेणी । मिश्रित रूपें वहातुसे ॥ २॥

चिंतामणि हे पाषाण । दिव्य वनवल्ली जाण ।
जेथें लागले हरिचे चरण । ते धन्य आळंकापुरी ॥ ३॥

जेथें समाधिसी बैसतां । इंद्रादि [6]सामोके येती तत्वतां ।
वैकुंठा जाईल निश्रांता । रामकृष्ण उच्चारित ॥ ४॥

यम न पाहे इकडे । काळ नमस्कारी वाडेंकोडें ।
म्हणती पाहा हो केव्हडें । भाग्य या ज्ञानदेवाचें ॥ ५॥

ऐसें उद्धव सांगे रुक्मिणी । होय म्हणती चक्रपाणि ।
पंढरीहुनि हे जुनाटपुराणीं । शैवागमीं बोलिलेसे ॥ ६॥

---

अभंग ९९०—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)
१ पाहो (पं.) २ सुबद्ध (पं.) ३ वाती (ह.) ४ उघडि (तं., पं. व ब.)
५ विष्णुभक्त । सखा माझा (पं.) ६ सामोरे (आ.)

अनुक्रमणिका

ज्ञानदेवें नमस्कार केला । नामा हृदयीं धरिला ।
प्रीतीनें पुढती आलिंगिला । म्हणे धन्य धन्य रे सखया ॥ ७ ॥
नामा लोळत गडबडां । चरणरजालागीं जाला वेडा ।
केशव म्हणे तूं धडफुडा । विष्णुभक्त साचार ॥ ८ ॥

[९९१]

ऐसी प्रदक्षिणा करूनी विष्णुभक्ता । नामा जालासे सरता ।
रुक्मिणी म्हणे यातें तत्वतां । [1]वैकुंठासी न्यावें जी ॥ १ ॥
नामा म्हणे नेघे मुक्ती । मज पंढरीची आर्ती ।
विठ्ठलनामें करीन कीर्ती । नित्यकाळ जीवन्मुक्त ॥ २ ॥
मज [2]नित्यमुक्ता जन्म नाहीं । केशवासी माते पुसोनि पाही ।
युगानयुगीं अवतार दाही । याचेनि संगें मज घडती ॥ ३ ॥[3]
तिहीं त्रिभुवनीं उदार । मुक्ति तुम्हापाशीं साचार ।
परि भक्तिविण मुक्ति असार । कोण पामर इच्छिल ॥ ४ ॥
मुक्ति फलकट नैश्वर । फळ एक विठ्ठल सार ।
विष्णुभक्तीसी ज्याचा निर्धार । त्याचे चरण वंदीन माथां ॥ ५ ॥
विष्णुविण कीर्तन न करीं । भक्तिविण नसे क्षणभरी ।
कीर्तन करीन गजरीं । रामकृष्णगोविंद ॥ ६ ॥
मज नामाचें अमृत । माझें मुक्ति दास्य करी ।
तूं मूळमाता जाणसी जरी । तरी तुजसीं हें गुह्य बोलिलों ॥ ७ ॥
नामदेव परतोनी पाहे । तंव ज्ञानदेवें उभारिले बाहे ।
म्हणे विष्णुभक्ति ऐसी आहे । [4]आइक माते इचा बडिवारू ॥ ८ ॥

[९९२]

भक्त अमर स्वस्तिक्षेम । चरणरजें डौरलें व्योम ।
मग कैलासीं मंदाकिनी सोम । नीळकंठें सिरीं धरियेली ॥ १ ॥

---

अभंग ९९१—(धु.), (पा.) व (ह.), ९९२—(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (ब.)

१ निजभुवनासी न्यावें (आ.) २ जीवन्मुक्त (पं.) ३ तीन व चार हे चरण (पं.) प्रतीत उलटया क्रमाने आहेत. ४ ऐक माते साचार (आ.)

अनुक्रमणिका

धन्य विष्णुचरणींची गंगा । [1]स्नपन होत महालिंगा ।
भीमरथीं मृत्युलोकीं [2]सवेगा । इंद्रायणीसमरसें ॥ २ ॥

भोगावती पाताळा गेली । मग विष्णुचरणीं गुप्त ठेली ।
मग पुरोनियां उरली । त्र्यंबक सिखरीं ॥ ३ ॥

मग कितेका काळें भागीरथी । भगीरथें आणिली भारथीं ।
सगर उद्धरिले त्वरितीं । विष्णुतीर्थें करूनियां ॥ ४ ॥

ऐसी त्रिभुवनीं ज्याची थोरी । तो मुकुटमणी हा हो श्रीहरी ।
त्यांतें सोडिलिया मुक्ति चारी । काय आम्हां तारिती ॥ ५ ॥

सर्वे तीर्थें ज्याचे रंक । आम्ही तयाचे सेवक ।
ज्याचेनि नामें हें त्रैलोक्य । नाम घेतां [3]तरत ॥ ६ ॥

तो पूर्ण बीजमंत्र आम्ही जाणों । विष्णुविण कांहीं नेणों ।
[4]पूर्ण ब्रह्म काय म्हणों । हा महिमा तूं जाणसी ॥ ७ ॥

ज्ञानदेवें नमस्कारिले हरी । निवृत्ति सोपान झडकरीं ।
मुक्ताई भेटली लवकरीं । ज्ञानदेवा करीं धरियलें ॥ ८ ॥

[९९३]

मग संतोष जाला हरिभक्तां । ज्ञानदेव झाला बोलता ।
निवृत्तीसी म्हणे तुम्ही जावें आतां । [5]त्र्यंबका सीखरीं ॥ १ ॥

करूनि नमस्कार हरिसी । वेगीं [6]यावें वैकुंठासी ।
नित्य हरिचरणापासीं । तुम्हीं आम्हीं सोपान ॥ २ ॥

मुक्ताई म्हणे ज्ञानदेवा । मज विठोबासी निरवा ।
मजवरी लोभ असों द्यावा । रुक्मिणीमाता आदिकरूनि ॥ ३ ॥

पुंडलिकासी निरवावें । समस्तांसी क्षेम सांगावें ।
कृपादृष्टीं अवलोकावें । मजलागीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥

ज्ञानें करुनि विज्ञान । भक्तीसी करावें निरूपण ।
द्यावें समाधिसंजीवन । तुम्ही यावें शीघ्रवत ॥ ५ ॥

निवृत्तीनें दिधलें उत्तर । आम्ही जाऊं वेगवत्तर ।
सोपानासी मार्गीं निरंतर । समाधीसी [7]बैसवूनि ॥ ६ ॥

---

अभंग ९९३—(धु.), (पा.), (तं.), (ह.) व (न.)

१ स्रवन (भा.) २ सवांगा (पं. व आ.) ३ तरती (पं. व ब.), तरताती (भा.) ४ तूं ब्रह्म परिपूर्ण आम्हीं काय म्हणों । (पं.) ५ ज्योतिर्लिंग त्र्यंबक सिखरीं ॥ (ब.) ६ जावें (आ.) ७ समाधि चालऊं (ह.)

तंव बोलिला यादवराणा । तुम्ही [1]सांगितल्या समाधीच्या खुणा ।
परी नामयावरी जाणा । माझी कासवदृष्टी ॥ ७ ॥

नामा म्हणे विठोबासी । तूं स्वामि दीनाचा होसी ।
गेलें निधान ज्ञानदेव दाखविशी । मज नयनीं प्रत्यक्ष ॥ ८ ॥

[९९४]

ऐसें बोलोनियां हरी । रुक्मिणीसीं विचार करी ।
यासी भोजनें परोपरी । अन्नें निफजवावीं ॥ १ ॥

संतोष जाला हरिभक्तां । जेथें स्वयें हरी भोक्ता ।
कर्ता आणि करविता । सर्व चाळक विठ्ठल ॥ २ ॥

तंव दिव्यग्राम उभवुनि । भक्तीं देखिले नयनीं ।
विश्वकर्मा येऊनी । उत्तरापंथें निर्मिले ॥ ३ ॥

तंव अष्टमहासिद्धी । सर्व सामोग्रीची समृद्धि ।
कर जोडोनी कृपानिधी । विनविती आनंदें ॥ ४ ॥

दिव्यवनें दिव्यवल्ली । दिव्यसुमनें समग्र जालीं ।
वैकुंठीहुनि आलीं । महाविष्णुकारणें ॥ ५ ॥

तेथें सुगंध परिमळ । जवादि कस्तुरी निर्मळ ।
चिंतामणी देती ढाळ । नानाकीळ दीप्तीचे ॥ ६ ॥

चंदनाचे खांब उभारिले । [2]पवळ वेलीचे शोभले ।
मुक्ताफळाचे घोस मिरवले । रत्नखचित [3]दामोदरें ॥ ७ ॥

चंपक सुमनाचियां हारी । सेवंती [4]वाटोगर नानापरी ।
नानापुष्पें परिमळ आगरीं । दिव्यवनें कीं शोभती ॥ ८ ॥

आंबे खजुरिया पोफळी । फणसें नारिंगें नारिकेळीं ।
कर्दळी वाळिंबलीया सरळी । उदक पाट वाहताती ॥ ९ ॥[5]

तेथें भ्रमर रुणुझुणु करित । कोकिळा सुश्वरें बोलत ।
पारवे आनंदें घुमघुमित । सुखें संवादती निजगजरें ॥ १० ॥

---

अभंग ९९४—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ मागितल्या (ब. व आ.) २ पोवळवेलीचे (ब.) ३ चामरें (आ.) ४ वाटोगरे नानापरी (पं.), बटमोगरे नानापरी (है.), वाटोगरें नागरी (तं.) ५ नवव्या आणि दहाव्या चरणांमध्ये पुढील चरण मिळतो—

कोकिळा सुस्वरें बोलती । पारवे आनंदे घुमती ॥ शुक मैना संवादती । गजरेंसी ॥ (धु.)

अनुक्रमणिका

तालालोरी गीती गाती । गोपाळ [1]वीणे वाजविती ।
नाना परी बागडे धरिती । देव पाहती विमानीं ॥ ११ ॥

थकलीं योगियांचीं ध्यानें । निश्चळ राहिलीं आसनें ।
निवृत्ती सोपानें । तेथें देवडे उभे असती ॥ १२ ॥

नामा जातो लोटांगणीं । वैकुंठ उतरलें मेदिनीं ।
आळंकापुर पाटणीं । [2]उत्तरापंथें देखिलें ॥ १३ ॥[3]

जेथें त्रिभुवनिचें निधान । स्वयं आपण भगवान ।
तेथें सकळ काम होती पूर्ण । जाणती खुण अंतरंग भक्त ॥ १४ ॥

नामा म्हणे ऐसीं विंदानें । भक्तीलागीं जगजीवनें ।
प्रत्यक्ष वैकुंठ भुवनें । दासा सुखसंपन्न करावया ॥ १५ ॥

[९९५]

ऐसें देखिलें वैष्णवीं । वैकुंठ नगरी चिरंजीवी ।
आणि ज्ञानदेव गोसावी । विष्णुमूर्ती चतुर्भुज ॥ १ ॥

तालालोरी वाजविती पावा । समाधान होतसे जीवां ।
नामा विनविता केशवा । तुझ्या दरुशनें निवालों ॥ २ ॥

तंव रुक्मिणीनें विनविलें । यासि भोजन सारा कां वहिलें ।
तंव अक्रूरें पाचारिलें । समस्तांसीं देखा ॥ ३ ॥

उद्धव घालित आसनें । ताटें विस्तारिलीं बोनें ।
राही रुक्मिणी विचक्षणें । पंचामृतें वाढिती ॥ ४ ॥

समस्त भक्त दाटले । पांतीकर एकवटले ।
नानापरी भात विस्तारिले । परिमळित [4]मघमघां ॥ ५ ॥

वरी मिरवे मुगांचें वरण । कथिका वाढिली संपूर्ण ।
नाना कोरिकें विस्तीर्ण । रुक्मिणी वाढितसे ॥ ६ ॥

कामधेनूचें घृत । पयोदधिक्षीर वाढित ।
नानापत्र शाखा शोभत । वैष्णवांचां ताटीं ॥ ७ ॥

ऐसें समस्तांसीं संपूर्ण । [5]ताटें जालीं विस्तीर्ण ।
तंव देव बोलती आपण । ज्ञानदेवासी ॥ ८ ॥

अभंग ९९५—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (ह.)

१ वेणु (आ.) २ उत्तरामुखें (आ.) ३ तेराव्या ओवीपुढील ओव्या (ब.) प्रतीतील आहेत. ४ घमघमा (पं. व आ.) ५ दुसरा चरण—भोजनासी बैसविलें प्रीतिकरून (पं. व ह.)



अनुक्रमणिका

निवृत्ती सोपान बोलवा । मुक्ताईस वेगीं आणवा ।
पांथिकरासी रिघावा । ताटीं बैसवा समस्तांसी ॥ ९ ॥

विष्णुमूर्ती चतुर्भुज । पूजी ब्राह्मण द्विभुज ।
तुळसी मंजिरी केसिराज । त्यांचे मस्तकीं वाहतसे ॥ १० ॥

चरणतीर्थ घेतलें । तेणें समस्त मंदिर शिंपिलें ।
आपण मुखीं घातलें म्हणे । कृतकृत्य जालों मी ॥ ११ ॥

नामा तिष्ठत उभा द्वारीं । त्यासीही रुक्मिणी ताट करी ।
ऐसीं भोजनें परोपरी । जालीं वैष्णवांचीं ॥ १२ ॥

[ ९९६ ]

ऐसे भक्त जेवुनि धाले । समस्त पांतिकरु उठिले ।
गोपाळें विडे दिधले । आपुलेनि करकमळें ॥ १ ॥

धन्य धन्य तें भोजन । धन्य धन्य तें निधान ।
धन्य धन्य तो वृक्ष अज्ञान । धन्य नारायण आळंकापुरी ॥ २ ॥

विठ्ठलें दिधलें वचन । यांसी घाला रे आसन ।
तंव उद्धवें आपण । समस्तां बैसकार दिधले ॥ ३ ॥

पूजिलें गंधाक्षता लावुनि । टिळे उटी कर्पुर चंदनीं ।
ऐसे तिये वैकुंठभुवनीं । वैष्णवांसी पूजी हरी ॥ ४ ॥

तंव म्हणे रुक्मिणी । नामा आणा बुझावुनि ।
आपलेनि हातें चक्रपाणि । त्यासी [1]घांस घालावे ॥ ५ ॥

ऐसें सांगतां हरीसी । बुझाविती नामयासी ।
तो स्फुंदत उकसा बुकसीं । मग चहूंकरीं उचलिला ॥ ६ ॥

सवें संतांचा मेळा । तयामाजीं परब्रह्म पुतळा ।
नामा बुझावोनी तत्काळा । देहावरी आणिला ॥ ७ ॥

तंव विस्तारुनी आणिलें ताट । माजी षड्रस अन्ने बरवंट ।
रुक्मिणी आणि जेथें वैकुंठ । भक्तांसहित उभे असती ॥ ८ ॥

नामयातें संबोखोनि हरि । बैसविला मांडियेवरी ।
कवळ घ्यावया मुख पसरी । [2]निजकरें हरी घालितसे ॥ ९ ॥

---

अभंग ९९६—(पं.), (धु.), (पा.), (है.) व (तं.)
१ ग्रास (पं.) २ चहुंकरी (आ.)

अनुक्रमणिका

नामा आनंदें डुलत । तृप्त जाला प्रेमें ओसंडत ।
सकळ संतां कवळ देत । आपुलेनि निजकरें ॥ १० ॥[1]

[९९७]

ऐसा [2]येकवळा भक्तांचा । भोक्ता हरी वैकुंठींचा ।
उतरोनी आळंकापुरीं साचा । करी भक्तांचा उत्छाव ॥ १ ॥
ऐसे जेवुनि धाले । हरिकरेंचि निवाले ।
मग सुखें रहिवासले । सकळै भक्त वैकुंठीं ॥ २ ॥
देव म्हणती निवृत्तीसी । तुम्ही जावें त्र्यंबक सिखरासी ।
मग समाधी सरिसी । गंगोदकें करूनि घ्यावी ॥ ३ ॥
तंव सोपान म्हणे स्वामी । पूर्वीं बोलिले होतेति तुम्ही ।
कऱ्हे पठार संवत्सरे ग्रामीं । समाधी देऊं म्हणोनि ॥ ४ ॥
देव म्हणती संतासि पुसा । हा ज्ञानदेव असे सरिसा ।
हाहि॰ दिव्यदेही आम्हांसरिसा । येईल तेथवरी ॥ ५ ॥
मुक्ताई म्हणे देवाधिदेवा । आम्ही करावी चरणसेवा ।
तुझेनि विचारें जी केशवा । समाधीधन भक्तांसी ॥ ६ ॥
ऐसा करिती विचार । [3]तंव पातला राजा इंद्र ।
भक्तीं केलें जयजयकार । देवें दुंदुभी वाजविल्या ॥ ७ ॥
संत सनकादिकीं स्तोत्रें । मुखीं आरंभिलीं पवित्रें ।
गाती हरीनाम चरित्रें । ऋषिगण सकळीक ॥ ८ ॥
धन्य आळंकापुरी ग्राम । जेथें प्रत्यक्ष पुरुषोत्तम ।
उतरोनि वैकुंठधाम । सोहळा करी भक्तांचा ॥ ९ ॥
नामा नाचे हरिचे द्वारीं । ब्रह्मांड गरजे जयजयकारीं ।
निवृत्ति सोपान म्हणती हरी । आम्हां निरंतरीं सांभाळीं ॥ १० ॥

[९९८]

नानागंधें तुलसीमाळा । वैष्णवीं घातलिया गळां ।
नमस्कार करिती गोपाळा । चरणरजा वंदिती ॥ १ ॥

---

अभंग ९९७—(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (बा.), ९९८—(धु.); (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ हा अभंग (है.) प्रतीत सापडत नाही २ कळवळा (आ.) ३ तंव पातले इंद्र चंद्र। (गों.)



अनुक्रमणिका

दोहीं बाहीं देव्हडे । संत सनकादिक गाढे ।
जयजयकार पुढें । महाशब्दें गर्जिन्नले ॥ २ ॥

ऐसे इंद्रायणींचां तटीं । हरि रुक्मिणी जगजेठी ।
संत सनकादिकांची गोमटी । मांदी मिळाली असे ॥ ३ ॥

तंव पुंडरिकें नमस्कार केला । म्हणे तूं कां गा येथें विठो उगवला ।
बहुत दिवस येथेंचि राहिला । या ज्ञानदेवाकारणें ॥ ४ ॥[1]

तरी पंढरीहुनि हे श्रेष्ठ । तूं येथें उभा अससी प्रगट ।
भूमी उतरलें वैकुंठ । ज्ञानदेवाकारणें ॥ ५ ॥

बहुत दिवस येथेंचिं जाले । मी न देखें विटेवरी जंव पाउलें ।
तंव नयन माझे भुकेले । न राहाती देवराया ॥ ६ ॥

देव म्हणती पुंडरिका । तूं भक्त माझा निजसखा ।
आणि हा ज्ञानदेव देखा । दुजा न देखों [2]आणिक ॥ ७ ॥

हे संत सनकादिक माझे । यांचेनि समागमें माझें बीजें ।
नामा डौरिन्नला यांचे चरणरजें । मग जावों रे पंढरीसी ॥ ८ ॥

[९९९]

सवें तीर्थें मिळालीं अनंतें । तीं सुखी करूनी कृतार्थें ।
संवत्सरा जावोनी सोपानातें । समाधीसी बैसवूं ॥ १ ॥
अनंत सुखाचिया रासी । उदैल्या भक्तांचिया मानसीं ।
आनंद जाला पुंडरिकासी । मग न बोले कांहीं ॥ २ ॥
सोपान म्हणे वैकुंठा । बिजें किजो महाश्रेष्ठा ।
संवत्सर ग्राम कऱ्हे तटां । वैकुंठासहित चालावें ॥ ३ ॥
इंद्रचंद्रब्रह्माहर देव । आणि गण मिळाले [4]सर्व ।
तेहतीस कोडी देव । विमानीं आरूढले देखा ॥ ४ ॥
निवृत्ति सोपान ज्ञानदेवो । त्रिमूर्ति तिन्ही देवो ।
धर्मरक्षणार्थ पाहा हो । मनुष्यरूपें अवतरले ॥ ५ ॥
तिघेही उभे सन्मुख । तिघांही थोर संतोष ।
विनविती केशवास । स्वामी विनंति अवधारिजो ॥ ६ ॥

---

अभंग ९९९—(घु.), (पा.), (है.), (तं.), (भा.) व (ह.)
१ चौथा चरण (तं.) प्रतीत नाही. २ त्रिभुवनीं (आ., पं. व ह.) ३ सर्व (ब.)
४ गंधर्व (ब. व भा.)

ये आळंकापुरीसी । स्थापावें कोटी तीर्थांसी ।
जो जो भक्त येईल स्नानासी । तो वैकुंठासि आणावा ॥ ७ ॥

ऐसें आइकोनि श्रीहरी । म्हणे धन्य धन्य तुमची वैखरी ।
जगदोद्धार केला संसारीं । बावीस वरूषें असतां पैं ॥ ८ ॥

जो जो दिवस उगवला । तो तो ज्ञानदेवें सफळ केला ।
पद पदांतर कथिला । जेणें आत्माराम संतोषे ॥ ९ ॥

पूर्वीं अनंत भक्त जाले । पुढें ही भविष्य बोलिलें ।
परी [1]निवृत्तीं ज्ञानदेवें सोडविले । अपार जीवजंतु ॥ १० ॥

जो अभक्त मनुष्य जनीं प्राणी । ज्याचा भार न साहे मेदिनी ।
मग इहीं अवतार घेउनी । जग तारिलें कीर्तनें ॥ ११ ॥

नामा पंढरीस नाचत । ज्ञानेश्वर आळंकापुरीं शोभत ।
सोपान संवत्सरीं मिरवित । निवृत्ति त्र्यंबकसिखरीं ॥ १२ ॥

[१०००]

ऐसें पांडुरंग बोलिले । मग सकळ तीर्थांसी सांगितलें ।
आळंकापुरीं वसिजो वहिलें । भक्त तारावया ॥ १ ॥

जो जो करील कीर्तन । तो तो तरेल जाण ।
आळंकापुरीं नारायण । स्वयें उभे असती ॥ २ ॥

ऐसा निरोप तीर्थांसि । ते तिष्ठति अहर्निशीं ।
कीर्तन करितां गजरेंसि । वैकुंठासी नेवों म्हणती ॥ ३ ॥[2]

देव म्हणे यमुना नर्मदा । सरस्वति भागीरथी त्रिविधा ।
गंगा कृष्णा तुंगभद्रा । इंद्रायणीस मिळावें ॥ ४ ॥

जो जो भक्त येईल स्नाना । तो पवित्र करावा ये [3]क्षणा ।
वैकुंठ कैलासापर्यंत जाणा । त्यासी घेवुनि यावें ॥ ५ ॥

हो म्हणती तीर्थें सकळें । मग मीनलीं आपुलेनि मेळें ।
गुप्त राहोनि यथाकाळें । आज्ञा शिरसा वंदिती ॥ ६ ॥

गया काशी त्रिवेणी । त्या शोभती विठ्ठलचरणीं ।
ज्ञानदेवा समाधिरंगणीं । अखंड वाहों लागल्या ॥ ७ ॥

---

अभंग १०००—(पं.), (धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

१ निवृत्ति सोपाने सोडविलें (पं., ह. व पा.) २ पुष्कळ प्रतींत हा चरण नाही. ३ स्वाना (शि.), येसना (तं., आ. व पं.)

अनुक्रमणिका

सुवर्णाचा अश्वत्थ । द्वारीं स्थापुनि निवास ।
भोवते देव्हडे तापस । समाधीस बैसले ॥ ८ ॥

देव म्हणे जो करील तप । तो होईल निष्पाप ।
केवळ होईल शिवरूप । आत्माराम साक्षात ॥ ९ ॥

जप तप नेम मंत्र [1]ध्यान । कोटि याग घडले पूर्ण ।
अथवा द्विजीं दिधलिया अन्न । चतुर्भुज नर होती ॥ १० ॥

ऐसें वचन सांगे हरी । ज्ञानदेवासी धरिलें करीं ।
निवृत्ति सोपान अंतरीं । ध्यान धरोनी राहिले ॥ ११ ॥

नामा म्हणे कोटि तीर्थांचें । तीर्थ वोळलें पैं साचें ।
पाप जाईल अनंत जन्मांचें । एक स्नान केलिया ॥ १२ ॥

[१००१]

मग अष्टदिशा व्यापुनी । तीर्थें राहिलीं स्थानीं स्थानीं ।
आळंकापुरीं पाटणीं । इंद्रायणीचां तटीं ॥ १ ॥

धन्य धन्य सृष्टीतळीं । आळंकापुरी महितळीं ।
कीर्तन करितां वैष्णव मेळीं । ते चतुर्भुज नर होती ॥ २ ॥

मग पुंडलिकासी सांगितलें । कृष्णपक्षीं येथें पाहिजे आलें ।
येरू म्हणे स्वामीनें सांगितलें । ते शिरसा वंदीन ॥ ३ ॥

देव म्हणे आम्ही तुम्ही । पंढरीहुनि समागमीं ।
येवों आळंकापुरा ग्रामीं । सकळ तीर्थीसहित ॥ ४ ॥

मग व्यास वाल्मिक बोलीविलें । त्यांसही हें तीर्थ सांगितलें ।
तें तिहीं शिवपीठ ऐसें म्हणितलें । जुनाट असे [2]केशवा ॥ ५ ॥

या शिवतीर्थाचा महिमा । कवणा वर्णवेल पुरुषोत्तमा ।
पंढरी पांडुरंग महात्मा । भीमातीरही उत्तम ॥ ६ ॥

आणिक आइकें वो सर्वोत्तमा । येथें अधिक अष्टतीर्थ [3]ग्रामा ।
पंचक्रोशीची उपमा । सिद्धि होती तात्काळ ॥ ७ ॥

ब्रह्मा विष्णु इंद्र तप । आणि योगेश्वर उमप ।
पाताळीं शेष समीप । याज खालता आहे ॥ ८ ॥

---

अभंग १००१—(धु.), (पा.), (तं.), (ह.) व (भा.)
१ स्नान (तं.) २ देश वो (भा.) ३ महिमा (आ.)

स्कंदासी उपदेश स्थान । लोहोगिरीसी येऊन ।
पुरूरवा पुण्य क्षेत्रमहिमान । पूर्वी येथुनि जालें ॥ ९॥

येथून भीमरथी नदी । भीमाशंकरा घेऊनि गेला नंदी ।
तेथुनि उगमीं पडली सर्वां आधीं । मग शंकरें तेथें स्नान केलें ॥ १० ॥

तें भीमा माहात्म्य प्रसिद्ध । तो हा सिद्धेश्वर अगाध ।
महा योगेश्वरा निजबोध । आळंकापुर पाटणीं ॥ ११ ॥

ऐसें व्यास बोले तये क्षणीं । नामा गेला लोटांगणीं ।
समाधी मूळपीठस्थानीं । आळंकापुरीं ज्ञानदेव ॥ १२ ॥

[ १००२ ]

मग व्यासपूजा सारिली । तैसीच वाल्मिकाची केली ।
वसिष्ठादिकीं अंगिकारिली । समस्त ऋषि पूजियले ॥ १ ॥

धन्य धन्य धरातळीं । येऊनियां देवीं सकळीं ।
माजीं सहित वनमाळी । आळंकापुरीं नगरीये ॥ २ ॥

मग माठी तीनशें गंगा । माजी शिव द्वादश लिंगा ।
अष्टोत्तर तीर्थं समर्थें पैं गा । तिहीं [1]स्तवन आरंभिलें ॥ ३ ॥

कोटी तीर्थांचा रहिवास । अष्टभैरव सावकास ।
वसू कोटि गणेश । साठीसहस्त्र गणासहित ॥ ४ ॥

ऐसे रहिवासले षण्मास । दिव्यद्रुमफळें प्रतिदिवस ।
दिव्य अन्नें सावकाश । अमृत भक्षिती देव ॥ ५ ॥

ऐसा सकळ तीर्थांचा मेळा । तयामाजीं परब्रह्म पुतळा ।
करी ज्ञानदेवाचा सोहळा । आळंकापुर नगरिये ॥ ६ ॥

गरूड हनुमंता ऐसे । पुढें कामारी हृषिकेशें ।
साक्षात वसिजे महेशें । गौरीसहित आळंकापुरीं ॥ ७ ॥

नंदि भृंगीं त्राहाटण । प्रतिदिनीं विभूतीचें उधळण ।
जयजय शंकर शिव पूर्ण । ऐशीं स्तोत्रें गाताती ॥ ८ ॥

महा सभास्थळ वैकुंठ । सभे श्रेष्ठ वैकुंठपीठ ।
आणि शिवमूर्ती घनदाट । नीळकंठ सभेसी ॥ ९ ॥

---

अभंग १००२—(पं.), (धु.), (पा.), (तं.), (ह.), (आ.) व (भा.)
१ तप (आ.), तपन (पं. व भा.), स्वपन (तं.)

रंभा उर्वशी नाचती । नारद तुंबर वीणे वाती ।
गणेश सारजा आळविती । सा राग एकवीस मूर्च्छना ॥ १० ॥

ऐसा रंग स्थिरावला । जयजयकारें घोष केला ।
तेणें चवकोनि उठला । पाताळींचा शेष ॥ ११ ॥

ऐकोनी विष्णुकीर्तन । तयासी आलें पैं स्फुंदन ।
मग उच्चारित रामकृष्ण । मृत्युलोकासि आला ॥ १२ ॥

सहस्र वदनें स्तुति करी । हर नमस्कारिले हरी ।
वाहुनि तुळसीमंजिरी । ज्ञानदेवा पूजियेलें ॥ १३ ॥

नामा म्हणे ज्ञानउदयो । ज्ञानदेवा भाग्याचा पहा हो ।
आपण येऊनि वैकुंठरावो । समाधि दिधली निजहस्तें ॥ १४ ॥

[१००३]

ऐसे स्वर्गवासी अमर । ते आपुलाले ठायीं स्थिर ।
राहोनि करिती जयजयकार । पुष्पवृष्टी ज्ञानदेवावरी ॥ १ ॥

धन्य धन्य तूं विष्णुभक्ता । ज्ञानदेवा तूं समर्था ।
म्हणौनि पडती पुष्पचळथा । ज्ञानदेवावरी ॥ २ ॥

अनंत तीर्थांचा मेळ । उदकें शिंपिती ब्रह्मगोळ ।
लोहगिरी सुवर्णाचळ । त्यावरी आळंकापुरी ॥ ३ ॥

म्हणती धन्य धन्य हे जन । जेथें जो करील कीर्तन ।
तया जोडे वैकुंठस्थान । चतुर्भुज होऊन जाईल ॥ ४ ॥

देव म्हणती इंद्रासी । तूं पूर्वीं येथेंच होतासी ।
आणि ब्रह्मा रूद्र तापसी । पूर्वापर हे पुरी असे ॥ ५ ॥

कृत त्रेत हे द्वापारादि । येथें सकळांची समाधी ।
धन्य ज्ञानदेव गोविंदीं । रतोनी येथें बैसले ॥ ६ ॥

इंद्र म्हणे विष्णुभक्त थोर । प्रत्यक्ष हेहि हरिहर ।
निवृत्ती सोपान ज्ञानेश्वर । हेंहि अवतार हरीचे ॥ ७ ॥

ऐसें सांगितलें समस्तां । मग विदित जालें उभयतां ।
शक्र जाहला निघता । ब्रह्मा आदि करूनी ॥ ८ ॥

शेषही पाताळासी गेला । पुंडरिक गोपाळ राहिला ।
आळंकापुरा स्थिरावला । सकळां भक्तां सहित ॥ ९ ॥

अभंग १००३—(धु.), (पा.), (है.), (तं.) व (ह.)

अनुक्रमणिका

सवें संतांचा मेळ । ऐसा राहिला गोपाळ ।
नामा म्हणे चक्रचाळ । पुढें कैसें वर्तलें ॥ १० ॥

[१००४]

गगनपंथें शुभ्र विमानें । देव लक्षिती अधोवदनें ।
तंव आळंकापुरीं कीर्तनें [1] टाळ मृदांग झणत्कारले ॥ १ ॥
जयजयकार क्षितीं होत । महादोषां संहार घात ।
नामा असे नाचत । पांडुरंगापुढें ॥ २ ॥
रामकृष्ण अवतार । चरित्र गाती सविस्तर ।
वैष्णवीं केला जयजयकार । पांडुरंग म्हणितलें ॥ ३ ॥
ज्ञानदेव बैसले समाधी । पुढें आजान वृक्ष निधी ।
वामभागीं पिंपळ क्षितीं । सुवर्णाचा शोभत ॥ ४ ॥
निवृत्ती सोपान खेचर । ज्ञानदेव मुक्ताई साचार ।
[1]हे उत्तर द्वारासमोर । बैसते जाले ॥ ५ ॥
देव म्हणे ज्ञानेश्वरा । चंद्र सूर्य जंव तारा ।
तुझी समाधि स्थिरा । राहो हे निरंतर ॥ ६ ॥
जंववरी हें क्षितिमंडळ । जंववरी हें समुद्रजल ।
मग कल्पक्षयी यथाकाळ । माझां हृदयीं ठसावें ॥ ७ ॥
आणिक एक सोपारें । ज्ञानदेव च्यार अक्षरें ।
जो जप करील निर्धारें । त्यासी ज्ञान होईल ॥ ८ ॥
ऐसा दिधला आशीर्वाद । मग संतासीं बोले गोविंद ।
ज्ञानदेवा ऐसा उद्‌बोध । दुजा न देखो [2]दृष्टीसी ॥ ९ ॥
ज्ञाना म्हणे स्वामी माझा । अंगिकार केला वोजा ।
पावला भक्तांचिया काजा । गरुडारूढ होऊनी ॥ १० ॥

[१००५]

ऐसे संतोषले देव । प्रसन्नरूपें माधव ।
मग बोलती ज्ञानदेव । विठ्ठलाप्रती ॥ १ ॥

अभंग १००४ व १००५—(पं.), (धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (भा.)
१ सन्मुख संत अपार। उत्तरद्वारें बैसले ॥ (तं.) २ सृष्टीसी (पं., ह. व भा.)

धन्य धन्य तूं विठ्ठला । धन्य धन्य प्रत्यक्ष देखिला ।
धन्य समारंभ येथिला । सोहळा करिसी भक्तांचा ॥ २ ॥

तुझेनि आम्ही धन्य । ये जगत्रयीं देवा मान्य ।
म्हणती भक्तांसमान । न देखों त्रिभुवनीं ॥ ३ ॥

तूं विश्वात्मा विश्वरूप । तूं जगाचें 'स्वरूप ।
तुज न लिंपे पुण्यपाप । सदा शुद्ध बुद्ध अससी ॥ ४ ॥

तूं आम्हां भक्तां सरिसा । सवें हिंडसी जगदीशा ।
तुजविण अष्टदिशा । मज शून्य वाटती ॥ ५ ॥

तरी तूं पाळिसी भक्त लळा । केला समाधीचा सोहळा ।
तो दाखविला मज डोळा । दिव्य दृष्टी देवोनी ॥ ६ ॥

तूं सत्वरजतमात्मक । तूं सकळ जीवांचा चालक ।
तूंचि त्रिमूर्ती अवघा एक । विराटस्वरूप सकळ ॥ ७ ॥

भक्तभाग्य भूमींतळीं । याकारणें तूं वनमाळी ।
दहा अवतार भूमंडळीं । नाना चरित्रें खेळसी ॥ ८ ॥

ऐसें महिमान अगाध । तें तुझें विश्वस्वरूप प्रसिद्ध ।
कोण भाग्याचा मी प्रबुद्ध । तो तूं मजकारणें आलासी ॥ ९ ॥

नामा म्हणे ज्ञानदेवें । ऐसी स्तुति केली स्वभावें ।
तंव कृपा करूनियां देवें । अभयकर दीधला ॥ १० ॥

[ १००६ ]

चतुर्भुज श्याममूर्ति । शंखचक्राची आकृती ।
पीतांबराची दिव्य दीप्ति । पडिली सृष्टीवरी ॥ १ ॥

धन्य धन्य ज्ञानदेव । धन्य धन्य तो माधव ।
मग आरंभिला अनुभव । ज्ञानदेवाचेनि मुखें ॥ २ ॥

देव म्हणे ज्ञानेश्वरा । तू अवतरौनि माजि चराचरा ।
हरिला महादोषथारा । तुझेनि कवित्वें ॥ ३ ॥

तुझें कवित्व माझ्या गोष्टी । जो परिसेल हे सृष्टी ।
तो येईल माझे भेटी । वैकुंठा पीठीं विष्णूच्या ॥ ४ ॥

---

अभंग १००६—(पं.), (धु.), (पा.), (तं.), (आ.), (भा.) व (ह.)
१ नांवरूप (पं., ह. व भा.)

अनुक्रमणिका

तुवां जो ग्रंथानुभव । 'गीतें 'सांगितला भाव ।
तें मुख्य ठेवणें राणीव । अनुभवीच जाणती ॥ ५ ॥

तैसाची अमृतानुभव । सिद्ध पीठ केलें भाव ।
दाउनी मनोहर राणीव । निज गुह्य आमुचें ॥ ६ ॥

वसिष्ठगीतेची टीका । भावार्थ काढिला श्लोका ।
ग्रंथ संचिला नेटका । करूनि रचना दाविली ॥ ७ ॥

तूं महाब्रह्मींचा अंश । पदपदांतरीं केला प्रवेश ।
दाऊनियां उदास विशेष । या जीवांसी तारिलें ॥ ८ ॥

तरी तूं आतां एक वेळ । माझी स्तुती करी निर्मळ ।
जेणें करूनि तरती सकळ । वक्ते श्रोते ग्रंथकार ॥ ९ ॥

नामा म्हणे परमानंद । पावोनियां उद्‍बोध ।
केला ज्ञानदेव सावध । स्तुती उपरती मांडिली ॥ १० ॥

[१००७]

ऐसें आळंकापुर पीठींचे । भक्त नांदती दैवाचे ।
जे कां सागर भाग्याचे । ज्ञानउदयो प्रकासिते ॥ १ ॥

मग षोडश उपचारीं । पूजा ज्ञानदेव आदरीं ।
दिव्यवाद्यें मंगळतुरीं । ओवाळिती पंचारतियां ॥ २ ॥

ज्ञान सोपान निवृत्ती । मुक्ताई प्रत्यक्ष ज्योती ।
ओंवाळिती विष्णूमूर्ती । चतुर्भुज पैं ॥ ३ ॥

पीतांबरधारी श्याममूर्ति । शंखचक्राची आकृती ।
उद्धव अक्रूर ढाळिती । चवरें वरी ॥ ४ ॥

प्रत्यक्ष लक्ष्मी आपण । दिव्य स्वरूप प्रसन्न वदन ।
माजी मिरवे दिव्य सिंहासन । त्यावरी आरूढली ॥ ५ ॥

पुढें गरूड जोडल्या करीं । उभा पक्षांचा फडत्कारी ।
सूर्य लोपे तेजाकारी । अमृतकरू नाम एक ॥ ६ ॥

गोपाळ देव्हडे उभे । मंजुळ पावे वेणुप्रभें ।
शुभकाळ सुप्रभें । माजी स्तुति मांडिली ज्ञानदेवें ॥ ७ ॥

नामा म्हणे ऐका । पुढें ग्रंथाची पीठिका ।
तो तारील सकळ लोकां । एक एक अक्षर आईकतां ॥ ८ ॥

---

अभंग १००७—(धु.), (पा.), (तं.) व (ह.)
१ गीतेचा (धु.), गीतेसी (आ.) २ दाविला (भा., ह., पं. व आ.)

अनुक्रमणिका

[१००८]

नमो काळकौतुहळ । नमो चक्रचालक गोपाळ ।
नमो विश्वप्रतिपाळ । प्रभंजन ॥ १ ॥

नमो शिव शिवेशा । नमो शिवादि विश्वेशा ।
नमो रूपा अष्टदिशा । व्यापका नारायणा ॥ २ ॥

नमो सकळ गर्भोद्भवा । नमो चित्तचाळक भावा ।
नमो विष्णुमूर्ती देवाधिदेवा । श्रीविठ्ठला ॥ ३ ॥

नमो भजनशीळ व्यापका । नमो ज्योतिर्लिंगदीपका ।
नमो नमो तुज एका । आत्मव्यापका जगद्‌गुरु ॥ ४ ॥

नमो श्रीये श्रीनिवासा । नमो आगमपरेशा ।
नमो ज्ञानगम्याधीशा । प्रतिकुळा ॥ ५ ॥

नमो स्वलीळा विनटा । नमोस्तु ते वैकुंठपीठा ।
नमो रूपादिश्रेष्ठा । वैकुंठीचिया ॥ ६ ॥

नमो दर्शनस्पर्शना । नमो उपरतिनिधाना ।
नमो तितीक्षा दारूणा । कमळालया ॥ ७ ॥

नमो [1]त्रिगंटी आदटा । नमो त्रिगुणा तूं उद्‌भटा ।
नमो सत्वरूप सदटा । ब्रह्मनामा ॥ ८ ॥

नमो [2]रजेश्वरा हरी । नमो विगळितसंहारी ।
नमो वाचा वक्ता करी । वाचाळ वाक्‌पुष्पीं ॥ ९ ॥

नमो तमहर्ताकर्ता । नमो सकळसंहर्ता ।
नमो [3]काळकौळु दाता । रक्षिता हरिभक्तां ॥ १० ॥

नमो हरिहरेश्वरा । नमो न देखों दुसरा ।
नमो वेदांत सागरा । सर्वेश्वरा तुज नमो ॥ ११ ॥

श्रुती निरामय नमो । नमो ज्ञानरूप गमो ।
नमो द्वैतनिरसनसमो । करीं तूं निजकरें ॥ १२ ॥

नमो व्यक्ताव्यक्त हरी । नमो मायासंहारकेसरी ।
नमो सर्वांच्या माजघरीं । नांदसी तूं आत्मारामा ॥ १३ ॥

---

अभंग १००८—(आ.), (पं.), (तं.) व (शि.)
१ त्रिघंटि (पं.) २ राजेश्वरा (तं.) ३ काळकवळ (तं. व शि.)

अनुक्रमणिका

[1]जीवशिव नमो तुज । ज्ञानविज्ञान तूं सहज ।
नमो सर्व जीवां बीज । तूंचि श्रीविठ्ठला ॥ १४ ॥

लीलेस्तव नटारंभ । नमो जगदादि अखिलस्तंभ ।
उभा राहोनी प्रतीभ । भीमातीरीं पंढरिये ॥ १५ ॥

नमो ऐशिया रूपेशा । नमो त्रैलोक्य विस्तारठसा ।
नमो आदि परेशा । जगदाधीशा युगादी ॥ १६ ॥

नमो पुरुषोत्तम परेशा । नमो सकळही उदासा ।
करूनि जीवरूपा ठसा । नांदसी तूं चराचरीं ॥ १७ ॥

मधुसूदना तुज नमो । मधुमाधवा हृदय रमो ।
नमो मधुर गीत समो । माजघरीं आत्मयाचिये ॥ १८ ॥

त्रिविधतिमिर नाशा । परम परमानंदा उल्हासा ।
नमो पुरविसी आशा । हरिभक्तांची श्रीहरी ॥ १९ ॥

नमो वासना चक्रचाळी । नमो तुंडवितंड गेली ।
नमो सर्वही हरली । प्रपंचरचना ॥ २० ॥

नमो श्रीधर श्रीकर । नमो सर्व संगीं निर्विकार ।
नमो विकृती विकार । हरिसी नामें एकें ॥ २१ ॥

नमो शांती दया क्षमा । नमो कृपाकर पुरुषोत्तमा ।
नमो कांसवदृष्टीसमा । निष्कलंक नाथा ॥ २२ ॥

नमो द्विविध छेदका । नमो एकार्णव पावका ।
नमो द्वादश अर्का । सुभाषका वेद वक्त्या ॥ २३ ॥

नमो चित्त चकोर हर्त्या । नमो सर्वकारण कार्यकर्त्या ।
नमो तुजवांचोनि सत्या । विबेक प्रत्यया पैं न ये ॥ २४ ॥

नमो अद्वैत अनंता । नमो निर्द्वंद्व भोक्ता ।
नमो नित्यानित्य सरता । तुज नमो नमो ॥ २५ ॥

नमो दुर्गतिहरणा । नमो सर्व हरण भरणा ।
नमो सर्व दृष्ट निवारणा । भय हरणा जगदीशा ॥ २६ ॥

नमो शिव शक्ति समलिंगा । नमो भक्षक काळवेगा ।
रुद्रादित्या वसु पैं गा । सम सर्वांगा परम परेशा ॥ २७ ॥

---

१ जीवशिव नमो तुज । नमो सर्व जीव बीज ॥
नमो तूंचि सहज । गरुडध्वजा श्री विठ्ठला ॥ (आ.)

अनुक्रमणिका

नमो कृत्रिम दहना । नमो कृश करण हरणा ।
नमो प्रतिपाळ करणा । नारायणा तुज नमो ॥ २८ ॥

नमो इंद्रिय नियंत्या । नमो प्रपंच अकृत्या ।
नमो दीनादित्या । सकळ वृद्धि तूंचि ॥ २९ ॥

नमो अवधूत दत्ता । नमो अपरमित मिता ।
नमो सर्वां वरिष्ठ सत्ता । तूं चाळिता हृषिकेशी ॥ ३० ॥

नमो दृष्ट दर्पादर्पा । नमो चमत्कार गंगा सर्पा ।
नमो नमो हरणं पापा । नमो स्वल्पा रामकृष्णा ॥ ३१ ॥

नमो चतुर वेद दीप्ता । नमो हरण करण तूं सुप्ता ।
जागृति स्वप्न गुप्ता । सत्य सुप्ता महाविष्णु ॥ ३२ ॥

नमो देवेश्वरा सूक्ता । महा मोहा हर्ता ।
मंद मंद नियंता । नमो नारायणा ॥ ३३ ॥

क्षीर नीर निर्झरा । नमो विद्वद अनुकारा ।
नमो विवेक सागरा । महानादा ॥ ३४ ॥

नमो मुखदंतसदना । नमो भक्षक भुवना ।
शुक्लांबरा शुक्लवर्णा । दयाघना गुणनिधी ॥ ३५ ॥

मृतामृत नमो नमो । नमो श्रुतिशास्त्र समों ।
नमो हा गर्व गमो । पद्मगर्भानंतानंता ॥ ३६ ॥

नमो चिदाकाशव्याप्ता । चित्सत्ता चळण सत्ता ।
चित्स्वरूपादिरूपा । भुवन दीपा महामूर्ती ॥ ३७ ॥

नमो एक एकार्णव । नमो कल्पादि गुण वैभव ।
नमो सकळ हे देव । हे भाव पैं तुझे ॥ ३८ ॥

गो गोपाळ नमो नमो । गोविंद गुणविष्णु धर्मो ।
नमो चित्त चिंतनीं रमो । सर्वकाळ तुझ्या चरणीं ॥ ३९ ॥

ध्वज वज्रांकुशा । ध्वजनीळ विकासा ।
ध्वजांबरा अष्ट दिशा । नीळिमा भासती शामांकिता ॥ ४० ॥

सुषुप्तीचे जें सत्य । तें नमो तुज कृत्य ।
असोस जे अमित्य । तें तें क्षमा करी स्वामी ॥ ४१ ॥

नमो निर्धार नियता । नमो सुखरूप दाता ।
नमो आलिया पदार्था । क्षमा करी स्वामी ॥ ४२ ॥

अनुक्रमणिका

नमो चित्त विश्रमा । नमोधार्य धैर्य नेमा ।
नमो पुराण पुरुषोत्तमा । पाहे कासव दृष्टी ॥ ४३ ॥

पसाय दाना नमो । परम परेशा समो ।
ध्यानांतर गमो । तुझ्या चरणीं केशवा ॥ ४४ ॥

आग्रह नियंत्या नमो । सुग्रह परी नमो ।
अनंता नित्य धर्मो । वैकुंठ गुण ग्राम नमो नमस्ते ॥ ४५ ॥

अनादृश दृश्यमाना । दृशादृश्य नित्यघना ।
सुखरूप जगजीवना । तुज नमो स्वामी ॥ ४६ ॥

दीप्तादीप्त अदृश्य । जीवन दिसती सादृश्य ।
जीवमय हें भाष्य । तुज नमो स्वामी ॥ ४७ ॥

परम पर ब्रह्मा । आदि ब्रह्मा तूं रामा ।
भक्तांलागीं साउमा । तुज नमो ॥ ४८ ॥

नमो नमो एक तत्वा । बाह्य मुद्रा शुद्ध सत्वा ।
योगा रूढ परतत्वां । सबाह्य पावसी तुज नमो ॥ ४९ ॥

वेदादि परम वक्ता । वेदादि तूंचि कर्ता ।
तुजवांचोनि सर्व सत्ता । नमो भोक्ता न देखों ॥ ५० ॥

ज्योतिर्मय रूप तुझें । सर्व तत्वां तूंचि बीज ।
नमो तुज सहज । पुढती पुढती नमो नमो ॥ ५१ ॥

परब्रह्म परात्पर । परम तत्व परम सार ।
परम गुह्य परम विचार । तुज नमो नारायणा ॥ ५२ ॥

दिघड बिघड सुघडा । जाडा जाड अवघड ।
द्वैता द्वैत जोडाजोड । कर्ता कार्यंता तुज नमो ॥ ५३ ॥

संख्या रहित जीवना । असंख्य जीव पाळणा ।
नमो तुज संजीवना । पुंडलिकधना पांडुरंगा ॥ ५४ ॥

निर्गुण सगुण रूपा । देवा देव तूं सोपा ।
तुझी जाहलिया कृपा । नमन बापा तुझ्या चरणीं ॥ ५५ ॥

नमो नमो तारका । तूं ब्रह्म नामा निशेखा ।
नमो तुजवांचोनि सखा । योगीयासी पैं नाहीं ॥ ५६ ॥

जुगादि जुगत्रय । जुग जोग योगमय ।
हे तुज पासाव होय । ऐसिया तुज नमो ॥ ५७ ॥

नमो नमो नम । नाहीं नाहीं तुजसी सम ।
ऐसा परापश्यंती नेम । वदलिया चारी ॥ ५८ ॥

चहूं मुक्ति परतत्वा । पंचभूजा शुद्ध सत्वा ।
षड् मार्ग गुण सत्वा । ग्रास न करिसी तुज नमो ॥ ५९ ॥

विद्वद चिद्विलासा । भानुबिंबा प्रति प्रकाशा ।
नेमो तेज तेजसा । आदिसूर्या ॥ ६० ॥

ऐसा चहूं ग्रंथाचा क्लेशु । वाउगाचि वाहे सोसू ।
त्रिमिर त्रिगुण असोसू । तो सत्वांशु तोडी माझा ॥ ६१ ॥

साहीं नाडी चक्र भ्रमें । वाहातां इंद्रियांची ग्रामें ।
ते अडखळोनि साउमे । नये ऐसें करीं नमो ॥ ६२ ॥

बाध्य बाधा कर्माची । सर्व सत्ता या भ्रमाची ।
नमनें करूनियां तुमची । तुम्हासी अर्पिलीं स्वामी ॥ ६३ ॥

यम धर्मांचिया सत्ता । कर्म धर्माचिया पंथा ।
कर्मधर्म विधाता । ऐसिया नेमिता तुज अर्पिला ॥ ६४ ॥

दश शम समान । इडा पिंगळा सुशुम्न ।
साही चक्रें दरूषन । तुह्मीं तुज अर्पिलीं ॥ ६५ ॥

मन पवन योग धारण । तूं यासी पैं कारण ।
समतुकें अवघे गुण । तुझ्या चरणीं निक्षेपिलें ॥ ६६ ॥

हें भूत भौतिक प्रचंड । जन्म उत्पत्तीचें अंड ।
जन्म जुगादि ब्रह्मांड । खंड विखंड तूं जाणता ॥ ६७ ॥

प्रचुर चर्या चित्ताची । धावन वळण अकोंचनाची ।
सूचना जे चमत्काराची । ते हि अर्पण तुज सदां ॥ ६८ ॥

निर्वासना वासना युक्त । गुंफले राहिले जेथें चित्त ।
तेथें तूं धावोनि अनंत । सोडविसी वासनामय ॥ ६९ ॥

सूक्ष्म अविचारा बोला । बोली नातुडे व्यर्थ गेला ।
तो म्यां बुझावोनि संबोखिला । मग लाविला तुझ्या पंथीं ॥ ७० ॥

नित्य धर्माचिया वोळी । चळल्या चुकल्या कोण चाळी ।
त्यासी वेद तुझा पाळी । त्या तूं सांभाळी परब्रह्म ॥ ७१ ॥

श्रृति स्मृतिची वचनें । याची अंगराग मार्गस्थानें ।
कीर्तनीं गुण वर्णनें । हे हि नारायणें अंगीकारावीं ॥ ७२ ॥

अनुक्रमणिका

उदंड विदंड वितंड । देह द्वयाचे अभंड ।
जे जे दिसे भ्रंश अंडांड । ते शुभ्र चंड सांभाळी ॥ ७३ ॥

देह भरणाची ममता । देह पोखिती जे सत्ता ।
त्याहि वरील सूक्ष्मता । ते कृपावंता सांभाळी ॥ ७४ ॥

त्रिमिर त्रिगुण अवघे । जें जें आलें असेल वोघें ।
तें तें मी नेघे । तें तूं सकळ वेगें सांभाळीं ॥ ७५ ॥

योनीचिया कष्टा । वरी वासना होती भ्रष्टा ।
त्या त्या करूनि प्रविष्टा । रत जालों तुझ्या चरणीं ॥ ७६ ॥

विद्या वयसा कुळ । ब्रह्म कर्म आचारशीळ ।
गेले आले विव्हळ । ते तूं दयाळ सांभाळी ॥ ७७ ॥

नाना जन्म अवतार । नाना शाखांचे निर्धार ।
नाना गोत्र उच्चार । तुझा विचार तूं जाणसी ॥ ७८ ॥

पाठ वेदादि वचनें । शास्त्रदृष्टी अवलोकनें ।
कीर्तनीं गुण वर्णनें । हें हि नारायणें अंगीकारावी ॥ ७९ ॥

सर्वमय सर्व सपाट । त्यावरी करूनि चालिलों वाट ।
चंद्र सूर्य नक्षत्रें घनदाट । करूनि एकवट पायरी ॥ ८० ॥

सर्व अंडांचे ब्रह्मांड । मी न म्हणे अंडांड ।
खंडें करूनियां विखंड । प्रचंड मी तुजसी बोलें ॥ ८१ ॥

रोमरंध्रीं ब्रह्मांडें । सकळ विराटमय खंडें ।
ऐसी महत्तू ब्रह्म प्रचंडें । तुझ्या अंगीं दातारा ॥ ८२ ॥

तूं विश्वरूपाची घडी । तारक ब्रह्मचि उघडी ।
मियां निज दृष्टीनें चोखडी । तुझी मूर्ति न्याहाळिली ॥ ८३ ॥

तें न सुटे निजकळे । येऱ्हवी हें ना कळे ।
तुझ्या कृपागुणें आकळे । तुझिया दासा निज भक्तां ॥ ८४ ॥

अनंत या नामाचा संकेत । मन मुरालें जेथें निर्धूत ।
तूंपणें परमाद्भुत । परमानंदा ॥ ८५ ॥

गुणाग्र गोसावी राम । गुण समुद्र गुण ग्राम ।
सकळ भूतांचा विश्राम । तुज नमो ॥ ८६ ॥

नमन केलिया विभूतीं । चित्त रमलें जाली विश्रांती ।
तुज देखिलिया श्रीपती । न राहे चित्तीं तळमळ ॥ ८७ ॥

नमन हेंचि थोर दिसे । एऱ्हवीं तरंगाकार भासे ।
देखिलें तितुकें नासे । नैश्वर्य ऐसें श्रुति बोले ॥ ८८ ॥

नमन हेंचि परम । नमन हेंचि सुधर्म ।
नमन हेंचि आत्माराम । करूं निघाली ॥ ८९ ॥

नमन हाचि अनुभव । नमन हाचि मुख्य भाव ।
नमन हाचि पैं देव । देवाधिदेव तूं पावसी ॥ ९० ॥

नमन हेंचि श्रेष्ठ पीठा । नेतसे तुझिया वाटा ।
तुज ऐसा श्रेष्ठा । मग वाटा काय कराव्या ॥ ९१ ॥

नमन हेंचि तारक । नमन हाचि विवेक ।
नमनेंविण त्रैलोक्य । आडमार्गीं रिघताती ॥ ९२ ॥

नमन लटिकें नव्हे नव्हे । नमन भलतियासी न साहे ।
जें साह्य सखा होय । श्री निवृत्ती ॥ ९३ ॥

नमन एवढा मंत्र । नाहीं नाही धुंडितां शास्त्र ।
विचार लक्षण पात्र । तोचि जाणे येथींचे ॥ ९४ ॥

नमन करी ब्रह्मा श्रेष्ठा । नाभीकमळीं धरी वैकुंठा ।
नमन करी नीळकंठा । तीर्थें मस्तकीं वंदिती ॥ ९५ ॥

इंद्र चंद्र महेंद्र थोर । नमनेंविण नैश्वर ।
अंडामध्यें चराचरा । नमनेंविण न तरती ॥ ९६ ॥

श्री गुरु कृपा जें होय । तें नमनाची ऐसी सोय ।
पाऊनि सुगम उपाय । नमो नमस्ते तुज ॥ ९७ ॥

नमस्ते नमस्ते नमस्ते । पुढतीं पुढतीं नमस्ते ।
समाधिसुख आस्ते । नमो नमन करितां ॥ ९८ ॥

नमो नमो आदि पीठा । शिवादिक वरिष्ठा ।
येथें येऊनि वैकुंठा । समाधि शेज घातली ॥ ९९ ॥

महाविष्णू तूं योगरूपा । महारूपाचिया स्वरूपा ।
महादित्या अमूपा । कोटी सूर्य तेजसा ॥ १०० ॥

शंखचक्रानें मंडित । करकमळ तुझे मिरवत ।
पदक हृदयावरी शोभत । आणि श्रीवत्सलांछन ॥ १०१ ॥

अनंत बाहूंचा मेळ । तो तूं चतुर्भुज गोपाळ ।
मुगुट विराजित तेजाळ । कोटी सूर्याहूनि प्रभा ॥ १०२ ॥

अनुक्रमणिका

पितांबर माळ कंठीं । सर्वांगीं चंदनाची उटी ।
हिरे माणिक कटीतटीं । अनेक कीळा फाकती ॥ १०३ ॥

क्षुद्रघंटिकाचिया वोळी । घणघणाट तया तळीं ।
देहुडा पाऊलीं निश्चळीं । वेणु वाजविसी सुस्वरें ॥ १०४ ॥

रुणुझुणु रुणुझुणु । ऐसा वाजविसी वेणू ।
सुंदर तूं श्यामतनु । अळंकापुरीं उभा असती ॥ १०५ ॥

सभोंवते गोपाळ तुझे । ते अंतरंग पैं सखे माझे ।
पुंडलिक तरि सहजे । प्राण सखा पैं माझा ॥ १०६ ॥

ऐसा ज्ञान उद्‌बोध बोले । ज्ञानांजन निरसलें ।
विज्ञानहि हारविलें । दृश्य द्रष्टेंपणेसी ॥ १०७ ॥

बापरखुमादेवीवरू । समाधि देऊनियां स्थिरू ।
वरी ठेवोनियां अभय करू । वर देऊनि राहिला ॥ १०८ ॥

[ १००९ ]

ऐसी स्तुति नमनाची । केलिया भगवंताची ।
ऐकतां जाली रुची । म्हणे धन्य धन्य रे सख्या ॥ १ ॥

कैसी स्तुति परिकर । जपतां नामावळी साचार ।
वेगीं तुष्टले हरिहर । निज ब्रह्म स्वरूप ॥ २ ॥

वैष्णव सभोंवते उभे । तिहीं जयजयकार प्रतिभे ।
करूनि रुक्मिणीवल्लभे । तया प्रसाद दिधला ॥ ३ ॥

मागुता ज्ञानदेव वदे । धन्य धन्य तुझीं चरणारविंदें ।
तेथें रातलिया योगिवृंदें । ते चरण धन्य धन्य ॥ ४ ॥[1]

पुंडलिकें स्तवन । मांडावें तंव नारायण ।
म्हणे सन्मुख उभा सोपान । यासी समाधि देणें लागेल ॥ ५ ॥

निवृत्ती मुक्ताई दोघें । तीं बुझाविलीं पांडुरंगें ।
उद्धव अक्रुर वेगें । तया संगें निरविलीं ॥ ६ ॥[2]

---

अभंग १००९—(धु.), (पा.), (तं.), (ह.) व (शि.)

१ हा वेगळा चरण (ह.) मध्ये क्रमांक ३ आहे—
मागुता ज्ञानदेव बोले । म्हणे धन्य धन्य तुझी पाऊलें ।
जेथें योगेश्वर रातले । तुझे चरण धन्य धन्य ॥ ४ ॥ (आ.)

२ या अभंगाची पहिली सहा कडवी (शि.) व (गों.) प्रतींत नाहीत. येथे अभंगाचा आरंभ सातव्या चरणापासून होतो.

ज्ञानदेवासी उद्धव । बोले एकांतीचा भाव ।
तुम्हां तुष्टला देवाधिदेव । धन्य धन्य वैष्णव तुम्ही ॥ ७ ॥
ज्ञानदेव म्हणे स्वामी । दीनें रंकें विठोबाचे आम्ही ।
धन्य धन्य भाग्याचे तुम्ही । जे निरंतर विष्णुसंगें ॥ ८ ॥
उद्धव म्हणे ज्ञानेश्वरा । आम्ही जाणो कृष्णावतारा ।
परि पांडुरंग मूर्ति निर्धारा । तूं आणि पुंडलिक जाणसी ॥ ९ ॥
नामा म्हणे ज्ञानदेवें । मागुतें स्तवन आरंभिलें भावें ।
तें ऐकावया देवें । एकचित्त केलें ॥ १० ॥

[१०१०]

कर जोडोनियां पुढें । लोटांगण टाकिलें गाढें ।
म्हणे स्तवन करावया मी वेडें । काय जाणे तुझा महिमा ॥ १ ॥
तरी पांडुरंगा तूं दयाळु । भक्त भाविकां कृपाळु ।
भीमातटीं उभा गोपाळु । पुंडलिकाकारणें ॥ २ ॥
चंद्रभागा सरोवरीं । निरे भिवरेचां तिरीं ।
वाट पाहसी हरी । भक्तसाह्या कारणें ॥ ३ ॥
तरी उदार [1]शूर महिमेचा । खुंटलिया चारी वाचा ।
तेथ पवाडु मज कैंचा । वर्णावया सामर्थ्य ॥ ४ ॥
शेषा ऐसा स्तुती करी । तया नाकळसीच श्रीहरि ।
जिव्हा चिरलिया भग्नधारी । मग मौन्येंचि राहिला ॥ ५ ॥
तो तूं अळंकापुरीं येसी । मज दीना [2]समोखिसि ।
देव म्हणे तूं होसि । साक्षात ज्ञानरूप ॥ ६ ॥
ज्ञानदेवो साक्षात नाम तुझें । तें ज्ञान हृदयीचें माझें ।
हे जन तारावया काजें । तुवां अवतार घेतला ॥ ७ ॥
नामा म्हणे देव हरी । पुढतोपुढतीं साहाकारी ।
वर देऊनि अंगिकारी । आपणची जाला ॥ ८ ॥

[१०११]

तव अंतरिक्षीं गगनीं । देव बैसोनि विमानीं ।
[3]वर्षताती दिव्य सुमनीं । पांडुरंगावरी ॥ १ ॥

अभंग १०१०—(धु.), (पा.), (है.), (तं.), (ह.) व (बा.), १०११—(तं.), (शि.), (आ.), (धु.), (पा.), (है.) व (ह.)

१ धीर (ह व बा.) २ समाधि देसी (आ.) ३ वर्षाव करिती (गों. व आ.)

अनुक्रमणिका

विठोबा गुणनिधी । सवें पुंडलिक सुबुद्धि ।
लधिमा आणिमादी सिद्धी । सवें असती ॥ २ ॥

मग नेमिलिया तिथी । कृष्णपक्ष अष्टमी समर्थी ।
[1]नाम संकीर्तन संतसंगतीं । तो ब्रह्मप्राप्ति पावला ॥ ३ ॥

[2]नवमीं गजर कथेचा । तरि बैष्णव तोचि साचा ।
चतुर्भुज होईल हे वाचा । वदोनियां गेले ॥ ४ ॥

सहज ते दशमी । दिंडी जागरण आश्रमीं ।
तो येईल वैकुंठ ग्रामीं । कीर्तन करीतची ॥ ५ ॥

एकादशी श्रेष्ठ गाढी । नामस्मरणें कोटीयाग जोडी ।
येकी घडी युगाएवढी । एवढें सामर्थ्य इयेचें ॥ ६ ॥

एकादशी दिननिशीं । जागरणी हृषिकेशी ।
कीर्तन करी अहर्निशीं । तरि तो तारिल सर्व जनां ॥ ७ ॥

[3]द्वादशीस क्षीराब्दी । कीर्तन करील आल्हादीं ।
तो पावन होईल गोविंदीं । निजपदीं विष्णूचा ॥ ८ ॥

त्रयोदशीं उत्तम थोर । करिल दिंडी पताका गजर ।
टाळ मृदुंगे झणत्कार । तरि तो सकळ कुळ तारील ॥ ९ ॥

नामा म्हणे चतुर्दशीं । अमावास्येचा दिवशीं ।
ज्ञानदेवीं राहेल नेमेंसी । तरी तो तरेल भूतकाळीं ॥ १० ॥

---

१ कीर्तन केलिया यथार्थी । ब्रह्मलोक पाविजे । (ह.)
२ नवमी गजर हरिनामाचा । तोचि वैष्णव कायामनवाचा ।
तो प्रत्यक्ष विष्णूरूप साचा । सत्य त्रिवाचा बोलिले ॥ ४ ॥
जोडे जया वद्य दशमी । स्नान विष्णूपूजन स्वधर्मी ।
तो सत्वर पावेल निजधामीं । नाम संभ्रमी नाचत ॥ ५ ॥
व्रत एकादशीं श्रेष्ठ गाढीं । कीर्तन श्रवणीं कोटी याग जोडी ।
एक एक घडी कल्पाएवढीं । भूषण प्रौढी कीर्तीची ॥ ६ ॥ (तं., शि. व आ.)
३ (आ.) प्रतीत खालील चरण आढळतात—
द्वादशी पारणें क्षीराब्धि । हरिकीर्तनीं परमानंदी ।
तो पद पावला अनादि । ज्ञानदेवी विष्णूच्या ॥ ८ ॥
वद्य त्रयोदशीं महाथोर गजर । कुंचे गरुडटके दिंडी संभार ।
वाजविती टाळ मृदंग झणत्कार । हरीनामें अपार उद्धरिले ॥ ९ ॥
नामा म्हणे वद्य चतुर्दशी । पुढती अमावास्येचे दिवशीं ।
ज्ञानदेवा जो दृढ धरी मानसीं । तो कृत निश्चयें तरलासे ॥ १० ॥

अनुक्रमणिका

[१०१२]

ऐसें वदोनि पांडुरंगें । समस्तांसी वस्त्रें दिलीं अंगें ।
देऊनि भूषणें अनेगें । रत्नमुक्ताफळें अलंकार ॥ १ ॥
धन्य जन्मले भूमंडळीं । कीर्तनीं नाचती गदारोळी ।
ते विष्णुसन्निध सर्वकाळीं । ऐसें वनमाळी बोलिले ॥ २ ॥
राही रुक्मिणी सत्यभामा । विचारिती पुरुषोत्तमा ।
बहुत अगाध येथिंचा महिमा । भूमीवरी वैकुंठ ॥ ३ ॥
म्हणे विठोजी जंववरी धरा । तंववरि समाधि स्थिरा ।
हरिकीर्तन करिती सैरा । चतुर्भुज होईल ॥ ४ ॥
हें शिवपीठ शिवाचें । हेंचि पूर्वस्थान अगस्तीचें ।
जाणोनि जन्म जाले चौघांचे । सर्व क्षेत्रांची आदिभूमि ॥ ५ ॥
पूर्वापार युगायुगीं । अनेक पुण्यें घडले यागीं ।
तपें तपिन्नलें महायोगी । तो हा आळंकापुरीं ठावो ॥ ६ ॥
येथें रामकृष्ण कथा । जो करील सर्वथा ।
तो पुढें पवेल व्यथा । भवबंधापासुनी सुटेल ॥ ७ ॥
सप्तद्वीप नवखंड । आणि अवघें गणितां ब्रह्मांड ।
त्याहूनि हें हो उदंड । पुण्य जोडेल नामें ॥ ८ ॥
ऐसें उत्तमोत्तम थोर । सकळ जीवांचें माहेर ।
नाम घेतां तरती चराचर । दिला वर रुक्मिणीवरें ॥ ९ ॥
नामा म्हणे देवराव । महिमा सांगतसे भाव ।
धन्य आळंकापुरी गांव । आदि ठाव वरिष्ठ ॥ १० ॥

[१०१३]

नित्य अनुष्टान ये तीर्थी । त्याचे पूर्वज उद्धरिती ।
जे कां अन्नदान करिती । ते पावती [1]वैकुंठीं ॥ १ ॥
ऐसें तीर्थक्षेत्र [2]सर्वोत्तम । आणिक नाहीं यासी सम ।
शिवपीठ हें मनोरम । आळंकापुरीं हें देख ॥ २ ॥

---

अभंग १०१२—(आ.), १०१३—(घु.), (पा.), (हे.) व (आ.)
१ वैकुंठराज्य (घु. व पा.) २ उत्तमोत्तम (पा.)

अनुक्रमणिका

[1]न वर्णवे येथिंची थोरी । जेथें साक्षात श्रीहरि ।
येऊनियां झडकरी । ज्ञानदेवा समाधि दिधली ॥ ३ ॥

अनंत पुण्य ज्याचें गांठीं । तरीच ज्ञानदेव पडे दिठी ।
[2]जोडे तप कोटयानुकोटी । ऐसे धूर्जटी बोलिले ॥ ४ ॥

सिद्ध साधकाचें स्थळ । सर्व तीर्थाचें हेंचि मूळ ।
वास केलिया सर्वकाळ । तरि महादोष हरतील ॥ ५ ॥

अजान वृक्षातळीं हरिकथा । नित्य जो नर करी तत्वतां ।
तो न जाय यमपंथा । ऐसें जगन्नाथ बोलिले ॥ ६ ॥

द्वारीं सुवर्णाचा अश्वत्थ । नित्य पूजलिया स्वस्थ ।
लक्ष्मी न सांडी तया सत्य । सकळ आर्ती पूर्ण होती ॥ ७ ॥

नित्य प्रदक्षिणा सप्त । तरी अगाध पुण्य त्वरित ।
पूर्वज वैकुंठासी जात । बेचाळिसां सहित ॥ ८ ॥

नित्य विष्णूचें पूजन । नित्य नाम संकीर्तन ।
नित्य वैष्णव संत भोजन । धन्य पावन इहलोकीं ॥ ९ ॥

नामा म्हणे आळंकापूर । सर्व क्षेत्रामाजीं मनोहर ।
पवित्रासी परम परिकर । त्रिभुवनीं दुर्लभ ॥ १० ॥

[१०१४]

ऐसें तीर्थ सर्वोत्तम । सांगतसे पुरुषोत्तम ।
शंकरादि परमधाम । ब्रह्मनाम वर्णित ॥ १ ॥
क्षेत्रमहिमा अति अद्‌भुत । आदि सिद्धेश्वर कुळदैवत ।
समर्थ महाभागवत । नामें गर्जत सर्वकाळ ॥ २ ॥
म्हणे पुंडलिक पूर्वीचें स्थळ । आणि शिवाचें मूळपीठ निर्मळ ।
तेथें निर्विकल्प सोज्वळ । तप विशाळ जोडिले ॥ ३ ॥
क्षेत्र पंढरीहुनी अधिक । ऐसें बोलती ब्रह्मादिक ।
म्हणती धन्य येथिंचे लोक । शुद्ध भाविक प्रेमळ ॥ ४ ॥
घडे महाविष्णूचें पूजन । तीर्थ व्रत संध्यास्नान ।
वाचे हरिनाम कीर्तन । श्रवणीं गुण विष्णुचे ॥ ५ ॥

---

अभंग १०१४—(शि.), (तं.) व (ह.)

१ न वर्णवे येथींची थोरी । साक्षात येऊनि श्रीहरि ।
ज्ञानदेवा गजरीं । समाधि दिधली सुखरूप ॥ ३ ॥ (आ.)

२ हें अगाध पुण्य धुरजेठी । बोलोनि गेले ॥ ४ ॥ (पा.)

विठोजी म्हणे ऐक भक्ता । तपोनिधी महंत तूं सर्वथा ।
ज्ञानदेवासारिखा वक्ता । मज आवडता न दिसे ॥ ६ ॥

तुम्ही दोघे असा या सृष्टीं । जग उद्धारीं पाटोवाटीं ।
कीर्तन करितां उठाउठी । तो वैकुंठीं पावावें ॥ ७ ॥

पुंडलिकें नमस्कारिले हरी । चरणरज वंदिले शिरीं ।
म्हणे मी भाग्याचा उजरी । तूं कैवारी आमुचा ॥ ८ ॥

नामा म्हणे देवभक्त । एक होऊनि समस्त ।
निवृत्तिराज स्तुति बोलत । प्रेम अद्‌भुत दाटलें ॥ ९ ॥

[१०१५]

परब्रह्म परममूर्ती । परमधाम परात्पर कीर्ति ।
परमप्रियो परंज्योती । श्रुतिस्मृति स्वानुभव ॥ १ ॥

अकळ विकळ निरंजन । ज्ञाताज्ञेय विवेकधन ।
संशय दृश्य निरसन । विश्वप्रिये ॥ २ ॥

नलिनीकमलविकाशा । नयनधन विश्वेशा ।
नमन चरणलेशा । चित्सुखा ॥ ३ ॥

चराचर सच्चिदानंदांग । शुद्धस्नान शंकर दिव्यांग ।
विष्णुमूर्ति पांडुरंग । सगुणरूप भीमातटीं ॥ ४ ॥

सजळ जळदघना । दशन कोटी सूर्यकिरणा ।
मुक्ताहार जडित रत्ना । किरिटी मुगुट विराजित ॥ ५ ॥

नीलोत्पल नीलवर्णा । श्यामसुंदरा मूर्तिघना ।
स्तवितां सहस्रवदना । नकळे पार तुझा ॥ ६ ॥

रजतमाचे मेहुडे । पाहतां तूं न सांपडे ।
नाहीं तुझिया पडिपाडें । भूमंडळीं दैवत ॥ ७ ॥

अनंत ब्रह्मांडधीशा । गुण न वर्णवे परेशा ।
तुंवा ज्ञानदेव सर्वेशा । अपणामाजीं सामावला ॥ ८ ॥

निवृत्ती म्हणे आम्ही दीनें । तारावीं तुम्ही नारायणें ।
मग काय आदरिलें सोपानें । तेथवरी येणें घडेल ॥ ९ ॥

ऐसी निवृत्तिदेवाची स्तुती । ऐकुनियां श्रीपती ।
नामा म्हणे देव तयाप्रती । बोलते जाले ॥ १० ॥

---

अभंग १०१५—(धु.) व (ह.)

नारायणें स्तुति परिसिली । ऐकुनियां अव्यक्त बोली ।
म्हणे तुवां गीतेची टीका केली । ते प्रमाण आम्हासी ॥ ११ ॥

नामा म्हणे हरी देवें । जाणोनियां अंतर्भावें ।
तुष्टले गुणगौरवें । निवृत्तीसी दिधलें ॥ १२ ॥

[१०१६]

म्हणे विठोजी शंकराचा । प्रत्यक्ष अवतार तुझा साचा ।
स्तुति केली असे वाचा । विस्मयाचा पूर मज ॥ १ ॥

वसति सप्तद्वीप नवखंड । त्यामाजीं अनंत ब्रह्मांड ।
रोमरंध्रीं ज्या अखंड । तो मनुष्यरूपें मेदिनी ॥ २ ॥

निवृत्तिनाथ नाना अवतारीं । तुमच्या सेवेसीं श्रीहरी ।
जें जें प्रेरसी कामारी । सांगितलें करी उगाचि ॥ ३ ॥

म्हणे देवाधिदेवा आतां । सांगाल तें करूं तत्वतां ।
हरूं भवार्णवाची चिंता । या त्रैलोक्याची ॥ ४ ॥

तंव निवृत्तीनें लोटांगण । म्हणे नाहीं तुज समान ।
आम्हांकारणें नारायण । साहाकारी होसी ॥ ५ ॥

आमुचा तपें समर्थें । तुवां सिद्धी पाववली जगन्नाथें ।
सरते करूनियां आम्हांते । विष्णुमार्गें लाविलें ॥ ६ ॥

देव म्हणे तूं आधीं । विष्णुमार्गीची सकळ सिद्धी ।
जाणतां तूं एकत्र शुद्धी । निवृत्ती होसी ॥ ७ ॥

नामा म्हणे ऐसे लळे । पाळिले तयाचे गोपाळें ।
देऊनियां समाधिसोहळे । विष्णुधर्म प्रतिष्ठिला ॥ ८ ॥

[१०१७]

ऐसा निवृत्ती स्थिरावला । महाविष्णु संतोषला ।
मग सोपानदेवें आरंभिला । स्तुतिवाद परियेसा ॥ १ ॥

जयजया तूं रामकृष्णा । भक्तभाविकां हरी तृष्णा ।
देहीं दीपक सहिष्णा । रामकृष्ण म्हणतांचि ॥ २ ॥

नरहरि नरकेसरी । टाळी वाउनियां गजरीं ।
टाळ मृदंग झणत्कारी । जयजय कृष्ण म्हणों आम्हीं ॥ ३ ॥

अभंग १०१६—(ह.), १०१७—(धु.), (पा.), (तं.) व (ह.)

अनुक्रमणिका

एक हरिविण नाहीं सखा । त्रिभुवनीं आत्मा देखा ।
समाधिसुखविशेखा । चरणरजें डौरवावें ॥ ४॥

धन्य हे भूमिका देश । आपण हरि जगन्निवास ।
ज्ञानदेवीं केला वास । समाधिसुख घेउनी ॥ ५ ॥

निवृत्ती ऐसा श्रेष्ठ गुरू । तोहि समाधीसी होय स्थिरू ।
तरि पुढें काय करणें विचारू । तो सांगावा स्वामिया ॥ ६ ॥

देव म्हणे ब्रह्मावतारा । या अवधिया चराचरा ।
श्रेष्ठ तूंचि निर्धारा । मनुष्यरूपें अवतरलासी ॥ ७ ॥

सकळ हे तुझे व्यापक । चराचर हें त्रैलोक्य ।
अधर्म जालिया चाळक । अवतार घेती तिघे ॥ ८ ॥

ऐसें बोले पांडुरंग । सोपान निवाला सर्वांग ।
म्हणे सांकडें फेडितां श्रीरंग । तूंचि श्री विठ्ठला ॥ ९ ॥

नामा म्हणे सोपानदेवें । मागुती स्तुति आदरिली भावें ।
जेणें करूनियां बरवें । समाधिसेजेची ॥ १० ॥

[१०१८]

मुक्ताई म्हणे देवा । तूं विसावा सर्वां [१]जीवां ।
गुण गौरवा अनुभवा । आम्ही जाणों तुज ॥ १ ॥

सत्य सत्य जनार्दना । सत्य सत्य नारायणा ।
सत्य सत्य तूं आमुचें धना । जगज्जीवन [२]जगदाकारा ॥ २ ॥

तुझेवांचोनि त्रिभुवनीं । दुजा न देखों नायकों कानीं ।
वेदशास्त्रपुराणीं । अगाध महिमा तुझा ॥ ३ ॥

तूं देवा देवोत्तम । योगियांचा विश्राम ।
शिवाचा ही आत्माराम । ऐसा नेम वेदाचा ॥ ४ ॥

तरी भक्तांलागीं ऐसा । पावसी तूं हृषिकेशा ।
तुजविण नाहीं [३]भरंवसा । आणिकां [४]देवांचा ॥ ५ ॥

तूं परत्रीचें तारू । तुझा आगम निगम विचारू ।
तुज चिंतलिया संसारू । निरसे हेंचि सत्य ॥ ६ ॥

---

अभंग १०१८—(पं.), (तं.), (धु.), (पा.), (हृ.) व (आ.)

१ जीवशीवा (तं. व आ.) २ जनार्दना-नारायणा-धना-जगदाकारा (तं. व पं.) ३ कोंवसा (आ.) ४ ऐसा निश्चयो साचा (पं., तं. व पा.)

अनुक्रमणिका

देव म्हणे मुक्ताबाई । चित्त समरसें जें माझ्या ठायीं ।
तें तया जन्मचि नाहीं । हें सत्य जाणावें ॥ ७ ॥

नामा म्हणे ऐसी स्तुति । मुक्ताबाई जंव करिती ।
तंव संत विनविती । महाविष्णूसी ॥ ८ ॥

[१०१९]

तंव पुंडलिक पुढारला । कर जोडोनि वदला ।
म्हणे वेदादिकां अबोला । तुझिया रूपाचा ॥ १ ॥

तो तूं प्रकट श्रीरंगा । भीमातटीं पांडुरंगा ।
येउनि आमुचिया लोभा । भक्तजनां तारिसी ॥ २ ॥

नेणों कोण भक्तपण । नेणों तुमचें महिमान ।
कोण तप कोण साधन । कोणें जन्मीं केलें होतें ॥ ३ ॥

नीरे भिवरेचां संगमीं । चंद्रभागेचां उगमीं ।
वेणुनाद परब्रह्मीं । गोपाळ गजरें गर्जती ॥ ४ ॥

तरी स्वामी दयाळा । महाविष्णू गोपाळा ।
भक्तालागीं [1]कृपाळा । तारावया दासांसी ॥ ५ ॥

माझें करूनियां मिस । राहिलासे युगीं अठ्ठावीस ।
धरूनि सगुण गुणास । माझे भक्ति लोधलासी ॥ ६ ॥

तूं नियंता ईश्वरमूर्ति । सकळ गोसावी श्रीपती ।
तुजवांचोनी नेणें मती । दयामूर्ति परब्रह्मा ॥ ७ ॥

नामा म्हणे पुंडलिका । देवें म्हणती पुण्यश्लोका ।
स्तुति आदर केला निका । धैर्य विवेक तूंचि होसी ॥ ८ ॥

[१०२०]

मग सारोनी संध्यास्नान । देवभक्ति विष्णुपूजन ।
पंक्ति आदरिलें आपोशन । मागुती भोजन करिताती ॥ १ ॥

धन्य धन्य तूं ज्ञानराजा । तूं आवडलासि केशिराजा ।
पंक्ति करोनि द्विजा । वाढितसे रुक्मिणी ॥ २ ॥

---

अभंग १०१९—(पं.), (घु.), (पा.), (तं.), (ह.) व (शि.), १०२०—(आ.)
१ स्नेहाळा (ह.)

राही रुक्मिणी सत्यभामा । वाढिती पंचामृत उत्तमा ।
पुंडलिक बोलावुनि साउमा । ज्ञानदेवा पंक्ति बैसविलें ॥ ३ ॥
निवृत्ती सोपान मुक्ताबाई । गोपाळ देव्हढे दोन्हीं बाहीं ।
रुक्मिणी सत्यभामा राही । वाढिती अन्नें नानाविधें ॥ ४ ॥
वैष्णव प्रेमळाचे पंक्तीं । प्रार्थना करितसे श्रीपति ।
सोपान ज्ञानदेव निवृत्ती । एकवट बैसविले ॥ ५ ॥
गरुड तिष्ठत होता द्वारीं । त्यासी रुक्मिणी ताट करी ।
मग गर्जिन्नले जैजैकारीं । गोविंद श्रीराम उच्चारें ॥ ६ ॥
देव आकाशीं पाहाती । ब्रह्मादिक वंचलों म्हणती ।
भाग्य केवढें यांचें क्षितीं । या भक्तजनांचें ॥ ७ ॥
नामा म्हणे आळंकापुर । धन्य धन्य मनोहर ।
आपण येउनि सारंगधर । समाधि देती ज्ञानदेवा ॥ ८ ॥

[१०२१]

तंव विनवी ज्ञानदेव । सकळांचा जाणोनी ठाव ।
शुद्ध भक्ति प्रेमळ वैष्णव । सर्वभाव सख्य घेतां ॥ १ ॥
बैसोनियां एक आसनीं । देवभक्त चक्रपाणि ।
तांबुल घेवोनियां वदनीं । सुखसंतोषें बोलती ॥ २ ॥
मग पाचारिला गरूड । भक्त पुंडलिक प्रौढ ।
भक्त सोपान गम्यगूढ । जाणते भक्त ॥ ३ ॥
केलें प्रयाणासि मुहूर्त । पंढरीस जावयाचें आर्त ।
संवत्सरा जाऊनि त्वरित । समाधी देऊं सोपाना ॥ ४ ॥
ऐसा निर्धार करूनि । समस्तां भोजनें सारूनि ।
सिद्ध जाली माता रुक्मिणी । दिन अस्तमाना गेला ॥ ५ ॥
जावोनी तया पुष्पकावरी । शयन आरंभिलें हरी ।
नारद तुंबर वैकुंठांभीतरीं । मंजुळ सुस्वरीं गातसे ॥ ६ ॥
भक्त भागवत भाग्याचे । तीहीं जयजयकार केला वाचे ।
ऐसें चतुर पाहार निशींचे । जागरण हरीचें क्रमिलें ॥ ७ ॥
नामा म्हणे निघतां हरी । ज्ञानदेवो प्रार्थना करी ।
[1]देवा तूंचि वैकुंठहरी । आमचा हृदयस्थु ॥ ८ ॥

अभंग १०२१—(धु.) व (पा.)
१ देवा तूंचि निरंतरीं । रहावें हृदयीं आमुच्या ॥ (आ.)

[१०२२]

उगवला दिन प्रभात । स्नान संध्या सारोनी समस्त ।
उद्धव कर जोडोनी बोलत । पूर्ण आर्त सर्वांचें ॥ १ ॥
अनूपम इचा महिमा । न बोलवे जाहली सीमा ।
आतां चला वेगीं पुरुषोत्तमा । आपले आश्रमा पंढरीसी ॥ २ ॥
गरूड सामोरा तिष्टत । भक्त भागवत समस्त ।
मुनी पुंडलिक विनवित । केलें दंडवत साष्टांगें ॥ ३ ॥
म्हणे ज्ञानदेव यजुर्वेदि । वागृस्नेहो वाक्बुद्धी ।
[1]परंपरा याचि वैखरी । यासी मंत्रोक्त दिधली ॥ ४॥
ऐसाचि सोपान मार्ग । तूंचि करितां पांडुरंग ।
ग्राम लेखनाचा प्रसंग । निरोपिला सांग कुळयाती ॥ ५ ॥
सकळवंश परंपरा । न सोडावें तुम्ही आचारा ।
आम्ही जातों पंढरपुरा । या विठोबा सांगातें ॥ ६ ॥
सकळां आलिंगन दिधलें । मग गरुडावरी आरूढले ।
ज्ञानदेवांनीं हरीचीं पाऊलें । दृढ धरिलीं निरंतर ॥ ७ ॥
नामा नाचे हरिद्वारीं । आनंद जाला आळंकापुरीं ।
विठ्ठल देवो निघाले पंढरीं । ज्ञानदेवा समाधि देवोनि ॥ ८ ॥

[१०२३]

नामयाचा धरूनि हात । क्षणक्षणा पंढरिनाथ ।
ज्ञानदेवातें आठवित । कंठ सद्‌गदित करूनियां ॥ १ ॥
उद्धवासी म्हणे पांडुरंग । या सज्जनाचा न व्हावा वियोग ।
हें हृदय होतसे दोन भाग । जाणा अंतरंग तुम्ही माझें ॥ २ ॥
त्याविण गोड मज न वाटे । ऐसे जिवलग कैचे भेटे ।
जे म्नींचा वियोग दुःख तुटे । समाधान वाटे हृदयामाजीं ॥ ३ ॥
ज्ञानदेवा ऐसो निधान । नाहीं धुंडितां त्रिभुवन ।
न संपडे न देखो जाण । तुझी आण उद्धवा ॥ ४ ॥
धन्य धन्य हे तिघेजण । मुक्ताई मुक्तरूपें पूर्ण ।
हीं उद्धरिलें त्रिभुवन । भवदुःख दारुण नासीलें ॥ ५ ॥

---

अभंग १०२२—(पं.), (धु.), (पा.) व (तं.), १०२३—(ह.) व (बा.)
१ परापश्यंती मध्यमा वैखरी । समाधी त्या मंत्रोदकें दिधली ॥ (आ.)

याचे निपडी पाडे । उपमेसी दीसे थोडे ।
परी ज्ञानदेवा ऐसें रत्न जोडे । हें न घडे कल्पांतीं ॥ ६ ॥
माझे जिवींचें गुह्यगुज । हें उद्धवा सांगितलें तुज ।
कां नामदेव जाणे सहज । आणि सकळ संत सज्जन ॥ ७ ॥
गुज सांगे रुक्मिणीसी । घडी घडी हृषिकेशी ।
तंव रुक्मिणीही मानसीं । या जीवलागासी आठवि ॥ ८ ॥
ज्ञानदेव तरी तुमचा अंश । केवळ स्वयंप्रकाश ।
स्वात्मसुख निजरहिवास । स्वानंद असे उद्‍बोध ॥ ९ ॥
निवृत्ति तुम्हां नाहीं भिन्नता । त्याचा आत्मा तुम्ही हो आनेला ।
शिव विष्णु आइक्यता । असे स्वभावता मुळींच ॥ १० ॥
सोपान तरि पोटींचा । तो प्राण असे तुमचा ।
तेथें शब्द [1]भिन्नपणाचा । कोठें [2]मिरवेल ॥ ११ ॥
संतभक्त सकळ मिळोनि । मस्तक ठेवला श्रीचरणीं ।
तंव बोले रुक्मिणी । तुम्हापासुनि दुरी नाहींत ॥ १२ ॥
नामयानें धरूनि चरण । [3]साष्टांगीं करूनि नमन ।
म्हणे तूं सर्वांचें स्वानंद जीवन । मी दीन काय बोलों ॥ १३ ॥

[ १०२४ ]

भगवंत म्हणे नामयासी । हें यथार्थ तूं बोलसी ।
परी क्षणक्षणा गुण आठवती मानसीं । या ज्ञानदेवाचे ॥ १ ॥
[4]भक्त ज्ञानि आणि वैरागी । ज्ञानदेवा ऐसा चहुंयुगीं ।
ना शको न देखो याची लागीं । खंती वाटे बहुत ॥ २ ॥
उद्धवें चरणावरी ठेउनि माथा । कांहीं एक विनंति जगन्नाथा ।
ते सांगाजी कृपावंता । गुज अंतरीचें स्वामी ॥ ३ ॥
निवृत्ति ज्ञान सोपानासि । हे बैसविले जी समाधीसी ।
मुक्ताईची स्थिती कैसी । तें हृषिकेशी सांगावें ॥ ४ ॥
मग देव म्हणे तूं काय नेणसी । जरी प्रीतीनें आम्हां पुससी ।
तरी आइकें गा च्छिती ऐसी । उघडचि बोलों ॥ ५ ॥

अभंग १०२४—(धु.), (पा.), (तं.) व (ह.)
१ भिन्नतेचा (बा.) २ मिरवला, मिरवैल (बा.) ३ साष्टांग पडिला दंडायमान । (ह.), साष्टांग घालोनि लोटांगण। (बा.) ४ भले ज्ञानी (ह.)

अनुक्रमणिका

तरी नाथाचा हात ईचा शिरीं । यालागीं ते सत्यसनातन अवधारी ।
महाकल्पाचा अवश्वरीं । हे सोडील देह ॥ ६ ॥

तंववरी तिचें शरीर । अभंग चिरकाळ निरंतर ।
महद्माया योगिणी साचार । मुक्ताबाई उद्धवा ॥ ७ ॥

देवगण बैसोनि विमाना । गेले आपुलिया भवना ।
सकळ महामुनि स्थाना । हरिचरणा वंदोनि ॥ ८ ॥

म्हणती ज्ञानदेवाच्या प्रसादें । देखिली विठ्ठल चरणारविंदें ।
रूप पाहातां डोळचां दोंदें । निघति स्वानंद सुखाचीं ॥ ९ ॥

तरी ज्ञानदेव हा पांयाळ जाण । निवृत्तिदेव तोचि अंजन ।
सोपान तो नयन । तेथिचे सुखप्राप्ती ॥ १० ॥

ऐसें करूनि साधन । साधिलें श्रीविठ्ठल निधान ।
तेथिचे विभागीं ज्याचें भाग्य पूर्ण । तींही प्रत्यक्ष देखिलें ॥ ११ ॥

या निधानासी कुरवंडी । मुक्ताबाई देह भावाची सांडी ।
मग उभविली गुढी । आनंदाची सर्वकाळ ॥ १२ ॥

नामा म्हणे पंढरीसी । चालिले हृषिकेशी ।
भक्ताचि मांदी देवासरीसी । नाम घोष गर्जत चालिले ॥ १३ ॥

[ १०२५ ]

ऐसियांचें चरित्र जो आवडी आईके । तो या भक्ताबरोबरी तुके ।
भोगी वैकुंठींचीं निजसुखें । बोलिले मुखें श्रीविठ्ठल ॥ १ ॥

धन्य धन्य ते भक्त । ज्या कारणें श्री भगवंत ।
ऐसे पवाडे करित । विश्व उद्धरी तेणें करूनि ॥ २ ॥

जे भाग्याचे होति । त्यासिच हे होय प्राप्ती ।
ते मागुते न येति पुनरावृत्ती । गर्भवासा ॥ ३ ॥

नामा म्हणे नामस्मरण । तुटति प्रपंचधरण बंधन ।
सुख पावती निदान । समचरण देखलिया ॥ ४ ॥

अभंग १०२५—(धु.), (पा.), (तं.) व (ह.)

• • •

अनुक्रमणिका

[ १०२६ ]

मंगळमूर्ति सुखधामा । भक्तांचिया कल्पद्रुमा ।
निवृत्तीचिया पुरुषोत्तमा । नमो तुज ॥ १ ॥

विद्यासागरा वैरागरा । संकटीं माउली ज्ञानेश्वरा ।
भरित दाटलें अंबरा । तो तूं योगेश्वरा मोक्षदायी ॥ २ ॥

मति चालविली रसाळ । संत श्रोतियां केला सुकाळ ।
दिधलें पुरुषार्थाचें बळ । तें तूं केवळ संजीवन ॥ ३ ॥

अमृतानुभव आनंदलहरी । ग्रंथ सिद्ध केला ज्ञानेश्वरी ।
संस्कृत प्राकृत वैखरी । वदविली माझी ॥ ४ ॥

आतां मोक्षाचिया वाटा । पाहिला षड्चक्र चोहटा ।
आज्ञा द्यावी वैकुंठा । ज्ञानदेव म्हणे ॥ ५ ॥

[ १०२७ ]

आतां पदपदांतराची सेवा । संपादिली स्वामी केशवा ।
धन्य आमुचिया दैवा । जोडिलां तुम्ही ॥ १ ॥

आत्मविद्या बोलावया कारणें । सुख पावले श्रोते सज्जन ।
आतां जें आरंभिलें मनें । तें आपण सिद्धि न्यावें ॥ २ ॥

भूवैकुंठ एक पंढरी । त्याहूनि आगळी आळंकापुरी ।
सिद्धेश्वरा शेजारीं । इंद्रायणी ॥ ३ ॥

त्रिपुटी पश्चिम मोक्षाची वाट । प्रत्यक्ष कैलास सिद्धपेठ ।
गोपाळपुरीं केली गोष्ट । चौघीजणी ॥ ४ ॥

नलगे कलियुगींचा वारा । जें जें बोलिलों जगदोद्धारा ।
मागितला थारा । पदीं तुझ्या ॥ ५ ॥

आतां वैराग्याचें बळ । सिद्धि प्राप्तीचें फळ ।
ज्ञानदेवें घेतली आळ । जाणा स्थळ आवडीचें ॥ ६ ॥

[ १०२८ ]

अष्टोत्तरशें तीर्थें सारीं । ओघें आलीं आळंकापुरीं ।
वाद्यें वाजताती गजरीं । कीर्तन लहरी अमृताची ॥ १ ॥

अभंग १०२६ ते १०२८—(आ)



अनुक्रमणिका

जैसा कस्तुरीचा सुगंधु । अनुभवी न म्हणतीच बद्धु ।
तैसा औटपिठाचा नादु । आठवी गोविंदु आवडीनें ॥ २ ॥

बौद्ध अवतार चक्रपाणि । सत्रावी कळा माय रुक्मिणी ।
जाणत असे अंतःकरणीं । भक्त इच्छा ॥ ३ ॥

भावें विठ्ठलें केली गोष्टी । ज्ञानदेवें अपूर्व इच्छिलें पोटीं ।
जावें उठाउठीं । समुदायेंसी ॥ ४ ॥

[१०२९]

विठ्ठल रुक्मिणीसहित गरुड हनुमंत । आणिक संत महंत जमा जाले ॥ १ ॥
परिसा भागवत् नामा पुंडलिक । पताकासहित उठावले ॥ २ ॥
गंधर्व आणि देव आले सुरगण । चाललीं विमानें आळंकापुरीं ॥ ३ ॥
लहान थोर सारे आले ऋषीश्वर । उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा दिसती तांतडी । जाती मज घडी युगा ऐसी ॥ ५ ॥

[१०३०]

पंढरीचा पोहा आला आळंकापुरीं । पंच कोसावरी साधुजन ॥ १ ॥
पांडुरंगा संगें वैष्णवांचे भार । दिंड्या ते बाहेर निघाल्यासे ॥ २ ॥
पताकांचे भार निघाले बाहेर । भेटती ऋषीश्वर पांडुरंगा ॥ ३ ॥
अवघिया भेटी जाल्या त्या बाहेरी । मग आळंकापुरीं येते जाले ॥ ४ ॥
सोपानानें मग केला नमस्कार । उतरिले पार पांडुरंगा ॥ ५ ॥

[१०३१]

हरिहरविधाता आले आळंकापुरीं । इंद्रायणी तीरीं एक थाटी ॥ १ ॥
योगियांचा सखा कोठें ज्ञानेश्वर । जाती ऋषीश्वर भेटावया ॥ २ ॥
शून्याचिया पोटीं निरंजन गुंफा । ज्ञानयज्ञ सोपा सिद्ध केला ॥ ३ ॥
उन्मनीं निद्रा लागलीसे फार । स्वरूपीं ज्ञानेश्वर जागा जाला ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा भली केली बुद्धी । लागली समाधि ज्ञानदेवा ॥ ५ ॥

अभंग १०२९ व १०३०—(आ.), १०३१—(पं.)

[१०३२]
लागली उन्मनी वैराग्याची धुणी । जागा निरंजनीं निरंतर ॥ १ ॥
भूचरी खेचरी चाचरीच्या छंदें । अगोचरीच्या नादें सहस्र दळीं ॥ २ ॥
औटहातध्वनी चित्तवृत्ती जेथें । उजळली ज्योत [1]चैतन्याची ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा करा सावधान । नाहीं देहभान ज्ञानदेवा ॥ ४ ॥

[१०३३]
धन्य इंद्रायणी पिंपळाचा पार । धन्य ज्ञानेश्वर पुण्यभूमी ॥ १ ॥
धन्य भागिरथी मनकर्णिका बोधा । आणिक हो गंगा त्रिवेणी त्या ॥ २ ॥
धन्य ऋषीश्वर धन्य पांडुरंग । मिळाले ते सांग आळंकापुरीं ॥ ३ ॥
नामा म्हणे धन्य भाग्याचे हे संत । जाला पहा एकांत ज्ञानोबाचा ॥ ४ ॥

[१०३४]
अल्याड पल्याड पताकांचे भार । मध्यें मनोहर इंद्रायणी ॥ १ ॥
पिवळ्या पारव्या आणिक हिरव्या । नीळवर्ण साऱ्या लखलखित ॥ २ ॥
जरी जर्तारी जाल्या रानभरी । विजा त्यावरी खेळताती ॥ ३ ॥
सर्पाकार दंड तारांगणावाणी । पताका तिकोनी दाटताती ॥ ४ ॥
नामा म्हणे तेथें पताकांचे भार । केव्हडें भाग्य थोर ज्ञानोबाचें ॥ ५ ॥

[१०३५]
कैलासाचा वास अधिक सिद्धबेट । विष्णूचें वैकुंठ पुरातन ॥ १ ॥
भूमीवरी पंढरी तैसी आळंकापुरी । पंच कोशावरी पुण्यभूमी ॥ २ ॥
सुखाची हे मूर्ति नीलकंठलिंग । चक्रतीर्थ सांग मोक्ष भेटे ॥ ३ ॥
परमार्थ सुअर्थ देखतांची संत । सांगितली मात अनुभवाची ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा हें स्थळ चांगलें । चित्त मन रंगलें ज्ञानोबाचें ॥ ५ ॥

[१०३६]
पुसताती संत सांगा देवा मातें । पूर्वी येथें होतें कोण क्षेत्र ॥ १ ॥
देव म्हणे स्थळ सिद्ध हें अनादि । येथेंच समाधि ज्ञानदेवा ॥ २ ॥

अभंग १०३२—(धु.) व (आ.), १०३३ ते १०३६—(आ.)
१ तन्मयाची (आ.), चिन्मयाची (बा.)

अष्टोत्तरशें वेळां साधिली समाधी । ऐसें हें अनादि ठाव असे ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा सांगितलें उत्तम । ज्ञानअंजन सुगम देखों डोळां ॥ ४ ॥

[१०३७]

स्वानंदें देवभक्तां भेटी । वोरसोनि कंठीं आलिंगावें ॥ १ ॥
देव म्हणे भले आठवलें तुज । ते हे संधी मज कळली असे ॥ २ ॥
पदपदांतरें केला मार्ग सोपा । त्यांत माझी कृपा वोळली असे ॥ ३ ॥
देव म्हणे तुझी पुरवीन आळी । सुखी [1]सही मंडळी वैष्णवांची ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा आज्ञा देगा यासी । नेणूं काय आम्हांसी आरंभिलें ॥ ५ ॥

[१०३८]

उदित जालें मन आतां काय अनुमान । करी शीघ्र प्रस्थान आज्ञा माझी ॥ १ ॥
देवाचा हो कर धरोनी ज्ञानेश्वर । निघाला बाहेर योगिराज ॥ २ ॥
मागें पुढें संत चालिले मिरवित । कौतुक पहात इहलोकीं ॥ ३ ॥
नारा विठा गोंदा माहादा विरक्त । परसा भागवत उभें तेथें ॥ ४ ॥
समुदाय वैष्णव मिळालासे भारी । महोत्सव गजरीं आरंभिला ॥ ५ ॥
नामा म्हणे गुज दाविलें श्रीहरी । धन्य आळंकापुरीं पुण्यभूमी ॥ ६ ॥

[१०३९]

सारासार विचार करिती अवघे जन । हे ज्ञान अंजन दाविलें डोळां ॥ १ ॥
पाहिलें गे माय अंतरीचें सुख । वैकुंठनायक उभा असे ॥ २ ॥
ज्ञानदेवायोगें सकळांशी दर्शन । परब्रह्म निधान डुल्लतसे ॥ ३ ॥
वोसंडले देव पाहोनियां प्रेम । डुल्लती सप्रेम अनुभवें ॥ ४ ॥
अवघे जन कोडें घालिती सांकडें । सांगावे निवाडे नामयाचे ॥ ५ ॥
देव म्हणे नामा विचारिलें आम्हां । ते कां संधी तुम्हां कळली नसे ॥ ६ ॥

---

अभंग १०३७—(बा.), १०३८ व १०३९—(आ.)
१ राही (बा.)

अनुक्रमणिका

[१०४०]

देव म्हणे नामया ब्रह्मक्षेत्र आदी । येथेंचि समाधि ज्ञानदेवा ॥ १ ॥
चौयुगां आदिस्थळ पुरातन । गेले तें नेमून मुनिजन ॥ २ ॥
चालिले सकळ जाले ते विकळ । अनादि हें स्थळ ज्ञानदेवा ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां सांगितलें हरी । दीर्घध्वनि करी बोसंडोनी ॥ ४ ॥

[१०४१]

खेद दुःख करी मनाचा कळवळा । प्रेमाश्रु डोळां दाटताती ॥ १ ॥
नारा विठा गोंदा पाठविला महादा । साहित्या गोविंदा सांगितलें ॥ २ ॥
काय काय आणूं सांगा हें प्रमाण । नेमियेला नेम पांडुरंगें ॥ ३ ॥
तुळसी आणि बेल दर्भ आणि फुलें । उदक हें चांगलें भागिरथीचें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा साहित्य करितां । आठवितें चित्ता खेद दुःख ॥ ५ ॥

[१०४२]

साडेतीन पाउलें टाकिलीं निश्चळ । नेमियेलें स्थळ उत्तरायणीं ॥ १ ॥
देव म्हणे ज्ञाना होई सावधान । माग वरदान मज कांहीं ॥ २ ॥
ज्ञानदेव म्हणे शुद्ध कार्तिक मासीं । व्रत एकादशी स्वामीकडे ॥ ३ ॥
कृष्णपक्षीं व्रत हरिदिन परिपूर्ण । मागितला मान ज्ञानदेवें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा आवडीनें देतां । जोडलें हें संतां पियुष जें ॥ ५ ॥

[१०४३]

वोसंडोनी हरि आनंदला तेथें । पुण्य हें अगणित सांगितलें ॥ १ ॥
सर्वांगालागीं न्याहाळिलें परिपूर्ण । केलें निंबलोण आवडीनें ॥ २ ॥
आळंकापुरीं कोणी करील कीर्तन । तयालागीं येणें वैकुंठीचें ॥ ३ ॥
अस्ति नास्ति उदकीं करिल ब्रह्मरूप । कोटी कुळांसहित उद्धरीन ॥ ४ ॥
जेथें ज्ञानदेव तेथें मी निशिदिनीं । येथें सुखें ज्ञानी डुल्लताती ॥ ५ ॥
नामा म्हणे आतां बोसंडले हरी । जडमूढावरी कृपा केली ॥ ६ ॥

---

अभंग १०४०--(पं.), (शि.), (ह.), (पा.), (भा.) व (न.), १०४१ ते १०४३--(आ.)

अनुक्रमणिका

[१०४४]

वन वृक्ष वल्ली ईश्वरासमान । ऋषि मुनिजन राहाती जेथें ॥ १ ॥
होऊनियां पक्षी कपोद कोकिळा । वेष्टियेलें स्थळा ब्रह्मबोधें ॥ २ ॥
मृत्तिका पाषाण पंचक्रोशीचे खडे । जाले पहा धडफुडे ब्रह्मरूप ॥ ३ ॥
पंचमहापातकी गेले आळंकापुरीं । न चाले त्याजवरी काळ यम ॥ ४ ॥
सांगताती देव ऐकती रुक्मिणी । नामा म्हणे चक्रपाणि वर दिला ॥ ५ ॥

[१०४५]

चक्रतीर्थीं पाहा उभा तो गोपाळ । पुढें विणे टाळ वाजताती ॥ १ ॥
स्वर्गींहुनि पुष्पें वर्षती सुरवर । उभे ऋषीश्वर समुदायेंसी ॥ २ ॥
आणिक वाद्यें तेथें वाजती अपार । जाती ज्ञानेश्वर समाधीसी ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा चुकों नेदी संधी । पोंहोचवितां सिद्धि बाळकासी ॥ ४ ॥

[१०४६]

कोण जाणे माझे जीवींचा कळवळा । प्रेमाश्रु डोळां लोटताती ॥ १ ॥
अवधियांचे मन दूषित तटस्थ । लहान थोर संत वोसंडती ॥ २ ॥
तारियेले जड बा माझ्या कीर्तनीं । आठवती मनीं गुण तुझे ॥ ३ ॥
नामा म्हणे येथें बोलवेना मज । जातसे निजगुज आवडीचें ॥ ४ ॥

[१०४७]

काय सांगों देवा ज्ञानोबाची ख्याती । वेद म्हैशामुखीं वदविले ॥ १ ॥
कोठवरी वानूं याची स्वरूप स्थिती । चालविली भिंती मृत्तिकेची ॥ २ ॥
अविद्या मायेचा लागों नेदी वारा । ऐसें जगदोद्धारा बोलविलें ॥ ३ ॥
नामा म्हणे यांनीं तारिले पतित । भक्ति केली ख्यात ज्ञानदेवें ॥ ४ ॥

[१०४८]

अनुभव हा सागर गुह्य आणि ब्रह्म । उघडे अध्यात्म बोलियेलें ॥ १ ॥
प्रगट हें गुह्य उकलिलें गाबाळ । केलें करतळमळ ज्ञानयानें ॥ २ ॥

---

अभंग १०४४ ते १०४६—(आ.), १०४७—(पं.), १०४८—(आ.)

अनुक्रमणिका

कोणाची कल्पना नुरेचि बा येथें । उघडा गुह्यार्थ सिद्ध केला ॥ ३ ॥
करणें न करणें सांगितला पंथ । तिहीं लोकीं कीर्त वाढविली ॥ ४ ॥
ज्ञान हें अंजन साधी संजीवनी । नामा म्हणे यांनीं ख्याती केली ॥ ५ ॥

[१०४९]

अहंकार पोटींचे उतरिले जहर । केला उपकार जगामाजीं ॥ १ ॥
कामक्रोध उतें उतरिले दंभ । करपले कोंभ संशयाचे ॥ २ ॥
विकल्पाचे पायीं घातियेली बेडी । केली ताडातोडी इंद्रियांची ॥ ३ ॥
स्वर्गादिक सुखें कमाविलीं रोकडीं । वैकुंठासी शिडी लावियेली ॥ ४ ॥
नामा म्हणे धन्य उभारिल्या ध्वजा । घातियेल्या शेजा सुखधामीं ॥ ५ ॥

[१०५०]

कासाविस प्राण मन तळमळी । जैसी कां मासोळी जीवनाविण ॥ १ ॥
दाही दिशा वोस वाटती उदास । करिताती सोस मनामाजीं ॥ २ ॥
घातियेली वोण प्राण आला कंठीं । ज्ञानदेवासाठीं तळमळी ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा वाटतसे खंती । चालली विभूति योगियाची ॥ ४ ॥

[१०५१]

नानापरी मन आवरितां भारी । कांहीं केल्या हरि विसर न पडे ॥ १ ॥
दृश्यादृश्याच्या दूर केल्या गोष्टी । उघडिली दृष्टि ज्ञानदेवें ॥ २ ॥
गीतेवरी टीका ग्रंथ केला सार । केवळ ईश्वर ज्ञानाचा हा ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां देहासी विटला । स्वरूपीं पालटला ज्ञानदेव ॥ ४ ॥

[१०५२]

गंध आणि अक्षता पंचामृत उदक । धूप आणि दीप आणियेले ॥ १ ॥
संत सज्जनांचा मिळाला समुदावो । मध्यें ज्ञानदेवो चालतसे ॥ २ ॥
क्षेत्र प्रदक्षणा करावया उद्देशी । मुहूर्त देवापाशीं विचारिला ॥ ३ ॥
दशमीचे दिवशी रिघावें बाहेर । हरिदिनीं जागर निशिदिनीं ॥ ४ ॥

---

अभंग १०४९ ते १०५२—(आ.)—

अनुक्रमणिका

द्वादशी पारणें सोडावें निश्चळ । नेमियेलें स्थळ सिद्धेश्वरीं ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि नेमिला सिद्धांत । काय माझा अंत पाहातसां ॥ ६ ॥

[१०५३]

ज्ञानेश्वरापाशीं आनंदी आनंद । नाचतो गोविंद कीर्तनासी ॥ १ ॥
दशमीच्या दिवशीं महोत्सव आळंकापुरीं । करितसे हरि आवडीनें ॥ २ ॥
हरिदिनीं जागरण होत सारी रात्र । बसोनि पंढरिनाथ स्वयें अंगें ॥ ३ ॥
द्वादशी पुण्यतिथी केली ज्ञानेश्वरा । पांच दिवस सारा महोत्सव ॥ ४ ॥
अमावास्ये दिवशीं केला गोपाळकाला । मग वैष्णवाला लाभ मोठा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा आनंद आळंकापुरीं । कांहीं दिवस हरि राहा येथें ॥ ६ ॥

[१०५४]

विनविति संत आणिक सज्जन । नव्हे समाधान कांहीं केल्या ॥ १ ॥
नानाचि प्रकार करितसे घोर । कांहीं केल्या स्थिर चित्त नव्हे ॥ २ ॥
काय पाहावें याला विरक्त पुरुषाला । स्वरूपीं मिळाला ज्ञानदेव ॥ ३ ॥
नामा म्हणे यांचें उचंबळलें प्रेम । म्हणोनि परब्रह्म मागें पुढें ॥ ४ ॥

[१०५५]

निवृत्ति सोपान आणिक मुक्ताई । जाताती पाहीं कोणीकडे ॥ १ ॥
देवासी गुह्यार्थ केला पां एकांत । ज्ञानदेवें हित आरंभिलें ॥ २ ॥
नामा म्हणे अवघे बसा एकीकडे । ऐकों द्या निवाडे गुज याचें. ॥ ३ ॥

[१०५६]

निवृत्ती सोपान मुक्ताई धाकुटी । धरियेली कंठीं पांडुरंगें ॥ १ ॥
कळवळिली मनीं करिती दीर्घ ध्वनी । आठविती मनीं ज्ञानदेव ॥ २ ॥
विकळ जालें चित्त संत हे दुश्चित । नामा विकळ तेथ होत असे ॥ ३ ॥

[१०५७]

तिघांजणांलागीं केलें समाधान । सांगितली खूण अंतरींची ॥ १ ॥
कलियुगीं जग आत्याती करिती । साहवेना कीं यासी कांहीं केल्या ॥ २ ॥

अभंग १०५३ व १०५४—(आ.), १०५५—(पं.) व (शि.), १०५६ व १०५७—(आ.)

अनुक्रमणिका

पापी उद्धरिले पतित तारिले । जड पावविले मोक्षपंथीं ॥ ३ ॥
नामा म्हणे याचें करितां समाधान । कळलें अंतःकरण मन यांचें ॥ ४ ॥

[१०५८]

निसंगासी संग न लगे आणिकाचा । परमार्थ हा साचा गहन केला ॥ १ ॥
जड या जीवाचें हरविलें अज्ञान । नेले उतरून भवसिंधु ॥ २ ॥
ज्ञानियासि केली सिंधुसंजीवनी । जालें जनीं वनीं एक तारूं ॥ ३ ॥
नामा म्हणे सत्य बा माझ्याचें बोलणें । करी निंबलोण पदीं त्यांचें ॥ ४ ॥

[१०५९]

फार आठवतें निवृत्तीचे चित्तीं । सोपान स्फुंदती मुक्ताबाई ॥ १ ॥
आम्हां माता पिता नित्य ज्ञानेश्वर । नाहीं आतां थार विश्रांतीसी ॥ २ ॥
छळिलें ब्राह्मणें प्रतिष्ठानीं जातां । रेड्यामुखीं वेदांता बोलविलें ॥ ३ ॥
आला चांगदेव व्याघ्र वहान घेऊन । नेला अभिमान ज्ञानदेवें ॥ ४ ॥
नाना प्रकारचे आठविती शब्द । नामा म्हणे बोध भाविकाला ॥ ५ ॥

[१०६०]

देव म्हणे असे आठवाल फार । लागे उशीर समाधीसी ॥ १ ॥
रुक्माबाई म्हणे याजलागीं जाण । ब्रह्मीं ब्रह्म खूण मेळविली ॥ २ ॥
अवतार हे चौघे जाले कैशापरी । सांगा आम्हां हरी उकलोनी ॥ ३ ॥
शिव तो निवृत्ती सोपान ब्रह्मस्थिती । ज्ञानदेव मूर्ति विष्णूची हो ॥ ४ ॥
ब्रह्मणी हे कळा माय मुक्ताबाई । विचारूनि पाही स्वयं मुक्ता ॥ ५ ॥
नामा म्हणे याला नाही पां उपाधी । पूर्ण हे समाधि ज्ञानदेवा ॥ ६ ॥

[१०६१]

अंतर बाहेर कळलें स्वरूप । स्वयें नंदादीप उजळिला ॥ १ ॥
येणें जाणें कोठें योगी पहा अवीट । सान वैकुंठ करूनि ठेवी ॥ २ ॥

अभंग १०५८ व १०५९—(आ.), १०६०—(पं.), (शि.) व (न.), १०६१—(पं.) व (आ.)

अनुक्रमणिका

ज्ञानियाला मरण म्हणती अज्ञान । वायां तुम्ही शीण करूं नका ॥ ३ ॥
घटाचिया योगें प्रतिबिंब भासे । काय म्हणे नासे निरालंब ॥ ४ ॥
दर्पणाचे योगें दुसरें देखणें । काय मुखें दोन त्यांसी जालीं ॥ ५ ॥
दृश्याचियामुळें जीव दिसे येथें । काय पा परमार्थे विटंबले ॥ ६ ॥
तंतूचियामुळें पटाला विस्तार । काय निराकार वायां गेलें ॥ ७ ॥
रुक्मादेवीवरें केलें समाधान । [1]नामा म्हणे मौन धरूनि ठेले ॥ ८ ॥

[ १०६२ ]

छत्र चामरें उभा सन्मुख भोंवती । रुक्माईचा पति मध्यभागीं ॥ १ ॥
निंबें आणि नारळ गोण्याचीं पोफळें । उदंड तिहीं केळें आणियलीं ॥ २ ॥
आणिक बहुता परी घेतली सामुग्री । पीत पीतांबरी मृगछाला ॥ ३ ॥
भगवीं आभरणें घेतलें भस्म । अंगें परब्रह्म साह्य त्यासी ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी तिष्ठताती अंगें । मेळविली सांगें साहित्यासी ॥ ५ ॥

[ १०६३ ]

उगमापासुनी गंगा सागरासी गेली । काय दोन जालीं उदकें त्यांची ॥ १ ॥
तैसा ज्ञानदेव जाला अनुभव । काय आम्हां देव दुरावला ॥ २ ॥
सरिता सरोवराचे एके ठायीं झरे । लहान थोर सारे स्वरूपीं माझ्या ॥ ३ ॥
रुक्मादेवीवरें उगविलें गाबाळ । संत कृपाळ डुल्लताती ॥ ४ ॥
नामा म्हणे येणें मोहिलें चित्त । राहिले तटस्थ चौघेंजण ॥ ५ ॥

[ १०६४ ]

आणिक वाद्यें तेथें वाजताती अपार । उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥
चिद्रत्नमंडप दिसला कल्लोळ । जैसे दीपमाळ दीप ठेले ॥ २ ॥
नक्षत्र गोंधळ उसळती भारी । चक्रें त्याजवरी उल्लाळती ॥ ३ ॥
मोतियें तोरणें लाविलीं अपार । झळकती तारे विभु ऐसे ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा नवल केलें गहन । पुंजाळिलें गगन ज्ञानदेवें ॥ ५ ॥

---

अभंग १०६२ ते १०६४—(आ.)

१ धरूनि ठेले मौन्य अवघेजण। (आ.)

अनुक्रमणिका

[१०६५]

निवृत्ति ज्ञानदेव उभे दोहींकडे । सोपान तो पुढें मुक्ताबाई ॥ १ ॥
देहुडे सुरगण थक्क पडिलें लोकां । सुरू केला डंका वैकुंठींचा ॥ २ ॥
चक्रतीर्थी उभे देव साधुजन । करविलें स्नान ज्ञानदेवा ॥ ३ ॥
देवाचें हें तीर्थ घेतलें ज्ञानेश्वरें । केला नमस्कार पादपद्मीं ॥ ४ ॥
विठ्ठल रुक्मिणी ऋषि सुरवर । पूजा ज्ञानेश्वर करितसे ॥ ५ ॥
नामयाच्या हातीं गंध अक्षता । पूजा महंता मान्य जाली ॥ ६ ॥

[१०६६]

टाळ विणे मृदंग वाजती अपार । नारद तुंबर गीत गाती ॥ १ ॥
शुक वामदेव अंबऋषि सादर । मध्यें ज्ञानेश्वर ब्रह्मरूप ॥ २ ॥
पिपिलिकेसी मार्ग जावया न मिळे । जाती भार मेळे वैष्णवांचे ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा दाविली नवाळी । पुरविली आळी ज्ञानोबाची ॥ ४ ॥

[१०६७]

दशमीचे दिवशीं केली प्रदक्षिणा । आणिक कीर्तना संत उभे ॥ १ ॥
रात्रंदिवस त्यांही केला हरिजागर । हरिदिनीं थोर कृष्णपक्षीं ॥ २ ॥
मग केलें स्नान भागिरथीचे तीरीं । संत महंता भारी पूजियेलें ॥ ३ ॥
अवलोकिलें डोळां अंतर बाहेरी । मग सिद्धेश्वरीं येते झाले ॥ ४ ॥
सिद्धेश्वरालागीं पूजिले निवळ । मागितलें स्थळ समाधीसी ॥ ५ ॥
गंगा आणि गिरजा नीलकंठ ईश्वर । केला नमस्कार नामा म्हणे ॥ ६ ॥

[१०६८]

अष्टोत्तरशें वेळ समाधि निश्चळ । पूर्वी तुझें स्थळ वहनाखालीं ॥ १ ॥
उठविला नंदी शिवाचा ढवळा । उघडिली शिळा विवराची ॥ २ ॥
आसन आणि धुनि मृगछालावर । पाहाती ऋषीश्वर वोसंडोनि ॥ ३ ॥
बा माझी समाधि पाहिली जुनाट । केवळ वैकुंठ गुह्यगोप्य ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा पुरातन स्थान । ऐसें नारायणें दावियेलें ॥ ५ ॥

---

अभंग १०६५—(न.), १०६६—(पं.) व (शि.), १०६७ व १०६८—(आ.)

[१०६९]

नारा विठा गोंदा महादा पाठविला । झाडविली जागा समाधीची ॥ १ ॥
हरिदिनीं जागर केला निशीदिनीं । उदईक पारणीं द्वादशींची ॥ २ ॥
गंगा गिरजा राही रुक्माबाई भामा । उठिल्या रांधण्या पारण्याच्या ॥ ३ ॥
नाना प्रकारचे पाक ते अपार । मुनि ऋषीश्वर बोलाविले ॥ ४ ॥
वैष्णव देव आणि आले सुरगण । करोनियां स्नान इंद्रायणी ॥ ५ ॥
पिंपळाचे पारीं बैसविल्या पंक्ती । पात्रें ते श्रीपती वाढू लागे ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा करणें साहित्यासी । येतो कासाविसी प्राण माझा ॥ ७ ॥

[१०७०]

[1]सोवळचानें हरि वाढतो सकळां । मनींचा कळवळा कोण जाणे ॥ १ ॥
रुक्माईचे कानीं सांगितली गोष्ट । विस्तारावें ताट ज्ञानदेवा ॥ २ ॥
राही रुक्माबाई वाढिती आवडीनें । सोडितो पारणें ज्ञानदेव ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा परब्रह्म अन्न । जातों बोलावण ज्ञानदेवा ॥ ४ ॥

[१०७१]

निवृत्ति सोपान मुक्ताई चवथी । अनेक विभूति ज्ञानेश्वरा ॥ १ ॥
नामा पुंडलिक गरूड हनुमंत । परसा भागवता बोलविलें ॥ २ ॥
विठ्ठल रुक्माई सत्यभामा राही । इतुके तयेठायीं जमा जाल्या ॥ ३ ॥
विसोबा खेचर चांगा वटेश्वर । सांवता कुंभार एके ठायीं ॥ ४ ॥
गंगा गिरजा दोघी नीळकंठ ईश्वर । मध्यें ज्ञानेश्वर घेतियेला ॥ ५ ॥

[१०७२]

निवृत्ति मुक्ताईचें करिती समाधान । घेतला सोपान मध्यभागीं ॥ १ ॥
ऐक्य अहिक्याची बैसली एकवटे । विस्तारिलीं ताटें रुक्माईनें ॥ २ ॥
एक एकालागीं देताती प्रसाद । आतां ज्ञानराज पाहूं डोळां ॥ ३ ॥
नामा म्हणे स्वस्थ जेवितां पंगती । घृतपात्र हातीं विस्तारितु ॥ ४ ॥

अभंग १०६९—(न.) व (ह.), १०७०—(बा.), १०७१—(पं.), १०७२—(आ.)
१ सांवळा तो (बा.)

अनुक्रमणिका

[१०७३]

ज्ञानदेवालागीं चंदनाची उटी । पंचारती होती आनंदाच्या ॥ १ ॥
गंध आणि अक्षता पुष्पपरिमळा । घेती वोसंगळा नामदेव ॥ २ ॥
ज्ञानदेव स्वस्थ देवा वोसंगळा । माळा घाली गळां नामदेव ॥ ३ ॥

[१०७४]

जेऊनियां स्वस्थ उठिले परिपूर्ण । केलें आचमन वैष्णवांनीं ॥ १ ॥
वैकुंठींचा प्रसाद पावेल निवाडे । गोंदा महादा विडे वांटिताती ॥ २ ॥
दोन प्रहरपावेतों आटोपलें भोजन । तृतीय प्रहरीं कीर्तन आरंभिलें ॥ ३ ॥
कीर्तनाच्या नादें मोहिला गोविंद । करावा उद्योग समाधीचा ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा करितां उशीर । विकळ ज्ञानेश्वर जात असे ॥ ५ ॥

[१०७५]

मुगुट मनोहर कुंडलें मकाराकार । कांसे पीतांबर कसियेला ॥ १ ॥
खोविले गोशे स्वार गरुडावर । उठविले भार वैष्णवांचे ॥ २ ॥
केलें आचमन तीर्थी त्या तांतडी । आले उठाउठी सिद्धेश्वरीं ॥ ३ ॥
परमार्थ स्वार्थ जाल्या गुह्य गोष्टी । होताती भेटी ज्ञानदेवा ॥ ४ ॥
नामा म्हणे भेटा लहान थोर सारे । जातो ज्ञानेश्वर समाधीसी ॥ ५ ॥

[१०७६]

ब्रह्मादिक तेथें करिताती पूजा । घालिताती सेजा समाधीसी ॥ १ ॥
चिद्रत्न आसन उन्मनीची धुनी । समाधि सज्जनीं पाहियेली ॥ २ ॥
धुवट वस्त्राची घडी ते अमोल । तुळसी आणि बेल आंथरिले ॥ ३ ॥
दुर्वा दर्भ वरी टाकिले मोकळे । पुष्पें तीं सकळें समर्पिलीं ॥ ४ ॥
नामा म्हणे येथें छाया निरंतर । सुखी ज्ञानेश्वर सुखावला ॥ ५ ॥

[१०७७]

लावियेला दीप निरंजन ज्योति । प्रकाशल्या दीप्ती तन्मयाच्या ॥ १ ॥
पूजूनि समाधि निघाले बाहेर । प्रेमें ज्ञानेश्वर डुल्लतसे ॥ २ ॥

---

अभंग १०७३ ते १०७५—(आ.), १०७६—(पं.), १०७७—(आ.)

अनुक्रमणिका

अनुमानिलें स्थळ सभोंवती सारें । धन्य ज्ञानेश्वरें कृपा केली ॥ ३ ॥
देव आणि नामा रुक्माई राही । स्फुंदती ठायीं ठायीं संतजन ॥ ४ ॥

[१०७८]

निवृत्ति सोपान पुढें मुक्ताबाई । देवा सांगा कांहीं निजगुज ॥ १ ॥
देव ज्ञानेश्वर बैसले जवळीं । घेतियेली आळी सोपानानें ॥ २ ॥
ज्ञानदेवें खूण सांगितली देवा । पूर्ण तूं विसांवा सज्जनांचा ॥ ३ ॥
सोपानाचे हात देवाचिये हातीं । तेव्हां आपमूर्ति कामाविस ॥ ४ ॥
म्लान वदनें निवृत्ति सद्‌गुरू सागर । येऊनि ज्ञानेश्वर चरणीं लागे ॥ ५ ॥
नामा म्हणे याचे अंतर परिपूर्ण । नाहीं देहीं भान निवृत्तीसी ॥ ६ ॥

[१०७९]

पांडुरंग निवृत्ति उभे दोघेजण । आरंभिलें नमन ज्ञानदेवें ॥ १ ॥
नामा पुंडलिक उभे दोहोंकडे । ज्ञानराज पुढें उभे ठेले ॥ २ ॥
गंध आणि अक्षता पुष्प परिमळ । आणियेले जळ भागिरथीचें ॥ ३ ॥
अनंत स्वरूपाचीं अनंत हीं नावें । नमन ज्ञानदेवें आरंभिलें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा नमनाची रीती । नमन सर्वांभूतीं मान्य जालें ॥ ५ ॥

[१०८०]

पुढें ज्ञानेश्वर जोडोनियां कर । बोलतो उत्तर स्वामिसंगें ॥ १ ॥
पाळिलें पोसिलें चालविला ळळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥ २ ॥
स्वामीचिया योगें जालों स्वरूपाकार । उतरलों पार मायानदी ॥ ३ ॥
निवृत्तीनें हात उतरिला वदना । त्यागिलें निधाना आम्हालागीं ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा देखवेना मज । ब्रह्मीं ज्ञानराज मेळविला ॥ ५ ॥

[१०८१]

वोसंडोनि निवृत्ति आलिंगों लागला । आणिकांच्या डोळां अश्रु येती ॥ १ ॥
अमर्यादा कधीं केली नाहीं येणें । शिष्य गुरूपण सिद्धी नेलें ॥ २ ॥

---
अभंग १०७८ ते १०८१—(आ.)

अनुक्रमणिका

गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा । गुह्यगौप्यमाळा लेवविल्या ॥ ३ ॥
फेडिलीं डोळ्यांचीं अत्यंत पारणीं । आतां ऐसें कोणी सखे नाहीं ॥ ४ ॥
काढोनियां गुह्य वेद केले फोल । आठवती बोल मनामाजीं ॥ ५ ॥
नामा म्हणे संत कासावीस सारे । लाविती पदर डोळियांसी ॥ ६ ॥

[१०८२]

देव म्हणे ऐसें आठवाल कोठवर । होईल उशीर समाधीशी ॥ १ ॥
निरंजनीं समाधि निरंतर तुम्हांसी । व्यर्थ कासाविसी होऊं नये ॥ २ ॥
निवृत्तीसी पोटीं धरिलें देवानें । केलें समाधान अवघियांचें ॥ ३ ॥
ब्रह्मणि ही कळा पुढें मुक्ताबाई । देवा सांगा कांहीं आम्हांलागीं ॥ ४ ॥
देव म्हणे तुज येणें जाणें नाहीं । अनुभवोनि पाही जीवन्मुक्ती ॥ ५ ॥
म्हणे मुक्ताई सख्या ज्ञानेश्वरा । प्रार्थना तुम्ही करा देवालागीं ॥ ६ ॥
ज्ञानदेवें वचन घातलें देवांवर । विश्वाचें मनोर पांडुरंग ॥ ७ ॥
नामा म्हणे स्वामि प्रेमाचिया रंगें । बोलावणें स्वांगें करूं आम्ही ॥ ८ ॥

[१०८३]

ज्ञानदेवें देवा घातलें वचन । करा समाधान सोपानाचें ॥ १ ॥
समुदायेसीं तुम्हां करूं बोळवण । ऐसाचि सोपान ब्रह्मकरू ॥ २ ॥
तीर्थावळी वेळें नेमियलें स्थान । तेथें पोचविणें मजलागीं ॥ ३ ॥
विठ्ठल रुक्माई उभी समाधान । दिधलें वचन ज्ञानदेवा ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा स्थिरावलें मन । करितां समाधान अवघियांचें ॥ ५ ॥

[१०८४]

निवृत्तिदेव म्हणे सांगतो या वाचे । राहाणें चौघांचें एकरूप ॥ १ ॥
त्रिवेणीचा ओघ जैसा एके ठायीं । तैसी मुक्ताबाई आम्हांमध्यें ॥ २ ॥
ब्रह्माविष्णुहर जैसे एके ठायीं । तैसी मुक्ताबाई आम्हांमध्यें ॥ ३ ॥
रज तम गुण सत्व गुणाठायीं । तैसी मुक्ताबाई आम्हांमध्यें ॥ ४ ॥

अभंग १०८२—(पं.) व (शि.), १०८३—(न.), १०८४—(आ.)



अनुक्रमणिका

भूचरी खेचरी चांचरी ते पाही । अगोचरा ठायीं मुक्तगंगा ॥ ५ ॥
प्रथम ज्ञानेश्वरें काढियेली वाट । धरियेलें वैकुंठ आळंकापुरीं ॥ ६ ॥
इंद्रनीळ पर्वत नेमिला सोपाना । निवृत्तीसी जाणा त्रिंबकेश्वर ॥ ७ ॥
चौथी मुक्ताबाई नेमियली तापी । नामा म्हणे ख्याती केली यांनीं ॥ ८ ॥

[१०८५]

निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान । कांहीं केल्या मन राहात नाहीं ॥ १ ॥
बांधल्या तळयाचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥ २ ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेसे ॥ ३ ॥
हरिणीविण खोपी पडियेली वोस । दशदिशा पाडसें भ्रमताती ॥ ४ ॥
मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां । ऐसें संकट तेव्हां जालें नाहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥ ६ ॥

[१०८६]

देव रुक्माबाई आणिक साधुजन । करिती समाधान निवृत्तीचें ॥ १ ॥
ज्ञानियांनीं ऐसी करावी जंव खंती । अज्ञानाचा किती पाड आला ॥ २ ॥
धन्य तुमचा महिमा बोलती पुराणीं । दृश्य कांहीं मनीं आठवूं नये ॥ ३ ॥
आकाशाचे ठायीं अभ्रें येती जाती । कोण त्याची खंती करूं पाहे ॥ ४ ॥
अवतारादिक गेले आले अपार । जैसा का विस्तार मृगजळाचा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवें धरियेलें हातीं । उठविली विभूति निवृत्तिराज ॥ ६ ॥

[१०८७]

गरुड हनुमंत मुक्ताई सोपान । देव साधुजन आनंदले ॥ १ ॥
मागें पुढें संत पताकांचे भार । मध्यें ज्ञानेश्वर मिरवतो ॥ २ ॥
टाळ आणि विणे मृदंग गायन । करिती कीर्तन सुस्वरेंसी ॥ ३ ॥
जयजयकार ध्वनि करिती सुरगण । वर्षती सुमन स्वर्गींहुनी ॥ ४ ॥
हरिपाठ गजर करिती अपार । नामा म्हणे भार उठविले ॥ ५ ॥

अभंग १०८५ ते १०८७—(आ.)

[१०८८]

सर्व स्वस्ति क्षेम वैष्णव मंडळी । बैसलेती पाळी समाधीच्या ॥ १ ॥
पताकांची छाया दुणावली फार । सिद्ध ज्ञानेश्वर तेव्हां जाले ॥ २ ॥
अजानवृक्षदंड आरोग्य अपार । समाधीसमोर स्थापियेला ॥ ३ ॥
कोरड्या काष्टीं फुटियेला पाला । तेव्हां अवधियाला नमस्कारी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा धार गेली उडोन । बाळें दाणादाण पडियेलीं ॥ ५ ॥

[१०८९]

मुंग्यांचिये विवरीं लागलीसे आग । पुढें आणि मागें जालें नाहीं ॥ १ ॥
राही रुक्माई आणि सत्यभामा । ओवाळिती प्रेमा ज्ञानेश्वरा ॥ २ ॥
उभारिल्या गुढिया आणि तोरणें । छाया सुदर्शन धरियेलें ॥ ३ ॥
नारा विठा गोंदा भेटला महादा । उभे जागोजागा राहिलेती ॥ ४ ॥
विसोबा खेचर चांगा वटेश्वर । केला नमस्कार अवधियांनीं ॥ ५ ॥
गोरा कुंभार सांवता माळी । नामा तळमळी वत्सा ऐसें ॥ ६ ॥

[१०९०]

परसा भागवतें केला नमस्कार । सारे लहान थोर जमा जाले ॥ १ ॥
सकळांचिया पायीं नमियलें नमना । केली प्रदक्षिणा समाधीसी ॥ २ ॥
प्रथम पायरी बाहेरील जेथ । उभा पंढरीनाथ भेटावया ॥ ३ ॥
देव म्हणे बापा अमृत नेदी पाट । फार केले कष्ट जगासाठीं ॥ ४ ॥
नामा म्हणे यांनीं अनुभवाच्या नौका । पार केलें लोकां जडमूढां ॥ ५ ॥

[१०९१]

देव निवृत्ति यांनीं धरिले दोन्ही कर । जातो ज्ञानेश्वर समाधीसी ॥ १ ॥
नदीचिया माशा घातलें माजवण । तैसें जनवन कालवलें ॥ २ ॥
दाही दिशा धुंद उदयास्ताविण । तैसेंचि गगन कालवलें ॥ ३ ॥
जाऊनि ज्ञानेश्वर बैसले आसनावरी । पुढें ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥ ४ ॥

अभंग १०८८—(आ.), १०८९—(पं.) व (शि.), १०९० व १०९१—(आ.)

ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा । पादपद्मीं ठेवा निरंतर ॥ ५ ॥
तीन वेळां जेव्हां जोडिलें करकमळ । झांकियेले डोळे ज्ञानदेवें ॥ ६ ॥
भीममुद्रा डोळा निरंजनीं लीन । जालें ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव ॥ ७ ॥
नामा म्हणे आतां लोपला दिनकर । बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ॥ ८ ॥

[१०९२]

निवृत्तीनें बाहेर आणिले गोपाळा । घातियेली शिळा समाधीसी ॥ १ ॥
सोपान मुक्ताई सांडिती शरीरा । म्हणती धरा धरा निवृत्तीसी ॥ २ ॥
आणिकांचीं तेथें उद्विग्न तीं मनें । घालिताती सुमनें समाधीसी ॥ ३ ॥
नामदेवें भावें केली असे पूजा । बापा ज्ञानराजा पुण्यपुरुषा ॥ ४ ॥

[१०९३]

अवघी जयजयकारें पिटियेली टाळी । उठली मंडळी वैष्णवांची ॥ १ ॥
सह मंडळी सारे उठले ऋषीश्वर । केला नमस्कार समाधीशी ॥ २ ॥
पंचद्वारें संत रिघाले बाहेर । सखा ज्ञानेश्वर आळंकापुरीं ॥ ३ ॥
इंद्रायणी केलें अवघ्यांही आचमन । करिती समाधान निवृत्तीचें ॥ ४ ॥
सोपानासी पोटीं धरिलें देवानें । संवत्सरगांवीं जाणें नेम केला ॥ ५ ॥
मुक्ताबाईलागीं सांगितली खूण । जाय तो सोपान स्थिर असा ॥ ६ ॥
त्रिवर्ग तीं ऐसीं राहिलीं एकमनें । जाणोनियां खूण नामा म्हणे ॥ ७ ॥

[१०९४]

देवसमागमें परतले भार । केला हरिगजर समाधीसी ॥ १ ॥
नव दिवस संत समाधीजवळी । देव चंद्रमौळी कीर्तनासी ॥ २ ॥
शुद्धमार्गसर दशमी भोजनें । विधि नारायणें संपादिली ॥ ३ ॥
एकादशीं कीर्तन द्वादशीं पारणीं । मग ऋषि मुनि संतोषले ॥ ४ ॥
त्रयोदशीं देव रिघाले बाहेरी । धन्य आळंकापुरीं ज्ञानराज ॥ ५ ॥
नामा म्हणे धन्य पलाटण पाउलीं । पंचक्रोश ठेलीं सकळ तीर्थें ॥ ६ ॥

अभंग १०९२ ते १०९४—(आ.)

अनुक्रमणिका

[१०९५]

धन्य आळंकापुरीं शिवपीठ शिवाचें । अगस्ति ऋषीचें पूर्वस्थळ ॥ १ ॥
त्रिवर्गीं म्हणितलें जातां जातां हरी । आम्हां कौंडण्यपुरीं आज्ञा द्यावी ॥ २ ॥
इंद्रनीळ पर्वत नेमिला सोपान देवा । तोंवरी करूं सेवा अंबिकेची ॥ ३ ॥
देव म्हणे भलें आरंभिलें तुम्हीं । आज्ञा घेतों आम्ही पंढरीसी ॥ ४ ॥
इंद्रनीळ पर्वतीं समाधि सोपान । सर्वत्र आमंत्रण देवें दिलें ॥ ५ ॥
देवभक्तालागीं जालें समाधान । मग सुरगण आंवतिले ॥ ६ ॥
नामा पुंडलिक निघाले बाहेरी । गरुडावरी देव स्वार जाले ॥ ७ ॥

[१०९६]

समाधी परिपूर्ण बैसले ज्ञानेश्वर । उठविले भार वैष्णवांचे ॥ १ ॥
आळंकापुरीं सव्य घेतली ते संतीं । दिली भागीरथी ज्ञानालागीं ॥ २ ॥
भैरवापासुनि उगम निरंतर । रानोमाळ झरे तीर्थ गंगा ॥ ३ ॥
सैंघ इंद्रायणी वाहाती मिळोनी । अखंड क्षणीं बोघ जाती ॥ ४ ॥
चालिलें विमान गंधर्व सुरगण । यात्रा परिपूर्ण जाली म्हणती ॥ ५ ॥
तीर्थ महोत्साह जाला सारासार । देव ऋषीश्वर परतले ॥ ६ ॥
वैष्णवांचे भार निघाले बाहेर । केला जयजयकार सर्वत्रांनीं ॥ ७ ॥
पंढरीचा पोहा निघाला बाहेर । गरुडावरी स्वार देव जाले ॥ ८ ॥
नामा म्हणे ऐसा सुखी ज्ञानेश्वर । जाला असे स्थिर ब्रह्मबोधें ॥ ९ ॥

अभंग १०९५ व १०९६—(आ.)

• • •

[१०९७]

मग उड्डाण केलें गरुडें । गगन आक्रमिलें चंडें ।
वरी आरुढले प्रचंडें । भक्त देव सकळिक ॥ १ ॥

पक्षाचेनि फडत्कार । ग्राम ठाकिला संवत्सर ।
गिरीकडे पठार । शिखरीं गरुड उतरला ॥ २ ॥

ते दिनीं समारंभ केला । महा उत्सव तरिसी जाला ।
जयजयकार प्रवर्तला । विमानें दाटलीं आकाशीं ॥ ३ ॥

दृष्टी देखावया कौतुक । शिवगण आले सकळिक ।
कर्ता ब्रह्मांडनायक । ते कौतुक अवलोकिती ॥ ४ ॥

मुनि पुंडलिक उतरला । संगतीं वैष्णवांचा मेळा ।
समाधि लक्षण डोळां । पाहती देव सकळिक ॥ ५ ॥

हातें खाणोनि भूमिका । अमृत शिंपुनी सुगंधिका ।
महामंगळिक सुखा । वेदघोष आरंभिले ॥ ६ ॥

नामा म्हणे सुखसंगतीं । वैष्णव हरिनाम गर्जती ।
लक्ष्मी नारायेण क्षितीं । उतरोनि समाधि देताती ॥ ७ ॥

[१०९८]

भक्तां समागमें हरी । सत्वर आले संवत्सरीं ।
ब्रह्मानंद परोपरी । चरण धरी सोपानदेव ॥ १ ॥

भागीरथी सवें सरिता । धावोनि आली गंगा माता ।
यमुना सरस्वती उभयतां । एकात्मता कर्‍हेमाजीं ॥ २ ॥

इंद्र चंद्र तेहतीस कोडी । नवनाथ सिद्ध सौंगडी ।
भक्त सनकादिक प्रौढी । वेद परवडी गर्जती ॥ ३ ॥

गगनामाजीं देवांगना । वर्षाव करिती दिव्यसुमना ।
म्हणे निवृत्तीनाथ सोपाना । चरणावरी ठेवी तूं ॥ ४ ॥

पुष्पकारूढ जाले देव । आणिक मागुती आले सर्व ।
पांडुरंग देव सदैव । सोपानदेव बाळमूर्ति ॥ ५ ॥

इंद्रनीळ पर्वत आहे । तेथोनि ठाव जावया पाहें ।
सप्तपाताळीं शेष वाहे । दीर्घदेह फणी असे ॥ ६ ॥

अभंग १०९७—(धु.), (पा.), (तं.), (ह.) व (न.), १०९८—(आ.)

अनुक्रमणिका

जावोनी त्यासी श्रुत करावें । गरुडासि बोलिलें देवरावें ।
मार्गीं चालिला लवलाहें । क्रमित जावें सप्तपाताळीं ॥ ७ ॥

नामा म्हणे अमृतकरीं । मुख कुरवाळोनी श्रीहरी ।
सोपान समाधिभीतरीं । आपण पुढारीं बैसले ॥ ८ ॥

[१०९९]

ऐसा सोपान 'संबोखिला । महा उत्सव आनंद जाला ।
अभय वर दिधला । गर्जिन्नला देवराणा ॥ १ ॥

म्हणे तूतें न विसंबे । संवत्सरीं असेन स्वयभें ।
या वटेश्वरीं सगुण सुलभे । समारंभ प्रतिवर्षी ॥ २ ॥

सिद्धसाधकाचें स्थळ । तो हा वटेश्वर सानुकुळ ।
यासी म्हणती सोडविल नीळकंठ । शीतळ प्रथम नाम ॥ ३ ॥

पूर्वीं हें ब्रह्मयाचें स्थान । तेणें येथें तप साधिलें गहन ।
प्रत्यक्ष शंकर सुप्रसन्न । आशीर्वचन बोलिले ॥ ४ ॥

इंद्रनीळ पर्वत रूप । प्रत्यक्ष नारायण स्वरूप ।
असे कौंडिण्यपुर समीप । माता साक्षेपें ॥ ५ ॥[२]

ऋषिगण गंधर्व । क्षेत्रपाळ मल्हारी देव ।
इंद्र चंद्र ब्रह्मदेव । शुद्ध ठाव नेमिला ॥ ६ ॥

नामा म्हणे जनार्दन । बहुत संतोषला सोपान ।
अंगें ब्राह्मण सनातन । शुद्ध अधिष्ठान दिधलें ॥ ७ ॥[३]

[११००]

सोपान म्हणे देवोत्तमा । पूर्वीं येथें होता ब्रह्मा ।
आणि तुम्हीं सर्वोत्तमा । कोणे स्थळीं होतां देवा ॥ १ ॥

---

अभंग १०९९—(तं.), (धु.), (पा.), (पं.), (ह.) व (न.), ११००—(धु.), (पं.), (ह.), (पा.) व (न.)

१ तुष्टला (तं., पा., धु. व पं.)

२ यापूर्वी असा चरण अधिक आढळतो—

अनंत ऋषींची शेतें । आणि अनंत पैं तीर्थें । पैं ब्रह्मा जाला निर्माता । तें हें स्थळ रे सोपाना । (तं., पा., धु. व पं.)

३ त्याचप्रमाणे काही प्रतींत—

नामा म्हणे जनार्दन । कैसा बुझाविला सोपान ।
प्रत्यक्ष परब्रह्म सनातन । उपदेश करी भक्तांशी ॥ ४ ॥

असेही चरण मिळतात. (तं., धु., पा. व पं.)

अनुक्रमणिका

देव म्हणे कथा परिस । कोटद्यानुकोटी युगांस ।
आम्हीं होतों पंढरीस । अनंत कल्पें गेलीं ॥ २ ॥

अनंत भक्तांचिया मेळीं । अनंत वैष्णवें भूमंडळीं ।
माजीं गवसले सकळीं । केली आगळी पुंडलिकें ॥ ३ ॥

येणें प्रसन्न केलें शंकरा । शंकरें मज दाखविलें निर्धारा ।
आपण राहोनि पाठमोरा । विश्व तारिलें कीर्तनें ॥ ४ ॥

भक्ताचेनि आराधनें । साधियेलें बहुत पुण्यें ।
माझें जालेंसे येणें । एक कारण पुंडलिकाचें ॥ ५ ॥[1]

पूर्वापार पंढरीसी । होती विष्णुमात ऐशी ।
निर्धार करोनि मानसीं । अहर्निश अनुष्ठान ॥ ६ ॥

येथोनि पूर्वभाग पंढरी । पश्चिमभागीं ब्रह्मा अवधारी ।
अवतार कऱ्हे पाठारीं । महादेव शिखरीं मानदेसी ॥ ७ ॥

तेहतीस कोटी देवस्थळी । पूर्व पश्चिम वैश्य मंडळी ।
उग्र तप साधिलें चंद्रमौळी । या इंद्रनीळ पर्वतावरी ॥ ८ ॥

द्रोणाचळ इंद्राचळ । हनुमंतें आणिला विशाळ ।
त्याच्या शाखा अधोमूळ । तो हा इंद्रनीळ पर्वत ॥ ९ ॥

येथें वल्ली सुवर्णाकार । गुप्त असती त्या निर्धार ।
दिसे अस्तमानीं अंधार । दीप आकार जगाप्रती ॥ १० ॥

येथोनियां दक्षिणद्वार । गोकर्ण महाबळेश्वर ।
पाताळद्वारीं पूजा शंकर । बेलपत्र अद्यापि निघती ॥ ११ ॥

[2]नामा म्हणे देवाधिदेव । सांगितला स्वानुभाव ।
अधिष्ठान गुढाव । सोपानदेव निवांत ॥ १२ ॥

[ ११०१ ]

पूर्वकथा संवत्सरनगरीं । सांगितली असे अवधारी ।
मग शेषाद्रि पर्वतावरी । गरुड शिखरीं उभा असे ॥ १ ॥

धन्य धन्य हा सोपान । धन्य समाधि संपूर्ण ।
प्रत्यक्ष येऊनि नारायण । अभयदान दिधलेंसे ॥ २ ॥

---

अभंग ११०१—(आ.)

१ काही (पं.) प्रतीत हा पाचवा चरण नाही.

२ नामा म्हणे देवाधिदेवें । सांगितलें उत्तम लिंगें शिवे ।
जेथे वसिजे महादेवें । ते सांगिजेल पुढा ॥ (धु., पं., ह. व पा.)

अनंत वैष्णव प्रेमळ । दिंडी पताका टाळ घोळ ।
रामकृष्ण नाम सरळ । भक्त सर्वकाळ नाचती ॥ ३ ॥

दिव्य उतरलीं विमानें । देव वर्षती सुमनें ।
इंद्र चंद्र देवगणें । लोटांगण घालती ॥ ४ ॥

समाधिसुखाचा आनंद । अंगें करीतसे गोविंद ।
कथा सांगितली अभेद । श्रोते सन्निध सकळीं ॥ ५ ॥

म्हणती धन्य धन्य सोपान । देव पुरुष चतुरानन ।
संत महंत वैष्णव प्रमाण । रामकृष्ण गाताती ॥ ६ ॥

नामा म्हणे देवराव । मनोरथ पूर्ण करोनि सर्व ।
अपार गुणकीर्ति लाघव । न कळे माव कोणाशीं ॥ ७ ॥

[११०२]

सोपान समाधी बैसला । सकळीं पुष्पवर्षाव केला ।
जयजयकारें भूगोल कोंदला । आनंद दाटला महीवरी ॥ १ ॥

धन्य धन्य हा सोपान । वर्णितसे श्रीभगवान ।
क्षणोक्षणीं माझी आठवण । उद्विग्न मन होतसे ॥ २ ॥

नारद तुंबर अक्रूर उद्धव । पुंडलिकादि करूनि सर्व ।
मुनिदेवगण गंधर्व । स्तुतिस्तव बोलती ॥ ३ ॥

[1]म्हणती चौघेजण भाग्याचे । जें निदान ब्रह्मादिकांचें ।
तें [2]निजध्यान शंकराचें । सकळ जीवांची जीवनकळा ॥ ४ ॥

[3]तो प्रत्यक्ष येऊनि अनंत । याची परिचर्या करित ।
[4]भक्ता साह्य होऊनि भगवंत । पूर्ण आर्त करावया ॥ ५ ॥

निजभक्तांचें कौतुक । करोनि ब्रह्मांडनायक ।
तया वर्णिती सनकादिक । [5]वरकड मशक बापुडें ॥ ६ ॥

पुंडलिक विस्मयें बोलती । हे चौघे भाग्याच्या मूर्ती ।
यांच्या नामें जग उद्धरती । पावे विश्रांति जगासी ॥ ७ ॥

नामा म्हणे सकळ जगाचा । उदय जाहलासे दैवाचा ।
सुकाळ केला स्वानंदाचा । ब्रह्मविद्येचा मृत्युलोकीं ॥ ८ ॥

---

अभंग ११०२—(पं.), (धु.), (पा.), (ह.), (तं.) व (न.)

१ म्हणती भक्त (ह.) २ करी स्तवन (च., धु., पा., ह. व तं.) ३ तो स्वयें भगवंत (धु., पा., तं. व ह.) ४ भक्त साह्य श्री अनंत तो अभिमान सिद्धि नेला। (धु., पा., ह., तं. व च.) ५ वरकडाचा पाड किती (धु., पा., ह., तं. व च.)

अनुक्रमणिका

[११०३]

सद्‌गुरु सागरा दीनबंधु । अनाथनाथा सुरैकसिंधु ।
चातकातें कृपाबिंदु । प्रसाद द्यावा ॥ १ ॥
गुरु आणि गणपति पुरातन । सिद्धांत वेदांत जुनाट जुना ।
दयाळा पातकहरणा । रक्षीं रक्षीं स्वामिया ॥ २ ॥
तूं अंतरीचें जाणतां । तूं इच्छेचा दाता ।
तूं हृदयीं प्रेरक होता । कमळालया ॥ ३ ॥
दृश्यादृश्य करितां पार । चौऱ्यांशीं लक्ष योनी दुर्धर ।
चुकवूनि उतरसी पार । संकटीं स्वामिया ॥ ४ ॥
निवृत्ति प्रवृत्ति दोन्ही थडी । मधीं माया नदी उघडी ।
बोधभावें घालिसी सांगडी । पार उतरिसी स्वामिया ॥ ५ ॥
सोपान आपला अंकित । पद्महस्तें करावें मुक्त ।
जो मनें इच्छिला अर्थ । सिद्धि न्यावा स्वामिया ॥ ६ ॥

[११०४]

तूं सद्‌गुरु आनंद भरित । तुझा आदि ना अंत ।
तूं प्रकाशा प्रकाशमंत । तुज नमो स्वामिया ॥ १ ॥
बुद्धिपालका वैभवा । तूं देवाधिदेवा ।
तूं जाणसी अंतरींचा गोवा । उगवीं उगवीं स्वामिया ॥ २ ॥
तूं सत्स्वरूपाची चौघडी । आणि परेची पैलथडी ।
बोधभावें करी उघडी । पार उतरी स्वामिया ॥ ३ ॥
तूं विश्रांतीचें स्थळ । तूं निर्गुणानिगुण निर्मळ ।
निवृत्तिमतीचा विशाळ । पुरवी आळ सोपानाची ॥ ४ ॥

[११०५]

स्पष्ट जोडोनियां कर । मी दासानुदास अपार ।
प्रार्थना करुनि नमस्कार । उतरी पार भवाब्धि ॥ १ ॥
निवृत्ति मुक्ताई परियेसी । योगीराज जाला उदयासी ।
वद्य कार्तिक मासीं । आळंकापुरीं जावें लागे ॥ २ ॥

---

अभंग ११०३ ते ११०५—(आ.)

ज्ञानदेवें मागितला मान । देव वैष्णवांचें आगमन ।
येऊनि गंधर्वाचें विमान । विधि नारायण संपादिला ॥ ३ ॥
इंद्रनीळ पर्वत पुरातन । पूर्वी येथें ब्रह्मयाचें स्थान ।
कौंडण्यपुरीं अंबिकाभुवन । महाब्रह्म योग माया ॥ ४ ॥
तिची भावें केली पूजा । परमार्थ साधिला स्वहित काजा ।
मुक्ताई आणि निवृत्तिराजा । सोपान सहजा सिद्ध जाले ॥ ५ ॥

[ ११०६ ]

धन्य कऱ्हेचे पाठारीं । इंद्रनीळ पर्वत महागिरी ।
जैसें आळंकापुरीं । तैसें पुण्यक्षेत्र हें ॥ १ ॥
ऐसें अनुमानिलें स्थळ । पूर्वापार निर्मळ ।
सिद्धी पाववी आळ । माय बापा ॥ २ ॥
मग सुमूहूर्त अमृतयोग । सिद्ध संकेत ज्ञानमार्ग ।
पहिला चंद्र स्वांग । गमन केलें योगिराजें ॥ ३ ॥
निवृत्ति सोपान मुक्ताई । आळंकापुरीहुनी आले पाही ।
मृदंग वाजती घाई । कीर्तन नवाई काय सांगू ॥ ४ ॥
समाधि सावधान । सुखी ज्ञानेश्वर निधान ।
जाला पां स्थिर सोपान । भेटीलागीं ॥ ५ ॥
केलें समाधिस नमन । विज्ञापिले सर्वजन ।
करा आमुची बोळवण । शेवटींची ॥ ६ ॥

[ ११०७ ]

देव म्हणे नाम्या मार्गशीर्ष गाढा । जावें सासवडा उत्सवासी ॥ १ ॥
सोपानासी आम्हीं दिधलें वचन । चला अवघेजण समुदाय ॥ २ ॥
आळंकापुरीची यात्रा केली सांग । मग पांडुरंग सिद्ध जाले ॥ ३ ॥
दुरोनि पताका दिसती मनोहर । उठावले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥
निवृत्ति मुक्ताई घेतला सोपान । जातो नारायण कऱ्हेतीरीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देव गंधर्व सुरगण । चालिले सोपान समाधीसी ॥ ६ ॥

अभंग ११०६—(आ.), ११०७—(पं.), (चि.), (धु.), (ह.), (तं.) व (न.)

अनुक्रमणिका

[११०८]

भक्तांचें तें साह्य करणें पांडुरंगा । म्हणोनि तीर्थगंगा उगविलें ॥ १ ॥
जान्हवी मंदाकिनी भोगावती मिळुनी । दुजी हे त्रिवेणी या भूमीसी ॥ २ ॥
निर्झर जीवन वाहती निरंतर । तेथें वटेश्वर उतरले ॥ ३ ॥
दुरोनि हें स्थळ दिसे मनोहर । उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥
नामा म्हणे स्थळ आदि हें अनादि । येथेंची समाधी सोपानासी ॥ ५ ॥

[११०९]

उतरिलीं विमानें स्वर्गींचें राऊळ । पताका रानोमाळ मिरविताती ॥ १ ॥
सोपान मुक्ताई सद्‌गुरु निवृत्ति । रुक्माईचा पति मध्यभागीं ॥ २ ॥
टाळ मृदंग वाजताती विणे । नारद गायन करीतसे ॥ ३ ॥
नामा पुंडलिक चालती आवडीनें । संत साधूजन मिरवती ॥ ४ ॥
लहान थोर संत चालती मिळोन । करिती बोळवण नामा म्हणे ॥ ५ ॥

[१११०]

भोगावती तीरीं दिधला मंडप । साधू आपरूप पांडुरंग ॥ १ ॥
रखुमाई राही बैसल्या अनेक । सखा पांडुरंग उतरला ॥ २ ॥
वद्य मार्गशीर्ष दशमी जागर । हरिदिनीं गजर कीर्तनाचा ॥ ३ ॥
क्षेत्रप्रदक्षिणा केली असे संतीं । आले भोगावती अवघेजन ॥ ४ ॥
निवृत्ति मुक्ताई दुश्चित्त अंतःकरण । साहित्य नारायण करीतसे ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा आधीं नेमा स्थळ । मग हें सकळ साहित्य करूं ॥ ६ ॥

[११११]

वटेश्वरें वृत्तान्त सांगितला सकळ । पूर्वी आमुचें स्थळ याच क्षेत्रीं ॥ १ ॥
येथूनियां वाट जातसे पाताळा । उघडिली शिळा समाधीची ॥ २ ॥
आसन मनोहर मृगछालावर । पहाती ऋषीश्वर आनंदानें ॥ ३ ॥
सोपान वटेश्वर करिती एकांत । कळलें मनोगत नामा म्हणे ॥ ४ ॥

अभंग ११०८ ते ११११—(आ.)

अनुक्रमणिका

[१११२]

सोपान वटेश्वर पातले समोर । केला नमस्कार निवृत्तीसी ॥ १ ॥
म्हणे मुक्ताबाई जाती दोघेजण । ऐसें नारायणें बुझाविलें ॥ २ ॥
गरूड हनुमंता परिसा भागवता । मग साधुसंता श्रुत केलें ॥ ३ ॥
गंधर्वा आणि देवा कळला वृत्तान्त । जाती उभयतां समाधीसी ॥ ४ ॥
नामा म्हणे यांनीं आरंभिलें हित । करितो स्वहित पांडुरंग ॥ ५ ॥

[१११३]

सोपान वटेश्वर उभे ठेले पुढती । पंचारत्या होती आनंदाच्या ॥ १ ॥
गंध आणि अक्षता वाहियेल्या सहज । देव निवृत्तिराज पूजियेले ॥ २ ॥
धूप आणि दीप आणिलें संपूर्ण । पूजिलें गगन सोपानानें ॥ ३ ॥
दाही दिशा दृष्टि अवलोकिली सारी । गगन अंकुरीं डवरिलें ॥ ४ ॥
चक्र सर्पाकार विजा लखलखती । ज्योति प्रकाशति रानोमाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा उदय जाला सकळ । सोपानदेवें मूळ दाखविलें ॥ ६ ॥

[१११४]

शेंदूर पारवे नीळवर्ण ठसे । जनीं वनीं दिसे परब्रह्म ॥ १ ॥
मुक्ताफळ भरित सबाह्य कोंदलें । रूप हें चांगलें विठोबाचें ॥ २ ॥
श्वेत पीतवर्ण आंत तारांगण । अंकुरलें गगन नानारूपें ॥ ३ ॥
ज्योतिर्मय ब्रह्म एकांतीचें पहाणें । समाधि नारायणें उदय केली ॥ ४ ॥
संत स्वरूप अवघें अवलोकिलें मनें । नमन नामा म्हणे आरंभिलें ॥ ५ ॥

[१११५]

निवृत्ति म्हणे ऊर्मी तुटल्या श्रृंखळा । मार्ग हा मोकळा आम्हां जाला ॥ १ ॥
पांडुरंग पाश आवरिला आपला । म्हणोनि फुटला मार्ग आम्हां ॥ २ ॥
आवरिली माया पुरातन आपुली । म्हणोनि आम्हां जाली बुद्धि ऐसी ॥ ३ ॥
नामदेवें मस्तक ठेवियलें पायीं । आतां खेद कांहीं करूं नका ॥ ४ ॥

अभंग १११२ ते १११५—(आ.)

अनुक्रमणिका

[११११६]

जाती ब्रह्मादिक जाती चराचर । मायिक व्यवहार ऐसा परी ॥ १ ॥
प्रकृति पुरुषाचा मांडियेला खेळ । जाईल सकळ नाशिवंत ॥ २ ॥
चंद्र सूर्य जाईल जाईल मृगजळ । जाती तिन्ही ताळ शून्यापोटीं ॥ ३ ॥
होईल निरामय अवघे चराचर । ब्रह्मींचा विस्तार होईल ब्रह्मीं ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी जाताती सकळ । ब्रह्मीं माया मूळ जाली कैसी ॥ ५ ॥

[१११७]

धन्य आमुचें भाग्य परब्रह्म संगें । साहित्य स्वआंगें करितसे ॥ १ ॥
नाशिवंत देह जाईल कीं अंतीं । नीचाची संगति कोण काज ॥ २ ॥
पाहिला गे माय ब्रह्मींचा आवर्तु । जीव आणि जंतु विस्तारिले ॥ ३ ॥
निवृत्ति मुक्ताई केलासे विवेक । आपपर लोक दुजें नाहीं ॥ ४ ॥
नामा म्हणे चित्त केलें स्थिर । देव ऋषीश्वर उठावले ॥ ५ ॥

[१११८]

पांडुरंग म्हणे सख्या निवृत्तिराजा । झाडा आतां शेजा समाधीच्या ॥ १ ॥
नारा विठा महादा पाठविला गोंदा । झाडावया जागा समाधीच्या ॥ २ ॥
परिसा भागवत चांगदेव हातें । आणिलें साहित्य समाधीचें ॥ ३ ॥
तुळसी बुका बेल दर्भ आणि फुलें । उदक चांगलें भोगावतीचें ॥ ४ ॥
भस्म पितांबर भगवीं तीं वस्त्रें । योगी दिगंबर समागमें ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा उठवा ऋषीश्वर । होईल उशीर समाधीसी ॥ ६ ॥

[१११९]

उठिले वैष्णव घेऊनि नारायणा । चालिले ते स्नाना अवघे जन ॥ १ ॥
गंध आणि अक्षता विसोबाचे हातीं । पूजा ते करिती सोपानाची ॥ २ ॥
सोपान वटेश्वर सोंवळे जाले सांग । निवृत्ति पांडुरंग पूजियेले ॥ ३ ॥
गंधर्व आणि सुरगण पूजिती सोपान । यथाविधी प्रमाण संपादिलें ॥ ४ ॥
नामा म्हणे पूजा केली हृषिकेशी । चला पारण्याशी अवघे जन ॥ ५ ॥

अभंग १११६--(आ.), १११७--(भा.), १११८ व १११९--(आ.)

[११२०]

राही रखुमाई ऋद्धिसिद्धि जेथें । पडले पर्वत पक्वान्नांचे ॥ १ ॥
बैसल्या त्या पंक्ति भोगावती तीरीं । पात्रें टाकी हरि वैष्णवाला ॥ २ ॥
विसोबा खेचर पुंडलिक संगें । वाढी पांडुरंग वैष्णवाला ॥ ३ ॥
संतसभेमाजीं निवृत्ति सोपान । यथाविधी प्रमाण संपादिलें ॥ ४ ॥
रखुमाईला देवें सांगितली खूण । सोडितो पारणें सोपानदेव ॥ ५ ॥
नामा म्हणे स्वामी जातो बोलावण । आणितो सोपान भोजनासी ॥ ६ ॥

[११२१]

चांगा वटेश्वर मुक्ता निवृत्तीश्वर । सावंता कुंभार ऐहिक ते ॥ १ ॥
एके ठायीं मिळाले परब्रह्म गवसून । वटेश्वर सोपान मध्यभागीं ॥ २ ॥
सोपान वटेश्वर घेतले वोसंगळा । माळा घाली गळां पुंडलिक ॥ ३ ॥
सोपान वटेश्वर पूजिती आवडीनें । संगतीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥
आनंदानें सारे बैसले एकवट । विस्तारिलें ताट रखुमाईनें ॥ ५ ॥
नारा विठा गोंदा बोलाविला माहादा । नामा म्हणे पूजा अवघे जन ॥ ६ ॥

[११२२]

उठिले वैष्णव आटोपलें भोजन । केलें आचमन भोगावतीं ॥ १ ॥
अवघ्यांनीं घेतला सोपान वटेश्वर । गोंदा महादा साचार विडे देती ॥ २ ॥
निशिदिनीं कीर्तन केलें द्वादशी । वद्य त्रयोदशी मार्गशीर्ष ॥ ३ ॥
भोगावतीं केलें अवघ्यांनीं स्नान । चालिले सोपान समाधीसी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा स्थळ मनोहर । उठावले भार वैष्णवांचे ॥ ५ ॥

[११२३]

कळवळी मन नाहीं देहभान । वटेश्वर सोपान सोंवळे जाले ॥ १ ॥
संत साधुजन होत कासाविसी । आले समाधीपाशीं तांतडीनें ॥ २ ॥
समाधीभोंवतें कुंकुमाचे सडे । पाहाती निवाडे अवघे जन ॥ ३ ॥

अभंग ११२०—(भा.), ११२१ ते ११२३—(आ.)

वरी मृगछाला दिसताती लाल । दर्भ आणि फुलें समर्पिलीं ॥ ४ ॥
दुर्वा आणि वेल टाकिले मोकळे । साहित्य सकळ समर्पिलें ॥ ५ ॥
निवृत्ति पांडुरंग बैसले येऊन । नमन सोपान करितसे ॥ ६ ॥

[ ११२४ ]

नमो अगणित गुणा । नमो अगम्य ध्याना ।
नमो कलिविध्वंसगहना । कालरूपा ॥ १ ॥
नमो शून्यादि क्षरा । अक्षरा तूं हरा ।
हरिहर सर्वेश्वरा । नमो तुज ॥ २ ॥
वेदविदा विद्वदा । सहज बोधा परमानंदा ।
अनादि आनंदा । गोविंदा तुज नमो ॥ ३ ॥
नमो चित्त विभ्रमा । नमो वृत्ति ध्यानागमा ।
नमो आगमसमा । ऐशिया परमात्मा तुज नमो ॥ ४ ॥
नमो अनंता अशेषा । नमो सकळ महेशा ।
जीव शिवादि विश्वेशा । नमो तुज ॥ ५ ॥
देव देवोत्तमा सकळा । देवाधिदेवा वेगळा ।
नमो तुज गोपाळा । चक्रचाळका हरी ॥ ६ ॥
नमो विष्णु कृष्णरूपा । नमो शुद्धादिरूपा ।
नमो नमो भुवनदीपा । नारायणा आदिनाथा ॥ ७ ॥
नमो योगिया योगोत्तमा । नमो सर्वांचा तूं आत्मा ।
नमो नमो परब्रह्मा । सर्वारामा आत्मया ॥ ८ ॥
नमो नमो नमन । तूं जगादि जगजीवन ।
जगज्जनकु जनार्दन । आनंदघन महामूर्ति ॥ ९ ॥
नमो कौतुहलहळणा । नमो भक्त प्रेमपाळणा ।
परात्पर निधाना । परादि वाचा ॥ १० ॥
परेहि परतत्त्वा । नाहीं जेथें रजतमसत्त्वा ।
वेदादिका देउनी महत्त्वा । पाळण करिसी धर्माचें ॥ ११ ॥
अनंत योगाधीशा । अनंत नामाधिवासा ।
अनंत तपें सहसा । न जोडसी तूं स्वामी ॥ १२ ॥

अभंग ११२४—(पं.), (ह.), (तं.) व (धु.)



अनुक्रमणिका

ऐशिया विश्वेश्वरादि शिवा । नमो तुज महादेवा ।
होय जयावरी कृपाहेलावा । तरी सर्व सुख देशी ॥ १३ ॥

भुक्ति मुक्ति विशेषा । दवडुनी मी माझी आशा ।
सांडुनी रजतम दुराशा । चरणीं चित्त रमलें ॥ १४ ॥

नमो उद्बोध विशद । तया वरील जो बोध ।
वरी झळके प्रसिद्ध । तो शुद्धाशुद्ध रस देई ॥ १५ ॥

निर्विकाराचा विकार । स्वस्वरूपाचा निर्धार ।
सर्वरूप होऊनि निर्विकार । ग्रास न करिशी माझा ॥ १६ ॥

शमदमादि समश्रेष्ठा । आदि अनादि वरिष्ठा ।
सकळा होऊनि विशिष्टा । भुवनपदा दावी ॥ १७ ॥

अनंत अनंतेश्वरा । अरुपाचाही आकारा ।
ग्रास न करुनी निर्धारा । सांठवी हृदयीं आपुला ॥ १८ ॥

नाथ दीनानाथा दीनेशा । चित्ताचित्त समरसा ।
नमो शिवादि शिवेशा । आदि प्रभु ॥ १९ ॥

नमो नमो रामा । नमो नमो भवादिश्रमा ।
नमो योगादि विश्रामा । आदिपती तुज नमो ॥ २० ॥

अवधूत महादत्ता । सकळ वृष्ट तूंचि हर्ता ।
नमो सकळ कर्ता । आदिसत्ता पैं तुझी ॥ २१ ॥

नमो दशानंद परेशा । नमो तुज ऐशिया जगदिशा ।
तुजविण व्यर्थ भरंवसा । आणिकां देवांचा ॥ २२ ॥

नमो नमो हरी मुकुंदा । नमो नमो पावविसी परमपदा ।
ऐशिया तुज सदा । पुढती नमो नमो ॥ २३ ॥

वामदक्षिण परिपूर्णा । अधउर्ध्व शून्यपणा ।
नमो तुज सर्वाभरणा । समाधि देशी तुज नमो ॥ २४ ॥

वीर्य धैर्य संपन्नगुणा । निराशा आशा अवगुणा ।
तुज स्मरतां पूर्णनिधाना । पावविसी परमपदा ॥ २५ ॥

चतुराचतुर शून्या । वेदशास्त्र श्रुतिमौन्या ।
सकळजन सौजन्या । नांदसी सभराभरित ॥ २६ ॥

मंजुळ शब्दाचिया गुणा । मंजुळ नादाचिया ध्याना ।
विश्वरूप अनन्या । वैकुंठीं नांदसी सदा ॥ २७ ॥

अनुक्रमणिका

जगद्गुरु जगद्पालका । जगदादि जगन्नायका ।
वेदादि विवेका । कर्ता हर्ता जगदीशा ॥ २८ ॥

नारायणा पूर्णचैतन्या । पूर्णापूर्ण सौजन्या ।
श्रुतितुजमाजि मौन्या । मौन्यरूपी नांदसी सदा ॥ २९ ॥

तूं परमेश्वर परेपरता । सकळ देहीं देहहर्ता ।
सकळ रूपें हे सत्य वार्ता । वेद बोलोनी गेले ॥ ३० ॥

ऐशिया नमो हो देवा । महामूर्ति निरंजन ठेवा ।
तो तूं पुंडलिक अनुभवा । रूपरेखें आलासी ॥ ३१ ॥

विनट विठ्ठलमूर्ति । युगें अठ्ठावीस कीर्ति ।
वीटे नीट लक्ष्मीपती । भक्तालागीं तिष्ठसी ॥ ३२ ॥

भक्तालागीं दयाळु । दीनदयानिधि गोपाळु ।
तूं द्वारकेचा भूपाळु । बाळलीला अवतरलासी ॥ ३३ ॥

निराभिवरासंगम । चंद्रभागेचा उगम ।
माजीं सर्वात्माराम । वृंदावनीं खेळसी ॥ ३४ ॥

वैकुंठादि वैकुंठवासा । वैकुंठरूपा जगदीशा ।
सर्वज्ञा हृषिकेशा । त्राहे त्राहे स्वामिया ॥ ३५ ॥

समाधिधन देवा तूंचि । समाधी सेज तूंचि रची ।
समाधि हे जिवाची । शिवाशीं मेळवी ॥ ३६ ॥

अनंत जन्माचें संचित । अनंत दोष दुर्घटित ।
अनंत नामाचा संकेत । हारपे तुजमाजीं ॥ ३७ ॥

ऐसी सोपान स्तुति करीत । तेणें संतोषला पंढरीनाथ ।
त्वां जग तारिलें समस्त । कीर्तनें करूनी ॥ ३८ ॥[१]

नामा म्हणे ऐसें स्तवन । सोपान देवें केलें संपूर्ण ।
मग बोले जगज्जीवन । तयाप्रती ॥ ३९ ॥

[११२५]

आतां स्तुति पुरे पुरे सोपाना । प्रेमळाचिया निधाना ।
संतुष्ट जालों रे वचना । एक एका तुझिया ॥ १ ॥

---

अभंग ११२५—(तं.), (आ.), (धु.) व (पा.)
१ काही प्रतींत हा चरण सापडत नाही. (बा.)

तूं अवतार चतुरानन । ऐसें बोलिले जगज्जीवन ।
तंव स्तवन करितां सोपान । तो मौन्यचि राहिला ॥ २ ॥
सर्वोत्तम म्हणे चतुरा । महा विचाराच्या सारा ।
पवित्ररूपा परिकरा । सकळ [१]जनासी तूंची ॥ ३ ॥
मग पाचारिलीं तीर्थें । जे जे तीर्थरूप सामर्थ्यें ।
म्हणे उदक द्यावें स्नानातें । सोपानदेवासी ॥ ४ ॥
गंगा जान्हवी मंदाकिनी । भोगावती [२]भीमरथी तिन्ही ।
येती जालिया माध्यान्हीं । पंचारती घेऊनियां ॥ ५ ॥
योगी सिद्ध प्रसिद्ध । नाथादि नारायण नवविध ।
आणि सनकादिक अगाध । नारद तुंबर पातले ॥ ६ ॥
देवीं आदरिलें स्तवन । ऋषीं वेदघोष आरंभिले पूर्ण ।
सनकादिकीं भाष्य जाण । हा हा हु हु गंधर्व ॥ ७ ॥
मंगळ तुरे वाजती । महावैष्णव हरिकथा करिती ।
नामा म्हणे पुढतो पुढतीं । चरणा लागे सोपान ॥ ८ ॥

[ ११२६ ]

नमो ज्योतिर्मय ब्रह्मा । आनंद ईश्वर पुरातन ।
नमो नारायणा कमळ-कोंदणा । नमो नमो स्वामिया ॥ १ ॥
नमो सद्‌गुरु निवृत्ति । नमो रखुमाईच्या पति ।
नमो ज्ञानमूर्ती । अगम्य पुरुषा ॥ २ ॥
नमो भक्ति मुक्ति चैतन्य माया । नमो कर्ता हर्ता काया ।
नमो आदि पुरातन पाया । परब्रह्मा ॥ ३ ॥
नमो विराट पुरुषा पुरातना । नमो जगज्जीवना करुणाघना ।
चराचरपालका आनंदघना । अंगिकारीं नमना माझिया ॥ ४ ॥
नमो ब्रह्मांडव्यापका । नमो गुणातीता मायांतका ।
चुकवी जन्ममरण एका । तारी विश्वकृपेनें ॥ ५ ॥
नमो जळस्थळ रक्षिता । आदी अवसानी तारिता ।
नमो रोमारोम अव्यक्ता । नमो नमो दीनबंधू ॥ ६ ॥

---
अभंग ११२६—(आ.)
१ जालासी (तं.) २ भागिरथी (आ.)

नमो विराट महद्‌ब्रह्मा । निष्कलंक परब्रह्मा ।
योगियांच्या सुखधामा । नमो नमो दयाळा ॥ ७ ॥
औट हातीं ध्वनी । नमो नमो अंतःकरणीं ।
नमो नमो सत्रावी त्रिवेणी । त्रिपुटी जेथें ॥ ८ ॥
नमो विटेवरी सदटा । नमो वैकुंठीचिये पीठा ।
आदी अंतीं एकटा । नमो आदिपुरुषा ॥ ९ ॥
आदी अंतीं शेवटीं । सहस्रदळीं गुह्य पिठीं ।
नमो उघडी दृष्टि । स्वरूपीं तुझ्या ॥ १० ॥
नमो पायीं पडली मिठी । नमो बांधिली हृदयीं गांठी ।
तुझें स्वरूप हृदयसंपुष्टीं । धरून ठेविलें स्वामिया ॥ ११ ॥
नमो गेलें आलें । नमो जालें तें जालें ।
नमो सांभाळुनी तुझें । ठेवी आम्हां ॥ १२ ॥

[११२७]

नमो नमो गणपति । नमो सरस्वती ।
नमो नमो रमापति । दीनबंधु ॥ १ ॥
नमो योगी दिगंतरा । नमो वैष्णवांचिया भारा ।
नमो गंधर्व ऋषीश्वरा । लहान थोरां ॥ २ ॥
नमो नमो अंतरीं । नमो नमो दिशा चारी ।
नमो अंतरबाहेरीं । एकत्व एक ॥ ३ ॥
नमो अनंता अनंत-नामा । जानकीश जगज्जीवना ।
जयजय रामारामा । तुज नमो ॥ ४ ॥
नमो मत्स्य कच्छ अवतार । नमो सिंह सुकर ।
नमो परशुराम फरशधर । वामना तुज नमो ॥ ५ ॥
नमो रामा वेदपाळका । नमो इंद्रियेंचालका ।
नमो बोधभाविका । श्रीविठ्ठला ॥ ६ ॥
नमो कलंकी विनटला । पटला विठ्ठला ।
सारासार नटला । तुज नमो ॥ ७ ॥
निरामय निर्णय तुज । नमो नमो चतुर्भुज ।
नमो सर्व जगदात्मज । अनाथनाथा ॥ ८ ॥

अभंग ११२७—(आ.)

अनुक्रमणिका

नमो बारा ज्योतिर्लिंगा । नमो पंढरी पांडुरंगा ।
नमो भिवरा चंद्रभागा । नमो वैकुंठपीठा ॥ ९ ॥
मी काय जाणें नामस्थिती । नमन केलें भोळे भक्ती ।
नमन श्रीपती । मान्य जालें ॥ १० ॥
नमन निवृत्ति ज्ञानेश्वरा । नमो सोपान वटेश्वरा ।
नमन मुक्ताबाई निर्झरा । सत्रावींच्या ॥ ११ ॥
नमो हंसा सुअक्षरा । नमो व्यापका चराचरा ।
नमो नमो अव्यक्त विषयावरा । पांडुरंगा ॥ १२ ॥
नमन तुमचें तुम्ही केलें । नमन सहजासहज जालें ।
नेणें काय आलें गेलें । सद्गुरुनाथा ॥ १३ ॥

[११२८]

उभयतांनीं नमन केलें यथासांग । अर्थी पांडुरंग साह्य केला ॥ १ ॥
कळवळिले संत वैष्णवांचे भार । आणिक योगेश्वर स्फुंदताती ॥ २ ॥
गरुड हनुमंत विसोबा खेचर । लावितो पदर डोळियासी ॥ ३ ॥
निवृत्ति मुक्ताबाई चांगदेवासहित । परसा भागवत शोक करी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा खेद सिंधू लोटा । उठा आतां भेटा सोपानासी ॥ ५ ॥

[११२९]

सोपानदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर निवृत्तीच्या ॥ १ ॥
सवें मुक्ताबाई सद्गुरु निवृत्ति । लक्ष्मीचा पति घेतलिया ॥ २ ॥
जयजयकार ध्वनि होताती अपार । जाती योगेश्वर समाधीसी ॥ ३ ॥
राही रखुमाई निळकंठ जवळी । समाधिच्या पाळी अवघे जण ॥ ४ ॥
समाधि पायरीवरी वटेश्वर सोपान । मागितला मान पांडुरंगा ॥ ५ ॥
प्रतिवर्षी भेटी देऊं उभयतां । आळंकापुरीं जातां उत्सवासी ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा कृपा केली फार । दिधला कीं वर भक्तराज ॥ ७ ॥

[११३०]

निवृत्ति मुक्ताईनें धरियेलें मौन । वटेश्वर सोपान त्यागियेला ॥ १ ॥
समाधि पताकांची पडली सावली । उतरले खालीं योगीराज ॥ २ ॥

---

अभंग ११२८ ते ११३०—(आ.)

अनुक्रमणिका

पांडुरंगासंगें गेले ऋषीश्वर । सोपान वटेश्वरीं बैसविले ॥ ३ ॥
शिवाचा अवतार सद्गुरु निवृत्ति । मुक्ताबाई सखी तुम्हांपाशीं ॥ ४ ॥
अंतरीचें जाणतां बा पंढरीनाथ । आले अश्रुपात सोपानासी ॥ ५ ॥
सोपानाची बोळवण करितसे हरी । दीर्घ ध्वनी करी नामदेव ॥ ६ ॥

[ ११३१ ]

धूप आणि दीप उजळिल्या ज्योति । तेव्हां ओसंडती अवघे जन ॥ १ ॥
सोपान वटेश्वरें केला नमस्कार । उतरले पार भवसिंधू ॥ २ ॥
घेतियेलें तीर्थ तंव झालें विकळ । झांकियेले डोळे ब्रह्मबोधें ॥ ३ ॥
निवृत्ति मुक्ताई राहिलीं बाहेरी । आतां तुम्ही हरि सांभाळावें ॥ ४ ॥
देव ऋषीश्वर निघाले बाहेर । केला नमस्कार नामदेवें ॥ ५ ॥

[ ११३२ ]

जयजयकारें टाळी पिटली सकळां । घातियेली शिळा समाधिसी ॥ १ ॥
निवृत्तिमुक्ताईनें घातियेली घोन । करितो समाधान पांडुरंग ॥ २ ॥
सोपान वटेश्वर सुखधामीं शेजा । करिताती पूजा समाधीची ॥ ३ ॥
खेद दुःख जालें अवघ्या साधूजनां । केली प्रदक्षिणा समाधीसी ॥ ४ ॥
निवृत्तिमुक्ताईनें वंदिली समाधि । देहभान शुद्धि हारपली ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा उठा अवघेजण । करूं आचमन भोगावतीं ॥ ६ ॥

[ ११३३ ]

वैष्णवांनीं केली समाधि प्रदक्षिणा । गेले आचमना भोगावतीं ॥ १ ॥
सारी रात्र कीर्तन केलें त्रयोदशीं । चतुर्दशी दिवशीं भोजनें केलीं ॥ २ ॥
अमावास्ये जागरण केलें परिपूर्ण । प्रतिपदे गमन वैष्णवांचें ॥ ३ ॥
निवृत्ति मुक्ताई जाली उदासी । आतां हृषिकेशी बोळवावें ॥ ४ ॥
चांगा म्हणे माझी करा बोळवण । घेऊनि नारायण समागमें ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा माघ मास नेमा । चांगदेवा प्रेमा समाधि देऊं ॥ ६ ॥

---
अभंग ११३१ ते ११३३—(आ.)

अनुक्रमणिका

[११३४]

सव्य हातें नगर घेती ऋषीश्वर । केला नमस्कार समाधीसी ॥ १ ॥
परतले देव आणि सुरगण । चाललीं विमानें वैष्णवांचीं ॥ २ ॥
निवृत्ति मुक्ताबाई चांगदेव संगें । रूक्मिणी पांडुरंग समुदायेंसी ॥ ३ ॥
नामा म्हणे देव गंधर्व ऋषिमुनी । जाती उत्तरायणीं निवृत्तिराज ॥ ४ ॥

[११३५]

निवृत्तिदेवासंगें देव ऋषीश्वर । उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥
प्रतिपदीं देव निघाले बाहेर । केला नमस्कार समाधीसी ॥ २ ॥
अवघियांसहित वैष्णव मंडळी । सवें वनमाळी चालताती ॥ ३ ॥
गोदातीरा जाया निवृत्ति उद्देशी । सह समुदायेंशी उठावले ॥ ४ ॥
नामा म्हणे घेतला नारायण संगें । चालिले अनेगें भक्तराज ॥ ५ ॥

अभंग ११३४ व ११३५—(आ.)

[११३६]

निवृत्तिदेवा योग्य गंगेचें तें स्नान । करूं अवघेजण आवडीनें ॥ १ ॥
तीर्थयात्रा होईल देवसमागमें । केवढा महिमा रामें सांगितला ॥ २ ॥
मार्गीं चालताती भक्त आणि हरी । आले भुलेश्वरीं अवघेजण ॥ ३ ॥
भुलेश्वरालागीं पूजा केली सांग । भक्त पांडुरंगें तीन रात्रीं ॥ ४ ॥
तेथून वैष्णव चालियेले हरी । आले सिद्धेश्वरीं देवभक्त ॥ ५ ॥
पाराशर ऋषींचें स्थळ पुरातन । राहिले नारायण पंचरात्र ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा जावें कपिलेश्वरा । आनंद ऋषीश्वरा जाला फार ॥ ७ ॥

[११३७]

कौतुकानें तेथें आले सावकाश । उभे हरिदास कीर्तनासी ॥ १ ॥
दहा दिवस तेथें राहियेले स्वस्थ । अवघ्यांचा मनोरथ पूर्ण जाला ॥ २ ॥
क्षेत्रींचा महिमा पुसिती देवासी । [1]जना आगळी काशी सांगियेली ॥ ३ ॥
येथोनियां वाट जाते वाराणसी । मुनि आणि ऋषि आनंदले ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा दिवस जाले फार । लागेल उशीर समाधीसी ॥ ५ ॥

[११३८]

चालिले घेऊनि देव ऋषीश्वरा । आवघियां पुढारां गरुडदेव ॥ १ ॥
दिवसानुदिवस चालिले सत्वर । पहावें गोदातीर म्हणोनियां ॥ २ ॥
धन्य गोदातीर धन्य कचेश्वर । जाती ऋषीश्वर स्नानालागीं ॥ ३ ॥
सारा पौष मास गेला कचेश्वरीं । नित्य गंगातीरीं स्नानसंध्या ॥ ४ ॥
पाहिला कचेश्वर पाहिली ती गोदा । आली प्रतिपदा माघमास ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा जावें पुण्यस्तंभा । मनोहर जागा सिद्धेश्वर ॥ ६ ॥

[११३९]

उठले वैष्णव कीर्तन गजरीं । आले सिद्धेश्वरीं आश्रमासी ॥ १ ॥
पौर्णिमेपावेतों राहिले निश्चळ । नेमा आतां स्थळ समाधीसी ॥ २ ॥

अभंग ११३६—(आ.), ११३७—(बा.), ११३८ व ११३९—(आ.)
१ जवा आगळी (बा.)

अनुक्रमणिका

निवृत्ती मुक्ताई संगें आला चांगा । म्हणती पांडुरंगा उठा आतां ॥ ३ ॥
ज्ञानदेवासाठीं उत्सव आळंकापुरीं । तैसा कऱ्हेतीरीं सोपानासी ॥ ४ ॥
तैसी चांगयाची पुरवावी आळी । नामा वनमाळी उठावले ॥ ५ ॥

[ ११४० ]

दशमीचे दिवशीं ठेविलें प्रस्थान । साधियेला येणें देव गुरु ॥ १ ॥
दिधला मंडप सिद्धेश्वरासमोर । उठावले भार वैष्णवांचे ॥ २ ॥
सर्व स्वस्थ तेथें बैसले मिळून । नारद कीर्तन पुढें होत ॥ ३ ॥
धन्य पुण्यस्तंभ धन्य गंगातीर । धन्य दिसती भार पताकांचे ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा निजभक्तीसाठीं । अंगें होसी कष्टी पांडुरंगा ॥ ५ ॥

[ ११४१ ]

गोदातीरीं उत्सव करिती जगजेठी । चांगदेवासाठीं समारंभ ॥ १ ॥
निवृत्ति मुक्ताबाई संगें पंढरिनाथ । आले मंडपांत समुदायेंसी ॥ २ ॥
निवृत्ति पांडुरंग बैसले निवाडे । चांगदेव पुढें उभे ठेले ॥ ३ ॥
जोडियेले कर चांगदेवें पुढतीं । करिती विनंति वोसंडोनी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा उठिलें अंतःकरण । नाहीं देहभान चांगयासी ॥ ५ ॥

[ ११४२ ]

चवदाशें वर्षें शरीर केलें जतन । नाहीं अज्ञानपण गेलें माझें ॥ १ ॥
अहंकारें माझें बुडविलें घर । जालों सेवा [1]थोर स्वामीसंगें ॥ २ ॥
तापत्रयीं तापलों महाअग्नीं जळालों । अविवेकीं जालों मंदमती ॥ ३ ॥
काय माझा देह वायांविण व्यर्थ । आलों शरणागत पांडुरंगा ॥ ४ ॥
अभिमानें आलों श्रीआळंकापुरीं । अज्ञान केलें दुरी मुक्ताईनें ॥ ५ ॥
नामा म्हणे योग दुःखाचें शरीर । काय याचा घोर करूनियां ॥ ६ ॥

[ ११४३ ]

नाना दुःख माया आठवती मना । आतां नारायणा कृपा करी ॥ १ ॥
माझ्या पातकांचा लागूं नेदी अंत । ऐसें माझें चित्त साक्ष असे ॥ २ ॥

अभंग ११४० व ११४१—(आ.), ११४२—(भा.), ११४३—(पं.)
१ चोर (वा.)

अनुक्रमणिका

ज्ञानाग्नि माझी करा तृणवत । होऊनि कृपावंत श्रीहरी ॥ ३ ॥
योगिराज यासी नाहीं पापदोष । केला उपदेश मुक्ताईनें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा पेटलें अंतर । करा आतां स्थिर योगिराज ॥ ५ ॥

[११४४]

अवघ्या विद्येचा करूनी अभ्यास । पावलों मी क्लेश देवराया ॥ १ ॥
मुक्ताबाई योगें उतरलों भवसिंधु । तैशी दीनबंधु कृपा करी ॥ २ ॥
पतितपावन नाम तुझें थोर । करीं अंगिकार अनाथाचा ॥ ३ ॥
धन्य आमुचें भाग्य जाहलें दर्शन । अंगें नारायण साहित्य करी ॥ ४ ॥
चांगदेवें ऐसें आठविलें फार । केला नमस्कार नामा म्हणे ॥ ५ ॥

[११४५]

कृपावंत जाली जेव्हां मुक्ताबाई । स्वरूप दिशा दाही दाखविलें ॥ १ ॥
पाठीं पोटीं स्वरूप केलें सद्गुरूनें । तंव अभिमान गेला माझा ॥ २ ॥
याच्या उपकाराची काय वर्णूं थोरी । ज्यांच्यासंगें हरि जोडियेला ॥ ३ ॥
पुरे पुरे आतां आठविसी फार । होईल उशीर समाधीसी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा उठा संतजन । करूं आतां स्नान गौतमींसी ॥ ५ ॥

[११४६]

हरिपाठ गजरें केला जयजयकार । उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥
टाळ मृदंग वाजती अपार । मिरविती भार वैष्णवांचे ॥ २ ॥
दोहीं बाहीं उभे पताकांचे भार । मध्यें मनोहर गौतमी ते ॥ ३ ॥
विसोबा खेचरें पुंडलिका हातें । आणिलें साहित्य समाधीचें ॥ ४ ॥
नामा म्हणे हरि चांगदेवा स्नान । घाली आवडीनें प्रेमयुक्त ॥ ५ ॥

[११४७]

निवृत्ति मुक्ताई गोविंद गोपाळ । उठले सकळ स्नानालागीं ॥ १ ॥
राही रखमाई सहसमुदायेंसी । मुनि आणि ऋषि उठावले ॥ २ ॥

अभंग ११४४ व ११४५—(आ.), ११४६—(पं.), ११४७—(बा.)

अनुक्रमणिका

करूनियां स्नान निघाले सकळ । नाचती गोपाळ गोदातीरी ॥ ३ ॥
चांगदेवें सोवळें होऊनियां त्वरें । देव ऋषीश्वर पूजियेले ॥ ४ ॥
धन्य गोदातीर आदि हे अनादि । [1]उरकिली समाधि यथासांग ॥ ५ ॥
नामयाचे पुत्र नारा विठा गोंदा । जागा झाडी महादा समाधीची ॥ ६ ॥

[११४८]

चांगदेव योगी निष्काम चांगला । स्वरूपीं रंगला केशवाच्या ॥ १ ॥
सुगंध अक्षता पुष्पें परिमल । पूजिले सकळ साधुसंत ॥ २ ॥
राही रखमाई आणि पांडुरंग । पूजियले सांग चांगदेवें ॥ ३ ॥
पूजिली मुक्ताई सद्‌गुरु निवृत्ति । आणिक विभूति गौरविले ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां नका राहूं स्थिर । होईल उशीर समाधीसी ॥ ५ ॥

[११४९]

उठियेलें देव गोपाळ मंडळी । बैसले ते पाळी समाधीचे ॥ १ ॥
निशीं सर्व कीर्तन वद्य माघमासीं । व्रत एकादशी गोदातीरीं ॥ २ ॥
द्वादशी पारणें वैष्णव सोडिती । बैसल्या त्या पंक्ती सिद्धेश्वरीं ॥ ३ ॥
सिद्धेश्वरीं पूजा केली चांगयानें । पात्रें नारायण टाकूं लागे ॥ ४ ॥
राही रखुमाई करिती पक्वानें । सोडिती पारणें चांगदेव ॥ ५ ॥
चांगदेवासंगें निवृत्ति मुक्ताई । बैसले ते पाही वैष्णवांत ॥ ६ ॥
नामा म्हणे आतां करावीं भोजनें । ताटें रखुमाईनें विस्तारिलीं ॥ ७ ॥

[११५०]

एकमेळीं जेविती वैष्णव सकळ । वाढिती गोपाळ सकळांसी ॥ १ ॥
पांडुरंगें केला चांगोबाचा सोहळा । माळ घाली गळां पुंडलिक ॥ २ ॥
गंध आणि अक्षता विसोबाचे हातीं । महापूजा होती चांगोबाला ॥ ३ ॥
आरत्या पंचारत्या करिती आनंदानें । नामा म्हणे प्रेमें वोसंडलें ॥ ४ ॥

अभंग ११४८ ते ११५०—(आ.)
१ उकरिली (बा.)

अनुक्रमणिका

[ ११५१ ]

निवृत्ति मुक्ताईचे वोसंडले नयन । करितो समाधान पांडुरंग ॥ १ ॥
विसोबा खेचराचे भरोनि येती डोळे । परिसा तळमळे पुंडलिक ॥ २ ॥
नाना खेद करूनि सारिलें भोजना । जाती आचमना गंगेलागीं ॥ ३ ॥
आंचवले देव वैष्णव ते ऋषी । जाती समाधीसी चांगदेव ॥ ४ ॥
जेवूनियां संत बैसले निवाडे । गोंदा महादा विडे वांटिताती ॥ ५ ॥
नामा म्हणे सर्वे उठे नारायण । आले अवघेजण समाधीपाशीं ॥ ६ ॥

[ ११५२ ]

मुक्ताईनें चांगा घेतलासे पोटा । उठा आतां भेटा लहान थोर ॥ १ ॥
भेटले ऋषीश्वर वैष्णव सकळीं । बैसले ते पाळी समाधीच्या ॥ २ ॥
निवृत्ति मुक्ताईसी केला नमस्कार । उतरिले पार भवसिंधू ॥ ३ ॥
विठ्ठल रखुमाईसी केली प्रदक्षिणा । मग शुद्ध नमना आरंभिलें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा निवृत्ति मुक्ताई । चांगा लागे पायीं जाऊनियां ॥ ५ ॥

[ ११५३ ]

नमो अनादि चक्रपाणि । नमो निवृत्ति ज्ञानस्वामी ।
नमो सोपान संजीवनी । मुक्ताबाई ॥ १ ॥
नमो सद्गुरु मुक्ताई । नमो स्वस्वरूप ठायीं ठायीं ।
नमो वंदितसे पायीं । नमो नमो परम पद ॥ २ ॥
नमो सूर्येन्धशनी । नमो भ्रूमध्य आटणी ।
नमो माय कुंडलिणी । योगियांची ॥ ३ ॥
नमो त्रिविधताप हरण । नमो विषय निवारण ।
नमो स्वामि निष्काम । कर्ता हर्ता नमो ॥ ४ ॥
नमो अर्ध नासिक धसनी । नमो पाठीपोटीं दाटणी ।
नमो जनीं वनीं । चिन्मयछत्र ॥ ५ ॥
नमो योगमाया दिगंबर । नमो व्यापक चराचर ।
नमो दाही अवतार । परब्रह्म नमो ॥ ६ ॥

अभंग ११५१ ते ११५३—(आ.)

कंद कळीकाळ हरणा नमो । तुझेनि परब्रह्म गमो ।
शांति अव्यक्त क्षमो । श्रीहरी ॥ ७ ॥

नमो संसार निरसिता । नमो माया हर्ता ।
नमो अद्वय अनंता । पांडुरंगा ॥ ८ ॥

नमो पातकसंहारी । नमो परब्रह्म खेचरी ।
नमो योग अगोचरीं । परमात्मा आत्मा ॥ ९ ॥

नमो शिवशिवेशा । नमो आदिगुरु जगदीशा ।
नमो प्रकाश प्रकाशा । परब्रह्मा ॥ १० ॥

पुरे पुरे येरझारा । नमो वेव्हार सारा ।
नमो शारंगधरा । अंतःकरण पाहासी ॥ ११ ॥

नमो मुक्ताईच्या उपदेशा । नमो आदि अनंता जगदीशा ।
स्वरूपादि परेशा । जगद्गुरु नमो नमो ॥ १२ ॥

नमस्ते नमस्ते निवृत्ति । नमस्ते नमस्ते ज्ञानमूर्ती ।
नमस्ते नमस्ते सोपान ज्योती । परेशा नमो ॥ १३ ॥

[११५४]

लाविली कौपीन पितांबरी एक । त्यागिली अनेक महत् माया ॥ १ ॥
सव्य हातें घेतलें संतसाधुजनां । केली प्रदक्षिणा समाधीसी ॥ २ ॥
समाधीचे पाळी निवृत्ती वनमाळी । अंतरीं कळवळी मुक्ताबाई ॥ ३ ॥
आणिकांच्या डोळां अश्रुपात येत । होईल कीं गुप्त योगिराज ॥ ४ ॥
चांगदेवा दिधली विठोबाचीं पाऊलें । तीर्थ तें घेतलें देवगुरूचें ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि जाली आळवण । करा बोळवण चांगोबाची ॥ ६ ॥

[११५५]

पुंडलिकें धरिला चांगोबाचा हात । तंव सकळ संत कळवळती ॥ १ ॥
पताकांचे भार समाधि भोंवते । तेव्हां साधुसंत उठावले ॥ २ ॥
यांच्या या ज्ञानाचा अंतपार नाहीं । भली मुक्ताई ओसंडली ॥ ३ ॥
संतसमागम फळला तुजला । एकांत फावला मुक्ताई ॥ ४ ॥
मसुरेप्रमाणें दावियेली खूण । तेंचि पूर्ण ब्रह्म योगियाचें ॥ ५ ॥

अभंग ११५४ व ११५५—(आ.).

अनुक्रमणिका

फार दिवस तुम्हीं रक्षिलें शरीर । मुक्ताईनें पार उतरिलें ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा सद्गुरूचा महिमा । बाप पूर्ण आम्हां पांडुरंग ॥ ७ ॥

[११५६]

कुंकुम केशराचे समाधीसी सडे । पहाती निवाडे जनलोक ॥ १ ॥
गोदातीरीं महोत्सव चांगदेवा । पूर्ण तूं विसावा पांडुरंगा ॥ २ ॥
समाधीभोंवते उभे साधुसंत । उतरले आंत चांगदेव ॥ ३ ॥
निवृत्ति पांडुरंग गेले समागमें । वैष्णव रामराम बोलताती ॥ ४ ॥
राहि रखुमाबाई उभ्या दोहीं बाहीं । मध्यें मुक्ताबाई संबोखिती ॥ ५ ॥
नामा पुंडलिक करिती समाधान । स्थिर करा मन बोधभावें ॥ ६ ॥

[११५७]

समाधीशी शेज घातली मनोहर । बैसविले वर चांगदेव ॥ १ ॥
आनंदानें टाळघा पिटिति वैष्णवभार । लाविती पदर डोळियासी ॥ २ ॥
टाळ मृदंगाचा जाला झणत्कार । गेले योगेश्वर समाधीसी ॥ ३ ॥
सांडिलीं भूषणें भस्म आभरणें । जाले निमग्न परब्रह्मीं ॥ ४ ॥
झांकियेले नेत्र उन्मनीच्या संगें । निवृत्ति पांडुरंग ओसंडले ॥ ५ ॥
नामा म्हणे जाला समाधिस्थ योगेश्वर । निघाले बाहेर देवभक्त ॥ ६ ॥

[११५८]

भूचरी खेचरी चांचरी निश्चळा । अगोचरी डोळा स्थिरावली ॥ १ ॥
झांकिली समाधी संतसज्जनांनीं । तुलसी पुष्पें वरूनि वर्षताती ॥ २ ॥
निवृत्तीची मिठी विठोबाच्या गळां । आणिकांच्या डोळां अश्रू येती ॥ ३ ॥
केलें समाधान विठ्ठल रखुमाईनें । निवृत्ति म्हणे राहणें काय आतां ॥ ४ ॥
गेले योगिराज राहिले ठायीं ठायीं । आतां मुक्ताई जाईल कीं ॥ ५ ॥
स्वरूपींचे ओघ जातील स्वरूपीं । नामा म्हणे निरोपी पांडुरंग ॥ ६ ॥

[११५९]

देवें समाधान केलें अवघेजण । चला आचमना गौतमीसी ॥ १ ॥
वद्य त्रयोदशी दिधली समाधी । महोत्सव गोविंदीं समर्पिला ॥ २ ॥

---

अभंग ११५६ ते ११५९—(आ.)



अनुक्रमणिका

गर्जती वैष्णव विठोबाच्या नामा । थोर तुझा महिमा दीनबंधु ॥ ३ ॥
समाधि प्रदक्षिणा केली अवघींजणीं । जाली बोळवणी चांगयाची ॥ ४ ॥
कीर्तन करीत आले गौतमीसी । देव मुनि ऋषि आंचवले ॥ ५ ॥
अवघ्यांनीं आचमनें केलीं गोदातीरीं । नामा म्हणे हरी आतां उठा ॥ ६ ॥

[ ११६० ]

आचमन करुनि आले सिद्धेश्वरा । हरि ऋषीश्वरा आर्जविती ॥ १ ॥
निवृत्ति मुक्ताईला त्यागूं नये कोणी । आतां उत्तरायणीं गमन करूं ॥ २ ॥
पांच दिवस उत्सव केला चांगदेवा । विश्वाचा विसावा श्रीहरी ॥ ३ ॥
वैष्णवांनीं समाधि बांधली साजिरी । सुवर्णाचा वरी पिंपळ तो ॥ ४ ॥
केला नमस्कार वैष्णवांनीं जेव्हां । मुक्ताई तेव्हां वोसंडली ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा तीर्थक्षेत्र चांगलें । चित्त मन रंगलें चांगयाचे ॥ ६ ॥

[ ११६१ ]

शुद्ध फाल्गुन मासीं वैष्णव हृषिकेशी । पंचमीचे दिवशीं सिद्ध जाले ॥ १ ॥
निवृत्तिराज म्हणे जावें म्हाळसापुरीं । जेथें ज्ञानेश्वरी पूर्ण जाली ॥ २ ॥
उठावले भार देवऋषीश्वर । केला नमस्कार समाधीसी ॥ ३ ॥
सव्यहातें क्षेत्र घेतलें वैष्णवांनीं । चालली विमानें नेवाशासी ॥ ४ ॥
नामा म्हणे देव निघाले बाहेर । कीर्तन गजर पुढें होती ॥ ५ ॥

अभंग ११६० व ११६१—(आ.)

• • •

अनुक्रमणिका

[११६२]

तेथोनि वैष्णव आले नेवाशासी । सहसमुदायेंसी देवराव ॥ १ ॥
म्हाळसेलागीं पूजा केली असे निगुतीं । राहिले दहा रात्रीं हृषिकेशी ॥ २ ॥
येथोनि चलावें पुढती शारंगधरा । जावें टोकेश्वरा स्नानालागीं ॥ ३ ॥
चहूं युगा आदि स्थळ पुरातन । आले नारायण गोदातीरीं ॥ ४ ॥
नामा म्हणे येथें रहावें हृषिकेशी । विजयादशमीशीं सिद्ध होऊं ॥ ५ ॥

[११६३]

देव म्हणे राहणें न घडेचि येथें । जावे आतां पुढतें उद्योगासी ॥ १ ॥
निवृत्तिराज म्हणे शुद्ध प्रतिपदा । जाऊं जी गोविंदा प्रतिष्ठाना ॥ २ ॥
अनादि जें स्थळ दाविलें नारायणें । मग प्रतिष्ठाना येते जहाले ॥ ३ ॥
चक्रतीर्थीं पोहा म्हणती आला थोर । वैष्णवांचे भार उतरले ॥ ४ ॥
नामा म्हणे हरी सहज आली वाट । आपेगांव कोठें सांगा स्वामी ॥ ५ ॥

[११६४]

मायभूमि पाहूं यांची आम्हीं डोळां । चलावें गोपाळा सहजासहज ॥ १ ॥
भक्त त्र्यंबकपंत मूळ पुरुष आदि । तयाची समाधि आपेगांवीं ॥ २ ॥
आपेगांवीं आले देव ऋषीश्वर । उतरले भार वैष्णवांचे ॥ ३ ॥
धन्य यांचें कुळ धन्य यांचा वंश । धन्य यांचें कुशीं योगिराज ॥ ४ ॥
नामा म्हणे आम्हां दाविलें नारायणें । जाली चौघीजणें याचि क्षेत्रीं ॥ ५ ॥

[११६५]

निवृत्ति मुक्ताईनें पाहुनि स्थळ डोळां । आलासे उमाळा ओसंडोनी ॥ १ ॥
तात आणि माता गेलीसे येथून । तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा ॥ २ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न । सांभाळी सोपान मजलागीं ॥ ३ ॥
तुझ्या योगें हरि क्रमियेलें काळा । फुटलासे मेळा तापसांचा ॥ ४ ॥
नामा म्हणे यांचें कळवविलें मन । करी समाधान पांडुरंग ॥ ५ ॥

---

अभंग ११६२—(आ.), ११६३—(न.), ११६४ व ११६५—(आ.)

अनुक्रमणिका

[ ११६६ ]

पाहिली गे माय पूर्वभूमि आपुली । बहुत सन्मानिली वैष्णवांनीं ॥ १ ॥
चैत्रमास शिवरात्र उत्सव आगळा । जावें पां वेरुळा घृष्णेश्वरा ॥ २ ॥
दशमीचे दिवशीं निघाले बाहेर । उठावले भार वैष्णवांचे ॥ ३ ॥
वेरूळ नगर असे पुरातन । विश्वकर्मा यानें कीर्ति केली ॥ ४ ॥
अगाध तें पुण्य बोलताती ऋषि । जावें वेरुळासी नामा म्हणे ॥ ५ ॥

[ ११६७ ]

मुक्ताई उदासी जाली असे फार । आतां हें शरीर रक्षूं नये ॥ १ ॥
त्यागिले आहार अन्नपाणी सकळीं । निवृत्तिराज तळमळी मनामाजीं ॥ २ ॥
गंधर्व सुरगण उठले सहमेळा । गेले ते वेरूळा अवघेजण ॥ ३ ॥
वेरुळाचा महिमा सांगे हृषिकेशी । [१]जवा आगळी काशी म्हणोनियां ॥ ४ ॥
वेरुळाची यात्रा केली यथासांग । मग पांडुरंग निघते जाले ॥ ५ ॥
चालिले श्रीरंग वैष्णवांचे भार । पाहावें तापीतीर नामा म्हणे ॥ ६ ॥

[ ११६८ ]

निवृत्तिराज म्हणे आतां पंढरिनाथा । मुक्ताईला जपा अवघेजण ॥ १ ॥
वेधली चित्तवृत्ति स्वरूपीं निमग्न । नाहीं देहभान मुक्ताईला ॥ २ ॥
अवघेजण जपती जपे नारायण । चालती घेऊन मध्यभागीं ॥ ३ ॥
निवृत्तिराजें धरिली मुक्ताई हातीं । सांभाळित जाती निशिदिनीं ॥ ४ ॥
पदोपदीं जपे निवृत्तिराज करें । आणिक ऋषीश्वर सांभाळिती ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा जातां तातडीनें । पुढें स्थळ कोण नेमियेलें ॥ ६ ॥

[ ११६९ ]

तापीचिये तीरीं महत्ग्राम थोर । असे सोमेश्वर पुरातन ॥ १ ॥
वद्य वैशाख मास दशमी निर्मळ । उष्णकाळ फार तापतसे ॥ २ ॥

अभंग ११६६ ते ११६९.—(आ.)
१ जना (आ.)

तेथें परशुरामें मारियेला बाण । पाहती पुरातन पश्चिमेस ॥ ३ ॥
पाहिलें माय आम्हीं तापीतीर । उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥
धन्य तापीतीर दिसे मनोहर । दोही थडी भार पताकांचे ॥ ५ ॥
नामा म्हणे हरी आवडीचें स्थळ । कण्हेर कमळ उदय जाला ॥ ६ ॥

[ ११७० ]

फुलले अनेक तरुवर तेथ । दुर्वा दर्भ आंत डवरले ॥ १ ॥
करंज जांभळी लागली एक थाटी । वरी बहु दाटी तरुवरांची ॥ २ ॥
अमृतफळें अपार विस्तारले फार । त्यामाजीं मयूर टाहो देती ॥ ३ ॥
कंठ कोकिळा त्या सुस्वर गायन । तरुवर सुमनें परिमळते ॥ ४ ॥
पारिजातकांची दाटी थाटी जाली भारी । आंत मैलागिरी डुल्लताती ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा भला हा एकांत । मार्कंडेयें येथें तप केलें ॥ ६ ॥

[ ११७१ ]

सोनियाचीं झाडें अनेक कर्दळी । त्यांत रानकेळी फोंफावल्या ॥ १ ॥
सिताफळी भरित अवघी तापीथडी । दाट दिसती गाढी रामफळें ॥ २ ॥
तापीतीरीं ऋषि आणि शारंगधर । पाठीमागें भार वैष्णवांचे ॥ ३ ॥
धन्य महत्नगर धन्य सोमेश्वर । धन्य तापीतीर योगियांचें ॥ ४ ॥
उष्णकाळीं छाया आवडती फार । म्हणती ऋषीश्वर रम्य स्थळ ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा रंगलें अंतःकरण । उतरती विमानें गंधर्वांची ॥ ६ ॥

[ ११७२ ]

उदित कमळें नानावर्ण सुंदर । फुलले तरुवर नानारूपें ॥ १ ॥
श्वेतपीतरक्त भ्रमर रुणझुण । होताती श्रवण वैष्णवांसी ॥ २ ॥
गुंजारव भ्रमती रत्नकीळा फांकती । मनोहर दिसती सुरवरांला ॥ ३ ॥
तरुवर गगनीं अंकुरले भारी । विजा तें कोंदल्या बहुतांपरी ॥ ४ ॥

अभंग ११७० ते ११७२—(आ.)

अनुक्रमणिका

गंधर्व गायनें आलापित सुस्वरीं । केलें स्पष्ट नयनीं गुह्य गौप्य ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा मन जालें स्थिर । पडियेला विसर अविद्येचा ॥ ६ ॥

[ ११७३ ]

निवृत्तीनें एकांत केला मुक्ताईशीं । गमन कोणे दिवशीं आरंभिलें ॥ १ ॥
मुक्ताई म्हणे जावें यावें कोठें । अवघें निघोट स्वरूप स्वामी ॥ २ ॥
गर्जतां गगन कडाडली वीज । स्वरूपीं सहज मिळयेली ॥ ३ ॥
मावळला दीप ज्योत कोठें होती । सहज सामावती निरंजनीं ॥ ४ ॥
नामा म्हणे हरि जाईल पाहतां । ऐसें माझें चित्ता कळों आलें ॥ ५ ॥

[ ११७४ ]

आमुच्या स्वस्थानीं नाहीं पां अंधार । अवघीं चराचर प्रकाशत्वें ॥ १ ॥
उदयु आणि अस्तु नाहीं स्वरूपासी । ऐसें मुनि ऋषि जाणताती ॥ २ ॥
आम्हीं कधीं आलों स्वरूप सोडोन । जावें पालटोन जेथिल तेथें ॥ ३ ॥
अंतर बाहेर स्वामीचें स्वरूप । स्वयें नंदादीप उजळिला ॥ ४ ॥
वद्य वैशाखमासीं दशमीचे दिवशीं । गेले ते स्नानासी तापीतीरीं ॥ ५ ॥
नामा म्हणे गोविंदा मनोहर पद्मनाभा । अंकुरला गाभा विराटाचा ॥ ६ ॥

[ ११७५ ]

टाळ विणे मृदंग सुस्वर गायन । कोंदलें गगन दाही दिशा ॥ १ ॥
प्रळयींच्या विजा वर्षती अपार । जाला धुंधकार दाही दिशा ॥ २ ॥
करोनियां स्नान बैसले बाहेर । म्हणती अंधकार फार जाला ॥ ३ ॥
झंझाट सुटला वारा कापूं लागे धरा । नभचि अंतरा कालवलें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा जाली कैसी गती । पडलीसे भ्रांति अवघ्या जनां ॥ ५ ॥

[ ११७६ ]

निवृत्तिराज म्हणे प्रळयींचा वारा । सुटला शारंगधरा ऐसें वाटे ॥ १ ॥
हालतें गगन डोलती विमानें । गेलें देहभान अवघियांचें ॥ २ ॥

अभंग ११७३ ते ११७६—(आ.)

अनुक्रमणिका

अवचियांचे डोळे झांकले एकट । माध्यान्हीं अभूट वळुनि आलें ॥ ३ ॥
निवृत्ति पांडुरंग राही रखुमाई । धरा म्हणती धाई मुक्ताईला ॥ ४ ॥
नामा म्हणे केशवा जाहला उबाळा । कांहीं केल्या डोळा उघडों नेदी ॥ ५ ॥

[११७७]

ऋषि म्हणती हरि पातलेसें विघ्न । आतां कैसे प्राण वांचतील ॥ १ ॥
कोणाचिया शुद्धि नाहींचिया कोणा । म्हणती नारायणा मृत्यु आला ॥ २ ॥
कडाडली वीज निरंजनीं जेव्हां । मुक्ताई तेव्हां गुप्त जाली ॥ ३ ॥
वैकुंठीं लक्ष घंटा वाजती एकघाई । जाली मुक्ताई स्वरूपाकार ॥ ४ ॥
एक प्रहर जाला प्रकाश त्रिभुवनीं । जेव्हां निरंजनीं गुप्त जाली ॥ ५ ॥
गेलें निवारूनी आकाश अभूट । नामा म्हणे कोठें मुक्ताबाई ॥ ६ ॥

[११७८]

उघडिल्या दिशा उघडिलें गगन । पाहिलें वदन भास्कराचें ॥ १ ॥
निवृत्तिराजातें कळवळा वाटे भारी । आतां आम्हां हरि आज्ञा द्यावी ॥ २ ॥
जयजयकारें टाळया पिटिती सकळ । नाचती गोपाळ तापीतीरीं ॥ ३ ॥
सकळांचे चित्तीं येतो कळवळा । मुक्ताई डोळां पाहिली नाहीं ॥ ४ ॥
नानापरि खेद करिती योगेश्वर । लाविती पदर डोळियांसी ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा कैसें आतां कांहीं । आम्हां मुक्ताई बोलली नाहीं ॥ ६ ॥

[११७९]

ज्ञानेश्वरा तुम्हीं निरविलें सोपान । केली बोळवण पांडुरंगा ॥ १ ॥
तो आम्ही उत्सव पाहिलासे डोळां । चांगोबाचा सोहळा दाविला हरी ॥ २ ॥
होती ऐसी नाहीं जाली मुक्ताई । संत तया ठायीं स्फुंदताती ॥ ३ ॥
रम्य स्थळ म्हणोनि राहिले एक मास । युगा ऐसे दिवस क्रमियेले ॥ ४ ॥
अर्ध मास वैशाख अर्ध मास ज्येष्ठ । फार होती कष्ट निवृत्तिराजा ॥ ५ ॥
मुक्ताई मुक्त केली केशवराजा । नामा म्हणे पूजा तापीतीरा ॥ ६ ॥

अभंग ११७७ ते ११७९--(आ.)

अनुक्रमणिका

[११८०]

पूजियेली तापी पूजिला सोमेश्वर । उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥
कांहीं कोणावरी नाहीं पडलें ओझें । कष्टी निवृत्तिराज होत असे ॥ २ ॥
आली गेली कैसी आम्हां कळलें नाहीं । कोठें मुक्ताई विसर्जिली ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा उठवा ऋषीश्वरा । निवृत्तीचें करा समाधान ॥ ४ ॥

अभंग ११८०—(आ.)

अनुक्रमणिका

[ ११८१ ]

निवृत्तिराज म्हणे भलें केलें देवा । आतां जी केशवा सिद्ध व्हावें ॥ १ ॥
निवृत्तिदास म्हणे सहजासहज हरी । बोळविलीं सारीं सुखधामा ॥ २ ॥
दाही दिशा चित्त जालें असें सैरा । आतां शारंगधरा सिद्ध व्हावें ॥ ३ ॥
आतां माझे श्रम नको घेऊं हरी । जावें त्र्यंबकेश्वरीं समाधीसी ॥ ४ ॥
पार माझा प्राण आला असे कंठीं । आतां जगजेठी सिद्ध व्हावें ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा दिवस नाहीं आतां । त्वरें वेगीं संता सिद्ध करा ॥ ६ ॥

[ ११८२ ]

विमानीं बैसली विठ्ठल सुखमूर्ती । घेतला निवृत्ति मध्यभागीं ॥ १ ॥
राही रखुमाई बैसले सुरगण । उठलीं विमानें गंधर्वांचीं ॥ २ ॥
गोपाळांचे भार उठले नातडीनें । चालिलीं विमानें सुरवरांचीं ॥ ३ ॥
आतां त्वरें चला तुम्ही सप्तशृंगा । कार्य हें गोविंदा सिद्धि न्यावें ॥ ४ ॥
आदि माया तेथें होईल दर्शन । संत साधुजन भेटतील ॥ ५ ॥
नामा म्हणे धन्य तुझ्या योगें हरी । तीर्थयात्रा सारी घडली आम्हां ॥ ६ ॥

[ ११८३ ]

टाळ हे मृदंग गायनें पुढती । रंजविती निवृत्ति अवघेजण ॥ १ ॥
गीतार्थ करिती योगी मुनिजन । रंजविती मन निवृत्तीचें ॥ २ ॥
आत्मसुख एक बोलती बोलणीं । ज्ञानराज मनी आठवतो ॥ ३ ॥
ज्ञानराजें आमुचे निववीले डोळे । आतां ऐसे खेळे नाहीं कोणी ॥ ४ ॥
ऐकावा हा अर्थ मुक्ताईच्या मुखीं । आतां ऐसी सखी नाहीं कोणी ॥ ५ ॥
नामा म्हणे स्वामी सांगतां प्रमाण । ऐकतां श्रवण खेद वाटे ॥ ६ ॥

[ ११८४ ]

अविट बोलणें बोलावें अनादि । जें गुह्य वेदीं सांपडेना ॥ १ ॥
कीर्ति पें वैराग्य केलें सामराज्य । गुरुत्वासी लाज नाहीं आली ॥ २ ॥

अभंग ११८१ ते ११८४—(आ.)

अनुक्रमणिका

नाशिवंत शरीर केलें अविनाश । घडविला विलास अध्यात्मींचा ॥ ३ ॥
अविट बोलणीं आठवती मनीं । आतां त्रिभुवनीं दिसेनात ॥ ४ ॥
तुझ्यामुळें हरि चालतो उगला । देहा आधीं गेला प्राण माझा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा करितां ऐसा घोर । मांडील शरीर निवृत्तिराज ॥ ६ ॥

[११८५]

जें जें सुख आम्हीं अनुभविलें मना । त्याचा नारायणा आठव होतो ॥ १ ॥
ऐसें पदोपदीं निवृत्तिराज कष्टी । कोणकोणाच्या गोष्टी आठवाव्या ॥ २ ॥
ज्येष्ठाच्या आधीं कनिष्ठाचें जाणें । केलें नारायणें उफराटें ॥ ३ ॥
उफराटें फार कळलें माझें मनीं । वळचणीचें पाणी आढ्या गेलें ॥ ४ ॥
अवघ्यापरीस कष्टी केलें मुक्ताईनें । कांहींच बोलणें घडलें नाहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे विठोबा ऐकशी बोलणें । अवघियांची मनें कळवळती ॥ ६ ॥

[११८६]

गहिनीनाथें मज सांगितलें सार । केली ज्ञानेश्वरें व्याख्या त्याची ॥ १ ॥
काढिला शोधून अनुभव मुक्ताईनें । ते ज्ञान सोपानें संपादिलें ॥ २ ॥
अनुभवें निवविला चांगा वटेश्वर । विसोबा खेचर सिद्ध जाला ॥ ३ ॥
त्या ज्ञानें जाला चांगदेव विकळ । त्यागियेली सकळ अविद्या माया ॥ ४ ॥
अज्ञानासी ज्ञान जालें तें सहज । ऐसें निवृत्तिराज आठविती ॥ ५ ॥
सप्तश्रृंगीं आले देव सुरगण । उतरिलीं विमानें नामा म्हणे ॥ ६ ॥

[११८७]

देवीं देवेश शिवीं शिवेश । अगम्य सुरस आदिमाया ॥ १ ॥
अष्टदिशा अगोचरें अष्टभुजा संहारकरें । असुरादि मंथन विरे कुलस्वामिनीये ॥ २ ॥
वदताती देव आणि सुरगण । उतरिलीं विमानें ठायीं ठायीं ॥ ३ ॥
सकळांनी पूजा केली आनंदानें । करिती कीर्तनें अंबेपुढें ॥ ४ ॥
मंडपीं बैसले निवृत्ति नारायण । नारदकीर्तनें पुढें होत ॥ ५ ॥
नामा म्हणे देवी पहाती सकळ । पूजिती गोपाळ आनंदानें ॥ ६ ॥

अभंग ११८५ ते ११८७--(आ.)

अनुक्रमणिका

[११८८]

सप्तश्रृंगालागीं केली प्रदक्षिणा । आतां नारायणा सिद्ध व्हावें ॥ १ ॥
मार्गीं आदिमाया पूजिली आनंदी । म्हणती धन्य मांदी वैष्णवांची ॥ २ ॥
चालतां चालतां दिवस जाले फार । होईल उशीर समाधीसी ॥ ३ ॥
तीन रात्र तेथें राहिले गोपाळ । मग म्हणती सकळ चला आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे देव बैसले गरुडावर । उठावले भार वैष्णवांचे ॥ ५ ॥

[११८९]

वंदिली अंबिका निघाले बाहेर । कीर्तन गजर पुढें होत ॥ १ ॥
गोदातीरीं क्षेत्र धन्य त्र्यंबकेश्वर । उतरले भार वैष्णवांचे ॥ २ ॥
म्हणती पांडुरंगें दावियेलें स्थळ । निवृत्तिराज विकळ पार जाले ॥ ३ ॥
पंचमीचे दिवशीं गेले पंचवटी । उतरले तटीं गौतमीचे ॥ ४ ॥
नामा म्हणे शेवट केला वनमाळी । रहाती ये स्थळीं निवृत्तिराज ॥ ५ ॥

[११९०]

सुंदर नारायण गौरविले फार । केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ १ ॥
सुरस सर्व तीर्थें आदि पुरातन । केली नारायणें तीर्थयात्रा ॥ २ ॥
विसोबा खेचर परिसा भागवत । अनेक ते संत बैसविले ॥ ३ ॥
मध्ये निवृत्तिराज पांडुरंग पुंडलिक । पाहाती कौतुक गौतमीचें ॥ ४ ॥
दशमीचे दिवशीं केलें तें प्रस्थान । विधि नारायण सांगतसे ॥ ५ ॥
नामा म्हणे श्रीरंगा गौरविले सकळ । जालासे विकळ निवृत्तिराज ॥ ६ ॥

[११९१]

सहसमुदायेंसी उठावें शारंगधरा । हरिहरेश्वरा जाऊं आतां ॥ १ ॥
उठले वैष्णव आणि हृषिकेशी । आले त्र्यंबकासी निवृत्तिराज ॥ २ ॥
एकादशी व्रत वद्य ज्येष्ठ मासीं । उत्सव निवृत्तीसी देवें केला ॥ ३ ॥
द्वादशीं पारणें सोडिती वैष्णव । समारंभ देव करितसे ॥ ४ ॥

---

अभंग ११८८ ते ११९०—(आ.), ११९१—(बा.)

राहिली ते शक्ति गळालें शरीर । देह अहंकार त्यागियेला ॥ ५ ॥
कोणाची करावी पूजा कोणें कोणा । अवघे नारायणा करणें येथें ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा मुक्ताईची गती । सांडिलें [1]निवृत्ति शरीरासी ॥ ७ ॥

[११९२]

आपुलिया अंगें साहित्य श्रीरंगें । पुजियेले सांग संतसाधू ॥ १ ॥
निवृत्तिदेवें केली विठोबाची पूजा । उभारिल्या ध्वजा पताकांच्या ॥ २ ॥[2]
पश्चिमेसी स्थळ अनादि समूळ । उघडिली शीळ समाधीची ॥ ३ ॥
म्हणती योगेश्वर अनादि या शेजा । चिद्रत्नें ती पूजा केली असे ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा जागा निरंजनीं । युगादि हे धुणी धुपतीये ॥ ५ ॥

[११९३]

तुळसी बेल पुष्पें समर्पिलीं वर । पाहाती ऋषीश्वर पहिली पूजा ॥ १ ॥
नारा विठा गोंदा पाठविला महादा । झाडावया शेजा पुढें जाले ॥ २ ॥
सभोंवतीं जागा झाडिली निर्मळ । अनादि हें स्थळ निवृत्तिराजा ॥ ३ ॥
सभोंवते दीप लाविले समाधी । म्हणती पूजा आधीं केली असे ॥ ४ ॥
अनादि हे पूजा केली म्हणती संत । आतां कोणी आंत उतरूं नये ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि काय स्थळ चांगलें । दुर्वा दर्भ फुलें वाहियेलीं ॥ ६ ॥

[११९४]

पुष्करिणीकांठीं वैष्णवांचे भार । देव ऋषीश्वर जेवताती ॥ १ ॥
अवघिया पात्रें वाढलीं नारायणें । सोडिती पारणें निवृत्तिराज ॥ २ ॥
विठोबा रखुमाईनें घेतला निवृत्ति । जेविताती पंक्ति गोपाळांच्या ॥ ३ ॥
जेवले वैष्णव आणि हृषिकेशी । गेले आचमनासी पुष्करिणीतें ॥ ४ ॥
अवघे संत तेथें बैसले निवाडे । पुंडलिक विडे वांटितसे ॥ ५ ॥
नामा म्हणे केशव बैसले कीर्तनास । होतो कासाविस निवृत्तिराज ॥ ६ ॥

---

अभंग ११९२--(बा.), ११९३--(धु.), ११९४--(आ.)

१ निश्चिती (बा.)

२ (बा.) प्रतीत पुढील चरण अधिक आढळतो--
निवृत्तिराजा स्नान घातलें देवानें । पूजा संतजनें करिताती ॥

अनुक्रमणिका

[११९५]

निवृत्तिदेवासाठीं स्फुंदती ऋषीश्वर । लाविला पदर डोळियांसीं ॥ १ ॥
गरुडावर पुंडलिकें घातियेला साज । जाती निवृत्तिराज समाधीसी ॥ २ ॥
चालती विमानें बाजतसे घंटा । उठा आतां भेटा अवघेजण ॥ ३ ॥
समाधीभोंवते कुंकुमाचे सडे । पाहती निवाडे योगीराज ॥ ४ ॥
कीर्तन गजरीं गेलीसे मंडळी । बैसली ते पाळी समाधीच्या ॥ ५ ॥
नामा म्हणे पुढें उभे नारायण । आरंभिलें नमन निवृत्तिराजें ॥ ६ ॥

[११९६]

नमो गणपति गजानना । नमो सरस्वति मंगलध्याना ।
नमो अगाध ब्रह्मपरायणा । नमो नमो स्वामी ॥ १ ॥
नमो आदिमायादि सागरा । नमो चिदानंद दिगंबरा ।
एकत्व एक सारा । नमो नमो तुज ॥ २ ॥
नमो मत्स्येंद्रनाथा अनादि । नमो सर्वव्यापका बुद्धि ।
नमो जुनाट युगादि । तुज नमो ॥ ३ ॥
नमो सत्यकाळनाथ त्रिजगतीं । नमो पुढत पुढती ।
योगेश्वरा आदि अंतीं । नमो नमो स्वामी ॥ ४ ॥
नमो गैहिनीनाथ अविनाशा । नमो सहजासहज प्रकाशा ।
नमो व्यापुनि दाही दिशा । आदि गुरु तुज नमो ॥ ५ ॥
गुप्तनाथ तुज नमन । नमो सद्गुरु परब्रह्म पूर्ण ।
सदा स्वरूपीं अनुसंधान । नमस्ते नमस्ते ॥ ६ ॥
नमो गैहिनीनाथ आदिगुरु । तूं संकटीं आदि तारूं ।
नमो [1]संसारहर्ता हरू । सद्गुरुनाथा तुज नमो ॥ ७ ॥
नमो कर्ता हर्ता नारायणा । नमो उदयाअस्तु गगनघना ।
नमो विराटपुरुषा जगज्जीवना । नमस्ते नमस्ते कुळस्वामी ॥ ८ ॥
नमो त्रिपुटी गुप्तधना । नीलवर्णा कलंकी कोंदणा ।
नमो ज्योतिर्मय दारुणा । नमो नमो जगद्गुरु ॥ ९ ॥
नमो पांडुरंग दयाळा । नमो गोविंदा गोपाळा ।
नमो वैष्णवां सकळां । योगिया ऋषीश्वरा नमो नमो ॥ १० ॥

अभंग ११९५ व ११९६—(आ.)
१ संहारकर्ता (बा.)


अनुक्रमणिका

नमो सर्व चराचर । नमो अंतरबाहेर ।
नमो दहाही अवतार । जगद्भूषणा तुज नमो ॥ ११ ॥
नमन नेणो कैसें व्यापी । नमन रंगलें विश्वरूपीं ।
नमन चिन्मय गुह्य गौप्यीं । नमो सर्वभूतीं निजगुरु ॥ १२ ॥

[११९७]

धूप पंचारती गंधाक्षता वाहती । पूजिला निवृत्ति वैष्णवांनीं ॥ १ ॥
प्रेमें आसुवें येती सकळांचिये डोळां । माळ घाली गळां पुंडलिक ॥ २ ॥
निवृत्तिदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर विठोबाच्या ॥ ३ ॥
अवघ्या जनालागीं केला नमस्कार । उठावले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥
गोविंद गोपाळ आले ते सकळ । प्रेमें होती विकळ निवृत्तिराज ॥ ५ ॥
केलीं आचमनें पुष्कर्णीचे तटीं । आले उठाउठी समाधीपाशीं ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा निवृत्तिसारखा योगी । नाहीं आतां जगीं दावावया ॥ ७ ॥

[११९८]

समाधीच्या पाळी बैसली [१]सकळीं । केला या गोपाळीं जयजयकार ॥ १ ॥
निवृत्तीच्या संगें पुंडलिक पांडुरंग । सिद्ध जाले सांग समाधीसी ॥ २ ॥
निवृत्तिदेवें वंदिलीं सकळांची पाउलें । तीर्थ तें घेतलें विठोबाचें ॥ ३ ॥
पताकांची छाया समाधीसी आली । उतरले खालीं निवृत्तिदेव ॥ ४ ॥
पुंडलिक पांडुरंग गेले बरोबरी । बैसले आसनावरी निवृत्तिराज ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा काय पाहावें आतां । गेला पंढरिनाथा चिद्भानु तो ॥ ६ ॥

[११९९]

निवृत्तिराज बैसले समाधीं सुचित । चिन्मय [२]ते ज्योत उजळली ॥ १ ॥
पुंडलिकें मिठी निवृत्तीच्या गळां । अवघियांच्या डोळां आसुवें येती ॥ २ ॥
विठोबाचें हृदय आलेंसें भरून । झांकियेले नयन निवृत्तिराजें ॥ ३ ॥
पुंडलिके आणिलें विठोबासी बाहेर । केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ ४ ॥

अभंग ११९७--(आ.), ११९८--(बा.), ११९९--(धु.)
१ मंडळी (बा.) २ योगयुक्त उजळला (धु.)

अनुक्रमणिका

राही रखुमाई बैसल्या गहिंवरत । आणिक संत महंत वोसंडती ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि शुद्धि नाहीं सकळां । घाला आतां शिळा समाधीसी ॥ ६ ॥

[ १२०० ]

नारा महादा गोंदा विठा जाले विकळ । झांकियेली शीळ समाधीची ॥ १ ॥
गंधर्व आणि देव चिंतावले भारी । दीर्घध्वनि करी नारा विठा ॥ २ ॥
गोंदा आणि महादा सांडिती शरीर । विसोबा खेचर फार कष्टी ॥ ३ ॥
लोपलासे भानु पडला अंधार । गेला योगेश्वर निवृत्तिराज ॥ ४ ॥
गेल्या त्या विभूति अनादि अवतार । आतां देवा फार आठवतें ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि धरवेना धीर । येती गहिंवर वोसंडोनी ॥ ६ ॥

[ १२०१ ]

परिसा भागवत करितसे शोक । म्हणती देवा दुःख अति जालें ॥ १ ॥
द्वादशी समाधि दिधली निवृत्तीसी । जाले उदासी अवघेजण ॥ २ ॥
देव म्हणे उठा करा आतां पूजा । घालूं पुष्पशेजा समाधीसी ॥ ३ ॥
उठले सकळ होताती विकळ । गेले ते गोपाळ समाधीसी ॥ ४ ॥
घेतली समाधि सव्य वैष्णवांनीं । पूजिताती सुमनीं समाधीसी ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे करा प्रदक्षिणा । चला आचमना पुष्कर्णीसी ॥ ६ ॥

[ १२०२ ]

पांच दिवस उत्सव केला निवृत्तीसी । काला आमावास्येसी त्र्यंबकेश्वरीं ॥ १ ॥
प्रतिपदेसी हरि निघाले बाहेरी । कीर्तन गजरी पुढें होत ॥ २ ॥
कांहीं ऋषीश्वर राहियेले तेथें । गेले बहुत ते आळंकापुरीं ॥ ३ ॥
गरुडावरी सिद्ध जाले नारायण । चाललीं विमानें गंधर्वांचीं ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा जावें आषाढीसी । आले एकादशी पंढरीये ॥ ५ ॥

[ १२०३ ]

जयजयकारें टाळी पिटिली सकळीं । चालली मंडळी वैष्णवांची ॥ १ ॥
पंढरीचा पोहा निघाला बाहेरी । कीर्तन गजरीं पुढें होत ॥ २ ॥

---
अभंग १२००—(न.), १२०१ ते १२०३—(आ.)

विठोबा रखुमाई वैसली गरुडावर । केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ ३ ॥
म्हणती तीर्थयात्रा जाली यथासांग । पाहिले प्रसंग समाधीचे ॥ ४ ॥
गेले योगिराज अनादि जे आदि । राहिल्या समाधि जगामाजीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा गेले मुनिजन । राहिलें तें ज्ञान जगामाजीं ॥ ६ ॥

[१२०४]

गेले दिगंबर ईश्वर विभूति । राहिल्या त्या कीर्ति जगामाजीं ॥ १ ॥
वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं । आतां ऐसें कोणी होणें नाहीं ॥ २ ॥
सांगतील ज्ञान म्हणतील खूण । नयेचि साधन निवृत्तीचें ॥ ३ ॥
परब्रह्म डोळां दावूं ऐसें म्हणती । कोणा नये युक्ति ज्ञानोबाची ॥ ४ ॥
करतील अर्थ सांगतील परमार्थ । नये पां एकांत सोपानाचा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा सांगूनियां कांहीं । नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥ ६ ॥

[१२०५]

नानापरी खेद आठविती मना । आतां नारायणा सिद्धि न्यावें ॥ १ ॥
समाधीसी केली आरति पंचारती । राहिली निवृत्ति स्वरूपीं तुझ्या ॥ २ ॥
सुखाचें साधन जालीं चौघेजणें । केलीं नारायणें बोळवण ॥ ३ ॥
पंचक्रोशावरी उभे ठेले भार । केला नमस्कार समाधीसी ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां जावें पंढरपुरा । समाधीचा सारा विधि जाला ॥ ५ ॥

[१२०६]

शेवटची समाधि जाली जैसी तैसी । तुज हृषिकेशी समर्पिली ॥ १ ॥
आपुल्या सत्ताबळें चालविलें हरि । विष्णुदासावरी कृपा केली ॥ २ ॥
नेणों कैसा होईल समाधीचा प्रसंग । वोलिलेति अंगें पांडुरंगा ॥ ३ ॥
मुकियाला वाचा दिधली श्रीरंगें । इच्छिला प्रसंग सिद्धी नेला ॥ ४ ॥
नामा म्हणे देव माय बाप विठ्ठल । म्हणोनि माझे बोल स्वीकारिले ॥ ५ ॥

अभंग १२०४ ते १२०६—(आ.)

अनुक्रमणिका

[१२०७]

काय म्यां बोलावें किती माझी मति । तुम्ही रमापति गोड केलें ॥ १ ॥
विश्वरूप घडी उघडिली धडफुडी । आतां काय थोडी कृपा म्हणूं ॥ २ ॥
चिन्मय लहरी येती उन्मळुनी । दया नारायणीं थोर केली ॥ ३ ॥
समाधि चरित्र केलें यथामति । रखूमाईचा पति आर्जविला ॥ ४ ॥
समाधि चरित्र जो करील श्रवण । तयालागीं पेणें वैकुंठीचें ॥ ५ ॥
नामा म्हणे देवगुरु धरील चित्तीं । उद्धरील पति रुक्माईचा ॥ ६ ॥

[१२०८]

समाधि श्रवण करिती निशिदिनीं । त्यांसि चक्रपाणि देईल भेटी ॥ १ ॥
समाधि श्रवणाचा धरील जो विश्वास । नाहीं नाहीं दोष पातकांचा ॥ २ ॥
समाधि विरक्ताची पतिता वाराणसी । कोटि कुळें त्याची उद्धरील ॥ ३ ॥
जो कोणी बैसेल समाधिश्रवणा । तया प्रदक्षिणा पृथ्वीची हे ॥ ४ ॥
स्वहित साधन सांगितलें येथें । परिसा भागवत लेखकु जाला ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि बोलिलों तुझिया बळें । वाहिलीं तुळसीदळें स्वामीलागीं ॥ ६ ॥

[१२०९]

आळंकापुरीस पांडुरंग गेले । समाधिस्थ केलें ज्ञानदेवा ॥ १ ॥
उरकोनी सोहळा संगें संतमेळा । विठोबा राहिला आळंदीस ॥ २ ॥
पाहे चक्रपाणि नाम्या डोळचां पाणी । कठ तो दाटुनि उगा आहे ॥ ३ ॥
पुसे रुक्मिणीकांत कां रे तूं निवांत । नाम्या शोकाक्रांत कोण्या दुःखें ॥ ४ ॥

[१२१०]

नामा म्हणे देवा ज्ञानदेव सृष्टीं । पडेल कां दृष्टी पुन्हां आतां ॥ १ ॥
ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग । भेटीचा प्रयोग करा देवा ॥ २ ॥
ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं । जीव तळमळी त्याच्याविण ॥ ३ ॥
संत अंतरला सखा जाला दूर । आतां पंढरपूर कैसें कंठूं ॥ ४ ॥
तुमचें दर्शन ज्ञान कृपादान । पंढरीस येणें ह्याचसाठीं ॥ ५ ॥

---

अभंग १२०७ व १२०८—(आ.), १२०९—(पं.), १२१०—(आ.)

अनुक्रमणिका

[१२११]

तरीच येईन पंढरीस । दृष्टी देखेन ज्ञानेश ॥ १ ॥
ज्ञानदेवा भेटी व्हावी । ऐशी सोय देवा लावी ॥ २ ॥
ऐशियाच्या कृपादानें । तुम्हां संगतीं नाचणें ॥ ३ ॥
पंढरीचें जें कां सुख । जाणे तो एक भाविक ॥ ४ ॥

[१२१२]

ज्ञानदेव पहावा डोळां । ऐसें वाटतें विठ्ठला ॥ १ ॥
जगजेठी जगत्पाळ । माझी पुरवावी आळ ॥ २ ॥
तुम्हां काय अवघड । लीळें झेला गिरिगड ॥ ३ ॥
कल्पतरुतळीं वास । त्या घडे कां उपवास ॥ ४ ॥
माझ्या कृपाळुवा देवा । हांकेसरसा घेशी धांवा ॥ ५ ॥

[१२१३]

ज्ञानदेव माझें सौख्यसरोवर । त्यांत जलचर स्वस्थ होतों ॥ १ ॥
दुर्दैव तापानें आटलें तें नीर । वर्षी रघुवीर कृपामेघ ॥ २ ॥
ज्ञानदेवाविण व्याकुळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी ॥ ३ ॥
विठाबाई तूं गे जाणसी ना जाण । रक्षी मज कोण दुजें येथें ॥ ४ ॥

[१२१४]

नामा हें वदतां डोळ्यां आलें पाणी । पडिला धरणीं देवापुढें ॥ १ ॥
नामदेव स्थिती पाहून श्रीपती । विस्मित ते चित्तीं स्तब्ध जाले ॥ २ ॥
कैशा रीती नाम्यां संबोखूं मी आतां । कठिण अवस्था देव म्हणे ॥ ३ ॥
प्रेम उचंबळे ऐकतां ही आळ । बुझावी गोपाळ नाम्यालागीं ॥ ४ ॥

[१२१५]

देव म्हणे नाम्या पाहे । ज्ञानदेव मींच आहे ॥ १ ॥
तो आणि मी नाहीं दुजा । ज्ञानदेव आत्मा माझा ॥ २ ॥

---

अभंग १२११ ते १२१४—(आ.), १२१५—(पं.), (शि.), (पा.), (भा.), (न.) व (ह.)

माझ्या ठायीं ठेवीं हेत । सोड खंत खंडी द्वैत ॥ ३ ॥
नाम्या उमज मानसीं । ऐसें म्हणे हृषिकेशी ॥ ४ ॥

[१२१६]

ज्ञानदेवापुढें कथा । करी वारील ह्या व्यथा ॥ १ ॥
आत्मरूपीं ज्ञानेश्वर । तोचि ज्ञानाचा सागर ॥ २ ॥
ज्ञानदेवीं धरी भाव । स्वयें होय तूंचि देव ॥ ३ ॥
राम कृष्ण रे गोविंद । जप म्हणे तो मुकुंद ॥ ४ ॥

[१२१७]

प्रेमळ तूं भक्ता माझ्या नामदेवा । जीवींचा विसावा भक्त तूंची ॥ १ ॥
तुमचेनि माझें देवपण सत्य । चंद्रें पाझरत सोमकांत ॥ २ ॥
तुमचे भक्तीनें आणिलें रूपासी । अवाच्य अविनाशी अरूप तें ॥ ३ ॥
पंढरिचा राणा सांगतो ह्या खुणा । भक्तांच्या कारणा येणें मज ॥ ४ ॥

[१२१८]

नग जों तें सोनें लेण्याजोगें होतें । मुदी कंकण तें नामें त्यांचीं ॥ १ ॥
मुशीमाजीं जेव्हां गेलें तें मुरोन । जालेसें सुवर्ण अभिन्न तें ॥ २ ॥
तैसा ज्ञानदेव भक्त तो मी देव । लौकिक लाघव दासांसाठीं ॥ ३ ॥
ज्ञानसमाधी हे नाशी रूप नांवा । अंतींचा मेळावा मजमाजीं ॥ ४ ॥

[१२१९]

तेज स्पर्शें ज्योती कर्पुरीं निघाली । दोन्ही तीं निमालीं एकदांची ॥ १ ॥
आघातानें नाद घंटेंतून उठे । शेवटीं तो मिटे घंटेमाजीं ॥ २ ॥
ब्रह्मीं माया स्फुरे चैतन्यप्रकाशें । शेवटीं तें वसे ब्रह्मरूपीं ॥ ३ ॥
पांडुरंग म्हणे ऐक नाम्या ज्ञान । वाटो समाधान तुझ्या जीवा ॥ ४ ॥

[१२२०]

नामदेव म्हणे देवा । ब्रह्मज्ञान पोटीं ठेवा ॥ १ ॥
तुम्ही मायेसंगें गूढ । ज्ञान जाणिवेचें आड ॥ २ ॥

---

अभंग १२१६ ते १२२०—(आ.)

अनुक्रमणिका

आम्हां नाहीं याची चाड । वाटे संतभेटी गोड ॥ ३ ॥
संतभेटी प्रेम फावे । प्रेमें देवाशीं भेटावें ॥ ४ ॥
प्रेम आहे पोटभरी । देव त्यासी पोटीं धरी ॥ ५ ॥
नामदेवा ठायीं प्रेम । मार्गीं आडविलें ब्रह्म ॥ ६ ॥

[१२२१]

देई भक्तिरस प्रेमा । देवा घाली आम्हां जन्मां ॥ १ ॥
प्रेम येई हातां जरी । जेथें नांदू ती पंढरी ॥ २ ॥
ज्ञानदेवीं भेट व्हावी । ज्ञान गोष्ट कां सांगावी ॥ ३ ॥
नामा न बुझावा जनीं । कोण नाचेल कीर्तनीं ॥ ४ ॥
पुरवा नामयाच्या आर्ता । देवा सांगे जगन्माता ॥ ५ ॥

[१२२२]

देव कळवळले चित्तीं । त्यासी मायेची संमती ॥ १ ॥
मायबापांचा त्या लळा । नामा घेईना कां आळा ॥ २ ॥
बाप जगताचा स्वामी । आई प्रत्यक्ष लक्ष्मी ॥ ३ ॥
नामा थोराचें लेंकरूं । छंद त्याचा अनिवारु ॥ ४ ॥
छंद नाम्याचा पुरविण्या । देव वेंची प्रेमनाण्या ॥ ५ ॥
हाटीं उदमीं भाविक । विठुराजा त्या ग्राहिक ॥ ६ ॥

[१२२३]

गरुडासि मग म्हणे पांडुरंग । साकल्य हें सांग पुंडलिका ॥ १ ॥
नामदेव कष्टी ज्ञानदेवासाठीं । घेऊन या तो भेटी नामयाच्या ॥ २ ॥
संतप्रेम भेटी देव गुज गोष्टी । जाणत्याच्या पोटीं सर्व वसे ॥ ३ ॥
करी पांडुरंग येई त्याच्या मना । निमित्ताकारणा भक्त शोधी ॥ ४ ॥

[१२२४]

ऐकतां निरोप पुंडलिक भक्त । जाला सद्‌गदित धन्य म्हणे ॥ १ ॥
धन्य ती आळंदी धन्य विष्णुदास । धन्य हा दिवस देव भेटे ॥ २ ॥

अभंग १२२१ ते १२२४—(आ.)

अनुक्रमणिका

ज्ञानदेवा आलें वैकुंठीचें रूप । पोचतां निरोप पुंडलिका ॥ ३ ॥
पुंडलिकें तेव्हां गरुड पूजियेला । ज्ञाना बैसविला विमानांत ॥ ४ ॥
पुढें तो गरुड मागें ये विमान । रुक्मिणी दुरोन दावी देवा ॥ ५ ॥

[१२२५]

आकाशीं पुष्पक शुभ्र दंड दिसे । बैसोनि येतसे ज्ञानदेव ॥ १ ॥
शुद्धभावें इच्छी ज्ञानदेव भेटी । येई उठाउठी भेटूं त्यासी ॥ २ ॥
पहाती नवल भक्त ते प्रेमळ । निश्चय निढळ आहे ज्यांचा ॥ ३ ॥
देव म्हणे नाम्या घेई भेटीसुखा । ज्ञानदेव सखा उभा येथें ॥ ४ ॥

[१२२६]

ज्ञानदेवा पहातां डोळां । नामदेवा हर्ष जाला ॥ १ ॥
घट्ट धरियेले पाय । तूं तो जाला सद्‌गुरुराय ॥ २ ॥
नको करूं रे अव्हेर । मज धरूं नको दूर ॥ ३ ॥
सदा आठवत मना । तुझ्या भक्तीच्या कल्पना ॥ ४ ॥

[१२२७]

नाथा नको रे अंतरूं । तुझ्या कांसेचें वासरूं ॥ १ ॥
कळा दुभती तूं गाय । तुझा वियोग असह्य ॥ २ ॥
देह भोगितां प्राक्तन । मना ठेवी तयाधीन ॥ ३ ॥
ज्ञानदेवीं ही समाधी । जडो मनोवृत्ति अवधी ॥ ४ ॥
नामा भेटे ज्ञानदेवा । जनां प्रसाद मिळावा ॥ ५ ॥

[१२२८]

हरीचिया दासा नामया उदासा । तुझी हृषिकेशा प्रीति बहू ॥ १ ॥
हरिदासांमाजी होसी तूं आगळा । प्रेमाचा पुतळा नामदेव ॥ २ ॥
ज्ञानदेव म्हणे तूं विठोचा लडिवाळ । नामया तूं कृपाळ आम्हांवरी ॥ ३ ॥

---

अभंग १२२५ ते १२२८—(आ.)

[१२२९]

धन्य पुण्यभूमि आळंदी हें गांव । दैवताचें नांव सिद्धेश्वर ॥ १ ॥
चौऱ्यांशीं सिद्धींचा सिद्धभेटी मेळा । तो सुखसोहळा काय सांगूं ॥ २ ॥
विमानांची दाटी पाहती सुरवर । वर्षताती भार सुमनांचे ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा चला तया ठाया । विश्रांति घ्यावया कल्पवरी ॥ ४ ॥

[१२३०]

अगा पांडुरंगा भक्तजन कैवारी । सेवकजन द्वारीं तिष्ठताती ॥ १ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान हा पाही । आली मुक्ताबाई चांगदेव ॥ २ ॥
खेचर विसोबा असंद सुदामा । चोखा पुरुषोत्तमा आला असे ॥ ३ ॥
मैराळ जनक वत्सरा तो नारा । विठा सारंगधरा आला असे ॥ ४ ॥
परसा भागवत सांवता नरहरी । चोखा मेळा द्वारीं भानुदास ॥ ५ ॥
नटनाट्यकुसरी कान्होपात्रा द्वारीं । चवरें विंजणें हरी जाणविती ॥ ६ ॥
माचंगा अनंता नरसीपुरीं होता । तो हा पंढरीनाथा आला असे ॥ ७ ॥
मच्छिंद्र गोरक्ष चरपटी चौरंगीं । गोपीचंद योगी आला असे ॥ ८ ॥
इडा ती पिंगळा सूक्ष्म ती आवळा । षड्स गोपाळा घेऊनि आला ॥ ९ ॥
तेथें टाळ दिंडी घेऊनियां नामा । भेटी पुरुषोत्तमा आला असे ॥ १० ॥

[१२३१]

रखुमाई माता राही ओंवाळिती । नित्य पंचारती हरिच्या दासां ॥ १ ॥
नित्य भक्तां हरि यालागीं विनट । पंढरीची पेठ बसविली ॥ २ ॥
धन्य हा निवृत्ति धन्य हा सोपान । धन्य हा निधान ज्ञानदेव ॥ ३ ॥
खेचर सांवता धन्य जनमित्र । यांसि सकळ देत हरि ब्रह्म ॥ ४ ॥
पांडुरंग पिसा यालागीं जाहला । मुक्ताई पाजिला प्रेम पान्हा ॥ ५ ॥
नामा म्हणे खूण जाणती सज्ञान । अखंड तें ध्यान निवृत्तिदेवीं ॥ ६ ॥

---

अभंग १२२९—(आ.), १२३०—(पं.), (धु.) व (न.), १२३१—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[१२३२]

सिपियाचें कुळीं जन्म माझा जाला । परि हेतु गुंतला सदाशिवीं ॥ १ ॥
रात्रिमाजीं सिवी दिवसामाजी सिवि । आराणूक जीवीं नोव्हे कदा ॥ २ ॥
सुई आणि सुतळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवीं ॥ ३ ॥
नामा म्हणे सिवीं विठोबाची अंगीं । म्हणोनियां जगीं धन्य जालों ॥ ४ ॥

[१२३३]

कल्याणींचा सिंपी हरिभक्त गोमा । त्याची कांता उमा नरहरिभजनीं ॥ १ ॥
सरिता सुकृताची त्या पोटीं उत्पन्न । जाली संबोधन गोणाबाई ॥ २ ॥
गोणाई दामासेठी जालें पाणिग्रहण । संसारीं असोन नरसी गांवीं ॥ ३ ॥
गोत्र संज्ञा ऐका पूर्वजांची सहज । गाधिज भारद्वाज दोनी कुळें ॥ ४ ॥
आऊबाई कन्या जाली गोणाईसी । पुढें देवा नवसी पुत्रासाठीं ॥ ५ ॥
नामा म्हणे होतें विठोबाचे मनीं । तेंचि नित्य जननी नवस करी ॥ ६ ॥

[१२३४]

केशवा माधवा गोविंदा गोपाळा । जेवी तूं कृपाळा पांडुरंगा ॥ १ ॥
अच्युता वामना दशरथनंदना । जेवी तूं गा कृष्णा पांडुरंगा ॥ २ ॥
कृष्णा विष्णु हरि मधुसूदन मुरारी । जेवी तूं नरहरी पांडुरंगा ॥ ३ ॥
ऐसी ग्लानि करितां विठ्ठल पावला । नैवेद्य जेविला नामयाचा ॥ ४ ॥

[१२३५]

जेऊनियां हातीं देवें दिधली वाटी । आला उठाउठी नामा घरा ॥ १ ॥
गोणाई म्हणे रे ऐक नामदेवा । नैवेद्य आणावा माझे हातीं ॥ २ ॥
तेव्हां नामदेवें हातीं दिधली वाटी । पाहूं गेली दृष्टी रिकामी ते ॥ ३ ॥
काय तुज घरीं उणें होतें अन्न । नैवेद्य आपण तेथें खावा ॥ ४ ॥
ते दोघे बोलतां दामासेठी आला । पुसे त्या दोघांला काय गुह्य ॥ ५ ॥
देखियेलें नाहीं नाहीं ऐकियेलें । ऐसें सांगितलें नामदेवें ॥ ६ ॥
दामासेठी म्हणे आतां असों द्यावें । सकाळीं पहावें प्रचीतीस ॥ ७ ॥

अभंग १२३२—(पं.), (धु.) व (गि.), १२३३ ते १२३५—(पं.)

अनुक्रमणिका

[१२३६]

आम्ही हाटा जाऊं लवकरी येऊं । नैवेद्य पाठवूं नाम्या हातीं ॥ १ ॥
दुसऱ्या दिवशीं नैवेद्य धाडिला । दामसेठी गेला त्याच्या मागें ॥ २ ॥
जाऊनियां नामा उभा राहे सन्मुख । म्हणे विठोबास जेवी बापा ॥ ३ ॥
देव म्हणे नाम्या बैसावें दारांत । लवकरी जेवितों पाहे आतां ॥ ४ ॥
जेऊनियां देवें हातीं दिधली वाटी । तेव्हां दामसेठी काय बोले ॥ ५ ॥
बारा वर्षें तुज उपवासी मारिलें । आजि जेवविलें नामदेवें ॥ ६ ॥
देव म्हणे आतां ऐका दामसेठी । हे तों गुह्य गोष्टी बोलूं नका ॥ ७ ॥
आम्ही न बोलतां आम्ही न सांगतां । कळे अवचिता आपणांसी ॥ ८ ॥
करसी चोरी तूं गुप्त गोकुळांत । पृथ्वींत मात कोणी नेली ॥ ९ ॥
गोकुळींच्या गोष्टी येथें बोलूं नये । मौन पंढरिये धरिलें आहे ॥ १० ॥
मौन धरियेलें सांगसी आम्हासी । तरी कां जेवशी पांडुरंगा ॥ ११ ॥
काय तुझें घर पडियेलें ओस । चोख्यासंगें कैसा जेवलासी ॥ १२ ॥
चोखियाचें अन्न मिष्टान्न भोजन । मिळाया कारण तेथें नाहीं ॥ १३ ॥
राम अवतारीं वान्नरगणें । लंकेसी झोंबणें सीतेसाठीं ॥ १४ ॥
पाला खाऊनियां वाहिले पर्वत । बांधियेला सेतु सिंधूवरी ॥ १५ ॥
कृष्ण अवतारीं गोपाळ साचार । वळूं गायी फार देवासवें ॥ १६ ॥
यमुनेचे तीरीं खेळूं चेंडूफळी । आपण दिधली नाहीं डावि ॥ १७ ॥
पसरितों पदर धरितों हनुवटी । अन्याय हा पोटीं घालीं नाम्या ॥ १८ ॥
तेव्हां दामसेठी धरूनि हातासी । म्हणे नामयासी चाल घरा ॥ १९ ॥
धन्य माझें भाग्य धन्य माझा वंश । परब्रह्म वेष प्रगटलें ॥ २० ॥
बौद्ध अवतारीं आम्हीं जालों संत । वर्णावया मात नामा म्हणे ॥ २१ ॥

[१२३७]

नामा सिंपे नामा सिंपे । रोप लाविलें केशवबापें ॥ १ ॥
येक उगवली आरडी दरडी । येक वाळुनी जाली कोरडी ॥ २ ॥
येक [1]पुष्प फळासि आली । येक [2]कळींच निर्फळ जाली ॥ ३ ॥
नामा उगवला केशव द्वारीं । न माये आंत बाहेरी ॥ ४ ॥

---

अभंग १२३६—(पं.), १२३७—(पं.) व (शि.)
१ पुण्य (शि. व पं.). २ कळीच (शि. व पं.)

अनुक्रमणिका



घोमान येथील नामदेवांची मानलेली समाधी

अनुक्रमणिका



नामदेवांची पायरी (पंढरपूर)

अनुक्रमणिका



नामदेवांच्या वंशजांचे आज असलेले घर (पंढरपूर)

अनुक्रमणिका

[ १२३८ ]

लोखंडाचा विळा परिसासी लाविला । मागिलिया मोला मागूं नये ॥ १ ॥
[1]दासी होती परि रायासी रतली । मागील ते बोली बोलों नये ॥ २ ॥
वेश्या होती तेचि पतिव्रता जाली । मागील ते बोली बोलों नये ॥ ३ ॥
विष्णुदास नामा विठ्ठलीं रंगला । तो शिंपी वहिला म्हणों नये ॥ ४ ॥

[ १२३९ ]

कुश्चळ भूमीवरी उगवली तुळसी । अपवित्र तियेसी म्हणों नये ॥ १ ॥
काकविष्टेमाजी जन्मे तो पिंपळ । तया अमंगळ म्हणों नये ॥ २ ॥
दासीचिया पुत्रा राज्यपद आलें । उपमा मागील देऊं नये ॥ ३ ॥
नामा म्हणे तैसा जातीचा मी शिंपी । उपमा जातीची देऊं नये ॥ ४ ॥

[ १२४० ]

माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें । लिहिलें त्याची खूण सारू ऐका ॥ १ ॥
अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसी ॥ २ ॥
[2]शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रभव संवत्छर शालिवाहन शके ॥ ३ ॥
प्रसवली माता मज मळमूत्रीं । तेव्हां जिव्हेवरी लिहिलें देवें ॥ ४ ॥
शत कोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाम मंत्र खुणा वाचुनी पाहे ॥ ५ ॥
ऐशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण । नामसंकीर्तन नामया वृद्धी ॥ ६ ॥

[ १२४१ ]

आम्हां कीर्तन कुळवाडी । आणिक नाहीं उदीम जोडी ॥ १ ॥
वाचा पिकली पिकली । हरिनामाची वरो जाली ॥ २ ॥

---

अभंग १२३८—(पं.) व (भा.), १२३९—(पं.) व (शि.), १२४०—(पं.), १२४१—(पं.) व (धु.)

१ (भा.) प्रतीत पुढील चरण अधिक आढळतात—
तैसे हे चरण तुझे गा श्रीरंगा । म्हणोनियां जगा वंदें जालों ॥ २ ॥
कोरडेचि काष्ट अंगें कामाविलें । नामा ते पावलें देवपाट ॥ ३ ॥
बहुता जन्मावरी पावलासी आम्हां । म्हणतसे नामा खेचराचा ॥ ४ ॥

२ शुद्ध (पं.)

एकादशीचे दिवशी । जाल्या कैवल्याच्या राशी ॥ ३ ॥
संत म्हणती नामयाला । हरिनामाचा सुकाळ जाला ॥ ४ ॥

[१२४२]

केशवाचें प्रेम नामयाचि जाणें । नाम्या हृदयीं असणें केशवातें ॥ १ ॥
नामा तो केशव केशव तो नामा । अभिन्नत्व आम्हां केशवासी ॥ २ ॥
नामा म्हणे केशवा दुजेपण नाहीं । परि प्रेम तुझ्या ठायीं ठेवियेलें ॥ ३ ॥

[१२४३]

सुख दुःख दोन्ही आम्हासी सारिखीं । प्रतीति पारखी मना आली ॥ १ ॥
अंतर्बाह्य एक ब्रह्मचि कोंदलें । दुजेपण नेलें निपटोनि ॥ २ ॥
त्वचा टाकुनियां सर्प गेला बिळीं । मग तो सांभाळी कोण सांगा ॥ ३ ॥
ओघ सोडूनियां गंगा सिंधू ठाये । विस्तराळीं धाये खळाळाची ॥ ४ ॥
नामा म्हणे रात्र जैसी कां पाहाळे । धरणीतें जालें तैसें आम्हां ॥ ५ ॥

[१२४४]

भक्ताचिया भावा होऊनि ऋणायितु । उभा असे तिष्ठतु पंढरिये ॥ १ ॥
महाद्वारींची हे तळींची पायरी । तो वैकुंठावरी कळस केला ॥ २ ॥
भूतळींचें वैभव कायसें बापुडें । बोलतां लाज पडे देवराया ॥ ३ ॥
त्या सुखाची नव्हाळी कैंची रसातळीं । बोलतां बोबडी जिव्हा पडे ॥ ४ ॥
म्हणोनि पांडुरंग मौनचि राहिला । नाम्यानें धरिला दोन्हीं चरणीं ॥ ५ ॥

[१२४५]

उठोनि प्रातःकाळीं ओढितां काचोळीं । जातो वेळोवेळीं महाद्वारीं ॥ १ ॥
अहो जी दातारा विनवी अवधारा । तुम्हीं यावें घरां भोजनासी ॥ २ ॥
रखुमाई सांगाते तुम्ही यावें तेथें । सामोग्री सांगातें चालवावी ॥ ३ ॥

अभंग १२४२—(पं.) व (शि.), १२४३—(आ.), १२४४—(पं.), (शि.) व (धु.), १२४५—(आ.)

अनुक्रमणिका

सडा संमार्जन हें माझें करणें । उदक भरणें सुगंधेंसी ॥ ४ ॥[1]
शेणपत्रावळी काढीन उष्टावळी । नित्य वेळोवेळीं हाचि धंदा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा तुमचें तुम्ही जेवा । प्रसाद तो द्यावा सेवकासी ॥ ६ ॥

[ १२४६ ]

आजि आवतणें संतांचें । [2]भोजन जालें हरिनामाचें ॥ १ ॥
आम्ही जेविलों जेविलों । नामामृतें पूर्ण धालों ॥ २ ॥
बरवी परवडी वैष्णवांची । आवडी पुरली हरिनामाची ॥ ३ ॥
[3]नामा केशवाचा म्हणे । माझे हृदयीं नारायण ॥ ४ ॥

[ १२४७ ]

अगाध महिमा यात्रा कार्तिकिये । आला पंढरीये नामदेव ॥ १ ॥
भक्तां शिरोमणी श्रीपंढरिनाथा । कृपाळुवा माता बाळकासी ॥ २ ॥
धन्य नामदेव धन्य नामदेव । हृदयीं पंढरीराव न विसंबे ॥ ३ ॥
प्रेमळ भक्त मिळोन अपार । करिताती गजर हरिनामाचा ॥ ४ ॥
नटनाटय कीर्तन झळकती गरुडटके । करिती ब्रह्मादिक पुष्पवृष्टी ॥ ५ ॥
नामघोष श्रवण सकळां समाधान । चुकले जन्म-मरण कल्पकोटी ॥ ६ ॥
नामा म्हणे जीव निवाला बा तेथें । पाहातां विठोबातें श्रम गेला ॥ ७ ॥

[ १२४८ ]

गरुडपाराजवळी नामदेव आला । सन्मुख देखिला पांडुरंग ॥ १ ॥
मेघःशाममूर्ती डोळस सांवळी । तें ध्यान हृदयकमळीं धरोनि ठेला ॥ २ ॥
धन्य नामदेव भक्त शिरोमणि । ज्याचा चक्रपाणि वेळाइतू ॥ ३ ॥
पूर्ण सहज स्थिती जाला सुखाचा अनुभव । सकळ देहभाव पारुषले ॥ ४ ॥
मन पांगुळलें स्वरूपीं गुंतलें । बोलणें खुंटलें प्रीतिमौन ॥ ५ ॥
सबाह्य अभ्यंतरीं स्वरूप कोंदलें । द्वैत निरसलें दृश्याकार ॥ ६ ॥

---

अभंग १२४६—(पं.) व (शि.), १२४७ व १२४८—(धु.)
१ (धु.) प्रतीमध्ये पुढील चरण अधिक आढळतो—
आणखीही यावें बाह्य पोखरणी । मुंगी मात्रा लागुनि आवतणें ॥
२ जेवण जेऊं हरिनामाचें ॥ (आ.)
३ विष्णुदास नामयाति । केशव प्रसाद वाटिती ॥ (शि.)

निजरूप निर्धारितां नयन [1]सोज्वळ जाले । रोमांच दाटले खरबरीत ॥ ७ ॥
आनंदाचा घन बोळला अंबरीं । वृष्टीस चराचेरीं होत असे ॥ ८ ॥
तें क्षीर सेवितां जालें समाधान । चुकलें [2]जन्ममरण कल्पकोटी ॥ ९ ॥
सहज सुखें निवाला भवदु:ख विसरला । विसावा भेटला पांडुरंग ॥ १० ॥
नामा म्हणे दृष्टी लागेल पां झणीं । धन्य पुंडलिकाचेनि जोडलें सुख ॥ ११ ॥

[१२४९]

दृष्टि उघडुनि नामा भोंवती जंव पाहे । तंव पुढें माय देखियेली ॥ १ ॥
म्हणे मजशीं नाम्या वैर कां साधिलें । बहुत दु:ख जालें कोणा सांगों ॥ २ ॥
भक्तजनवत्सला परियेसी केशवा । भेटवी केधवां पूर्वस्थिती ॥ ३ ॥
भोजना बैसले जेवीं क्षुधाक्रांत । न कोणाशीं मात न बोले कांहीं ॥ ४ ॥
तें बळें उठविलें नव्हतां पैं तृप्ती । तैसी दु:खप्राप्ति जाली मज ॥ ५ ॥
पूर्ण पान्हा धेनु यांतला वोरसे । वत्स थोर हर्षें पान करी ॥ ६ ॥
तें धनियें देखोनि बळें आसुडलें । तळमळित ठेले थोर आशा ॥ ७ ॥
कृपणें संपत्ति जोडिली सायासें । तळमळी ते कैसें नेलियातें ॥ ८ ॥
तैसी परी मज जाहली गा देवा । परियेसी केशवा मायबापा ॥ ९ ॥
दु:खाचे सागरीं पडिलों गा श्रीहरि । सुखरूप मुरारी निववी मातें ॥ १० ॥
नामा म्हणे विठो कृपेचा सागरू । करावा अंगिकार अनाथाचा ॥ ११ ॥

[१२५०]

माता वाट पाहे नामा अजुनी कां नये । देखोन विठ्ठल काय भुलला तेथें ॥ १ ॥
ऐसें मज पाहतां हेंचि घडे साचें । विठ्ठलीं मन त्याचें गुंतलें असे ॥ २ ॥
काय सांगों माय जाल देवळासी । जपतो अहर्निशीं विठ्ठल नामा ॥ ३ ॥
तहान भूक कांहीं आथीचना मनीं । विठ्ठल विठ्ठल म्हणोनि हाचि छंद ॥ ४ ॥
नेणो कवण्या गुणें भुलविलें यातें । विदान आमुतें न कळे कांहीं ॥ ५ ॥
दिशा अवलोकितां प्राण नव्हे निश्चित । बहुत क्षुधाक्रांत जाली असे ॥ ६ ॥
तेथून लवलाहे धांवत निघाली । महाद्वारा आली पहावया ॥ ७ ॥

अभंग १२४९ व १२५०—(आ.)
१ सजल (धु.) २ आया गमन (धु.)

अनुक्रमणिका

तो तंव पांडुरंगा सन्मुख देखिला । चित्रींचा लिहिला पुतळा जैसा ॥ ८ ॥
नाहीं चळणवळण तटस्थ नयन । केलें निंबलोण योगिजनीं ॥ ९ ॥
ते देखोनि मातेसी थोर द्वेष आला । क्रोधें आसुंडिला करीं धरुनि ॥ १० ॥
तंव प्रेताचियेपरी पडिला भूमीवरी । देखोनि सुंदरी रुदना करी ॥ ११ ॥
मग उचलोनि ओसंगा धरिला पोटासी । म्हणे कांरे रुसलासि सांग नाम्या ॥ १२ ॥
निढळासी निढळ मिळवुनि ते रडे । माझिया कानाडें काय जालें ॥ १३ ॥
दृष्टि उघडुनी नामा भोंवतें जंव पाहे । तंव सन्मुख माय देखियेली ॥ १४ ॥
येरी उचलोनि दिधलें आलिंगन । जालें समाधान तयेवेळीं ॥ १५ ॥
सुहृदें सोयरीं सकळिकें मिळोनि । करिती झाडणी नानापरी ॥ १६ ॥
माउली नव्हेसि तूं वैरिणी जाण । माझ्या केशवाची खूण अंतरली ॥ १७ ॥
शस्त्रेंविण वध केला अवचिता । जीव तळमळतां जाऊं पाहे ॥ १८ ॥
आतां परतोनी माझी वाट पाहसी । साच रिपु होसी तरी जाण ॥ १९ ॥
नामा म्हणे माते जाई हो येथुनी । मज जाई निरवूनि विठोबासी ॥ २० ॥

[१२५१]

नवमासवरी म्यां वाहिलासि उदरीं । आस केली थोरीं होसी म्हणोनी ॥ १ ॥
शेखीं त्वां रे नाम्या ऐसें काय केलें । वनीं मोकलिलें निरंजनीं ॥ २ ॥
कांरे नामदेवा जालासी निष्ठुर । न बोलसी उत्तर मजसि कांहीं ॥ ३ ॥
सज्जन सोयरीं सांडियेली लाज । जालासि निर्लज्ज एकसरा ॥ ४ ॥
प्रेमपिसें तुज लाविलें विठ्ठलें । रूप दावुनि केलें [1]तद्रूप तुज ॥ ५ ॥
यासि सेविलिया कैंची बाप माय । सर्व हाचि होय सर्वांठायीं ॥ ६ ॥
ऐसियाचा संग धरियला तुवां । परिणामीं अनुभवा जाणशील ॥ ७ ॥
संत सनकादिकां लावियेलें वेधीं । तींहीं संसार उपाधि सांडियेली ॥ ८ ॥
विठ्ठल विठ्ठल हेंचि पैं चिंतन । विटेसहित चरण धरियेले ॥ ९ ॥
ऐसें शिकवितां नाम्याचें न मोहरे चित्त । पाहतसे तटस्थ तन्मय दृष्टी ॥ १० ॥
नामा म्हणे माते वायां कां कष्टसी । विठोबा जीवेंसि जडला जाण ॥ ११ ॥

अभंग १२५१—(धु.)
१ तन्मय तुवां (धु.)

[१२५२]

[1]माता म्हणे नामा राऊळाशीं खेळतां । तुज कोण्या दैवता ओढियलें ॥ १ ॥
लाजिरवाणें नाम्या तुवां केलें जिणें । हांसती पिशुनें देशोदेशीं ॥ २ ॥
सांडि देवपिसें नको करूं ऐसें । बळें घर कैसें बुडविसी ॥ ३ ॥
जन्मा येऊनियां पराक्रम करीं । कां होसी संसारीं भूमिभार ॥ ४ ॥
सुदैवाची लेंकरें वर्ततात कैसीं । तूं मज जालासि कुळक्षय ॥ ५ ॥
कैसी तुज नाहीं लौकिकाची लाज । हेंचि थोर मज नवल वाटे ॥ ६ ॥
अभिमान अहंता सांडुनियां जगीं । नाचतोसि रंगीं गीत गातां ॥ ७ ॥
तुजविण लोक अज्ञान नसती । क्षण न विसंबती मायबापा ॥ ८ ॥
पुत्र आणि कलत्र घराची विपत्ति । तुज अभाग्याचे चित्तीं पंढरीनाथ ॥ ९ ॥
यातें भजतीं त्याचें न उरेचि कांहीं । हाचि देव पाहीं घरघेणा ॥ १० ॥
जयाचें खुंटे तो लागे याच्या पंथें । तुजसि शिकवितें म्हणोनियां ॥ ११ ॥
गोणाई म्हणे नाम्या हें नव्हे पें भलें । विठोबानें केलें आपणा ऐसें ॥ १२ ॥

[१२५३]

कापड घेऊनी जाय बाजारासी । गोणाई नाम्यासी शिकवितसे ॥ १ ॥
लोकांचे हे पुत्र संसार करिती । आमुची फजिती केली नाम्या ॥ २ ॥
नाम्या विठोबाचा [2]संग नव्हे बरा । मैंद हा खरा गळाकाटू ॥ ३ ॥
याचे संगतीनें संसार जाळावा । भोपळा हा घ्यावा भीक मागूं ॥ ४ ॥
नको संग धरूं नाम्या ऐक गोष्टी । गोणाई हनुवटी धरूनी सांगे ॥ ५ ॥

[१२५४]

नामा म्हणे माते ऐक वो वचना । मी गेलों दर्शना नागनाथा ॥ १ ॥
आंवढ्या देउळीं जाहला संचार । पारुषला धीर या देहाचा ॥ २ ॥

---

अभंग १२५२—(आ.), १२५३—(पं.), १२५४—(आ.)

१ असाच दुसरा अभंग मिळतो त्यांत पुढील चरण अनुक्रमे त्या त्या क्रमावर आहेत—
जन्मासि येऊनि पराक्रम धरी । कां होशी संसारी भूमिभार ॥ १ ॥
आणीकांची मुलें संसारिक कैसीं । तूं मज जालासि कुलक्षण ॥ २ ॥
यातें जे भजती त्याचें नुरें कांहीं । हा देव नव्हे पाहीं घरघेणा ॥ ७ ॥
याचें नांव चक्रपाळ हा ब्रम्हादिकां आकळ । तो कैसा कृपाळ दिना लागीं ॥ ८ ॥
होणार सारखी तुज रचिली बुद्धी । देव नव्हे त्रिशुद्धी मारकु जगीं ॥ ९ ॥
२ छेद (पं.)

तेंहूनि तुज मज तुटला संबंधु । विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं ॥ ३ ॥
लौकिक व्यवहार नाठवेचि कांहीं । कल्पना ते देहीं आथीचना ॥ ४ ॥
टाळ दिंडी घेऊनि नाचतो रंगणीं । तेणें माझ्या मनीं सुख वाटे ॥ ५ ॥
या देहघरसंसाराचा आलासे कंटाळा । म्हणोनि गोपाळा शरण आलों ॥ ६ ॥
पुत्र कलत्र येथें कायसी बापुडीं । जेणें रौरव कुंडीं वास घडे ॥ ७ ॥
तूं जरी म्हणसी हें सत्य संसारसुख । तरी हें केवळ विख विस्तारलें ॥ ८ ॥
तेचि हें जाण म्हणोनि टाकियलें दुरी । तें सेवितां उरीं कैंची मातें ॥ ९ ॥
म्हणोनि मी जालों या संतांचा दीन । तेणें हरिला सीण जन्मांतरीचा ॥ १० ॥
नामा म्हणे आतां मी-तूंपण कैंचें । मी या विठोबाचें शरणागत ॥ ११ ॥

[१२५५]

जनिता जीवविता सर्वज्ञ प्रतिपाळिता । आडणी सांभाळितां चराचरीं ॥ १ ॥
एक पांडुरंग दुजा नाहीं चांग । म्हणुनि याचा संग धरिला माते ॥ २ ॥
माझी तुज कांहीं करणें नलगे चिंता । मज आहे पोसिता पांडुरंग ॥ ३ ॥
हा शरणागतांचा जाणे कळवळा । हा पैं कळिकाळा पाहों नेदी ॥ ४ ॥
केले कोटिवरी न मानी अपराध । हें पैं साजे ब्रीद पांडुरंगा ॥ ५ ॥
आम्ही आपुल्या सुखें असो भलत्या ठायीं । प्रीति तया पायीं जडली असे ॥ ६ ॥
तेणें उपकारें न विसंबे क्षण । हातीं सुदर्शन घेऊनि उभा ॥ ७ ॥
जाणतां नेणतां राम गावों गीतीं । जन्माची विश्रांति होय जेणें ॥ ८ ॥
ऐसी जिवलग होईल कैंचें आन । संचला परिपूर्ण सर्वांठायीं ॥ ९ ॥
इष्टमित्र बंधु सज्जन सोयरा । माझिया संसारा हाचि एक ॥ १० ॥
नामा म्हणे माते मज न चले मोहोपिसें । तुम्हांसि मज ऐसें होईल काई ॥ ११ ॥

[१२५६]

साधावया आत्मसुख । तें हे विटेवरी देख ॥ १ ॥
नको जाऊं परदेशीं । वास करी पंढरीसी ॥ २ ॥
भाव धरी बळकट । मुखीं नाम येकनिष्ठ ॥ ३ ॥
नामा म्हणे गोणाबाई । सर्व सुख याचे पायीं ॥ ४ ॥

अभंग १२५५—(आ.), १२५६—(पं.), (शि.) व (धु.)

[१२५७]

[1]वाघाचिये [2]गव्हाणीं बांधिलीसे गाये । कैसी तु वो माये लोभाचारें ॥ १ ॥
कां मज संसारीं घालितोसि देवा । कैसी तुझी माया जीवा गोड वाटे ॥ २ ॥
विषयाचें गरळ पाजिसी केवळ । हृदय कोवळें कैसें तुझें ॥ ३ ॥
नामा म्हणे मज आदिअंतीं एकु । जननी आणि जनकु पांडुरंग ॥ ४ ॥

[१२५८]

गोणाई म्हणे नाम्या राहिलासी उदरीं । तेंहुनि मी करीं आस तुझी ॥ १ ॥
उपजलासि तैं मज जाला संतोष । आनंद उल्हास वाटे जीवां ॥ २ ॥
गणगोतामाजीं केलें बारे नांव । पंढरीचा देव प्रसन्न केला ॥ ३ ॥
रात्रंदिवस लेखी अंघोळीवरी । तूं मज संसारीं होसी म्हणोनि ॥ ४ ॥
तंव तुज अवचिती उपजली बुद्धी । भोपळा हा खांदीं आवडला ॥ ५ ॥
हातीं टाळ घेऊनी करिसी आळवणी । घागरिया चरणीं बांधोनियां ॥ ६ ॥
सांडोनि घर-दार आपुला संसार । नाचतां विचार न धरिसी ॥ ७ ॥
नव्हें तें करितां कोण असे वारिता । परी त्वां आपुल्या हिता प्रवर्तावें ॥ ८ ॥
मी एक आहें तंव करीन तळमळ । मग तुझा सांभाळ करील कोण ॥ ९ ॥
या विठ्ठलावांचुनी तुज नाहीं संसार । हा बोल निर्धार सत्य माझा ॥ १० ॥
कोण्या गुणें तुवां घेतलें धरणें । गोणाई म्हणे करणें फळा आलें ॥ ११ ॥

[१२५९]

आपणा वेगळा कशाला निवडिसी । कां मज दवडिसी सांग नाम्या ॥ १ ॥
बरवें पुत्रपण जालासी उत्तीर्ण । आतां अभिमान पाहें माझा ॥ २ ॥
तुज नेल्यावीण नवजाय येथून । पंढरी गिळीन विठोबासहित ॥ ३ ॥
माझेंसी लेकरूं मज आहे वेव्हारू । मज आहे निर्धारू विठोबासी ॥ ४ ॥
हा दानवांतें छळी आपणा म्हणवी बळी । तें मजजवळी न चले कांहीं ॥ ५ ॥

अभंग १२५७---(धु.), (शि.) व (आ.), १२५८ व १२५९---(भा.)

१ वाघाचिया गळा सेळी बांधोनियां । तैसी तुझी माया लोभापर ॥ १ ॥ (शि.)
वाघाचिया गळां बांधलीसे गाय । तैसी तू गे माय लोभापर ॥ (आ.)

२ गवाणीं बांधिसील (बा.)

विटेसहित चरणीं बांधिन आपुला गळा । क्षण जीवा वेगळा जाऊं नेदी ॥ ६ ॥
आसनीं शयनीं न विसंबे भोजनीं । घालिन मुरडोनि हृदयामाजीं ॥ ७ ॥
या देहाचा संकल्प आलेसें करोन । घातलेंसे पाणी घरादारां ॥ ८ ॥
हा त्रिभुवनीं समर्थ मी असें जाणत । पाहेन पुरुषार्थ आजी याचा ॥ ९ ॥
अठ्ठाविस युगें भरलीं तया बोला । धरोनि उभा केला पुंडलिकें ॥ १० ॥
गोणाई म्हणे देवा होई कां शहाणा । वायां कां परधना धरिसी लोभु ॥ ११ ॥

[ १२६० ]

वडील वडील आमुची बोलतील गोष्टी । परी तुज ऐसा सृष्टीं देव नाहीं ॥ १ ॥
दर्शना आलिया पाडिसी आव्हाटा । मन मारूनी चोहाटा भुलविसी तूं ॥ २ ॥
ऐसा कैसा कोणें केलासिरे देव । आमुच्या जाणिया खेंच आणियेला ॥ ३ ॥
माझें बाळ तुझ्या दर्शनासीं आलें । तें त्वां भुलविलें केशिराजा ॥ ४ ॥
रात्रिदिवस तुझ्या नामाचा रे छंदु । गोविंद गोविंद म्हणतसे ॥ ५ ॥
तान्ह भूक विसरला पिसाट पैं जाला । नोळखे मजला काय करूं ॥ ६ ॥
परतोनि संसाराची सांडियेली आस । दिसतो उदास सर्वांपरी ॥ ७ ॥
लोकांचीं लेंकुरें कां गा चाळविसी । आपणया ऐसें करसी भलत्यासी ॥ ८ ॥
[1]आणिक असतां नाश वेगळा थोर । मग माझा विचार कळतां तुज ॥ ९ ॥
तुज एक वर्म पुंडलिक आहे । जेणें जडविले पाय विटेवरी ॥ १० ॥
याहुनी आणिक अधिक पावसी । आम्हां दुबळयासी कष्टवितां ॥ ११ ॥
मागें पुढें तुज ऐसेंचि फावलें । तें तंव न चले मजसी कांहीं ॥ १२ ॥
जीव मी देईन कां नामा नेईन । नांव मी करिन गोतामाजीं ॥ १३ ॥
आतां बरवें विचारी अगा ये श्रीहरी । माझा नामा करीं मज आधीन ॥ १४ ॥
नाहीं तरी जीवित्व वेंचिन तुझ्या पायीं । विनविते गोणाई केशिराजा ॥ १५ ॥

[ १२६१ ]

अगा ये विठोबा पाहे मजकडे । कां गा केलें वेडें बाळ माझें ॥ १ ॥
तुझें काय खादलें त्वां काय दिधलें । भलें दाखविलें देवपण ॥ २ ॥

---

अभंग १२६०—(भा.), १२६१—(शि.)
१ काय करूं मज तुजवीण न दीसे थोर । (भा.)

आम्हीं म्हणूं तूं रे कृपाळू असती । आतां तूं कळलासि पंढरिराया ।। ३ ।।
कां देवपण आपुलें भोगूं पैं जाणावें । भक्तां सुख द्यावें हेळामात्र ।। ४ ।।
देव देव होऊनियां अपेश कां घ्यावें । माझें कां विघडावें एकुलतें बाळ ।। ५ ।।
तूं कैसा रे देव या देवावेगळा । बांधितें तुझा गळा परि संतां भ्यालें ।। ६ ।।
तुझी करणी अवघी आम्हां ठाउकीच आहे । बोलोनियां काय हूलकट व्हावें ।। ७ ।।
जाणोनि पुंडलिक तुझी न पाहेचि वास । तूं भला नव्हेस घरघेणा ।। ८ ।।
तो बैस पैं न म्हणे तुज याचकाकारणें । जडसी जीवेंप्राणें सात्विकभावें ।। ९ ।।
झणीं तूं आपुला करिसी बोभाट । मग येईल वीट लोकाचारी ।। १० ।।
थोरपणें नामा करीं मज आधीन । गोणाई म्हणे चरण धरिन तुझे ।। ११ ।।

[ १२६२ ]

तुझा नामा तुज व्हावा जन्मोजन्मीं । काय यासी आम्ही करूं शकों ।। १ ।।
मर्यादा सांडोनि बोलसी कठिण । करिसी वायांविण इष्ट तुटी ।। २ ।।
ऐसें कांहीं सुख अनुपम्य दाखवीं । जया ओळखी जीवीं निजरूपा ।। ३ ।।
जेणें लोभें त्याचें मन मागें मोहरे । वृत्तिसहित विरे ठाईं ठाईं ।। ४ ।।
तेणें या जन्माचे विसरोनि संताप । सोय आपेंआप धरिल तुझी ।। ५ ।।
जरी तूं देखतीस स्वहित पूर्वीं याचें । तरी कां चित्त त्याचें श्रास घेतें ।। ६ ।।
संसार करितां कांहीं न देखेचि सुख । म्हणोनि विन्मुख जाला तुज ।। ७ ।।
वरपंगाचें पेहें पाजिसिल काय । हा निजमुखीं धाय ऐसें करी ।। ८ ।।
तरीच तूं निजाची लोभापर माता । म्हणोनि श्लाघ्यता जगामाजीं ।। ९ ।।
आतां असो सहज येणेंविण काय काज । मी बोलिलों तुज कळेल तें करीं ।। १० ।।
नामा म्हणे देवा ऐसें काय केलें । काय तुजवेगळें जीवन माझें ।। ११ ।।

[ १२६३ ]

माझा नामा जंव नांवरूपा आला । जंव म्हणों लागला घरदार ।। १ ।।
तंव कैसें विघ्न उठिलें गे माये । नामा पंढरिरायें भुलविला ।। २ ।।
सांग बा विठ्ठला म्यां काय केलें । नामया कां भुलविलें कवण्या गुणें ।। ३ ।।

अभंग १२६२—(आ.), १२६३—(भा.)

अनुक्रमणिका

आम्ही गा सिंपिये अनाथें पैं दीनें । करूं रिवने टिपणें पोट भरूं ॥ ४ ॥
त्यासी देवा तुवां आणियेला क्षयो । कैंचा आम्हां देवो निर्मिलासी ॥ ५ ॥
असतां चराचर न बुडतां हे सृष्टी । कां गा घेसी पाठी दुर्बळीची ॥ ६ ॥
एक बाळ माझें धरिली त्याची आस । [1]त्यां कैसी निराश मांडियेली ॥ ७ ॥
दिरां मासां गर्भ जाणोनियां पोटीं । त्याची आस मोठी करिती लोक ॥ ८ ॥
एवढा माझा नामा कैसेन विसरेन । देई कृपादान दुर्बळासी ॥ ९ ॥
तूं अनाथा गोसावी दीनाचा कैवारी । तें ब्रीद श्रीहरी काय जालें ॥ १० ॥
बिघडलें पाडस करी एके ठायीं । विनवितें गोणाई केशिराजा ॥ ११ ॥

[१२६४]

तुझिया नाम्यानें बळी देउनि चित्त । जन्मोनियां आप्त केलें मज ॥ १ ॥
इष्ट मित्र बंधु जननी जनक । सर्व मीच एक करूनि ठेला ॥ २ ॥
ऐसी याची करणी अजोनि नेणसी । बाळ माझें म्हणसी चाळविलें ॥ ३ ॥
प्रेमाचें लाघव लाउनि माझ्या पायीं । बांधलें हृदयीं धरोनियां ॥ ४ ॥
वृत्तिसहित मन लाविलें राखण । केलें जीवें जतन मजलागीं ॥ ५ ॥
उचंबळले नयन अंतरींच्या अनुरागें । रात्रंदिवस जागे मन माझ्या ठायीं ॥ ६ ॥
बोले चाले परी लक्ष मजवरी । बाहेरी भीतरीं मज देखें ॥ ७ ॥
सर्व सुख गुणा रूपा देउनि मिठी । आणि निर्गुणीं हिपुटी होऊं नेदीं ॥ ८ ॥
न मागे न घे न धरी सोय संसाराची । कल्पना देहींची मावळली ॥ ९ ॥
ऐसें येणें मज विश्वासी गोंविलें । सर्वत्र लाविलें मजचिकडे ॥ १० ॥
निर्गुणीं हा नामा न सोडी सर्वथा । सांपडला आतां एकरूपा ॥ ११ ॥

[१२६५]

बुडविली क्रिया बुडविलें कर्म । बुडविला धर्म पाहा येणें ॥ १ ॥
तुझिया नामाचें लागलेसें पिसें । असोनि न दिसे लोकाचारीं ॥ २ ॥
नेणों काय कळे तुवां वागविला । संबंध तुटला मज नाम्याचा ॥ ३ ॥
बुडविला आचार बुडविला विचार । बुडविला संसार कुळासहित ॥ ४ ॥

अभंग १२६४ व १२६५—(आ.)
१ तुवां, निराश मांडियेली (भा.)

आपुलें पारिखें सर्वथा सारिखें । नेणों कवणें सुखें वेडावला ॥ ५ ॥
बुडविला मोहों बुडविली ममता । बुडविली अहंता मीतूंपण ॥ ६ ॥
हा नेणें वेव्हार कां इंद्रियांचें सुख । अखंड याचें लक्ष तुझे पायीं ॥ ७ ॥
बुडविली कल्पना समूळीं वासना । बुडविली सेवा त्रिविध कैसी ॥ ८ ॥
हांसे नाचे प्रेमें फुंदतु डुल्लतु । अहर्निशीं गातु नाम तुझें ॥ ९ ॥
असोनि नसता केला ये संसारीं । म्यां वाहिला उदरीं तैसा नाहीं ॥ १० ॥
गोणाई म्हणे देवा त्वां केली निरास । चाळविलें उदास बाळ माझें ॥ ११ ॥

[१२६६]

ऐके गोणाई म्हणे केशिराज । सदा अरज तुझें नामदेवा ॥ १ ॥
संसारादि यासी नावडेचि कांहीं । मिठीच वो पायीं घातलीसे ॥ २ ॥
नेणों याच्या जीवें घेतलेसें कांहीं । लोळणींच पायीं घातलिसे ॥ ३ ॥
पुसे वो जीवीचें काय काय आवडे । उमगोनि कोडें नेई यासी ॥ ४ ॥
देतां कांहीं न मागे नसतां कांहीं नेघे । गुज पैं न सांगें अंतरीचें ॥ ५ ॥
जन्मोनि सांकडें घातलें वो कैसें । गिळिल मज ऐसें वाटतसे ॥ ६ ॥
मी भावासि भुललों सांपडलों याचे हातीं । करिल काय अंतीं न कळे कांहीं ॥ ७ ॥
एक वेळ मज सोडवीं या पासोनी । दे कां मज लागोनि जीवदान ॥ ८ ॥
माझिये पैं बोले मजचि गोविलें । यातें आपंगिलें अनाथ म्हणोनि ॥ ९ ॥
अंगोळिये धरितां खांदा वोळंगिये । आतां माझें केलें न चले कांहीं ॥ १० ॥
तूं आपुलिया मनीं विचारूनि पाही । नामा आपुला नेई आवडता ॥ ११ ॥
माय लेक दोघे साम्राज्य करा । घ्यावें धरणीवरी सुख याचें ॥ १२ ॥
कठिण बोल तुझे बहूसाळ ऐकिले । नाहीं त्वां गे पाहिलें मागेंपुढें ॥ १३ ॥
[1]आतां तुझी कैसी झांकोळिली माया । मज करिसी वायां इष्ट तूं गे ॥ १४ ॥
ऐसें देवाचें बोलणें ऐकोनि उदास । नाम्या जाले क्लेश तयेवेळीं ॥ १५ ॥
नामा म्हणे देवा ऐसें कैसें घडे । सृष्टीहि पैं बुडे तरी न सोडी तुज ॥ १६ ॥

[१२६७]

विश्वजनमोहना कपटिया नारायणा । काय देवपणा मिरवितोसी ॥ १ ॥
दर्शना आलिया हृदयीं संचरसी । देहभाव घेसी हिरोनियां ॥ २ ॥

अभंग १२६६—(आ.), १२६७—(भा.)
१ चित्त तुझें कैसे सांठविलें माया । कां करिसी वायां इष्ट तुटी ॥ १४ ॥ (आ.)

अनुक्रमणिका

या विश्वावेगळें नवल तुझें करणें । सांगावें गाऱ्हाणें कवणालागीं ॥ ३ ॥
सर्वांगें सुंदर परी हृदयें कठोर । नेणसी जिव्हार मज दुर्बळीचें ॥ ४ ॥
मज अनाथाचें बाळ वेधोनि मोहिलें । बहुत दुःख जालें सांगों कोणा ॥ ५ ॥
कासया पितृभक्ति पुंडलिकें केली । विवसी आणिली पंढरीसी ॥ ६ ॥
माय दुखवुनी मोहिसी बाळकें । देवपण निकें कैसें तुझें ॥ ७ ॥
[1]यातें अनुसरल्या कैंची बाप माय । नाठवेची सोय संसाराची ॥ ८ ॥
ऐसियानें संग धरिला तुझा देवा । प्रत्यक्ष अनुभवा आलें मज ॥ ९ ॥
[2]आतां माझिया जीवीचें जाणसी तें गुज । तरी काई तुज उणें होतें ॥ १० ॥
माझा नामा लावीं संसाराचे सोई । विनविते गोणाई केशवातें ॥ ११ ॥

[१२६८]

बहुत दिवस भरल्ले पैं गोपाळा । अगा ये विठ्ठला कवण न ये ॥ १ ॥
नामा माझा वेगीं देई माझ्या हातीं । जाऊं दे परती अनाथनाथा ॥ २ ॥
खाऊं जेऊं तुज असोस पैं देऊं । कीर्ति तुझी गाऊं जगामाजीं ॥ ३ ॥
तुज काय जाणे ब्रह्मांडनायका । नव्हेसी मजसारिखा एकदेशी ॥ ४ ॥
अनंत ब्रह्मांडें क्षणें घडामोडीसी । कां मज दुर्बळीसी कष्टाविलें ॥ ५ ॥
तुज दुजेपणाचा सहज आला वीट । तूं तंव एकट एकलाची ॥ ६ ॥
ऐसी कीर्ति वेद वर्णिती पुराणें । तें कां लाजिरवाणें करिसी देवा ॥ ७ ॥
तूं कृपेचा कोंवळा म्हणति विश्वजन । त्या तुझें निर्वाण कळलें नाहीं ॥ ८ ॥
मंद मुद्रा धरणें गळां तुळसीमाळा । निवटितोसि गळा न कळतां ॥ ९ ॥
आतां आपुला भ्रमु राखे तो शहाणा । झणें माझ्या निर्वाणा पहासी देवा ॥ १० ॥
गोणाई म्हणे माझा नामा देऊनी हातीं । अंगिकारीं कीर्ति पंढरिराया ॥ ११ ॥

[१२६९]

थितें माझें प्रेम घेऊनि बैसला । अझुनि नुठी वाहिला नामा तुझा ॥ १ ॥
जीवें भावें सर्वस्वें घेतलें धरणें । म्यां काय करणें ऐशियासी ॥ २ ॥

---

अभंग १२६८ व १२६९—(आ.)

[1] तूतें जे अनुसरले तींही काय देखिलें। सर्वस्वें मुकले संसारासी॥ (भा.)

[2] माझिया मनीचें जाणोनियां गुज। कांही एक तुज सांगेन मी॥ (भा. व आ.)

कासया अपराध ठेविशिल मज । शिकवितें तुज नाहीं कोणी ॥ ३ ॥
संसारा गांजले जन्ममरणा उबगले । म्हणोनी शरण आले भयाभीत ॥ ४ ॥
कृपा उपजली जीवें अनुसरला । जीव गुंतला माझे ठायीं ॥ ५ ॥
दवडितां वेगळे वोसंगा रिघालें बळें । बोलताहे साळे भोळे करुणावचनीं ॥ ६ ॥
तेणें माझें हृदय कळवळलें । म्हणोनि देखतां डोळे निवती माझे ॥ ७ ॥
शरण आलिया ते स्यां जरि अव्हेरावें । कोण कोणें आपंगावें सांग सत्य ॥ ८ ॥
शत्रुमित्र आदि करूनी सकळ । दुःख अळुमाळ पडों नेदी ॥ ९ ॥
संसाराची येणें सांडियेली सोयी । प्राणें माझ्या ठायीं अनुसरला ॥ १० ॥
आतां याची लटिकी करी दूर आस । नामा म्हणे उदास सर्वस्वासी ॥ ११ ॥

[ १२७० ]

निर्गुणपणाचा अभिमान सांडिला । निगम लाजविला नारायणा ॥ १ ॥
कपट करोनि भक्तांसि तारिसी । तुझा तूं ठकसी पंढरिराया ॥ २ ॥
ठकुनी पुंडलिकासी न्यावया वैकुंठासी । या बुद्धी आलासी पंढरिये ॥ ३ ॥
तंव त्या भक्तराजें धरियेलें चित्तें । परतोनि मागुतें जाऊं नेदी ॥ ४ ॥
अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां । निर्गम सर्वथा नव्हे देवा ॥ ५ ॥
मग कटावरी कर धरोनियां धीर । उभा निरंतर राहिलासी ॥ ६ ॥
सर्व घे प्रेमें तें हिरोनि बांधिलें । विचारें साधिलें कोणें कोणा ॥ ७ ॥
द्वारीं द्वारपाळ जालासी अंकित । सांग बुद्धीमंत कोण ऐसा ॥ ८ ॥
नाथिलेनि करिसी आपणा गोंविसी । बोल कां ठेविसी नामयातें ॥ ९ ॥
गोणाई म्हणे तुझें नकळे विंदान । देईं कृपादान बाळ माझें ॥ १० ॥

[ १२७१ ]

माझें घर तुवां पूर्वींच बुडविलें । जें दर्शनासी आलें बाळ माझें ॥ १ ॥
नेणों काय वर्म तुझें सांपडलें हातीं । रिघालासी चित्तीं जेणें द्वारें ॥ २ ॥
लौकिक परिहार देसील कासया । मी तुज ऐसिया बरवें जाणें ॥ ३ ॥
कटीं ठेउनि कर उभा गरुडपारीं । हें तंव अंतरीं हारपला ॥ ४ ॥

अभंग १२७० व १२७१—(आ.)

नाहीं चळणवळण न लावी पात्या पातें । लागलें निरुतें लक्ष तुझें ॥ ५ ॥
तुझी याची खूण अंतरींची एकी । दाविसी लौकिकीं भिन्नपण ॥ ६ ॥
[1]सांडियेली येणें लौकिकाची लाज । नव्हे माझा मज कांहीं केल्या ॥ ७ ॥
तुझेनि सुखें धाला आनारिसा जाला । अभिमान मावळला समूळ याचा ॥ ८ ॥
देहीं पैं असोनी विदेही दिसत । प्रेमें ओसंडत हृदयकमळीं ॥ ९ ॥
तूं अनाथा कैवारी ऐसी वेदवाणी । परी कां नये अजोनी कणव तुज ॥ १० ॥
गोणाई म्हणे माझा नामा देईं हातीं । लागेन पुढता-पुढती तुझे पायीं ॥ ११ ॥

[ १२७२ ]

वाचेचेनि बळें बोलसी आगळें । मर्यादे वेगळें वायांविण ॥ १ ॥
भ्रमलिस आरजे न पाहसी आपणाकडे । धारिष्ट केवढें पाहें तुझें ॥ २ ॥
नेई आपला नामा काय चाड आम्हां । जरी आहे तुज भ्रम ममत्वाचा ॥ ३ ॥
पाहे पां पूर्वीचा कवणिये जन्मींचा । नकळे तुझा याचा ऋणानुबंध ॥ ४ ॥
तो सरला कीं उरला विचारी आपुला । हा तुज अंतरला कवण्या गुणें ॥ ५ ॥
येणें सांडिला संसार वेव्हार लौकिक । अविद्या अहंभाविक दोन्ही नाहीं ॥ ६ ॥
[2]हा प्रपंचावेगळा नकळे याची लीला । लागलासे डोळा प्रेममुद्रा ॥ ७ ॥
ऐसी याची स्थिति देखोनियां डोळां । मज कां वेळोवेळां छळितेसी ॥ ८ ॥
जाणसी त्या परी बुझावी वो यातें । जेणें सुखें तूंतें ओळखिला ॥ ९ ॥
याचेनि संसार चालविन म्हणोनी । ऐसी भ्रांती मनीं धरिली वायां ॥ १० ॥
नामा अंतरीं निमाला आत्मा असे उरला । तरंग निमाला जेवीं जळीं ॥ ११ ॥

[ १२७३ ]

लावोनि भवभयें तुवां केलें साचें । देह नव्हे याचें ऐसें केलें ॥ १ ॥
सुखभोग सर्व दिला टाकोनियां । नेणें तुझ्या पायांपरतें कांहीं ॥ २ ॥
ऐसें काय केलें नामया चाळविलें । समूळ बुडविलें अपणांमाजीं ॥ ३ ॥
आम्हां दुर्बळांचा करोनियां घात । केला वाताहात घराचार ॥ ४ ॥

अभंग १२७२—(भा.) व (न.), १२७३—(भा.)
१ सर्वांपरी तुझी लागलीसे सवें । कांहीं केल्या नव्हे माझा मज ॥ ७ ॥ (न.)
२ देहीं नावीं देहीं प्रपंच्यावेगळा । नकळे याची लीला ···· (भा.)

अनुक्रमणिका

आतां तुजविण कोणाचें साउली । पाळली पोसिली तुझी देवा ॥ ५ ॥
संकटीं उदरीं वाहिली म्यां आशा । होता भरंवसा थोर याचा ॥ ६ ॥
तंव तुवां लाविला आपुलिया सवें । नव्हे मज कांहीं ऐसा केला ॥ ७ ॥
काया वाचा मनें सांडोनियां मज । अनुसरला तुज मनोभावें ॥ ८ ॥
नकळे तुझी भाव काय या दाविलें । परतेनासें केलें चित्त याचें ॥ ९ ॥
आतां माझा शीण निवारिल कोण । एका तुजविण पांडुरंगा ॥ १० ॥
गोणाई म्हणे देवा देई जीवदान । सुखाचें निधान नामा माझा ॥ ११ ॥

[ १२७४ ]

राही रखुमाई सत्यभामा माता । सिकवा वो कांता बहुतां परी ॥ १ ॥
संत सनकादिक साक्ष हे सकळ । येणें माझें बाळ चाळविलें ॥ २ ॥
हा काय आमुचा धनी कीं गोसावी । [1]नाहीं तें शिकवी लेंकुरासी ॥ ३ ॥
जाला देव तरी पडों याच्या पायां । मंदावें केलिया भलें नव्हे ॥ ४ ॥
भीड तुटलिया नेईन चोघां चारीं । होईल समसरीं याची मज ॥ ५ ॥
देव [2]कांहीं आम्ही [3]नसति ऐकिले । परी नाहीं देखिले ऐसे कोठें ॥ ६ ॥
दर्शनेंचि जेथें जीवित्वाची हानी । नाठवे परतोनि घराचार ॥ ७ ॥
कैंची वो पंढरी मी वो काय जाणें । याच्या पुत्रपणें देखियेलीं ॥ ८ ॥
या देवासी भेटी जन्ममरण तुटी । मावळली गोष्टी संसाराची ॥ ९ ॥
तुम्ही अवघ्याजणी जीवाच्या सांगातिणी । पुसा याचे मनीं काय आहे ॥ १० ॥
देऊनियां नामा मज लावा वाटे । गोणाई म्हणे वोखटें न करा देवा ॥ ११ ॥

[ १२७५ ]

अरे विठोबा आतां पाहे मजकडे । कां रे केलें वेडें बाळ माझें ॥ १ ॥
तुझें उच्छिष्ट खादलें त्वां काय दिधलें । भलें दाखविलें देवपण ॥ २ ॥
आधीं त्वां तयाचें भोगूं वें जाणावें । भक्ता सुख द्यावें आनंदाचें ॥ ३ ॥
गोणाई म्हणे देवा तुज बांधलें दावें । तरी तुज भ्यावें लागे संतां ॥ ४ ॥

---

अभंग १२७४—(भा.), १२७५—(न.)
१ नाटक सीकवी ··· (भा.) २ काये ··· (भा.) ३ बहुत ऐकिले ··· (भा.)

अनुक्रमणिका

[१२७६]

हरी त्वां कोणाचें बरवें केलें । पूर्ण आम्हां कळों आलें ॥ १ ॥
नारद वैष्णव जगजेठी । त्यासी लाविली लंगोटी ॥ २ ॥
मयुरध्वज राजा भला । त्यासि करवतीं घातला ॥ ३ ॥
बळी दानशीळ भला । तुवां पाताळीं घातला ॥ ४ ॥
भीष्म वैष्णवांचा राव । त्याचा बाणें पूजिला ठाव ॥ ५ ॥
रुक्मांगद हरिचा दास । त्याचा गांवच केला वोस ॥ ६ ॥
बाळ एकुलतें एक । तें त्वां ज्ञानीच केला शुक ॥ ७ ॥
उपमन्यु बाळक पाहें । क्षीरसागरीं कोंडिलें आहे ॥ ८ ॥
ध्रुरू बाळक गोजिरवाणें । त्याचें खुंटलें येणें जाणें ॥ ९ ॥
हरिश्चंद्र ताराराणी । डोंबा घरीं वाहे पाणी ॥ १० ॥
प्रल्हाद भक्तीचा भुकेला । त्याचा बाप त्वां वधिला ॥ ११ ॥
हनुमंत भक्त निकट । त्यासी केलें तूं मर्कट ॥ १२ ॥
पुण्यवंत राजा नळ । त्याचा केला तुवां छळ ॥ १३ ॥
श्रियाळ राजा भला । त्याचा बाळ त्वां खादला ॥ १४ ॥
तुज कोणी न म्हणे भलें । बाळें पोटींचें कोवळें ॥ १५ ॥
जिकडे तिकडे तुम्ही दोघे । तिकडे तिसरा नामा मागें ॥ १६ ॥
तुज नाहीं जाती कुळ । जेऊनि भ्रष्टविलें बाळ ॥ १७ ॥
जेणें तुझें नाम घेतलें । तें संसारावेगळें केलें ॥ १८ ॥
आतां जेविसी तरी तुज आण । ऐकोनि हांसे जगज्जीवन ॥ १९ ॥
नामा दिला माते हातीं । नयन भरले अश्रुपातीं ॥ २० ॥
माय पाहे नामदेव । तंव तो जाला केशवराव ॥ २१ ॥
माय म्हणे नये कामा । तुझा ओपिला तुज नामा ॥ २२ ॥
गोणाई म्हणे हरी । तुझी करणी तुजचि बरी ॥ २३ ॥

[१२७७]

गोणाई म्हणे नाम्या वचन माझें ऐक । पोटींचें बाळक म्हणोनि सांगे ॥ १ ॥
महिमेचा संसार सांडोनि आपुला । संग त्वां धरिला निःसंगाचा ॥ २ ॥

अभंग १२७६ व १२७७--(आ.)



अनुक्रमणिका

या काय मागसी तो काय देईल । शीघ्रची नेईल वैकुंठासी ॥ ३ ॥[1]
सविल्याचीं लेंकुरें वर्तताती कैसीं । तूं मज जालासी कुळक्षय ॥ ४ ॥
धनधान्य पुत्र कलत्रें नांदती । तुज अभाग्याचे चित्तीं पांडुरंग ॥ ५ ॥
[2]शिवण्या टिपण्या घातलेंसें पाणी । न पाहासी परतोनि घराकडे ॥ ६ ॥
कैसी तुझी भक्ती या लौकिकावेगळी । संसाराची होळी केली नाम्या ॥ ७ ॥
याची तुवां कैसी धरियेली कांस । हा तंव कवणास जाला नाहीं ॥ ८ ॥
त्यातें जे अनुसरती त्याचें नुरे कांहीं । देव नव्हे पाही हा घरघेणा ॥ ९ ॥
गोकुळीं करी चोरी आपुलें पोट भरी । तो तुज निर्धारीं देईल काई ॥ १० ॥
लक्षुमीसारिखी सुंदर टाकोनी । ताटिका गौळणी गौळीयांच्या ॥ ११ ॥
अष्टसिद्धी दासी जयाच्या कामारी । कल्पवृक्ष द्वारीं कामधेनु ॥ १२ ॥
बळीच्याचि घरा भीक मागूं गेला । धरूनी बांधिला दारवंटा ॥ १३ ॥
कुबज्या कुरूप कंसाचिया दासी । जीवें भावें तिसी रतलासे ॥ १४ ॥
यातें भजती त्याच्या संसाराची नासी । जडला जीवेंसी नवजाय ॥ १५ ॥
ठकोनियां येणें बहु नाडियेलें । तैसें तुज जालें सत्य जाण ॥ १६ ॥
गोणाई म्हणे नाम्या बरें नाहीं केलें । घर बुडविलें कुळासहित ॥ १७ ॥

[ १२७८ ]

नामा म्हणे माते परियेसी वचन । गुज मी सांगेन अंतरीचें ॥ १ ॥
धरोनि माझी वृत्ति पाहें माझें सुख । मी सांगतों तें एक जननिये ॥ २ ॥
कायावाचामनें ममत्व माझ्या ठायीं । तें तूं ठेवीं पाईं विठोबाचे ॥ ३ ॥
मग हा कृपासिंधु न विसंबेल तुज । अनाथाची लाज हाचि राखे ॥ ४ ॥
पाहे पां पशु जळचरें गांजिले । सकळीं सांडिले जिवलगीं ॥ ५ ॥
पितांबरासहित घालोनियां उडी । सोडविला पानेडी अनाथ म्हणोनी ॥ ६ ॥
प्रल्हादाकारणें जाला पैं पिसाट । धरिले विकट रूप देवें ॥ ७ ॥
विदारुनी दैत्य आवेशें बहुत । यानें माझा भक्त गांजियेला ॥ ८ ॥
पांडवांचें काज करितां नाहीं लाज । म्हणे शरण मज अनन्य भावें ॥ ९ ॥

अभंग १२७८—(आ.)
१ चरण ३ व ४ (धु.) प्रतीमध्ये नाहीत.
२ शिवण्या टिपण्या सोडुनियां । नाचमी कीर्तनीं विठोबाच्या ॥ (आ.)

पाडसाकारणें जैसी कुरंगिणी । तैसा रानींवनीं सांभाळित ॥ १० ॥
जन्मोनियां माझे बहु लळे केले । अडचणी सांभाळिलें अनाथनाथें ॥ ११ ॥
नामा म्हणे याचे दृढ धरिले चरण । कळिकाळापासोन सोडविलें ॥ १२ ॥

[ १२७९ ]

लाभाचिया लोभें मज म्हणसी आपुलें । परी नेणसी तापलें चित्त माझें ॥ १ ॥
जन्म मरण दुःखें शिणलों यातायातीं । ऐसी माझी खंती न विचारिसी ॥ २ ॥
म्हणोनि विठोबाचा जालों शरणागत । तेणें माझें हित ऐसें केलें ॥ ३ ॥
पुत्र कलत्र सकळ भजती हितालागीं । दुःखाचे विभागीं नव्हती कोणी ॥ ४ ॥
जन्मोनि भजतां उचित एक चुके । तें होय पारिखे क्षणामाजीं ॥ ५ ॥
नाना योनीं हिंडतां आपुलें निज कर्म । मज होय श्रम तें तूं देई ॥ ६ ॥
परी माझ्या विठोबाची सेवा सुख गोडी । नाहीं एक घडी न देखों कोठें ॥ ७ ॥
जाती कुळ माझें नाहीं विचारिलें । नेणों अंगिकारिलें कवण्या गुणें ॥ ८ ॥
तुजविण त्याचें हृदय कोवळें । पाळी माझे लळे नानापरी ॥ ९ ॥
शिणलिया बोभाय मग मी वाट पाहें । ये वो माझे माये पांडुरंगे ॥ १० ॥
शब्द माझ्या कानीं पडतां तत्क्षणीं । येतसे टाकोनि झेंपावत ॥ ११ ॥
न मागतां कांहीं सर्व जाणें जिवींचें । आणिक ऐसें कैंचें लोभापर ॥ १२ ॥
देऊनि अभयदान करें कुरवाळी । करितसे साउली पीतांबरें ॥ १३ ॥
मायबाप सखा जिवलग सोईरा । माझिया संसारा हाचि एक ॥ १४ ॥
नामा म्हणे माझ्या हृदयींचा विसावा । गीतीं गातां जीवा गोड वाटे ॥ १५ ॥

[ १२८० ]

गोणाई म्हणे नाम्या जल्पसी भलतें । तुज कोण्या दैवतें वोढियेलें ॥ १ ॥
लाजिरवाणें तुवां केलें रे हें जिणें । हांसती पिसुनें देशोदशीं ॥ २ ॥
सांडीं सांडीं नाम्या तूं हें देवपिसें । बळें घर कैसें बुडवितोसी ॥ ३ ॥
नवमास उदराभीतरीं वाहिला । माझ्या नेणत्या बाळा चाळविलें ॥ ४ ॥[1]
तुझे द्वारीं बैसोनि उपवास करिन । नामा घेऊन जाईन गुणराशी ॥ ५ ॥

अभंग १२७९—(आ.), १२८०—(न.)
१ चरण ४,५ व ६ हे (न.) प्रतीमध्ये नाहीत.

येथें ते होईल लटिकेंचि भांडण । नामा द्यावा म्हणे गोणाई माझा ॥ ६ ॥
गोणाई म्हणे नाम्या कळेल तें करी । स्वहित विचारी सांगो किती ॥ ७ ॥

[१२८१]

पोर निर्दय जालें देवपिसें लागलें । लोकाचें गोविलें तेंहि पोर ॥ १ ॥
नित्य करी अंघोळी धोत्रेंहि फाडिलीं । कळी मांडियेली याही पोरें ॥ २ ॥
गांवींचे महाजन करिती गुडघे स्नान । या पोरां व्यसन अंघोळीचें ॥ ३ ॥
जन्मोजन्मीं नेणों आम्ही ह्या तुळसी । या पोरें विवसी मांडियेली ॥ ४ ॥
गोणाई म्हणे नाम्या तुवां भलें केलें । जया वस्य केलें विठोबासी ॥ ५ ॥

[१२८२]

ज्याचें दैव त्या सांगातें । मला नवल वाटतें ॥ १ ॥
एक बैसती अश्वावरी । एक चालती चरणचाली ॥ २ ॥
एक जेविती मिष्टान्न । एका न मिळे कोरान्न ॥ ३ ॥
गोणाई म्हणे धन्य देवा । नामयाचा संचित ठेवा ॥ ४ ॥

[१२८३]

सोये सांडिली [1]सर्वांची । जोडी केली विठोबाची ॥ १ ॥
मायबापासी टाकिलें । ध्यान देवाचें लागलें ॥ २ ॥
स्त्री पुत्र बंधु बहिणी । केली सर्वांची सांडणी ॥ ३ ॥
गणगोत इष्टमित्र । सर्व जोडिलें विठ्ठलपात्र ॥ ४ ॥
गोणाई म्हणे नामा । भली केली बारे सीमा ॥ ५ ॥

[१२८४]

नामयाची माता विनवितसे संतां । म्हणे पुत्रनाथा काय करूं ॥ १ ॥
नामा चाळविला पंढरिये नेला । विठ्ठलीं मीनला नामदेव ॥ २ ॥
नेणें अन्नपाणी शिवणीं टिपणीं । अखंड चक्रपाणि हृदयीं वसे ॥ ३ ॥
संत म्हणती गोणाई विपरीत अवधारीं । नामा पंढरपुरीं वैष्णवांमाजीं ॥ ४ ॥

---
अभंग १२८१—(न.), १२८२—(आ.), १२८३—(पं.), (शि.) व (आ.), १२८४—(न.)
१ घराची (आ.)

[ १२८५ ]

नामयासारिखें निधान तुझिये कुसीं । धन्य तूं वो होसी जगामाजीं ॥ १ ॥
धन्य याचें सुख देखियेलें डोळां । प्रेमाचा जिव्हाळा अलौकिक ॥ २ ॥
धन्य तुझें कुळ धन्य तुझा वंश । दीपासवें प्रकाश दिसे जेवीं ॥ ३ ॥
धन्य तुझी काया धन्य वाचा मन । करविलें स्तनपान नामयासी ॥ ४ ॥
धन्य हा दिवस तुवां केलें सार्थक । खेळविलें कौतुकें नामयासी ॥ ५ ॥
धन्य तुझें भोजन नाहीं नाम्याविण । धन्य उदकपान केलें तुवां ॥ ६ ॥
धन्य विश्रांतीसी केलें त्वां शयन । वोसंगा घेऊन नामयासी ॥ ७ ॥
धन्य तुझे कर कुरवाळिला नामा । धन्य तो संभ्रमा स्नेह तुझा ॥ ८ ॥
धन्य कृपादृष्टीं नाम्यातें पाहिलें । [1]केस कुर्वाळिले बाळपणीं ॥ ९ ॥
[2]ऐसी तूं वो धन्य जन्मोनियां धन्य । तुझें नाम धन्य मिरवत ॥ १० ॥
धन्य तुझा नामा ज्याची भेटी आम्हां । धन्य त्याचा प्रेमा नित्य नवा ॥ ११ ॥

[ १२८६ ]

मग पंढरीनाथ म्हणे नामयासी । तूं जाई गोणाईसी घेऊनियां ॥ १ ॥
अतिशय कां इणें मांडिलासे फार । मातेसि निष्ठुर होऊं नये ॥ २ ॥
स्तनपान देऊनि मोहें पाळिलासी । अंतर तियेसी देऊं नये ॥ ३ ॥
नामा म्हणे शरण आलों जिच्या भेणें । तिचे हातीं देणें उचित नव्हे ॥ ४ ॥

[ १२८७ ]

देव जाला नामा नामा जाला देव । गोणाईचा भाव पाहावया ॥ १ ॥
[3]हा घे तुझा नामा काय चाड आम्हां । आनंदाचा प्रेमा गोणाईसी ॥ २ ॥
हातीं धरोनियां घेऊनी चालिली । फिरूनी पाहती जाली तंव तो देव ॥ ३ ॥
अगा माझ्या बापा तूं कोणा हवासी । मज दुर्बळासी काय होय ॥ ४ ॥

---

अभंग १२८५—(भा.), १२८६—(न.), १२८७—(पं.)
१ कैसें हो साहिले बाळपणें ॥ (भा.)
२ ऐसी धन्य धन्य होऊनि तूं धन्य । नामा तुझे गुण वर्णितसे ॥ (भा.)
३ हा गे तुझा नामा जाये निज धामा । आनंद वाटला गोणाईसी ॥ (पं.)

अनुक्रमणिका

सोळा सहस्त्र मुख्य अष्ट तुझ्या कांता । त्या माझिया घाता प्रवर्ततील ॥ ५ ॥
पुंडलिकासी तुवां दिधली आहे भाक । गोणाई म्हणे ठक बहु होसी ॥ ६ ॥

[१२८८]

माझा नामा मज देई । जीव देईन तुझे पायीं ॥ १ ॥
पुंडलिका भुलविलें । तैसें माझें बाळ केलें ॥ २ ॥
तें गा न चले मजपासीं । दे गा माझ्या नामयासी ॥ ३ ॥
तुज संगतीं जे लागले । ते त्वां जितेंचि मारिले ॥ ४ ॥
विठ्ठल म्हणे गोणाई । आपुला नामा घेऊनी जाई ॥ ५ ॥
हातीं धरोनियां गेली । गोणाई तेव्हां आनंदली ॥ ६ ॥

[१२८९]

शिवणें टिपणें करोनि आपुलें । नित्य चालवणें संसारिक ॥ १ ॥
गणगोतांमाजीं बरें केलें नांव । माझें सत्त्व सर्व बुडविलें ॥ २ ॥
कवणें गुणें तुज पडिली बा भुली । सुख या विठ्ठलीं देखिलें काय ॥ ३ ॥
तूं भक्त निधडा हा देव धडफुडा । मेळविला जोडा येरवेरां ॥ ४ ॥
यासी नाहीं आप तुज नाहीं पर । आमुचा संसार विभांडिला ॥ ५ ॥
सरलें आयुष्य उरले थोडे दिस । थोर केली आस होती जीवीं ॥ ६ ॥
आमच्या माघारें राखिसी वो नांव । त्वां तंव बरवें दैव काढियेलें ॥ ७ ॥
खांदिये भोपळा गळां तुळसीमाळा । जपसी वेळोवेळां रामकृष्ण ॥ ८ ॥
तेणें छंद नयनीं अश्रूंचिया धारा । केली ख्याति गव्हारा जनांमाजीं ॥ ९ ॥
अरे ऐसें तुवां बुडविलें कुळ । सांडिली सकळ लोकलाज ॥ १० ॥
बरवी धरिली दृढ सत्वाची पाउटी । शिकवी दामशेठी नामयासी ॥ ११ ॥

[१२९०]

बोले दामसेठी । नाम्या ऐकावी हे गोष्टी ॥ १ ॥
पाहे संसाराची सोये । हाटा बाजारासी जाये ॥ २ ॥
कुटुंब चालवणें तुज । वृद्धपण आलें मज ॥ ३ ॥

अभंग १२८८ व १२८९—(न.), १२९०—(प.)

अनुक्रमणिका

तुजसाठीं नवस केला । सेखीं हाचि कामा आला ॥ ४ ॥
दामा म्हणे नामयासी । किती शिकवावें तुजसी ॥ ५ ॥

[१२९१]

केशवासी नामा सांगतसे भावें । नफा वेवसाव जाला तैसा ॥ १ ॥
मालिक गणोबा धोंडोबा जामीन । घेतलीसे पूर्ण निशाणचिठी ॥ २ ॥
आठवड्याची बोली करूनियां आलों । नामा म्हणे धालों तुज पाहतां ॥ ३ ॥

[१२९२]

दामाशेठी म्हणे वेव्हार कोणासी । केला तो आम्हांसी सांग नाम्या ॥ १ ॥
गणोबा नाईक नाम हें जयाचें । सावकार साचे पुरातन ॥ २ ॥
तयांचे दुकानीं वेंचिलें कापड । आठांवारीं तोड ऐवजासी ॥ ३ ॥
दामाशेठी म्हणे नामया सुजाणा । वेगीं द्रव्य आणा जाऊनियां ॥ ४ ॥

[१२९३]

जावोनियां नामदेव । बोले गणोबासी भाव ॥ १ ॥
द्रव्य द्यावें हो सत्वरीं । आम्हीं जातों आपुल्या घरीं ॥ २ ॥
मग म्हणे धोंडोबासी । तुम्ही जामीन ऐवजासी ॥ ३ ॥
द्रव्य द्यावें हो लवकरी । नाहीं तरी चलावें घरीं ॥ ४ ॥
ऐसें बोलोनि धोंडोबासी । पुढें लोटिलें तयासी ॥ ५ ॥
नामा पंढरिसी आला । संगें धोंडोबा आणिला ॥ ६ ॥

[१२९४]

कुलुप अर्गळा घालोनि कोठडिसी । घातलें धोंड्याशीं बंदीखानीं ॥ १ ॥
गोणाई दामासेठी नव्हती तेव्हां घरीं । गेली भीमातीरीं स्नानालागीं ॥ २ ॥
नामदेव गेले राउळा त्वरित । सांगतसे मात केशवासी ॥ ३ ॥
दामासेठी आले स्नान करूनियां । राजाई त्यां पायां लागुनि बोले ॥ ४ ॥

---
अभंग १२९१ ते १२९४ (पं.)

ऐका हो मामाजी पुत्राची हे मात । धोंड्याशीं घरांत कोंडियलें ॥ ५ ॥
दामासेठी बोले नामा कोठें गेला । बोलवा तयाला झडकरी ॥ ६ ॥
नारा महादा दोघे जाती राऊळासी । बोलाविती नाम्यासी चला घरीं ॥ ७ ॥
मुखाकडे पाहे केशवाच्या नामा । घरीं जातां दामा मारिल तो ॥ ८ ॥
देव म्हणे नाम्या भिऊं नको मनीं । नाम हें निर्वाणीं तारिल तुज ॥ ९ ॥
नामा घरां आला दामासेठीपायीं । नमस्कारूनि त्यांही उभा पुढें ॥ १० ॥
दामासेठी म्हणे नाम्या काय केलें । धोंड्याशीं कोंडिलें घरामध्यें ॥ ११ ॥

[१२९५]

अरे नाम्या काये केलें । कासया धोंड्याशीं कोंडिलें ॥ १ ॥
उदीम बरवा फळा आला । हरविलें भांडवला ॥ २ ॥
संसारिक चतुर बहु । मातीसमान घेसी गहूं ॥ ३ ॥
नामा म्हणे दामासेठी । माझी ऐकावी हे गोष्टी ॥ ४ ॥

[१२९६]

ऐका दामासेठी सांगतों तुम्हासी । द्रव्यही कुळासी मागुन घ्यावें ॥ १ ॥
मालधनी आलों घेऊनियां घरा । तुम्ही कां दातारा गांजितसां ॥ २ ॥
नामदेव म्हणे धोंडोबा नाईका । मिती आणि पैका द्यावा वेगीं ॥ ३ ॥

[१२९७]

धोंडोबा नामदेवें काढिला बाहेरी । अंतर्बाह्यात्कारीं सोनें जालें ॥ १ ॥
दामासेठी पाहुनी नामयासी बोले । वेर्थ म्यां छळिलें तुज बाळा ॥ २ ॥
राजाई गोणाई धांवोनियां आली । विनीत होऊनि बोली बोलताती ॥ ३ ॥
आम्ही हे कुटुंबी द्रव्य नाहीं घरीं । म्हणोनि श्रीहरी पावलासी ॥ ४ ॥
गोणाई दामासेठी सांगे नामदेवा । न बोलावें भावा जनीं बापा ॥ ५ ॥
जगा मात कळलियावरी । नेतील हिरोनि धोंडोबासी ॥ ६ ॥
नामदेव म्हणे आपुलें द्रव्य घ्यावें । उरलें तें धाडावें गणोबासी ॥ ७ ॥

---

अभंग १२९५ ते १२९७—(पं.)

अनुक्रमणिका

[१२९८]

ऐसें ऐकोनियां राजाई ते आली । रोषें येऊनि बोली बोलतसे ॥ १ ॥
देवानें हें दिलें तुम्ही कां पाठवा । काशाचा गणोबा बोलतसा ॥ २ ॥
ऐसें बोलोनियां हातें लोटी धोंडा । तुमचिया वितंडा कोण पुसे ॥ ३ ॥
देवें मज दिलें तुम्ही कां मागतां । अलंकार आतां घडीन मी ॥ ४ ॥
नामा म्हणे धन ज्याचें त्यासी द्यावें । आपुलें तें घ्यावें आपणची ॥ ५ ॥

[१२९९]

क्षेत्रीं हा वृत्तांत कळला सर्वांशीं । आले पंचक्रोशी सभोंवते ॥ १ ॥
धोंडोबा गणोबा होते ज्याचे रानीं । ते आले धांवोनि मागावया ॥ २ ॥
आपुलें द्रव्य घ्यावें धोंडोबाशीं द्यावें । नाहीं तरी चलावें पंचाइती ॥ ३ ॥
नामदेव म्हणे द्रव्य तुम्ही द्यावें । आपुले घेवोनि जावें धोंडोबासी ॥ ४ ॥

[१३००]

सकळ समुदाव मिळोनियां आले । द्रव्य देउनि नेलें धोंडोबाशीं ॥ १ ॥
धोंडोबाशीं सकळिके ग्रामस्थीं आणिले । पूर्ववत जाले दगडची ॥ २ ॥
नामा म्हणे विठो पावला निर्वाणीं । भक्तां चक्रपाणि रक्षितसे ॥ ३ ॥

[१३०१]

आई जे शिकवी तीतें तुम्ही नाईका । नाहीं भय शंका लौकिकाची ॥ १ ॥
लावोनि लंगोटी जालेती गोसावी । आमुची उठाठेवी कोण करी ॥ २ ॥
ऐसी तुमची स्थिती विलग देखोनि । पडिलें चिंतवनीं काय करूं ॥ ३ ॥
धडचि कांटीये घातलें हो कैसें । बळेंचि आपणा पिसें लावियेलें ॥ ४ ॥
सुखाचा संसार करोनि बारा वाटे । नांव केलें मोठें जगामाजीं ॥ ५ ॥
तोडियेला मोह सांडियेली माया । भुलविले तुमचिया चित्ता कोणें ॥ ६ ॥
कवणें पुण्य ऐसी जोडियेली जोडी । केली बिघडाबिघडी आम्हां तुम्हां ॥ ७ ॥
तुमचि हे गति लेकुरें नेणति । कोण चालविती घराचार ॥ ८ ॥

अभंग १२९८ ते १३०१—(पं.)

अनुक्रमणिका

म्हणोनि माझें चित्त [1]आपुलेनि उद्वेगें । कवणा जीवींचे सांगे सुखदुःख ॥ ९ ॥
सर्वस्वें सांडोनि धरिला तुम्ही देव । येणें पुसिला ठाव संसारींचा ॥ १० ॥
आमची कणव न वाटेचि कांहीं । विनविते राजाई नामदेवा ॥ ११ ॥

[१३०२]

घरधनि याणीं केला गुरु । बाई मी आतां काय करूं ।
असोनि नाहींसा संसारू । चमत्कार कृपेचा ॥ १ ॥
धांवे पावे गे मेसाई । येथें कोणाचें न चाले कांहीं ।
सत्यपण तुझे ठायीं । तरी हें नाहिसें करी गे ॥ २ ॥
मंत्र घेतला जैसा । घरीं संताचा बोळसा ।
वोस पडो हरिदासा । गेले नमत मागुते ॥ ३ ॥
काय सांगों याची रीती । सोसे सोसे पाये चरणाप्रती ।
अवघे भांवडभूत होती । नाचताती आनंद ॥ ४ ॥
लौकिकांत गेली वायां । एकाच्या एक पडती पायां ।
म्हणती ये गा पंढरिराया । ब्रह्मानंदें डुल्लतां ॥ ५ ॥
भोळी सासू गोणाबाई । पांढरा स्फटिक व्याली पाही ।
त्यानें जोडिला शेषशायी । काय राजाई करूं म्हणे ॥ ६ ॥

[१३०३]

दोन प्रहर रात्र पाहोनी एकांत । राजाई वृत्तांत सांगे माते ॥ १ ॥
अहो रखुमाबाई विठोबासि सांगा । भ्रतारासि कां गा वेडें केलें ॥ २ ॥
वस्त्र पात्र नाहीं खाया जेवयासी । नाचे अहर्निशीं निर्लज्जसा ॥ ३ ॥
चवदा मनुष्यें आहेत माझ्या घरीं । हिंडती दारोदारीं अन्नासाठीं ॥ ४ ॥
वरा मार्ग तुम्ही उमजोनि सांगा । नामयाची राजा भली नव्हे ॥ ५ ॥

[१३०४]

सावध सावध राजाई हो सुखें । नामयानें दुःख निरसिलें ॥ १ ॥
संसार सांतें या येऊनि भाग्याचा । छंद विठ्ठलाचा लागला यासी ॥ २ ॥

अभंग १३०२—(पा.), १३०३—(पं.) व (पा.), १३०४—(आ.)
१ व्यापीयेले उगी । सांगु कोणा वेगि जिवीचें दुःख ॥ (पं.)

याचें नाम ऐसें न दिसे त्रिभुवनीं । नायकों दुजें कर्णी नाम्या ऐसें ॥ ३ ॥
वैष्णवांचे गजर टाळघोष दिंडी । उभयतां ब्रह्मांडीं घोष गेला ॥ ४ ॥
तयाच्या दर्शनें कलिमाजीं तारिलीं । भाग्यें विनटलीं विठ्ठलेंसी ॥ ५ ॥
राजाई म्हणे माते रखुमाई बुद्धिवंते । आमुच्या अदृष्टातें लिहिलें कैसें ॥ ६ ॥

[१३०५]

परियेसी रुक्माई जैसा बैसला पाटीं । दैन्य पैं न सोडी काय करूं ॥ १ ॥
सदैवाच्या स्त्रिया अलंकारमंडित । मजवरी नाहीं प्रीत काय करूं ॥ २ ॥
दरिद्रें विश्रांति घातली वो कैसी । सांगो कोणापाशीं माउलिये ॥ ३ ॥
एकी दिव्य वस्त्रें नेसल्या परिकर । मज खंडें जर्जर मिळालेसें ॥ ४ ॥
मोडकें खोंपट वारा येतो भराभराट । बहु होती कष्ट कोणा सांगों ॥ ५ ॥
कैंची कुसुमसेज कैंचे पटकुळ । फाटकी वाकळ अंथरूणा ॥ ६ ॥
कन्या आणि पुत्र जाली उपवरी । अजोनि न धरी घर प्राणनाथ ॥ ७ ॥
जनलोकांमाजीं केलें येणें हासें । म्हणती लागलें पिसें नामयासी ॥ ८ ॥
जन्मीं न देखे उपाय येणें केले अपाये । कोणा सांगो माये सुखदुःख ॥ ९ ॥
[1]आमुच्या वडिलां शस्त्र सुई आणि कातरी । हा बाण आणि सुरी वागवितसे ॥ १० ॥
एकांतें भाकिलें रुदना करि त्याची नारी । वाहियेली सुरी नागनाथीं ॥ ११ ॥[2]
लज्जेचा हा गांव सांडियेला येणें । शिकवावें कोणें माउलिये ॥ १२ ॥
संसाराचा येणें सांडिला पसारा । कणव स्त्री बाळा न ये कैसी ॥ १३ ॥
नसतां विठोबा नसतां पंढरी । तरी हा सुखें घरीं नांदतां कीं ॥ १४ ॥
होणार होऊन गेले शिकवूं आतां काई । विनविते राजाई रखुमाईसी ॥ १५ ॥

[१३०६]

शिकवा हो रुक्माई आपुलिया कांता । कां आम्हां अनाथा कष्टविती ॥ १ ॥
जन्मोनियां आमुची पुरविली पाठी । मोडिली राहाटी संसाराची ॥ २ ॥

अभंग १३०५ व १३०६—(आ.)
१ आमुच्या वडिलां शस्त्र सुई कातरी । हा टाळ वीणा करीं वागवितो ॥ (बा.)
२ हा चरण (बा.) प्रतीत पुढीलप्रमाणे सापडतो—
एकांतीं भाकुनि रुदन करी आई । येणें वाहिली सुई नागनाथीं ॥

आतां आम्ही काय करणें माउलिये । बैसूं सावलिये कवणाचिये ॥ ३ ॥
माझ्या भ्रतारासी लावियेला चाळा । क्षण जी वेगळा न करी त्यासी ॥ ४ ॥
आमुचा वेव्हार विध्वंसिला पाहीं । करुणा माझी कांहीं न ये त्यासी ॥ ५ ॥
सकळाचें मूळ आपणा आधीन । केलें येणें जाणें पांडुरंगें ॥ ६ ॥
आपुलें परावें मोहो हा सांडिला । आंगोठा मोडिला उपाधीचा ॥ ७ ॥
उघडें घरदार लौकिक वेव्हार । धरिला निर्धार याचे नामीं ॥ ८ ॥
रात्रंदिवस जपे गोविंद हृदयीं । आमुची चिंता कांहीं नलगे त्यासी ॥ ९ ॥
तुमचे सन्निधानें जालों आम्ही दीन । न वाटे निर्वाण कैसें तुम्हां ॥ १० ॥
संसाराचि व्यथा नेणवे सर्वथा । होय तें उचिता करणें आम्हां ॥ ११ ॥
धरी निरंतर एकचि उत्तर । परि हा तुम्ही विचार काय केला ॥ १२ ॥
अनुभव अनुभवीं जाणें तुम्हीं समर्थपणें । सदासुखीं म्हणे नामीं तुझ्या ॥ १३ ॥
जन्मोनि अवघी तुमचीं पोसणीं । नेणो तुम्हांवांचोनि कोणी दुजें ॥ १४ ॥
कायावाचामनें तुमचिये पाईं । विनविते राजाई जिवलगा ॥ १५ ॥

**[१३०७]**

[1]अंगोळिये विठा कडियेसी नारा । राजाई पंढरपुरा चालियेली ॥ १ ॥
भिवरा संपूर्ण जातसे भरयेली । राजाई बोलली कैसें जालें ॥ २ ॥
एकली मी बाळें काय करूं आतां । आहा पंढरिनाथा काय केलें ॥ ३ ॥
एक बांधिलें पाठीसी दुजें बांधिलें पोटासी । वेणुनादापाशीं वाहावत गेली ॥ ४ ॥
हंबरडा हाणोनि बोभाये नामया । आवर्ती पडोनियां तळास गेली ॥ ५ ॥
योगनिद्रा सारोनि देव जागा जाला । त्वरित पावला काढिली तिघें ॥ ६ ॥
नारा विठा दोघे कडियेसी घेतले । राजाईस धरिलें दक्षिण करीं ॥ ७ ॥
आणिलीं महाद्वारा पुढें दे लेकुरां । विठोबा सामोरा नामा आला ॥ ८ ॥
बाबा बाबा म्हणोनि नारा धाविन्नला । नामा त्या बोलिला परतें होईं ॥ ९ ॥
देखोनि राजाईसी गहिंवरू पैं आला । अरे बा विठ्ठला काय केलें ॥ १० ॥
बाळेंसहित विख घेईन मी आतां । पाहे पंढरिनाथा बुडवीन घर ॥ ११ ॥
मेला सर्प होतां तो ओटिये घेतला । खांडोनि घातला डेऱ्यामाजीं ॥ १२ ॥

अभंग १३०७—(भा.)
१ आंगोळीसी (भा.)

खालीं ज्वाळ घाली उकळी फुटली । पोटासी धरिलीं दोवें बाळें ॥ १३ ॥
देह विठोबासी समर्पण करूं । ऐसा पैं निर्धारू धरियेला ॥ १४ ॥
रुक्मिणी म्हणे देवा अनर्थ मांडिला । नामा बाहेर गेला निश्चयेंसी ॥ १५ ॥
डेरा उघडोनि राजाई जंव पाहे । तोंडभरीं भरलाहे अवघें सोनें ॥ १६ ॥
राजाईनें धरिले नामयाचे चरण । कृपादृष्टीं पाहणें आम्हांकडे ॥ १७ ॥
विठ्ठल विठ्ठल ऐसें बोलियेला । निवांत राहिला घटका चारी ॥ १८ ॥
कांपत कांपत महाद्वारीं आला । तुझी माव विठ्ठला नकळे कांहीं ॥ १९ ॥
अष्ट दिशा देवा वरूता आणि खालुता । तुजविण सर्वथा ठाव नाहीं ॥ २० ॥
तंव नामदेव निजला देखिला । अंतरीं उठिला विठ्ठल ध्वनी ॥ २१ ॥
राजाई म्हणे प्रयत्न न चले तेथें आतां । प्रार्थूं पंढरिनाथा बहुतांपरी ॥ २२ ॥
राजाईनें धरिले विठोबाचे पाय । कृपादृष्टि पाहे आम्हांकडे ॥ २३ ॥

[१३०८]

नामदेवा घरीं पाहुणे मेहुणे । आले दोघेजण पंढरिसी ॥ १ ॥
राजाईनें बंधु देखुनि दृष्टिसी । उल्हास मानसीं थोर जाला ॥ २ ॥
कडकडूनि भेटि लोभाची आवडी । टाकली घोंगडी बैसावया ॥ ३ ॥
भ्रतार लागले विठोबाचे ध्यानीं । संसाराची मनीं आस्था नाहीं ॥ ४ ॥
नाचतो निर्लज्ज होऊनि निःशंक । सांडिला लौकिक देहभाव ॥ ५ ॥
ऐसें जंव सांगे राजाई बंधुसी । तंव आले घरासी नामदेव ॥ ६ ॥
तयासी सोयरे अभ्युत्थान देती । न भेटे तयासी विष्णुदास ॥ ७ ॥
देखुनी कांतेसी क्रोध आला फार । असोनि संसार नाहीं आम्हां ॥ ८ ॥
[1]अगडधूत येती घेऊनि टाळविणा । लागे त्यांचे चरणा वेळोवेळां ॥ ९ ॥
जन्मामध्यें आले माझे सहोदर । न बोले उत्तर त्यांसी कांहीं ॥ १० ॥
भोंदु घरीं येती हरिनामें गर्जती । धुवुनि त्यांचें पिती पायावणी ॥ ११ ॥
माझे सखे बंधु घरा आले बाई । रामराम तोहि न घे त्यांचा ॥ १२ ॥
नामा म्हणे कांते राम हृदयांत । सांठवुनी तृप्त जालों आम्ही ॥ १३ ॥

अभंग १३०८—(बा.)
१ अग्रदूत (बा.)

अनुक्रमणिका

[ १३०९ ]

राजाई तें पुसे अहो नामयाला । करा जेवायला कांहीं यासीं ॥ १ ॥
प्रातःकाळीं घरीं सारूनि भोजन । आले ते चालून माझे भेटी ॥ २ ॥
नामा म्हणे कांते दशमी एक भुक्ति । भोजन निश्चिती करूं नये ॥ ३ ॥
उदईक हरिदिनीं उपवास जागरण । ऐकावें कीर्तन चार प्रहर ॥ ४ ॥
द्वादशीं पारणें जालिया भोजन । ऐकोनी पाहुणे चिंतातुर ॥ ५ ॥
क्षुधातुर पोटीं निद्रा नलगे कांहीं । वर्षाएवढी पाही रात्र जाली ॥ ६ ॥

[ १३१० ]

[1]ऐसी चिंताक्रांत मनीं दुःख धरिलें । म्हणे कां बापें दिधलें ऐशियासी ॥ १ ॥
खाया ना जेवाया लेया ना नेसाया । दैन्य भोगावया आलें जन्मा ॥ २ ॥
जयाचि करीं भक्ति त्याचेंचि करणें । घरोघरीं हिंडणें न चुके माझें ॥ ३ ॥
लाज सांडुनियां निलाजरा जाला । मुंड पडसूड मारिला जोग ज्याणें ॥ ४ ॥
देवासुरीं वाहिली तेचि दैना आली । उचितें राहिलीं तेंहूनि ॥ ५ ॥
ऐसी भक्तकांता मनीं वाहे चिंता । काय जाला करिता पंढरिराव ॥ ६ ॥
वेष वाणियाचा सवें बैल द्रव्याचा । म्हणे नामा आमुचा केउता गेला ॥ ७ ॥

अभंग १३०९—(आ.), १३१०—(धु.)
१ (धु.) प्रतीत एक असाच (अपुरा) १४ चरणी अभंग मिळतो. तो असा—
चिंता ग्रस्छ स्त्रिये दुःख धरूनि मनीं । देवा काय दिधलें पिसियालागुनि मायबाप ॥ १ ॥
देवा वाहिला सुयी दोरा तैं दैन्य आलें घरा । आतां माझिया संसारा ठाव नाहीं ॥ २ ॥
भक्ताची कांता मनीं वाहे चिंता । तिचिया आकांता पावलें देव ॥ ३ ॥
धरूनि वेष वाणियाच्या हातिं बैल द्रव्याचा । म्हणे नामा आमचा केउता गेला ॥ ४ ॥
काय पुसाल त्याचें मनुष्यपण गेलें साचें । पिसें लागलें देवाचें भलतेंचि बोले ॥ ५ ॥
हें द्रव्य अवघें वेचावें नाम केशवसेटी सांगावें । तुम्ही सुखी राहावें जायिन वाहिला ॥ ६ ॥
देव पाठिमोरे जाले तंव नामदेव आले । पुसों जे पैल काय ॥ ७ ॥
नेणों कैंचा आला वाणि तो ठेउनि गेला गोणी । त्यासीं मसीं आझुनि वोळख नाहीं ॥ ८ ॥
नामा म्हणे स्त्रिये त्वां अनुचित केलें । कां माझ्या कष्टविलें विठोबासी ॥ ९ ॥
रत्नखचित मुकुट सत्वर काढुनि । आलासे वेष्ठुनि शुभ्र सेला ॥ १० ॥
कस्तुरी मळवट सुरेखा पुसोनि । आलासे लाउनि विभूति भाळीं ॥ ११ ॥
रुद्राक्षाचे मणी घालुनि कर्णपुटीं । कुंडलें गोमटीं काढियेलीं ॥ १२ ॥
चंदनाची उटी भासली गोमटी श्रमजलें । पितांबर सेला फेडुनि गोमटा ........
................ बांधलासे धाटा वोट धरील ॥ १३ ॥
द्रव्याचेनि तुजे भ्रांत जालें मन । हातिंचे निधान राबाविलें ॥ १४ ॥

अनुक्रमणिका

बिदीं उभा राहिला घर पुसों लागला । म्हणे नामा राहिला कोणें ठायीं ॥ ८ ॥
सांगितलें बिराड तुळसीवन अपार । तेंचि जाणा घर नामयाचें ॥ ९ ॥
बाहेर तरी कोणी बैसलासे द्वारीं । बोलविली नारी नामयाची ॥ १० ॥
अहो घ्याहो बाई हे ठेवावी गोणी । नामा येतो परतोनी येईन मी ॥ ११ ॥
येरी म्हणे तुम्ही त्याचें काय जाणा । आपुली नाम खुणा सांगा तुम्ही ॥ १२ ॥
नाम पुसेल तरी केशवशेटी सांगावें । लागेल तितुकें वेचावें हें द्रव्य ॥ १३ ॥
आणिक मज मागावें कांहीं न ठेवावें । माझें क्षेम सांगावें सखा म्हणोनि ॥ १४ ॥
इतुकें बोलुनि देव पाठमोरा जाला । सवेंचि घरा आला विष्णुदास ॥ १५ ॥
म्हणे कैंची गोणी टाकुन गेला वाणी । परि आम्हीं कोणी ओळखूं ना ॥ १६ ॥
त्यानें नांव केशवशेटी म्हणितलें । तंव येरें जाणिलें माझा देव ॥ १७ ॥
कां गे धांवा केला देव माझा कष्टला । अपराध जाला तुजपाशीं ॥ १८ ॥
राजाई म्हणे आम्हां थोर लाभ जाला । विडवई भेटला केशवशेठी ॥ १९ ॥

[१३११]

वराईची गोणी कळली राजाईसी । नामा ब्राह्मणांसी बोलाविती ॥ १ ॥
इतक्यामध्यें होन मडकेंभर काढिले । गोणी ते शिविली होती तैसी ॥ २ ॥
द्विज मेळवुनि आला नामदेव । वांटियेलें सर्व द्रव्य त्यानें ॥ ३ ॥
नामा म्हणे द्रव्य ज्याचें त्या दिधलें । ऋण तें ठेविलें नाहीं कांहीं ॥ ४ ॥
राजाई ते होन राखावया गेली । हातां राख आली कोळशांची ॥ ५ ॥
कोळसे देखोनि खोंचियली मनीं । धन्य तुझी करणी पांडुरंगा ॥ ६ ॥
नामदेवापुढें सांगे वर्तमान । चोरून म्यां होन ठेविले होते ॥ ७ ॥
पाहातां होनांचे जाले हो कोळसे । नामा पाहतां ते जाले सोनें ॥ ८ ॥
वांटिले ब्राह्मणां ते होन तयानें । फेडियेलें ऋण गोविंदाचें ॥ ९ ॥

[१३१२]

¹नामा म्हणे स्त्रिये अनुचित केलें । कां माझ्या शिणविलें विठोबाशी ॥ १ ॥
निंदेच्या उत्तरीं निषेधिलें मज । वाटली त्या लाज मायबापा ॥ २ ॥

अभंग १३११ व १३१२—(आ.)
१ जाणमी ते करिं आपुलें हित । म्यांतरि ठेविले चित्त पांडुरंगी ॥ (धु.)

मग तो माझा स्वामी जाला वेषधारी । तुजलागीं सुंदरी पुढारला ॥ ३ ॥
रत्नजडित मुगुट सत्वर फेडोनि । आलासे वेढोनी शुभ्र शेला ॥ ४ ॥
तेणें भारें त्याचा धगधगिला मस्तक । म्हणोनि मज शोक वाटतसे ॥ ५ ॥
कस्तुरी मळवट सुरेख पुसोनि । आलासे लावूनि विभुति भाळीं ॥ ६ ॥
रूद्राक्षाचे मणि लेऊनि कर्णपुटीं । कुंडलें गोमटीं लपविलीं ॥ ७ ॥
कौस्तुभ वैजयंति काढिली परती । बांधलेंसे प्रीतिं शिवलिंग ॥ ८ ॥
देखूनि रखुमाईस वाटलें उदास । हंसती उपहास केले त्याचे ॥ ९ ॥
रमा शरणागतें आलिंगिलीं बाहीं । कैसी गोणी तिहीं कवळिली ॥ १० ॥
सर्वांगीं साजिरी चंदनाची उटी । भ्रंशली गोमटी श्रमु जाला ॥ ११ ॥
सोनसळापटा फेडोनि गोमटा । नेसला धुबटा बोटधारी ॥ १२ ॥
इंद्रनीळ तनु रूळली असेल रजें । श्रीमुख रवितेजें कोमाइलें ॥ १३ ॥
धन्य तुझे नयन देखिले श्रीचरण । परी जीवें निंबलोण नाहीं केलें ॥ १४ ॥
द्रव्याचेनि लोभें भ्रांत जालें मन । हातींचें निधान हारपलें ॥ १५ ॥
आतां आदिअंतीं पाहतां केवळ । मूळ आणि फळ दुःखरूप ॥ १६ ॥
जाणोनि निवृत्ति धरिली सज्जनीं । सांडिलें निर्वाणीं वमन जैसें ॥ १७ ॥
जाणसी तें करीं आपुलें तूं हित । म्यां ठेविलें चित्त त्याचे पायीं ॥ १८ ॥
नामा म्हणे केशव न पाहे निर्वाण । माझा अभिमान आहे त्यासी ॥ १९ ॥

[१३१३]

दोन्ही जोडुनि कर माथा ठेवी चरणीं । म्हणे परिसा विनवणी स्वामी माझी ॥ १ ॥
मी तंव अज्ञान न कळे तुमचा महिमा । अपराध क्षमा करा माझा ॥ २ ॥
अंतरींची खूण कांहीं सांगा मज । जें तुम्ही हृदयीं बीज धरूनि असां ॥ ३ ॥
जेणें सुखें तुमचें चित्त निरंतर । आनंदें निर्भर सदा असां ॥ ४ ॥
इच्छा तृष्णा देहीं मानवली कल्पना । सदा समाधाना इंद्रियासी ॥ ५ ॥
मायबापें मज दिधलें तुमच्या हातीं । जन्मोनि सांगाति लावियेलें ॥ ६ ॥
देव द्विज गुरु साक्ष हे करुनी । स्वामीचे चरणीं जोडियलें ॥ ७ ॥
तुमची चित्तवृत्ति उदास देखोनी । पडिलें चिंतावनीं काय करूं ॥ ८ ॥
मग तुमचा स्वामी कृपेचा कोंवळा । न धरत पातला अनाथबंधु ॥ ९ ॥

अभंग १३१३--(आ.)

अनुक्रमणिका

मग त्या विश्वंभरें कृपेच्या सागरें । पुसिली आदरें तुमची गोष्टी ॥ १० ॥
तंव मी दुराचारें निर्भत्सिलें तुम्हां । ऐकोनि मेघःश्यामा करुणा आली ॥ ११ ॥
तंव तो जगज्जीवन बोले अमृतवाणी । लोटोनियां गोणी दारवंटा ॥ १२ ॥
म्हणोनि हें द्रव्य तुम्ही सर्वहि वेंचावें । आणिक मागावें लागेल तें ॥ १३ ॥
सद्‌गदित कंठें सांगितलें तुम्हां । परि न कळे मज महिमा दैवहीना ॥ १४ ॥
लोभाचा बोरसु कोणिये जन्मींचा । नकळे तुमचा ऋणानुबंधु ॥ १५ ॥
पाहतां श्रीमुख निवालें माझें चित्त । मग हे मनोरथ विसरले ॥ १६ ॥
क्षण एक आनंद जाला माझे जिवीं । उपमा कवणे द्यावी तया सुखा ॥ १७ ॥
आतां ये संसारीं मीच धन्य जगीं । जें तुम्हां अर्धांगीं विनटले ॥ १८ ॥
परि मला एक वेळ घाला विठोबाचे पायीं । विनविते राजाई नामदेवा ॥ १९ ॥

[१३१४]

युक्तायुक्त ज्ञान वैराग्यसाधन । महातपोधन वरव [1]योग्य ॥ १ ॥
[2]आनंदाचा ओघ भक्तीचा सोहळा । हरि वेळोवेळां जपत वाचे ॥ २ ॥
नित्य हें पूजन करी नामदेव । विठ्ठलीं हा भाव ठेवूनियां ॥ ३ ॥
नामयाची कांता क्रोधयुक्त बोले । भजन सोहळे तुम्हां गोड ॥ ४ ॥
परी हा नावडे संसाराचा संग । अखंड पांडुरंग चिंतितसां ॥ ५ ॥
तुमची हे गति लेकुरें नेणती । धान्य नाहीं नित्य भक्षावया ॥ ६ ॥
ऐसा हा वेव्हार तुमचा जी स्वामी । आतां पुसेन मी पांडुरंगा ॥ ७ ॥
माझिया संसारा घातलेंसे पाणी । नाचतो रंगणीं विठ्ठलाच्या ॥ ८ ॥
ऐसें देवा तुझें अघटित मत । म्हणोनि रडत देवापुढें ॥ ९ ॥
देव म्हणे नाम्या अंगिकार द्यावा । करुनि देवाचा होईं सुखी ॥ १० ॥
नामा म्हणे देवा ऐका जी वचन । उबग कोण्या गुणें आला असे ॥ ११ ॥
राहो हे पंढरी सुखें नांदे देवा । मज नाहीं हेवा उणें कांहीं ॥ १२ ॥
तुझिया कृपेचा अंकित मी होये । तुजविण आहे मज कोण ॥ १३ ॥
माझिया संसारा पाडियेलें पाणी । काय आहे वाणी गति कोण ॥ १४ ॥
ऐसें असुनियां उबग केशवा । माझ्या आला दैवा कोण्या गुणें ॥ १५ ॥

अभंग १३१४—(पं.) व (शि.)
१ योगे (शि.) २ आनंदाचा बोध (शि.)



अनुक्रमणिका

जन्मापासोनियां सेवेसी लाविलें । निःसंतान केलें पांडुरंगा ॥ १६ ॥
आतां मजलागीं लावियतां उद्वेगा । अगा पांडुरंगा मायबापा ॥ १७ ॥
आतां मज म्हणसी संसार करावा । काय मी केशवा करूं आतां ॥ १८ ॥
देवा ऐसी युक्ति उगा राहे आतां । समर्था केशिनाथा देवराया ॥ १९ ॥
मागुनि अंतरीं विचार पैं केला । चित्तीं पैं सांचला क्रोध फार ॥ २० ॥
म्हणोनियां आतां विठो सुखें राहें । [1]मुख तुज पाहे दाखविना ॥ २१ ॥
देवाचे चरण पहावयासाठीं । संसाराची तुटी करावया ॥ २२ ॥
ऐसें मी करीन जाण विठ्ठोराया । पंढरिचे ठाया मोडवीन ॥ २३ ॥
राहें नामीं आतां जाईन दूर देशा । भक्तीची हे आशा सोडोनियां ॥ २४ ॥
जाईल भिवरा जाईल पुंडलिक । जाईल [2]सकळिक महिमा तुझी ॥ २५ ॥
[3]ऐसें बा विठ्ठला त्वां दुखविलें मज । सोडिना सहज पंढरितें ॥ २६ ॥
उदास हें चित्त माझें जालें देवा । जाईन केशवा मायबापा ॥ २७ ॥
आतां असों द्यावा लोभ हाचि देवा । समर्था केशवा मायबापा ॥ २८ ॥
आपुल्या सांगातें नेईन पंढरी । नेईन संत नगरीं भीवराजन ॥ २९ ॥
नेईन सांगातें महिमा येथिंची । मागें हेत हाचि धरुनि राहे ॥ ३० ॥
चक्रतीर्थ आणि पद्माळें हें जाण । सर्वहि करीन आपणासी ॥ ३१ ॥
आपणचि तीर्थ आपणचि व्रत । आपण दीनानाथ होईन मी ॥ ३२ ॥
येथें हे पंढरी होती ऐसें लोक । म्हणतील देख पुढें देवा ॥ ३३ ॥
बोलोनियां ऐसें पुढें चाले नामा । मग आला प्रेमा पांडुरंगा ॥ ३४ ॥
पळतां पळतां नाटोपे जाणा । मागें देवराणा धांवतसे ॥ ३५ ॥
धांवतां धांवतां भागला केशव । उभा राहे तंव हात कटीं ॥ ३६ ॥
जें कां पंढरपूर वस्तीचें असणें । धरियेलें तेणें ठाणें पांडुरंगें ॥ ३७ ॥
तंव तो पळत लोळणीं घातली । [4]त्या क्षणीं न बोले देवाशीं जो ॥ ३८ ॥
देव म्हणे नाम्या पाहे परतोन । तुज मी शरण आलों असे ॥ ३९ ॥
न करी उदास चाल तूं पंढरी । ऐसें बोले हरि नामयासी ॥ ४० ॥

१ यथें मुख पाहे दाखवीना । (पं.) २ सकळ महिमा तुझा । (पं. व आ.)
३ ऐसें त्वां विठ्ठला दुःखविलें मज । सोडविन सहज पंढरितें ॥ (पं.)
४ त्या रानीं देवासी न बोली जो । (शि.)

तंव नामा म्हणे ऐसें मी करीन । पंढरी नेईन भिवरें सहित ॥ ४१ ॥
मोडीन महिमा तीर्थींचा केशवा । कळे तुज तेव्हां भक्त ऐसा ॥ ४२ ॥
मग म्हणे विठ्ठल पुंडलिकासाठीं । चाल उठाउठीं पंढरिसी ॥ ४३ ॥
पितृभक्त पाहीं तोचि पुंडलिक । ऐसा भाव देख जाणिवेचा ॥ ४४ ॥
मग धरुनि मनगटीं चालविला नामा । मोठा आला प्रेमा विठोबासी ॥ ४५ ॥
ऐसें हें आख्यान सारुनियां देवें । मग आले भावें पंढरिसी ॥ ४६ ॥

[१३१५]

उठले निवृति संतांच्या दरुशना । पंढरीचा प्रेमा घरा आला ॥ १ ॥
केली प्रदक्षिणा वंदिले चरण । जाला अभिमान नामयासी ॥ २ ॥
देवाचे जवळी आम्ही निरंतर । यासी अधिकार नमस्कारा ॥ ३ ॥
नित्य समागम हरिच्या चरणीं । हे आणि आम्हीं देवभक्त ॥ ४ ॥
नामा म्हणे कांये वंदूं यांचे चरण । अंगें परब्रह्म मजपाशीं ॥ ५ ॥

[१३१६]

उठले ज्ञानेश्वर केलें तें वंदन । मस्तकीं चरण नमस्कारिले ॥ १ ॥
नामा म्हणे आम्हां वडिल अधिकारू । यासाठीं नमस्कारूं योग्य आहे ॥ २ ॥
आम्ही देवापाशीं असतों सर्वकाळ । येऊनी सकळ वंदिताती ॥ ३ ॥
वैष्णवांचे भार देव सुरगण । येताती शरण पंढरिसी ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां पाहिली मंडळी । यासाठीं वनमाळी स्फुंदूं लागे ॥ ५ ॥

[१३१७]

आले ते सोपान वंदिले या पायीं । पांडुरंगा ठायीं मानियेला ॥ १ ॥
रंजल्यागांजल्याचा घेतला समाचार । संतामाया थोर अनाथांची ॥ २ ॥
आमुचे मायबाप भेटलेति आज । समाधान सहज आलिंगितां ॥ ३ ॥
नामा म्हणे मज कळलें याचें प्रेम । देव केले श्रम काय गुणें ॥ ४ ॥

[१३१८]

अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाहीं गेला ॥ १ ॥
मान अपमान वाढविसी हेवा । दिवस असतां दिवा हातीं घेसी ॥ २ ॥

अभंग १३१५—(पं.),(धु.)व(भा.), १३१६—(आ.), १३१७—(पं.), (धु.)व(भा.), १३१८—(पं.) व (भा.)

परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ । आंधळे पां डोळे कां बा जाले ॥ ३ ॥
कल्पतरुतळवटीं इच्छिली ते गोष्टी । अद्यापि नरोटी राहिली कां ॥ ४ ॥
घरीं कामधेनु ताक मागूं जाय । ऐसा द्वाड आहे जगामाजीं ॥ ५ ॥
म्हणे मुक्ताबाई जाई दरुषणा । आधीं अभिमाना दूर करा ॥ ६ ॥

[१३१९]

जालासी हरिभक्त तरी आम्हां काय । आंतली ती सोय न ठाऊकी ॥ १ ॥
घेऊनि टाळ दिंडी हरिकथा करिसी । हरिदास म्हणविसी श्रेष्ठपणें ॥ २ ॥
गुरुविण तुज नव्हेचि गा मोक्ष । होशिल मुमुक्षु साधक तूं ॥ ३ ॥
आत्मतत्त्वीं दृष्टी नाहींच पां केली । तंववरी ब्रह्मबोली बोलुनि काय ॥ ४ ॥
तुझें जरी रूप तुवां नाहीं ओळखिलें । अहंतेतें धरिलें कासयासी ॥ ५ ॥
आमुचें तूं मूळ जरी पुसतोसी । तुझें तूं अपेशी पाहुनि घेई ॥ ६ ॥
ऐक रे नामया होई आत्मनिष्ठ । तरीच तूं श्रेष्ठ ज्ञानी म्हणे ॥ ७ ॥

[१३२०]

बोलोनियां येणें वाढविला डांगोरा । अंतरींचा कोरा गुरुविण ॥ १ ॥
संतांचा सन्मान कळेना जयासी । राहुनि देवापाशीं काय केलें ॥ २ ॥
परिसा झांकण घातलें खापर । नाहीं जाले अंतर बावनकस ॥ ३ ॥
खदिरांगारीं श्रृंगारी हिलाल । अंतरींचें काळें गेलें नाहीं ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई अभिमानें नेलें । सर्पा पाजियेलें विष तेंचि ॥ ५ ॥

[१३२१]

अमृत टाकुन कांजीची आवडी । साजेना झोपडी काय त्याला ॥ १ ॥
खरासी अखंड गंगेचें हो स्नान । गेलें वायांविण जिणें त्याचें ॥ २ ॥
पोवळ्यापरिस दिसती रानगुंजा । श्रृंगाराच्या काजा न येती त्या ॥ ३ ॥
आनारा परिस चोखट इंद्रावन । चवी कडुपण हीन त्याचें ॥ ४ ॥
रंगाची बाहुली दिसती साजिरी । बेगडाचे परी नग त्याली ॥ ५ ॥
म्हणे मुक्ताबाई पुरे तें दर्शन । गुरुविण संतपण आहे कोठें ॥ ६ ॥

---

अभंग १३१९--(आ.), १३२० व १३२१--(पं.) व (भा.)

अनुक्रमणिका

[१३२२]

उंसाचे सेजारीं येरंडाचें झाड । नाहीं त्याचा पाड गोडी आली ॥ १ ॥
कर्पुरासी जाला दीपाचा शेजार । काय गुणें सार राहिल त्याचा ॥ २ ॥
सागरीं लवण टाकिलें नेऊन । काय गुण खडेपण उरलें त्याचें ॥ ३ ॥
तैसा नामदेव विठोबाच्या जागा । काय गुणें या गा कोरेपण ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई चंदनाचें झाड । अहंतासर्प वेढे गुंडाळिले ॥ ५ ॥

[१३२३]

संत पाहुणेरा सज्जनाचे घरीं । पूजा करितां वरी डोई काढी ॥ १ ॥
करितां सन्मान अंगीं भरे ताठा । देवा पैं करंटा असुनी काय ॥ २ ॥
अहंता हा खुंट वाढविला चित्तीं । न साहे संगती सज्जनाची ॥ ३ ॥
पंढरीचें भूषण सांगतो जनांसी । नाहीं या मनासी तीळ बोध ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई चांगदेवा वाणी । भजावा सज्जनीं नामदेव ॥ ५ ॥

[१३२४]

चौदाशें वरुषें शरीर केलें जतन । बोधाविण शिण वाढविला ॥ १ ॥
नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश । [1]परमार्थासि दोष लावियेला ॥ २ ॥
स्वहिताचें कारण पडियेलें जेव्हां । शरण आला तेव्हां आळंकापुरीं ॥ ३ ॥
गैनीनाथें गुज दिलें निवृत्तीला । निवृत्तीचा जाला ज्ञानदेव ॥ ४ ॥
[2]ज्ञानदेवें बीज वाढविलें जनीं । तेंचि आम्हीं तुम्हीं संपादिलें ॥ ५ ॥
म्हणे मुक्तावाई तिहीं लोकीं ठसा । नामदेव ऐसा राहिला कां ॥ ६ ॥

[१३२५]

[3]निवृत्तिदेव म्हणे ऐसें म्हणों नये । धन्य भाग्यें पाहे संत आले ॥ १ ॥
आपुलें स्वहित करावें आपण । संतांच्या सन्माना चुकों नये ॥ २ ॥

अभंग १३२२ व १३२३––(पं.) व (भा.). १३२४––(पं.), (भा.) व (शि.), १३२५––(पं.) व (भा.)

१ लोक परमार्थास लावियेले। (शि. व पं.)
२ ज्ञानदेवें बीज वाटिलें सजनीं । ते तुम्ही आम्ही संपादिले ।। (भा.)
३ निवृत्ति म्हणे ऐसें न म्हणावें बाई । धन्य भाग्य पाही संत आले ।। (वा.)

अनुक्रमणिका

धन्य हो ते नर राहाती पंढरीं । श्वान त्यांचे घरीं सुखें व्हावें ॥ ३ ॥
नामदेवा संगें देवाचा हो वोढा । प्रेमें केला वेडा पांडुरंग ॥ ४ ॥
निवृत्ति म्हणे त्यांसी न म्हणे आरे तुरे । बाई ठेवितां बरें डोई माते ॥ ५ ॥
म्हणे मुक्ताबाई घाला लोटांगण । आपणां दर्शन नलगे त्याचें ॥ ६ ॥

[ १३२६ ]

कुलालाचे कुंभ भाजल्याविण माती । काय आहे संगतीं पाणियाची ॥ १ ॥
मेणाची पुतळी घेतां करीं बरी । अग्निचे शेजारीं राहे कैशी ॥ २ ॥
तैसा अधिरासी काय संतसंग । मृगजळा तरंग येतील कैसे ॥ ३ ॥
तें आजि नवल देखियेलें डोळां । दगड जैसा जळां वेगळेपण ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई जाऊं [1]देऊं नये । ऐसें सरिसें काय भांडें करा ॥ ५ ॥

[ १३२७ ]

[2]कुलाल आपल्या घरीं भाजवी भाचरी । म्हणे जैं होईल हरि कृपावंत ॥ १ ॥
हरीसि वरदळ लावितो निशिदिनीं । धाडिला म्हणोनि तुम्हांपाशीं ॥ २ ॥
तुम्ही संतजन उद्धराल तत्काळ । नामा लडिवाळ विठोबाचा ॥ ३ ॥
राखावें तें ब्रीद करावें पावन । धाडा बोलावणें गोरोबाला ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई भाजलें कीं कोरें । काकाचें उत्तर सत्य मानूं ॥ ५ ॥

[ १३२८ ]

गोरा जुनाट पैं जुनें । हातीं थापटणें अनुभवाचें ॥ १ ॥
परब्रह्म म्हातारा निवाला अंतरीं । वैराग्याचे वरी पाल्हाळला ॥ २ ॥
सोहं शब्द विरक्ति डवरली आंतरीं । पाहातां आंबरी अनुभव ॥ ३ ॥
म्हणे मुक्ताबाई घालूं द्या लोटांगण । जाऊं द्या शरण अव्यक्तासी ॥ ४ ॥

[ १३२९ ]

मोतियांचा चुरा फेंकिला अंबरीं । विजुचियां परी कीळ जालें ॥ १ ॥
जरी पितांबरें नेसविलीं नभा । चैतन्याचा गाभा नीळबिंदू ॥ २ ॥

---

अभंग १३२६ ते १३२९—(पं.) व (भा.)

१ म्हणे मुक्ताबाई जाऊं न द्या यास । भाजुन सरस भांडें करूं ॥ (भा.)

२ कुलालें आपुले घरीं भाजावीं भासरें । म्हणजे होईल बरें रूपवंत ॥ (भा.)

तळीपरि पसरली शून्याकार जाली । सर्पाचिये पिली नाचूं लागे ॥ ३ ॥
कडकडोनि वीज निमाली ठायिचे ठायीं । भेटली मुक्ताबाई गोरोबाला ॥ ४ ॥
ज्ञानदेव म्हणे कैसी जाली भेट । ओळखिलें अविट आपुलेंपण ॥ ५ ॥

[ १३३० ]

निवृत्तिदेव म्हणे चला गुंफेमधीं । अचळ हे आदि समाधी असे ॥ १ ॥
सद्गुरुप्रसादें बोधिली नेटकी । गुहे गोप्य ताटी आड केली ॥ २ ॥
दंड चक्राकार बांधिली चौकुन । आंत संतजन करिती वास ॥ ३ ॥
ऐसे गुंफेमध्यें नाहीं नामदेव । म्हणुनि माझा जीव थोडा होतो ॥ ४ ॥
गैनीची मिरास घेतला [1]प्रमाण । पूर्वभूमि जतन करित आस ॥ ५ ॥
निवृत्तिदेव म्हणे मुक्ताईच्या उत्तरें । भाजलें कीं कोरें कळों येईल ॥ ६ ॥

[ १३३१ ]

परस्परें गुह्य करिती भाषण । म्हणती महाधन गांवा आला ॥ १ ॥
रक्त श्वेत पीत नीळ वर्णाकार । नक्षत्रांची वर पूजा केली ॥ २ ॥
प्रकाशमय तत्त्व ज्योतिर्मय पहाणें । [2]दीप त्रिभुवनीं एक जाला ॥ ३ ॥
निवृत्तिदेव म्हणे कुलालाचें चक्र । [3]अंतर बाहेर एक ऐसें जालें ॥ ४ ॥

[ १३३२ ]

हांसोनि सोपानें खुणाविल्या खुणा । नामदेव पाहुणा आला असे ॥ १ ॥
तयासी हो पाक पाहिजे पवित्र । भाजलें कीं कोरें कळों नेदी ॥ २ ॥
मुक्तिकेचे पारखी तुम्ही आहां देवा । भाजुनि जीवा शिवा ब्रह्म करा ॥ ३ ॥[4]
आनंदें डुल्लती करावरी कर । नेणों राहिलें कोरें कोण्या गुणें ॥ ४ ॥
निर्गुणापासोनी सगुणाची संगती । नाहीं स्वरूपस्थिति अंगा आली ॥ ५ ॥
म्हणे मुक्ताबाई हेरोनियां हेरा । हिरा किंवा गारा नेणों बापा ॥ ६ ॥

---

अभंग १३३० ते १३३२—(पं.) व (भा.)

१ प्रेमानें (भा.) २ दीपें त्रिभुवन येकवटिलें। (भा.) ३ आंतर बाहेर नसे जालें। (भा.) ४ (भा.) प्रतीत येथें नवा अभंग होतो व तो सहापर्यंत पुरा होतो, तर दुसऱ्या (भा.) प्रतीत १३३१ व १३३२ हे जोड अभंग आहेत.

[१३३३]

जोहारियाचे पुढें मांडियेलें रत्न । आतां मोला उणें येईल कैसें ॥ १ ॥
[1]तैसें थापटणें पारखियाचा हात । वाफ जाल्या घात वायां जाती ॥ २ ॥
प्रथम थापटणें निवृत्तीच्या माथा । डेरा जाला निका परब्रह्म ॥ ३ ॥
तेंचि थापटणें ज्ञानेश्वरावर । आतां कैंचें कोरें उरे येथें ॥ ४ ॥
तेंचि थापटणें सोपानाचे डोईं । यांत लेश नाहीं कोरें कोठें ॥ ५ ॥
तेंचि थापटणें मुक्ताबाईला हाणी । अमृत संजिवनी उतु आली ॥ ६ ॥
तेंचि थापटणें नामदेवावर । डोई चोळूं मोहरे रडों लागे ॥ ७ ॥
गोरा म्हणे कोरा राहिला गे बाई । सुन्नेभरि नाहीं भाजियेला ॥ ८ ॥

[१३३४]

संतसमागम फळला रे मला । सन्मानाचा जाला लाभ मोठा ॥ १ ॥
अतीथि आदर केला मुक्ताबाई । लांकडानें डोई फोडिली माझी ॥ २ ॥
देवानें गोंधळ घातला गरुडपारीं । भिजली पितांबरी अश्रुपातीं ॥ ३ ॥
माझें माझें म्हणोनि गाईलें गान्हाणें । कळलें संतपण हेंचि तुमचें ॥ ४ ॥
भरी भरोनियां आलों तुम्हां जवळी । कैकाड मंडळी ठावी नोव्हे ॥ ५ ॥
नामा म्हणे सन्मान पावलों भरून । करितां गमन बरें दिसे ॥ ६ ॥

[१३३५]

[2]उद्विग्न मनीं करी दीर्घ ध्वनी । नाहीं माझें कोणी सखे ऐसें ॥ १ ॥
वैराग्य कसवटी सोसवेना घाये । पळावया पाये मार्ग काढी ॥ २ ॥
जाले चाळाचूळ मनांत चंचळ । युगा ऐसें पळ वाटतसे ॥ ३ ॥
नामा म्हणे जावें पळोनियां आतां । संतसंग होतां भाजतील ॥ ४ ॥
म्हणे मुक्ताबाई [3]चैतन्याचा केर । ब्रह्म अग्नीवर चेतवावा ॥ ५ ॥[4]

---

अभंग १३३३—(पं.), (भा.) व (बा.), १३३४—(पं.) व (भा.), १३३५—(पं.), (भा.) व (बा.)

१ गोरोबा उठले सवे तैसे (बा.) २ गहिवरतां (बा.) ३ जमवा क्षराक्षर (बा.) ४ हा अभंग 'संतसमागम फळला रे मला' व 'उद्विग्न मनीं करी' मिळून (भा.) प्रतीत एकच अभंग होतो.

अनुक्रमणिका

[१३३६]

अंतर बाहेर भाजूं आम्ही कुंभ । भरूं निरालंब सगळेची ॥ १ ॥
अहं सोहं उर्ध्व लाउनी फुंकणी । नेत्रद्वारें फुंकुनी जाळ करूं ॥ २ ॥
जीवित्व काढुनि शिव घडूं अंगा । प्रिय पांडुरंगा आवडेल ॥ ३ ॥
म्हणे मुक्ताबाई पळायाचें पाही । आसन स्थिर नाहीं नामयाचें ॥ ४ ॥

[१३३७]

न पुसतां संतां निघाला तेथुनी । पैलपार इंद्रायणी प्राप्त जाला ॥ १ ॥
मागें पुढें पाहे पळत तांतडी । आला उठाउठी पंढरिसी ॥ २ ॥
कळवळोनि कंठी धरिली विठल मूर्ती । नको देऊं हातीं निवृत्तीच्या ॥ ३ ॥
ज्ञानदेव सोपान बोलाविला गोरा । जुनाट म्हातारा जाळूं आला ॥ ४ ॥
मुक्ताईनें तेथें [1]भाजविली कळी । हे संत मंडळी कपटी तुझी ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा आणिलें पूर्व दैवें । गेलों असतों जीवें सगळाची ॥ ६ ॥

[१३३८]

पूर्वी तुझी कांहीं केली होती सेवा । उपयोगा देवा आली आजी ॥ १ ॥
[2]अनंता जन्मींचें फळलें अनुष्ठान । पाहिले चरण विठो तुझे ॥ २ ॥
न जाणों माझ्या येतील पाठोपाठीं । घालतील मोठी भीड तुज ॥ ३ ॥
त्यासी द्याल तुम्ही अगत्य उदारा । मातें कां न मारा आपुले हातें ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझे न सोडी चरण । युगायुगीं धरणें घेतलें असे ॥ ५ ॥

[१३३९]

हातांत नरोटी जीर्ण वस्त्र भार । म्हणसी सवदागर संत माझे ॥ १ ॥
परळ भोपळा गृहामाजी संपत्ति । भूषण कां श्रीपती सांगतसां ॥ २ ॥
भणंगाचे घरां नित्यची राजपट । सांगसी अचाट ब्रीद त्यांचें ॥ ३ ॥

---

अभंग १३३६ ते १३३९—(पं.) व (भा.)

१ मातविली (भा. व पं.) २ येरवीं तो आजी दिल्हीसे आहुती। मज कां जाळिती अवघे जन ॥ असा चरण (भा.) प्रतीत दुसरा आहे.

कैकाडयाचे वानी करिती गुडगुड । मजला हें गूढ उमजेना ॥ ४॥
नामा म्हणे गाती प्रकाशाचें गाणें । आम्हां 'अघोरवाणें दिसतसे ॥ ५ ॥

[१३४०]

म्हणती घेतल्या आम्हीं धनाचिया कोडी । खर्चायला कवडी थार नसे ॥ १ ॥
रडती पडती येरांवरी येर । आनंदाला पार नाहीं म्हणती ॥ २ ॥
काय गुणें देव रिझाला त्यावरी । नेसाया फटकुरीं जन्म गेला ॥ ३ ॥
पाहोन दरिद्र जालों कासाविस । केवळ परीस ते पांढरेच ॥ ४॥
ल्हानशी मुक्ताई जैसी सणकांडी । केले देशोधडीं महान संत ॥ ५ ॥
सगळेंची काखेसी घेई ब्रह्मांड । नामा म्हणे पाखांड दिसतें मज ॥ ६ ॥

[१३४१]

पांचा सातांचा आहे येक जागां मेळा । देताती कवळा येकयेकां ॥ १ ॥
करूं पाहातां मज जिताची विटंबना । म्हणोनी नारायेणा पळोनी आलों ॥ २ ॥
पाहिला तयाचा मानस आदर । जमा केला केर जाळावया ॥ ३ ॥
त्यांच्या धाकें मागें आलों रे अनंता । येत तुझ्या चित्ता बरें त्यांचें ॥ ४ ॥
'नामा म्हणे जीवें आलों वांचवोनी । अझुनि तरी चक्रपाणि वांचवी मज ॥ ५ ॥

[१३४२]

आहे त्यांचे मनीं करावें आगमन । घेतील मागुन तुजपाशीं ॥ १ ॥
त्यावेळीं तुम्ही व्हाल जी बेभान । द्याल जी काढोन संतापासीं ॥ २ ॥
खादल्या जेविल्याचें राखावें स्मरण । तुला माझी आण पांडुरंगा ॥ ३ ॥
चालविला लळा पुरविली आवड । आतां कां दगड जड जालों ॥ ४ ॥
कां माझी चिंता सांडिली अनंता । संताहातीं देतां हरुष वाटे ॥ ५ ॥
नामा म्हणे काये करिसी अमंगळ । अडचणी राउळामाजीं जाली ॥ ६ ॥

अभंग १३४०—(पं.), १३४१—(भा.), १३४२—(पं.) व (भा.)
१ अवघडवाणें (भा.)
२ नामा म्हणे आलो जीव वाचउनी । आझुनि चक्रपाणि द्याल हाती ॥ (भा.)

[१३४३]

वटारोनि डोळे पाहती आकाश । मज त्याचा भास कळों नेदी ॥ १ ॥
भाजा भाजा म्हणोनि उठली एकसरां । मग म्यां बाहेरां गमन केलें ॥ २ ॥
आतां यांजवरी घाल त्यांचे हातीं । होऊं पाहाती माती जीवित्वाची ॥ ३ ॥
अभयाचें दान द्यावें बा श्रीहरी । 'दुर्बळ बाहेरी घालूं नये ॥ ४ ॥
समर्था लांच्छन लागतें नांवाचें । न जाणों देवाचें असेल कांहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे नांव पतितपावन । तेया बोला उणें आणूं नये ॥ ६ ॥

[१३४४]

संतांसी विन्मुख जालासी गव्हारा । नाहीं आतां थारा इहपरलोकीं ॥ १ ॥
नाहीं वेडया संतांचा अंगवळा । झोंप बैसली डोळां अज्ञानाची ॥ २ ॥
भ्रांतीनें तुझी पुरविली पाठी । सज्जनाच्या गोष्टी कडू जाल्या ॥ ३ ॥
हाता आला लाभ गमाविला सारा । भुललासी गव्हारा भ्रमभूली ॥ ४ ॥
मोह सर्पे तुझें व्यापियेलें अंग । म्हणे पांडुरंग काय आतां ॥ ५ ॥

[१३४५]

श्रीविठ्ठलें आपुल्या मुखवचनें । नामदेवासी करी अज्ञापन ।
होवोनि दीनाचें अति दीन । सद्‌गुरूसी शरण रिघावें ॥ १ ॥
जोडल्या सद्‌गुरुकृपालेश । मग सर्वत्र माझाचि प्रकाश ।
तुज मज भेदाचा भास । तो निरसोन जाईल ॥ २ ॥
नामा म्हणे तुजसी । पावावया सेविजे सद्‌गुरूसी ।
तो तूं रोकडा जोडिलासी । आतां सद्‌गुरूसी काय काम ॥ ३ ॥
फळ तरूवर शिखरीं । म्हणोनि आरोहण कीजे त्यावरी ।
तें फळ अवचिता जोडिलें करीं । मग तयावरी कासया चढावें ॥ ४ ॥
मग श्रीहरी म्हणे अज्ञान । सांडून सेविजे गुरुचरण ।
तुझ्या प्रेमें माया सोंग धरून । लटिका तुजपाशीं मी खेळें ॥ ५ ॥
जंव सद्‌गुरूचें नाहीं सेवन । तंव मी जैसें स्वप्नीचें धन ।
माझें न तुटे भवबंधन । सद्‌गुरूआज्ञेवांचूनी ॥ ६ ॥

---

अभंग १३४३ व १३४४—(पं.) व (भा.), १३४५—(आ.)
१ दया दुबळ्यावरी घालुनियां । (भा.)

तेणें नामा सद्‌गदित जाला । विठोबाच्या चरणीं लागला ।
कोण गुरु पाहिजे केला । तें सांगिजे स्वामिया ॥ ७ ॥
मग श्रीविठ्ठल म्हणे ऐक आतां । सांगेन सद्‌गुरूची वार्ता ।
त्वां पाहोनि तत्त्वतां । शरण तात्काळ रिघावें ॥ ८ ॥
भक्तीचें नेणें लक्षण । कृपामंद दयाहीन ।
इतरांचे अवगुण । अखंड मुखीं जल्पती ॥ ९ ॥
मी एक जाणता सर्वांठायीं । सर्व शिकविलें म्यांचि पाहीं ।
ऐसें बोलती जनप्रवाहीं । महंतीलागीं ॥ १० ॥
देखिलिया सज्जन । त्यासी करी सन्मान ।
सभा देखोनियां छळण । करी करवी तयाचें ॥ ११ ॥
लांडें लटिकें गद्य पद्य । पुसोनी होती श्लाघ्य ।
नेणें तरी हांसोनि निंद्य । बोलती ह्या गुरूसी ॥ १२ ॥
तो जरी सांगे खरें । त्यासी बोलती बरें बरें ।
सभाजनांसी नेत्रद्वारें । अशुद्धता दाविती ॥ १३ ॥
आपण न सांगती आपुलें गुज । पुढल्यासी म्हणती नकळे तुज ।
ऐसें संदेह करणीचें मोज । वाटे तया ॥ १४ ॥
शिष्य करितां उल्हासती । शिष्य होई म्हणोनि उपदेशिती ।
नानापरी बोधिती । सेवेलागीं ॥ १५ ॥
शिष्य करिती बहुवस । त्यांच्या सेवेची करिती आस ।
जो न भजे त्यास । शिव्याशाप देताती ॥ १६ ॥
तंत्र मंत्र उपदेशिती । ध्यान आसनीं गोंविती ।
देवा ब्राह्मणा न भजती । आचारभ्रष्ट जे ॥ १७ ॥
धातु विद्येची धरिती गोडी । जारणमारणाची अति आवडी ।
विषयवासनेची हुंडी । अखंड जीवीं ॥ १८ ॥
ज्ञान गर्वाचा महिमा बरवा । श्रीगुरु ऐशा अखंड भावा ।
शिष्यसमुदाय देखोनि गर्वा । थोरीवेचा मानिती ॥ १९ ॥
असो बहु ऐसें कथन । परी सद्‌गुरु कृपाधन ।
त्याचें ऐक महिमान । सावध चित्तें ॥ २० ॥
ज्यासी गुरुत्वाचें नाहीं काज । शिष्य भजतां वाटे लाज ।
उदास वृत्ति सहज । निर्मळ भोळा ॥ २१ ॥

अनुक्रमणिका

निंदा स्तुति समान । बोलती भेदिती कठिण वचन ।
कधीं न होती क्रोधायमान । कवणाहीवरी ॥ २२ ॥

जे नेणती खरें खोटें । समान वाटे सान मोठें ।
सुखदु:खाचे चपेटे । न शिवती कदाकाळीं ॥ २३ ॥

शिष्य करितां आळस चित्तीं । केलिया सर्वस्व निरोपिती ।
कांहीं थोरीव नाहींच चित्तीं । महत्त्वाची ॥ २४ ॥

सज्जन देखोनी आनंदती । त्याचें गुणागुण न विचारिती ।
जीवें भावें इच्छिती । साधुसंग ॥ २५ ॥

आपुला कष्टवुनी देहो । ज्ञान तर्काचा कलहो ।
साधुसेवेचा मनीं लाहो । करी सदा ॥ २६ ॥

जे आंत बाहेरी भरोनी उरले । अंतरीं निवोन विरालें ।
परब्रह्मीं सहजाविले । नेणों काय ॥ २७ ॥

ऐसें साधुचें महिमान । साधतां कैचें उरेल मन ।
कल्पा अवधीं करितां कथन । नव्हे पूर्ण पूर्णता ॥ २८ ॥

ऐसा साधु भेटेल तुज । तरी मीच होवोनि पावसी मज ।
जाईल सर्व संदेह आज । आपेंआप नाम्या ॥ २९ ॥

मग नामदेव म्हणे देवा । ऐसा साधु भेटेल जेव्हां ।
तरी कैशापरी सेवावा । कृपानिधी तो ॥ ३० ॥

मग बोलिले श्रीरंग । दैवत बुद्धीचा होईल त्याग ।
तन मन अर्पोन चांग । शुद्ध सेवा करावी ॥ ३१ ॥

तर्क वितर्क बाह्यमुद्रा । तेथें न चले गा भक्तनरेंद्रा ।
तारीं तारीं या भवसमुद्रां । म्हणोनि शरण रिघावें ॥ ३२ ॥

ते अंतर्बाह्य व्यापक । जाणतां सर्व लीला कवतुक ।
जैसे त्यासी देखती देख । तैसे तयासी आज्ञापिती ॥ ३३ ॥

भाग्यें जरी जोडती त्याचे चरण । तरी वर्तणूक आहे कठीण ।
तें तुज सांगतों गुप्त खूण । सावधान ऐक पां ॥ ३४ ॥

शरीर वेंचिलें तरी वेंचिजे । परी सद्‌गुरुवचन नुल्लंघिजे ।
रात्रंदिवस राहिजे । आज्ञा संकेतीं ॥ ३५ ॥

ज्यावरी गुरूची प्रीति । त्याची अनन्य भावें कीजें भक्ती ।
आज्ञेवांचोनि कल्पांतीं । विरोध कोणासी न करावा ॥ ३६ ॥

का जरी तो सर्वांतरीं आहे । विरोध कोणाचा न साहे ।
विशेष सद्‌गुरु जरी होये । तरी खेद न कीजे ॥ ३७ ॥

अरे विरोधभाव असतां । तें चढे सद्‌गुरूच्या माथा ।
जैसा घटभंग होतां । अमृत सांडे ॥ ३८ ॥

ज्याशीं सद्‌गुरूची कृपा असे । त्यासि मानावें आम्ही ऐसें ।
सर्वस्व जातां मानसें । न करिजे अंतर ॥ ३९ ॥

देखे त्याचे हृदयांतरीं । सद्‌गुरु वसे निरंतरीं ।
त्यासि खेद होतां भारी । अंतरे सद्‌गुरु ॥ ४० ॥

क्रोध हृदयीं भरला । तो आत्मस्थितीसी अंतरला ।
तोच गुरूचा घात केला । शिष्याहातीं ॥ ४१ ॥

गुरुशिष्य तोचि निजबंधु । त्यासि स्वप्नीं न कीजे विरोधु ।
करितां घडे गुरुवधु । शास्त्रवाक्य ॥ ४२ ॥

तरी गा कार्याकारणें । बोलिजे तेंची घडावें वर्तणें ।
एक होतां कोपायमानें । एक समाधान त्यास द्यावें ॥ ४३ ॥

जो आपुल्या गुरूची स्तुती करी । त्याचे चरण वंदावे शिरी ।
निंदा बोलतीये अवसरीं । निघिजे तेथोनी ॥ ४४ ॥

गुरूसमीप न बैसिजे । गुरूसी वचन न बोलिजे ।
आज्ञा मागोनी वंदिजे । कार्याकारणें ॥ ४५ ॥

देशीं आहे सद्‌गुरु । तिकडे कीजे नमस्कारू ।
चंद्रकारणें चकोरू । तैसा भेटी इच्छिजे ॥ ४६ ॥

गुरूसी अर्पिजे तन मन । गुरूसी अर्पिजे वित्त धन ।
गुरूसी अर्पिजे चैतन्य । आनंदरूप ॥ ४७ ॥

गुरूचे दोष गुण । मनें न कीजे उच्चारण ।
जें जें गुरूचें आज्ञापन । मेरू ऐसें मानिजे ॥ ४८ ॥

सज्जनाची संगती धरिजे । गुरूरूप विश्व मानिजे ।
चित्तानुसार अर्पिजे । साधुजनांसी ॥ ४९ ॥

ज्यासि सद्‌गुरु कोपला । तो साधु असतां खर वागला ।
ईश्वर जरी साह्य जाला । तरी काढों न शके ॥ ५० ॥

सद्‌गुरु आधीन सकळ देव । गुरु आधीन पितर मानव ।
सद्‌गुरु पूजितां सर्व । आनंदातें पावती ॥ ५१ ॥

अनुक्रमणिका

ऐसें सद्गुरूचें महिमान । म्हणोनि ब्रह्म त्या आधीन ।
तो जरी पतितासी देईल मान । तरी ब्रह्मपूर्ण तो होय ॥ ५२ ॥

ऐसें जेणें आचरावें । तरी सद्गुरूसी शरण जावें ।
नाहीं तरी करावें । नामस्मरण माझें पैं ॥ ५३ ॥

तेणेंकरून कांहीं एक । निवारूं शकेल जन्मदुःख ।
कोणें एक जन्मीं सद्गुरु देख । भक्ति करोनि पाविजे ॥ ५४ ॥

चढाओढी गुरु करिती । मग सुबुद्धिहि टाकिती ।
त्यासी यमाघरीं प्राप्ति । खरत्वाची ॥ ५५ ॥

सद्गुरुसेवा तें मोक्षपद । सद्गुरुसेवा तें आनंदपद ।
सद्गुरुसेवा तो ब्रह्मावबोध । कैवल्यप्राप्ती ॥ ५६ ॥

असो ऐसिया परी । जो सद्गुरु वाक्य वाहे शिरीं ।
तोचि ब्रह्मविद्येचा अधिकारी । हरिहरां वंद्य तो ॥ ५७ ॥

ऐसें नामदेवाप्रति श्रीहरी । स्नेह साक्षेपें निरूपण करी ।
ऐकोनियां चरणावरी । सद्गदित होउनि लोटला ॥ ५८ ॥

देवा तूं होवोनि माझी दिवटी । गुरुनिधान दाखवी दृष्टी ।
जेणें करूनी भवबंध गांठी । सुटेल सर्वथा ॥ ५९ ॥

मग कळवळोनी श्रीहरी । नामदेवातें पोटासी धरी ।
जाय पावशील झडकरी । हस्त विसा खेचराचा ॥ ६० ॥

तेणे नाम्यासी समाधान । देवही जाला सुखसंपन्न ।
नामा पावोनी ब्रह्मज्ञान । मिळशील माझ्या स्वरूपीं ॥ ६१ ॥

ऐसें हें देवभक्त निरूपण । प्रथम शिष्यासी करवी श्रवण ।
मग दीजे पूर्णपण । म्हणे नामा ॥ ६२ ॥

[ १३४६ ]

देव आणि नामा [१]उभे भीमातीरा । प्रेमें [२]येरयेरा आळविती ॥ १ ॥

देव म्हणे नाम्या ऐकें गुह्य गोष्टी । संसाराची तुटी जेणें होये ॥ २ ॥

श्रीगुरुवांचुनी मुक्ति तुज नाहीं । भवनदी डोहीं नुतरसी ॥ ३ ॥

शरण गुरुसी जालिया सप्रेमें । संसाराचा श्रम उतरेल ॥ ४ ॥

अभंग १३४६—(पं.) व (शि.)
१ उभा भीमातीरीं । (शि. व पं.) २ येरयेरी वोवाळिति । (शि. व पं.)

गुरुवांचुनियां कैंचा मुक्तिठाव । संसार हा वाव कैसा होय ॥ ५ ॥
म्हणूनि नाम्या तुवां गुरुसि जावें शरण । तेणें भवबंधनें मुक्त होती ॥ ६ ॥
ऐसें ऐकोनियां नामा थरारिला । मूर्च्छागत [१]जाला भूमीवरी ॥ ७ ॥
भूमि लोळे नामा कंठ सद्‌गदित । डोळियां स्त्रवत अश्रुजळ ॥ ८ ॥
इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम । नाम्यासी सप्रेमें उचलिलें ॥ ९ ॥
नाम्या तुज काय वाटतसे दुःख । [२]संसाराचें सुख तुज जालें ॥ १० ॥
नामा म्हणे देवा तुज ऐसा दाता । मज भवव्यथा कवणेपरी ॥ ११ ॥

[ १३४७ ]

अनाथांचा नाथ तुझी ब्रीदावळी । मज कां रे जाळी भवव्यथा ॥ १ ॥
देव म्हणे नाम्या गुरुवांचुनियां । मुक्ति पावावया आन नाहीं ॥ २ ॥
आन नेणें कांहीं करिसी वित्पत्ती । नव्हे माझी प्राप्ती गुरुविण ॥ ३ ॥
जाई नाम्या जाई गुरूसी शरण । तुटे भवबंधन तुझें वेगीं ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा कवणा शरण जाऊं । कोणा मी होऊं शरणागत ॥ ५ ॥

[ १३४८ ]

देव म्हणे नाम्या विसोबा खेचरासी । शरण तयासी जावें वेगीं ॥ १ ॥
इतुकें ऐकोनि नमियेलें देवा । चालयेला तेव्हां विसोबापाशीं ॥ २ ॥
चिंताग्रस्त नामा आला आंवढयासी । पुढें देऊळासी देखियेलें ॥ ३ ॥
नामा तये काळीं गेला देऊळासीं । देउळीं कौतुकासी देखियेलें ॥ ४ ॥

[ १३४९ ]

देवावरी पाये ठेउनि खेंचर । निजेला परिकर निवांतचि ॥ १ ॥
देखोनियां नामा पावला विस्मया । कैसा हा प्राणिया देवो नेणें ॥ २ ॥
उठी उठी प्राण्या आंधळा तूं काये । देवावरी पाय ठेवियेले ॥ ३ ॥
विसोबा खेचर बोले नामदेवा । उठविले जिवा कां रे माझ्या ॥ ४ ॥
देवाविण ठाव रिता कोठें आहे । विचारुनि पाहे नामदेवा ॥ ५ ॥

अभंग १३४७ ते १३४९—(पं.) व (शि.)
१ पडला (पं.) २ संसाराचा शोक तुज जाला। (पं.)

जेथें देव नसे तेथें माझे पाय । ठेवीं पां अन्वय विचारुनी ॥ ६ ॥
नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव । कोठें रिता ठाव न देखेची ॥ ७ ॥

[१३५०]

इतुकें देखोनि चरणीं घाली मिठी । सांठवला सृष्टी अवघा देव ॥ १ ॥
तिहीं त्रिभुवनीं आपण व्यापुनी । आनंदें कोंडोनि राहियेला ॥ २ ॥
श्रीगुरुचे पाय जीवें न विसंबत । मनोवृत्तिसहित ओंवाळिलें ॥ ३ ॥
डोळियांचे डोळे उघडिलें जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥ ४ ॥
जन्ममरणांचें तोडिलें सांकडें । कैवल्यचि पुढें दावियेलें ॥ ५ ॥
कैवल्याचा गाभा विटेवरी उभा । दिसे दिव्य शोभा पांडुरंग ॥ ६ ॥
नामा म्हणे माझी भक्ति हे माउली । कृपेची साउली केली मज ॥ ७ ॥[1]

[१३५१]

सर्व काळीं परमात्मा आहे सर्व देशीं । भावना हे अहर्निशीं दृढ धरी ॥ १ ॥
संतसमुदाय मिळती जेथें जेथें । जाये तेथें तेथें लोटांगणीं ॥ २ ॥
चिंता न करी नाम्या येणें तरसी जाण । तुज सांगितली खूण निर्वाणींची ॥ ३ ॥

[१३५२]

खेचरें केली माव लिंगावरी देउनि पाव । पहावया भाव नामयाचा ॥ १ ॥
नामा तेथें आला देव नमस्कारिला । देखोन बोलला वचन त्यासी ॥ २ ॥
लिंगावरोनि चरण काढाजी वहिले । [2]दिसतां वरी भले करणीं न कळे ॥ ३ ॥
तंव येरु बोलिला नाम्या तूं भला । मज नाहीं कळला देव तुझा ॥ ४ ॥[3]
जेथें नाहीं देव तेथें ठेवी पाव । सर्वज्ञ सदैव तूंची अससी ॥ ५ ॥
मीपणें भुललों मज नकळेची कांहीं । देव नसे ते ठायीं पाय ठेवीं ॥ ६ ॥
तंव नामा होय विचारिता शब्दांची कुसरी । पाहतां निर्धारीं सान नोहे ॥ ७ ॥

---

अभंग १३५० व १३५१—(पं.) व (शि.), १३५२—(धु.) व (भा.)
१ हा शेवटचा चरण (पं.) मध्ये ःःही २ दिसतसां भले परी करणी हीन ॥ (भा.)
३ येथील काही चरण १३४९ मध्येही आहेत.



अनुक्रमणिका

'देवाविण ठाव हें बोलणेंची वाव । परतोनि संदेह पडला मज ॥ ८ ॥
आपुलें उमाणें आपण उमगावें । मजसी तारावें भवसागरीं ॥ ९ ॥
नामा धरी चरण अगाध तुमचें ज्ञान। आपुलें नाम कोण सांगा स्वामी ॥ १० ॥
येरु म्हणे खेचर विसा पैं जाण । लौकिका मिरविणें अरे नाम्या ॥ ११ ॥
नाम आणि रूप दोन्ही जया नाहीं । तोचि देव पाही येर मिथ्या ॥ १२ ॥
जळ स्थळ आणि काष्ट हे पाषाण । पिंड ब्रह्मांड व्यापुन अणुरेणु ॥ १३ ॥
सर्वत्र साक्षभूत हें जाणोनि पाहो । खेचर म्हणे नाम्यातें अवघा देवो ॥ १४ ॥'

[१३५३]

नामदेवा काय करिसी तीळ तुळसी । उभा गा ठेलासी दर्भ जैसा ॥ १ ॥
भुका कागा मरसी जेथिंचा तेथें । केशवराज तूतें आतुडेना ॥ २ ॥
नाहीं दया ध्यान ईश्वरीं भजन । वायांविण प्राण कां करितोसी ॥ ३ ॥
हरिभक्तिविण जन्मलासी नरू । म्हणे विसोबा खेचरू अरे नाम्या ॥ ४ ॥

[१३५४]

तुझें निजसुख तुजपाशीं आहे । विचारुनि पाहे मनामाजीं ॥ १ ॥
विवेक वैराग्य शोधुनियां पाहे । तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ती ॥ २ ॥
ज्ञानाचा प्रकार सहजची जाला । अहंभाव गेला गळोनियां ॥ ३ ॥
खेचर विसा म्हणे जेथें ओंकार निमाला । सहजचि जाला ब्रह्ममूर्ती ॥ ४ ॥

[१३५५]

जरी म्हणसी देव देखिला । तरी हा बोल भला नव्हे नाम्या ॥ १ ॥
जोंवरी मी माझें न तुटे । तंव आत्मारामं कैसेंनि भेटे ॥ २ ॥
खेचर साह्यानें मीं कांहीं नेणें । जीवा या जीव इतुलें मी जाणें ॥ ३ ॥

[१३५६]

मेघेंविण जळ कीं जळेंविण पूर । नख न बुडे परी नाहीं उतार ॥ १ ॥
येथें आहे तो बुडे नाहीं तरे । लटिक्याचे खरें मानिसी काई ॥ २ ॥
म्हणे खेचर विसा तूं जालासी पिसा । दृश्याची हे आशा सांडी नाम्या ॥ ३ ॥

अभंग १३५३ ते १३५५—(आ.), १३५६—(पं.) व (शि.)
१ देवाविण ठाव हे बोलणेचि वाव। परतोनि संदेह न पडे नाम्या॥ (भा.)
२ अनेक प्रतींत चरणसंख्या भिन्न भिन्न आहेत. (धु.) मध्ये ११ व (भा.) मध्ये १० चरण आहेत.

[१३५७]

सुखाचें सुखरूप घेउनी जा तरी । विठ्ठल नामें भरी तिन्ही लोक ॥ १ ॥
आशापाश याही वासना पोखी । विठ्ठलनामा शेखीं घेऊनी राहे ॥ २ ॥
न लगती सायास करणें काया क्लेश । आपण वैकुंठ येईल सवें ॥ ३ ॥
नाठवी संसार नाठवी देहभाव । रोहिणीची माव नकळे काय ॥ ४ ॥
कुल्लाळकुसरीं भ्रमत चक्र । आयुष्या आवर्त मापा करीं ॥ ५ ॥
खेचर विसा म्हणे येथुनी काढिलें । तें तुज दिधलें जा रे नाम्या ॥ ६ ॥

[१३५८]

भवजलधि अगाध तरावया दुस्तर । रचिलें पंढरपूर चंद्रभागा ॥ १ ॥
तारूं पंढरिनाथ मोलेंविण उतरितु । उगला असे तिष्ठतु वाट पाहे ॥ २ ॥
बुडतयाचें भय नाहीं संसारीं । कलिमाजीं पंढरी नाव थोर ॥ ३ ॥
राव रंक दोन्हीं बैसवुनी वरी । उतरी पैलतीरीं भरंवसेनी ॥ ४ ॥
आठराही आवले जे नावेसि लागले । साही खण भरले मिरवताती ॥ ५ ॥
चौमुखीं वर्णितां नकळे याचा पार । वेदां अगोचर सहस्रमुखा ॥ ६ ॥
सडियातें कांसे लावित आपण । कुटुंबिये जाण नावेवारी ॥ ७ ॥
प्रेमाचे पेटे बांधोनियां पोटीं । उतरी जगजेठी पैलपारु ॥ ८ ॥
आप आंगें उघाडी बुडत्यातें कडे काढी । ऐंसे लक्षकोडी तारियले ॥ ९ ॥
सहस्र नाम पेटे बांधे मज पोटीं । तरी जगजेठी लावी कांसे ॥ १० ॥
आदि करोनी सर्वही तारिले । उतरूनि तारिले पैलतिरीं ॥ ११ ॥
ऐसे पक्षी कीट गुल्मल तारिले । खेचर विसा म्हणे तारी मातें पुंडलिक ॥ १२ ॥

[१३५९]

श्रवणीं सांगितली मात मस्तकीं ठेवियेला हात । पदपिंडाविवर्जित केला नामा ॥ १ ॥
खेचरु विसा प्रेमाचा पिसा । तेणें नामा कैसा उपदेशिला ॥ २ ॥
तया सांगितलें गुज । आतां पाल्हाळीं तुज काय चाड ॥ ३ ॥
मग खेचरू म्हणे मज ज्ञान हेंचि गुरु । तेणें अगोचरु म्हणे केला नामा ॥ ४ ॥

अभंग १३५७ ते १३५९—(आ.)


अनुक्रमणिका

[१३६०]

सुखालागें मन तुझें गिवसित तळमळी । परि सुख आहे जवळी नकळे तुज ॥ १ ॥
दर्पणीं दीप्ति कीं दुग्धीं घृतशक्ति । परि करणीविण हातीं न लभेची जाण ॥ २ ॥
सुखालागीं सुखसोय दाखवीत पाहे । अनुभवोनी होय सुखरूप ॥ ३ ॥
सुख तें शांति सुख तें दया क्षमी । सुख तें उपदेश मी निर्विकारी ॥ ४ ॥
सुख तें नैराश्य सुख हरिदास्य । सुख तें विश्वास सदा वसे ॥ ५ ॥
सुख तें सत्संगतीं सुख तें नामीं प्रीति । सुख तें विकृति विषयभोगीं ॥ ६ ॥
सुख तें एकांतवास सुख तें लौकिक त्रास । सुख तें सौरस स्वस्वरूपीं ॥ ७ ॥
म्हणे खेचर विसा परियेसी विष्णुदासा । न घडे भरंवसा तरी अनुभवणें ॥ ८ ॥

[१३६१]

भक्ति त्रिविधा षड्विध नवविधा । यजन याजनें जीवातें दंडिताती सदा ॥ १ ॥
केशव परमात्मा नेणोनि याजी पतितें । पतनीं पडतां होती भूतें रया ॥ २ ॥
नाहीं रूप स्थिति नाहीं शब्दस्थिति । नित्य तया वस्ती निरंजनीं ॥ ३ ॥
एकलें परब्रह्म गुरुमुखें जाणावें । तरि चुकवावें पुनरावृत्ति रया ॥ ४ ॥
ऐसें रे नामया वचन ऐक पुढें । हे तो देवाविषयीं श्रुतीचे निवाडे ॥ ५ ॥
श्रुती नेती परतोनि आलिया । खेचर पुढें सांगे नामया ॥ ६ ॥

[१३६२]

आधीं चैतन्य अपैतें करोनी । मग संचरे तारुण्य वनीं ।
कामक्रोध तुज देखोनी । जाती पळोनी बारा वाटा ॥ १ ॥
तुज पाठीं कवण धांवे । कवण टाकी कवण पावे ।
कामक्रोधें जग मोहावें । कासयासी खोवावें पोटीं पाय ॥ २ ॥
माया मोहजाळ तुटेल । पळेल पां काळ व्याळ ।
कां रे स्मरसी ना गोपाळ । मिथ्या व्याकुळ कांजेविण ॥ ३ ॥
वैराग्य दृढ होई निरुता । कासया भितोसी चपेटघाता ।
परस्त्री तितुकी मानी माता । विषयीं निमित्या आल्यासाठीं ॥ ४ ॥

अभंग १३६० व १३६१—(आ.), १,३६२—(पं.) व (शि.)

धर्माचेनी मार्गें निघाला कर्ण । शिबी चक्रवर्ती जाला जीवित्वहीन ।
तयामाजीं सांग नाडला कोण । लटकी झकवण कां बोलती ॥ ५ ॥
इंद्रिया गोड तें आरोगिजे । मग धनीवरी धावा [1]पोखरिजे ।
काय सांगूं शहाणपण तुझें । खेचर विसा म्हणे अरे नामया ॥ ६ ॥

[१३६३]

येथोनि तेथवरी धांवोनियां गेलों । कांहीं नाहीं तें पाहुनियां आलों ॥ १ ॥
कोठें गेलों कोठें धांवुनी आलों । कांहीं नाहीं तें पाहुनियां धालों ॥ २ ॥
खेचर विसा म्हणे नामदेवा । कांहीं तें तुम्हीं मज दाखवा ॥ ३ ॥

[१३६४]

पर्वतप्राय पापराशी होती दग्ध । वाचेसी मुकुंद उच्चारितां ॥ १ ॥
अच्युत श्रीहरी केशव नरहरी । माधव हरहरी रामकृष्ण ॥ २ ॥
नामाचें साधन करशील पूर्ण । तें प्रपंचाचें भान उरों नेदी ॥ ३ ॥
उदासीन वृत्ति आचरावें कर्म । नाहीं देहधर्म गुण माया ॥ ४ ॥
ऐसा हा अनकळित मार्ग साधेल तुज । खेचर विसा गुज सांगे नाम्या ॥ ५ ॥

[१३६५]

आप तेज वायू पृथिवी गगन । मेलें तें कवण पचामध्यें ॥ १ ॥
आम्हां मरण नाहीं मरशील काई । आत्मवस्तु पाही श्रीगुरुमुखें ॥ २ ॥
जिताची मरण आलेंसें हातां । मरण बोलतां लाज नये ॥ ३ ॥
खेचर विसा म्हणे आम्हां मरण नाहीं । कैसें मरण पाही आलें नाम्या ॥ ४ ॥

[१३६६]

मरण सांगा स्वामी कवणियां गुणें । संसारीं मरण उरलें नाहीं ॥ १ ॥
आम्हां मरण नाहीं मेलें होतें काई । श्रीगुरुच्या पायीं राहे मना ॥ २ ॥

अभंग १३६३—(आ.), १३६४ व १३६५—(पं.) व (शि.), १३६६—(पं.)
१ पोखारिजे (पं.)

अनुक्रमणिका

[1]मरणें हें काया मरणें हें माया । मरे हे छाया कवण्या गुणें ॥ ३ ॥
भक्ति अमरकंदु रामनाम वंदूं । नामयासी छंदू विठोबाचा ॥ ४ ॥

[१३६७]

नामा स्वयेंपाक करुं बैसला । केशव श्वानरूपें आला ।
रोटी घेऊनि पळाला । सर्वांभूतीं केशव ॥ १ ॥
हातीं घेऊनि तुपाची वाटी । नामा लागला श्वानापाठीं ।
तूप घे गा जगजेठी । कोरडी रोटी कां खाशी ॥ २ ॥
तंव श्वान हांसोनी बोलिले । नामया तुज कैसें कळलें ।
येरू म्हणे खेचरें उपदेशिलें । [2]सर्वांभूतीं विठ्ठल ॥ ३ ॥

[१३६८]

सद्‌गुरुनायकें पूर्ण कृपा केली । निजवस्तु दाविली माझी मज ॥ १ ॥
माझें सुख मज दावियेलें डोळां । दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥ २ ॥
[3]तया उतराई व्हावें कवण्या गुणें । जन्म नाहीं येणें ऐसें केलें ॥ ३ ॥
नामा म्हणे निकी दावियेली सोय । न विसरावे पाय विठोबाचे ॥ ४ ॥

[१३६९]

पाषाणाचा देव बोलेचि ना कधीं । हरि भवव्याधि केंवि घडे ॥ १ ॥
दगडाची मूर्ति मानिला ईश्वर । परि तो साचार देव भिन्न ॥ २ ॥
दगडाचा देव इच्छा पुरवीत । तरि कां भगत आघातानें ॥ ३ ॥
पाषाण देवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मुकती मूढपणें ॥ ४ ॥
प्रस्तराचा देव बोलत भक्तातें । सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥ ५ ॥
ऐशांचे माहात्म्य जे कां वर्णिताती । आणि म्हणविती तेणें भक्त ॥ ६ ॥

---

अभंग १३६७—(पं.), (धु.) व (शि.), १३६८—(धु.), १३६९—(आ.)

१ मरण सांगा स्वामी कवणिया गुणें। संसार मरणें उरलें नाहीं॥ हा चरण (पं.) मध्ये तिसरा चरण आहे.

२ सर्व भूतीं विष्णु जाला॥ (धु.)

३ डोळियाचा डोळा उघडिला जेणें । लेवविलें लेणें आनंदाचें ॥ हा चरण (धु.) मध्ये जास्त आहे.

परंतु ते नर पामर जाणावे । त्यांचे नायकावे बोल कानीं ॥ ७ ॥
धोंडा घडोनियां देव त्याचा केला । आदरें पूजिला वर्षे बहु ॥ ८ ॥
तरी तो उतराई होय केव्हां काई । बरवें हृदयीं विचारा हें ॥ ९ ॥
धोंडापाण्याविण नाहीं देव कोठें । होतां सान मोठें तीर्थ क्षेत्र ॥ १० ॥
बाराशीचे गांवीं जाहला उपदेश । देवाविण ओस स्थळ नाहीं ॥ ११ ॥
तो देव नामया हृदयीं दाविला । खेचरानें केला उपकारु हा ॥ १२ ॥

[ १३७० ]

कृपेची साउली अखंड लाधली । खेचर माउली भेटलिया ॥ १ ॥
आतां मज भय नाहीं पैं कोणाचें । जन्ममरणाचें दुःख गेलें ॥ २ ॥
बंधमोक्षाची फिटली काळजी । समाधि लागली समाधीसी ॥ ३ ॥
नामा म्हणे माझें सर्वही साधन । खेचर चरण न विसंबे ॥ ४ ॥

[ १३७१ ]

भक्ति हेंचि भाण परब्रह्म पक्वान्न । गुरुमुखें [1]जेवण जेवियेलें ॥ १ ॥
अनुभव भात लयलक्ष कढी । जेवणार [2]गोडी घेत असे ॥ २ ॥
सुखशांति शाखा भावार्थ हा वडा । जेवणार गाढा आत्माराम ॥ ३ ॥
दया क्षीरधारी शांती पूर्णपोळी । घृत हें कल्होळी प्रेम माझें ॥ ४ ॥
विषयाचा गुरळा थुंकोनी सांडिला । नामा आंचवला संसारासी ॥ ५ ॥

[ १३७२ ]

स्वानंदांत पडोनियां जाती । न संडी वासना चघळित हस्ती ॥ १ ॥
तैसें माझें मन मुरारी । वासना धांवे विषयावरी ॥ २ ॥
डोळियांचीं बुबुळें फुटोनियां जाती । न संडी वासना हालवितो पातीं ॥ ३ ॥
ढोराचें पुच्छ मोडोनियां चांगा । पुढती पुढती हालविती पैं गा ॥ ४ ॥
वोढाळ ढोरा बांधियेलें काष्ट । पुढती पुढती धरी तीच वाट ॥ ५ ॥
नामा म्हणे माझी मुळीं वासनाच खोटी । खेचर विसा चरणीं घातलिसे मिठी ॥ ६ ॥

---

अभंग १३७० व १३७१—(पं.), (धु.) व (शि.), १३७२—(आ.)
१ वचन (धु.) २ गडी आत्माराम (धु.)

अनुक्रमणिका

[ १३७३ ]

सूर्याचा प्रकाश सर्व सृष्टीवरी । धन्य तो अंतरीं सर्वकाळ ॥ १ ॥
स्वर्गादि पाताळ सर्व पूर्ण जळें । चातका न मिळे मेघाविण ॥ २ ॥
नारायण पूर्ण सर्वभूतां ठायीं । अभाग्यासी नाहीं तिहीं लोकीं ॥ ३ ॥
नामा म्हणे गुरुकृपेचें अंजन । पायाळासी धन दिसें जैसें ॥ ४ ॥

[ १३७४ ]

सुखाचे सोयरे भेटती अंतरीं । बाहेरी भितरीं दिधलें क्षेम ॥ १ ॥
सुखाची गवसणी घालोनियां मना । विठ्ठलीं वासना वोल्हावली ॥ २ ॥
वाचे उपरम मन जालें तन्मय । लागलासे लय पर लक्षीं ॥ ३ ॥
शांति क्षमा दया देती आलिंगन । चित्त समाधान पावविलें ॥ ४ ॥
परतलिया दृष्टी इंद्रियांच्या वृत्ती । पावली विश्रांति ठाईंच्या ठाईं ॥ ५ ॥
विष्णुदास नामा निजबोधें निवाला । खेचरें दिधला अभयकर ॥ ६ ॥

[ १३७५ ]

सद्‌गुरुचे पाय जीवें न विसंबावे । मन वळवावें वृत्तिसहित ॥ १ ॥
डोळियाचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥ २ ॥
जन्ममरणाचें फेडिलें सांकडें । कैवल्यचि पुढें दाखविलें ॥ ३ ॥
मोहरले तरु पुष्पफळभारें । तेचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥[१]
नामा म्हणे स्वामी खेचर माउली । कृपेची साउली केली मज ॥ ५ ॥

[ १३७६ ]

वेदांसी न कळे शास्त्रें पें भांडती । श्रुति विवादती ब्रह्मालागीं ॥ १ ॥
आवघेचि कर्मामुक्त उपदेश धर्म । हारपती पें कर्म गुरुसेवा ॥ २ ॥

---

अभंग १३७३—(आ.), १३७४—(पं.) व (शि.), १३७५—(न.), (पं.), (धु.), (शि.) व (भा.), १३७६—(पं.) व (शि.)

१ कैवल्याचा गाभा विटेवरी उभा । दिसे दिव्य शोभा पांडुरंग ॥ (शि.) प्रतीत हा चरण अधिक आवळतो.

सेवेपरतें साधन नाहीं पैं उपदेश । हरीसि सौरस आपेंआप ॥ ३ ॥
नामा म्हणे हरि गुरु आज्ञा काम । भजन निष्काम गुरुसेवा ॥ ४ ॥

[१३७७]

उपजोनी सभाग्य तेचि एक जाले । जीहीं विचारिलें आत्महित ॥ १ ॥
सांडोनि मीपणास सद्गुरुचरणा । लागलों संपूर्ण भावार्थेसि ॥ २ ॥
तयाचें जें कांहीं सर्व मज वोंझें । नाहीं मज दुजें त्यासि कांहीं ॥ ३ ॥
तयाचे हृदयीं संतपण प्रगटे । द्वैतपण तुटे क्षणामाजीं ॥ ४ ॥
नामा म्हणे आम्हां विठोबाचे बोल । सांपडली वोल तरावया ॥ ५ ॥

[१३७८]

सुखाचा सद्गुरु सुखरूप खेचरू । स्वरूप साक्षात्कारु दाखविला ॥ १ ॥
विठ्ठल पहातां मावळलें मन । ध्यानीं भरले नयन तन्मय जालें ॥ २ ॥
मी माझें होतें तें मजमाजि [1]निमालें । जळें जळ गिळिलें जयापरी ॥ ३ ॥
तेथें आनंदीं आनंदु बोळला परमानंदु । नाम्या जाला बोधु विठ्ठलनामें ॥ ४ ॥

[१३७९]

नाशवंत देतां ब्रह्म येईल हातां । ऐसी ज्याची कथा पुराणांत ॥ १ ॥
सद्गुरूचे पायीं देहासि अर्पितां । तात्काळ मुक्तता हातां येते ॥ २ ॥
माया देऊनियां ब्रह्म घ्यावें हातीं । ऐशा गुरूप्रति कां भजाना ॥ ३ ॥
नामा म्हणे गुरूपायीं लाभ आहे । मोक्ष तोही पाहे दास होतो ॥ ४ ॥

[१३८०]

चंद्रभागे तीरीं आयकिल्या गोष्टी । वाल्मीकें शतकोटी ग्रंथ केला ॥ १ ॥
[2]तेणें माझ्या चित्ता बहु जाले क्लेश । व्यर्थ म्यां आयुष्य गमाविलें ॥ २ ॥
जाऊनि राऊळा विठोसी विनविलें । वाल्मिकानें केलें रामायण ॥ ३ ॥
असेन मी खरा तुझा भक्त देवा । सिद्धीस हा न्यावा पण माझा ॥ ४ ॥

अभंग १३७७--(पं.) व (शि.), १३७८ व १३७९--(आ.), १३८०--(पै.), (धु.) व (आ.)
१ मिनलें (शि.) २ माझिया चित्तासी फार जाले क्लेश । (आ.)

शतकोटी तुझे करीन अभंग । म्हणे पांडुरंग ऐक नाम्या ॥ ५ ॥
तये वेळीं होती आयुष्याची वृद्धि । आतांची अवधि थोडी असे ॥ ६ ॥
नामा म्हणे जरी न होतां संपूर्ण । जिव्हा उतरीन तुज पुढें ॥ ७ ॥

[१३८१]

निश्चय पाहूनि उपजली दया । स्वामी देवराया पांडुरंगा ॥ १ ॥
सारजेसी सांगे भीमातीरीं हरी । बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ २ ॥[1]
लाडकें लडिवाळ नामा माझें तान्हें । तयाला मजविण कोण आहे ॥ ३ ॥
मजवरी त्याचें बहु असे ऋण । होईन उत्तीर्ण एवढयानें ॥ ४ ॥
नामा म्हणे हातीं बांधोनियां वह्या । बैसे लिहावया पांडुरंग ॥ ५ ॥

[१३८२]

अभंगाची कळा नाहीं मी नेणत । त्वरा केली प्रीत केशिराजें ॥ १ ॥
अक्षरांची संख्या बोलिले उदंड । मेरू सुप्रचंड शर आदि ॥ २ ॥
सहा साडेतीन चरण जाणावे । अक्षरें मोजावीं चौकचारी ॥ ३ ॥
पहिल्यापासोनि तिसऱ्यापर्यंत । अठरा गणित मोज आलें ॥ ४ ॥
चौकचारी आधीं बोलिलों मातृका । बाविसावी संख्या शेवटील ॥ ५ ॥
दीड चरणाचें दीर्घ तें अक्षर । मुमुक्षु विचार बोध केला ॥ ६ ॥
नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी । प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ॥ ७ ॥

[१३८३]

खवळलों आतां नं भिये रे तुज । सांडिली रे लाज लौकिकाची ॥ १ ॥
आम्ही दीन सिंपे यातिचे ते हीन । दे माझें ठेवणें केशीराजा ॥ २ ॥
साठ लक्ष संख्या चौऱ्यांसी कोटि । त्यांत मी कवडी सोडूं काय ॥ ३ ॥
आणिक याहून असेल वेगळें । घेईन तें बळें जाण आतां ॥ ४ ॥
तुझें थोरपण ऐक हें देवा । दुर्बळाचा ठेवा अभिलाषी ॥ ५ ॥
म्हणूनि पोरटा नामा खेचराचा । काया मनें वाचा सत्य करी ॥ ६ ॥

अभंग १३८१—(पं.), १३८२—(पं.) व (शि.), १३८३—(पं.)

१ ऐकोनियां ऐसें म्हणे पांडुरंगा। लिहिणार सांगा कोण आहे॥ असा अधिक चरण काही (पं.) प्रतींत मिळतो व तो चरण २ व ३ चरणांमध्ये येतो.

अनुक्रमणिका

[१३८४]

[1]दिवस गेले वायांविण । देवा तुज न रिघतां शरण ।
बाळत्व गेलें अज्ञानपण । [2]तैं आठवण नव्हेचि ॥ १ ॥
[3]आला तारुण्याचा अवसरु । सवेंचि विषयाचा पडिभरु ।
कामक्रोध मदमछरु । अति व्यापारु तृष्णेचा ॥ २ ॥
सवेंचि वृद्धपण पातलें । सकळ इंद्रियें सोडिलें ।
देह न करीच म्हणितलें । आंतर पडलें भक्तीसी ॥ ३ ॥
कांही हित नव्हेची माझें । [4]दास्य न घडेचि तुझें ।
आयुष्य वेचिलें वीण काजे । धरणी वोझें पैं जालों ॥ ४ ॥
पुनरपि जन्मा येईन मागुता । कोण जाणे कैसी अवच्छा ।
तुज मी ध्याईन अनंता । [5]ऐसा लहाना कैं होईन ॥ ५ ॥
[6]तुझ्या नामाचा वोरस । तेणें चुके गर्भवास ।
नामा म्हणे विष्णुदास । देई सौरस आपुलें नामीं ॥ ६ ॥

[१३८५]

मज चालतां आयुष्यपंथें । तारुण्यवन पातलें तेथें ।
मदमछरादि श्वापदें बहुतें । आलीं कळकळीत मजपाशीं ॥ १ ॥
तीं धांवती पाठोपाठीं । पाहे तंव विषयाचे घाटीं ।
काम क्रोध व्याघ्रांची दाटी । देखोनि पोटीं रिघालें भय ॥ २ ॥
मग स्वधर्ममार्गीं रिघालों । तंव अहंकारतस्करें आकळिलों ।
राहें राहें म्हणोनि उभा केलों । तेणें शिंतरलों स्वामिया ॥ ३ ॥
जंव क्षण एक उघडिले डोळे । पाहे तंव कंठ दाटला व्याळें ।
मायमोहसर्पीं डंखिलें । त्यांचिये गरळें झळंबलों ॥ ४ ॥
जंव न पवे शेवटील लहरी । तंव धांव धांव उपाव करी ।
विष्णुदास नामा धांवा [7]करी । माझा कैवारी केशिराजु ॥ ५ ॥

---

अभंग १३८४--(पं.), (शि.) व (आ.), १३८५--(पं.) व (न.)
१ देवा दिवस गेले वायाविण। (आ.) २ ते (पं.)
३ तारुण्य/ण्ये अंतरलों पडिभरु। सवेचि विषयाचा अवसरु॥ (पं. व शि.) ४ दास्यत्व (आ.)
५ ऐसा तुज लाहाना कैं होईन॥ (पं.)
६ आता मज करुं नको उदास। तुझिया नामाचा विश्वास।
हृदयीं नांदे हृषिकेश। विष्णुदास म्हणे नामा॥ (आ.)
७ पोकारी (न.)

[१३८६]

तुज नेणों गा महेशा । म्हणुनि आलों गर्भवासा ।
अंध कूपीं पडिला जैसा । रात्रिदिवसा तो नेणों ॥ १ ॥
तुझिया नामाची सांगडी । देईं ते न खंडी ।
पावेन मी पैलथडी । त्या सांगडी आधारें ॥ २ ॥
कामक्रोधादि जलचरीं । कासाविस जालों भारी ।
व्याकुळ होय चिंतालहरी । दुःखें भारी दाटलों ॥ ३ ॥
कल्पना वेली गुंडाळली पायीं । तेणें बुडें विषयडोहीं ।
भंवतें पाहे तंव कोण्हे नाहीं । मग तुज ध्यायीं विश्वेशा ॥ ४ ॥
मज बांधुनी कर्मदोरी । घातलें संसार दुर्धरीं ।
मायानदीचां महापुरीं । वाहावलों [१]गा दातारा ॥ ५ ॥
ऐसा खेदखिन जालों बहुवस । न देखें विश्रांतीची वास ।
विनवी नामा विष्णुदास । गर्भवास पुरे आतां ॥ ६ ॥

[१३८७]

अंतकाळीं मी परदेशी । ऐसें जाणोनि मानसीं ।
म्हणोनियां हृषिकेशी । शरण मी तुज आलों ॥ १ ॥[२]
नवमास गर्भवासीं । कष्ट जाले त्या मातेसी ।
ते निष्ठुर जाली कैसी । अंतीं दूर राहिली ॥ २ ॥
जीवीं बाळाची आवड । मुखीं घालूनि करी कोड ।
जेव्हां लागली येमवोढ । तेव्हां दुरी राहिली ॥ ३ ॥
बहिणी बंधूचा कळवळा । तें तूं जाणसी रे दयाळा ।
जेव्हां लागली यमशृंखळा । तेव्हां दुरी राहिली ॥ ४ ॥
कन्या पुत्रादिक बाळें । हे तंव स्नेहाचीं स्नेहाळें ।
तुझ्या दर्शनाहून व्याकुळ । अंतीं दूर राहिलीं ॥ ५ ॥
देहगृहाची कामिनी । ते तंव राहिली भवनीं ।
मी जळतसें स्मशानीं । अग्निसवें एकला ॥ ६ ॥

---

अभंग १३८६—(पं.), १३८७—(पं.), (धु.) व (शि.)
१ दूरी (पं.) २ पुष्कळ हस्तलिखितांत या अभंगाचा पहिला चरण मिळत नाही.

मित्र आले गोत्रज आले । तेहि स्मशानीं परतले ।
शेवटीं टाकोनियां गेले । [1]मज परता येमजाल ॥ ७ ॥
ऐसा जाणोनि निर्धार । मग मज आला गहिंवर ।
तंव दाहीं दिशा अंधःकार । मग मज कांहीं न सुचे ॥ ८ ॥
ऐसें जाणोनियां पाही । मनुष्य जन्म मागुता नाहीं ।
नामा म्हणे तुझे पायीं । ठाव देई विठोबा ॥ ९ ॥

[१३८८]

परियेसी वासने संकल्प स्वरूपे । विश्व त्वां आटोपें वश केलें ॥ १ ॥
ब्रह्मादिक तुझे इच्छेचें खेळणें । विषयाकारणें लोलिंगत ॥ २ ॥
[2]परि माझ्या मना सांडी वो समर्थे । देईं मज [3]दीनातें कृपादान ॥ ३ ॥
वेदशास्त्रवक्ते वित्पन्न थोरले । तृणापरीस केले हळुवट ॥ ४ ॥
कृपणाचे द्वारीं होऊनि याचक । विसरले [4]सुख आत्महित ॥ ५ ॥
एके अभिमानें भ्रांत जालें चित्त । भजती इंद्रियातें दीनरूपें ॥ ६ ॥
शब्द स्पर्श रूप रसगंधे फांसा । गुंतले दुराशा तळमळित ॥ ७ ॥
येकातें लाविला पुत्र कलत्र धंदा । नेणती ते कदा सुखगोष्टी ॥ ८ ॥
जन्म मरणांचे [5]जुंपियले पांतीं । आकल्प भोगिती नाना योनी ॥ ९ ॥
ऐसे तुझे संगें बहु [6]जालो हिंपुटी । पाडिली तुटी संतसंगा ॥ १० ॥
नामा म्हणे पुढती गांजिसील मज । येईल केशिराज सोडवणें ॥ ११ ॥

[१३८९]

वीतभर पोट लागलेंसे पाठी । साधुसंगें गोष्टी सांगूं न देई ॥ १ ॥
पोट माझी माता पोट माझा पिता । पोटानें ही चिंता लाविलीसे ॥ २ ॥
पोट माझा बंधु पोट माझी बहीण । पोटानें हें दैन्य मांडिलेंसे ॥ ३ ॥
विष्णुदास नामा पोटाकडे पाहे । अझुन किती ठाये हिंडविसी ॥ ४ ॥

---

अभंग १३८८—(पं.), (धु.), (शि.), (न.) व (आ.), १३८९—(आ.)
१ मज परता येम जाळ ॥ (धु.) २ तरी (पं.) ३ दीनानाथें (शि.) ४ सकळिक (न.)
५ गुंफियेले (पं. व शि.) ६ जाले (आ.)

अनुक्रमणिका

[१३९०]

मन माझें चोरटें लागलें कुसंगीं । 'बांधिलें षड्वर्गीं धरोनि त्यातें ।
केउता गेलासि माझ्या कृपावंता । ये गा पंढरिनाथा मायबापा ॥ १ ॥
वासनेची बेडी घालोनि माझे पायीं । विषयवज्रघायीं 'त्रासिताती ।
आशा तृष्णा माया आणिक कल्पना । 'करिताति कामना नानाविध ॥ २ ॥
कामक्रोध दंभ लाविताती कळा । ये माझ्या गोपाळा सोडवणें ।
'नामा म्हणे माझें घेउनियां चित्त । करि बंधन मुक्त संसाराचें ॥ ३ ॥

[१३९१]

विषयीं आसक्त जालें माझें मन । न करी तुझें ध्यान पंढरीराया ॥ १ ॥
नाथिले संकल्प करी नानाविध । तेणें थोर खेद पावतसे ॥ २ ॥
आयुष्य सरे परी न सरे कल्पना । भोगावी यातना नानाविध ॥ ३ ॥
जन्म मरण कष्ट भोगितां संकटीं । होतसे हिंपुटीं येरझारीं ॥ ४ ॥
ऐसा मी अपराधी दुराचारी देवा । भेटसी केशवा कवणेपरी ॥ ५ ॥
मायामोहें सदा भ्रांत माझें चित्त । चुकलें निजहित नारायणा ॥ ६ ॥
तूं अनाथा कैवारी ब्रीदावळी हरी । सोडवी मुरारी म्हणे नामा ॥ ७ ॥

[१३९२]

मज गांजिल्याचा धांवा । सावधान परिसावा ॥ १ ॥
विठो सुजाणाच्या राया । धांव माझ्या करुणालया ॥ २ ॥
माझें मन हें पामर । भ्रांत हिंडे दारोदार ॥ ३ ॥
मोहोपाशीं मज बांधिलें । 'भेणें वैराग्य साधिलें ॥ ४ ॥
नामा म्हणे काय करूं । तुजविण भूमिभारू ॥ ५ ॥

---

अभंग १३९०—(पं.), (शि.), (गों.) व (आ.), १३९१—(पं.), १३९२—(पं.), (शि.) व (आ.)

१ बधिले षड्वर्गी सोडी तयातें ॥ (पं.) २ त्राहाटिताती (पं.), त्रासतों मी (गों.), ताडितोसी (आ.) ३ करिती (पं.)

४ नामा म्हणे माझें घेऊनि चित्तवित्त । करी बंधनमुक्त संसारीचें ॥ (आ.)

५ थोर वैर त्वां साधिलें ॥ (आ.)

अनुक्रमणिका

[१३९३]

ममता तुटेना मज केशिराजा । अंगीं भाव दुजा लागे पाठीं ॥ १ ॥
शरीरीं तितीक्षा नाहीं क्षमा शांति । यालागीं श्रीपति वायां गेलों ॥ २ ॥
नामा म्हणे देवा तारिसी पतिता । म्हणोनियां सत्ता केली आम्हीं ॥ ३ ॥

[१३९४]

आशा तृष्णा व्याघ्र देखोनियां डोळा । जालेंसे व्याकुळ चित्त माझें ॥ १ ॥
पावें गा विठोबा पावें गा विठोबा । पावें गा विठोबा मायबापा ॥ २ ॥
तूं भक्तकैवारी कृपाळुवा हरि । येईं गा झडकरी देवराया ॥ ३ ॥
नामा म्हणे आन नाहीं तुजवांचोनि । जनक जननी केशिराजा ॥ ४ ॥

[१३९५]

माझे मनीं ऐसें होतें आतां देवा । [1]भाव समर्पावा तुझे चरणीं ॥ १ ॥
तंव मायामोहें मजसी केला हेवा । लोटियेलें भवजळामाजीं ॥ २ ॥
आशानदी पुरीं वाहविलीं वेगीं । काढी मज हरी कृपाळुवा ॥ ३ ॥
सरितेमाजीं धरिलों या मदनमगरें । पुढारें माघारें जाऊं नेदी ॥ ४ ॥
थडिये उभाउभीं धांवगा श्रीहरी । मज हानी थोरी सर्वस्वें गेलों ॥ ५ ॥[2]
भक्ति नवरत्नांची बुडाली वाखोरी । काढी वेगीं हरी मायबापा ॥ ६ ॥
धीर आणि [3]विचार ह्या दोन्ही सांगडी । श्रद्धा दोरी पुढील तुटोनि गेली ॥ ७ ॥
भावबळें सांपडलों दाटलों उभडीं । वेगीं घाली उडी कृपाळुवा ॥ ८ ॥
[4]तुझे भक्तिविण कोरडा होय गळा । नेतो रसातळा क्रोध मीन ॥ ९ ॥
नामा म्हणे तुझा मी सकळ जीवा । तरी हा काढावा शरणांगत ॥ १० ॥

[१३९६]

नावडे प्रपंच तापत्रय माया । येईं [5]धांवोनियां केशिराजा ॥ १ ॥
भवभयें फार श्यालों जन्मांतरा । चौऱ्यांशींचा फेरा [6]बुडवितो ॥ २ ॥

---

अभंग १३९३ व १३९४—(आ.), १३९५—(पं.), (शि.), (न.) व (आ.), १३९६—(पं.), (शि.), (भा.) व (आ.)

१ देह (शि. व पं.) २ पाचवा चरण (न.) प्रतीत पुढीलप्रमाणे आढळतो—
न निघे न निघे न निघे आणिका पोहणारे । सहित पितांबरें घाली उडी ॥ (न. व आ.)
३ बीर (पं.) ४ नामा म्हणे भजनेंविण कोरडा गळा । नेती रसातळा क्रोध मीन ॥ (आ.)
५ धांव धांवणिया (शि. व पं.) ६ चुकवितो (शि. व आ.)



अनुक्रमणिका

सत्कथा श्रवण नाम संकीर्तन । न घडे भजन मज देवा ॥ ३ ॥
नवविधा भक्ति कवणें केली कैसी । नामा म्हणे ऐसी दावी माते ॥ ४ ॥

[१३९७]

[1]भक्तीची अपेक्षा धरोनि अंतरीं । राहे भीमातीरी पंढरीये ॥ १ ॥
अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां । निर्गम सर्वथा नव्हे [2]देखा ॥ २ ॥
कटीं कर उभा शिणलें शरीर । धरोनि निर्धार भक्तिभावें ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां नको खटपट । आमुचे बोभाट नको पाहूं ॥ ४ ॥

[१३९८]

भावेंविण भक्ति कशानें हो करी । माया मोह वैरी देहामाजीं ॥ १ ॥
तुझें नाम दिव्य रस जिव्हे स्वाद । नाश काम क्रोध करिती माझा ॥ २ ॥
जे जे वस्तुसि नँयनीं मी पाहे । त्या त्या धांवताहे विषयीं मन ॥ ३ ॥
नामा म्हणे थोर उबगलों संसारीं । पुढा काळ वैरी ग्रासूं पाहे ॥ ४ ॥

[१३९९]

आम्हांपासी काय मागसी तूं देवा । नाहीं भक्तिभाव भांडवल ॥ १ ॥
भांडवल गांठीं देखोनि साचार । सुदाम्याची फार पाठ घेसी ॥ २ ॥
घेसी सोडुनियां पोहे मुठीभर । हिडसावल्या कर नामा म्हणे ॥ ३ ॥

[१४००]

दंभें गर्वें मदें घेरलेंसे भारी । अनुसरलों केसरी पंचानना ॥ १ ॥
तूतें वेद नेणें तूतें शास्त्र नेणें । तुझें नाम नेणें गातूं असे ॥ २ ॥
त्रिविद्या तूं पारु दोहींचा वृत्तांतु । सत्त्व राहे तीतूं जयालागीं ॥ ३ ॥
निर्गुण निराकार केशव उदार । नामा म्हणे पार उतरतील ॥ ४ ॥

[१४०१]

इलुसाचि प्रपंच परि हा लटिका । तेणें तुज व्यापका झांकियलें ॥ १ ॥
ऐसियाचा मज घालोनियां खेवा । स्वामिद्रोहि देवा करिसी [3]मज ॥ २ ॥

अभंग १३९७ व १३९८—(पं.) व (शि.), १३९९ व १४००—(आ.), १४०१—(पं.), (धु.) व (शि.)
१ भक्तांची (पं.) २ देवा (पं.) ३ कैसा (धु. व आ.)

अनुक्रमणिका

मेरुचिया गळा बांधोनि मशक । पाहसि कौतुक अनाथनाथा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा कळली तुझी माव । माझा मी उपाव करीन आतां ॥ ४ ॥

[ १४०२ ]

श्रीहरि श्रीहरि ऐसें वाचे म्हणेन । वाचा धरिसी तरी श्रवणें ऐकेन ॥ १ ॥
श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहिन । ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥ २ ॥
जेथें जाये तेथें लागलासी आम्हां । न संडी म्हणे नामा वर्म तुझें ॥ ३ ॥

[ १४०३ ]

आम्हां सांपडलें वर्म । करूं भागवतधर्म ॥ १ ॥
अवतार हा भेटला । बोलूं चालूं हा विसरला ॥ २ ॥
अरे हा भावाचा लंपट । सांडुनि आलासे वैकुंठ ॥ ३ ॥
संतसंगतीं साधावा । धरूनि हृदयीं बांधावा ॥ ४ ॥
नामा म्हणे केउता जाय । आमुचा गळा त्याचे पाय ॥ ५ ॥

[ १४०४ ]

काय गुणदोष आणितोसी मना । नको नारायणा अभक्तची ॥ १ ॥
शरीरसंबंधा सुचतीं अंतरें । काय म्यां पामरें आवरावें ॥ २ ॥
नामा म्हणे मज नागविसी दातारा । नको बा अंतरा पाहों अंत ॥ ३ ॥

[ १४०५ ]

काय गुण दोष माझे विचारिसी । आहे मी तों राशी अपराधांची ॥ १ ॥
अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ॥ २ ॥
स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ति । पुससी विरक्ति कोठुनियां ॥ ३ ॥
तूंची माझा गुरु तूंची तारी स्वामी । सकळ अंतर्यामीं गाऊं तुज ॥ ४ ॥
नामा म्हणे माझें चुकवीं जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा ॥ ५ ॥

---

अभंग १४०२—(पं.) व (शि.), १४०३ व १४०४—(आ.), १४०५—(धु.)



अनुक्रमणिका

[ १४०६ ]

चोरा ओढोनियां नेईजे जैं शुळीं । चालतां पाउलीं मृत्यु जैसा ॥ १ ॥
तैसी परी मज जाली नारायणा । दिवसेंदिवस उणा होत असे ॥ २ ॥
वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी । वेंचे तैसी घडी आयुष्याची ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंही लहरीचें जळ । आटत सकळ भानुतेजें ॥ ४ ॥

[ १४०७ ]

संसारींच्या आह्या आहाळलों भारी । निववी गा श्रीहरि अमृतदृष्टी ॥ १ ॥
मी अनाथ अपराधी दुर्बळ दुराचारी । कृपाळू बा हरी तारीं मज ॥ २ ॥
नामा म्हणे विठो कृपेचा कोंवळा । जाणसी कळवळा [१]अनाथनाथा ॥ ३ ॥

[ १४०८ ]

सांडोनि संसार जालों मी अंकित । ऐशियाचा अंत पाहूं नको ॥ १ ॥
पातकी मी सत्य पातकी मी सत्य । पातकी मी सत्य पांडुरंगा ॥ २ ॥
माझे गुणदोष न धरिसी चित्तीं । थोरपण ख्याति दावी आम्हां ॥ ३ ॥
ऐसा अपराध आणूं नको मना । पंढरीच्या राणा [२]म्हणे नामा ॥ ४ ॥

[ १४०९ ]

देशीं परदेशीं जालों तुजविण । माझें समाधान कोण करी ॥ १ ॥
चातक चकोरापरी पाहे वास । तूं कां गे उदास पांडुरंगे ॥ २ ॥
नामा म्हणे चित्त देईं माझ्या बोला । जीउ हा उरला तो निघों पाहे ॥ ३ ॥

[ १४१० ]

वत्साकारणें मोहाळु गाये । अनुसरलेया पान्हा ये ॥ १ ॥
तैसें तुझें वासरूं बांधलों मी असें । मज लावे कांसे आपुलिया ॥ २ ॥

अभंग १४०६—(पं.) व (शि.), १४०७ व १४०८—(पं.), (शि.) व (आ.), १४०९—(पं.) व (शि.), १४१०—(आ.)

१ अनाथाचा (आ.) २ म्हणोनियां (आ.)

अनुक्रमणिका

मज बांधलें त्वां संसारखुंटीं । माझी माउली दूर वैकुंठीं ॥ ३ ॥
थोरू करी मना लाहो । तंव आणिकें नेती पान्हावो ॥ ४ ॥
धीरू नव्हे याचि परि । नामा विनवितसे मुरारी ॥ ५ ॥

[१४११]

आपुले रूपीं मज लपवीं निरंतरीं । [1]समाये भीतरीं आड [2]राहे ॥ १ ॥
परि तुज मज असावा संवादु । भ्रांति मायाबाधु काय करी ॥ २ ॥
काम क्रोध लोभ दंभ मद मछर । हे वैरी अपार मारी माझे ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हीं जन्माजन्मांतरींचे । पोसणें घरींचे [3]सदा तुझें ॥ ४ ॥

[१४१२]

मुंगीचिया गळां बांधोनियां मेरू । तेणें हा प्रकारू कळों आला ॥ १ ॥
माळियाचे पोरें लपविलें पोटीं । तेणें जगजेठी सुख मानीं ॥ २ ॥
[4]कुलालाचे हातीं तुडविलें मूल । दाखवी नवल तयासाठीं ॥ ३ ॥
मजसाठीं काय धरियेलें मौना । धांव नारायणा नामा म्हणे ॥ ४ ॥

[१४१३]

विठ्ठल विद्गदे पुंडलिकवरदे । अनंत अभेदे [5]नामें तुझीं ॥ १ ॥
पाव गे विठ्ठले मजलागीं झडकरी । बुडतों भवसागरीं काढीं मज ॥ २ ॥
आकांत अवसरीं स्मरलें साच । दीनानाथें ब्रीदें सत्य केलीं ॥ ३ ॥
स्मरली संकटीं द्रौपदी वनवासी । धांवोनि आलासि लवडसवडीं ॥ ४ ॥
प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं । संकटापासोनि राखियेलें ॥ ५ ॥
नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें । अखंड पाहातसें वास तुझी ॥ ६ ॥

[१४१४]

रमासिंधुमाजी सौंदर्याची धणी । ब्रीदें चक्रपाणि मिरविती ॥ १ ॥
मेघदेहाकृति घनःश्याम मूर्ति । नटतसे भक्तीं भक्तजना ॥ २ ॥

---

अभंग १४११—(पं.) व (न.), १४१२—(पं.), (शि.) व (न.), १४१३—(पं.), (शि.) व (भा.), १४१४—(आ.)

१ सबाह्य अभ्यंतरीं (न.) २ राखी (न. व आ.) ३ दास (न. व आ.)
४ कुल्लाळें पैं हात तोडविलें मूळ। (न.) ५ रूपे (पं. व आ.)

अनुक्रमणिका

भाक देऊनियां गौळियाचे घरीं । गाई निरंतरीं चारितसे ॥ ३ ॥
इंद्र वेडावला मुनि थोर थोर । न कळेचि पार नामा म्हणे ॥ ४ ॥

[१४१५]

पांचमुखीं रुद्र स्वयें करी स्तुति । चहू मुखीं कीर्ति वर्णी ब्रह्मा ॥ १ ॥
देवी देव सर्व विस्मयो पावती । विठोबाची ख्याति कोण वानी ॥ २ ॥
परीक्षितीसाठीं प्राण त्यजी सर्व । रावणाचा गर्व स्वयें हाणी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुज सकळ समान । माझे दोष गुण मानी काय ॥ ४ ॥

[१४१६]

गुण दोष माझे पाहों नको आतां । तारिसी अनंता मज आतां ॥ १ ॥
अगाध महिमा काय वानूं हरी । गोकुळाभीतरीं गाई राखी ॥ २ ॥
अंबऋषीसाठीं जन्म सोशियले । महत्त्वाचे केले हूड स्वयें ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे नामाचेनि बळ । प्रसादें केवळ लाधलों मी ॥ ४ ॥

[१४१७]

मी तो तुझा दास न करी उदास । मायामोहपाश तोडीं देवा ॥ १ ॥
प्राण जावो परी नको करूं त्याग । करी अंगसंग अंगिकार ॥ २ ॥
अंगीकारी आतां अजामेळ अंतीं । समान श्रीपती सम करी ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें वर्णवें म्यां किती । नामें केली ख्याति चराचरीं ॥ ४ ॥

[१४१८]

वानरांच्या संगें स्वयें क्षेम देसी । मज हृषिकेशी न बोलावें ॥ १ ॥
रिसांपाशीं सदा स्वभावें तुम्ही खेळा । माझिया कपाळा नातुडसी ॥ २ ॥
पक्षि जटायूचें लेंकरूं तूं होसी । माझ्या कां मनासि नातुडसी ॥ ३ ॥
लावोनि चरण तारियेली शिळा । कोळियाचा केला अंगिकार ॥ ४ ॥
नामा म्हणे तुम्हां सांगावें म्यां किती । राग माना चित्तीं काय वाणुं ॥ ५ ॥

अभंग १४१५ ते १४१८—(आ.)

अनुक्रमणिका

[१४१९]

पतितपावना धांवसी निर्वाणीं । ब्रीद चक्रपाणि सत्य केलें ॥ १ ॥
काय अपराध कोणाचे पाहिले । नाहीं तुवां त्यागिलें नष्टखळां ॥ २ ॥
अजामेळासाठीं आहार वर्जिले । बीज तें भाजिलें भवमूळ ॥ ३ ॥
नामा म्हणे [1]नागवेंचि बरें । आतां उणें पुरें पाहूं नका ॥ ४ ॥

[१४२०]

विश्वंभर नाम तुझें कमळापती । जगीं श्रुति स्मृति वाखाणिती ॥ १ ॥
गौळियां घरींचें दहीं लोणी चोरूनी । खातां चक्रपाणि लाजसी ना ॥ २ ॥
आतां दीनानाथा तुझें ब्रीद साचें । तरी भूषण आमुचें जतन करीं ॥ ३ ॥
येर ठेवाठेवी कायसी आतां । तुम्हां विनवितो नामा केशिराजा ॥ ४ ॥

[१४२१]

शरीराचा भाव तुज नाहीं देवा । तेथें मी केशवा काय बोलूं ॥ १ ॥
अंगदाचे अंगीं बळ देसी फार । बहु उपकार कळों आलें ॥ २ ॥
तुम्हां नित्य न्याय नोव्हे साचपण । बळि तूतें दान देउनि ठके ॥ ३ ॥
नामा म्हणे सदा काय म्यां गाऱ्हाणें । किती नारायणें देऊं आतां ॥ ४ ॥

[१४२२]

जन्मल्यापासूनि सोशिले [2]प्रवास । वियोग पहावया जाले आतां ॥ १ ॥
आतां एक करीं धावणिया धांवा । बुडतों केशवा काढीं मज ॥ २ ॥
लाभ नव्हे हानि जाली भागाभाग । तूंचि पांडुरंग पुरविसी ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें सर्वस्व रक्षिलें । पाषाण तारिले जळामाजीं ॥ ४ ॥

[१४२३]

दुर्घट तें दुःख लागों नेदी भक्ता । त्याची तुज चिंता असे फार ॥ १ ॥
आणिक प्रकार [3]घडे तो निकट । पैठणीं प्रकट रूप दावीं ॥ २ ॥

अभंग १४१९--(पं.) व (धु.), १४२० ते १४२३--(आ.)
१ नागवण बारे (धु.) २.पायास (बा.) ३ जरूर (आ.)

अनुक्रमणिका

जेथुनि सत्वर निघाले स्वदेशा । मुक्त केलें महिषा मार्गीं जाण ॥ ३ ॥
जाणती प्रेमळ कीर्तनासी नर । समाधि निरंतर म्हणे नामा ॥ ४ ॥

[१४२४]

हिरे जळामधीं भिजतील कधीं । तैसें कृपानिधी केलें आम्हां ॥ १ ॥
आमुचा विकल्प आमुचा विकल्प । आमुचा विकल्प आम्हां नाडी ॥ २ ॥
कामधेनु संगें गाढव बांधिलें । तयाचें तें मोलें तुके केवि ॥ ३ ॥
काय म्यां करावें पाठी लागे भोग । नामा म्हणे योग्य तुझ्या हातीं ॥ ४ ॥

[१४२५]

आशा मनिषा तृष्णा लागलीसे पाठीं । धांव जगजेठी स्वामी माझ्या ॥ १ ॥
गेलासि केउता वाढिलें दुश्चिता । अगा कृपावंता स्वामी माझ्या ॥ २ ॥
नामा म्हणे मज नाहीं कोण गत । तारिसी अनंत स्वामी माझ्या ॥ ३ ॥

[१४२६]

तुजविण आम्हां कोण हो पोषिता । अहो जी कृपावंता पंढरिराया ॥ १ ॥
न करीं विठ्ठला आतां लाजिरवाणें । मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥ २ ॥
काकुळती कोणा येऊं हो मी आतां । अनाथाचे नाथा विठ्ठला तूं ॥ ३ ॥
एक वेळ आतां पाहे मजकडे । नामा म्हणे वेडें रंक तुझें ॥ ४ ॥

[१४२७]

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अनाथाचा नाथ होसी तूं दयाळा । किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां बरी ॥ ४ ॥

[१४२८]

समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हांसती सकळ लाज कोणा ॥ १ ॥
देव आप्त दैन्य उरे कैंचे बापा । आम्हांसि तूं कां पां विसरलासी ॥ २ ॥
ऐसा तूं अविनाश त्रिभुवनिंचा राजा । नामा म्हणे माझा तूंचि स्वामी ॥ ३ ॥

अभंग १४२४ व १४२५—(आ.), १४२६—(पं.), १४२७—(आ.), १४२८—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[१४२९]

आम्ही [1]काय जाणों तुझा अंत पार । होसी तूं साचार निवारिता ॥ १ ॥
बहु अपराधी जाण यातिहीन । पतितपावन पांडुरंगा ॥ २ ॥
नामा म्हणे ऐसा पातकी पामर । करिसी उद्धार साच ब्रीद ॥ ३ ॥

[१४३०]

नेणे धातमात नव्हे कळावंत । शास्त्रज्ञ पंडित तोहि नव्हे ॥ १ ॥
रंकाहुनि रंक संतांचा सेवक । मी नामधारक विठोबाचा ॥ २ ॥
नव्हे बहुश्रुत नव्हे ज्ञानशीळ । नव्हे मी वाचाळ तर्कवादी ॥ ३ ॥
नामा म्हणे राया विठोचा डिंगर । नामें पैलपार पावविलों ॥ ४ ॥

[१४३१]

लटिका मी [2]गाईन लटिका मी [3]नाचेन । संतासि देखोन [4]लटिका लवें ॥ १ ॥
लटिका माझा भाव लटिकी माझी भक्ति । तूं तंव श्रीपती कृपासिंधु ॥ २ ॥
लटिकी माझी क्रिया लटिकें माझें कर्म । परि [5]सत्य तुझें नाम गातु असे ॥ ३ ॥
लटिकें माझें ध्यान लटिकें माझें ध्यान । [6]तूं तंव सहजगुण सत्यरूप ॥ ४ ॥
लटिकी माझी पूजा लटिकें माझें स्मरण । लटिकें माझें भजन भावहीन ॥ ५ ॥
लटिकें प्रेमवत्स धेनु हें स्वीकारी । तैसें मज करीं म्हणे नामा ॥ ६ ॥

[१४३२]

आधींच मी लटिका वरी लटिकी तुझी माया । [7]ऐसें हें कासया पाहसी देवा ॥ १ ॥
जाणतां नेणतां नाम तुझें देवा । गाईन केशवा आवडीनें ॥ २ ॥
विषयीं आसक्त भ्रांत माझें मन । कैसें तुझें [8]भजन घडेल मज ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां जाणसी तें करीं । पतितपावन हरि नाम तुझें ॥ ४ ॥

---

अभंग १४२९—(पं.) व (शि.), १४३०—(धु.), १४३१—(पं.), (शि.), (गं.), (धु.) व (आ.), १४३२—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ कांहीं नेणो (पं. व आ.) २ गाणू (आ.) ३ नाचणू (आ.) ४ लोचन लावी (आ.) ५ सतत (धु.) ६ सत्यत्वीं अनुमान नाहीं तुझ्या ॥ (धु.) ७ भजन ऐशिया पाहसी काय ॥ (आ.) ८ ध्यान (धु.)

[१४३३]

लटिका तरी गाईन तुझेंचि नाम । लटिकें तरी प्रेम आणीन तुझें ॥ १ ॥
सहजचि लटिकें असे माझें ठायीं । तुझिया पालट नाहीं साचपण ॥ २ ॥
लटिकें तरी हरी करी तुझें ध्यान । लटिकें माझें मन तुजचि चिंती ॥ ३ ॥
लटिकें तरी बैसे संतांचें संगतीं । दृढ धरीन चित्तीं नाम तुझें ॥ ४ ॥
लटिका तरी तुझा म्हणविन दास । धरीन विश्वास नामीं तुझे ॥ ५ ॥
लटिकें माझें मन सुफळ करी देवा । नामा म्हणे केशवा विनती माझी ॥ ६ ॥

[१४३४]

नापिकाचे परि वरी वरी बोडी । परि अंतरींची वाढी उणी नव्हे ॥ १ ॥
तैसें माझें मन न राहे समूळीं । प्रपंच कवळी दाही दिशा ॥ २ ॥
भक्ति प्रेमभाव वरी वरी दावी । अंतरीं आटवी घराचार ॥ ३ ॥
मी लटिका जाण असे परोपरी । तारी भवसागरीं म्हणे नामा ॥ ४ ॥

[१४३५]

वासरूं भोवे खुंटियाभोवतें । आपआपणियातें गोवियेलें ॥ १ ॥
तैसी परी मज जाली गा देवा । गुंफलोंसे भावा लटिकिया ॥ २ ॥
नामा म्हणे केशवा तोडी कां बंधनें । मी एक पोसणें भक्त तुझें ॥ ३ ॥

[१४३६]

लोभियाचे घरीं लटिकेचि उपवास । न मरे हृषिकेश म्हणती जगीं ॥ १ ॥
तूं तंव भावाचा अंकुर जी देवा । लटिका मी पहावा दास तुझा ॥ २ ॥
लटिकी पक्षियातें बोभाये कुंटणी । ते त्वां माझी म्हणोनि अंगिकारिली ॥ ३ ॥
लटिका अजामेळ पुत्राचेनि मोहें । सोडविला पाहे कैसा तुवां ॥ ४ ॥
त्या अवघ्याहुनि मी लटिका सहस्र गुणें । तारूनि कीर्ति करणें म्हणे नामा ॥ ५ ॥

[१४३७]

तापत्रयअग्निची जळतसे सगडी । आहाळोनि कोरडी जाली काया ॥ १ ॥
केव्हां करुणाघना वोळसी अंबरीं । निवविसी नरहरी कृपादृष्टी ॥ २ ॥

---

अभंग १४३३ व १४३४—(पं.), (धु.) व (शि.), १४३५—(पं.) व (शि.), १४३६—(पं.), १४३७—(पं.), (शि.), (भा.) व (आ.)

अनुक्रमणिका

शोकमोहाचिया झळंबलों जाळीं । क्रोधाचे काजळीं पोळतसें ॥ ३ ॥
चिंतेचा वोणवा लागला चहूंकडां । [1]प्राण होय व्याकुळा धांव देवा ॥ ४ ॥
धांवधांव करुणाघना तुजविण । नामा म्हणे प्राण जातो माझा ॥ ५ ॥

[१४३८]

धांवुनि जाईन श्रीमुख पाहीन । इडापिडा घेईन विठोबाची ॥ १ ॥
तया सुखा दृष्टि लागेल वो झणीं । मग मी साजणी काय करूं ॥ २ ॥
म्हणोनि माझें चित्त व्यापिलें उद्वेगें । [2]सिणलें मी उबगें जन्मोजन्मीं ॥ ३ ॥
धरोनियां घालीं जीवाचे अंतरीं । आंतोनि बाहेरी जाऊं नेदीं ॥ ४ ॥
वासना पापिणी करील पायरव । मग हा अनुभव कोठें पाहूं ॥ ५ ॥
वृत्तिसहित करीन मनाचें सांडणें । न विसंबें प्राणें म्हणे नामा ॥ ६ ॥

[१४३९]

जीव तूं प्राण तूं । [3]आत्मा तूं गा विठ्ठला ॥ १ ॥
जनक तूं जननी तूं । सोयरा तूं गा विठ्ठला ॥ २ ॥
माझा गुरु तूं गुरुमंत्र तूं । सर्वस्व तूं माझें म्हणे नामा ॥ ३ ॥[4]

[१४४०]

संसारसंकटें रिघालों पाठिसी । आतां झणीं देसी त्यांचे हातीं ॥ १ ॥
ब्रीदें बडिवार ऐकोनियां फार । रिघों आम्ही द्वार विठोबाचें ॥ २ ॥
आणिकहि वार्ता सांगों काय आतां । पंढरिच्या नाथा परिसावें ॥ ३ ॥
अमृत पाजणें प्रीतीनें भक्तासी । सत्य हृषिकेशी नामा म्हणे ॥ ४ ॥

[१४४१]

कलियुगीं जन मूर्ख शून्यवृत्ति । तारिसी श्रीपति नाम घेतां ॥ १ ॥
परम पावना पवित्रा निर्मळा । भक्ताचा सांभाळ करीं देवा ॥ २ ॥

---

अभंग १४३८—(पं.) व (शि.), १४३९—(पं.), (शि.), (आ.) व (गों.), १४४० व १४४१—(आ.)

१ जातो तळा बुडा धांव देवा ॥ (आ.) २ वाउगें (पं.) ३ आम्हां (आ.) ४ या चरणाआधी (गों.) प्रतीत एक चरण आहे तो असा—

तन तूं मन तूं । जीवन तूं विठ्ठला ॥

अनुक्रमणिका

देवा तूं दयाळ जिवलग मूर्ति । पुराणें गर्जती वेदशास्त्रें ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां नको भागाभाग । सखा पांडुरंग स्वामी माझा ॥ ४ ॥

[ १४४२ ]

देवा तुज आम्हीं दिधलें थोरपण । पाहें हें वचन शोधूनियां ॥ १ ॥
नसतां पतित कोण पुसे तूतें । सांदीस पडतें नाम तुझें ॥ २ ॥[1]
पतित अमंगळ जालों तुज साह्य । खरें खोटें पाहे विचारोनी ॥ ३ ॥
रोग व्याधि पीडा जनांसी नसती । तरि कोण पुसती वैद्यालागीं ॥ ४ ॥
कल्पनेची बाधा झडपे संसारीं । म्हणुनि पंचाक्षरी श्रेष्ठ जगीं ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो दैवें आलों घरा । नको लावूं दारा आम्हालागीं ॥ ६ ॥

[ १४४३ ]

जगत्रजीवना अगा नारायणा । कां नये करुणा दासाची हे ॥ १ ॥
अच्युता केशवा ये गा दीनानाथा । सर्वज्ञ समर्था कृपामूर्ति ॥ २ ॥
चिद्‌घना चिद्‌रूपा विरंचीच्या बापा । करावी जी कृपा सर्वांभूतीं ॥ ३ ॥
तुझें म्हणविलें उपेक्षिसी जरी । नामा म्हणे हरी ब्रीद काय ॥ ४ ॥

[ १४४४ ]

घालुनि आसन साधिला पवन । घेतलें जीवन अंतरिक्षीं ॥ १ ॥
परहस्तें तृप्ति नव्हे जी दातारा । कृपा करुणा करा केशिराजा ॥ २ ॥
जीवाचें जीवन तूं सर्वांचें कारण । धांव मजलागुन केशिराजा ॥ ३ ॥
अनाथाचा नाथ हें ब्रीद साचार । झणें माझा अव्हेर करिसी देवा ॥ ४ ॥
विष्णुदास नामा अंकियेला तुझा । विनवी केशिराजा प्रेमसुखें ॥ ५ ॥

[ १४४५ ]

ज्याचिया रे मनें देखियेलें तुज । त्याची लोकलाज मावळली ॥ १ ॥
नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म । नाहीं वर्णाश्रम सुखदुःख ॥ २ ॥

अभंग १४४२—(धु.), १४४३—(पं.), १४४४ व १४४५—(पं.) व (शि.)
१ हा चरण (आ.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

नाहीं देह स्फूर्ति जाती कुळ भेद । अखंड आनंद ऐक्यतेचा ॥ ३ ॥
नामा म्हणे त्याचे चरणरज व्हावें । हेंचि भाग्य द्यावें केशिराजा ॥ ४ ॥

[ १४४६ ]

येतां जातां थोर कष्टलों गर्भवासीं । पडिलों गा उपवासी प्रेमेंविण ॥ १ ॥
बहुतांचा सेवक जालों काकुळती । न पावें विश्रांती तयाचेनी ॥ २ ॥
ऐसें माझें मन शिणलें नानापरी । घालीन आभारीं संतांचिया ॥ ३ ॥
वियोगें संतांच्या व्याकुळ चिंतातुर । हिंडें दारोदार दीनरूपें ॥ ४ ॥
परि कोणी संतांच्या न घालिती चरणीं । तळमळीं अनुदिनीं [1]अश्रांत सदा ॥ ५ ॥
माझें माझें म्हणोनि जया घाली मिठी । दिसे तेचि दिठीं नाहीं होय ॥ ६ ॥
तया शोकानळें संतप्त आंदोळें । गेलें तें न मिळे कदाकाळीं ॥ ७ ॥
न देखत ठायीं देखावया धांवें । भ्रांती भुललें भावें नानामार्गी ॥ ८ ॥
तुझा स्वरूपानंदु नाहीं वोळखिला । जाली ते विठ्ठला हानि थोर ॥ ९ ॥
लोहाचा कवळु लागला परिसातें । पढिये सर्वांतें होय जेवीं ॥ १० ॥
नामा म्हणे तैसी भेटी संतचरणीं । करूनि त्रिभुवनीं होईन सरता ॥ ११ ॥

[ १४४७ ]

[2]धांउनियां मिठी घालीन संतचरणीं । सांगे वचनींचे गुज तुम्हां ॥ १ ॥
विठोबाच्या गांवा यारे मनीं येकवेळां । फार आहाळला जीव माझा ॥ २ ॥
आनंदाचें जीवन पाहिन श्रीमुख । शोकमोहदु:ख हरती माझे ॥ ३ ॥[3]
विटेसहित चरण देईन आलिंगन । तेणें माझी तनु वोल्हावेल ॥ ४ ॥
तुम्ही माझे आवडते अंतरंग । माझे जिवलग प्राणसखे ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो कृपेची माउली । तेव्हां ते साउली करिल मज ॥ ६ ॥

[ १४४८ ]

वाल्मिकादि भीष्म द्रोण कृपाचार्य । द्रुपदतनया दिली भेटी ॥ १ ॥
उद्धव नारद अंबरिष शुक । बळी ध्रुवादिक आले भेटी ॥ २ ॥

---

अभंग १४४६—(पं.) व (शि.), १४४७—(पं.) व (आ.), १४४८—(आ.)
१ श्रांत (पं. व शि.)
२ धांवोनि घालीन संतापायीं मिठी। तेणें ते धूर्जटी वंदीतसे।। (आ.)
३ (आ.) प्रतीत ३ व ५ हे चरण नाहीत.

अनुक्रमणिका

देवी देवऋषी गोपाळांसहित । भाष्यकारें नीत शुद्ध केली ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां पाहूं नको देश । पतितास यश तुझे नामीं ॥ ४ ॥

[ १४४९ ]

भक्तांची आवडी मोठी त्या देवासी । सद्भक्तिप्रेमासी लांचावला ॥ १ ॥
काय सांगूं आतां तयांचें कौतुक । जेथें ब्रह्मादिक स्तब्ध ठेले ॥ २ ॥
गज आणि गणिका भिल्लिणी कुंटिणी । नेल्या त्या विमानीं बैसोनियां ॥ ३ ॥
अजामीळ खळ कोळी तो वाल्मिक । तारिले अनेक एकसरां ॥ ४ ॥
धर्माचिये घरीं उच्छिष्ट काढी । जाहला बराडी देवराव ॥ ५ ॥
नामा म्हणे कांहीं मागेना तो देव । मुख्य पाहे भाव दृढ त्याचा ॥ ६ ॥

[ १४५० ]

जैसा वृक्ष नेणे मान अपमान । तैसे ते सज्जन वर्तताती ॥ १ ॥
येऊनियां पूजा प्राणि जे करिती । त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ॥ २ ॥
अथवा कोणी प्राणि येऊनि तोडिती । तया न म्हणती छेदूं नका ॥ ३ ॥
निंदा स्तुति सम मानिती जे संत । पूर्ण धैर्यवन्त [1]सिंधु ऐसे ॥ ४ ॥
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी । तरी जीव शिवा [2]मिठी पडुनि जाय ॥ ५ ॥

[ १४५१ ]

मंत्रयंत्र दीक्षा सांगतील लक्ष । परि राम प्रत्यक्ष न करी कोण्ही ॥ १ ॥
प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय । आणिकांची काय चाड मज ॥ २ ॥
सर्व कामीं राम भेटविती मातें । जीवेंभावें त्यांतें ओवाळीन ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां थोर लाभ जाला । सोईरा भेटला अंतरींचा ॥ ४ ॥

[ १४५२ ]

कैसा पांडुरंगा करावा विचार । सांग बा निर्धार साक्षरूपा ॥ १ ॥
काय आलें देवा कैचें थोरपण । आकारासि कोणी आणियलें ॥ २ ॥
आणियलें आतां आपणासारिखें । गोपिकांसी रूपें दावी नाना ॥ ३ ॥
काय जीवेंभावें सकळां संमत । सगुण अनंत म्हणे नामा ॥ ४ ॥

---

अभंग १४४९—(आ.), १४५०—(धु.), १४५१ व १४५२—(आ.)
१ साधु (धु. व आ.) २ गांठी (धु. व आ.)

[१४५३]

कांसवीची पिलीं राहाती निराळीं । दृष्टि पान्हावली [1]सुधामय ॥ १ ॥
जैसा जवळूनि असेन मी दुरी । दृष्टि मजवरी असो द्यावी ॥ २ ॥
तान्हें वत्स घरीं वनीं धेनू चरे । [2]परि ती हुंबरे क्षणोक्षणा ॥ ३ ॥
[3]नामा म्हणे सत्ता करिती निकट । भक्तांसी वैकुंठ पद देसी ॥ ४ ॥

[१४५४]

बाप संतसभा भली । बहुता पुण्यें जोडिली ।
हृदयींची गोवी आपुली । संताप्रति निवेदीन ॥ १ ॥
आजि प्रसंग हरिभक्तीचा । हरि स्वभावें उच्चारु वाचा ।
विठोबा ऋणिया रे भक्तांचा । ऋण फेडितो भक्तांचें ॥ २ ॥
अरे हा अनादिचा लागु करी । अरे जन्माची. उभरा भरी ।
आमुचा लागिया श्रीहरी । दो उत्तरीं निवडावा ॥ ३ ॥
आतां असो हा कर्मविभागु । आम्ही मागूं आपुला लागूं ।
जरि हा म्हणेल निःसंगु । तयासी आम्हांसी संबंध कायसा ॥ ४ ॥
जरि हा न लगे आमुचें ऋण । हातीं घेऊनि सुदर्शन ।
आम्ही करूं हरिकीर्तन । तेथें तिष्ठत कां उभा ॥ ५ ॥
मागें [4]चाळविलि या रिति । परि आम्हांसि आलिया प्रचीति ।
ज्यासि हरिची सोय संगती । तयासि न मनें अन्य स्थळ ॥ ६ ॥
हरि कौसाळ मल्ल म्हणती । ते अवघी रे जाणावी भ्रांति ।
[5]सेवा हरिची सांगताती । संत होती हरिकडे ॥ ७ ॥
आणिक एकू आम्हांसी आठवलें । आम्ही भांडूकरे एकले ।
आमुचें केलें काय चाले । या हरिभक्तां वांचूनि ॥ ८ ॥
जे हरिभक्ति विरहित । त्यांचें हरिचरणीं न बोधे चित्त ।
अवघे मिळूनि हरिचे भक्त । हरि व्हावा म्हणताती ॥ ९ ॥

---

अभंग १४५३—(पं.) व (धु.), १४५४—(पं.) व (शि.)
१ अमृतमय (पं.) २ परतोनि हुंबरे (धु. व पं.)
३ नामा म्हणे सलगीनें करितों मी निकट । झणें मज वैकुंठ पद देसी ॥ (पं.)
नामा म्हणे सलगी न करीं निकट । झणीं तूं वैकुंठ पद देसी ॥ (धु.)
४ चाळाचिये (पं. व आ.) ५ व्यवहाराचि सांगता गति । (पं.)

अनुक्रमणिका

आणिक एक नवल परि । जो याची सेवा करी ।
त्याचें सर्वस्व हरी । आणि श्रीहरि नाम मिरवतु ॥ १० ॥
हरि आळवितां मागा उभा । आठवितां पुढें उभा ।
हरि ध्यातां हृदयीं उभा । हें तंव सभा विचारा ॥ ११ ॥
आमुचें हो तेंच तुम्हीं विनवावें । आम्हांसि मानलें आघवें ।
किती येरझारीं शिणवावें । शरण रिघावें श्रीहरी ॥ १२ ॥
विश्व श्रीहरिचें आघवें । म्यां गाऱ्हाणें कवणाशीं द्यावें ।
लागे त्यासिच मागावें । हरिविण [1]ठावो नसे वो ॥ १३ ॥
वीरराया पंढरीनाथा । आतां अपंगावें शरणागता ।
जरी उपेक्षिसी सर्वथा । वाट कोणाची पहावी ॥ १४ ॥
नको नको निंदा स्तुति । हाचि भावो हेचि भक्ति ।
मज नेदी पुनरावृत्ति । विष्णुदास म्हणे नामा ॥ १५ ॥

[१४५५]

तुझिया संतांची [2]अंगसंगति । ते [3]शिणलिया विश्रांति संसारिया ॥ १ ॥
श्रवण कीर्तन ध्यान घडे अनायासें । भेदभ्रम नासे तेचि क्षणीं ॥ २ ॥
ऐसें भाग्य मज देसी कवणें काळीं । होईन पायधुळी वैष्णवांची ॥ ३ ॥
वदनीं तुझें नाम वसे निरंतर । राखीन त्यांचें द्वार थोर आशा ॥ ४ ॥
येतां जातां मज करिती सावधान । वदनीं कृष्ण कृष्ण म्हणविती ॥ ५ ॥
कामधेनु घरीं असे प्रसवली । ते विकावया नेली दैवहतें ॥ ६ ॥
पंथी पडिला पायां लागे चिंतामणी । पाषाण म्हणऊनि उपेक्षिला ॥ ७ ॥
तैसी परी मज जाहली अधमा । चुकलों तुझ्या वर्मा केशिराजा ॥ ८ ॥
[4]नामा म्हणे थोर खंती वाटे जीवा । [5]कृपा करूनि ठेवा कर माथां ॥ ९ ॥

[१४५६]

सर्वभावें तूतें जे ध्याती दातारा । त्यांचिया संसारा तूंचि होसी ॥ १ ॥
ज्याचे चित्तीं नाहीं आणिक कांहीं काम । त्याचा योगक्षेम तूंचि होसी ॥ २ ॥

---

अभंग १४५५—(पं.), (शि.) व (आ.), १४५६—(पं.), (धु.) व (शि.)
१ ठाव न देखो (पं.) २ अंगसंगसंगती (पं. व शि.) ३ पावलिया (आ.)
४ नामा म्हणे थोर खंती वाटे चित्ता । (आ.)
५ कृपा करूनि माथा ठेवी चरणीं ॥ (पं. व आ.)

ऐहिक परत्र जें कांहीं देखिजे । तें तुवां होईजे मायबापा ॥ ३ ॥
नामा म्हणे माझी भक्ति हे माउली । केशवा वाहिली क्षणमात्रें ॥ ४ ॥

[ १४५७ ]

अमृताहुनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥ १ ॥
सांग पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासि न ये तुझें ॥ २ ॥
कीर्तनीं बैसतां निद्रें नागविलें । मन हें भुललें विषयसुखा ॥ ३ ॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति । न ये माझ्या चित्तीं नामा म्हणे ॥ ४ ॥

[ १४५८ ]

जगदानिया हें ब्रीद आहे जगीं । तें आजि मजलागीं काय जालें ॥ १ ॥
मज पाहतां विसरु पडिला त्या नामाचा । कीं तुज आमुचा वीट आला ॥ २ ॥
सुजाणाच्या राया परिसें केशिराजा । भक्ताचिया काजा लाजों नको ॥ ३ ॥
भक्तकाजकैवारी हें ब्रीद चराचरीं । तें ठेविलें क्षीरसागरीं लक्ष्मीपाशीं ॥ ४ ॥
मज पाहतां अभिलाष धरिला मानसीं । मग तूं हृषिकेशी विसरलासी ॥ ५ ॥
दीनानाथ ऐसें नाम बहुतांसी वांटिलें । निर्गुण तें उरलें तुजपाशीं ॥ ६ ॥
म्हणोनि केशिराजा विसरलासी आम्हां । विनवितसे नामा विष्णुदास ॥ ७ ॥

[ १४५९ ]

अपराधाच्या कोडी हीच माझी जोडी । पावनत्व प्रौढी नाम तुझें ॥ १ ॥
द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं । धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥ २ ॥
उपमन्यालागीं आळी पुरविली । अढळपदीं दिधली वस्ती ध्रुवा ॥ ३ ॥
नामा म्हणे करा करुणा केशवा । तूं माझा विसावा पांडुरंगा ॥ ४ ॥

[ १४६० ]

संसारसागरीं पडलों महापुरीं । सोडवण करी देवराया ॥ १ ॥
नामाची सांगडी देऊनियां मातें । वैकुंठावरूतें नेऊनि घाली ॥ २ ॥

अभंग १४५७--(पं.), (धु.) व (शि.), १४५८--(पं.) व (शि.), १४५९--(आ.), १४६०--(पं.), (धु.) व (शि.)



अनुक्रमणिका

काम क्रोध मगर करिती माझा ग्रास । झणीं तूं उदास होसी देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा झणीं मोकलिसी मातें । नाम तुझें सरतें धरिलें एक ॥ ४ ॥

[१४६१]

कीटकीतें भयें स्वयें भृंगी ध्यातां । तैसा तूं अनंता करी आतां ॥ १ ॥
भजनें पाठविलें श्रीहरिरूपासी । नेतो वैकुंठासी नारायण ॥ २ ॥
नाम नारायण अंतीं उद्धारक । नामा म्हणे देख भाक माझी ॥ ३ ॥

[१४६२]

काखे पान अंगणीं उभें उगें । भोजन मागें रामनाम ॥ १ ॥
आणिक नाहीं मज चाड । रामनाम गोड जेऊं घाला ॥ २ ॥
[1]आनरस सेवितां मंद पडिलों । तुझेंचि नामें रुचीस आलों ॥ ३ ॥
इच्छाभोजनीं तूं एक दाता । नामा विनवी पंढरीनाथा ॥ ४ ॥

[१४६३]

तान्हेलों भुकेलों । तुझेनि नामें निवालों ॥ १ ॥
तहान नेणें भूक नेणें । अखंड पारणें नामीं तुझ्या ॥ २ ॥
अमृतलिंग केशव हा चित्तीं । तेणें नामया तृप्ति अखंडित ॥ ३ ॥

[१४६४]

मोहभुजंगें डंखिलें । विषयलहरीं झांकोळिलें ॥ १ ॥
धांव धांव चक्रपाणि । आणिका न करवे धांवणी ॥ २ ॥
नामा म्हणे निर्विष जालों । केशव नामें उपचारिलों ॥ ३ ॥

[१४६५]

नाम गाऊं नाम ध्याऊं । नामें विठोबासी पाहूं ॥ १ ॥
आम्ही दैवाचे दैवाचे । दास पंढरिरायाचे ॥ २ ॥
टाळ दिंडी घेऊनि हातीं । केशवराज गाऊं [2]गीतीं ॥ ३ ॥
नामा म्हणे लाखोली सदा । अनंत नामें वाहूं गोविंदा ॥ ४ ॥

---

अभंग १४६१—(आ.), १४६२—(पं.) व (शि.), १४६३—(आ.), १४६४—(पं.) व (शि.), १४६५—(पं.), (धु.), (शि.) व (आ.)

१ अनरस (पं. व आ.) २ प्रीतीं (आ.)

[ १४६६ ]

नामें तरूं अवघे जन । यमपुरी घालूं [1]वाण ॥ १ ॥
करूं हरिनामकीर्तन । तोडूं देहाचें बंधन ॥ २ ॥
करूं हरिनामाचा घोष । कुंभपाक पाडूं ओस ॥ ३ ॥
ऐसा नामा यशवंत । विठोबाचा शरणागत ॥ ४ ॥

[ १४६७ ]

विठ्ठल आवडी प्रेमभावो । विठ्ठल नामाचा रे टाहो ।
तुटेल हा संदेहो । भवमूळव्याधीचा ॥ १ ॥
म्हणा नरहरि उच्चार । कृष्ण हरी श्रीधर ।
हें नाम आम्हां सार । संसार तरावया ॥ २ ॥
एकतत्त्व त्रिभुवनीं । हेंचि आम्हां हरिपर्वणी ।
गाइली जे पुराणीं । वेदशास्त्रांसहित ॥ ३ ॥
नेघों नामेंविण कांहीं । विठ्ठल कृष्ण लवलाही ।
नामा म्हणे तरलों पाही । विठ्ठल विठ्ठल म्हणतांचि ॥ ४ ॥

[ १४६८ ]

जें जें घडेल तें तें घडो । देह राहो अथवा पडो ॥ १ ॥
[2]परि मी न सोडी सर्वथा । तुझे पाय पंढरिनाथा ॥ २ ॥
क्लेश होत नाना परी । मुखीं रामकृष्ण हरि ॥ ३ ॥[3]
नामा म्हणे केशवातें । जें जें घडेल या देहातें ॥ ४ ॥

[ १४६९ ]

यज्ञ याग दान व्रत उद्यापन । हें नेणें मी साधन काय करूं ॥ १ ॥
जप तप होम स्वधर्माचरण । नव्हे तीर्थाटण कांहीं मज ॥ २ ॥

---

अभंग १४६६ व १४६७--(पं.) व (शि.), १४६८--(पं.), (धु.), (शि.), (न.) व (आ.), १४६९--(पं.) व (शि.)

१ ठाण (पं.) २ नाम न सोडी सर्वथा । दीनबंधु पंढरीनाथा ॥ (न. व आ.)
३ (धु.) व (आ.) प्रतीत अधिक चरण आढळतों--
जैसा जैसा असेल भोग । तैसा तैसा घडेल योग ॥ (धु. व आ.)



अनुक्रमणिका

गया पिंडदान प्रयागीचें स्नान । कर्म अनुष्ठान नव्हे मज ॥ ३ ॥
भक्ति उपासना देवाचें पूजन । ध्यान उपोषण नव्हे मज ॥ ४ ॥
पृथ्वीचें भ्रमण अनुताप संपूर्ण । सारासार खूण नकळे कांहीं ॥ ५ ॥
पुण्य नाहीं गांठीं पापाचें संचित । परम पतित वाटे मज ॥ ६ ॥
माझा देह आहे पातकांचा थारा । मी अपराधी खरा कळलेसें ॥ ७ ॥
पुराणप्रसिद्ध नाम तुझें सार । ऐसें निरंतर बोलताती ॥ ८ ॥
अन्यथा वचन नोहे हें प्रमाण । तरी ब्रीदें जाण सांडवलीं ॥ ९ ॥
तुम्ही ब्रीद आपुलें जतन करणें । तरी नारायणें सांभाळावें ॥ १० ॥
नामेंविण कांहीं आम्हांपाशीं नाहीं । विचारोनी पाही पांडुरंगा ॥ ११ ॥
धन वित्त सर्व आमची हे जोडी । नामा म्हणे गोडी नामीं तुझें ॥ १२ ॥

[ १४७० ]

लपलासी तरी नाम कैसें नेसी । आम्ही अहर्निशीं नाम गाऊं ॥ १ ॥
आम्हांपासोनियां जातां नये तुज । तें हें वर्म बीज नाम घोकूं ॥ २ ॥
आम्हांसी तों तुझें नामचि पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥ ३ ॥
[1]भोळीं भक्तें आम्ही चुकलों होतों वर्म । सांपडलें नाम नामयासी ॥ ४ ॥

[ १४७१ ]

भोगावरी आम्ही घातिला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥
नाहीं यासी पतन न होय बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामीं ॥ २ ॥
नामा म्हणे भाव सर्वांभूतीं करा । आणिक पसारा घालूं नका ॥ ३ ॥

[ १४७२ ]

[2]नलगे तुझी भुक्ति [3]नलगे तुझी मुक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच ॥ १ ॥
माझें मज कळलें माझें मज कळलें । माझें मज कळलें प्रेमसुख ॥ २ ॥
न करीं तुझें ध्यान [4]नलगे ब्रह्मज्ञान । माझी आहे खूण वेगळीच ॥ ३ ॥

अभंग १४७०—(पं.), (शि.) व (धु.), १४७१—(आ.), १४७२—(पं.), (शि.), (धु.) व (गं.)

१ भोळे भक्त (धु.) २, ३ व ४—न मगे (पं.)

अनुक्रमणिका

न करीं तुझी स्तुति न बाखाणीं कीर्ति । धरलासि ते युक्ति वेगळीच ॥ ४ ॥
न करीं काया क्लेश इंद्रिया निरोध । माझा आहे बोध वेगळाचि ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प । येसी आपोआप गिवसित ॥ ६ ॥

[ १४७३ ]

क्रिया कर्म धर्म तूंचि होसी माझे । राखेन मी तुझें द्वार देवा ॥ १ ॥
मज पाळीसी तैसा पाळीं दीनानाथा । न सोडीं सर्वथा नाम तुझें ॥ २ ॥
गाईन तुझें नाम हृदयीं धरुनि प्रेम । हाचि नित्य [1]नेम सर्व माझा. ॥ ३ ॥
नामा म्हणे [2]केशवा सुखाच्या सागरा । तूं आम्हां सोईरा आदिअंतीं ॥ ४ ॥

[ १४७४ ]

अवघाचि संसार करीन सुखाचा । जरी जाला दुःखाचा दुर्धर हा ॥ १ ॥
विठोबाचें नाम गाईन मनोभावें । चित्त तेणें नांवें सुख पावे ॥ २ ॥
इंद्रियांचें कोड सर्वस्वें पुरती । मनाचे मावळती मनोधर्म ॥ ३ ॥
श्रवणीं श्रवणा नामाचा प्रबंधा । नाइकें स्तुतिनिंदा दुर्जनाची ॥ ४ ॥
कुंडलें मंडित श्रीमुख निर्मळ । पाहतां हे डोळे निवती माझे ॥ ५ ॥
विटेसहित चरण धरीन मस्तकीं । तेणें तनु सुखी होईल माझी ॥ ६ ॥
संतसमागमें नाचेन रंगणीं । तेणें होईल धुणी त्रिविध तापा ॥ ७ ॥
नामा म्हणे सर्व सुखाचा सोईरा । न विसंबे दातारा क्षणभरी ॥ ८ ॥

[ १४७५ ]

नमन करीन द्वारकानायका । पांडव पालका देवराया ॥ १ ॥
आतां मी गाईन गुण नाम कीर्ति । जेणें चारी मुक्ति दासी होती ॥ २ ॥
साधक लोकांसी हेंचि पैं साधन । ब्रह्म सनातन वश होय ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्व सारांचें हें सार । जेणें निरंतर सुख वाटे ॥ ४ ॥

---

अभंग १४७३—(पं.),(शि.),(धु.) व (न.), १४७४—(पं.) व (शि.), १४७५—(आ.)

१ धर्म (न.)

२ विठो कृपेच्या (न. व आ.)

[ १४७६ ]

जीवन्मुक्त केलें नामाचे गजरीं । [1]सेवेसी अधिकारी विठोबाचे ॥ १ ॥
काय उतराई होउं तुज देवा । उदारा केशवा मायबापा ॥ २ ॥
[2]अंतरीं देऊन प्रेमाचा जिव्हाळा । मुक्तीचा सोहळा भोगविसी ॥ ३ ॥
नामा म्हणे वेदां न येसी अनुमाना । वर्णितां पुराणां पडियेलें ठक ॥ ४ ॥

[ १४७७ ]

[3]मन नेणें तुझ्या मनाचा विश्वास । येर तो हव्यास गोड वाटे ॥ १ ॥
तुझें प्रेम नेणें तुझें प्रेम नेणें । सांग काय करणें केशिराजा ॥ २ ॥
मज घातलें संसारीं [4]पीडिलों कर्मभांडारीं । कृपा नरहरी करी मज ॥ ३ ॥
नामा म्हणे मी तों ठायींचाचि अपराधी । केशवा कांहीं बुद्धि सांग मज ॥ ४ ॥

[ १४७८ ]

येइना अझुनी श्रीकृष्ण सदना । गोंवळा रक्षणा मायबाप ॥ १ ॥
लावुनि आशा फिरविशी दिशा । प्रेमभाव कैसा दावीं आतां ॥ २ ॥[5]
बाळेभोळे जन करिती विनंती । मोकलिसी अंतीं म्हणे नामा ॥ ३ ॥

[ १४७९ ]

अगे तूं माउली संतांची साउली । आठवितां घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
प्रेमपान्हा पाजी अगे माझे आई । विठाई गे मायी बोरसोनी ॥ २ ॥
येतों काकुळती प्रेम पान्ह्यासाठीं । उभा तो धुर्जटी मागें पुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे जीवें करीन लिंबलोण । ओवाळिन चरण विटेसहित ॥ ४ ॥

---

अभंग १४७६––(पं.), (शि.) व (आ.), १४७७––(पं.), (शि.) व (न.), १४७८ व १४७९––(आ.)

१ सवे अधिकारी वैकुंठीचे ॥ (आ.)

२ सगुण भक्तिस साक्ष काय जाण । कर्म नारायण कर्मनिष्ठ ॥ (आ.), चरण २ (आ.) प्रतीत नाही. ३ मज (न.), मी तों (पं.) ४ पडिलों (न.) ५ (आ.) प्रतीत पुढील चरण अधिक आहे––

कृपा करा देवा कृपा करा देवा । कृपा करा देवा पांडुरंगा ॥ २ ॥ (आ.)

अनुक्रमणिका

[ १४८० ]

विठ्ठल माउली कृपेची कोंवळी । आठवितां घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें जालें हृदय तुझें ॥ २ ॥
तुजविण जिवलग दुजें कोण होईल । ते माझे साहिल जड भारी ॥ ३ ॥
तूं माझी माउली मी वो तुझा वच्छ । परतों परतों वास पाहे तुझी ॥ ४ ॥
माया मोहें कैसी न विसंबे सर्वथा । अंतरींची व्यथा कोण जाणे ॥ ५ ॥
नामा म्हणे विठ्ठले कां गे रुसलिसी । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥ ६ ॥

[ १४८१ ]

[1]डोळुले सिणले पाहता वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजीं ॥ १ ॥
तूं माझी जननी सखिये सांगातिणी । विठ्ठले धांवोनी देई क्षेम ॥ २ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । क्षुधें पीडिलों मज विसरलीसी ॥ ३ ॥
तूं माझी कुरंगिणी मी तुझें पाडस । गुंतलें भवपाश सोडी माझा ॥ ४ ॥
मी तुझें वच्छ तूं माझी [2]गाउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ ५ ॥
नामा म्हणे माझी पुरवावी आस । पाजी तान्हुल्यास प्रेमपान्हा ॥ ६ ॥

[ १४८२ ]

येई गे विठ्ठले अनाथाचे नाथे । माझे कुळदैवते पंढरीचे ॥ १ ॥
पंच प्राणांचा उजळोनि दीपक । सुंदर श्रीमुख ओवाळीन ॥ २ ॥
मनाचा प्रसाद तुजलागीं केला । रंगभोग आपुला घेऊनि राहे ॥ ३ ॥
आनंदाचा भोग घालिल आसनीं । वैकुंठवासिनी तुझ्या नांवें ॥ ४ ॥
आपुलें म्हणवावें सनाथ करावें । भावें संचारावें हृदयांत ॥ ५ ॥
नामा म्हणे माझे पुरवी मनोरथ । देई सदोदित प्रेमकळा ॥ ६ ॥

[ १४८३ ]

कृपावंत समर्थ म्हणूनि करी आर्त । येईन सांवरत पांडुरंगे ॥ १ ॥
मज कां विसंबली विठ्ठल माउली । तनु तृषावली जीवनेंविण ॥ २ ॥

अभंग १४८०—(पं.) व (शि.), १४८१—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १४८२—(पं.), (शि.) व (धु.), १४८३—(पं.)
१ डोळुले भागले (धु.) २ माउली (आ.)

अनुक्रमणिका

तूं माझें जीवन नाम जनार्दन । हृदयीं भरी पूर्ण प्रेमरस ॥ ३ ॥
अमृताच्या करें कांसवीच्या भरें । कुरवाळीं त्वरें देह माझा ॥ ४ ॥
पूर्ण पान्हा देई निववीं हृदयीं । येई वो कान्हाई सांवळिये ॥ ५ ॥
नामा म्हणे पावे जीवा शीण न साहे । वेगीं लवलाहे पाजी पान्हा ॥ ६ ॥

[ १४८४ ]

तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेमपान्हा [1]पांडुरंगे ॥ १ ॥
तूं माझी गाउली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं [1]पांडुरंगे ॥ २ ॥
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । [2]तोडी भवपाश [1]पांडुरंगे ॥ ३ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घाली मज [1]पांडुरंगे ॥ ४ ॥
कासवीची दृष्टी सदा बाळावरी । तैसी दया करीं [1]पांडुरंगे ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो भक्तीच्या वल्लभा । [3]मागें पुढें उभा सांभाळिसी ॥ ६ ॥

[ १४८५ ]

विसावा विठ्ठल सुखाची साउली । प्रेमपान्हा घाली भक्तांवरी ॥ १ ॥
दाखवी चरण दाखवी चरण । दाखवी चरण नारायणा ॥ २ ॥
विठ्ठल आचार विठ्ठल विचार । दावीं निरंतर पाय आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे नित्य बुडालों संसारीं । धांवोनियां धरीं हातीं मज ॥ ४ ॥

[ १४८६ ]

भुक्ति मुक्ति मागों तुज । तरी मज हांसती पूर्वज ॥ १ ॥
मज प्रेम पढियें देवा । न मगें आन कांहीं [4]सेवा ॥ २ ॥
मोक्ष मागूं तुजप्रति । संत छलवादें हांसती ॥ ३ ॥
चाड धरीन ब्रह्मज्ञानीं । तरी मज व्यर्थ व्याली जननी ॥ ४ ॥
होऊं सिद्धीचा साधिता । दैवें सांडिलें [5]तत्त्वता ॥ ५ ॥
[6]नामा म्हणे कांहीं न मगें । उभा राहेन संतांमागें ॥ ६ ॥

अभंग १४८४—(पं.), (शि.) व (धु.), १४८५—(आ.), १४८६—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ रामराया (धु.) २ नको तोडूं आस (धु.) ३ ठाव आम्हां द्यावा चरणापासीं ॥ (पं.)
४ केशवा (आ.) ५ सर्वथा (आ.) ६ नामा म्हणे तूं जाणसी । माझा भाव हृषिकेशी ॥ (आ.)

[ १४८७ ]

असोनि न दिसे लौकिक वेव्हारीं । [1]ऐसा तूं अंतरीं लपवीं मज ॥ १ ॥
[2]परि तुझे पायीं माझें अनुसंधान । वरी प्रेमजीवन देईं देवा ॥ २ ॥
[3]मनाचिया वृत्ति आड तूं राहोनि । झंपावती झणीं कामक्रोध ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें पाळिसी तूं मातें । मी जीवें तूतें न विसंबें ॥ ४ ॥

[ १४८८ ]

उडाली पक्षिणी [4]गेली अंतराळीं । चित्त [5]बाळाजवळी ठेवूनियां ॥ १ ॥
तैसें माझें मन राहो कां ईश्वरीं । मग सुखें संसारीं असेना का ॥ २ ॥
धेनु चरे वनीं वच्छ असे घरीं । चित्त वच्छावरी ठेवुनि फिरे ॥ ३ ॥
दुडीवरी दुडी सखिसी गोष्टी करी । चित्त दुडीवरी ठेवूनियां ॥ ४ ॥[6]
विष्णुदास नामा विनवी परोपरी । हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ ५ ॥

[ १४८९ ]

येईं वो कृपावंते अनाथांचे नाथे । निवारीं भवव्यथे पांडुरंगे ॥ १ ॥
मी बाळक भुकाळु तूं माउली [7]कृपाळु । करीं माझा सांभाळु पंढरिराया ॥ २ ॥
माझें माहेर पैं नित्य आठवे अंतरीं । सखा विटेवरी पांडुरंग ॥ ३ ॥
मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्त तूं अन्न । मी तृषार्त तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥
मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर । मी याचक तूं दातार पांडुरंगा ॥ ५ ॥
मी धनलोभी शुंभ तूं पूर्ण कनक कुंभ । मी मगर तूं अंभ पांडुरंगा ॥ ६ ॥
मी चातक तूं मेघ मी प्रवृत्ति तूं बोध । मी शुष्क नदी तूं ओघ पांडुरंगा ॥ ७ ॥
मी दोषी तूं तारक मी भृत्य तूं नायक । मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा ॥ ८ ॥
मी पाडस तूं कुरंगिणी मी अंडज तूं पक्षिणी । मी अपत्य तूं जननी पांडुरंगा ॥ ९ ॥
मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय । मी आडळ तूं साह्य पांडुरंगा ॥ १० ॥

---

अभंग १४८७—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १४८८—(पं.), (शि.), (धु.), (न.) व (बा.), १४८९—(पं.), (शि.) व (बा.)

१ ऐसें निरंतरीं लपवीं मातें ॥ (आ.) २ तुझें स्वरुपीं माझें असो अनुसंधान। (आ.)
३ मनाचिये वृत्ति अंतरापासोनि। झोंबो नेदी दोन्ही कामक्रोध ॥ (आ.)
४ जाय (न.) ५ आविसाळीं (बा.) ६ (धु.) प्रतीत काही ठिकाणी हा चरण मिळत नाही.
७ कनवाळु (बा.)

ऐसी जे जे माझी विनंती ते तुजचि लक्ष्मीपती । निज सुख सांगाती पांडुरंगा ॥ ११ ॥
शीघ्र येईं वो श्रीरंगे भक्त मानस घे गे । प्रेमपान्हा दे गे नामदेवा ॥ १२ ॥

[१४९०]

बहु दिस होतों तुमचां गांवीं । आतां कृपा असों द्यावी ॥ १ ॥
आम्ही जातों आपुल्या गांवा । विठोबा लोभ असों द्यावा ॥ २ ॥
आमुचे ठायीं तुझें मन । तुझे चरण आमुचे प्राण ॥ ३ ॥
आमुचें स्मरण असों द्यावें । लिखित पत्र पाठवावें ॥ ४ ॥
नामा म्हणे जी केशवा । अखंड प्रेमभाव द्यावा ॥ ५ ॥

[१४९१]

प्रेमपिसें भरलें अंगीं । गीतें छंदें नाचों रंगीं ॥ १ ॥
कोणे वेळे [1]काय गाणें । [2]हें तो भगवंता मी नेणें ॥ २ ॥
वारा धावे भलतेया । तैसी माझी रंगछाया ॥ ३ ॥
टाळ मृदंग दक्षिणेकडे । आम्ही गातों पश्चिमेकडे ॥ ४ ॥
बोले बाळक बोबडें । तरी तें जननीये आवडे ॥ ५ ॥
नामा म्हणे गा केशवा । जन्मोजन्मीं देईं सेवा ॥ ६ ॥

[१४९२]

टाळ दिंडी हातीं उभा महाद्वारीं । नामा कीर्तन करी पंढरिये ॥ १ ॥
आवडीचेनि सुखें वोसंडतु प्रेमें । गातों मनोधर्में हरिचे गुण ॥ २ ॥
सांडोनि अभिमान नाचे धरोनि कान । अंतरीं ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥
श्रीहरिची उत्तम जन्मकर्मनामें । [3]घेतलीं त्या प्रेमें सुखरूपें ॥ ४ ॥
संतांची विश्रांति ज्ञानियांचें गुज । जें कां मुक्तिबीज मोक्षदानी ॥ ५ ॥
कृष्ण [4]विष्णु हरी मुकुंद मुरारी । अच्युता नरहरी नारायणा ॥ ६ ॥
गोवर्धनधरे गोपीमनोहरे । भक्तकरुणाकरे पांडुरंगा ॥ ७ ॥

---

अभंग १४९०—(पं.) व (शि.), १४९१—(पं.) व (न.), १४९२—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ गावें गाणें (न.) २ हें तो भगवंत जाणें ॥ (न.)
३ घोळितसे प्रेमें सुखरूप ॥ (धु.) ४ विठ्ठल (आ.)

अनुक्रमणिका

सकळा मंगळनिधी पातकभंजना । हरिजगज्जीवना परमानंदा ॥ ८ ॥
तूंचि एक सकळ आदिमध्यअंतीं । नित्य [1]सुखसंपत्ति सज्जनांची ॥ ९ ॥
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि घेता देता प्रेमसुख ॥ १० ॥
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा । सोडवी भवभ्रमां पासूनियां ॥ ११ ॥

[१४९३]

तुझ्या पायीं चित्त रंगलेसें माझें । नाहीं केशिराजें ऐसें केलें ॥ १ ॥
उठवितां काय होईल संतोष । मज अभाग्यास मोकलीलें ॥ २ ॥
प्रपंच काबाडी न घाली मज दृढ । नको वाडें कोड झणीं देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे भावें विनंति समस्तां । नको भंगू आतां प्रेमपान्हा ॥ ४ ॥

[१४९४]

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥
परेहूनि परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ३ ॥
सर्वांचें जें अधिष्ठान । तेंचि माझें रूप पूर्ण ॥ ४ ॥[2]
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ५ ॥
सर्व सत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता ॥ ६ ॥

[१४९५]

आम्ही तुझे असों एकचि त्या बोधें । नित्य परमानंदें बोसंडित ॥ १ ॥
विठ्ठलचि ध्यावा विठ्ठलचि गावा । विठ्ठलचि पहावा- सर्वांभूतीं ॥ २ ॥[3]
या परतें सुख न दिसे सर्वथा । कल्पकोटि येतां गर्भवास ॥ ३ ॥
नामा म्हणे चित्तीं विठ्ठलाचें रूप । संकल्प विकल्प मावळले ॥ ४ ॥

[१४९६]

तुझें प्रेम माझे हृदया आवडी । चरण मी न सोडी पांडुरंगा ॥ १ ॥
कशासाठीं शीण थोडक्याकारणें । काय तुज उणें होय देवा ॥ २ ॥

अभंग १४९३—(पं.) व (शि.), १४९४—(पं.), (शि.), (धु.) व (गं.), १४९५—(पं.) व (धु.), १४९६—(आ.)

१ तूं सुखसंविति (धु.) २ चरण ४ (आ.) प्रतीत नाही. ३ चरण २ (आ.) प्रतीत नाही.

चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ३ ॥
नामा म्हणे मज अनाथा सांभाळी । हृदयकमळीं स्थिर राहे ॥ ४ ॥

[ १४९७ ]

नामयाचें प्रेम केशवची जाणें । केशवासी राहणें नामयापासीं ॥ १ ॥
केशव तोचि नामा नामा तोचि केशव । प्रेमभक्तिभाव मागतसे ॥ २ ॥
विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं । प्रेमाची शिदोरी मागतसे ॥ ३ ॥

[ १४९८ ]

प्रेमफांसा घालुनियां गळां । जिनें धरिलें गोपाळा ॥ १ ॥
एक्या मनाची करूनि जोडी । विठ्ठल पायीं घातली बेडी ॥ २ ॥
हृदय करूनि बंदिखाना । विठ्ठल कोंडुनीं ठेविला जाणा ॥ ३ ॥
सोहं शब्दें मार केला । विठ्ठल काकुलती आला ॥ ४ ॥
नामा म्हणे विठ्ठलासी । जीवें न सोडी सायासी ॥ ५ ॥

[ १४९९ ]

विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन । विठ्ठल स्मरण प्रेमपान्हा ॥ १ ॥
विठ्ठलचि ध्यावों विठ्ठलचि गावों । विठ्ठलचि पाहों सर्वांभूतीं ॥ २ ॥
विठ्ठलापरतें न दिसे सर्वथा । कल्प येतां जातां गर्भवास ॥ ३ ॥
नामा म्हणे चित्तीं आहे सुखरूप । संकल्प विकल्प मावळती ॥ ४ ॥

[ १५०० ]

व्यापकापरीस मन केलें वाड । सांपडलें गोड प्रेमसुख ॥ १ ॥
जिकडे पाहें तिकडे विठ्ठल अवघा । भीमा चंद्रभागा पुंडलिक ॥ २ ॥
[१]सर्व निरंतरीं सबाह्य अंतरीं । हें ब्रह्मांड पंढरी जाली मज ॥ ३ ॥
महुरलें तरुवर पुष्पीं फलीं भार । तेंचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥

---

अभंग १४९७--(पं.), (शि.) व (धु.), १४९८--(आ.), १४९९--(पं.) व (शि.), १५००--(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ बाहेरीं भीतरीं सर्व निरंतरी । (आ.)

अनुक्रमणिका

आवडीचा आनंदु तोचि विष्णुनादु । अनुभव तो गोविंदु गोपवेषें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो भक्तीच्या वल्लभा । मागें पुढें उभा सांभाळित ॥ ६ ॥

[ १५०१ ]

तूं [1]आकाश मी [2]शामिका । तूं लिंग मी साळुंका ।
तूं समुद्र मी चंद्रिका । स्वयें दोन्ही ॥ १ ॥
तूं वृंदावन मी चिरी । तूं तुळशी मी मंजिरी ।
तूं पांवा मी मोहरी । स्वयें दोन्ही ॥ २ ॥
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मिणी ।
तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ॥ ३ ॥
तूं नदी मी थडी । तूं तारूं मी सांगडी ।
तूं धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही ॥ ४ ॥
तूं वेद मी स्तविता । तूं शास्त्र मी गीता ।
तूं गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही ॥ ५ ॥
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ।
मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ॥ ६ ॥

[ १५०२ ]

जीवन्मुक्त केलें नामाचे गजरीं । सेवेसी अधिकारी [3]विठोबाचे ॥ १ ॥
काये उतराई होऊं तुज देवा । उदारा केशवा मायबापा ॥ २ ॥
अंतरीं देऊनि प्रेमाचा जिव्हाळा । मुक्तीचा सोहळा भोगविसी ॥ ३ ॥
[4]नामा म्हणे वेदां न येसी अनुमाना । वर्णितां पुराणां पडलें टक ॥ ४ ॥

[ १५०३ ]

वारंवार काय विनवावें आतां । समजावें चित्ता आपुलिया ॥ १ ॥
तूं काय म्हणसी कंटाळेल हाची । जाईल उगाचि उठोनियां ॥ २ ॥
मजलागीं देवा जासी चुकवोनी । आणिन धरूनि तुजलागीं ॥ ३ ॥

---

अभंग १५०१—(पं.), (शि.) व (आ.), १५०२—(पं.), (शि.), (न.) व (आ.), १५०३—(पं.)

१ अवकाश (आ.) २ भूमिका (आ.) ३ वैकुंठीचे (न.)
४ नामा म्हणे आम्हां दीनांचे माहेर । हृदयीं निरंतर ध्यान करूं ॥ (आ.)

अनुक्रमणिका

दृढ भक्तिभाव प्रेमाचा हा दोरा । बांधीन सत्वर तुझे पायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे विठो बोल काय आतां । भेटावया सर्वथा यावें बरें ॥ ५ ॥

[१५०४]

संसारषड्चक्रीं पडिलों महाडोहीं । सोडवणें येई पांडुरंगा ॥ १ ॥
दवडादवडी धांव दवडादवडी धांव । नको भक्तिभाव पाहों माझा ॥ २ ॥
माझी चित्तवृत्ति अज्ञान हे गाई । व्याघ्रें धरिली आहे अहंकारें ॥ ३ ॥
[१]पंचाननीं मज घेतलें वेढोनि । नेताति काढोनि प्राण माझा ॥ ४ ॥
गजेंद्राकारणें घातली त्वां उडी । तैसा लवडसवडी पावें मज ॥ ५ ॥
नामा म्हणे मज तुझाचि आधार । पोसणा डिंगर जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

[१५०५]

येई हो विठ्ठले भक्तजनवत्सले । करुणा कल्लोळे पांडुरंगे ॥ १ ॥
सजलजलदघन पीतांबर परिधान । येई उद्धरणें केशिराजे ॥ २ ॥
नामा म्हणे तूं विश्वाची जननी । क्षिराब्धिनिवासनी जगदंबे ॥ ३ ॥

[१५०६]

येई वो विठ्ठले मजलागीं झडकरी । बुडतों भवसागरीं काढी मज ॥ १ ॥
आकांत आवसरी स्मरलीसे गजेंद्रें । दीनानाथ ब्रीदें साच केलीं ॥ २ ॥
स्मरलीसे संकटीं द्रौपदी वनवासी । धांवोनि आलीसी लवडसवडी ॥ ३ ॥
प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणी । संकटापासोनि राखियेलें ॥ ४ ॥
नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें । अखंड पाहतुसे वाट तुझी ॥ ५ ॥

[१५०७]

जननिये जिवलगे येवो पांडुरंगे । शिणलों भेटि दे गे एक वेळां ॥ १ ॥
आहे आहे आहे कृपादृष्टीं पाहे । येऊनियां राहे हृदयामाजीं ॥ २ ॥

अभंग १५०४—(पं.), (धु.) व (बा.), १५०५—(आ.), १५०६—(पं.), १५०७—(आ.)

१ पांचही पंचाननें। (बा.)

वासनेच्या संगें शिणलें माझें चित्त । विषयाचे आघात पडती वरी ॥ ३ ॥
नाहीं तुझी सेवा केली मनोधर्मे । संसार संभ्रमें भ्रांत सदा ॥ ४ ॥
नाहीं तुझें नाम गाईलें आवडी । बाळली कुवंडी त्रिविधतापें ॥ ५ ॥
नामा म्हणे आई धांवें लवलाही । बुडतों चिंताडोहीं तारी मज ॥ ६ ॥

[ १५०८ ]

भेटीची आवडी उत्कंठित चित्त । न राहे निवांत एके ठायीं ॥ १ ॥
जया देखे तया हेंचि पुसे मात । कां मज पंढरिनाथ बोलविना ॥ २ ॥
कृपेचा सागर विठो लोभपर । माझा कां विसर पडिला त्यासि ॥ ३ ॥
माहेरींची आस दसरा दिवाळी । बाहे ठेवुनि निढळ वाटे पाहे ॥ ४ ॥
सखे वारकरी पंढरीस जाती । निरोप त्या हातीं पाठवीन ॥ ५ ॥
निर्बुजला नामा कंठीं धरिला प्राण । करीतसे ध्यान रात्रंदिवस ॥ ६ ॥

[ १५०९ ]

भेटसी केधवां माझिया जिवलगा । ये गा पांडुरंगा मायबापा ॥ १ ॥[१]
[२]चित्त निरंतरीं तुझे महाद्वारीं । अखंड पंढरी हृदयीं वसे ॥ २ ॥
श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं । तेथें माझी दृष्टी बैसलीसे ॥ ३ ॥
भेटिचें आरत उत्कंठित चित्त । तुजविण माझें हित कोण करी ॥ ४ ॥
कटीं कर विटे समचरण साजिरे । देखावया झुरे मन माझें ॥ ५ ॥
[३]असुवें दाटलीं उभारोनि बाहे । नामा वाट पाहे रात्रंदिवस ॥ ६ ॥

[ १५१० ]

तूं माझी जननी काय गे साजणी । विठ्ठले धांवोनि भेट देई ॥ १ ॥
डोळे माझे शिणले पाहतां वाटोली । अवस्था दाटली हृदयामाजीं ॥ २ ॥

---

अभंग १५०८—(पं.), १५०९—(पं.) व (धु.), १५१०—(आ.)

१ हा अभंग—
आस धरोनि पोटीं, दिवस लेखीं बोटीं । प्राण ठेऊनी कंठीं वाट पाहे ॥
असा (पं.) प्रतीत आढळतो.

२ जिवींच्या (धु.)

३ सद्‍गदीत कंठ स्फुरती माझी बाहे । नामा वाट पाहे पंढरीची ॥ (धु.)

अनुक्रमणिका

मी तुझें पाडस गुतलों भवपाशीं । माते धीर तुजसी कैसा धरवला ॥ ३ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । क्षुधें पीडिलों मज विसरगी ॥ ४ ॥
तूं माझी माउली मी तुझें वोरस । पुढती पुढती वास पाहतसे ॥ ५ ॥
नामा म्हणे विठ्ठले आस पुरवीं माझी । ओरसे वेळां पाजीं प्रेमपान्हा ॥ ६ ॥

[१५११]

मुक्तपण आम्हां नको देवराया । भेटी मज पायां पुरे बापा ॥ १ ॥
[1]चतुरपणाची नको मज चाड । प्रेमभाव गोड पुरे बापा ॥ २ ॥
खाय भिल्लिणीचीं फळें आवडतीं । काय त्याचे चित्तीं दुजा भाव ॥ ३ ॥
भावापाशीं देव उभा सर्वकाळ । खेचरानें बळें दाखविला ॥ ४ ॥
नामा म्हणे मज सद्‌गुरूची सत्ता । आम्हासि मुक्तता नको बापा ॥ ५ ॥

[१५१२]

तूं माय माउली म्हणोनि आस केली । विठ्ठलें पाहिली वास तुझी ॥ १ ॥
मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें जालें हृदय तुझें ॥ २ ॥
तुजविण जिवलग दुजें कोण होईल । तें माझें जाणेल जडभारी ॥ ३ ॥
मी दीन अपराधी तुझा सरणागत । तुजविण माझें हित करिल कोण ॥ ४ ॥
करूणा कल्लोळिणी अमृत संजीवनी । चिंतितो निर्वाणीं पाव वेगीं ॥ ५ ॥
नामा म्हणे तुजविण जालों परदेशी । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥ ६ ॥

[१५१३]

भवव्याघ्र देखोनि भ्याले माझे डोळे । जालेसें व्याकुळ चित्त माझें ॥ १ ॥
पाव गा पाव गा पाव गा विठोबा । पाव गा विठोबा मायबापा ॥ २ ॥
तूं भक्त कैवारी कृपाळुवा हरी । येईं गा झडकरी देवराया ॥ ३ ॥
नामा म्हणे नेणें आन तुजवांचूनि । जनक जननी केशिराजा ॥ ४ ॥

---

अभंग १५११—(आ.). १५१२—(पं.), (शि.) व (धु.). १५१३—(पं.)
१ चातुर्यपणाची (आ.)

[१५१४]

कां गा मोकलिलें माझिया विठ्ठला । धांवा तुझा केला [1]मायबापा ॥ १ ॥
त्रितापें तापलों बहुत पोळलों । चिखलीं पडिलों दीनानाथा ॥ २ ॥
यालागीं तुजला भाकितों करुणा । धांवसी निर्वाणा पांडुरंगा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । रुक्माईच्या कांता घाली उडी ॥ ४ ॥

[१५१५]

वाडवेळ कां लाविला । कोण्या भक्तें रे गोंविला ॥ १ ॥
झडकरी यावें बा विठ्ठला । आळवितां कंठ सोकला ॥ २ ॥
वाट पाहें दाही दिशा । जिवीं धरोनि भरंवसा ॥ ३ ॥
न कळे का धरिले उदास । मज तो वाटती निरास ॥ ४ ॥[2]
[3]केव्हां येईल माझा हरी । आळंगील चहुंकरीं ॥ ५ ॥
नामा गहिंवरें दाटला । देह धरणिये लोटला ॥ ६ ॥

[१५१६]

जिवलग कोण तुजविण होईल । जें माझें जाणेल जडभारी ॥ १ ॥
अन्यायी अपराधी तुम्हां शरणागत । तुजविण हित कोण करी ॥ २ ॥
नामा म्हणे आई धावें लवलाहीं । बुडतों या डोहीं दंभाचिया ॥ ३ ॥

[१५१७]

काय पांडुरंगा सांग म्यां करावें । शरण कोणा जावें तुम्हांविण ॥ १ ॥
वाट पाहतांना भागले लोचन । कठिणच मन केलें तुवां ॥ २ ॥
ऐकिली म्यां कानीं कीर्ति तुझी देवा । उठलासे हेवा त्याचि गुणें ॥ ३ ॥
अनाथ अन्यायी काय मी करीन । दयावंत खूण सांगसी तूं ॥ ४ ॥
नामा म्हणे आस पूर्ण कीजे देवा । रूपडें दाखवा नेटें पाटें ॥ ५ ॥

अभंग १५१४—(पं.), (शि.), (धु.) व (बा.), १५१५—(पं.), (शि.), (न.) व (भा.), १५१६ व १५१७—(आ.)

१ पांडुरंगा (बा.) २ चवथा चरण (न.) व (आ.) प्रतींत नाही.
३ प्राण केव्हां येईल माझा । आलिंगिन चतुर्भुजा ॥ (आ.)



अनुक्रमणिका

[१५१८]

तूं माय माउली आस केली थोरी । वास निरंतरीं पंढरिये ॥ १ ॥
स्वरूप दाखवी एक वेळां मज । धरूं नको लाज पांडुरंगा ॥ २ ॥
नामा म्हणे तुज भक्तिचिये पें पिसें । पुरविसी आस दुर्बळाची ॥ ३ ॥[1]

[१५१९]

मयुरध्वज राजा महापापी जाण । उभा नारायण जोडी हात ॥ १ ॥
कर्वत आणसि सकळां देखतां । कांतिसी तत्वता मांस त्याचें ॥ २ ॥
कपोतणी मागें पारध्याचा वेष । दावी हृषिकेश रूप त्यासी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें करणें उचित । कां मज प्रचित न ये देवा ॥ ४ ॥

[१५२०]

अज्ञान बालक कोमाईलें झणीं । जाणे ते जननी तानभूक ॥ १ ॥
तैसा मजलागीं होउनि कृपाळ । करी गा संभाळ अनाथाचा ॥ २ ॥
वत्सालागीं धेनु येतसे वोरसे । पान्हा स्तनीं कैसे वोसंडती ॥ ३ ॥
नामा म्हणे तुज हें न साहे उपमा । मी कुडी तूं आत्मा केशिराजा ॥ ४ ॥

[१५२१]

अनाथ अनाथ म्हणती मातें । अनाथनाथ म्हणती तूतें ॥ १ ॥
आपुलें ब्रीद साच करी । येक वेळा भेटी दे गा मुरारी ॥ २ ॥
पतित पतित म्हणती मातें । पतितपावन म्हणती तूतें ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐकें सुजाणा । नाइकसि तरि लाज कवणा ॥ ४ ॥[2]

---

अभंग १५१८—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १५१९—(आ.), १५२०—(पं.), (शि.) व (धु.), १५२१—(पं.), (शि.) व (आ.)

१ आपणासमान करी कोणे काळीं । तंव वनमाळी देव म्हणूं ॥ हा चरण (आ.) प्रतीत तिसरा आहे.

२ (आ.) प्रतीत पुढील दोन चरण अधिक आहेत—
दीन दीन म्हणती मातें । दीनानाथा म्हणती तूतें ॥ ४ ॥
आर्त आर्त म्हणती मातें । आर्त परायण म्हणती तूतें ॥ ५ ॥

अनुक्रमणिका

[ १५२२ ]

तुवां येथें यावें कीं मज तेथें न्यावें । खंती माझ्या जीवें मांडियेली ॥ १ ॥
माझें तुजविण येथें नाहीं कोणी । विचारावें मनीं पांडुरंगा ॥ २ ॥
नामा म्हणे वेगीं यावें करुणाघना । जातो माझा प्राण तुजलागीं ॥ ३ ॥

[ १५२३ ]

बोलावूं पाठवूं एवढी कैंची शक्ति । या रंगा श्रीपती त्वां बा यावें ॥ १ ॥
येईं गा विठ्ठला पाहातसें आतां । या रंगा अनंता त्वां बा यावें ॥ २ ॥
धांवत त्वां यावें धांवत त्वां यावें । या रंगा नाचावें पांडुरंगा ॥ ३ ॥
तिन्हीं त्रिभुवनीं तुझीच करणी । ठाव मागे चरणीं नामदेव ॥ ४ ॥

[ १५२४ ]

दुरुनि आलों तुझिया भेटी । सांगावया जिवींच्या गोष्टी गा विठोबा ॥ १ ॥
बोल गा बोल मजशी कांहीं । दृष्टी [1]उघडुनी मजकडे पाही गा विठोबा ॥ २ ॥
अरे तूं कृपाळु दीनाचा । महा उदार थोर मनाचा गा विठोबा ॥ ३ ॥
भक्तें पुंडलिकें गोविलासी लोभें । प्रेमें प्रीतीच्या वालभें गा विठोबा ॥ ४ ॥
युगें अठ्ठावीस भरलीं । धणी अजुनी नाहीं पुरली गा विठोबा ॥ ५ ॥
प्राण होती माझे कासाविस । नामा म्हणे कां धरिलें उदास गा विठोबा ॥ ६ ॥

[ १५२५ ]

कां हो मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥
करुणाकल्लोळणी अमृत संजीवनी । चिंतल्या निर्वाणीं पावें वेगीं ॥ २ ॥
[2]अपराधी अनाथ जरी जालें अमंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ ३ ॥
नामा म्हणे [3]विठ्ठले आलों मी तुजपाशीं । केधवां भेटसी अनाथनाथा ॥ ४ ॥

[ १५२६ ]

कस्तुरीचा टिळा रेखिला कपाळीं । तेणें ते शोभली मूर्ति बरी ॥ १ ॥
बरवा बरवा विठ्ठल गे बाई । वर्णावया साही शिणताती ॥ २ ॥

---

अभंग १५२२—(पं.) व (शि.), १५२३—(आ.), १५२४—(पं.), (धु.) व (न.), १५२५—(पं.), १५२६—(आ.)

१ घालुनी, वळवुनि (न.), 'गा विठोबा' हे पालुपद (आ.) प्रतीत नाही.

२ अपराधी असंगळ अनाथ दुर्बळ। (पं.) ३ विठो जालों मी परदेसी। (पं.)

श्रीवत्सलांच्छन वैजयंती गळां । नेसला पाटोळा तेज:पुंज ॥ ३ ॥
पाऊलें समान विटेवरी नीट । नामा म्हणे भेट घ्यावी त्याची ॥ ४ ॥

[१५२७]

नको गा मोकलूं दीना पंढरिनाथा । तुजविण [1]आतां कोण पावे ॥ १ ॥
अपराधाच्या पोटीं पाहूं नको कांहीं । ये गे विठाबाई झडकरी ॥ २ ॥
माझ्या दोषासाठीं पाठमोरा होसी । पावन ब्रीदासी लागे बोल ॥ ३ ॥[2]
नामा म्हणे जननी तूंचि चराचर । तारिले अपार जड जीव ॥ ४ ॥

[१५२८]

वेदपरायण मनीं तो ब्राम्हण । चित्त समाधान संतुष्ट सदा ॥ १ ॥
येरा माझ नमन सर्वसाधारण । ग्रंथाचें राखण म्हणोनियां ॥ २ ॥
शास्त्रपंडित तोचि मी बहुमानी । जो आपणातें जाणोनि तन्मय जाला ॥ ३ ॥
पुराणिक ऐसा मानितो कृतार्थ । विषयीं विरक्त विधीपाळी ॥ ४ ॥
मानीं तो हरिदास ज्या नामीं विश्वास । मी त्याचा दास देहभावें ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें कई भेटविसी विठ्ठला । त्यालागीं फुटला प्राण माझा ॥ ६ ॥

[१५२९]

भेटिलागीं माझा फुटतसे प्राण । काया वाचा मनें जीवेंभावें ॥ १ ॥
जया देखे तया पुसें हेंचि मात । कैं मज अनंत बोलावील ॥ २ ॥
संतसमागमें दसरा दिवाळी । ठेवूनि निढळीं वाहे सदा ॥ ३ ॥
सखे पंढरीचे येती वारकरी । आर्त [3]निरंतरीं त्यांचे पायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें करी दंडवत । आमुतें पुनीत करी बापा ॥ ५ ॥

[१५३०]

संसाराचे सोये चुकले बापुडे । केशव मागें पुढें सांभाळित ॥ १ ॥
आळीकर नामें खेळे महाद्वारीं । आंतून बाहेरी [4]नवजे कांहीं ॥ २ ॥

अभंग १५२७—(पं.), (शि.) व (न.), १५२८—(आ.), १५२९ व १५३०—(पं.) (शि.)

१ मज (न.) २ पुढील चरण (पं.) प्रतीत २ व ३ चरणांमध्ये अधिक मिळतात—
मागें बहुत सखया तारियेले बहुत भक्त । वेदहि गर्जत नाम तुझे ॥ १ ॥
शास्त्रहि पुराण वाखाणिती तुज । नाम कीर्ति घोष पांडुरंगा ॥ २ ॥
३ मी तों धरी (पं.) ४ न वचे (पं.)

अनुक्रमणिका

संतांसी देखोनी मिठी घाली चरणीं । कुरवंडी करूनी देह टाकी ॥ ३ ॥
ऐसें निज बोधें राहिले निवांत । नामा एकुलते केशवचरणीं ॥ ४ ॥

[ १५३१ ]

तळियाचे पाळीं वृक्षावरी बैसुनी । कैसा चातक बोभाइतो रे ।
ताहाना फुटे परी उदक नेघे । मेघाची वाट पाही रे ॥ १ ॥
तैसा येईं बा कान्हया येईं बा कान्हया । जीवींच्या जीवना केशीराजा रे ॥ धृ० ॥
टाळघोळ कल्लोळ नानापरीचीं वाद्यें । वाजती वोजा रे ।
रानींच्या मयुरा नृत्या पैं नये । तुजविण मेघराजा रे ॥ २ ॥
जळाविण जळचर पक्षीविण पिलियासी । तैसे जालें नामयासी रे ।
शंखचक्र गदा पद्म पितांबरधारी । अझुनि कां न पावशी रे ॥ ३ ॥

[ १५३२ ]

तुझा विष्णुदास म्हणतात जगीं । [1]नाहीं माझे अंगीं प्रेमभाव ॥ १ ॥
तेणें थोर लाज वाटे पंढरिराया । ये माझ्या हृदया एक वेळां ॥ २ ॥
[2]द्वैताद्वैत भाव आहे माझे ठायीं । अनुभव नाहीं स्वरूपाचा ॥ ३ ॥
देखावेखीं बैसें संतांचे संगतीं । नाहीं माझे चित्तीं ध्यान तुझें ॥ ४ ॥
साकारलें रूप तें दिसे चर्मचक्षु । परी नाहीं वोळखी [3]केवळ मनें ॥ ५ ॥[4]
नामा म्हणे माझा उजळ करीं माथा । भेटी देउनी संतां निरवीं मज ॥ ६ ॥

[ १५३३ ]

गरुडावरी हरि बैसोनियां यावें । आम्हांसि रक्षावें दीनबंधू ॥ १ ॥
अच्युता केशवा मुकुंदा मुरारी । येईं लवकरी नारायणा ॥ २ ॥
ऐकोनियां धांवा धांवला अनंत । उभा गरुडासहित मागें पुढें ॥ ३ ॥
वैजयंती माळा किरीट कुंडलें । नामयानें केलें लिंबलोण ॥ ४ ॥

[ १५३४ ]

नेत्र माझे रोडले आठवे माहेर । कें भेटेन निरंतर बाईयांनो ॥ १ ॥
चतुर्भुज विठ्ठलु कें देखेन डोळां । भक्तांचा जिव्हाळा जीव माझा ॥ २ ॥

---

अभंग १५३१—(आ.), १५३२—(पं.), (शि.) ब.(धु.), १५३३—(पं.), १५३४—(आ.)

१ परी नाहीं अंगीं प्रेमभाव ॥ (पं.) २ द्वेषाद्वेष (पं.) ३ कवणें मानें (पं.)
४ चरण ५ हा (आ.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

येणें शोकें रे वाळलों शरीरीं । आठवतों हरि मी काय सांगूं ॥ ३ ॥
चारी भुजा उचलोनि क्षेम देईल । कैं मज नेईल पंढरपुरा ॥ ४ ॥
काम चित्तीं न लगे आतां कांहीं मज । कैं भेटल राजा पंढरीचा ॥ ५ ॥
त्यासि आठवितां हृदय वो फुटे । तो कैं मज भेटे बाप माझा ॥ ६ ॥
येणें देह न पवती मग काय येउनि करिती । सांगा काकुळती रखुमाईसी ॥ ७ ॥
वामांगीं रुक्मिणी कैं देखेन दोन्ही नयनीं । फेडीन पारणीं डोळियांची ॥ ८ ॥
जंव जंव आठवती तंव तंव उभड येती । कोणी न सांगती विठ्ठलासी ॥ ९ ॥
ऐसें श्रवणीचें सुख कैचें नवो देखे । येथें येऊनि बहुतेकें काय करिती ॥ १० ॥
गरुडटके अवघे आकाशीं ओळले । येवोनि सांगितलें विष्णुलोकीं ॥ ११ ॥
मग जावोनियां तया ठायां पाहें पंढरिराया । लागेन मी पायां तयाचिये ॥ १२ ॥
याचि लागोनियां आलों लवडसवडी । सांडियेली थड मग रोखिलासी ॥ १३ ॥
गरुडावरी आरूढ बाप माझा जाला । मज न्यावया आला बाईयांनों ॥ १४ ॥
येणें हर्षें संतोष कोठेंच न माये । भेटला विठ्ठल माय रुक्मिणीसहित ॥ १५ ॥
नामा जांतसे माहेरा एकला पंढरपुरा । हरी दातारा संसारा वेगळा करीं ॥ १६ ॥

[१५३५]

पाहूं द्यारे मज विठोबाचें मुख । लागलीसे भूक डोळां माझ्या ॥ १ ॥
कस्तुरी कुंकुम भरोनियां ताटीं । अंगीं बरवंट गोपाळाच्या ॥ २ ॥
जाईजुई पुष्पें गुंफोनियां माळां । घालूं घननीळा आवडीनें ॥ ३ ॥
नामा म्हणे विठो पंढरीचे राणे । डोळियां पारणें होत असे ॥ ४ ॥

[१५३६]

तपें केलीं दाटोदाटीं । थोर पुण्याचिया साठीं ॥ १ ॥
जन्मोजन्मींचा संकटीं । विठो तुझी जाली भेटी ॥ २ ॥
दोन्हीं चरण लल्लाटीं । नामा म्हणे न सोडीं मिठी ॥ ३ ॥

[१५३७]

महिमा अगाध यात्रा कार्तिकीये । आला पंढरीये नामदेव ॥ १ ॥
भक्त शिरोमणी पंढरीच्या नाथा । कृपाळुवा माता बाळकासी ॥ २ ॥

---

अभंग १५३५ व १५३६--(पं.) व (शि.), १५३७--(आ.)

अनुक्रमणिका

धन्य नामदेव धन्य नामदेव । जिवीं तुझे पाव न विसंबे ॥ ३ ॥
भक्त सप्रेम मिळाले अपार । करिती गजर हरिनामीं ॥ ४ ॥
नटे महाद्वारीं झळके पताका । करिती ब्रह्मादिक पुष्पवृष्टी ॥ ५ ॥
नामघोष कानीं समस्त ऐकती । पाषाण द्रवती तेणें प्रेमें ॥ ६ ॥
नामा म्हणे जीव निवालासे येथें । पाहतां विठोबातें श्रमु नेला ॥ ७ ॥

[१५३८]

ऐसी चाल नाहीं कोठें । नमस्कारा आधीं भेटे ॥ १ ॥
मायबाप निर्विकारीं । सखा नांदतो पंढरीं ॥ २ ॥
देव भक्तपण । नाहीं नाहीं त्यासी आण ॥ ३ ॥
नामा म्हणे आधीं भेटी । मग चरणां घालीन मिठी ॥ ४ ॥

[१५३९]

बहुत जन्माशेवटीं तुजशीं जाली भेटी । बहु मी हिंपुटी जालों थोर ॥ १ ॥
बहु कीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं । बहुत केले सुखी शरणागत ॥ २ ॥
बहुतां आसक्त बहुतां ओळगणा । बहुत विटंबना जाली माझी ॥ ३ ॥
बहु फेरे पाहिले बहु दुःख साहिलें । बहु चित्त वाहिलें दुर्भरची ॥ ४ ॥
बहुत काळ गेले बहु अन्याय केले । बहु नाहीं जोडिलें नाम तुझें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा एक उरली वासना । घ्यावी नारायणा चरणसेवा ॥ ६ ॥

[१५४०]

तान्हेलिया जाय उदका लागोनी । पारधी देखोनी मुरडे वेगीं ॥ १ ॥
तैसे तुझे चरण विसरलों देवा । संसार केशवा देखोनियां ॥ २ ॥
तैसी परि मज जहाली जाण देवा । नामा उभा केशवा विनवितो ॥ ३ ॥

[१५४१]

धरोनि हस्तक बैससी एकांतीं । भक्तासी श्रीपती सर्वकाळ ॥ १ ॥
दाखवीं चरण दाखवीं चरण । दाखवीं चरण धांवे नेटें ॥ २ ॥

अभंग १५३८ व १५३९—(आ.), १५४०—(पं.) व (शि.), १५४१—(आ.)

अनुक्रमणिका

सर्व आचरण दाविसी प्रकार । कल्पना अंधार निमित्याचा ॥ ३ ॥
नामा म्हणे होसी चतुर आपण । आमुचें निर्वाण पाहूं नको ॥ ४ ॥

[१५४२]

बुद्धिहीन अति करितों हव्यास । उठती उद्देश नाना मतें ॥ १ ॥
एकापुढें एक नासोनियां जाती । सोशिली विपत्ति जन्ममरण ॥ २ ॥
वासनेचें संगें बुडालों मी वायां । चुकवूं नको पायासवें भेटी ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे गेले बहुतेक । वैकुंठनायका तारीं मज ॥ ४ ॥

[१५४३]

अठ्ठाविस युगें उभा विटेवरी । मुद्रा अगोचरीं लावूनियां ॥ १ ॥
ध्यान विसर्जन केधवां करिसी । नेणवे कोणासी ब्रह्मादिकां ॥ २ ॥
पहात्तां तुजकडे माझें मीपण उडे । भेदाचें सांकडें हारपलें ॥ ३ ॥
तुजपाशीं असतां मुकिजे जीवित्वा । ठकले तत्त्वतां नेणों किती ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी कृपादृष्टि पाहें । मन पायीं राहे ऐसें कीजे ॥ ५ ॥

[१५४४]

माझी कोण गति सांग पंढरिनाथा । तारिसी अनाथ कीं बुडविसी ॥ १ ॥
मनापासोनियां सांग मजप्रती । पुसें काकुळती जीवाचिये ॥ २ ॥
न बोलसी कां रे धरिला अबोला । कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥
कोणासी सांकडें घालावें हें सांग । नको करूं राग दीनावरी ॥ ४ ॥
बाळकासी जैसी एकचि वो माये । तैसे तुझे पाये [१]आम्हांलागीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । कृपाळुवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

[१५४५]

नेत्र तान्हेले पाजीं पाणी । पंढरिचे मायबहिणी ॥ १ ॥
बाळ पालकीं करी सोर । माते आला निद्राभर ॥ २ ॥

अभंग १५४२—(आ.), १५४३—(पं.) व (धु.), १५४४—(पं.) व (शि.), १५४५—(पं.), (शि.), (धु.) व (गं.)

१ नामा म्हणे (शि. व पं.) हा पाठभेद घेतल्यास अभंग पाचच चरणांचा होईल.

[1]जागी न होसी गे माये । प्राण जातो करूं काये ॥ ३ ॥
[2]नामा म्हणे चक्रपाणि । चरणीं घातली लोळणी ॥ ४ ॥

[१५४६]

पक्षिणी प्रभाते चारियासी जाये । पिलें वाट पाही उपवासी ॥ १ ॥
तैसें माझें मन करी वो तुझी आस । चरण रात्रंदिवस चिंतितसे ॥ २ ॥
तान्हें वत्स घरीं बांधलेंसे दावा । तया हृदयीं धांवा माउलीचा ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा तूं माझा सोईरा । झणें मज अव्हेरा अनाथनाथा ॥ ४ ॥

[१५४७]

रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवीं । अनुदिनीं आठवीं चरण तुझे ॥ १ ॥
ने रे पांडुरंगा आपुलिया गांवा । तूं माझा विसावा जिवलग ॥ २ ॥
मी येक येकट रंकाहूनि रंक । त्रिभुवननायक कीर्ति तुझी ॥ ३ ॥
मी तुझें पोसणें दास पैं दुर्बळ । तूं दीनदयाळ स्वामी माझा ॥ ४ ॥
तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा । सांभाळीं [3]सर्वथा ब्रीद तुझें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो जालों कासावीस । पुरवीं माझी आस मायबापा ॥ ६ ॥

[१५४८]

बाळका स्तनपान करविते माता । टाळितां परता चरणीं लोळे ॥ १ ॥
हातीं घेऊनि शिपटीं माय लागे पाठीं । चरणीं घाली मिठी परते नोहें ॥ २ ॥
तैसें माझें मन तुजलागीं देवा । न विसंबे केशवा क्षणभरी ॥ ३ ॥
[4]चातक तेथें पाणी तृषाक्रान्त वनीं । वाट पाहे गगनीं जीवनाची ॥ ४ ॥
निराळेंचि पीयुष वर्षे तयालागीं । [5]आळवितां वेगीं मेघराया ॥ ५ ॥
वाळलें हें तृण नसंडी हो क्षीर । तैसें भक्तीं स्थिर मन राहे ॥ ६ ॥
नामा म्हणे या जन्माचिया साठीं । चरणीं घाली मिठी परता नोहे ॥ ७ ॥

---

अभंग १५४६—(पं.), (शि.) व (धु.), १५४७—(पं.), (शि.) व (न.), १५४८—(पं.) व (भा.)

१ वेगाजागी (पं., शि. व गों.) २ नामा आला लोटांगणि। पाइ घातली लोळणी॥ (पं.) ३ समर्था (न. व आ.) ४ चातका नलभे पाणी तृषाक्रांत मनीं। (आ.) ५ आळवितसे वेगीं नामा म्हणे॥ (पं.) हा चरण स्वीकारल्यास अभंग येथेच संपतो.

[१५४९]

युक्तिप्रयुक्तीचें प्रमाण मी नेणें । केशवचरणें ध्यातों मनीं ॥ १ ॥
आणिक साधन काय म्यां करावें । ब्रह्मादिक देव मौन ठेले ॥ २ ॥
आतां मी कायसा करावा आधार । चरण निर्धार देवपूजा ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझा अंत नाहीं पार । काय म्यां पामर जाणों आतां ॥ ४ ॥

[१५५०]

जाणीव शाहणीव वाहियेलें वोझें । तेणें चरण तुझे अंतरले ॥ १ ॥
मज नेणतेंचि करी मज हरी । या लौकिकाबाहेरी काढी मज ॥ २ ॥
तुझिया नामाचें मज लागो पिसें । देहीं देह न दिसे ऐसें करी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुज जाणसी तरी येकचि जाण । रहित कारण कल्पनेचें ॥ ४ ॥

[१५५१]

तुझें [1]प्रेम माझ्या दाखवीं मनातें । मग तुझ्या चरणातें न विसंबें ॥ १ ॥
कासया शिणविसी थोडिया कारणें । काय तुझें उणें होईल देवा ॥ २ ॥
चातकाची तहान पुरवी [2]जळधर । काय त्याची थोरी जाऊं पाहे ॥ ३ ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहोळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ४ ॥
कूर्मी अवलोकीं आपुलिया बाळा । काय तिच्या डोळां दृष्टि नासे ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा । अनाथा कुंवसा होसी तूंचि ॥ ६ ॥

[१५५२]

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडी सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळनाम । अखंड सदोदित प्रेम ॥ ३ ॥
जैसा तैसा असेल भाग । तैसा तैसा घडेल योग ॥ ४ ॥[3]
नामा म्हणे केशवराजा । केला [4]पण चालवी माझा ॥ ५ ॥

---

अभंग १५४९—(आ.), १५५०—(पं.), (शि.) व (धु.), १५५१—(धु.) व (बा.), १५५२—(पं.), (शि.) व (धु.)

१ रूप (बा. व आ.) २ जळधारी (बा.) ३ चरण ४ (आ.) प्रतीत नाही.
४ नेम (पं. व आ.)

[१५५३]

माथां मोरपिसा वेठी । श्रवणीं कुंडलें पदक कंठीं ।
हातीं घेऊनी वेताटी । गोधना पाठीं लागले ॥ १ ॥
तुझीं पाउलें अनंता । न विसंबे गा सर्वथा ।
गोविंदा माधवा अच्युता । श्री विठ्ठला ॥ २ ॥
गाई गोवळी पावला । येक म्हणती वळावळा ।
विष्णुदास नामा चरणाजवळा । अखंड वळत्या देतसे ॥ ३ ॥

[१५५४]

ऐसें माझें मना येतें पंढरीनाथा । न सोडी सर्वथा चरण तुझे ॥ १ ॥
यासि काय करूं सांगा जी गोपाळा । कां स्नेह लावियेला पूर्वीहुनी ॥ २ ॥
हृदयीं चित्तवृत्ति मनेंसि मिळोनी । अवघीं तुझ्या चरणीं सुरवाडिलीं ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा धरिली तुझी सेवा । सुखा अनुभवा अनुभविलें ॥ ४ ॥

[१५५५]

कोण होईल आत्मज्ञानी । जो बा राहे त्याच्या ध्यानीं ॥ १ ॥
मज तो चरणांची आवडी । जन्मोजन्मीं मी न सोडी ॥ २ ॥
होईल सिद्धीचा साधक । त्यासी देई स्वर्गसुख ॥ ३ ॥
कोण होईल देहातीत । त्यासी करी संगरहित ॥ ४ ॥
नामा म्हणे जीवें साठीं । तुज मज जन्में पडिली गांठी ॥ ५ ॥

[१५५६]

ब्रह्म अविनाश आणि आनंदघन । त्याहुनि चरण गोड तुझे ॥ १ ॥
तें जीवें न सोडी अगा पंढरीनाथा । जाणसी तत्त्वतां ह्रुदय माझें ॥ २ ॥
[1]परात्पर वस्तु ध्याईजे अपारापार । त्यांचे हें जिव्हार पाय तुझे ॥ ३ ॥
सच्चिदानंदघन जेथें हरपे मन । त्याहूनि चरण गोड तुझे ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझें पाउल हें सार । तें माझें माहेर विटेवरी ॥ ५ ॥

अभंग १५५३—(पं.) व (शि.), १५५४ व १५५५—(आ.), १५५६—(पं.) व (आ.)
१ परात्पर वस्तु जे कां अपरंपर। तियेचा साक्षात्कार पाव तुझे ॥ (आ.)

अनुक्रमणिका

[१५५७]

तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । जाती माझे प्राण तत्क्षणीं ॥ १ ॥
मग हें ब्रह्मज्ञान कोणापें सांगसी । विचारीं मानसीं केशिराजा ॥ २ ॥
वदनीं तुझें नाम होतांचि खंडणा । शतखंडरसना होइल माझी ॥ ३ ॥
सांवळें सुंदर रूप तुझें दृष्टी । न देखतां उन्मळती नेत्र माझे ॥ ४ ॥
तुज परतें साध्य आणिक साधन । साधक माझें मन होईल भ्रान्त ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा अनाथाचा नाथ । क्षणीं माझा अंत पाहसी देवा ॥ ६ ॥

[१५५८]

देवा माझें मन करोनि स्वाधीन । निमोले स्वामीपण भोगिसीना ॥ १ ॥
फुकाचा कामारा वोळगे निरंतर । न घाली तुज भार कल्पनेचा ॥ २ ॥
तुज नलगे देणें [1]मज नलगे मागणें । असेन अनुसंधानें चरणाचेनि ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा तूं सर्व जाणता । समयींच्या उचिता चुकों नको ॥ ४ ॥

[१५५९]

तुझिये चरणीं असती दोनी भाव । तरीच हा जीव नरककुंडीं ॥ १ ॥
बोल बोले एक मनीं असे आणिक । तरी तयासी देख दोनी त्राप ॥ २ ॥
तुजविण सुख आणिकांचें मानी । तरी मज जननी दोनी देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे माझा सत्याचा साहाकारी । आस मी न करी आणिकांची ॥ ४ ॥

[१५६०]

पाहुनि न दिसे लौकिक वेव्हारीं । ऐसा तूं अंतरीं लावीं मज ॥ १ ॥
परि तुझ्या चरणीं माझें अनुसंधान । तरी प्रेम पावन देईं देवा ॥ २ ॥
मनाचिये वृत्तीं अखंड तूं राहोनी । झेंपावती क्षणीं कामक्रोध ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे पावसी तूं मातें । तरी मी जीवें तूतें न विसंबें ॥ ४ ॥

अभंग १५५७—(पं.) व (धु.), १५५८—(पं.), (शि.), (धु.) व (गं.), १५५९ व १५६०—(पं.) व (शि.)

१ मज नाहीं सांगणें। (आ.)

अनुक्रमणिका

[ १५६१ ]

तुझे पायीं माझ्या मनें दिली बुडी । इंद्रियें बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥
आतां विषयसुख जाणावें कवणें । जाणोनि भोगणें कवणें स्वामी ॥ २ ॥
देह सहज स्थिति [1]राहिले निष्काम । हृदयीं सदा प्रेम ओसंडत ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करीं मज ॥ ४ ॥

[ १५६२ ]

आतां होणार तें होवो पंढरीनाथा । न सोडी सर्वथा चरण तुझे ॥ १ ॥
हृदयीं तुझें ध्यान वाचे जपें नाम । हाचि नित्यनेम सर्व माझा ॥ २ ॥
आम्हीं तुझी देवा धरियेली कांस । न करी उदास पांडुरंगा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करी मज ॥ ४ ॥

[ १५६३ ]

[2]विषय तडातोडी करि माझे मन । राहिलें म्हणोन तुझे पाइं ॥ १ ॥
नको नको देवा वासनेचा संग । मज आला दुभंग नारायणा ॥ २ ॥
कामक्रोधलोभ वैरि पाठी लागियेती । झणीं त्याचे हाति देसी मज ॥ ३ ॥
नामा म्हणे होसि अनाथ कोंवसा । ब्रिदें जगदिशा वर्णिताती ॥ ४ ॥

[ १५६४ ]

अपत्याचें हित किजे त्या जनकें । जरी वेडें मुकें जालें देख ॥ १ ॥
तैसें मी पोसणें तुझे जिवलग । अंतरींची सांग खूण कांहीं ॥ २ ॥
राखीन मी नांव तुझें सर्वभावें । चित्त वित्त बळी देईन पायीं ॥ ३ ॥
जरी दैवहीन [3]म्हणसी मजला । [4]तरी लाज कवणाला म्हणे नामा ॥ ४ ॥

---

अभंग १५६१—(पं.) व (धु.), १५६२ व १५६३—(पं.) व (शि.), १५६४—(पं.), (शि.) व (न.)

१ जाहलें (धु.)

२ ह्या अभंगाची अशीही संहिता आढळते—
वायां ताडतोडी केली माझ्या मनें । राहिलों लपोन तुझे पायीं ॥ १ ॥
नको नको मज कल्पनेचा संग । आलासे उद्वेग नारायणा ॥ २ ॥
काम क्रोध लोभ पाठीं लागो येती । झणी त्यांचे हातीं देसी देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे होसि अनाथांचा कैवारी । ब्रीदें चराचरीं वर्णिताती ॥ ४ ॥ (आ.)

३ म्हणतील मज । (न.) ४ लाज होईल तुज म्हणे नामा ॥ (न.)

अनुक्रमणिका

[१५६५]

देह जावो हेंचि घडी । पाय हरिचे न सोडी ॥ १ ॥
क्लेश होत नानापरी । वाचे रामकृष्ण हरी ॥ २ ॥
नाचूं वैष्णवांचे मेळीं । हांक विठ्ठल आरोळी ॥ ३ ॥
[1]नामा म्हणे विठोवासी । जें तें घडो या देहासी ॥ ४ ॥

[१५६६]

माझें सर्व भाग्य केशवाचे पाय । आणिक उपाय नेणों आम्ही ॥ १ ॥
पक्षी अवचित अंगणांत आला । घेऊनियां गेला सारा तेणें ॥ २ ॥
हाटकरी आम्ही हाटासी पैं गेलों । फिरोनियां आलों गांवामाजीं ॥ ३ ॥
नामा म्हणे नमूं सर्व जीवजंत । दिसे ते अनंत दृष्टीपुढें ॥ ४ ॥

[१५६७]

मायबापाची ते सांडुनियां आस । धरिली तुझी कांस पांडुरंगा ॥ १ ॥
झणीं पांडुरंगा उपेक्षिसी मातें । तरी हांसतील तूंतें संतजन ॥ २ ॥
नामा म्हणे तुझीं पाउलें समान । तेथें माझें मन स्थिरावलें ॥ ३ ॥

[१५६८]

तुजवांचोनि कांहीं गोड न वाटे जीवा । मज दिव्य केशवा पाय तुझे ॥ १ ॥
लौकिकापासुनि कधीं सोडविसी । सांग हृषिकेशी उघडोनि ॥ २ ॥
तुझे पाय दिव्य तुझे पाय दिव्य । तुझे पाय दिव्य रे दातारा ॥ ३ ॥
नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । तुझे पाय केशवा दिव्य मज ॥ ४ ॥

[१५६९]

तुझिया पायांचें प्रमाण हें माझें । चरण कमळ तुझे विसंबेना ॥ १ ॥
संसाराच्या गोष्टी कीट जाले पोटीं । रामकृष्ण कंठीं माळ घाल ॥ २ ॥
दुरोनियां देखें गरुडाचें वारिकें । गोपाळा सारिखें चतुर्भुज ॥ ३ ॥
नामा म्हणे विठो जन्मजन्मांतरीं । ऋणि करुनि करीं घेई मज ॥ ४ ॥

---

अभंग १५६५--(धु.) व (बा.), १५६६—(आ.), १५६७ ते १५६९--(पं.) व (गि.)
१ नामा केशवाचा दास। द्वैतपणा केला नास ॥ (बा.)

अनुक्रमणिका

[ १५७० ]

किती देवा तुला यावें काकुलती । काय या संचितीं लिहिलें असे ॥ १ ॥
केली कांहो सांडी माझी हृषिकेशी । आम्ही कोणापाशीं तोंड वासूं ॥ २ ॥
ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं । तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥
समूळ घेतला पृथ्वीचा भार । माझाचि जोजार काय तुला ॥ ४ ॥
नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा विठोपायीं मिठी घाली ॥ ५ ॥

[ १५७१ ]

गाणीं मी गाईलों भाटीं वाखाणिलों । जन्मोनियां जालों दास तुझा ॥ १ ॥
आतां माझी लाज राखें नारायणा । ह्मणीं केबिलवाणा दिसों देसी ॥ २ ॥
माये दुऱ्हाविलों मोहें मोकलिलों । सोये पैं चुकलों संसाराची ॥ ३ ॥
आपवर्गि सांडिलों गोत्रजां तुटलों । येवोनि विनटलों तुझे पायीं ॥ ४ ॥
षड्वर्गीं सांडिलों प्रवृत्ती दंडिलों । मीपणा मुकलों मायबापा ॥ ५ ॥
नामा म्हणे तुझ्या चरणाची आवडी । लागली न सोडी चित्त माझें ॥ ६ ॥

[ १५७२ ]

[१]हातीं विणा मुखीं हरी । गायें राउळाभीतरीं ॥ १ ॥
अन्न उदक सोडिलें । ध्यान देवाचें लागलें ॥ २ ॥
स्त्री पुत्र बाप माय । यांचा आठव न होय ॥ ३ ॥
देहभाव विसरला । छंद हरीच लागला ॥ ४ ॥
नामा म्हणे हेंचि देई । तुझे पाय माझे डोयीं ॥ ५ ॥

---

अभंग १५७०—(पं.), (शि.) व (धु.), १५७१—(पं.), (शि.), (धु.) व (गं.), १५७२—(पं.) व (धु.)

१ हा अभंग असाही सापडतो—
हातीं वीणा मुखि हरि । गाय राउळाभीतरीं ॥ १ ॥
देह भाव हारपला । तुज पाहतां विट्ठला ॥
नये कळु सुखदुःख । तान हारपलि भूक ॥
स्त्री पुत्र बापमाय । याची आठवण होये ॥
नामा म्हणे विठाबाई । हेचि कृपादान देई ॥ ४ ॥ (धु.)

[१५७३]

पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा । पुढतीं एक चिंता वाटतसे ॥ १ ॥
झणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या संतसंगा कोठें पाहूं ॥ २ ॥
मग हे पंढरी आनंद सोहळा । कवणाचें डोळां पाहूं देवा ॥ ३ ॥
मग हे हरिकथा अमृत संजीवनी । कवणाचे श्रवणीं ऐकों देवा ॥ ४ ॥
नामा म्हणे मज पंढरीची सोये । अनंत जन्म होये याचिलागीं ॥ ५ ॥

[१५७४]

देवा माझें मन आणि तुझे चरण । एकत्र करोन दिधली गांठी ॥ १ ॥
होणार तें हो गा सुखें पंढरीनाथा । कासया शिणतां वायांविण ॥ २ ॥
माझिया अदृष्टीं ऐसेंचि पैं आहे । सेवावे तुझे पाय जन्मोजन्मीं ॥ ३ ॥
असतां निरंतर येणें अनुसंधानें । प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥ ४ ॥
हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम । बुद्धि हे निष्काम धरिली देवा ॥ ५ ॥
नामा म्हणे तुझीं पाउलें चिंतितां । जाली कृतकृत्यता जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

[१५७५]

तुझिया चरणाची न संडी मी आस । मग होत गर्भवास कोटिवरी ॥ १ ॥
हेंचि मज द्यावें जन्मजन्मांतरीं । वाचे नरहरी नाम तुझें ॥ २ ॥
कृपेचें पोसणें मी गा येक दिन । माझा अभिमान न संडावा ॥ ३ ॥[1]
नामा म्हणे मज चाड नाहीं येरे । इतुकेंचि पुरे केशिराजा ॥ ४ ॥

अभंग १५७३ ते १५७५––(पं.), (शि.) व (धु.)
१ या अभंगाचे ३ व ४ चरण असे आढळतात––
तुझिया नामाचा करीन विसांवा । मनाचा हा ठेवा तुझे पायीं ॥ ३ ॥
नामा म्हणे माझे हेचि मनोरथ । होईन शरणागत जन्मोजन्मीं ॥ ४ ॥ (पं. व आ.)

• • •

अनुक्रमणिका

[ १५७६ ]
सांडोनि अभिमान जालों शरणागत । ऐसियाचा अंत पहासी काई ॥ १ ॥
माझे गुणदोष मनीं गा न धरीं । पतित पावन जरीं म्हणविसी ॥ २ ॥
पडविलिया पापराशी झणीं देसी देवा । हे लाज केशवा कोणास जी ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा चतुरा शिरोमणी । निकुरा जासी झणीं मायबापा ॥ ४ ॥

[ १५७७ ]
[1]जाणसी तें करीं कृपाळुवा हरि । लाज सर्वापरी आहे तुज ॥ १ ॥
आरूष साबडें मी कांहीं नेणें वेडें । जन्मोनि सांकडें केलें तुज ॥ २ ॥
बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं । बहुत केले सुखी शरणागत ॥ ३ ॥
नाहीं तुझी सेवा केली मनोभावें । लोभ दंभ गर्व भ्रांति सदा ॥ ४ ॥
नामा म्हणे मज होताती विपत्ति । सोडवीं श्रीपति येथोनियां ॥ ५ ॥

[ १५७८ ]
भिऊनि निघिजे समर्थाचे [2]पोटीं । विषयांची तो भेटी नको मज ॥ १ ॥
तैसा मी शरण आलों रे केशवा । मज त्वां राखावें पायांतळीं ॥ २ ॥
नको उदासीन राखों अभिमान । माझें आगमन विचारीं कां ॥ ३ ॥
तुझेनि होईल तेंच मी मागेन । न सोडीं चरण अहर्निशीं ॥ ४ ॥
अविद्या अपार संचरली देवा । आम्हासि कुढावा नाहीं कोणी ॥ ५ ॥
देवा आतां मज नको गर्भवास । [3]नामा विष्णुदास विनवितसे ॥ ६ ॥

[ १५७९ ]
वासनेचा फांसा पडिला माझे कंठीं । हिंडलों जगजेठी नाना योनी ॥ १ ॥
सोडवीं गा देवा दीनदयानिधी । मी एक अपराधी दास तुझा ॥ २ ॥

---

अभंग १५७६—(धु.) व (पं.), १५७७—(पं.) व (शि.), १५७८—(पं.), (न.) व (शि.), १५७९—(पं.), (शि.) व (धु.)

१ हाच अभंग थोड्याफार फरकाने खालीलप्रमाणे मिळतो—
आरूष सांबडें नेणे कांहीं वेडें। जन्मोनि सांकडें केलें तुज ॥ १ ॥
जाणसी तें करीं कृपाळुवा हरी। लाज सर्वांपरी आहे तुज ॥ २ ॥
मी तंव अपराधी असे लक्षकोटी। म्हणतों जगजेठी दास तुझा ॥ ३ ॥
नाहीं तुझी सेवा केली मनोभावें। लोभदंभगर्वें भ्रांत जालों ॥ ४ ॥
कीर्ति म्यां ऐकिलीं बहुतांच्या मुखीं। केली बहु स्तुति शरणागतें ॥ ५ ॥
नामा म्हणे मज मोकलिसी झणीं। अनाथ म्हणोनि शरण आलों ॥ ६ ॥ (पं. व शि.)

२ पाठीं (पं.) ३ विठा विष्णुदास विनवितसे। (न.)



अनुक्रमणिका

शरण आलियाचे न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण तुज साजे ॥ ३ ॥
त्रिभुवनीं समर्थ उदार मनाचा । कृपाळू दीनांचा ब्रीद तुझें ॥ ४ ॥
गजेंद्र गणिकेची राखिली तुंवां लाज । उद्धरिला द्विज अजामेळ ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अव्हेरितां मज । जगीं थोर लाज येईल तूंतें ॥ ६ ॥

[ १५८० ]

देवा तुझी अवज्ञा घडे । तयाचे दास होती वांकुडे ।
व्याधिविण देह पीडे । बुडे सागरीं चिंतेच्या ॥ १ ॥
देवा तूं होसी उदासीन । तरी हांसती सकळैक जन ।
जेथें जाय तेथें होय [1]अपमान । जगाधीन होऊनि ठाके ॥ २ ॥
देवा तूं नाहींस जयाचें चित्तीं । सोनें धरिल्या होये माती ।
पीक न पिके तयाचे शेतीं । पेंवीं पाणी रिघतसे ॥ ३ ॥
सेवा करी जयाचे घरीं । तींचि होतीं पाठमोरीं ।
इष्टमित्र सज्जन सोयरीं । आप्त वैरी होऊनि ठाके ॥ ४ ॥
ठेवा ठेविला चुके आपण । मागतोचि मागे जाण ।
सत्यास घडे आपदास्तपण । बोले तितुकें लटिकेची ॥ ५ ॥
ऐसा अनुभव घडला मज । म्हणोनि बा शरण आलों तुज ।
नामा म्हणे केशिराज । कृपा करीं दातारा ॥ ६ ॥

[ १५८१ ]

तुज गीतीं गातां न येसी पांडुरंगा । प्रेमेंचि दडूं गा पायांपाशीं ॥ १ ॥
वांकडें तिकडें जैसें आलें तैसें । गावया उल्हास उगवला ॥ २ ॥
त्याचि भरें तोंडा आलें तें बोलतों । नाम मुखीं घेतों अखंडित ॥ ३ ॥
तुझा म्हणवितों सांभाळावें देवा । नामया केशवा सर्वकाळ ॥ ४ ॥

[ १५८२ ]

अपराधाच्या कोडी हेचि माझी जोडी । पतितपावन प्रौढी तुझी देवा ॥ १ ॥
माझिया निदैवें ऐसेंचि घडलें । तूं तंव आपुलें न संडिसी ॥ २ ॥
सहस्र अपराध घालीं माझे पोटीं । तारीं जगजेठी नामा म्हणे ॥ ३ ॥

---

अभंग १५८०—(पं.), (शि.) व (आ.), १५८१—(आ.), १५८२—(शि.), (पं.), (धु.) व (गं.)

१ अनमान (आ.)

[ १५८३ ]

देवा माझें मन ठेवीं तुझे चरणीं । घालीं माझे नयनीं रूप तुझें ॥ १ ॥
मज या लोकांचा शीण असे मनांत । तुजचि चिंतित हृदयकमळीं ॥ २ ॥
चंदनाच्या दृतीं वेधले तरूवर । सबाह्य अभ्यंतर काय जालें ॥ ३ ॥
सरिता सिंधुमाजी मिळोनि लपाली । सागरची जाली एकसरें ॥ ४ ॥
लवण जळाचें प्रसिद्धचि असे । ऐक्यभावें वसे न दिसे कांहीं ॥ ५ ॥
[1]नामा म्हणे शरण आलों केशिराजा । ऐसा भावो माझा करी वेगीं ॥ ६ ॥

[ १५८४ ]

तत्त्व पुसावया गेलों वेदज्ञासी । तंव भरले त्यापासीं विधिनिषेध ॥ १ ॥
तया समाधान नुपजे कदा काळीं । अहंकार बळि जाला तेथें ॥ २ ॥
म्हणोनि तुझें नाम धरिलें शुद्धभावें । उचित करावें पांडुरंगा ॥ ३ ॥
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी । तंव भरले तयापाशीं भेदाभेद ॥ ४ ॥
एकएकाचिया न मिळती मतासी । भ्रांत गर्वराशि भुलले सदा ॥ ५ ॥
पुराणिकासी पुसूं स्वरूपाची स्थिति । तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें ॥ ६ ॥
विषयीं ठेवुनि मन सांगति ब्रह्मज्ञान । तेणें समाधान नुपजे कदा ॥ ७ ॥
हरिदासासी पुसूं भक्तीचा उपाव । तंव तयापाशीं भाव नाहीं कोठें ॥ ८ ॥
वाचेनें सांगती नामाचा बडिवार । विषयीं पडीभर सदाकाळीं ॥ ९ ॥
ऐसें विचारितां बहुत भागलों । म्हणोनि शरण आलों पांडुरंगा ॥ १० ॥
[2]भयभीत जालों संसार येरझारीं । शिणलों असें भारी तारीं मज ॥ ११ ॥
नामा म्हणे आतां हिंडतां कष्टलों । म्हणोनि शरण आलों पांडुरंगा ॥ १२ ॥

[ १५८५ ]

संसारी गांजलों म्हणोनि शरण आलों । पाठीसि रिघालों देवराया ॥ १ ॥
कळिकाळा वास पाहूं तूं न देसी । भरंवसा मानसीं आहे मज ॥ २ ॥
नामा म्हणे देवा स्वामिया तूं एक । आवडता सेवक करीं मज ॥ ३ ॥

---

अभंग १५८३ ते १५८५—(पं.) व (शि.)

१ नारा (आ.) २ (आ.) प्रतींत हा अभंग ११ चरणांचा आहे व शेवटचें कडवें—
भयभीत जालों संसार करितां । नामा म्हणे आतां तारी मज ॥
असे आढळते.



अनुक्रमणिका

[१५८६]

लाज सांडोनियां जालों शरणागत । ऐसियाचा अंत पाहसी झणीं ॥ १ ॥
गुण दोष माझे मनीं गा न धरीं । पतितपावन जरी म्हणविसी ॥ २ ॥
[1]पडावें परदेसीं हे लाज कोणासी । जरी तूं न पावसी पांडुरंगा ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा चतुरां शिरोमणी । विचारीं अंतःकरणीं मायबापा ॥ ४ ॥

[१५८७]

शरणागतासी नको मोकलावा । हें तरी केशवा जाणतोसी ॥ १ ॥
सांगणें नलगे सांगणें नलगे । सांगणें नलगे मायबाप ॥ २ ॥
सांगतां समर्थ सवेंचि विसरे । त्याच्या अभ्यंतरीं नव्हे बोल ॥ ३ ॥
नामा म्हणे तैसा न होसी शहाणा । अठराहि पुराणें वेडावलीं ॥ ४ ॥

[१५८८]

काय अपराध पाहसी कोणाचे । धांवे भाविकांचे कामकाजीं ॥ १ ॥
काय केशिराजा वाणूं मी दुबळें । शरणागता लळे पुरविशी ॥ २ ॥
पतितपावन ब्रीद चराचरीं । तेथें मी भिकारी कोणीकडे ॥ ३ ॥
नामा म्हणे तूंचि करिशी उद्धार । मज भाग्या पार नाहीं देवा ॥ ४ ॥

[१५८९]

जन्ममरणाचें भय मज दाविसी । तें म्यां हृषिकेशी अंगिकारलें ॥ १ ॥
आतां माझी चिंता तुज कां पंढरिनाथा । असो दे भलभलता भलतें ठायीं ॥ २ ॥
सुखदुःख भोगणें माझें मीच जाणें । तुज तंव भोगणें नलगे कांहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे माझे हेचि मनोरथ । होईन शरणागत जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

[१५९०]

आम्हीं शरणागतीं केलासी सरता । येऱ्हवीं अनंता कोण जाणे ॥ १ ॥
वेदशास्त्र पुराणीं उबगोनि सांडिलासी । तो तूं आम्हीं धरिलासे हृदयकमळीं ॥ २ ॥

---

अभंग १५८६--(पं.), (शि.) व (आ.), १५८७--(पं.) व (शि.), १५८८--(आ.) १५८९ (पं.), (शि.) व (धु.), १५९०--(पं.) व (धु.)

१ पडलिया पाथरा लाथ देसी देवा । हे लाज केशवा कोणास जी ॥ (आ.)

अनुक्रमणिका

चतुरा शिरोमणी अहो केशिराजा । अंगीकार तुझा केला आम्हीं ॥ ३ ॥
सहस्र नामें जरी जालासि संपन्न । तरी हेंहि भूषण आमुचेंचि ॥ ४ ॥
येऱ्हवीं त्या नामाची कवण जाणे सीमा । पाहें मेघश्यामा विचारोनि ॥ ५ ॥
होतासि क्षीरसागरीं अनाथाचे परी । लक्ष्मी तेथें करी चरणसेवा ॥ ६ ॥
तेहि तंव जाण आमुची जननी । तूं तियेवांचोनि शोभसी कैसा ॥ ७ ॥
तुज नाहीं नाम रूप जाति कूळ । अनादीचें मूळ म्हणती तुज ॥ ८ ॥
आम्ही भक्त तरी तूं भक्तवत्सल । ऐसा प्रगट बोल जगामाजीं ॥ ९ ॥
ऐसि आमुचेनि भोगिसी थोरीव । अमुचा जीवभाव तुझे पायीं ॥ १० ॥
नामा म्हणे केशवा जरि होसी जाणता । या बोला उचिता प्रेम देई ॥ ११ ॥

[ १५९१ ]

[1]आम्हीं शरणागतीं सांडिली वासना । ते त्वां नारायणा अंगिकारिली ॥ १ ॥
म्हणोनि प्रसन्न व्हावया आमुतें । वोसरल्या चित्तें चालविसी ॥ २ ॥
अज्ञान बाळकु ठकविला धुरू । तैसा मी अधिरू नव्हे जाण ॥ ३ ॥
लंकापति केला तुवां बिभीषण । झालासी उत्तीर्ण वाचाऋणें ॥ ४ ॥
उपमन्यें घेतला दुधाचाचि छंद । तैसा बुद्धिभेद नव्हे जाण ॥ ५ ॥
नामा म्हणे तैसा नव्हे मी अज्ञान । माग तुज देईन शरीर अवघें ॥ ६ ॥

[ १५९२ ]

आम्ही शरणागत परि [2]सर्वस्वें उदार । भक्तीचे सागर सत्वशील ॥ १ ॥
काया वाचा मनें अर्थ संपत्ति धन । दिधलें तुजलागुन पांडुरंगा ॥ २ ॥
आम्हां ऐसें चित्त तुम्हां कैचें देवा । हा बडिवार केशवा न बोलावा ॥ ३ ॥
सत्वाचा सुभट बळि चक्रवर्ति । पहा केवढी ख्याति केली तेणें ॥ ४ ॥

---

अभंग १५९१—(पं.), (शि.) व (धु.), १५९२—(पं.) व (शि.)

१ हा अभंग काही ठिकाणी असाही सापडतो—
आम्ही विष्णुदासीं सांडीली वासना । तुम्ही नारायणा कळों आलें ॥ १ ॥
अज्ञान बाळक ठकविलें धुरू । तैसा मी अधिरू नोहे देवा ॥ २ ॥
शरण आला तुज मूर्ख बिभीषण । लंकाराज्य तेणें मागितलें ॥ ३ ॥
उपमन्य बाळका दुधाचा पैं छंद । तैसा मतिमंद नोहे देवा ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझे न लगे आम्हां काहीं । वास सदा देई चरणाजवळी ॥ ५ ॥ (पं.)

२ सखे (पं. व शि.)

त्रिभुवनीचें वैभव जोडिलें ज्या लागुनि । तें शरीर तुझ्या चरणीं समर्पियेलें ॥ ५ ॥
रावणा ऐसा बंधु सांडूनि सधर । ओळंगति परिवार ब्रह्मादिकां ॥ ६ ॥
तें सांडोनि एकसरा आलासे धांवत । जाला शरणागत बिभीषण ॥ ७ ॥
हिरण्यकश्यपें तुझ्या वैर संबंधें । पाहे त्या प्रल्हादा गांजियेलें ॥ ८ ॥
अजगर कुंजर करितां [1]विषपान । परि तुझें स्मरण न संडीच ॥ ९ ॥
पति पुत्र स्नेह सांडोनि गोपिका । रासक्रीडे देखा भाळलिया ॥ १० ॥
एकीं तुझें ध्यान करितां त्यजिले प्राण । सांग ऐसें निर्वाण कवणें केलें ॥ ११ ॥
ऐसे मागें पुढें जाले असंख्यात । भक्तभागवत सखे माझे ॥ १२ ॥
त्यांचिनि सरता झालासी त्रिभुवनीं । विचारी आपुल्या मनीं पांडुरंगे ॥ १३ ॥
केलें उच्चारणें बोलतां लाजिरवाणें । हांसती पिसुणें संसारींची ॥ १४ ॥
नामा म्हणे केशवा अहो शिरोमणी । निकुरा जाल झणीं मायबापा ॥ १५ ॥

[१५९३]

कागदीचें वित्त वेश्येसी दिधलें । तैसें आम्हां केलें नारायणें ॥ १ ॥
जोडोनियां हस्त केलें मढचापाशीं । तैसें तूं मजशीं केलें देवा ॥ २ ॥
कडू भोपळ्याचा कोणता उपयोग । तैसें पांडुरंगें केलें जाण ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें करूं नको देवा । समागम व्हावा पायांसवें ॥ ४ ॥

[१५९४]

दास जाल्यावरी करिसी उदास । मनीं तें तुम्हांस आणी देवा ॥ १ ॥
सोशिले प्रवास जन्मजन्मांतर । करिसी अव्हेर आम्हांलागीं ॥ २ ॥
भार खांद्यावरी घेऊनी हिंडवी । होसी मजविशि पाठमोरा ॥ ३ ॥
श्रांत सावकाश गाती इतिहास । काय कासाविस होय तुम्हां ॥ ४ ॥
नामा म्हणे नको वाउगे उदीम । न सोडीं मी नाम केल्या कांहीं ॥ ५ ॥

[१५९५]

तुझा माझा देवा कां रे वैराकार । दुःखाचे डोंगर दाखविशी ॥ १ ॥
वळें बांधोनियां देसी काळा हातीं । ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या ॥ २ ॥

अभंग १५९३ ते १५९५—(आ.)
१ अग्निपान (पं. व शि.)

अनुक्रमणिका

आम्हीं देवा तुझी केली होती आशा । बरवें हृषिकेशा कळों आलें ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा करा माझी कींव । नाहीं तरी जीव घ्यावा माझा ॥ ४ ॥

[१५९६]

सकळ वैभव निजकर्म भोग । ते तुज उद्वेग दावी काई ॥ १ ॥
मीतूंपण असे तेथें मग कैचें । निर्माण ठायिचें तोडीं वेल ॥ २ ॥
आपुला करूनि ठेवीं तुझें पायीं । थोरपण कांहीं नको मज ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें [1]सोलीन [2]ढोंपर । कासया विचार देखों आतां ॥ ४ ॥

[१५९७]

कपटनाटका कल्लोळ करुणा । मजलागीं दीन होसी देवा ॥ १ ॥
रात्रंदिवस मज ठेवुनि जवळ । घालसी कवळ मुखामाजीं ॥ २ ॥
पेंद्या सुदाम्याचे करिसी कैवांर । मजसी अंतर केलें आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हीं करितों बोभाट । देऊं नको भेट पांडुरंगा ॥ ४ ॥

[१५९८]

त्वां चाळविलें अनंत सेवका । तोचि चाळा मज दाविसी निका ॥ १ ॥
आदि अंतीं तुझ्या जाणितल्या खुणा । आतां काय करिसी पंढरीच्या राण्या ॥ २ ॥
भलारे भला मज जालासि शहाणा । भेष पळविलें शास्त्रपुराणा ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा मज मारून दवडी । पुढती न धरावि सोय माझी पुढती फुडी ॥ ४ ॥

[१५९९]

कटीं कर उभा ऐसा । पहा कैसा घरघेणा ॥ १ ॥
[3]माझा हिशेब करी हिशेब करी । हिशेब करी केशवा ॥ २ ॥

---

अभंग १५९६—(गों.), (पं.) व (शि.), १५९७ व १५९८—(पं.) व (शि.), १५९९—(आ.), (पं.) व (शि.)

१ कदाचित हा शब्द 'सोडी न' असा असावा. परंतु कुठल्याही हस्तलिखितात मिळाला नाही.

२ पाय हे साचार (गों.)

३ माझा हिशेब करी रे केशवा । चौऱ्यांशीं लक्ष जन्म केली तुझी सेवा ।
माझें ठेवणें देईं गा देवा । नाहीं तर धरी न मी तुझ्या सेवा ॥ (आ.)

अनुक्रमणिका

चौऱ्याशीं लक्ष जन्म केली तुझी सेवा । माझें ठेवणें देईं गा देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे मज खवळिसी वायां । पिसाळलों तरी झोंबेन तुझ्या पायां ॥ ४ ॥

[१६००]

[1]साचपणें ब्रीद सोडविन तुझ्या । आतां केशिराजा पण हाचि ॥ १ ॥
लबाड तूं देवा लबाड तूं देवा । लबाड तूं देवा ठावा आम्हां ॥ २ ॥
काय मूर्खपणें सांगशिल गोष्टी । थोरपणें मोठीं पुरे आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे काय खवळिसि आम्हां । लाज नाहीं [2]तुम्हां कवणेविसीं ॥ ४ ॥

[१६०१]

काय थोरपणा मिरविसी व्यर्थ । खोटेपणा स्वार्थ कळों आलें ॥ १ ॥
हिता अनहिता केले आपस्वार्थ । वचन यथार्थ बोल आतां ॥ २ ॥
होसी कालिमाजीं कलिसारिखाची । भोळ्या भाविकाच्या भक्तिकाजा ॥ ३ ॥
नामा म्हणे माळ घातिली स्वहस्तें । करितोसि दंडवत निमित्यासी ॥ ४ ॥

[१६०२]

काय केलें मागें कोणाचें तूं बरें । शेवटीं वान्नरें संग करी तें ॥ १ ॥
संगें करूनियां हिंडे रानोरान । दशरथा खूण चुकविसी ॥ २ ॥
काय काय तरी सांगों तुज गुण । भिल्लिणीची आण सत्य मनीं ॥ ३ ॥
सत्य मानी वाळी वशिष्ठासहित । नामा म्हणे मात ही पुरातन ॥ ४ ॥

[१६०३]

काय तुज देवा आलें थोरपण । दाविसी कृपण उणें पुरें ॥ १ ॥
पुरे आतां सांगों नको बा श्रीहरी । गोकुळाभीतरीं खेळ मांडी ॥ २ ॥
हलाहल शांत करी तत्क्षण । अमृतजीवन नाम तुझें ॥ ३ ॥
तुझें नाम सर्व सदा गोपाळासी । नामा म्हणे यासी काय जालें ॥ ४ ॥

अभंग १६००—(पं.) व (शि.), १६०१ ते १६०३—(आ.)
१ साचपण (पं.) २ आम्हां (पं.)

अनुक्रमणिका

[ १६०४ ]

निर्गुणपणाच्या घेसी अभिमाना । तुज नारायणा [1]शोधीं नामीं ॥ १ ॥
काय तुझी भीड धरावी म्यां आतां । कृपाळु अनंता म्हणें ना मी ॥ २ ॥
पुंडलिकासाठीं उभा राहिलासी । ठकडा तूं होसी म्हणे ना मी ॥ ३ ॥
नामा म्हणे नको मज चाळवण । लवकरी चरण दावींना का ॥ ४ ॥

[ १६०५ ]

कल्पतरुतळीं बैसलिया । कल्पिलें फळ न पविजे ॥ १ ॥
कामधेनु जरी दुभती । तरी उपवासीं कां मरावें ॥ २ ॥
उगे असा उगे असा । होणार तें होय जाणार तें जाय ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा काय तुझी भीड । संता महंतां देखतां सांगेन तुझी खोड ॥ ४ ॥

[ १६०६ ]

मुळींच मी जाणें तुझा ठेंगेपणा । काय नारायणा बोलसील ॥ १ ॥
पुरे पुरे आतां तुमचे आचार । मजशीं वेव्हार घालूं नको ॥ २ ॥
लालुचाईसाठीं मागे भाजीपाना । लाज नारायणा तुज नाहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे काय सांगों तुझी कीर्ती । वाउगी फजिती करूं तुज ॥ ४ ॥

[ १६०७ ]

तुझा दास मी तों राहिलों होवोनि । बोल चक्रपाणि पुरे आतां ॥ १ ॥
जावो प्राण आतां न सोडीन संग । नव्हति वाउगे बोल माझे ॥ २ ॥
श्रुति स्मृति वेद काव्यें ही पुराणें । तीं तुज भूषणें सुखें मानूं ॥ ३ ॥
काय हानि जाली सांगा मजपाशीं । उद्धारा जगासी नामा म्हणे ॥ ४ ॥

[ १६०८ ]

पंढरीनिवासा सख्या पांडुरंगा । करी अंगसंगा भक्ताचिया ॥ १ ॥
भक्त कैवारिया होसी नारायणा । बोलतां वचना काय लाज ॥ २ ॥

अभंग १६०४—(पं.) व (शि.), १६०५—(आ.), १६०६—(पं.) व (शि.), १६०७ व १६०८—(आ.)

१ सोडी ना मी (आ.)

अनुक्रमणिका

मागें बहुतांचें फेडियेलें ऋण । आम्हांसाठीं कोण आली धाड ॥ ३ ॥
वारंवार तुज लाज नाहीं देवा । बोल रे केशवा म्हणे नामा ॥ ४ ॥

[१६०९]

देवा तूं प्रथम कर्म भोगिसी । सागरीं जळचरूं मछ जालासी ।
कमठे पाठीं न संडी कैसी । कर्में कासाविसी केलें तुज ॥ १ ॥
अपवित्र नाम आधीं वराह । याहुनि थोर कूर्म कांसव ।
अर्ध सावज अर्ध मानव । हे भवभाव कर्मांचे ॥ २ ॥
खुजेपणीं बळीसी पाताळीं घातलें । तेणें कर्में तयाचें द्वार रक्षिलें ।
पितयाचें वचनीं मातेसी वधिलें । तें कर्म जडलें परशुरामा ॥ ३ ॥
श्रीरामा जाल्या आपदा बहुता । कर्में भोगविलें अंतरली सीता ।
भालुका तीर्थीं वधियेलें अवचिता । नाम अच्युता तुज जाहलें ॥ ४ ॥
ऐसा कष्टी होउनि [1]बोध्य राहिलासी । तूं कलंकी या लोका भारिसी ।
आपल्या दोषासाठीं आणिका दंडिसी । निष्कलंक होसी नारायणा ॥ ५ ॥
ऐसा तूं बहुतां दोषीं बांधलासी । पुढीलाचीं जन्में अवगतोसी ।
विष्णुदास नामा म्हणे हृषिकेशी । तुझी भीड कायसी स्वामियाहो ॥ ६ ॥

[१६१०]

मरणें पेरणें जन्म उगवणें । मायेची ते खूण सांगितली ॥ १ ॥
संग तुझा पुरे संग तुझा पुरे । संग तुझा पुरे नारायणा ॥ २ ॥
तूं तरी न मरे मी तरी न पुरे । [2]भक्ति हे संचरे हाचि लाभु ॥ ३ ॥
नामा म्हणे माझ्या ठायिचा मी नेणें । [3]संसार भोगणें तुझी लाज ॥ ४ ॥

[१६११]

तुज विकोनी घातली वोर । मज समोर बोलतोसी ॥ १ ॥
उच्छिष्ठ शिदोरी घेऊनिया करीं । भक्तांचा भिकारी तूंचि एक ॥ २ ॥
चोर आणि शिदळु चाळविलें गोविळें । अनंत मर्दिले दुष्टकाळ ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा सांगेन वर्म । ऐकतां न राहे संतांचें कर्म ॥ ४ ॥

---

अभंग १६०९—(पं.), (शि.) व (आ.), १६१०—(पं.), (शि.) व (न.), १६११—(पं.) व (शि.)

१ बौद्ध (आ.) २ शिणलों हो भारी बहु येरझारें ॥ (न.) ३ गर्भवास (शि.)

[ १६१२ ]

उदार कृपाळ सांगशील जना । तरी कां रावणा मारियेलें ॥ १ ॥
नित्यानित्य पूजा सिरकमळीं करी । तेणें तुझें हरी काय केलें ॥ २ ॥
किती बडिवार सांगसील वायां । ठावा पंढरिराया आहेसी आम्हां ॥ ३ ॥
कर्णा ऐसा वीर झुंझार उदार । त्यासी त्वां जर्जर केलें बाणीं ॥ ४ ॥
पाडिलें भूमीसी न येचि करुणा । त्याचे नारायणा पाडिले दांत ॥ ५ ॥
श्रियाळ बापुडें सात्विक [1]निर्वाणीं । खादलें कापोनी याचें पोर ॥ ६ ॥
ऐसा कठिण कोण होईल दुसरा । कांडियेलें शिरा उखळामाजीं ॥ ७ ॥
शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग । कापिलें त्याचें अंग ठायीं ठायीं ॥ ८ ॥
जाचोनियां प्राण घेतला तयाचा । काय सांगसी वाचा बडिवार ॥ ९ ॥
हरिश्चंद्राचें राज्य घेऊनियां सर्व । विकले त्याचे जीव डोंबाघरीं ॥ १० ॥
बहुतचि श्रम दिधले तयासि । परी तो सत्वासि ढळेचिना ॥ ११ ॥
पाडिला विघड नळादमयंतीं । ऐसी कृपामूर्ति बुद्धि तुझी ॥ १२ ॥
आणिक तुझी [2]कीर्ति सांगावी ती किती । केली ते फजिती माउशीची ॥ १
मारियेला मामा सखा पुरुषोत्तमा । नामा म्हणे सीमा फार केली ॥ १४ ॥

[ १६१३ ]

उदारांचा राणा म्हणविसी आपणां । सांग त्वां कवणां काय दिल्हें ॥ १ ॥
उचिता उचित भजसी पंढरीनाथा । न बोलों सर्वथा वर्मं तुझीं ॥ २ ॥
वर्में तुझीं कांहीं बोलेन मी आतां । क्षमा पंढरीनाथा करी बापा ॥ ३ ॥
न घेतां न देसी आपुलेंहि कोणा । प्रौढी नारायणा न बोलावी ॥ ४ ॥
बाळमित्र सुदामा विपत्तीं पिडला । तो भेटावया आला तुजलागीं ॥ ५ ॥
त्याचें मुष्टिपोहेसाठीं मन केलें आसट । मग दिलें उत्कृष्ट भाग्य तया ॥ ६ ॥
छळावया पांडव दुर्वास पातला । द्रौपदीनें केला धांवा तुझा ॥ ७ ॥
गेली वृंदावना केली प्रदक्षणा । आळविला कान्हा द्वारकेचा ॥ ८ ॥
आळवी पांचाळी येर बा वनमाळी । राख ये काळीं सत्व माझें ॥ ९ ॥

अभंग १६१२—(पं.), (शि.) व (तं.), १६१३—(पं.), (शि.), (धु.) व (गं.)
१ वाणी (तं.) २ बुद्धि (तं.)

येवढिया आकांतीं घेऊनि भाजीपान । मग दिलें अन्न ऋषिलागीं ॥ १० ॥
बिभीषणा दिधली सुवर्णाची नगरी । हे कीर्ति तुझी हरि वाखाणिती ॥ ११ ॥
वैरियाचें घर भेदें त्वां घेतलें । त्याचें त्यासी दिधलें नवल काय ॥ १२ ॥
ध्रुवा आणि प्रल्हाद अंबऋषि नारद । हरिश्चंद्र रुक्मांगद आदि करुनी ॥ १३ ॥
त्याचें सेवाऋण घेऊनि अपार । मग त्या देशी वर अनिर्वाच्या ॥ १४ ॥
एकाचि शरीरसंपत्ति आणि वित्त । एकाचें तें चित्त हिरोनि घेसी ॥ १५ ॥
मग तया देशी आपुलें तूं पद । जगदानी हें ब्रीद मिरविसी ॥ १६ ॥
माझें सर्वस्व घेई तुझें नको कांहीं । मनोरथाची नाहीं चाड मज ॥ १७ ॥
नामा म्हणे केशवा जन्मजन्मांतरीं । ऋणी करिन हरी ऋणें सेवा ॥ १८ ॥

[१६१४]

निर्गुण नामाची अनंत कल्पना । धरूनि नारायणा व्यक्ति येसी ॥ १ ॥
लाज लावियेली त्या निर्गुणपणा । श्रुतींच्या वचना वाखाणितां ॥ २ ॥
तैसें न हो आम्ही करणीचे विलगट । नामाचे निकट दास तुझे ॥ ३ ॥
चतुरा शिरोमणी नंदाचा खिल्लारी । हें अघटित मुरारी नाम जरी ॥ ४ ॥
तुमचे तुम्हां देवा सांगतां तें निकें । समर्थांसी रंकें बोलिजे केवीं ॥ ५ ॥
देवा मुगुटमणी हें बोलती पुराणें । आणि बळिचें राखणें द्वार काय ॥ ६ ॥
अर्जुना सारथी रथा वागविसी । उच्छिष्टें काढिसी धर्माघरीं ॥ ७ ॥
विश्वंभर नाम तुझें कमळापति । जगीं श्रुति स्मृति वाखाणिती ॥ ८ ॥
गौळियांचे घरीं दहीं लोणी चोरूनी । खातां चक्रपाणि लाजसीना ॥ ९ ॥
आतां दीनानाथ ब्रीद तुझें साचें । तरी भूषण आमुचें जतन करी ॥ १० ॥
येर ठेवा ठेवी कायसी आम्हां आतां । विनवितो नामा केशिराजा ॥ ११ ॥

[१६१५]

अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । भक्तांचा कृपाळ पांडुरंग ॥ १ ॥
ये गा तूं विठ्ठला माझिया माहेरा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ २ ॥
वर्णिती पुराणें न करीं लाजिरवाणें । बोलती वचनें सनकादिक ॥ ३ ॥
कृपेचा सागरू कैवल्यउदारू । रखुमाईचा वरू पांडुरंग ॥ ४ ॥

अभंग १६१४—(पं.) व (शि.), १६१५—(आ.)

अनुक्रमणिका

पुंडलिकाचे भेटी अससी वाळवंटीं । हात ठेवुनि कटीं विटेवरी ॥ ५ ॥
भक्तिलागीं कैसा उभा असे तिष्ठत । असे वाट पहात भीमातीरीं ॥ ६ ॥
येऊनी जन्मासी पाहावी पंढरी । तेणें भवसागरीं तरसील ॥ ७ ॥
नामा म्हणे मज हरीचा विश्वास । जालों असे दास जन्मोजन्मीं ॥ ८ ॥

[१६१६]

काया कर पैं फुटों नेदी । टाळ दिंडी वाहिन खांदीं ॥ १ ॥
तूं बा माझा तूं बा माझा । तूं बा माझा केशिराजा ॥ २ ॥
आळवणीचा तूं बा वाचे । तेणें छंदें पेंधा नाचे ॥ ३ ॥
तूं बा माझा मी दास तुझा । विनवितो नामा केशिराजा ॥ ४ ॥

[१६१७]

निंदा आणि स्तुति तुझीच करणें । परि [1]आणिकांचे न घेणें गुणदोष ॥ १ ॥
[2]वैर अथवा सख्या तुझियेच । परि न पडो हृदयीं विसर तुझा ॥ २ ॥
दास्य अथवा सत्ता गोपाळांचे परी । असो तुजवरी सर्वलोभ ॥ ३ ॥
जिणें अथवा मरणें तुझियेच द्वारीं । उदास नरहरि करिसी झणें ॥ ४ ॥
नामा म्हणे थोर शिणलों पंढरिनाथा । स्वामीचें नेणतां प्रेमसुख ॥ ५ ॥

[१६१८]

छंदिस्त हें मन माझें पंढरिनाथा । न सोडीं सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥
यासि काय करूं सांगा जी विठ्ठला । स्नेह कां लाविला पूर्वींहूनि ॥ २ ॥
कांसवीचीं पिलीं सोडोनि निराळीं । दृष्टि पान्हाईलि अमृतमय ॥ ३ ॥
तैसा मी जवळुनि असेन पैं दुरी । दृष्टि मजवरी असों द्यावी ॥ ४ ॥
तान्हें वछ घरीं धेनु चरे वनीं । हंबरे क्षणक्षणां परतोनि ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा सलगी करीं निकट । झणें मज वैकुंठ पद देसी ॥ ६ ॥

---

अभंग १६१६—(पं.) व (शि.), १६१७—(पं.), (शि.) व (आ.), १६१८—(पं.) व (शि.)

१ आणिकांचे कां घेणें गुणदोष। (पं.)
२ आतां माझें चित्त असो तुझे चरणी। अगा चक्रपाणि पांडुरंगा। (आ.)

[१६१९]

अनाथासी साह्य होसी नारायणा । करुणावचना बोलविसी ॥ १ ॥
पांडुरंगा कृपा करीं मजवरी । पामर उद्धरीं पाहतांची ॥ २ ॥
गणिकें सत्वर मोक्षपद देसी । उपमन्यु बाळासी क्षीरसिंधु ॥ ३ ॥
नामा म्हणे याति विचारसी । कण्या घरीं खासी विदुराच्या ॥ ४ ॥

[१६२०]

अनाथाचा नाथ भक्तांचा कैवारी । पुराणीं हे थोरी ऐकियली ॥ १ ॥
ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारी दुःखासी केशिराजा ॥ २ ॥
त्रितापें तापलों दुःखें आहाळलों । कासाविस जालों दयासिंधू ॥ ३ ॥
तुजवीण आतां कोणातें मी सांगू । तोडी हा उद्वेगु नारायणा ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरीं त्वरित पांडुरंगा ॥ ५ ॥

[१६२१]

कृपा करोनि त्वां मज प्रसन्न व्हावें । आणि म्यां मागावें बुद्धिज्ञान ॥ १ ॥
ऐसी भुली मज न घालीं पांडुरंगा । विघड संत्संगा न करीं मज ॥ २ ॥
मोक्षासी साधन एका ते उपाधी । दाखवुनि बुद्धिभ्रंश केलें ॥ ३ ॥
एका पुत्र कलत्र राज्याचा संभ्रम । दावोनी दुर्गम भ्रम केला ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझ्या प्रेमालागीं भक्ति । घेतली म्यां सुतीं जन्ममरणें ॥ ५ ॥

[१६२२]

अनंता जन्मींचें चुकवीं सांकडें । काय मी बापुडें वानुं कैसें ॥ १ ॥
सगुण गुणाची वोळलिसे मूर्ति । राहो माझे चित्तीं निरंतर ॥ २ ॥
माझा मीच जालों सकळ व्यापारी । संसारा बाहेरी काढी कोण ॥ ३ ॥
नामा म्हणे मज नको गोवूं आशा । पावन परेशा केशिराजा ॥ ४ ॥

[१६२३]

जेथें जेथें मन जाईल गा माझें । तेथें तेथें तुझें रूप असो ॥ १ ॥
ऐसी मज संवई लावीं निरंतर । जन्मजन्मांतरीं केशिराजा ॥ २ ॥

---

अभंग १६१९—(आ.), १६२०—(पं.), (धु.) व (शि.), १६२१—(आ.), १६२२—(शि.), (पं.) व (भा.), १६२३—(धु.)

अनुक्रमणिका

आपणांस काम जरूर कायसा । आतां पंढरीशा आटोपावें ॥ ३ ॥
[1]नामा म्हणे नको पाहों माझी लाज । संसाराचें बीज मूळ खुडी ॥ ४ ॥

[१६२४]

आम्ही काय जाणों तुझा अंतपार । होसी निरंतर निवारिता ॥ १ ॥
बहु अपराधी जाणा यातिहीन । पतितपावन तुम्ही देवा ॥ २ ॥
नामा म्हणे ऐसा पातकी पामर । करिसी उद्धार साच ब्रीदें ॥ ३ ॥

[१६२५]

अग्निमाजि पडे बाळू । माता धांवे कनवाळू ॥ १ ॥
तैसा धांवे माझिया काजा । अंकिला मी दास तुझा ॥ २ ॥
सवेंचि झेपावें पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणीं ॥ ३ ॥
भुकेलें वत्स रावें । धेनु हुंबरत धांवे ॥ ४ ॥
वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतित हरिणी ॥ ५ ॥
नामा म्हणे मेघा जैसा । विनवितो चातक तैसा ॥ ६ ॥

[१६२६]

धेनु विये वनीं तीसि कैंचि सुयणी । तरीं ते वत्स स्तनीं लावी कवण ॥ १ ॥
भुजंगाचीं पिलीं उपजतांचि वेगळीं । त्यांसी डंखू शिकविलें हो कोणी ॥ २ ॥
सहज लक्षण जयाचिये ठायीं । तो आपुलिये सोई धांवतसे ॥ ३ ॥
उपजतांचि फूल मोगऱ्यांच्या माथां । त्यासी परिमळता कोणें लावियेली ॥ ४ ॥
कडू दुध्याच्या आळ्यासी साखर दूध घातलें । ते अधिकचि कडुवाळें कवणें केलें ॥ ५ ॥
गाळिला तोडिला खंड विखंडी । ऊंस न संडी सोय गोडीसी ॥ ६ ॥
नामा म्हणे तैसें आहे गा श्रीहरी । साईचे व्यापारीं घेईन तूतें ॥ ७ ॥

[१६२७]

माता पिता बंधु कुळगुरु दैवत । सखा सर्व गोत केशिराजा ॥ १ ॥
जन्मोनि पोसणा तुझा मी अंकिला । आणिकांचा पांगिला न करी देवा ॥ २ ॥
विष्णुदास नामा विनवितो केशवा । झणीं घालिसी देवा संसारासी ॥ ३ ॥

---

अभंग १६२४—(पं.) व (शि.), १६२५ ते १६२७—(आ.)

१ (धु.) प्रतीत शेवट असा आढळतो—

कृपणांचें ठेवण असे भूमिगत । जेथ जाय तेथ ध्यान मनीं ।
नामा सर्वांपरी मी अज्ञान । विनवीं आस करून पंढरिराया ॥ (धु.)

[ १६२८ ]

दाविसी अनंता स्वरूपें अनेक । वाउगाचि शोक वाढविसी ॥ १ ॥
आपुल्या मानसीं विचारूनि पाहे । सावधान होये तुझे पाईं ॥ २ ॥
नामा म्हणे नाम निर्वाणीचें बीज । मजसाठीं गुज दावियेलें ॥ ३ ॥

[ १६२९ ]

काय आम्हापाशीं आहे धन वित्त । दान तें उचित देऊं काय ॥ १ ॥
देतां घेतां आम्हां पुरे पुरे जालें । संगतीं त्यागिलें भिवोनियां ॥ २ ॥
काय वाणूं गुण भिकारपणाची । होसी पंढरीची नामनौका ॥ ३ ॥
नामा म्हणे पुढें दाखवी मारग । आम्ही तुज मागें येऊं सुखें ॥ ४ ॥

[ १६३० ]

देव दगडाचा भक्त हा मावेचा । संदेह दोघांचा फिटे कैसा ॥ १ ॥
ऐसे देव तेहि फोडिले तुरकीं । घातले उदकीं बोभातीना ॥ २ ॥
ऐसिया देवासी वाहिले टिळे डोळे । भक्त बाळे भाळे नागविले ॥ ३ ॥
ऐसींहि दैवतें नको दावूं देवा । नामा म्हणे केशवा विनवितसे ॥ ४ ॥

[ १६३१ ]

माझे गुणदोष जरि [1]विचारिसी । [2]सर्व नारायणा अपराधी ॥ १ ॥
सेवाहीन दीन पातकाची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥ २ ॥
अंगुष्ठ धरूनि मस्तकापर्यंत । अखंड दुष्कृत आचरलों ॥ ३ ॥
[3]स्वप्नामाजी तुझी घडली नाहीं भक्ति । पुससी विरक्ति कोठोनियां ॥ ४ ॥
तूंचि माझा गुरु तूंचि माझा स्वामी । सकळ अंतर्यामीं [4]वससी तूं ॥ ५ ॥
नामा म्हणे माझें चुकवी जन्ममरण । न करीं मी सीण पांडुरंगा ॥ ६ ॥

[ १६३२ ]

काय करूं आतां देवा विश्वंभरा । मजलागीं थारा नाहीं कोठें ॥ १ ॥
उबगति सोयरीं धायरीं समस्त । काय करूं अंत पाहसी माझा ॥ २ ॥

---

अभंग १६२८—(पं.) व (शि.), १६२९—(आ.), १६३०—(पं.) व (शि.), १६३१—(पं.), (शि.) व (धु.), १६३२—(आ.)

१ आणशिल (पं.) २ केवळ पापरासी आहे देवा ॥ (पं.) ३ स्वल्प मज (पं.) ४ निवारी तूं (पं.)

अनुक्रमणिका

तूंचि मातापिता गुरुबंधू होसी । जाऊं मी कोणासी शरण आतां ॥ ३ ॥
पायीं थारा मागे नाम्याची विनंति । चित्त द्या श्रीपति आतां वेगें ॥ ४ ॥

[ १६३३ ]

आसनीं शयनीं भोजनीं गमनीं । तुझे पाय दोन्ही दावी मज ॥ १ ॥
संसार कल्मष समूळ छेदिसी । दावीं अहर्निशीं पाय मज ॥ २ ॥
हरी ध्यानीं मनीं भक्तां तूं परेशा । अनाथ कोंवसा गोंवळियां ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम ऐकों सर्वोत्तमा । संसारींच्या श्रमा वारीं देवा ॥ ४ ॥

[ १६३४ ]

नव्हे माझें कांहीं नेणें तुजविण । दुजे वोझें घेऊनि जड बहु ॥ १ ॥
[१]रंग नांनासूत्रि अनेक पुतळे । तैसा तुझा खेळ नकळे कोण्हा ॥ २ ॥
[२]नामा म्हणे तुझी नकळे करणी । [३]जन्मोजन्मीं चरणीं ठेवीं मज ॥ ३ ॥

[ १६३५ ]

हस्तीच्या चरणावरी बैसे माशी । नमन तयासी करावया ॥ १ ॥
तैसें कायसें मी केवढें बापुडें । लागे कोणीकडे देवराया ॥ २ ॥
नामा म्हणे तैसें मी एक दुबळें । चरणावेगळें करूं नको ॥ ३ ॥

[ १६३६ ]

कृपणाचें धन असे भूमि आंत । तेथें जाय चित्त जेथें धन ॥ १ ॥
ऐसी मज देवा लावावी हे सवे । हेंचि मज द्यावें पांडुरंगा ॥ २ ॥
जेथें जेथें मन जाईल हें माझें । तेथें तेथें तुझें रूप भासे ॥ ३ ॥
नामा म्हणे मी सर्वांपरी अज्ञान । विनवी आस करून पांडुरंगा ॥ ४ ॥

अभंग १६३३—(पं.) व (शि.), १६३४—(आ.), १६३५ व १६३६—(पं.) व (शि.)
१ खांब सूत्रीं दावा अनेक पुतळे । न कळोनि खेळे खेळ करा ॥ (आ.)
२ दैत्य वृत्रासुर आपटी आकाशी । आनंदें खिळखिसी सुरवरा ॥ हा चरण (आ.) प्रतीत अधिक आहे.
३ जन्मोजन्मीं क्षणीं दावीं पाय ॥ (आ.)

[१६३७]

तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । नेलें माझें मन षड्वर्गी ॥ १ ॥
धांव गा विठ्ठला सोडवीं आपुला दास । थोर कासावीस केलों बापा ॥ २ ॥
कर्म कुळाचार क्रोध हा अनिवार । मदें निरंतर भ्रांत केलें ॥ ३ ॥
मछरें तुजसी दुरावलें देवा । लोभें केला गोवा गर्भवासी ॥ ४ ॥
दंभ रसातळीं जातसे घेऊनि । विश्वचक्षु होउनि पाहसी कैसा ॥ ५ ॥
नामा म्हणे मज तुझाचि भरंवसा । अनाथा कुंवसा होसी देवा ॥ ६ ॥

[१६३८]

मनीं जें जें देखें परी दृष्टी नेणें । प्रेमाची ते खूण जाणावया ॥ १ ॥
काय करूं माय बाप गा विठ्ठला । मजसि कां अबोला धरिलासी ॥ २ ॥
मानसीं वसणें [1]प्रत्यक्ष पाहणें । तुझें नाम गाणें तरी साच ॥ ३ ॥
नामा म्हणे किती सांगावें गा तुज । केशवा हें गुज पुरवी माझें ॥ ४ ॥

[१६३९]

पुंडलिक वरद आनंदें अभेद । विठ्ठल विद्गद नाम तुझें ॥ १ ॥
पाव गा वेगीं मजलागीं झडकारी । बुडतों भवसागरीं तारी मज ॥ २ ॥
आकांत अवसरीं स्मरिला गजेंद्र । दीनानाथ ब्रीद साच केलें ॥ ३ ॥
स्मरली संकटीं द्रौपदी वनवासी । धांवुनि आलासी लवलाही ॥ ४ ॥
प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं । संकटापासुनि रक्षियेलें ॥ ५ ॥
नामा म्हणे थोर पिडिलों गर्भवासें । अखंड पाहातसें वाट तुझी ॥ ६ ॥

[१६४०]

माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ १ ॥
वारा जाय भलत्या ठायां । तैसी माझी रागछाया ॥ २ ॥
गातां येईल तेणेंचि गावें । येरीं हरि हरि म्हणावें ॥ ३ ॥
तान मान नेणें देवा । नामा विनवितो केशवा ॥ ४ ॥

अभंग १६३७ व १६३८—(पं.) व (शि.), १६३९—(आ.), १६४०—(धु.)
१ प्रत्यय (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[ १६४१ ]

काया मनें वाचा नेणों भक्तिभाव । करिसी उपाव केशिराजा ॥ १ ॥
थोरपणासाठीं मन घे हव्यासु । मी तो कासाविसु होय देवा ॥ २ ॥
सर्वांभूतांमाजीं समत्वें दिससी । नामा म्हणे ऐसी दावी लीला ॥ ३ ॥

[ १६४२ ]

समर्थपणें रंका कां गांजितसां स्वामी । हें काये स्वधर्मी मिळतसे ॥ १ ॥
आपुली करणी न विचारा मनीं । दुसरियास झणीं बोल ठेवा ॥ २ ॥
निर्गुण निराकार होतेंती शून्यपणें । आम्हांसी असणें तेचि ठायां ॥ ३ ॥
सुखें एकरूप होतों तुझे पोटीं । कासया हे सृष्टी वाढविली ॥ ४ ॥
विकाराचें मूळ दिधलें हें शरीर । तेणें कष्टी थोर जालों आम्ही ॥ ५ ॥
पाप पुण्य दोन्हीं लाविलीं सांगातें । म्हणऊनि सुखातें अंतरलों ॥ ६ ॥
यमलोकीं वास रौरव यातना । तेणें नारायणा धाक थोर ॥ ७ ॥
खातों जेवतों तें न लगेचि अंगीं । जालोंसें उद्वेगीं रात्रंदिवस ॥ ८ ॥
ऐसे देह आम्हां कासया दिधले । काय मागितले आम्हीं तुम्हां ॥ ९ ॥
सृष्टीपूर्वी पाप नव्हतें हरी । कासया श्रीहरी कष्टी केलें ॥ १० ॥
वेदशास्त्रभय आम्हांसी लाविलें । तें तुम्हीं टाकिलें एकीकडे ॥ ११ ॥
वेदशास्त्रवचन चुकल्या अवचिता । गोसावी जी होतां दंडावया ॥ १२ ॥
मागां चुकलेती तें ठेवा एकिकडे । आतां तरी पुंढें सांभाळावें ॥ १३ ॥
एकरूप तुम्ही होतेती निर्गुणीं । तेथें आमुचे कोण्ही बोलों आलों ॥ १४ ॥
निर्गुण सांडुनि व्हावें जी सगुण । ऐसें तुम्हां कोण बोलियेलें ॥ १५ ॥
आपुलिये इच्छे ब्रह्मांडें रचिलीं । काय सांगितलीं जी आम्हीं तुम्हां ॥ १६ ॥
लक्ष्मीचे विलास धरिले नानां वेष । हा काय उपदेश आम्ही केला ॥ १७ ॥
विश्व हें निर्मुनि जालेती गोसावी । हें काय सांगावी आम्ही केली ॥ १८ ॥
जे तुम्हां पाहिजे तें तुम्ही निर्मिलें । आपणासवें केलें कष्टी आम्हां ॥ १९ ॥
कल्पजन्मांतरी युगयुगांतरी । जवळी श्रीहरी होतों आम्हीं ॥ २० ॥
तुम्ही तेथें आम्ही आम्ही तेथें तुम्ही । विचारावें स्वामी पांडुरंगा ॥ २१ ॥

अभंग १६४१ व १६४२—(आ.)



अनुक्रमणिका

तुम्हां आम्हां कांहीं वेगळिक नाहीं । बोलोनियां काई दावूं आतां ॥ २२ ॥
आम्हांसि तुम्ही काय सोसिलें अधिक । ठकितसां लोक तैसें नव्हें ॥ २३ ॥
तुम्हांसी अवतार कोरडियें काष्टीं । तुमच्या नामें कष्टी दैत्यें केलें ॥ २४ ॥
तुम्हांसी मातेनें धाडियेलें वना । आमची विटंबना बहुत जाहली ॥ २५ ॥
वल्कलें वेष्टोनी जालेती तापसी । वेष आम्हां देसी मर्कटाचे ॥ २६ ॥
जवळीच असुनी हरविली कांता । आम्ही शुद्धिकरतां कष्टी जालों ॥ २७ ॥
तियेचे वियोगें शोक करा वनीं । वानरें होऊनि हिंडों आम्हीं ॥ २८ ॥
तुम्ही स्वामीपणें बैसा एके ठायीं । आम्हीं शिळा डोईं वाहिलेल्या ॥ २९ ॥
लंकेपुढें आम्हीं वेचियेलें प्राण । तुम्ही ते दुरून बाण टाका ॥ ३० ॥
अयोध्येचे राज्यीं तुम्हां सिंहासन । आमचे कपाळीं हीन चुकेचि ना ॥ ३१ ॥
वस्त्रें अलंकार तुम्हां हस्ती घोडे । आम्हीं ते उघडे पायीं चालों ॥ ३२ ॥
चाड सरलिया नाहीं आठवण । कांहो लक्षुमण दवडिला ॥ ३३ ॥
लोक म्हणों तरी पाठीं सहोदर । जालेति निष्ठुर देवराया ॥ ३४ ॥
तुम्हां एकलेनि न करावें गमन । सर्व अवघेजण आलों आम्ही ॥ ३५ ॥
कंसाभेणें तुम्ही राखियेल्या गाई । तेथें आम्ही काई नव्हतों देवा ॥ ३६ ॥
भोगा स्वामीपण राखितां गोधनें । ठकोनियां खाणें आमच्या रोटचा ॥ ३७ ॥
सर्पापोटीं आम्हीं घाबरलोसें विखें । तुम्ही आपुले सुखें वेगळेची ॥ ३८ ॥
खेळतां यमुनेडोहीं टाकियेली उडी । आम्ही थडी थडी रुदन करूं ॥ ३९ ॥
गोवर्धन गिरी आमुचिये शिरीं । तुम्ही नानापरि वेणु वाहा ॥ ४० ॥
आम्हां चोरुनी नेलें वर्षभरी । तुम्हीं आपुले घरीं सुखी असा ॥ ४१ ॥
असो आतां चाड नाहीं येणेंवीण । आमुचें निर्वाण पाहूं नका ॥ ४२ ॥
आमुचे दिवस काय वायां गेले । स्वामीया उगले राहा तुम्ही ॥ ४३ ॥
कल्पाचे शेवटीं तुम्हां आम्हां भेटी । तेथें पैं ह्या गोष्टी कळों येती ॥ ४४ ॥
नामा म्हणे आम्ही पाईक फुकाचे । धारक नामाचे दास तुझे ॥ ४५ ॥

[ १६४३ ]

नेणें भक्ति कांहीं करूं कैसी सेवा । हें तों मज देवा समजेना ॥ १ ॥
करूं कैसा जप करूं कैसें ध्यान । नाहीं माझें मन स्थिर देवा ॥ २ ॥

अभंग १६४३—(पं.)

अनुक्रमणिका

कामक्रोध यांची मोठी हे जाचणी । जालों वेडयावाणी समजेना ॥ ३ ॥
नामा म्हणे माझे सांवळे विठाई । येऊनियां राही हृदयामाजीं ॥ ४ ॥

[ १६४४ ]

तुज दिलें आतां यत्न करी याचा । जीवभाव वाचा काया मनें ॥ १ ॥
भागलों दातारा शीण जाला भारी । आतां मज तारी अनाथासी ॥ २ ॥
नेणतां सोसिली तयांची आटणी । नव्हतीं हीं कोणी कांहीं माझीं ॥ ३ ॥
वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट । इंद्रिय सुसाट सर्व पृथ्वी ॥ ४ ॥
येरझार फेरा शिणलों सायासीं । आतां हृषिकेशी अंगिकारीं ॥ ५ ॥
नामा म्हणे मन इंद्रियाचें सोयी । धांव यासी कायी करूं आतां ॥ ६ ॥

[ १६४५ ]

तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें । बहुजन्मीं वियोगें शिणलें होतें ॥ १ ॥
आहाळलें पोळलें तापत्रयीं पीडिलें । तृष्णें विभांडिलें नानापरी ॥ २ ॥
काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । इहीं निरंतर जाजावलें ॥ ३ ॥
बुडतिया अवचटें लाभे पैं सांगडी । ते जीवें न सोडी तैसें जालें ॥ ४ ॥
नामा म्हणे केशवा तूं कृपेचा सागर । झणीं माझा अव्हेर करिसी देवा ॥ ५ ॥

[ १६४६ ]

न विचारितां बळि घातला पाताळीं । सर्वेचि कणव उपजली तये वेळीं ।
द्वार न संडिसि कवणेकाळीं । ऐसी तुझी करणी दातारा ॥ १ ॥
अगा केशवा सुजाणा । गाऱ्हाणें सांगूं कवणा ।
तुझिये नामें तुटे बंधना । देवकीनंदना वासुदेवा ॥ २ ॥
वसुदेव वांदवडी । आपदा करोन एवढी ।
मग त्या कंसा केवीं धाडी । मोक्ष तया दिधला ॥ ३ ॥
सुदामा सांगातें जेवी । धान्य मागे गांवोगांवीं ।
आपदा करोनि बहू ही । मग त्यासी राज्य दिधलें ॥ ४ ॥

अभंग १६४४—(आ.), १६४५—(पं.), (शि.) व (धु.), १६४६—(आ.)

जोहरीं सुदलें पांडवां । सर्वेंची उपजली कणवा ।
अग्निपासोनी केशवा । रक्षियेलें तयांसी ॥ ५ ॥
सभा पिसुनाची दाटली । द्रौपदी वस्त्रें आसुडली ।
एवढी आपदा करविली । मग वस्त्रें पुरविलीं तियेतें ॥ ६ ॥
दैत्यें गांजियला प्रल्हाद । तुझ्या नामाचा घेतला छंद ।
एवढा करुनियां खेद । मग त्या दैत्या वध केला ॥ ७ ॥
बिभीषणा हाणितल्या लाथा । लंका दिली त्या उचिता ।
समर्थे केलें तें बरवें आतां । तूं रघुनाथा ऐकें पैं ॥ ८ ॥
आम्ही लाडके डिंगर । माझें बोलणें उद्धट फार ।
तूं तंव कृपेचा सागर । उतरी पार म्हणे नामा ॥ ९ ॥

[ १६४७ ]

निरंजनीं वनीं पाषाण पैं व्हावें । परी जन्मा न यावें मागत्याच्या ॥ १ ॥
राजाचें लेकरूं पांघरे वाकळ । तेव्हां तें सकळ लाज कोणा ॥ २ ॥
पोसवेना तरी दवडुनि देई देवा । नामा तुज केशवा विनवितसे ॥ ३ ॥

[ १६४८ ]

माझिया मनाचें हिंडणें जे जे ठायीं । तेथें तेथें राही पांडुरंगा ॥ १ ॥
भीमा चंद्रभागा वैकुंठ पंढरी । दावीं दृष्टीभरी निरंतर ॥ २ ॥
पुंडलिकासमोर लक्ष निरंतरीं । तैसाची अंतरीं येऊनि राहे ॥ ३ ॥
कटीं कर विटे समचरण गोमटें । पाहतां [1]अति निकट हेंचि ध्यान ॥ ४ ॥
पुरवीं माझी आस तूं बाप माउली । करीं मज साउली पद्मकरें ॥ ५ ॥
नामा म्हणे झणें करिसी उदास । होती कासावीस प्राण माझे ॥ ६ ॥

[ १६४९ ]

आसनीं शयनीं आठवीं अनुदिनीं । नित्य समाधानीं रूप तुझें ॥ १ ॥
काम धाम कांहीं नलगे माझ्या चित्तीं । न देखे विश्रांति तुजविण ॥ २ ॥
तापत्रय [2]ओणवा लागला चहूंकडे । न देखें उघडे तुजविण ॥ ३ ॥

अभंग १६४७ व १६४८––(पं.) व (शि.), १६४९––(बा.)
१ नेटकें नीट (पं.) २ वणवा (बा.)

तुजविण तें जिवलग दुजें कोण होईल । तें माझें निवारील उद्वेग हे ॥ ४ ॥
कृपेचा सागरू त्रिभुवनीं उदारू । न करी अव्हेरू अनाथाचा ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा आस माझी पुरवी । पाउलें दाखवी एक वेळां ॥ ६ ॥

[ १६५० ]
आतां माझी चिंता तुज नारायणा । रुक्मिणीरमणा वासुदेवा ॥ १ ॥
द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं । धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥ २ ॥
उपमन्या आळी तुवां पुरविली । अढळपदीं दिल्ही वस्ति ध्रुवा ॥ ३ ॥
नामा म्हणे करा करुणा केशवा । तूं माझा विसावा पांडुरंगा ॥ ४ ॥

[ १६५१ ]
विष पाजावया पूतना ते आली । ते तुवां तारिली काय म्हणुनि ॥ १ ॥
पुसा या म्हणोनि वेश्या वोभाईलि । ती तुवां तारिली काय म्हणूनि ॥ २ ॥
पिंगळेची आख्या पुराणीं ऐकिली । ते तुवां तारिली काय म्हणुनि ॥ ३ ॥
गौतमाचें शापें अहल्या शिळा जाली । ते तुवां तारिली काय म्हणुनि ॥ ४ ॥
नामा म्हणे केशवा अकळ तुझी करणी । विसंबसी क्षणीं तूंचि मज ॥ ५ ॥

[ १६५२ ]
तुझें गुणनाम ऐकतां श्रवण नाराध्ये । अवलोकन करित नयन नाराध्ये ।
पूजन करितां कर नाराध्ये । ऐसी नाराणुक द्यावी कमळापती ॥ धृ० ॥
नरहरि या नामें उदंड । केव्हांही नसावें रिकामें तोंड ।
खांदीं सतत करंडा वाहे । मस्तकीं अखंड निर्माल्य राहे ।
नेत्रीं आनंदजळ वाहे । यामध्यें देवा क्षणें कांहीं उणें होय ॥ १ ॥
तुझेनि प्रसादें जठर पोसिलें । चरणोदकें तृष्णाहरण केलें ।
नामें नृत्य करितां मन हें निवालें । दंडवत घालितां श्रम हरले ॥ २ ॥
गत शयनीं विसर न द्यावा श्रीरामा । यापरी निश्चित परमात्मा ।
तूं आलिया निवारिसी श्रमा । ऐसें केशिराजा विनवितो नामा ॥ ३ ॥

[ १६५३ ]
तुझें नाम म्हणतां सुलभ अनंता । दुर्लभ म्हणतां अंतकाळीं ॥ १ ॥
तैसें तुवां मज केशवा करावें । हृदयीं भेदावें नाम तुझें ॥ २ ॥

अभंग १६५० व १६५१—(आ.), १६५२—(पं.) व (शि.), १६५३—(पं.)

मुके पशु पक्षी वृक्ष आणि पाषाण । तया नारायणा गति कैसी ॥ ३ ॥
नामा म्हणे कैसें केशवा सांगणें । अज्ञानी ते नेणें कवणेंपरी ॥ ४ ॥

[ १६५४ ]

देवा निढळावरी हात दोन्ही । पाहें चक्रपाणि वाट तुझी ॥ १ ॥
धांव गा धांव सख्या पांडुरंगा । जीवीं जिवलगा मायबापा ॥ २ ॥
तुजविण ओस दिसती दाही दिशा । आणि धांव जगदीशा मजसाठीं ॥ ३ ॥
नामा म्हणे काय बैसलों निवांत । धांवतो अनंत भक्तांसाठीं ॥ ४ ॥

[ १६५५ ]

भागलासि देवा धांव धांवणिया । दाखविसी पायां पांडुरंगा ॥ १ ॥
गजेंद्र गणिका तुम्हां श्रमविलें । मी काय उगलें परदेशी ॥ २ ॥
सोळा सहस्र आणि गोपी त्या उद्धरती । माझी कींव चित्तीं कां वा नये ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां पुरे तुझा संग । वारंवार मग वारी कोण ॥ ४ ॥

[ १६५६ ]

केशवचरणीं मनें दिली बुडी । इंद्रियें बापुडीं धांवती पाठीं ॥ १ ॥
संसार संभ्रम नको सुखलेश । भातुकें सरिसें [1]पाठविसी ॥ २ ॥
जन्मजन्मांतरीं जाणावें कवणें । नेणोनि भोगणें कवणें स्वामी ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवे भक्तवत्सले । आम्हांसि वेगळे होऊं नका ॥ ४ ॥

[ १६५७ ]

ऐशा विचारें समाधान करीं । गोविंद श्रीहरी नारायण ॥ १ ॥
सर्वकाळ ऐसी वदो ही वैखरी । आणिक अंतरीं नाठवावें ॥ २ ॥
आणिकासी गुज न बोले वदन । वदो नारायण सर्वकाळ ॥ ३ ॥
रामकृष्ण माझ्या शेषाचें स्तवन । शास्त्रेंहि पुराणें भाट ज्यांचीं ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां ऐसें करी देवा । हृदयीं केशवा राहे माझ्या ॥ ५ ॥

अभंग १६५४ व १६५५—(आ.), १६५६—(पं.) व (शि.), १६५७—(पं.)
१ पाठवावे (पं.)

• • •

अनुक्रमणिका

[ १६५८ ]

पैल पिकली पंढरी । विठ्ठलरायाची नगरी ॥ १ ॥

पाहा ऐकलें निरूतें । विश्व केलें हें मागुतें ॥ २ ॥

केशवा खळेदान [1]देतां । नामा जालासे मागता ॥ ३ ॥

[ १६५९ ]

विटेवरी नीट उभा कटीं ठेवुनी कर । तो पुंडलिकाचे द्वारीं देखियेला ॥ १ ॥

वहुली बहुली देहुडा पाउलीं । गुंजाहार गळां देखियेला ॥ २ ॥

पुष्पवतीच्या संगमीं गोपाळ आश्रमीं । काला करितां आम्ही देखियेला ॥ ३ ॥

वेणु वाहतां चहुंकरी नाद उठला अंबरीं । वासुरें तटस्थ हुंबरी होऊनि देखियेला ॥ ४ ॥

अंगीं चंदनाची उटी मयुरपत्रांची दाटी । चेंडू खेळतां यमुनेतटीं देखियेला ॥ ५ ॥

नामा म्हणे केशवा देखियेलें हृदयीं । जन्मवरी राहीं हेंचि मागें ॥ ६ ॥

[ १६६० ]

बाहेरीं भीतरीं तुजचि मी देखें । चित्त तेणें सुखें वेडावलें ॥ १ ॥

संतसंगें मज पालट हा जाला । पाहातां विठ्ठला रूप तुझें ॥ २ ॥

मीपणासहित आनंदीं बुडालें । न निघे कांहीं केलें चित्त माझें ॥ ३ ॥

नामा म्हणे एक उरलीसे वासना । स्वामिसेवकपणा देईं देवा ॥ ४ ॥

[ १६६१ ]

मन माझें आंधळें कपटाचें कवाडें । [2]भक्ता केंवि उघडे ज्ञानेंविण ॥ १ ॥

काय करूं देवा माझिया या दैवा । अभक्तांसी भाव केंवि होय ॥ २ ॥

हें माझें म्हणसी कुबुद्धि लेंकरी । मागें काळवैरी पाहतसे ॥ ३ ॥

नामा म्हणे केशवा [3]माझा तुझा भाव । तुझे पायीं ठाव देईं देवा ॥ ४ ॥

[ १६६२ ]

मी असे तेथें मग तूं कैंचा । हा उपजत ठायींचा तोडी वेळु ॥ १ ॥

आपुलें करोनि ठेवीं तुझे चरणीं । न मानिति कोणी क्षिती नाहीं ॥ २ ॥

---

अभंग १६५८—(बा.), १६५९—(आ.), १६६०—(पं.), (शि.) व (धु.), १६६१ व १६६२—(पं.) व (शि.)

१ देता (बा.) २ भक्तीं केवा घडे ज्ञानेंविण । (पं.) ३ सांडीं दुजा भाव । (आ.)

अनुक्रमणिका

सेवा तुझी देई हेंचि दुजेपण । येर तो अभिमान खंडी माझा ॥ ३ ॥
[1]नामा म्हणे देवा आवडसी माझ्या जीवा । सुखरूप केशवा विठ्ठलराजा ॥ ४ ॥

[ १६६३ ]

मनें ध्यान करणें वाचे उच्चारणें । नयनीं तुज पाहणें हेंचि देईं ॥ १ ॥
माथा चरणीं ठेवणें करें पूजा करणें । श्रवणीं ऐकें गुण हेंचि देईं ॥ २ ॥
षट्चक्रमार्गावरी वावन्न अक्षरीं । निरालव निरंतरीं भेटी देईं ॥ ३ ॥
मनसा वाचा कर्म आणि दश इंद्रियें । तुझ्या चरणीं होय ऐसें करीं ॥ ४ ॥
डावी उजवीकडे आणि मागें पुढें । अंतरीं चरण जोडे ऐसें करीं ॥ ५ ॥
[2]नामा म्हणे केशवा मी तुझें लडिवाळ । जन्मोजन्मीं जोड हेंचि देईं ॥ ६ ॥

[ १६६४ ]

काळ देहासी आला खाऊं । आम्ही आनंदें नाचूं गाऊं ॥ १ ॥
कोण वेळे काय गाणें । हें तो भगवंता मी नेणें ॥ २ ॥
टाळ मृदंग दक्षिणेकडे । माझें गाणें पश्चिमेकडे ॥ ३ ॥
नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मीं द्यावी सेवा ॥ ४ ॥

[ १६६५ ]

तूं एक म्हणोनि मी ऐसा जाणें । तुझें नाम जाण विस्तारिलें ॥ १ ॥
आतां करिसी काय आतां करिसी काय । सांपडली सोय रामचंद्रा ॥ २ ॥
[3]चरणींजे आहे ती माझी माय । ईश्वरू तो वाहे शिरकमळीं ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा न सोडी मी भावा । जन्मोजन्मीं सेवा द्यावी तुझी ॥ ४ ॥

[ १६६६ ]

दास्यत्व न घडेची तुझें । आयुष्य वेंचिलें वीण काजे ।
धरणीं जालें पें ओझें । तुझ्या प्राप्तिवांचोनि ॥ १ ॥
पुनरपि जन्मा येईन मागुता । कवण जाणे कैसी व्यवस्था ।
तुज मी ध्याईन अनंता । ऐसा लाभ कैं होईल ॥ २ ॥

---

अभंग १६६३—(पं.), (शि.) व (आ.), १६६४—(आ.), १६६५—(पं.) व (शि.), १६६६—(आ.)

१ नारा (वा.) २ नामा म्हणे केशवा तुझी मज गोडी । जन्मोजन्मीं जोडी हेचि देईं ॥ (आ.)
३ चरणिजे (पं.)

अनुक्रमणिका

तुझ्या नामाचा वोरसु । तेणें चुकला गर्भवासु ।
नामा विनवी विष्णुदासु । देई सौरसु आपुले नामीं ॥ ३ ॥

[ १६६७ ]

स्वामी एक व्हावा तुजचि सारिखा । करी निज सेवका जगद्वंद्य ॥ १ ॥
देउनी प्रेमातें पाळिसी तूं बाळें । न करिसी जीवावेगळें क्षणभरी ॥ २ ॥
बळी भीष्म नारद उद्धव रुक्मांगद । हनुमंत प्रल्हाद अंबऋषि ॥ ३ ॥
नामा म्हणे हेचि देईं जन्मोजन्मीं । मी दास तूं स्वामी केशिराजा ॥ ४ ॥

[ १६६८ ]

हेचि माझी संध्या हेंचि माझें स्नान । तुझ्या पायीं मन लागो देवा ॥ १ ॥
हेचि माझी ऋद्धि हेचि माझी सिद्धि । अखंड समाधी पाय तुझे ॥ २ ॥
नामा म्हणे हेंचि देई गा श्रीपती । कथेची विश्रांति जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

[ १६६९ ]

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥
हेंचि घडो मज जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ २ ॥
मुखीं नाम सदा संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें नित्य महाद्वारीं । कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

[ १६७० ]

माता आणि तात सोयरे हरिजन । यम नेम नेणें दोन गोष्टी ॥ १ ॥
गोष्ट ते कोणती म्हणाल तुम्ही जरी । वाचे हरिहरि म्हणतसों ॥ २ ॥
नामा म्हणे आम्ही मागतों देवासी । कीर्तनीं उपवासीं करावें देवा ॥ ३ ॥

[ १६७१ ]

आम्हीं दिला जीव तुझिया कीर्तनें । पांगुळलीं मनें योगियांचीं ॥ १ ॥
न बोलवे वाचा न बोलवे कांहीं । आपेंआप पाही ठाकलों असे ॥ २ ॥

अभंग १६६७—(आ.), १६६८—(पं.) व (शि.), १६६९—(धु.), १६७०—(पं.), १६७१—(आ.)

अनुक्रमणिका

ऐसें तुझें नाम दे गोड गा देवा । घाली वा केशवा हृदयामाजीं ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां सांपडलें वर्म । नित्य वाचे नाम रामकृष्ण ॥ ४ ॥

[१६७२]

आठवितां मनीं तुझी ब्रीदावळी । येऊनि जवळी उभा ठाकें ॥ १ ॥
लाज धरोनियां होतोसि माघारा । तुजची दातारा दिसे शोभा ॥ २ ॥
नामरूपासाठीं घेसी नाना सोंगें । भक्त जिवलगे अंतकाळीं ॥ ३ ॥
नामा म्हणे मज नको हा संसार । [1]मज निरंतर देईं संग ॥ ४ ॥

[१६७३]

[2]सगुण निर्गुण जे कां बोलिजे । ते तूं माझें सर्व पांडुरंगा ॥ १ ॥
आहेसि तितुकें तूंचि सर्वगत । मी काय अनाथ वर्णूं तुज ॥ २ ॥
चरणींची आवडी न संडावी मनें । यापरि पोसणें मायबापा ॥ ३ ॥
साक्ष भीमरथी संत पुंडलिक । नाम्यातें आणिक [3]न कळे कांहीं ॥ ४ ॥

[१६७४]

श्रीमुखाची सोय पाहों म्हणों जरी । एवढा मी अधिकारी कैंचा देवा ॥ १ ॥
चरणांजवळूनि नसावें जी दुरी । जन्मजन्मांतरीं हेंचि देईं ॥ २ ॥
तुज देतां सोपें मजहि तृप्ति अल्पें । सर्वज्ञा साक्षेपें सांगतसे ॥ ३ ॥
अनाथाचा नाथ हें ब्रीद साच । न करावें उदास नामा म्हणे ॥ ४ ॥

[१६७५]

बाहेरीं भीतरीं पाहतां दिसे एकु । उभा असे व्यापकु पंढरिरावो ॥ १ ॥
पंढरीचा राणा विटेवरी जाणा । जीविचिया खुणा भक्ता सांगे ॥ २ ॥
गुंतलों संसारीं भरलों कर्मभांडारीं । विषयामाझारीं मोहियेलें ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा माझें उणें न पाही । चरणसेवा देईं जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

---

अभंग १६७२––(बा.), १६७३––(पं.), (धु.), (शि.) व (आ.), १६७४––(पं.), (धु.) व (शि.), १६७५––(पं.) व (शि.)

१ देईं निरंतर संतसंग । (बा.)

२ सगुण निर्गुण श्रुती ज्या बोलती । तो तूं माझे चित्तीं पंढरीराया ॥ (आ.)

३ नलगे (आ.)

[ १६७६ ]

हेंचि देवा पैं मागत । चरणसेवा अखंडित ॥ १ ॥
वास द्यावा पंढरीचा । सदा संग हरिदासाचा ॥ २ ॥
जन्म हो का भलते याति । परि मी न चुकें हरिभक्ति ॥ ३ ॥
नामा म्हणे कमळापती । हेंचि द्यावें पुढतोंपुढतीं ॥ ४ ॥

[ १६७७ ]

विणा घेऊनियां करीं । उभा राउळामाझारीं ॥ १ ॥
तहान भूक हरपली । छंद लागला विठ्ठलीं ॥ २ ॥
कन्या पुत्र बाप माय । त्यांचा आठव तो न ये ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंचि देई । तुझे पायीं माझी डोई ॥ ४ ॥

[ १६७८ ]

नेणें मन कांहीं विश्वास नामाचा । गोसावी आमुचा पांडुरंग ॥ १ ॥
संसारीं पडलों कर्माचे भांडारीं । कृपा निरंतरीं करी मज ॥ २ ॥
नेणें तुझें ध्यान नेणें तुझें प्रेम । दावी मज वर्म सेवकासी ॥ ३ ॥
नामा म्हणे माझे गुणदोष कांहीं । ठाव तुझे पायीं देई मज ॥ ४ ॥

[ १६७९ ]

होईन संताचा बोळगणा । दास डिंगर पोसणा ॥ १ ॥
प्रेम देई नारायणा । भूतदया परिपूर्णा ॥ २ ॥
संतचरणींचे रज । हेंचि सर्व [1]तीर्थ मज ॥ ३ ॥
सेवीन संत उष्टावळी । तेणें पवित्र आमुची कुळी ॥ ४ ॥
राखेन संताचें मी द्वार । तें मज वैकुंठीहुनि थोर ॥ ५ ॥
नामा म्हणे पंढरीनाथा । आणिक न मगें सर्वथा ॥ ६ ॥

---

अभंग १६७६—(प.) व (धु.), १६७७—(पं.) व (शि.), १६७८—(आ.), १६७९—(पं.) व (शि.)

१ तीर्थबीज (पं.)

अनुक्रमणिका

[१६८०]

ऐकें मोक्षाची मी कथा । तेणें भय वाटे चित्ता ॥ १ ॥
देवा कांहीं नमगें नमगें । मौन असें संतसंगें ॥ २ ॥
ऐकें मुक्तिचिया गोष्टी । तेणें होतसें हिंपुटी ॥ ३ ॥
ऐकें समाधीची गोडी । मन तुझे पायीं बोढी ॥ ४ ॥
ऐकें स्वर्गसुख थोरी । भेणें कांप येतो भारी ॥ ५ ॥
नामा म्हणे अभयदान । देऊनि सांगे प्रेमखूण ॥ ६ ॥

[१६८१]

साधुनि समाधी तुज म्यां चितावें । मग माझ्या यावें हृदयांत ॥ १ ॥
तंव पांडुरंगा संतामाजीं उणें । तुजलागीं निर्वाणें करी देवा ॥ २ ॥
तुजसी संबंध लौकिका वेगळा । पाळिसी गोपाळा लळे माझे ॥ ३ ॥
उपजतां बाळ हितार्थी लागोनी । प्रसन्न जननी होई आधीं ॥ ४ ॥
भिडेस्तव पान्हा फुटोनियां थानीं । पेहे त्या पाजुनि दिलें काय ॥ ५ ॥
उदित सूर्यासि लागे विनवावा । यावें तुवां गांवा प्रकाशित ॥ ६ ॥
मग तें तयानें निवारावें तमा । हे तो मेघःश्यामा नाहीं श्रुत ॥ ७ ॥
पृथ्वी भूतीं काय करावा आदरू । मग त्याचा भारू चालवावा ॥ ८ ॥
जीवना जीवन प्रार्थुनि आणावें । तेणें काय निववावें संत त्यांसी ॥ ९ ॥
सर्वज्ञ उदार होसी चक्रवर्ती । कार्याकारणांतीं नांद तुझी ॥ १० ॥
नामा म्हणे माझें चित्त कृष्णाकार । करूनि निर्धार प्रेम देई ॥ ११ ॥

[१६८२]

आडलिया कोंवसा अनाथा कैवारी । ब्रीद चराचरीं वर्णिताती ॥ १ ॥
येई बा श्रीहरी तूं आमचा कैवारी । सुदर्शन करीं येई शीघ्र ॥ २ ॥
[१]गजेंद्राकारणें कळवळा अगाध । जगीं तुझें ब्रीद तैसा येई ॥ ३ ॥
सुदामा ब्राह्मण अनाथ दुर्बळ । तेथें तूं केवळ अवतरलासी ॥ ४ ॥

---

अभंग १६८० व १६८१—(आ.), १६८२—(पं.) व (शि.)

१ (आ.) प्रतीत पुढील चरण २ व ३ मध्ये आढळतो—
द्रौपदीच्या आकांतीं पावलासी लौकरी । तैसा झडकरी शीघ्र येई ॥

अनुक्रमणिका

ध्रुवासी स्थापिलें उपमन्याकारणें । क्षीरसागर देणें तैसा येई ॥ ५ ॥
अंबऋषीसाठीं सोशी गर्भवास । दुर्वासा कासावीस तैसा येई ॥ ६ ॥
विदुरासी भक्तपण तूं उद्धवासी जवळी । अर्जुना सर्वकाळीं तैसा येई ॥ ७ ॥
गोपाळा यशोदा नंदासी खेळसी । गायी रानीं चारिसी तैसा येई ॥ ८ ॥
नामा म्हणे मागेन सदा अभयकर । प्रेमाचा [1]उदार तैसा येई ॥ ९ ॥

[ १६८३ ]

प्रपंचीं जरी मातें करिसी उदासीन । तरी तुझें ध्यान लागो मना ॥ १ ॥
हेंचि तुज मागणें जन्मजन्मांतरीं । न मागतां अंतरीं प्रगट होसी ॥ २ ॥
इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडी । प्रेमरसगोडी देई मातें ॥ ३ ॥
नामा म्हणे शरण आलों मी केशवा । हाचि तूं पुरवावा मनोरथ ॥ ४ ॥

[ १६८४ ]

शरीर प्राणाचें देउनी बळीदान । [2]साधा रे निधान प्रेमसुख ॥ १ ॥
हेंचि नित्य मागा तया श्रीवल्लभा । त्रिभुवनीं दुर्लभा आणिक नाहीं ॥ २ ॥
हरिदासांचा संग हरिकथा अनुराग । हेंचि पुण्यभाग्य अनुपम्य ॥ ३ ॥
विषईं विरक्ती नामीं नित्य प्रीति । हृदयीं कृष्णमूर्ति [3]वसो सदा ॥ ४ ॥
सर्वभावें करूनि सर्वभूतीं करुणा । सर्वत्र देखणा विठ्ठलरूप ॥ ५ ॥
[4]नामा म्हणे मग तो केशव कृपासिंधु । देईल भक्तिबोधु प्रेमसुखें ॥ ६ ॥

[ १६८५ ]

वेणू वाहोनी सांवळा । गाई चारिसी गोवळा ॥ १ ॥
कां बा न येसि धांवत । विठ्ठल माझें कुळदैवत ॥ २ ॥
अंगीं चंदनाची उटी । पदकं मिरविलें कंठीं ॥ ३ ॥
गळां माळ वैजयंती । सुदर्शन घेऊन हातीं ॥ ४ ॥
कासे पितांबर शेला । विटेवरलिया विठ्ठला ॥ ५ ॥
नामा म्हणे पीडिलों भुकें । देई प्रेमाचें भातुकें ॥ ६ ॥

---

अभंग १६८३—(पं.), १६८४—(पं.) व (शि.), १६८५—(धु.)
१ उद्गार (पं.) २ साधावें (शि. व आ.) ३ वसे (पं. व आ.)
४ ········ कृपावंत । करील मनोरथ पूर्ण माझे ॥ (पं.)

[१६८६]

पुलक धर्म रोमांच नाहीं जंव उठिले । सजळ नाहीं जाले नयन जंव ॥ १ ॥
तंव हरिभक्तिचें सुख कळलें जे म्हणती । लटिकें बोलिजेति उभयलोकीं ॥ २ ॥
ऐसा भक्तिप्रेमा देईं जी देवा । सर्व भावें सेवा घडे तुझी ॥ ३ ॥
श्रवणीं ऐकतां नाम वाचे बोले । नाहीं सुखावलें मन त्याचें ॥ ४ ॥
श्रीहरीचें नाम म्हणवितां न म्हणे । मा सहज उच्चारणें कैंचें त्यासी ॥ ५ ॥
दर्दुराचे परी जिव्हा बटवटी । सांडोनि हरिगोष्टी आणिक सांगे ॥ ६ ॥
देवाच्या मूर्ती संत महंत देखोनी । न वचे लोटांगणीं भावें त्यासी ॥ ७ ॥[१]
न लावी त्यांचे रज टकामका पाहत । बुजवण जैसें सेत राखे तैसें ॥ ८ ॥
ऐसे कैक प्राणी आहेति मूढमति । हित सांगतां चित्तीं दुःख वाटे ॥ ९ ॥
नामा म्हणे केशवा मी तुझें दीन । नेणें तुजवांचोन आन दुजें ॥ १० ॥

[१६८७]

पतितपावन ब्रीद सोडविन आतां । तरीच पंढरीनाथा दास तुझा ॥ १ ॥
माझे गुण दोष न धरावे मनीं । तारिले मजहुनि कोण वंद्य ॥ २ ॥
अजामेळां अधिकार न्यावया वैकुंठा । माझिया अदृष्टा काय जालें ॥ ३ ॥
पित्यासी पतन स्वामीची करणी । गणिका विमानीं कीर्ति कोण ॥ ४ ॥
शिशुपाळें सिव्या [२]दिल्ह्या सभेआंत । त्यांहुनि पतित थोर जालों ॥ ५ ॥
नामा म्हणे पुढती न बोलें तुझें वर्म । [३]अंगिकारोनि प्रेम देईं देवा ॥ ६ ॥

[१६८८]

आणिक न मागें हें ब्रीद साजे चातका । भूमीच्या उदका न खालवी माथा ॥ १ ॥
आणिका पुढें न गाय हें ब्रीद साजे कोकिळिये । वसंतऋतु स्वयें आळवितसे ॥ २ ॥
आणिकापुढें न नाचे हें ब्रीद साजे मयुरा । वर्षला घन सारा वळोनियां ॥ ३ ॥

अभंग १६८६—(पं.), (शि.) व (धु.), १६८७—(पं.), (शि.), (धु.), (गं.) व (न.), १६८८—(आ.)

१ (धु.) प्रतीत खालील चरण ७ व ८ चरणांमध्ये आढळतो—
लटकिया प्रेम डोलतसें कैसा । नादें सर्प जैसा भुललासे ॥
२ दिल्हे, दिधल्या (धु. व आ.) ३ मज सांपडलें वर्म तुझे पाय ॥ (न.)

अनुक्रमणिका

एका लक्ष्मीपतिवांचुनि न बैसे आणिकापुढें । हें ब्रीद साजे रोकडें गरुडासी ॥ ४ ॥
आणिकांचा पांगिला न करी गा देवा । नामा म्हणे केशवा रंक तुझा ॥ ५ ॥

[ १६८९ ]

काये देणारे ते नर । जंव दिल्हें नाहीं रघुवीरें ॥ १ ॥
आजि दिल्हें उद्यां नाहीं । ऐसियासी मागों काई ॥ २ ॥
हात पसरूं ऐसें धुरें । दिल्हें कल्पान्तीं न सरे ॥ ३ ॥
नामा म्हणे देवाधिदेव । समर्थ [1]दाता पंढरिराव ॥ ४ ॥

[ १६९० ]

माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पती ॥ १ ॥
मेघ वर्षे सिळाधारी । तेथें चातक चंचुभरी ॥ २ ॥
महाडोहो गंगाजळ । तृप्त एका दो अंजुळें ॥ ३ ॥
साखरेची साठी । तेथें मुंगी मुखवटी ॥ ४ ॥
नामा म्हणे मी सेवेसी । तूं तो उदाराची राशी ॥ ५ ॥

[ १६९१ ]

पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारां ।
पतितपावन नव्हेसी म्हणुनी जातों माघारा ॥ १ ॥
घ्यावें तेव्हां द्यावें ऐसा असती उदार ।
काय धरूनि देवा तुझें कृपणाचें द्वार ॥ २ ॥
सोडी ब्रीद देवा आतां नव्हेसि अभिमानी ।
पतितपावन नाम तुझें ठेवियलें कोणी ॥ ३ ॥
झेंगट घेउनी हातीं दवंडी पिटीन तिहीं लोकीं ।
पतितपावन देवा परी तूं मोठा घातकी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा तुझें न लगे मज कांहीं ।
प्रेम असोंदे चित्तीं म्हणुनी लागतसे पायीं ॥ ५ ॥

अभंग १६८९ व १६९०—(पं.), (शि.) व (धु.), १६९१—(धु.)
१ माझा (धु.)



अनुक्रमणिका

[१६९२]

राहोनि भोंवतीं नामा वाटे पाहे । श्वास न समाये दुःखें पोटीं ॥ १ ॥
म्हणती मायेनें वैर साधियलें । विषयीं बुडालों सांगों कोणा ॥ २ ॥
भक्तां अंतरंग देतोसी तूं देवा । भैटसि केशवा पूर्ण स्थिती ॥ ३ ॥
पूर्ण पान्हा धेनु घालीत वोरसे । वत्स थोर हर्षें पान करी ॥ ४ ॥
देखोनि पैं स्वामी बळेंचि वोढिलें । तळमळीत ठेलें थोर आशा ॥ ५ ॥
कृपणें संपत्ति जोडिलीया राशी । हिरोनिया घेती बळियानें ॥ ६ ॥
आळवी करुणा धांवे दाहि दिशा । तैसें हृषिकेशा जालें मज ॥ ७ ॥
क्षुधाक्रांत जेवि भोजनीं बैसले । कोणासी न बोले मातु कांहिं ॥ ८ ॥
उठविते वेळीं नव्हतांचि तृप्ति । तैसी दुःखप्राप्ति जाली मज ॥ ९ ॥
अघोर संसार मोहो महापुरीं । अखंड मुरारी सुखरूप ॥ १० ॥
नामा म्हणे विठो अनाथाच्या बंधु । देई सुखसिंधु मज आतां ॥ ११ ॥

[१६९३]

माझें व्रत एक चालवी विठ्ठला । सकळा घटीं तुला देखें ऐसें ॥ १ ॥
तई माझें चित्त पावें समाधान । नाहीं तरी जिणें काय व्यर्थ ॥ २ ॥
तुझी कास आणि बुडे महापुरीं । ऐसें होतां हरि लाज कोणा ॥ ३ ॥
मागितलें फार तुज काय देवा । नको बा केशवा मीतूंपण ॥ ४ ॥
नामा म्हणे माझा कैवारी सबळ । असोनियां काळ भोगूं काशा ॥ ५ ॥

[१६९४]

मनुष्य करिसी तरी [1]झाडफेडी मिसें । [2]परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ १ ॥
पक्षि करिसी तरी चारियाचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ २ ॥
झाड करिसी तरी तुळसीचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ३ ॥
वृक्ष करिसी तरी मंडपाचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ४ ॥

---

अभंग १६९२ व १६९३--(आ.), १६९४--(पं.), (शि.) व (धु.)
१ झाडकुडी (पं.)
२ चरणार्धानंतर प्रत्येक चरणातील ' परी ' हे (आ.) प्रतीत नाही.

श्वान करिसी तरी उच्छिष्टाचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ५ ॥
पाषाण करिसी तरी पायरीचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ६ ॥
उदक करिसी तरी सडियाचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ७ ॥
नामा म्हणे मज कीर्तनाचेनि मिसें । परी तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ८ ॥

[ १६९५ ]

काय मागूं विठ्ठल धुरे । [1]एक तुळशीदळ पुरे ॥ १ ॥
मागूं मुकुट माथाचा । तरी तो आणिला इंद्राचा ॥ २ ॥
मागूं कुंडलें कर्णीचीं । तरी तीं आणिलीं कर्णाचीं ॥ ३ ॥
मागूं पितांबर शेला । तरी तो कासेसी कसिला ॥ ४ ॥
मागूं पादुका चरणींच्या । तरी त्या आणिल्या शेषाच्या ॥ ५ ॥
मागूं तोडर पायींचा । धाक जाईल असुरांचा ॥ ६ ॥
मागूं जातां लक्ष्मीयेसी । ऋद्धिसिद्धी जिच्या दासी ॥ ७ ॥
नामा म्हणे कांहीं न मागों । तुझे चरणीं लक्ष लागो ॥ ८ ॥[2]

[ १६९६ ]

भावें तुझे चरण धरिले विठ्ठला । आतां तूं पांगिला करूं नको ॥ १ ॥
न लगे मज कांहीं ऋद्धिसिद्धी पाही । मुक्तिसुख तेंहि नलगे मज ॥ २ ॥
नामा म्हणे मज जन्म दे अनंता । भक्तिविरहिता जिणें नको ॥ ३ ॥

[ १६९७ ]

[3]मोक्षपद जरी अभिलाषिन चित्तीं । झणीं मज अंतरती चरण तुझे ॥ १ ॥
निर्वासना चित्तें भजन तुझें करितां । झणीं या सायुज्जता देसी मज ॥ २ ॥

अभंग १६९५--(पं.), (शि.) व (धु.), १६९६--(पं.) व (शि.), १६९७--(पं.), (धु.) व (गं.)

१ आम्हां (धु.)

२ मागूं म्हणे शंख जरी । तरी तो मिरवे तुमच्या करीं ॥ ८ ॥
मागों सुदर्शन दळ । त्या शस्त्राचें तुम्हां बळ ॥ ९ ॥
मागों वैजयंती माळ । तरी शून्य दिसेल वक्षस्थळ ॥ १० ॥
कारण तेंचि मागितलें । नामया केशवाचें प्रेम दिलें ॥ ११ ॥
[८ ते ११ हे चरण हस्तलिखितात सापडत नाहीत. (आ.) प्रतीत आहेत.]

३ मुक्तिपद (आ.)

मग मी काय करूं वैकुंठनायका । ऐशा प्रेमसुखा कोठें पाहों ॥ ३ ॥
ध्यान सुखें करूं पाहे हृदयकमळीं । पक्षिणी ऐसी आळी करिशी झणीं ॥ ४ ॥
संकल्पें यावें वाटे चरणाजवळी । विकल्प काजळी झणीं देशी ॥ ५ ॥
नामा म्हणे आतां कांहींच मी न करीं । मज होतु कोटीवरी गर्भवास ॥ ६ ॥

[१६९८]

देव देवी देवतार्चन । तूंचि माझें पूर्णपण ॥ १ ॥
न मगें न मगें विठ्ठला । येथूनियां राहे उगला ॥ २ ॥
जप तप नेम निष्ठा । तुजचि जाणो गा वैकुंठा ॥ ३ ॥
तुझी भक्ति हेचि गोड । आणिक नाहीं आम्हां चाड ॥ ४ ॥
यज्ञ याग मंत्र तंत्र । तूंचि आमचें कुळ गोत्र ॥ ५ ॥
येथुनि पंढरिये हरी । आम्हांसि तूं अंगिकारी ॥ ६ ॥
आम्ही करितों कीर्तन । तारावे हे तुम्ही जन ॥ ७ ॥
हेंचि [1]मागणें हो देवा । नामा म्हणे द्यावी सेवा ॥ ८ ॥

[१६९९]

वाणी [2]गांधिपण पाठी पसारा । घेवोनि संसारा आलों असे ॥ १ ॥
पसारे करी पसारे करी । वायां उभाराउभरी करितसे ॥ २ ॥
रस रसायण आणि भाजीपाला । शकुन आम्हां जाला पुरता आहे ॥ ३ ॥
वाटे एक खोटें दांडी चेपी बोट । कवणेपरी न फिटे कुडेपण ॥ ४ ॥
बोलतों पैं खोटें देतों पैं उणें । वायांच शिणे रात्रंदिवस ॥ ५ ॥
विष्णुदास नामा विनवी केशवा । तेहिपरी देवा उद्धरावें ॥ ६ ॥

[१७००]

तुझे चरणीं सुख अनुपम्य आहे । हें तूं जाणसी काये पांडुरंगा ॥ १ ॥
आम्हां ऐसें व्हावें तेणें तें भोगावें । नकळे स्वभावें ब्रह्मादिकां ॥ २ ॥

अभंग १६९८—(पं.) व (शि.), १६९९—(धु.), १७००—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ मागेल (पं.) २ गाध (धु.)

चतुराशिरोमणि आमुची जननी । जाणे ते रुक्मिणी [1]जीवनकळा ॥ ३ ॥
चरणींचा प्रभाव जाणे गौतमवधु । [2]जेणें शापबद्ध मुक्त केली ॥ ४ ॥
चरणींचा स्वभाव जाणती वैष्णव । नल कुबेर [3]मुनिसुग्रीव सखे माझे ॥ ५ ॥
नामा म्हणे तुझे चरणींची त्रिपथा । भूषण उमाकांता ऐसें जालें ॥ ६ ॥

[ १७०१ ]

तुझें नित्य सुख घ्यावें येणें मनें । असावें अनुसंधानें चरणाचेनि ॥ १ ॥[4]
वासनेविरहित होऊनि एकवट । असावें निकट संतसंगें ॥ २ ॥
ऐशी मज कृपा करी गा विठ्ठला । म्हणविती आपुला दास जगीं ॥ ३ ॥
श्रवणीं तुझें नाम ऐकावें आवडी । चित्तें देऊनि बुडी प्रेमडोहीं ॥ ४ ॥
नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र । व्हावे भूतमात्र सखे माझे ॥ ५ ॥
वदनीं तुझें नाम गावें निर्विकल्प । धरोनि तुझें रूप हृदयकमळीं ॥ ६ ॥
काया संताचरणीं जावी लोटांगणीं । तें भाग्य अनुदिनीं देईं बापा ॥ ७ ॥
हेंचि माझें व्रत हेंचि तपतीर्थ । करावें दास्यत्व संतांचें हें ॥ ८ ॥
अनुदिनीं व्हावा संताचा हा संग । असावा अनुराग कीर्तनाचा ॥ ९ ॥
मनाचा मज त्रास अपमानीं उल्हास । देईं तुझा ध्यास सर्वकाळ ॥ १० ॥
नामा म्हणे विठोबा तरीच शरणागत । नाहीं तरी पतित म्हणति मज ॥ ११ ॥

[ १७०२ ]

देहाभिमानें पुरविली पाठी । कांहो जगजेठी न ये कृपा ॥ १ ॥
स्वात्मसुखासाठीं स्तुति करी ब्रह्मा । व्याधा निजधामा स्थिरपद ॥ २ ॥
काय करतसे मातृपितृभक्ति । तया जगत्पति [5]नाचतसे ॥ ३ ॥
नाचती वैकुंठीं सर्व ऋषीश्वर । नामा म्हणे पार नाहीं नाहीं ॥ ४ ॥

[ १७०३ ]

पूर्ण कृपा केली देवा । दिधली पादपद्मसेवा ॥ १ ॥
पापें पळालीं पळालीं । नामकीर्तनकल्लोळीं ॥ २ ॥

---

अभंग १७०१—(पं.), (आ.) (शि.) व (धु.), १७०२—(बा.), १७०३—(पं.) व (शि.)
१ चरण महिमा (आ.) २ जेणें शापबंधु मुक्त केला ॥ (धु.) ३ मणिग्रिव (आ.)
४ (आ.) प्रतीत हा अभंग पुढील चरणानें सुरू होतो—
निरंतर सुख द्यावें येणें मनें । पायीं समाधान व्हावें वेगीं ॥
व शब्दरचनेत अन्यत्रही पुष्कळ बदल आढळतो.
५ पावतसे (बा.)

अनुक्रमणिका

द्वारीं तुळसी वृंदावन । अखंड नामसंकीर्तन ॥ ३ ॥[१]
रंगमाळाच्या रंगणी । तेथें मुक्ति वाहती पाणी ॥ ४ ॥
जन्म वैष्णवकुळीं यावा । घडो संताची हे सेवा ॥ ५ ॥
नामदेवाची आवडी । संतचरणीं देतों बुडी ॥ ६ ॥

[ १७०४ ]

शंख चक्र गदा पद्मेंसि [२]अंकित । मी तुम्हां सांगाते निरंतर ॥ १ ॥
जिकडे जाल तिकडे मी तुमचा सांगाती । तुम्हांविण [३]विश्रांति आणिक नाहीं ॥ २ ॥
संसाराचें ओझें पडो नेदी तुम्हातें । या वैष्णवा सांगातें निरंतर ॥ ३ ॥
अशनि शयनि ध्यानि मज मनि । योगक्षेम दोन्ही वाहे त्याचें ॥ ४ ॥
विठोबा म्हणे नाम्या न विसंबे मातें । हें वर्म तूतें सांगितलें ॥ ५ ॥

[ १७०५ ]

तुझें भक्तिसुख द्यावें मज प्रेम । वसो तुझें नाम माझे मुखी ॥ १ ॥
सद्‌भक्ति विचार वाहो माझे चित्तीं । हेचि कृपामूर्ति द्यावें मज ॥ २ ॥
[४]पदर पसरिला न निघे माघारा । विठोबा दातारा द्यावें आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा इतुकें द्यावें मज । ऐकोनि केशवराज काय बोले ॥ ४ ॥

[ १७०६ ]

घेरे घेरे नाम्या दिल्हें माझें प्रेम । घोकी माझें नाम सर्वकाळ ॥ १ ॥
शिरावरी हात ठेवितसे [५]माझ्या । अभिमान तुझा गेला म्हणुनि ॥ २ ॥
भक्तिसुख देवें दिल्हें नामयातें । नामा परमामृतें तृप्त जाला ॥ ३ ॥[६]

अभंग १७०४—(पं.), (शि.) व (धु.), १७०५ व १७०६—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ चरण ३ हा (आ.) प्रतीत नाही. २ सहित (धु.) ३ संगती-संपत्ति (पं. व. धु.), संपत्ती (आ.)

४ तुझा दास जगीं म्हणवितों विख्यात । पसरिला हात फिरवूं नको ॥ (आ.) काही प्रतींत हा चरण सापडतो, तर काहीत सापडत नाही.

५ माझा (पं.)

६ (आ.) प्रतीत चौथा चरण खालीलप्रमाणे आहे—
नामा म्हणे देवा जालों मी पावन । माझें तुजविण कोण आहे ॥ ४ ॥ (आ.)

अनुक्रमणिका

[१७०७]

अपराधी तरी केला अंगिकार । कासया विचार तुजमाजीं ॥ १ ॥

लोहो होतें परि परिससंगतीं । तैसा तूं श्रीपति जगामाजीं ॥ २ ॥

घुसळितां रवी नेणें लाभ हानी । तैसें चक्रपाणि होऊं नये ॥ ३ ॥

हीन दीन सर्व तुझाच आधार । नामा म्हणे सार हेंचि आतां ॥ ४ ॥

[१७०८]

मायबापांपरीस लोभ तुझा हरी । आहे मजवरी केशिराजा ॥ १ ॥

आतां जाणसी तें कृपाळुवा करी । लाज सर्व हरी आहे तुज ॥ २ ॥

माझें जातिकुळ नाहीं त्वां पुशिलें । अन्याय साहिले कोटयानकोटी ॥ ३ ॥

जन्मोजन्मीं मज घातलें पाठिसी । संकटीं रक्षिसी नारायणा ॥ ४ ॥

देऊनि प्रेमभातें पाळिलें पैं मातें । साउली तळहातें केली देवा ॥ ५ ॥

हे खूण जाणती तेचि माझे सखे । मी तुझें लाडिकें म्हणवीं देवा ॥ ६ ॥

नामा म्हणे काईं होऊनी उतराई । पुढें जन्म नाहीं ऐसें केलें ॥ ७ ॥

[१७०९]

दाही दिशा पाहतां दिसती निर्मळ । स्फुरत वक्षःस्थळ होतें असे ॥ १ ॥

येईल माझा विठो देईल आलिंगन । जीवें निंबलोण करीन त्यासी ॥ २ ॥

प्रेमपूर भरतें सुखसिंधू लोटली । माउली भेटली जिवलग ॥ ३ ॥

धरुनि हनुवटी सांगेल [१]गुज गोष्टी । पाहील कृपादृष्टी माझें म्हणोनि ॥ ४ ॥

प्रीतीचें पडिभरें कुर्वाळील मज । सांगेन निजगुज संसारीचें ॥ ५ ॥

हरुषें नामा निवाला निवाडे । नाचे संतापुढें सांगेन गुज ॥ ६ ॥

[१७१०]

निर्गुण गुणासी आलें । परब्रह्म ठसविलें ।
भक्त पुंडलिका लाधलें । गौप्य केलें प्रगट ॥ १ ॥

सेवा सेवा ब्रह्मरस । विठ्ठल पंढरीनिवास ॥ धृ० ॥

निर्गुण गुणाकार । मूर्ति सांवळी सुंदर ।
सकलहि गुणांचें माहेर । मुक्तिपेठ पंढरी ॥ २ ॥

---

अभंग १७०७—(आ.), १७०८ व १७०९—(पं.) व (शि.), १७१०—(बा.)

१ सुख गोष्टी (पं.)

धन्य धन्य भीमातट । चंद्रभागा हे निकट ।
जेथें विठ्ठलवीर प्रगट । नाम गर्जती हरिदास ॥ ३ ॥
धन्य धन्य पद्माळें । सभराभरित आनंद जळें ।
स्नान केलिया निर्मळें । कोटि कुळें उद्धरती ॥ ४ ॥
धन्य धन्य [1]माणदेश । विठ्ठलें केला रहिवास ।
नामा म्हणे विष्णुदास । देईं उल्हास भक्तीचा ॥ ५ ॥

[१७११]

पंढरी माहेरीं विठ्ठल माउलिये । [2]जावोनि हे बोली सांगिजो जी ॥ १ ॥
संसारगांवीं लेकी असे तुमची । चिंता का तियेची सांडियेली ॥ २ ॥
सासुरवासिणी पाहातुसे वाट । सांगिजो का कष्ट माउलिये ॥ ३ ॥
अव्हेरू माझा करी अविचारु भावा । आशा तृष्णा जावा बहिणी का ॥ ४ ॥
एकलिये माते खेदती बहुतें । तंव एकांतें तुमतें आठवीत ॥ ५ ॥
चांडाळी हे सासु नष्ट पैं पापिणी । कांहीं केल्या धणी पुरों नेदी ॥ ६ ॥
रात्रंदिवस नाहीं कामाचा शेवट । जीवित्वाचा वीट येतु असे ॥ ७ ॥
सखी सांगातिणी तिसी नाहीं भेट । अज्ञान हें पोटीं वाढतसे ॥ ८ ॥
सुखाचे डोहळे दुःख कीं नावडे । ऐसें केंवि घडे तुजविण ॥ ९ ॥
[3]रखुमाई माता पांडुरंग पिता । मी त्याची दुहिता म्हणे नामा ॥ १० ॥

[१७१२]

काशिये कनोजा द्वारके गुजरु । कानडा विठलु पंढरिये ॥ १ ॥
मायबापें माझी विठ्ठलरुक्मिणी । द्वारका पाटणीं माहियेर ॥ २ ॥
पर्वत शिखरीं बद्रिनारायणु । सोयरा सज्जनु पंढरिये ॥ ३ ॥
बारसी भगवंत तेरेसी तिखया । विठलु सोयरिया पांडुरंग ॥ ४ ॥
विटेवरी नीट समचरणीं उभा । पुंडलिकाचे लोभा भक्तिलागीं ॥ ५ ॥
विष्णुदास नामा चरणीं उतावेळु । करावा सांभाळु अपत्याचा ॥ ६ ॥

अभंग १७११—(बा.), १७१२—(पं.) व (शि.)
१ मायदेश (बा.) २ धांवोनि (बा. व आ.)
३ (बा.) प्रतीत पुढील चरण अधिक आढळतो—
तरी चांगती धाडिजे तो सांगिजो तिजपाशीं । जेविना उपवासि भेटीविण ॥

[ १७१३ ]

अपत्याचे परी सांभाळिलें श्रीहरी । वाट निरंतरीं पाहतु असे ॥ १ ॥
संवसारीं कष्ट जालेती बहूभारी । मज निववी हरी मायबापा ॥ २ ॥
गांव तें पंढरी भिवरेच्या तीरीं । निरोप माहेरीं सांगिज्रो का ॥ ३ ॥
क्षीरसागराभीतरीं पहुडले श्रीहरी । कवण धांवा करी कुमारीचा ॥ ४ ॥
पुंडलिकाची भक्ति मांडली चराचरीं । गुढिया निरंतरीं उभविल्या ॥ ५ ॥
संत सनकादिक ते माझे सज्जन । द्वारीं असें वाहन गरुडाचें ॥ ६ ॥
रखमाई माता विठो माझा पिता । नामा म्हणे संता भेटावया ॥ ७ ॥

[ १७१४ ]

स्फुंदत स्फुंदत नामा उभा महाद्वारीं । दृष्टि पायावरीं विठोबाच्या ॥ १ ॥
देखोनि केशवें उभारिल्या बाहे । पालवितु आहे पीतांबरें ॥ २ ॥
संवसारीं रुसलासे नामा । दाटलासे प्रेमा ओसंडत ॥ ३ ॥
येईं नाम्या तुज धरीन पोटाशीं । कोणें गांजिलासि दुराचारें ॥ ४ ॥
ऐके वो रुक्मिणी अंजारूनि तुम्हीं । वोसंगा घेऊनि आळवावा ॥ ५ ॥
जगत्र जननी संभ्रमें करुनि । प्रीतिपान्हा स्तनीं वोसंडला ॥ ६ ॥
वोरसला नामा घेतलासे करीं । मुख पितांबरें पुसीतसे ॥ ७ ॥
कवणें तुझे चित्तीं लावियेला चाळा । न देखतां डोळां स्फुंदतसे ॥ ८ ॥
बुझाविला नामा दाटलासे प्रेमा । हांसे सत्यभामा काय जालें ॥ ९ ॥
कोण कुळीं नामा काय लोभ याचा । तूं स्वामी दीनाचा पांडुरंग ॥ १० ॥[१]

[ १७१५ ]

करुणेचीं उत्तरें बोले नामदेव । ऐकोनि पंढरिरावो हांसिन्नले ॥ १ ॥
मग हे विवंचना सांगे रुक्माईसी । म्हणे नामयासि आणा वेगीं ॥ २ ॥

---

अभंग १७१३—(पं.) व (शि.), १७१४—(आ.), १७१५—(पं.) व (शि.)

१ (शि.) प्रतीत हा अभंग असाहि सापडतो—
स्फुंदस्फुंदोन नामा उभा महाद्वारीं । चित्त पायांवरीं विठोबाच्या ॥ १ ॥
उभा दीनानाथ उभारोनी बाहे । पालवीत आहे पीतांबरें ॥ २ ॥
आरता येरे नामया धरिला पोटासीं । कोणे गांजिलासी दुर्जनानें ॥ ३ ॥
अंतरिंचे सांगे पडे माझ्या मागें । कां करिशी उद्वेग संसारींचा ॥ ४ ॥
नामा म्हणे विठो असें मी नेणता । आठवीं पंढरीनाथा वेळोवेळां ॥ ५ ॥

मग रुक्माई चरणीं ठेवी माथा । म्हणे आणा जी समर्था नामयासी ॥ ३ ॥
मग पंढरीराव रुक्माई ज्ञानदेव । पुंडलीक समुदाय चालिलासे ॥ ४ ॥
येऊनि नाम्यापाशीं उभे पैं ठाकले । पुंडलीक बोले नामयासी ॥ ५ ॥
धन्य नामदेवा तुझा एक भाव । सहित पंढरीराव आले तेथें ॥ ६ ॥
पीतांबर छाया रूप प्रगट केलें । नामया आलिंगिलें पांडुरंगें ॥ ७ ॥
कडे घेऊनि नामा रखुमाई जननी । प्रेमपान्हा वोसंडोनि पाजी तया ॥ ८ ॥
नामयासि घेऊनि आले पंढरीसी । वैकुंठ ओवारिसी कळस केला ॥ ९ ॥
नामयाचे मुखीं घालुनि कवळु । पुसे हा गोपाळु सिण भाग ॥ १० ॥

[ १७१६ ]

स्वरूपाकारणें विश्वरूप घेशीं । निर्गुणा दाविसी गुणरया ॥ १ ॥
तत्त्वीं तत्त्वरवीं उगवे मंडळी । अवघे झोकोळी आपुल्यातें ॥ २ ॥
दृश्याचिये दीप्ति दृश्यासी न दिसे । समरस असें तेज त्याचें ॥ ३ ॥
चित्स्वरूपीं नांदे तत्त्वरूप भासे । आकारासरिसें तदाकार ॥ ४ ॥
करुणा वोतिलें सप्रेम सुतेज । तेथें तूं विराज ज्ञानदेवा ॥ ५ ॥
ज्ञान हेंचि तोय विज्ञान हे गंगा । प्रेमें प्रेमभागा स्नान करीं ॥ ६ ॥
एकत्व आरामें शांति पूर्ण घरीं । श्रीहरी कामारी होतो तुझा ॥ ७ ॥
स्वस्ति श्रीनिवृत्ति गुरुत्व उचित । लक्ष्मी अवचित नामदेवा ॥ ८ ॥

[ १७१७ ]

राजमंदिराभीतरीं रुक्मिणी सेजेवरी । नामा परसांसरी वोळगों आले ॥ १ ॥
नामया देखोनी झडकरी उठली । आड उभी ठेली जाऊनियां ॥ २ ॥
अचळ सरिसां करी श्रृंग माथ्यावरी । पाहें पां निदसुरी होती कैसी ॥ ३ ॥
मी म्हणे नावेक लागेल वेळ यातें । तंव अवचितें देखियेलें ॥ ४ ॥
कनक परयेळीं घेउनी आरती करीं । ओवाळिले हरी नामयासहित ॥ ५ ॥

[ १७१८ ]

नाहीं भीड [1]चाड बोलसी आगळें । तोंडाचेनि बळें अरे नाम्या ॥ १ ॥
आपुलिया चाडें करितसां सेवा । आभारु कां लावा आम्हांलागीं ॥ २ ॥

अभंग १७१६ व १७१७—(आ.), १७१८—(पं.), (शि.), (धु.) व (भा.)
१ भाड (धु.)

माझ्या ठायीं काय मज उणें होतें । माते देउनी [1]सरतें केलें तुम्हीं ॥ ३ ॥
निर्गुण निराकार होतों निजानंदें । त्यासी तुम्हीं भेद केला देखा ॥ ४ ॥
संकल्प वासना नाना भजन मतें । शुद्ध स्वरूपातें भेद जाला ॥ ५ ॥
वैंकुंठ निजधामा सर्व सुखरासी । सांडोनी तुम्हांपासीं येणें जालें ॥ ६ ॥
शेषाचे आरूवरीं निद्रा क्षीरसागरीं । सांडोनी वेषधारी जालों आम्ही ॥ ७ ॥
दाही अवतारीं युगयुगांतरीं । अनुष्ठान थोरी केली नाम्या ॥ ८ ॥
अवतारीं कष्ट जाले थोर थोर । मारिले असुर तुम्हांलागीं ॥ ९ ॥
नाना योनी दुःखें भोगा अनंत जन्में । ते निरसलीं नामें माझ्या एका ॥ १० ॥
विषय भोगितां रवरवीं वास । मन केलें उदास वैराग्येंसी ॥ ११ ॥
प्रपंचीं प्रज्वाळ अग्निचे कल्लोळ । सुखरूप सीतल [2]आत्मज्ञानें ॥ १२ ॥
माया हे दुस्तर नकळे इचा पार । ते नदी उतार केली तुम्हां ॥ १३ ॥
कामक्रोधादिक षड्वैरी विकार । महा थोर थोर वश्य केले ॥ १४ ॥
परदारा परधन परनिंदा परपीडा । दिधलिया झाडा दयाधर्मा ॥ १५ ॥[3]
ऐसें सर्वांपरी म्यां केलें गोमटें । परी शब्द उफराटे न संडिसी ॥ १६ ॥
रात्रंदिवस तुज लागला छंद । आम्हांसी विनोद करूं ठासी ॥ १७ ॥
अवघिया परिस तूं जालासी धीट । बोलसी वोखट अमर्याद ॥ १८ ॥
भक्तीचिया भीडा म्यां वहु साहियेलें । त्वां नाहीं पाहियेलें मागेंपुढें ॥ १९ ॥
जें आम्हीं पेरिलें तेंचि फळ आलें । उफराटें जालें तुजवरी कृपा ॥ २० ॥
पहिलेचि चुकी पडियेली थोरी । तुझे अधिकारी जालों आम्ही ॥ २१ ॥
खांदी बैसलें तें नुतरे खालतीं । तैसें हें अमुतें वोडवलें ॥ २२ ॥
सलगीं खेळवितां चुंबितां वदनीं । देतां टाकुनि मिठी घाली ॥ २३ ॥
तुझा त्याग करितां कोपतील संत । [4]हांसती समर्थ पिसुन लोक ॥ २४ ॥
सृष्टचादिका व्यापार राहिला परता । तुजसी बोलतां न पुरे वेळ ॥ २५ ॥

१ निरुते (पं.) २ हरिचें नाम (धु.)
३ चरण १५ नंतर खालील चार चरण (आ.) प्रतीत आहेत—
अहंकार अविवेक निरसोनी भ्रांती । सुखरूप शांति दिधली तुम्हां ॥ १ ॥
अविश्वास अलोट मेरुहुनी घनदाट । देउनि भावार्थ पीठ केलें ॥ २ ॥
देउनियां ज्ञान निरसिलें अज्ञान । तेणें समाधान जालें तुम्हां ॥ ३ ॥
अधर्म अज्ञान अनाचारा मूळ । देऊनि स्वधर्म तारियेले ॥ ४ ॥
४ हांसतील समस्त विषइ लोक ॥ (भा.)

कांहींच न मागसी देतांहि न घेसी । अखंड जीवेंसी जडोनि ठेला ॥ २६ ॥
वाढवितां भक्ति तुज नाहीं तृप्ती । काय करिसी अंतीं न कळे मज ॥ २७ ॥
मागें भक्त आम्हीं बहुत देखिले । [1]उठोनियां गेले क्षणामाजीं ॥ २८ ॥
अवतार अवतारीं नव्हेसी परता । संबंध तुटतां न दिसे तुझा ॥ २९ ॥
नामा म्हणे देवा होई समाधान । परियेसी वचन एक माझें ॥ ३० ॥

[१७१९]

पितयाचें भाग्य पुत्रासि पैं न ये । विरळा एखादा होय नांव राखे ॥ १ ॥
मी तंव अज्ञान जालों तुमचे पोटीं । तुझेनि आम्हां तुटी संसाराची ॥ २ ॥
होणार तें जालें न चले कांहीं केलें । विठ्ठलें दुराविलें जन्म मरणें ॥ ३ ॥
माझिये अदृष्टीं ऐसेंचि लिहिलें । जें मज निर्मियेलें चतुराननें ॥ ४ ॥
या विठोबाचे पाय हृदयीं धरावे । तेणें विसरावें भवदुःख ॥ ५ ॥
मी नेणें पूजाविधि नेणें क्रियासिद्धि । ऐसा अपराधी तारियेलों ॥ ६ ॥
अनुपम्य सुख देखिलिया चरणीं । घातली लोळणि माझ्या चित्तें ॥ ७ ॥
बहुत देव माझ्या पाहियेलें जीवें । केलें सर्वभावें कुटुंबदास्य ॥ ८ ॥
इहीं माझें चित्त केलें तडातोडी । नाहीं सुख घडी देखिलीं कांहीं ॥ ९ ॥
मग या पांडुरंगें माझी राखियेली लाज । हा माझा पूर्वज प्राणसखा ॥ १० ॥
अंतरींचें गुज सांगितलें मज । दिलें प्रेमबीज नामनिधी ॥ ११ ॥
सुख या दुःखाची निवारिली बाधा । शरीरसंबंधा वेगळें केलें ॥ १२ ॥
आपुलें म्हणोनि कृपेनें न्याहाळिलें । आवडी सांभाळिलें मायबापें ॥ १३ ॥
ऐसा मजलागीं स्नेहाळु न विसंबे जीवें । म्यां काय त्याचें व्हावें उतराई ॥ १४ ॥
नामा म्हणे मज अनाथालागुनी । न विसंबे निर्वाणीं पंढरीराव ॥ १५ ॥

[१७२०]

पतित अनेक पावन तूं एक । जालासी [2]सुरेख कवणाचेनी ॥ १ ॥
पतित मी भला कीं पावन तूं भला । सांग बा विठ्ठला मायबापा ॥ २ ॥
परिसाचें महिमान कैसेंनी वाढतें । निर्माण नसतें लोहो जरी ॥ ३ ॥

---

अभंग १७१९—(पं.) व (शि.), १७२०—(पं.), (धु.), (शि.) व (आ.)
१ उठोनि लाविले क्षणामाजी ॥ (पं.) २ सुश्लोक (पं. व आ.)

कल्पतरूची कीर्ति कैसेनी वाढते । जरि कल्पना नसती [1]याचकासी ॥ ४ ॥
प्रजेसी पोशिलें शोभती राजेश्वर । तैसा हा विचार तुम्हां आम्हां ॥ ५ ॥
[2]नामा म्हणे स्वामी नोव्हे ते आमुचे । तुज देवा कैचें क्रियाकर्म ॥ ६ ॥

[ १७२१ ]

[3]सर्व जीव तूं जालासी आपण । आम्ही का पतित तूं कैसा पावन ॥ १ ॥
[4]मना इंद्रियाचा तूंचि चाळविता । ठेवविसी सत्ता कोणे ठाईं ॥ २ ॥
सुवर्णाच्या पोटीं जाला अलंकारु । वानिति साचारु येकि भला ॥ ३ ॥
गंगासिंधु मिळणीं जाली सहस्त्रमुख । ओघ तो उदक आन नाहीं ॥ ४ ॥
बीजाचिया पोटीं वटाचा विस्तारु । सर्व तो आकारु तुझाचि असे ॥ ५ ॥
[5]नामा म्हणे ऐसे असतां निर्धारें । आम्हासी अव्हेर करूं नका ॥ ६ ॥

[ १७२२ ]

विषयाचे आळुकें जरी नव्हतों दीन । तरी दीनानाथा कोण म्हणती तुज ॥ १ ॥
सुष्ट दुष्ट तरी आमुचें आचरण । तें तुज भूषण जालें देवा ॥ २ ॥
पतितपावन ब्रीद कैसेनी जोडतें ॥ जरि आम्ही नव्हतों कर्मजड ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें आहे जी गा देवा । विचारीं केशवा मायबापा ॥ ४ ॥

[ १७२३ ]

रुसलासे नामा उभा गरुडपारीं । पितांबरधारी पालवी तो ॥ १ ॥
आपुल्या सुखाचा तुज देईन वांटा । तरी येसी वैकुंठा याचि वेळा ॥ २ ॥
आपुले निजपदीं तुज वैसवीन । उभा मी राहीन मागें पुढें ॥ ३ ॥
पितांबर छाया धरीन तुजवरी । तुज मी क्षणभरी न विसंबे ॥ ४ ॥

---

अभंग १७२१—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १७२२—(पं.) व (शि.), १७२३—(पं.), (शि.) व (धु.)

१ याचकाची (धु.)
२ नामा म्हणे सर्व आहे ते आमुचें । तुज देवा कैचें क्रियाकर्म ॥ (आ.)
३ सर्वजीवजंतु जालासी आपण । पतित पावन कैसा न होसी ॥ (पं.)
४ मन इंद्रियें तूंचि जालासी चाळिता । आमुच्या ठायीं कोणें ठेविली सत्ता ॥ (आ.)
५ नामा म्हणे सर्व तुझेंचि करणें । उगें खवळून घेऊं नको देणें ॥ (आ.)

व्यास अंबऋषि ध्रुवरुक्मांगद । तयाहुनी वंद्य करीन तुज ॥ ५ ॥
ऐसें माझे मनीं होतें बहुत दिवस । तूं कां रे उदास कवण्या गुणें ॥ ६ ॥
नामा म्हणे ऐसें नाहीं माझे चित्तीं । मज आहे विश्रांती तुझे पायीं ॥ ७ ॥

[ १७२४ ]

नेघें भूमंडळ न घाली तुज सांकडें । तुजवीण केवढी जोडी याची ॥ १ ॥
चरण मी सेवीन गाईन मी नाम । हृदयीं धरोन प्रेम नाचेन सदा ॥ २ ॥
ऋद्धिसिद्धि नेघें कामना न लगती । तुजवीण श्रीपती अवघें वेर्थ ॥ ३ ॥
रसातळ भूतळ वैकुंठासी नये । तुजवीण न पाहे ठाव कोठें ॥ ४ ॥
विष्णुदास आम्ही भक्तिविण नेघों । दारींच वोळगों तुझ्या देवा ॥ ५ ॥
नामा म्हणे हेचि चाड गा विठ्ठला । हा पुंडलिकें सांगितला गुह्य ठेवा ॥ ६ ॥

[ १७२५ ]

ऐसें नामा बोले आनंदें करोनी । तंव देव विचारूनी बोलियेले ॥ १ ॥
भला भला नाम्या शाहाणा जालासी । कां रे तूं न घेसी सांग मज ॥ २ ॥
येरू म्हणे देवा हें अवघेंचि नश्वर । तूंचि एक साचार पुरे आम्हां ॥ ३ ॥
अनंत कोटी ब्रह्मांडें वसती रोमरंध्रीं । त्या चरणाचे अग्रीं वसों आम्हीं ॥ ४ ॥
पुंडलिक जाणे त्याचें गुह्य गुज । उमजोनि तुज काय सांगों ॥ ५ ॥
नामा म्हणे मूळ सोय धरूं खोडी । ब्रह्मांडा येवढी नलगे पृथ्वी ॥ ६ ॥

[ १७२६ ]

प्रेम तें पडिभरें देवासी वोसंडे । क्षमा तयाकडे शोभतसे ॥ १ ॥
प्रेमाचें स्फुंदन न सांवरे नामया । पसरोनियां बाह्या देत क्षेम ॥ २ ॥
सावध रे नामया आलिंगिला नाहीं । आवडतें कांहीं सांग मज ॥ ३ ॥
उघडोनियां नयन पाहे दृष्टिभरीं । वैकुंठाभीतरीं चला जाऊं ॥ ४ ॥
ऐकोनियां नामा जालासे सावध । मग देतसे शब्द नारायणा ॥ ५ ॥
भक्तिविण सुख नेघेंचि वैकुंठ । पंढरीं प्रगट परब्रह्म ॥ ६ ॥

---

अभंग १७२४—(पं.), (शि.) व (भा.), १७२५—(पं.) व (शि.), १७२६—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

हेंचि गोड आम्हां आवडे बा हरी । वैकुंठाभीतरीं नाहीं चाड ॥ ७ ॥
सर्वकाळ सेवा करूं पैं कीर्तन । येणें माझें मन संतुष्ट सदा ॥ ८ ॥
संबोखिला नामा हृदयावरि हस्तक । येरू चरणीं तूं मस्तक ठेवी ॥ ९ ॥
माग रे नामया आवडे जितुलें । त्रिभुवना इतुलें ब्रह्मसुख ॥ १० ॥
देईन मागसी तें ऋद्धिसिद्धी कामारी । परिपूर्ण घरीं अखंडित ॥ ११ ॥
नामा म्हणे पंढरीं कीर्तन करीन । परि न सोडीं चरण तुझे ॥ १२ ॥

[१७२७]

मज घेउनियां बैसलासे किती । पाहे सहज स्थिति आपुलें सुख ॥ १ ॥
कांहीं तूं नव्हेसी विचारी मानसीं । चैतन्य आहेसि शुद्धबुद्ध ॥ २ ॥
क्रिया कर्म कर्ता नव्हेसी सर्वथा । आहे सर्वांगता रूप तुझें ॥ ३ ॥
भजतां भजन पूजितां पूजन । हें कांहींच जाण आथीचना ॥ ४ ॥
ज्ञान ज्ञेय ज्ञाता ध्याता ध्यान ध्येय । हे नाथिले उपाय नाहीं तूज ॥ ५ ॥
नामा म्हणे मज नलगेचि कांहीं । सेवा तुझी देईं जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

[१७२८]

जन्मजन्मांतरीं घेतलें धरणें । सांग कवण्या गुणें विष्णुदासा ॥ १ ॥
कांहींच न घेसी कांहींच न मागसी । ऋणें किती करिसी सेवारूपें ॥ २ ॥
चतुर्विधा मुक्ति अथवा धन संपत्ति । नलगे तुझे चित्तीं काय करूं ॥ ३ ॥
समुद्रवलयांकित अवघें भूमंडळ । अथवा रसातळ दुर्लभ कांहीं ॥ ४ ॥
भेटिलागीं आर्त आहे रे वैकुंठ । पाही तुज वाट रात्रंदिवस ॥ ५ ॥
नामा म्हणे सर्व ओसंडिलें चित्तें । तुझिया चरणापरतें नलगे कांहीं ॥ ६ ॥

[१७२९]

माझिया मनेंसी केला म्यां विचार । तव तेणें निर्धार सांगितला ॥ १ ॥
मज नलगे मुक्ति नलगे ब्रह्मज्ञान । पायरी होईन पंढरिची ॥ २ ॥
इंद्रियां मारितां येती काकुळती । तुजचि म्हणती ठायीं ठायीं ॥ ३ ॥
श्रवणीं श्रवण करणें अखंड तुझी कीर्ति । विश्वविठ्ठलमूर्ति देखों डोळा ॥ ४ ॥

अभंग १७२७—(बा.), १७२८—(पं.) व (धु.), १७२९—(पं.), (धु.) व (शि.)



अनुक्रमणिका

नामामृतें रसना निवाली त्या सुखें । नाठवती दुःखें जन्मांतरींचीं ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसा कोण भाग्यहीन । जो धरी वासने वैकुंठींचे ॥ ६ ॥

[१७३०]

निर्विकल्प नाम अनंत कल्पना । होसी नारायणा अव्यक्तेंसी ॥ १ ॥
लाज ते लाविली निर्गुणपणासी । श्रुति पुराणासी साम्य दावी ॥ २ ॥
चातुर्य सागर नंदाचा खिल्लारी । गायी निरंतरीं चारशील ॥ ३ ॥[१]
तूं देवपण मिरविसी निकें । नामा म्हणे सुख तुझे पायीं ॥ ४ ॥

[१७३१]

जन्ममरणाच्या खुंटती लहरी । वायां का येरझारीं सीणतोसी ॥ १ ॥
मी सांगेन तें करीं मन मुळीं आवरीं । एकांतीं क्षणभरी चला जाऊं ॥ २ ॥
आकारलें तितुकें आहे नाशिवंत । देव आणि भक्त कैंचा तेथें ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा असो तुझें [२]तुज । तुजवांचोनि मज न लगे कांहीं ॥ ४ ॥

[१७३२]

वतन आमुचें मिरास पंढरी । विठोबाचे घरीं नांदणूक ॥ १ ॥
सेवा करूं नित्य नाचूं महाद्वारीं । नामाची उजरी जागवूं तेथें ॥ २ ॥
साधुसंतां शरण जावूं मनोभावें । प्रसाद स्वभावें देती मज ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संत पाय हिरे देती वरू ॥ ४ ॥

[१७३३]

क्षण एक एकांतीं बैसोनि निवाडे । माग मज पुढें आवडे जें जें ॥ १ ॥
सीणभाग आपुला सांगे पैं वहिला । असेल जो वाटला मजविण ॥ २ ॥
पुरवीन जीवींचे सर्व तुझें कोड । गगनाहुनि वाढ असेल जरी ॥ ३ ॥

---

अभंग १७३०—(पं.), (शि.) व (आ.), १७३१—(पं.), (धु.), (आ.) व (शि.), १७३२—(पं.), १७३३—(पं.), (धु.) व (शि.)

१ काही हस्तलिखितांत चरण ३ व ४ यामध्ये पुढील चरण आहेत—
सगुण संबंध पडिलासे गांठी । कोण्या भक्तासाठीं काय धंदा ॥ (आ.)

२ गुज (आ.)

अनुक्रमणिका

वाटे माझे सर्व द्यावें तुझे हातीं । नामरूपवृत्तिसहित मन ॥ ४ ॥
परी सर्वभावें तुझें उदासिन चित्त । उरलें माझें आर्त कवण पुरवी ॥ ५ ॥
म्हणोनि पांडुरंग धरूनि हनुवटी । सांगे जिवींच्या गोष्टी नाम्याजवळी ॥ ६ ॥

[ १७३४ ]

विचारितां सहज कोणी नव्हे माझें । दृढ चरण तुझे धरियेले ॥ १ ॥
हेंचि माझें ज्ञान हाचि गुरुमंत्र । व्रत तप तीर्थ चरण तुझे ॥ २ ॥
हेंचि माझे पुज्य हेंचि माझें पूजन । [1]ध्याई तुझे चरण हृदयकमळीं ॥ ३ ॥
हेंचि माझी क्रिया हेंचि माझें कर्म । हाचि माझा धर्म चरण तुझे ॥ ४ ॥
हाचि परमानंद हेचि योगसिद्धी । लय लक्ष समाधि चरण तुझे ॥ ५ ॥[2]
नामा म्हणे मनें मानिला निर्धार । तरलों भवसागर याचीपरी ॥ ६ ॥

[ १७३५ ]

संकल्प विकल्प निरसुनियां भ्रांति । दावीन विश्रांति अभिनव तुज ॥ १ ॥
सर्वभावें माझी धरुनि आवडी । आस तूं रे सोडी इंद्रियांची ॥ २ ॥
जें जें विषयसुख लागेल तुझे मनीं । तें तूं खेवा घालुनी घेई मज ॥ ३ ॥
श्रवण घ्राण रसना त्वचा आणि लोचन । हे सकळ होऊनि मीचि भोगीं ॥ ४ ॥
यातायाती तुज न घाली रे सायास । धरी माझा विश्वास दृढ मनीं ॥ ५ ॥
अंतरीचें गुज बोलुनि पंढरीनाथ । आलिंगन देत नामयासी ॥ ६ ॥

[ १७३६ ]

सहज तुझें सुख आहे तुजजवळी । वायां मृगजळीं बुडों नको ॥ १ ॥
सावध होय पां सोय धरीं वेगीं । [3]अनुभवांगीं आनंद स्वस्वरूपीं ॥ २ ॥
हा हो जगडंबर पसरला पाल्हाळ । मायामय सकळ स्वप्न सर्व ॥ ३ ॥
शरीरसंपत्तीचा मानिसी निर्धार । तों हें क्षणभंगुर सत्य जाण ॥ ४ ॥

---

अभंग १७३४—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १७३५—(पं.) व (शि.), १७३६—(पं.), (शि.), (धु.) व (आ.)

१ ध्याईन (आ.) २ चरण ५ (शि.), (पं.) व (धु.) यांपैकी काही प्रतींत हा चरण मिळत नाही. ३ अनुभवी (आ.)



अनुक्रमणिका

आपले साउलीं जासी बैसावया । कोण तापलिया निववी तुज ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा असो तुझें ज्ञान । देवा तुजवांचुन आन नेणें कांहीं ॥ ६ ॥

[ १७३७ ]

महाद्वारीं सुख असे या सुखाचें । लागती संतांचे चरणरज ॥ १ ॥
म्हणोनियां स्थळ पाहिलें निवांत । जालें चित्त तेथें समाधान ॥ २ ॥
सकळ वैष्णवांसहित बोळवण करा । तुम्हीं हो दातारा मजलागीं ॥ ३ ॥
देव म्हणे नाम्या राहे पक्षभरी । पुरतील अंतरीं कोड तुझें ॥ ४ ॥

[ १७३८ ]

माय [1]मेली पोरटें लहान । कवाड धरून उभें ठेलें ॥ १ ॥
नेणतें बापुडें दारवंटा धरी । शेखीं आस करी भितरील ॥ २ ॥
राउळीं म्हणती कैचें हे भणंग । जंव तंव अंग चुकावीत ॥ ३ ॥
जाति नाहीं त्यासि कायसी पंगती । म्हणोनी एकांतीं बैसविलें ॥ ४ ॥
[2]सातादारवंठा बाहेर टाकी पूजा । तेथें बऱ्या वोजा बैसविलें ॥ ५ ॥
देव म्हणे नाम्या पोशीन मी तूतें । [3]नामामृतशितें देऊनियां ॥ ६ ॥

[ १७३९ ]

केशव पुसे नामयासी । तुझी नांदणूक कैसी ॥ १ ॥
आम्हां काय उणें काय उणें । तुझेनि धर्मे दातारा ॥ २ ॥
तुम्हां घरीं बोचकें लुगडीं । आम्हां घरीं पोरें उघडीं ॥ ३ ॥
तुम्हां घरीं दुर्ग दारवंटा । आम्हां घरीं बारा वाटा ॥ ४ ॥
तुम्हां घरीं गाई म्हैशी । आम्हां घरीं उंदिर घुशी ॥ ५ ॥
तुम्हां घरीं बटकी दासी । आम्हां घरीं आहेत लांसी ॥ ६ ॥
तुम्हां घरीं शेजा बाजा । आम्हां घरीं तृण-सेजा ॥ ७ ॥
तुम्हां घरीं सुवर्ण मडकीं । आम्हां घरीं खापरें फुटकीं ॥ ८ ॥

अभंग १७३७—(पं.), १७३८—(पं.) व (आ.), १७३९—(पं.)
१ 'नाम्या' हा शब्द अधिक आहे (आ.) २ केशवाचें नामें बाह्य (आ.) ३ मुठी मुठी शितें (पं.)

तुम्हां घरीं लेंकुरें वाडे । आम्हां घरीं तुळशी झाडें ॥ ९ ॥
नामा म्हणे तुमचे घरीं सोनें दाम । आमुचे घरीं तुमचें नाम ॥ १० ॥

[ १७४० ]

भक्त पुंडलिकें अससी उभा केला । त्याचेनि रागें मजसी धरिला अबोला ॥ १ ॥
मी तुझें पोसणें मी तुझें पोसणें । मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥ २ ॥
[1]तुझी कृपा नाहि रे सत्य । मी तरि प्रत्यक्ष रूप अवलोकितों ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा तूं जाणतोसी मातें । उफराटे पाहोनी गिळीन मी तूंतें ॥ ४ ॥

[ १७४१ ]

भक्ताचे हृदयिंची जाणोनि अवस्था । [2]आला शरणागता लोभापरू ॥ १ ॥
संता पुसे माझें दाखवा रे नामें । तुम्हां समागमें खेळे सदा ॥ २ ॥
दृष्टिसी दाटले कृपेचें भरितें । म्हणे तें आवडतें केउतें गेलें ॥ ३ ॥
निरजळे नयनीं कोमायिलें वदनीं । आणा रे गवसुनि आळीकरें ॥ ४ ॥
तंव तो वाट पाहत होता परलक्षी । भेटी देऊनि सुखी केला देवें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो तूं माझा सुखराशी । क्षणीं दूर जासी हृदयींचा ॥ ६ ॥

[ १७४२ ]

कां रे विष्णुदासा कोमाईलासी वदनीं । गांजिलासी कवणीं दुराचारी ॥ १ ॥
क्षण एक जीव न गमे मज वेगळा । मीहि त्या जवळां सदा असे ॥ २ ॥
वैकुंठ भुवन नलगे माझे चित्तीं । क्षणीं याचि खंति होईल तुज ॥ ३ ॥
लक्ष्मिचे विलासीं न घडे माझें मन । क्षणीं याचे प्राण जाजावती ॥ ४ ॥
मी वो याचे प्राण हाहि माझें मन । जाणती हे खूण भक्त माझे ॥ ५ ॥
म्हणोनि जवळी बोलाविला केशिराजें । नामा धरी वोजें चरण दोन्ही ॥ ६ ॥

[ १७४३ ]

देवा विनंती ऐक माझी । म्यां सेवा करावी तुझी ।
आस न धरावी [3]दुजी । या अभिलाषाकारणें ॥ १ ॥

अभंग १७४० व १७४१—(पं.), (शि.) व (आ.), १७४२ व १७४३—(पं.) व (शि.)
१ तुझी कृपा नाहीं रे हें सत्य। मी तरी प्रत्यक्ष अवलोकितों॥ (आ.) २ आल्या (आ.)
३ आणिकाची (पं.)

अनुक्रमणिका

तुज म्यां जिवें अनुसरावें । आणि तुम्हीहि तैसेचि अपंगावें ।
परी आणिकांचे न म्हणवावें । जन्मोजन्मीं दातारा ॥ २ ॥
मज न [1]मानोत सकळजन । परी तूं नको गां उदासीन ।
एका तुमच्या नामावांचुन । आणिक नेणें मी दातारा ॥ ३ ॥
तुज न पोसवे दातारा । तरी या आयुष्या घाली चिरा ।
[2]एका पोटासाठीं दुर्भरा । उपेक्षुं नको गा ॥ ४ ॥
वदनीं तुजचि वर्णावें. । श्रवणीं गुणनाम ऐकावें ।
नयनीं चरण न विसंबावे । क्षण एक दातारा ॥ ५ ॥
अगा येऊनियां संसारा । नवजावें आणिकाच्या द्वारा ।
इष्ट मित्र सज्जन सोयरा । बंधू आदिकरुनी ॥ ६ ॥
नाम विक्रयो न करावा । दान प्रतिग्रहो न घ्यावा ।
कष्टें करुनि मेळवावा । तोचि ग्रास आपुला ॥ ७ ॥
नको दिवटया छत्र घोडे । जेणें तुजसी अंतर पडे ।
तुझें नामची आवडे । मज बापुडे म्हणोत कां ॥ ८ ॥
ऐसा मी अन्यायी अपराधी । अहो मज तारी कृपानिधी ।
तुझें नामचि उच्चारी आधीं । थोर अट्टाहास करुनी ॥ ९ ॥
विष्णुदास नामा म्हणे । आम्हां उपेक्षिसी झणें ।
जन्मोजन्मींचें पोसणें । केशवा उणें येऊं नेदी ॥ १० ॥

[ १७४४ ]

कृपेच्या सागरा भक्तकरुणाकरा । परियेसी उदारा केशिराजा ॥ १ ॥
मज घातलें संसारीं काळाचें आहारीं । करुणा कैसी हरि न ये तुज ॥ २ ॥
माझी सोडवण करीं कृपानिधी । तोडी हे उपाधि संसाराची ॥ ३ ॥
पुत्र कलत्र बंधु सांगाति देहाचे । बांधिले मोहाचे वज्रपाशीं ॥ ४ ॥
तिहीं माझे चित्तीं केलें ताडातोडी । नाहीं एक घडी सुखलेश ॥ ५ ॥
सकळिक सांगाती संभार कामाचे । परी नेदिती नामाचे स्मरण कोणी ॥ ६ ॥
दुःखाचे डोंगर पडिले मजवरी । धांव बा श्रीहरी पांडुरंगा ॥ ७ ॥
ऐशा सुखगोष्टी न करिती मजसी कोण्ही । जालों चक्रपाणि परदेशी ॥ ८ ॥

अभंग १७४४--(पं.), (शि.) व (धु.)

१ गमेचि (पं.) २ एका या पोटा दुर्भरा । साठी आव्हेरू नको गा ॥ (पं.)

अनुक्रमणिका

शिणलिया न म्हणती बैस घे विश्रांति । आठवी या श्रीपति 'पांडुरंगा ॥ ९ ॥
सकळांचें दास्यत्व केली थोर आशा । मानिला भरंवसा होतील म्हणोनी ॥ १० ॥
तंव ते भजती आपुलिया हितां । न करिती माझी चिंता परलोकींची ॥ ११ ॥
ऐसा दुर्जनांचा करूनि पातेरा । केला मी मातेरा आयुष्याचा ॥ १२ ॥
कुटुंब काबाडी सदा कानकोंडा । जालों या ब्रह्मांडा भूमिभार ॥ १३ ॥
ऐसीं करुणेचीं वचनें ऐकोनी पंढरिरायें । कटिवरूनी बाहे उभारिली ॥ १४ ॥
ना भी नामया भय न धरीं सर्वथा । माझ्या शरणागता कोण गांजी ॥ १५ ॥

[ १७४५ ]

माझिया भक्तां जे ठेविती दूषणा । तुटोनि रसना पडेल त्यांची ॥ १ ॥
ऐसे दुराचारी असती जे नर । भोगिती अघोर सत्य जाणा ॥ २ ॥
माझिया भक्तां जे करिती छळण बुद्धि । त्याची वंशवृद्धि नव्हे कदां ॥ ३ ॥
माझिया भक्तांचा करिती उपहास । त्यांचा समूळ वंश यमलोकीं ॥ ४ ॥
केशव म्हणे नाम्या बोलिलों सत्यवाणी । लटिकें म्हणेल पतनीं पडेल पापी ॥ ५ ॥

[ १७४६ ]

केशव म्हणे नामयासी । जें तूं दूरी धरिला होतासी ।
तें तूं काकुळती भाकिसी । मजलागीं हिंडसी दाही दिशा ॥ १ ॥
तुझें गाऱ्हाणें सांगों संतापाशीं । तीहिं तुज सरतें केलें भक्तीसी ।
मी तंव वंद्य तीहिं लोकांसी । त्वां तंव मजसीं प्रजियेलें ॥ २ ॥
आमुचीं वर्में कर्में बोलतोसी । सलगी करूनि फार जातोसी ।
उंच पदवी दिल्या पाइकासी । तरी काय स्वामिसी भिऊं नये ॥ ३ ॥
मी विश्वासलों तुझिया भावासी । परि तूं शब्देंहि न पुससी ।
म्यां तंव अमृतदृष्टी पाहिलासी । अढळपदासी दावियेलें ॥ ४ ॥
मी तंव वंद्य त्रिभुवनासी । श्रुति स्मृति आगमासी ।
न कळे अठरा पुराणांसीं । ऐसें त्वां मजसी प्रजियेलें ॥ ५ ॥
आतां असोत बहुत बोलासी । शहाणे सितरले मानसीं ।
तप्तलोहा उदक ग्रासी । तैसा होऊनि ठेलासी विष्णुदास नामयारे ॥ ६ ॥

अभंग १७४५ व १७४६—(पं.) व (शि.)
१ जिवलगा (धु. व पं.)

अनुक्रमणिका

[१७४७]

भूमीं लोळे नामा कंठ सद्‌गदित । डोळिया स्रवत अश्रुजळा ॥ १ ॥
इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम । नाम्यासि सप्रेमें उचलिलें ॥ २ ॥
नाम्या तुज काय वाटतसे दुःख । संसाराचा शोक तुज जाला ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा तुज ऐसा दाता । मज भवव्यथा कवणेपरी ॥ ४ ॥

[१७४८]

तुझा तूं आहेसी नाम्या एकला एक । वायांचि कां शोक वाढविसी ॥ १ ॥
आपण मानसीं विचारोनि पाहीं । सावध नाम्या होई सोय धरीं ॥ २ ॥
तुझा तूंचि देव तुझा तूंचि भक्त । आहे पां सिद्धान्त गुरुमुखें ॥ ३ ॥
तुझा तूंचि पूज्य तुझा तूं पूजिता । भजन भजता तुझा तूंचि ॥ ४ ॥
तुझा तूंचि गुरु तुझा तूंचि शिष्य । तुझा तूं उपदेश घेई नाम्या ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा हेंचि सर्व माझें । हृदयीं चरण तुझे निरंतर ॥ ६ ॥

[१७४९]

तुझ्या माझ्या शेता नाहीं पेंडवळा । दावियेला डोळा पांडुरंगा ॥ १ ॥
कल्पनेची पेंडी पाप कुंदा काढी । काशा देशोधडी लावियेल्या ॥ २ ॥
त्रिगुणीं त्रिफणीं धरोनी सूत्रधारी । वेद बैल चारी जुंपियेले ॥ ३ ॥
अनाथाचें शेत प्रेमाचा [१]हेलावा । शेत राखे देवा पांडुरंगा ॥ ४ ॥
ब्रह्म नामबीज बांधोनियां ओटीं । पेरी दाटोदाटी नामदेव ॥ ५ ॥

[१७५०]

परियेसी नाम्या सांगतों मी तुज । अंतरींचें गुज [२]भक्तराया ॥ १ ॥
तूं माझें आवडतें कृपेचें पोसणें । चित्ताचें बैसणें करीन तुज ॥ २ ॥
येणें संतसंगें यावें माझ्या गांवा । [३]भोगावया राणिवा वैकुंठीच्या ॥ ३ ॥

अभंग १७४७—(पं.) व (शि.), १७४८—(पं.), (धु.) व (शि.), १७४९—(पं.) व (शि.), १७५०—(पं.), (शि.) व (धु.)

१ ओलावा (पं. व आ.) २ भरावया (धु.) ३ भोगावे (आ.)

अनुक्रमणिका

माझिया कथेची ज्या बहु आवडी । माझी प्रेम गोडी पडीये जया ॥ ४ ॥
त्याची पायधुळी [1]लागावी सर्वांगें । म्हणोनि मागें मागें हिंडतसें ॥ ५ ॥
भलतिया यातीचे भलतेनिच भावें । भलते एक ध्यावें नाम माझें ॥ ६ ॥
त्याचिया उपकारें दाटे मी सर्वथा । मुगुट करूनी माथां वाहिन त्यासी ॥ ७ ॥[2]
चिंता न करी नाम्या नुपेक्षी सर्वथा । अभयकरू माथां ठेवला देवें ॥ ८ ॥

[ १७५१ ]

मीच माझा देव मीच माझा भक्त । मी माझा कृतार्थ सहज असे ॥ १ ॥
बंध आणि मोक्ष मायेची कल्पना । पडली होती मना भ्रांति कैसी ॥ २ ॥
विठ्ठलें विचारें दाखविलें सुख । होते जें [3]असंख्य हरपलें ॥ ३ ॥
नामा म्हणे सोय सांपडली निकी । जालों येकायेकीं हरिचा दास ॥ ४ ॥

[ १७५२ ]

अवघा संसार सुखाचा करीन । [4]अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक ॥ १ ॥
अवघा शिणभाग हिरोन घेईन । अवघेंचि तोडिन मायाजळ ॥ २ ॥
अवघा जिवलग हाचि पैं होईल । अवघा घेईल भार माथां ॥ ३ ॥
अवघा त्रिविधताप क्षणें मावळेल । अवघा चालविल योगक्षेम ॥ ४ ॥
अवघ्या संसाराचें बैसणें मोडील । अवघेंचि तोडील मायाजळ ॥ ५ ॥
नाम्या म्हणे अवघी सांडी मिथ्या भ्रांति । विठ्ठलेंविण विश्रांती नाहीं कोठें ॥ ६ ॥

---

अभंग १७५१ व १७५२—(पं.) व (शि.)
१ लावावी (पं.)
२ सात व आठ चरणांमध्ये पुढील चरण सापडतो—
तनु मन प्राण दिधले जेणें मातें। मजहूनि पढीयंते नाहीं त्यासी॥ (आ.)
३ अशोख (शि.)
४ जरी जाला दुःखाचा दुर्धर हा॥ १॥ (पं.)
(पं.) प्रतीत दुसऱ्या चरणापासून असाही अभंग मिळतो—
विठोबाचें नाम गाइन मनोभावें। चित्त तेणें नावें सुख पावे॥ २॥
इंद्रियाचें कोड सर्वस्व पुरती। मनाचे मावळती मनोधर्म॥ ३॥
श्रवणीं श्रवणा नामाच्या प्रबंधा। नाईके स्तुति निंदा दुर्जनाचि॥ ४॥
कुंडलें मंडित श्रीमुख निर्मळ। पाहातां हे डोळे निवती माझे॥ ५॥
विटेसहित चरण धरिन मस्तकीं। तेणें तनु सुखी होईल माझी॥ ६॥
संत समागमें नाचेन रंगणीं। तेणें होईल धणि त्रिविध ताप॥ ७॥
नामा म्हणे सर्व सुखाचा सोइरा। न विसंबे दातारा क्षणभरी॥ ८॥

[१७५३]

भीत नाहीं भीत नाहीं । अखंडहि सावध ॥ १ ॥
उघड समाधि उघड समाधि । अंतर बुद्धि निर्मळ ॥ २ ॥
गोंविसी कासया गोंविसी कासया । पंढरिराया सांभाळी ॥ ३ ॥
नामा म्हणे जगज्जीवना । नारायणा सांभाळी ॥ ४ ॥

[१७५४]

मूर्खाहातीं दिलें रत्न पारखीसी । तयाच्या मोलासी घेऊं नका ॥ १ ॥
आम्ही तैसे जालों आम्ही तैसे जालों । आम्ही तैसे जालों जाणतेची ॥ २ ॥
अंगीं नाहीं बळ होड घाली राया । आम्ही गेलों वायां तेणें न्यायें ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें केलें तयापरी । आम्हीं निरंतर तुम्हांसवें ॥ ४ ॥

[१७५५]

योगानें जोडिली सायासें । ते मज वोळली वोरसे ॥ १ ॥
बरवी कामधेनु गाय । विठाबाई माझी माय ॥ २ ॥
नसतां सडा साठवण । तृप्त केलें त्रिभुवन ॥ ३ ॥
कोटि कुळें वोरसलीं । पुरोनि अवधींच उरलीं ॥ ४ ॥
न साहे अहंकाराचा वारा । आली दीनाचिया घरां ॥ ५ ॥
नामा म्हणे हें दुभतें । जोडुनि दिधलें असे आइतें ॥ ६ ॥

[१७५६]

देह [१]देव्हारा पाट हृदय संपुष्ट । मधीं कृष्णमूर्त बैसविली ॥ १ ॥
प्रेमाचे पाण्यानें प्रक्षाळिन तुज । आत्मस्वरूप निज पांडुरंगा ॥ २ ॥
भावें केलें गंध भक्तीची अक्षता । वाहिली [२]निढळा देवावरी ॥ ३ ॥
मन केला मोगरा चित्त केलें शेवंती । भक्तीची तुळसी अर्पियेली ॥ ४ ॥
धूप दीप आर्ती ओवाळिन तूज । एक केशवराज सकळ सिद्ध ॥ ५ ॥

अभंग १७५३ ते १७५५—(आ.), १७५६—(बा.)
१ देव पाट (बा.) २ अच्युता निढळावरी (बा.)

अनुक्रमणिका

त्रिगुणीं पक्वान्न केलें ब्रह्मार्पण । वांच्छित भोजन अर्पियेलें ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा सेवा केली एका । पंचप्राण सखा बिटेवरी ॥ ७ ॥

[ १७५७ ]

आषाढी कार्तिकी विसरूं नका मज । सांगतसे गुज पांडुरंग ॥ १ ॥
पतित पावन मी तो आहें खरा । तुमचेनि बरा दिसतसे ॥ २ ॥
तुम्ही जातां गांवा हुरहुर माझे जीवा । भेटाल केधवां मजलागीं ॥ ३ ॥
धांवोनियां देव गळां घाली मिठी । स्फुंदस्फुंदून गोष्टी बोलतसे ॥ ४ ॥
तिन्ही त्रिभुवनीं मज नाहीं कोणी । म्हणे चक्रपाणि नामयासी ॥ ५ ॥

[ १७५८ ]

आत्मत्वाच्यायोगें पाहूं जातां । नाहीं निरंतर भिन्न देवता ॥ १ ॥
वर्णाश्रम याति कुळ गोत्र । भक्ति सदोदित नामापाशीं ॥ २ ॥
नामा म्हणे भय मुळीं कांहीं नाहीं । अखंडित पाही भक्ति सार ॥ ३ ॥

[ १७५९ ]

आम्हांसी चिंतन अवश्य श्रीरामा । आवडी आणिक आम्हां नाहीं दुजी ॥ १ ॥
वोळगलों हरि भूतभावा निर्धारीं । दिसे चराचरीं भावरूप ॥ २ ॥
जें जें पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टीं । हरिरूपी भेटी हेंचि दिसे ॥ ३ ॥
नामा म्हणे विठ्ठल सर्वांभूतीं आहे । आणिक उपाये न लगती ॥ ४ ॥

[ १७६० ]

तीर्थासी जाऊनि काये म्यां करावें । वाउगें हिंडावें पंथें तेणें ॥ १ ॥
माझें तीर्थ क्षेत्र पंढरी पैं जाण । उघडें निधान दृष्टीपुढें ॥ २ ॥
मागें थोर थोरीं हेंचि पैं साधिलें । माम्यासी दिधलें खेचरानें ॥ ३ ॥

अभंग १७५७—(शि.) व (धु.), १७५८—(आ.), १७५९ व १७६०—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[ १७६१ ]

नामयानें बंद रे घेतिले । विठ्ठलासी जीत धरिलें ॥ १ ॥
नामा आलारे म्हणती । भेणें कळिकाळ कांपती ॥ २ ॥
भाव भक्ति करोनि कडी । विठ्ठल पायीं जडली बेडी ॥ ३ ॥
देह करूनि [1]बंदिठाणा । विठ्ठल सांठविलें निधाना ॥ ४ ॥
सोहं शब्दें मार केला । विठ्ठल काकुलती आला ॥ ५ ॥
नामा म्हणे विठ्ठलातें । जीवें गेल्या न सोडी तूतें ॥ ६ ॥

[ १७६२ ]

असो आतां किती हेचि ठेवाठेवी । कृपा विठ्ठलदेवीं केली मज ॥ १ ॥
अंतरींच्या सुखा नाचतसे भोजें । हेंचि निजगुज जाणवलें ॥ २ ॥
नामा म्हणे अंतरींचें निजगुज । सांगितलें मज पांडुरंगें ॥ ३ ॥

[ १७६३ ]

कांसवीचीं पिलें पोशिलीं कृपेनें । तैसा पैं आत्मज्ञानें सुखी जालों ॥ १ ॥
स्वप्नींचें संतोषें [2]मुके जेवीं उल्हासें । कीं सुखें हांसे नेणताची ॥ २ ॥
पक्षी फळालागीं अंतराळीं उडाला । न कळे कोठें गेला माग त्याचा ॥ ३ ॥
नामा म्हणे खूण अनुभव जाणें । ब्रह्मत्वीं पाहाणें केशवचरण ॥ ४ ॥

[ १७६४ ]

आम्हां जतन करावया उभा विटेवरी । तळुवटीं पंढरी ओढवली ॥ १ ॥
तिहीं लोकीं पिकला जगा जगजीवनु । प्राप्ति पाहुन दानु देत असे ॥ २ ॥
चातका चिंतनीं जलधर गगनीं । पुढार देऊनि पुंडलिका ॥ ३ ॥
विष्णुदास नामा विनवी वेळोवेळां । विठ्ठलीं जीवनकळा मुरालिसे ॥ ४ ॥

[ १७६५ ]

तरावया संसार जडजीव प्राणी । नाव नवखणी नवही मुखें ॥ १ ॥
बैसा नावेवरी नाहीं भेदाभेद । श्रवणाचे छंदें नाव गेली ॥ २ ॥

---

अभंग १७६१—(पं.), (शि.), (धु.) व (आ.), १७६२—(पं.) व (शि.), १७६३—(पं.), (शि.) व (आ.), १७६४—(पं.) व (शि.), १७६५—(आ.)

१ बंदिखाना (आ.) २ मुके (आ.)

अठराहि आवले नावेसी लागले । साहि रंग भरले मिरवताती ॥ ३ ॥
चहूं मुखें जयाचा न कळे विचार । तेवीं अगोचर सहस्रमुखा ॥ ४ ॥
तारील तारील हाचि पैं निर्धार । नामा पैल पार उतरला ॥ ५ ॥

[ १७६६ ]

माझा भाव तुझे चरणीं । तुझें रूप माझे [1]नयनीं ॥ १ ॥
सांपडलों एकमेकां । जन्मोजन्मीं नोहे सुटका ॥ २ ॥
त्वां तोडिली माझी माया । मी जडलों तुझ्या पायां ॥ ३ ॥
त्वां मज केलेंरे विदेही । म्यां तुज धरिलें हृदयीं ॥ ४ ॥
नामा म्हणे गा सुजाणा । सांग लटिके कोणे कोणां ॥ ५ ॥

[ १७६७ ]

मन जालें उन्मन वासना तल्लीन । देखें हरिचरण सर्वांठायीं ॥ १ ॥
गुरुशिष्य मात हरपला दृष्टांत । प्रत्यक्ष त्वरित हरि जाला ॥ २ ॥
नामा म्हणे पाहे रूप चहूं बाही । दिशाद्रुम दाही हरि दिसे ॥ ३ ॥

[ १७६८ ]

आम्ही परीट चोखट । शुद्ध केलें खटनट ॥ १ ॥
बोध साबण लाऊनी ठायीं । डाग उडविला पाही ॥ २ ॥
शांति शिळेवरी धुतलें । ज्ञानगंगें निर्मळ जालें ॥ ३ ॥
परब्रह्म होउनी ठेलों । नामा म्हणे सुखरूप जालों ॥ ४ ॥

[ १७६९ ]

अठ्ठावीस युगें उभा चंद्रभागें । परी पालटची नेघे पांडुरंग ॥ १ ॥
उभा उगेपणें पुंडलिकाचेनी सुखें । आहे तेथें लक्षें जैसा तैसा ॥ २ ॥

अभंग १७६६—(पं.), (धु.), (शि.) व (न.), १७६७—(पं.) व (शि.), १७६८—(शि.) १७६९—(आ.)
१ मनीं (न.)

अनुक्रमणिका

प्रेम रसरंगें प्रीतीचेनी पांगें । सदा संतसंगें खेळ करी ॥ ३ ॥
जो नलभे योगें यागें आणि देहत्यागें । तो सांपडला सर्वांगें हृदयीं धरा ॥ ४ ॥
धुंडाळितां श्रृतिस्मृति जो नुमगे । तो भक्ता साहे मार्गें सांभाळित ॥ ५ ॥
योगियांच्या ध्यानीं क्षणएक न रंगे । तो सुखी गोष्टी सांगे नामयासी ॥ ६ ॥

[ १७७० ]

आम्ही देह केलें दुकान । तेथें सांठविलें ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
एकें खेपे पैं लाभ जाला । आम्हां पंढरिनाथ भेटला ॥ २ ॥
पुण्य सत्वाची केली तागडी । ब्रह्म तुकून बांधिली पुडी ॥ ३ ॥
तुझा दास मी वाणिया भला । नामा केशवचरणीं विनटला ॥ ४ ॥

[ १७७१ ]

आतां मज भय नाहीं पैं कोणाचें । जन्ममरणाचें दुःख गेलें ॥ १ ॥
बद्ध मोक्षाची फिटली काजळी । समाधि लागली समाधीसी ॥ २ ॥
नामा म्हणे मज सर्वही साधन । खेचर चरण न विसंबे ॥ ३ ॥

[ १७७२ ]

कोटी दिवाळया दसरे । आम्हां हेचि जाले पुरे ॥ १ ॥
घरोघरीं ओवाळणी । विठ्ठल देखिला नयनीं ॥ २ ॥
जाला सुखाचा शेजार । करा नामाचा गजर ॥ ३ ॥
नामयाचा स्वामी आला । ब्रह्मादिकां आनंद जाला ॥ ४ ॥

[ १७७३ ]

मी म्हणे उरलें पोटीं माया बालक । पाहे तंव कौतुक तेंही नाहीं ॥ १ ॥
तेथिचे तेथें दंपत्य लोपलें । कळिकाळें मंथिले नामें थोर ॥ २ ॥

अभंग १७७० ते १७७२—(आ.), १७७३—(पं.)

अनुक्रमणिका

तेचि घेऊनि ठेलों [1]मी येथें लोपलों । ब्रह्मींच गुंतलों [2]ब्रह्मीमाळे ॥ ३ ॥
नामा म्हणे चैतन्य चैतन्या मिळालें । अरूप रूपें ठेलें आपणांमाजी ॥ ४ ॥

[ १७७४ ]

मज तुज निगदले निगदले । राहे कळिकाळा उगले ॥ १ ॥
अरे खंडले एके बोलें । समर्थें होतां अंगिकारलें ॥ २ ॥
नाम्यानें संसारिक जिंकिले । केशवचरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

[ १७७५ ]

सहस्रनामाचें वाटगें । खांदीं घेतलें नेटगें ॥ १ ॥
देवा पाती तुझी देवा पाती तुझी । सरकत माझी भक्तिभावें ॥ २ ॥
पंढरिये गेलों हाटा । दुकान मांडिलें वाळुवंटा ॥ ३ ॥
वैष्णवांची भरली सात । गिऱ्हाईक पातलें बहुत ॥ ४ ॥
विकरा होतसे नामाचा । लाभ जाला त्या विठ्ठलाचा ॥ ५ ॥
नामा देखूनि दुबळा । विठ्ठलें दिधलें भांडवला ॥ ६ ॥

[ १७७६ ]

कोटी सूर्य प्रभादीप्ती । गगनीं झळकली अवचितीं ॥ १ ॥
संत नामयासी सांगती । पैल आला कमलापति ॥ २ ॥
वच्छालागीं जैसी धेनु । तैसा धांवे जगज्जीवनु ॥ ३ ॥
गरुडाचे [3]पक्षवाति । दाही दिशा आक्रंदती ॥ ४ ॥
हरि कंठींची सुमनमाळ । सुटूनि आली भूमंडळा ॥ ५ ॥
सवें चाले सुदर्शन । भक्त करावया रक्षण ॥ ६ ॥
उचलोनि दोहीं बाहीं । नामा धरिला हृदयीं ॥ ७ ॥

---

अभंग १७७४—(शि.), १७७५—(आ.), १७७६—(पं.), (शि.) व (भा.)
१ मा येथें लोपलों। (पं.) २ ब्रम्हमाळे (आ.) ३ धुंधुवाती (पं. व आ.)

अनुक्रमणिका

[१७७७]

क्षणीं दृष्टि लागो तुझ्या सगुणपणा । तेणें माझ्या मना बोध केला ॥ १ ॥
अनंता जन्मींचें विसरलों दु:ख । पाहतां तुझें मुख पांडुरंगा ॥ २ ॥
योगियांच्या ध्यानीं ध्यातां नातुडसी । तो तूं आम्हांपाशीं मागें पुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे जीवें करीन निंबलोण । विटेसहित चरण वोवाळीन ॥ ४ ॥

अभंग १७७७—(पं.) व (धु.)

● ● ●

अनुक्रमणिका

[ १७७८ ]

ऐका कलियुगाचा धर्म । पुत्र सांगे पितयास काम ।
ब्राह्मण त्यजिती ब्रह्मकर्म । ऐसें वर्तमान मांडलें ॥ १ ॥
माया बहिणी दवडिती । स्त्री आपुली आणविती ।
ऐका ऐका नवल गती । अगा श्रीपति परियेसी ॥ २ ॥
भार्या न करिती पतिची सेवा । नाहीं कवणा धर्माचा हेवा ।
वर्ततसे पापाचा ठेवा । अगा केशवा परियेसी ॥ ३ ॥
अरे वैराग्याचा घराचारू । आणि संन्यासा मोह थोरू ।
संता बहुत अहंकारू । रुसणें न लगे कोणासी ॥ ४ ॥
जाला कलिचा प्रवेशु । [1]तुम्हां नामाचा विश्वासु ।
हृदयीं हृषिकेशु । विष्णुदास नामा म्हणे ॥ ५ ॥

[ १७७९ ]

[2]ऐसा कलियुगींचा आचार । [3]क्रियाभ्रष्ट जाले नर ॥ १ ॥
मंचकावरी बैसे राणी । माता वाहतसे पाणी ॥ २ ॥
स्त्रियेसी अलंकार भूषण । माता वळितसे शेण ॥ ३ ॥
स्त्रियेसि पाटावाची साडी । माता नेसे चिंध्या लुगडीं ॥ ४ ॥
सासुसासऱ्या योग्य मान । मायबापा न घाली अन्न ॥ ५ ॥
साली सासवा आवडती । बहिण भावां तोंडीं माती ॥ ६ ॥
स्त्रियेसी एकांत गोडी । मातेसी म्हणे रांड वेडी ॥ ७ ॥
म्हणे विष्णुदासें नामा । ऐसा कलियुगींचा महिमा ॥ ८ ॥

---

अभंग १७७८—(पं.) व (शि.), १७७९—(पं.), (धु.) व (भा.)

१ आम्हां (बा.)

२ याच आशयाचा अभंग फिरून पुढे आला. तो असा—
पलंगीं नारी बैसवुनि । माये हातीं वाहे पाणी ॥ १ ॥
ऐसा कलियुगीं आचार । क्रियाभ्रष्ट जाले नर ॥ २ ॥
स्त्रीसी पाटावाची चोळी । माता सिविती सोंवळी ॥ ३ ॥
स्त्रियेचा कैवार वोढी । मातेसी म्हणे रांड वेडी ॥ ४ ॥
स्त्रीचें ऐकोनि उत्तर । सख्या बंधुसि पाडी वैर ॥ ५ ॥
म्हणे विष्णुदास नामा । ऐसा कलियुगाचा महिमा ॥ ६ ॥

३ अधर्मपर (आ.)

[ १७८० ]

'कांहीं सांगोनि गेले वचना । कृष्ण उपदेशी पंडुनंदना ।
येथें राहतां पाविजे बंधना । थोरं वर्तमान कलियुगीं ॥ १ ॥
या कलिमाझारीं । पुत्र पित्याचे वैरी ।
घरची माता होय कामारी । पुरुषांतें नारी अव्हेरिती ॥ २ ॥
न येती वृक्षा फळें आटती धेनु । न पिके मही न वर्षे घनु ।
यापरी आटेल सकळ जनु । ऐसे जगजीवनु बोलिले ॥ ३ ॥
आणिक एक वर्तेल अपवित्र । ब्राह्मण सांडितील वेदमंत्र ।
आचार सांडूनि होती शुद्र । ऐसे अपवित्र कलियुगीं ॥ ४ ॥
थोर वर्तमान पडेल काळु । चहुं वर्णांचा होईल एकचि मेळू ।
कोणी कोणाचा न धरिती विटाळु । मग गोपाळु निघते जाले ॥ ५ ॥
आतां वेळोवेळां सांगों किती । मोडला धर्म जाली प्रवृत्ति ।
विष्णुदास नामा येतो काकुळती । कैसेनि करूं भक्ती पंढरीराया ॥ ६ ॥

[ १७८१ ]

पाप्या नावडे संतसंगति । लोभिया नावडे उदारवृत्ति ।
व्यभिचारिणी नावडे पति । नावडे ज्योति उजियेडा ॥ १ ॥
चांदणें नावडे तया चोरा । सद्बुद्धि नावडे रांडपोरा ।
सावधान नावडे तया हेरा । सत्य कुचरा नावडे ॥ २ ॥
तीर्थ नावडे तयां दुष्टा । न्याय नावडे नष्टा ।
कणव नावडे तया पापिष्टा । अभिमान नष्टा न संडवे ॥ ३ ॥
भक्ति नावडे तया खळा । पुण्य नावडे तया चांडाळा ।
देखत देखत जन आंधळा । कां रे घननीळा विसरलेती ॥ ४ ॥
पारखी नावडे तया खोटचाला । स्नान नावडे तया विटाळा ।
सुसंग नावडे नाठाळा । न्याय तंटचाला नावडे ॥ ५ ॥
धर्म नावडे तया कृपणा । शुद्धि नावडे दुर्जना ।
कर्म नावडे अब्राह्मणा । ऐसी दुष्ट वासना पापियातें ॥ ६ ॥
नाम नावडे तया नष्ट भक्ता । व्रत नावडे तया सर्वथा ।
नावडे भजन कैंचीं कथा । नाहीं पतिव्रता कलियुगीं ॥ ७ ॥

अभंग १७८०—(बा.), १७८१—(शि.)
१ मागें (बा.)

ऐसा आला कलिचा प्रवेश । धरा नामाचा विश्‍वास ।
जीवीं धरा हृषिकेश । विष्णुदास नामा म्हणे ॥ ८ ॥

[ १७८२ ]

[1]देवाछळें पाप कांपते मेदिनी । षट्‍कर्म सांडियेलें ब्राह्मणीं ।
दैत्याचेनी भारें दाटली अवनी । प्रथम चरणीं कलियुगीं ॥ १ ॥
लटिक्याचा साच जिंकियेला कली । पाखांडी वेदांतें न मानिती बळी ।
अधर्म प्रवर्तला महितळीं । ऐसी पापें कळीं थोर जालीं ॥ २ ॥
म्हणोनी करुणा भाकितु आहे । जैसी व्याघ्रें वेढिली गाये ।
तेवीं पंचानन ग्रासूं पाहे । तैसें दिसती नारायणा ॥ ३ ॥
भक्ति भावो नावडे पैं गा । जैसें कां अमृत मुखीं भुजंगा ।
डंख करूं आवडे जगा । ऐसें श्रीरंगा नवल चोज ॥ ४ ॥
भ्रतारभक्ति सोडियेली नारी । परपुरुषीं मन निर्धारीं ।
पितयासि पुत्र असो नेदी घरीं । नित्य निंदा करी रे अपमान ॥ ५ ॥
म्हणोनिया जीवें त्रासु घेतला । सत्य लोपलें धर्म बुडला ।
अझुनि काय पाहतोसि उगला । धांवे विठ्ठला म्हणे नामा ॥ ६ ॥

[ १७८३ ]

वेदांवेगळें कर्म करी । मनीं पाखंड धरी ।
तो पविजे अघोरीं । चिरकाल वरी ॥ १ ॥
तो न आणावा पैं दृष्टीं । तोचि दोषी एक या सृष्टीं ।
तो होईल महा कष्टी । हरिसी न भजतां ॥ २ ॥
संध्या स्नान नेणें दान । नेणें हरिकथा श्रवण ।
तोहि पतित जाण । महापातकी चांडाळ ॥ ३ ॥
सांडुनि ब्राह्मणपण । शूद्ररीती आचरण ।
तो कष्टी पडलिया जाण । महादोष घडेल ॥ ४ ॥
निंदा करी जो संतांची । पूजा नेणें जो देवाची ।
तोचि राशि पापाचि । प्रत्यक्ष जाणावी ॥ ५ ॥

---

अभंग १७८२ व १७८३—(आ.)
१ पाप छळें (आ.)

अनुक्रमणिका

तीर्थ न करी हिंडतां । व्रत न करी बोलतां ।
पुराण नायकें पाहतां । तो तंव राक्षस जाणावा ॥ ६ ॥

सदा अमंगळ अशुची । गुरु आज्ञा भंगी साची ।
अखंड निंदा करी संताची । तो स्वामिद्रोही जाणावा ॥ ७ ॥

कपट शिके नानाविध । गोत्रजाशीं करी विरोध ।
तो जाणावा हें प्रसिद्ध । महा पातकी चांडाळ ॥ ८ ॥

गृहदारावरी नाहीं चित्त । परस्त्रियेसीं करी स्तुत ।
तो प्रत्यक्ष महादैत्य । त्याचें मुख पाहों नये ॥ ९ ॥

नाठवी जो उपकार । स्वामिसी न करी जो नमस्कार ।
तो जन्मांतरिंचा होय नर । पतित चांडाळ बोलिजे ॥ १० ॥

पाखंड रचि कवित्व । मातापितयाचें न करी महत्व ।
पंच पातकी जिवित्व । तो पूर्वीचा बोका होता ॥ ११ ॥

नामा म्हणे तैसे दोषी । न आणावे पंढरियेसी ।
काय करावे ते पाषाण जन्मासी । जे विठ्ठलनामासी मिळतीना ॥ १२ ॥

[१७८४]

कृष्णाचें कीर्तन नावडे ज्या नरा । जन्मोनि अघोरा पडे नरकीं ॥ १ ॥
कृष्णाचें श्रवण नाइके जो कानीं । तयासि मेदिनीं ठाव कैंचा ॥ २ ॥
कृष्णविष्णुकथा नावडे पैं नित्य । तयासी पैं सत्य ग्रह बाधी ॥ ३ ॥
रामकृष्ण हरि न पाहे पैं मूर्ति । तया यम नेती अंतीं जाणा ॥ ४ ॥[1]
नामा म्हणे हे नर कलियुगीं उदंड । घरोघरीं पाखांड करिताती ॥ ५ ॥

[१७८५]

त्यागेंविण विरक्ति । प्रेमावांचुनि भक्ति ।
शांति नसतां [2]ज्ञप्ति । शोभा न पवे ॥ १ ॥

दमनेवांचुनि यति । मननेंविण मुनिपति ।
योगी नसतां युक्ति । शोभा न पवे ॥ २ ॥

---

अभंग १७८४—(पं.) व (शि.), १७८५—(पं.), (शि.) व (आ.)
१ चरण ४ व ५ यांच्यामध्ये खालील चरण (पं.) प्रतीत आढळतो—
कृष्णासि न पाहे सीवासी जो भेदूं । जन्मोनि विरोधु द्वैतकारी ॥ ५ ॥
२ दीप्ति (पं.)

अनुक्रमणिका

बहिर्मुख कवि मति । नेमावांचुनियां वृत्ति ।
बोधेंविण महंती । शोभा न पवे ॥ ३ ॥

अनधिकारा व्युत्पत्ति । गुरु तो कनिष्ठ याति ।
[1]मा ते मीच शिष्यवृत्ति । शोभा न पवे ॥ ४ ॥

हेतुवांचुनि प्रीति । गुणरहित स्तुती ।
करणीवांचुनि कीर्ति । शोभा न पवे ॥ ५ ॥

सत्समागमसंगती । बाणली नसतां चित्तीं ।
नामा म्हणे क्षिति । शोभा न पवे सर्वथा ॥ ६ ॥

[ १७८६ ]

निर्विकार स्वरूप काशानें आतुडे । जंववरी न संडे मीतूंपण ॥ १ ॥
शब्दचित्रकथा बोलती पाल्हाळ । मन नाहीं निश्चळ रामकृष्णीं ॥ २ ॥
अणुचें प्रमाण असतां दुजेपण । मेरु तो समान देईल दुःख ॥ ३ ॥
नामा म्हणे विश्वात्मक रूप पाही । तरिच ठाईंचा ठाईं निवशील ॥ ४ ॥

[ १७८७ ]

[2]सोंगाचें वैराग्य अनर्थ हें मूळ । आशा तें केवळ मिथ्या जाण ॥ १ ॥
अंतरापासुनि नसतां विवेक । निभ्रांत चटक आशावरी ॥ २ ॥
राजस तामस करोनियां गोळा । होतसे आंधळा दाटोनियां ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐशा उदंड उपायें । विठोबाचे पाय अंतरिती ॥ ४ ॥

[ १७८८ ]

मुखीं नाहीं नाम । काय जपतो श्रीराम ॥ १ ॥
काय आसन घालुन । मुखीं नाहीं नारायण ॥ २ ॥
टिळे टोपी माळा दावी । भोळ्या भाविकांसी गोवी ॥ ३ ॥
नामा म्हणे त्याचा संग । नको चित्ता होय भंग ॥ ४ ॥

---

अभंग १७८६—(पं.) व (धु.), १७८७—(बा.), १७८८—(आ.)
१ माता नीच शिश्नवृत्ती। (आ.)
२ सात्विक हें वैराग्य अर्थाचें हें मूळ। आशा हे केवळ अनर्थ जाण ॥ (बा.)

अनुक्रमणिका

[ १७८९ ]

गोमुखीं गोंवुनि काय जपतोसि । जपतप त्यासी विघ्न करी ॥ १ ॥
नामसंकीर्तनें जळतील पापें । चुकतील खेपा चौऱ्यांशीच्या ॥ २ ॥
उपवास करी उग्र अनुष्ठानीं । तया चक्रपाणि अंतरतो ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे बहुतेक प्राणी । पिचतील खाणीं भ्रष्ट लोक ॥ ४ ॥

[ १७९० ]

कांचनिक भक्ति सर्वकाळ करी । बहुतांचे वैरी हित नेणें ॥ १ ॥
लोकांपुढें सांगे आम्ही हरिभक्त । न होय विरक्त स्थिति ज्याची ॥ २ ॥
असंतोषी सदा अतितासी [1]जाळी । सुकृताची होळी स्वयें केली ॥ ३ ॥
वेदमर्यादा सांडुनि चालती । हुंबते घेती वाऱ्यासवें ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां असो याची मात । सुख नेणें हित कदा काळीं ॥ ५ ॥

[ १७९१ ]

सिबुर दावुनि बैसलें हाटीं । सांगताहे गोष्टी जाणिवेच्या ॥ १ ॥
कापियेलें नाक जालें ते निःशंक । वारे भुरभुरां देख वाजतसे ॥ २ ॥
दवडा दवडा परतें [2]करील निंदा । [3]घ्यावा कां कांदा मुळीहुनी ॥ ३ ॥
[4]नामा विनवितसे केशवातें सत्ता । उरलें सुरलें आतां अवघे तासां ॥ ४ ॥

[ १७९२ ]

यज्ञादिक कर्म करूनि ब्राह्मण । दंभ आचरण दावी लोकां ॥ १ ॥
लोकांसी दाविती मीच कर्मनिष्ठ । अभिमान खोटा वागविती ॥ २ ॥
वागविती वाक्य जाण ऋषीश्वर । नको येरझार नाना मतें ॥ ३ ॥
नानामतें अधोऊर्ध्वसात जावीं । नको गोंवागोंवी नामा म्हणे ॥ ४ ॥

---

अभंग १७८९—(आ.), १७९०—(बा.), १७९१—(पं.) व (शि.), १७९२—(आ.)
१ टाळी (बा.) २ करी संत निंदा।
३ घ्या कां जिव्हे कांदा मुळीहुनी ॥ ३॥ (पं.)
४ विष्णुदास नामा विनवति केशवा। उरले सुरले तासावा आवघेचि ॥ ४॥ (पं. व शि.)

अनुक्रमणिका

[ १७९३ ]

वेदाध्ययन करिसी तरी वैदिकचि होसि । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ १ ॥
[1]पुराण सांगसी तरी पुराणिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ २ ॥
गायन करिसी तरी गुणिजन होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ३ ॥
कर्म आचरसी तरी कर्मठचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ४ ॥
यज्ञ करिसी तरी याज्ञिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ५ ॥
तीर्थ करिसी तरी कापडीच होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ६ ॥
नामा म्हणे नाम केशवाचें घेसी । तरीच वैष्णव होसी अरे जना ॥ ७ ॥

[ १७९४ ]

योगी ब्रह्मचारी सिद्ध ब्रह्मज्ञानी । ते तों तुज कोणी न येती कामा ॥ १ ॥
कोंडुनी इंद्रियें बैसती समाधि । हळुच तुझ्या पदीं झेंपावती ॥ २ ॥
एवढें विश्वरूप नाहीं ऐसें केलें । सकळ होऊनि ठेले आपणचि ॥ ३ ॥
ऐसियाचा विश्वास न धरिसी देवा । नामा तुज केशवा विनवितसे ॥ ४ ॥

[ १७९५ ]

गोसावीपणाचा दाखविती वेष । नाहीं निजध्यास हरिनामीं ॥ १ ॥
वरी वरी आर्त दाविती झगमग । अंतरीं तो संग विषयाचा ॥ २ ॥
व्यर्थ लोकांपुढें हालविती [2]माना । केली [3]विटंबना संसाराची ॥ ३ ॥
नामा म्हणे मन [4]गुंतेल पांडुरंगा । आतां ऐशा सांगा कोण रीती ॥ ४ ॥

[ १७९६ ]

विष्णुसी भजला शिव दुस्हाविला । अधःपात जाला तया नरा ॥ १ ॥
शिवपूजा करी विष्णुसी अव्हेरी । तयाचिये घरीं येम नांदे ॥ २ ॥
विष्णुकथा ऐके शिवासी जो निंदी । तयासी गोविंदीं ठाव नाहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे शिवविष्णुमूर्ति एक । वेदाचा विवेक आत्माराम ॥ ४ ॥

अभंग १७९३—(पं.), (शि.) व (धु.), १७९४—(आ.), १७९५—(पं.), (शि.), (बा.) व (आ.), १७९६—(पं.) व (शि.)

१ शास्त्र शिकसी तरी शास्त्रज्ञचि होसी। (पं.) २ मान (आ.) ३ विटंबन (पं.) ४ गुंतते (बा.)

[१७९७]

डोई बोडून केली खोडी । काया नागविली बापुडी ॥ १ ॥
ऐसा नव्हे तो संन्यास । [1]विषय देखोनि उदास ॥ २ ॥
मांजराचे गेले डोळे । उंदीर देखोनि तळमळे ॥ ३ ॥
वेश्या जाली पट्टराणी । तिला आठवे मागील करणी ॥ ४ ॥
नामा म्हणे वेष पालटे । परि अंतरींचें ओशाळ न तुटे ॥ ५ ॥

[१७९८]

पोटासाठीं जरी करी हरिकथा । जन रंजवितां फिरतसे ॥ १ ॥
तेणें घात केला एकोत्तरशतकुळांचा । पाहुणा यमाचा श्रेष्ठ थोर ॥ २ ॥
द्रव्याचिये आशें हरिकथा करी । तया यमपुरीं नित्य वास ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे होत जे रे कोणी । ते नर नयनीं पाहूं नये ॥ ४ ॥

[१७९९]

हरिभक्त म्हणविणें आणि हरिदर्शना न जाणें ।
बोलतां लाजिरवाणें आहे जी देवा ॥ १ ॥
पतिव्रता म्हणविणें आणि परपुरुषीं विचरणें ।
बोलतां लाजिरवाणें आहे जी देवा ॥ २ ॥
योगिया म्हणवणें आणि इंद्रिया नाहीं दमनें ।
बोलतां लाजिरवाणें आहे जी देवा ॥ ३ ॥[2]
क्षत्रिय म्हणविणें आणि पाठींशीं घाय साहणें ।
बोलतां लाजिरवाणें आहे जी देवा ॥ ४ ॥
पितृभक्त म्हणविणें आणि पितृआज्ञा न पाळणें ।
बोलतां लाजिरवाणें आहे जी देवा ॥ ५ ॥
ऐसे भक्त किती गेले अधोगति ।
नामा म्हणे श्रीपति दास तुझा ॥ ६ ॥

---

अभंग १७९७—(बा.), १७९८—(धु.), १७९९—(पं.), (शि.) व (धु.)
१ करी विषयाचा न्यास॥ (बा.) २ चरण ३ (आ.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

[१८००]

कडू वृंदावन साखरें घोळिलें । तरी काय गेलें कडूपण ॥ १ ॥
तैसा तो अधम करो तीर्थाटण । नोहे त्याचें मन निर्मळ तें ॥ २ ॥
बचनाग रवा दुग्धीं शिजविला । तरी काय गेला त्याचा गुण ॥ ३ ॥
नामा म्हणे संतसज्जनसंगतीं । ऐशासहि गति काळांतरीं ॥ ४ ॥

[१८०१]

दावी जडीबुट्टी जारण मारण । नागवें हिंडणें काय काज ॥ १ ॥
दावी उग्र तप केले उपवास । फिरतांहि देश काय काज ॥ २ ॥
काय काज तरी होसील फजित । स्मरारे अनंत सर्वकाळ ॥ ३ ॥
नामा म्हणे नव्हे उदंड उपाय । धरी आधीं पाय विठोबाचे ॥ ४ ॥

[१८०२]

लांब लांब काय सांगशील गोष्टी । करी उठाउठी निरभिमान ॥ १ ॥
मीतूंपण जंव दंभ गेला नाहीं । साधिलें त्वां न कांहीं तत्त्वसार ॥ २ ॥
अहंभाव देहीं प्रपंचाचे दृष्टी । काय चाले गोष्टी रोकडी ते ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे नेणती विचार । जाती निरंतर यमपंथें ॥ ४ ॥

[१८०३]

मी तूं हें कथन सांगसी काबाड । विठ्ठल हें येवढें न सांगसी ॥ १ ॥
ऐसें कांहीं सांग जेणें फिटे पांग । नित्य पांडुरंग भजन सोये ॥ २ ॥
मी आणि तूं हें वचन वोखटें । विठ्ठलीं विनटे दिननिशीं ॥ ३ ॥
नामा म्हणे भाव ऐसा धरीं सकळ । तुष्टेल गोपाळ [1]संवरिता ॥ ४ ॥

[१८०४]

मुखीं नाम हातीं टाळी । दया नुपजे कोणे काळीं ॥ १ ॥
काय करावें तें गाणें । धिक् धिक् तें लाजिरवाणें ॥ २ ॥

---

अभंग १८०० ते १८०२—(आ.), १८०३—(पं.) व (शि.), १८०४—(पं.), (गं.) व (शिं.)

१ नाम घेतां (पं.)

हरिदास म्हणोनि हलवि मान । कवडीसाठीं घेतो प्राण ॥ ३ ॥
हरिदासाचे पायीं लोळे । केशीं धरोनी कापी गळे ॥ ४ ॥
[1]नामा म्हणे अवघे चोर । [2]हरिनाम हें थोर ॥ ५ ॥

[१८०५]

ताकहि पांढरें दूधहि पांढरें । चवी जेवणारे जाणवीते ॥ १ ॥
केळयाच्या पाठीवर ठेविला दोडका । तोहि म्हणे विका तेणें मोलें ॥ २ ॥
ढोर म्हणती आम्हां हाकारलास । वारूवा सरसें खाऊं घांस ॥ ३ ॥
मंदल्याजेती घरोघरीं गाती । धृपदासाठीं ताक मागती ॥ ४ ॥
नामा म्हणे सोपीं कवित्वें जालीं फुका । हरि हरि म्हणतां आपुलिया सुखा ॥ ५ ॥

[१८०६]

योग याग यज्ञ इच्छिती कामना । परि केशव निधाना विसरला ॥ १ ॥
नेणेंचि हें मन भुललें अज्ञानें । यातायाति पतन भोगूं पाहे ॥ २ ॥
ज्याचेनि जाहलें तुझें हें शरीर । त्याचा नामोच्चार ना ये वाचे ॥ ३ ॥
नामा म्हणे कांरे नेणसी अज्ञुनी । केशवचरणीं अनुसरे कां ॥ ४ ॥

[१८०७]

गेला परमहंस परिवारासहित । कोल्लाळ करिती मायबहिणी ॥ १ ॥
काया हे नगरी पांचहि तराळ । निद्रेनें भ्रमले व्याकुळ जाले ॥ २ ॥
गेला [3]मागु न दिसे कवणिये वाटे । नवहि द्वारें पडलीं सपाट ओस ॥ ३ ॥
नामा म्हणे चोरी एके अंगणांत । दिवसा रात्रीं पडत खाण तेथें ॥ ४ ॥

[१८०८]

नाहीं परमार्थ पोटीं धनआशा । धरोनी हव्यासा घनमान ॥ १ ॥
दंभमान दावी ज्ञानमार्ग मोठा । पुढिलांसी वाटा यमपंथें ॥ २ ॥

---

अभंग १८०५--(आ.), १८०६--(पं.) व (शि.), १८०७—(पं.), (शि.) व (आ.), १८०८—(शि.)

१ नामा म्हणे अवघे खोटे । लोक नागविले थोटे ॥ ५ ॥ (गं.)

२ शेखीं हरिनाम सोयिरे ॥ (पं.) ३ मागुता (आ.)

[1]पंथ चुकती संताविण कधीं । संसारासंबंधीं तया नरा ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे बहु अभाविक । संतसंगसुख काय [2]जाणे ॥ ४ ॥

[ १८०९ ]

तोंवरी रे तोंवरी वैराग्याचें ठाण । जंव कामिनी कटाक्ष बाण लागले नाहीं ॥ १ ॥
तोंवरी रे तोंवरी आत्मज्ञान बोध । जोंवरी अंतरीं कामक्रोध उठले नाहीं ॥ २ ॥
तोंवरी रे तोंवरी निरभिमान । जंव देहीं अपमान जाला नाहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे अवघी बचबच गाळी । विरळा तो जाळी [3]द्वैत बुद्धि ॥ ४ ॥

[ १८१० ]

चंद्र सूर्यादि बिंब लिहिताती सांग । परि प्रकाशाचें अंग लिहितां न ये ॥ १ ॥
संन्यासाची सोंगें आणिताती सांग । परि वैराग्याचें अंग आणितां न ये ॥ २ ॥
नामा म्हणे कीर्तन करिताती सांग । परि प्रेमाचें तें अंग आणितां न ये ॥ ३ ॥

[ १८११ ]

[4]हरिभक्त आथिले ऐसे ते उत्तम । येर ते अधम अधमांहुनी ॥ १ ॥
[4]हरिभक्त सप्रेम तेंचि तैसें नाम । येर ते निनामें अनामिक ॥ २ ॥
नामा म्हणे जया नाहीं [5]हरिसेवा । ते जितचि केशवा प्रेतवाणें ॥ ३ ॥

[ १८१२ ]

भुजंग विखार करी पवनाहार । परि तो योगेश्वर म्हणूं नये ॥ १ ॥
पवनाच्या अभ्यासें कायाचि पालटी । परि तो वैकुंठीं सरता नव्हे ॥ २ ॥
शुद्ध करी मन समता धरी ध्यान । तरिच भवबंधन तुटेल रे ॥ ३ ॥
पवित्र गंगाजळ मीन सेवी निर्मळ । परि दुष्ट तें केवळ कर्म त्याचें ॥ ४ ॥
अवचिता तो हे सांपडला गळीं । न सुटे तयेवेळीं तीर्थोदकें ॥ ५ ॥
घर सांडोनियां वन सेविताती । वनीं का नसती रीस व्याघ्र ॥ ६ ॥

अभंग १८०९—(भा.), १८१०—(शि.), १८११—(पं.) व (शि.), १८१२—(शि.), (पं.) व (गं.)

१ पंथ न चुकती संताविण कधीं । संसारसमाधि तया नरा ॥ ३ ॥ (शि.)
२ तया (शि.) ३ देह (भा.) ४ हरिभक्ति (आ.) ५ हरीची सेवा (पं.)

काम क्रोध लोभ न संडवे मनीं । असोनियां वनीं कोण काज ॥ ७ ॥
बहुरुप्याचा नटा माथां भार जटा । भस्म राख सोटा हातीं दंड ॥ ८ ॥
धोति-पोति कर्मविगळाचि दिसे । हुंबरत असे अंगबळें ॥ ९ ॥
त्रिपुंड टिळे अंगीं चंदनाची उटी । घालोनियां कंठीं तुळसीमाळा ॥ १० ॥
व्यापक हा हरी न धरिती चित्तीं । लटिकी याची गति गातु असे ॥ ११ ॥
[1]मनातें तूं मुंडी देहभाव सांडी । राखिसी तरी शेंडी हेंचि कर्म ॥ १२ ॥
मन हें दर्पण करोनि निर्मळ । पाहे पां केवळ आत्मसोये ॥ १३ ॥
तुझा तूं केवळ तुजमाजीं पाही । नामा म्हणे ध्यायी केशिराज ॥ १४ ॥

[१८१३]

अहंकारें आथिलें ऐसें जें शरीर । तें जाणा मंदिर चांडाळाचें ॥ १ ॥
आपुलिया मुखें सांगे पंढरीनाथ । नव्हे हो तो भक्त सत्य जाणा ॥ २ ॥
नाम विटंबिती संतासि हांसती । ते मूर्ख म्हणिजेती सर्पपिलीं ॥ ३ ॥
तयांसि लक्ष्मीवल्लभ सांगे उपदेश । नामा विष्णुदास विनवितसे ॥ ४ ॥

[१८१४]

काय करुनियां जप । चित्तिं नाहीं अनुताप ॥ १ ॥
काय करूनी तीर्थाटण । मनीं भरले अवगुण ॥ २ ॥
मनसंकल्पाचीं पापें । नवजती तीर्थाचिया बापें ॥ ३ ॥
नामा म्हणे वर्म सोपें । पाप जाय अनुतापें ॥ ४ ॥

[१८१५]

करिना साधन जीवासी बंधन । कोणे काळीं मन नोहे शुद्ध ॥ १ ॥
करूं जातां तप अभिमानरूप । त्रिविधादि ताप कैसा निवे ॥ २ ॥
नित्यानित्य करी विवेक आपण । तेणें अभिमान वाढतसे ॥ ३ ॥
नामा म्हणे जन्म विसरोनियां गेलों । मरोनि राहिलों देहातीत ॥ ४ ॥

---

अभंग १८१३—(पं.) व (शि.), १८१४—(धु.) व (गं.), १८१५—(आ.)
१ मी तूं पण जरी हीं दोन्हीं सांडी। (आ.)

अनुक्रमणिका

[१८१६]

शिकला तैं गाणें राग आळवण । लोकां रंजतण करावया ॥ १ ॥

भक्ताचें तें गाणें बोबडिया बोली । तेंहि श्रीविठ्ठलीं अर्पियेलें ॥ २ ॥

बोबडिया बोली जाणते हांसती । तेहि पचिजेति रौरवीं ॥ ३ ॥

[१]नामा म्हणे बहुत बोलों आतां काय । विठोबाचे पाय अंतरती ॥ ४ ॥

[१८१७]

राजसी तामसी जें गान । तोडी ताल मोडी मान ॥ १ ॥

ख्याल गाये कंपस्वर । रिझवी दात्याचें अंतर ॥ २ ॥

हें तो प्रीति धनावरी । अर्था अनर्थ तो करी ॥ ३ ॥

नामा म्हणे हा शास्त्रार्थ । अर्थ तोचि होय स्वार्थ ॥ ४ ॥

[१८१८]

सुवर्ण आणि परिमळ । हिरा आणि कोमळ ।
योगी आणि निर्मळ । हें दुर्लभ जी दातारा ॥ १ ॥

देव जरी बोलता । तरी कल्पतरु चालता ।
गज जरी दुभता । हें दुर्लभ जी दातारा ॥ २ ॥

धनवंत आणि दयाळु । व्याघ्र आणि कृपाळु ।
अग्नि आणि सीतळु । हें दुर्लभ जी दातारा ॥ ३ ॥

सुंदर आणि पतिव्रता । सावधान होय श्रोता ।
पुराणिक तरी ज्ञाता । हें दुर्लभ जी दातारा ॥ ४ ॥

क्षत्रिय आणि शूर भला । चंदन फुलीं फुलला ।
स्वरूपीं गुण आथिला । हें दुर्लभ जी दातारा ॥ ५ ॥

ऐसा संपूर्ण सर्व गुणीं । केवी पाविजे शारंगपाणि ।
विष्णुदास नामा करी विनवणी । मुक्ति चरणीं त्याचिया ॥ ६ ॥

[१८१९]

शब्दामृत मांडे येती भोजना । अभ्यास अज्ञाना तरी फळें ॥ १ ॥

मुंगीचें थडकें फुटे जों आकाश । ब्रह्मत्व सायास न ये हातीं ॥ २ ॥

अभंग १८१६—(धु.) व (शि.), १८१७—(भा.), १८१८—(पं.) व (शि.), १८१९—(आ.)

१ नामा म्हणे ऐसे जाणते ते पाहीं । (धु.)

मशकाचे ओढी मेरू हाले बुडीं । जीवाचें तें जोडी ब्रह्म मिळे ॥ ३ ॥
उदकींची मासोळी सूर्यासी ते भेटे । तरी वारियाचें कोडें दृष्टी पडे ॥ ४ ॥
चंद्राचें चांदणें घेती जें पालवीं । मिथ्या माया देवी नामा म्हणे ॥ ५ ॥

[१८२०]

नामाची लेखनी श्वानाचिये कानीं । धांवतसे घाणी चर्माचिये ॥ १ ॥
विंचू म्हणतसे उदार मी दाता । उचित हें देतां नलगे वेळ ॥ २ ॥
सूकर म्हणे गृहस्थ मी भला । शेखीं तयाचा डोळा विष्टेवरी ॥ ३ ॥
नापिक म्हणे माझी नांदणूक मोठी । धोकटी माझारीं जन्म गेला ॥ ४ ॥
नामा म्हणे माझी वासंना हे खोटी । विठ्ठलचरणीं मिठी पडलिसे ॥ ५ ॥

[१८२१]

ओढाळ ते सुणें वैसे विरहणी । तेथें काय गुणीं प्रगटेल ॥ १ ॥
देव खादलें ते काय करी जाणा । सर्व अवगुण तयापासीं ॥ २ ॥
अवघी संतति काउळें पोशिले । जावोनि बैसले विष्टेवरी ॥ ३ ॥
भुजंगाचे मुखीं अमृत घातलें । फिरोनि पाहिलें विषमय ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसे अभक्त निर्लज्ज । त्यासि केशिराज उपेक्षिना ॥ ५ ॥

[१८२२]

कांडितांचि कोंडा न निघे तांदूळ । शेरा कैसें फळ अमृताचें ॥ १ ॥
कण्हेरीच्या मुळा सुगंध तो नाहीं । कसाबाची गाई जिणें कैचें ॥ २ ॥
रुईदूध जरी येईल भोजना । लोभियाच्या धना वेंच नाहीं ॥ ३ ॥
निर्फळ हें जिणें भक्तिविण मन । नामा म्हणे जाण नये कामा ॥ ४ ॥

[१८२३]

बुजगावणें शेतीं माणसें म्हणती । काय त्याचे हातीं शस्त्र शोभे ॥ १ ॥
हंसासी विरोध करीत कावळा । नेणे त्याची कळा उंचपणें ॥ २ ॥

अभंग १८२० ते १८२३ (आ.)

अनुक्रमणिका

अनामिकासंगें पाठवितां पंडिता । तो तयातें तत्त्वतां काय जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे बापा करूं नको तैसें । विचार कायसे पाहसील ॥ ४ ॥

[१८२४]

बेडुक म्हणिजे चिखलाचा भोक्ता । क्षीर सांडूनि रक्ता गोचीड झोंबे ॥ १ ॥
जयाची वासना तयासिच गोड । प्रेमसुख चाड नाहीं त्याला ॥ २ ॥
वांझ म्हणे मी वाढवितें जोंजार । उघडावया कवाड नाहीं कोणी ॥ ३ ॥
अस्वलाशीं तेल माखियलें कानीं । तें म्हणे रानीं थोर सुख ॥ ४ ॥
श्वानाचिया कानीं खोविली लेखणी । ते घेत असे घाणी घरोघरीं ॥ ५ ॥
गाढवासी लाविली तूप पोळी डाळ । भुंके आळोआळ लाज नाहीं ॥ ६ ॥
सूकरा कस्तुरी चंदन लाविला । तो तेथोनि पळाला विष्टा खाया ॥ ७ ॥
[1]नामा म्हणे माझी वासना हे खोटी । दृढ धरिली मिठी विठ्ठल पायीं ॥ ८ ॥

[१८२५]

भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव ।
तैसें आचार गौरव । सुकुलीनाचे ॥ १ ॥
झाड जाणावें फुलें । मानस जाणावें बोलें ।
भोगें जाणावें केलें । जन्मांतरीचें ॥ २ ॥
लोभ जाणावा उभय दृष्टी । क्रोध जाणावा भोंवया गांठी ।
लटिका जाणावा बहु गोष्टी । नष्ट प्रकृति ओळखावा ॥ ३ ॥
द्वाही घातलिया जाणावा खरा । [2]ढोकळ जाणावा कलिअवसरा ।
परद्वारिणी जाणावी उण्या उत्तरा । कुश्चळी घरोघरीं हिंडतसे ॥ ४ ॥
मृदंग जाणावा गंभीर नादें । गाणें जाणावें सुस्वर शब्दें ।
ओंकार जाणावा अक्षरभेदें । शहाणा शब्दें ओळखावा ॥ ५ ॥
विष्णुदास नामा करी विनंती । या उत्तराची न मानावी खंती ।
केशवाचा प्रसाद आहे माझे चित्तीं । देवा काय करिसी तें न कळे ॥ ६ ॥

[१८२६]

अंतरीं आवेश धरुनी कामाचा । लटकी जल्पे वाचा शब्दज्ञानें ॥ १ ॥
बोलाचे पैं मांडे क्षीर धारी अन्न । तेणें समाधान केंवि होय ॥ २ ॥

अभंग १८२४—(शि.) व (आ.), १८२५—(शि.), १८२६—(आ.)
१ नामा म्हणे माझे मन हें बोवळें । धरिलासे गोपाळें सोडीचिना ॥ (आ.)
२ ढोकेळ (शि.)



अनुक्रमणिका

बोलिल्यासारिखें न करी पामर । वृथाचि कुरकुर वाढविली ॥ ३ ॥
नाहीं जीव तया प्रेता आलिंगन । तैसें तें श्रवण केल्या होय ॥ ४ ॥
नामा म्हणे त्याच्या संगें स्थिति दूषे । जाला लाभ नासे तेथें जातां ॥ ५ ॥

[ १८२७ ]

सावली पिळुनि कां घालिशी । मुद्रेनें आंग कां जाळिसी ॥ १ ॥
कासया केली खोडी । काया विटंबिली बापुडी ॥ २ ॥
कावळा प्रातःस्नान करी । जितें मेलें तें न विचारी ॥ ३ ॥
मंदे लावूनि द्वादश टिळे । फासा घालूनि निवटी गळे ॥ ४ ॥
सुसरी गंगे रहिवासु । बहुतां जीवातें करी ग्रासु ॥ ५ ॥
गंगे गेल्या ज्ञान सांगे । मांजर मारिलें तें न सांगे ॥ ६ ॥
बक ध्यान लावुनि टाळी । मौन धरुनि मासा गिळी ॥ ७ ॥
नामा म्हणे केशिराजा । ऐशिया जीवा लावी बोजा ॥ ८ ॥

[ १८२८ ]

[1]आपुलें तें हित आपण नेणती । पुढिलांतें सांगती ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
नेणोनि परब्रह्म जाणते पैं जाले । अभावें गुंतले मायाजाळीं ॥ २ ॥
जीव आणि शिव एकरूप म्हणती । सेवेसीं अंतरती केशवाचे ॥ ३ ॥
नामा म्हणे तोचि केशवातें जाणतां । केशव म्हणतां मुक्त होय ॥ ४ ॥

[ १८२९ ]

उपाय असतां अपाय मानिती । तयां अधोगति न चुकती ॥ १ ॥
मनुष्यामाझारीं तो एक गाढव । तया अनुभव काय करी ॥ २ ॥
नामा म्हणे देव ऐसियासी कैंचा । काया मनें वाचा भेदवादी ॥ ३ ॥

---

अभंग १८२७—(आ.), १८२८—(शि.), १८२९—(आ.)

१ हा अभंग (शि.) प्रतीत पुढीलप्रमाणे मिळतो—

आपुले हित ते आपण नेणती । सर्वांसी सांगती ज्ञान गोष्टी ॥ १ ॥
नेणोनि परब्रह्म जाणते जाले । अहंभावे वंचले केशवासी ॥ २ ॥
जीव शिव दोन्ही एकरूप म्हणती । शेखीं आंतरती विठ्ठलासवें ॥ ३ ॥
नामा म्हणे तोचि केशवीं अनुसरता । सेवक म्हणता मुक्ति होय ॥ ४ ॥

[१८३०]

जो कां करी संतनिंदा । त्यासि दंडावें गोविंदा ॥ १ ॥
निंदक दंडावे दंडावे । नेऊनि [1]अघोरीं कोंडावे ॥ २ ॥
करी संतासि पाखंड । त्याचें करावें त्रिखंड ॥ ३ ॥
नामा म्हणे सांगेन ऐक । निंदक श्वानाचें तें लेक ॥ ४ ॥

[१८३१]

[2]हरिदासपणें उभविला ध्वज । परि तो वर्म बीज न कळेची ॥ १ ॥
काय करूं देवा जळो याची बुद्धि । जोंवरी नाहीं शुद्धि परलोकाची ॥ २ ॥
मुद्रा धारण अंगीं गळा तुळसिमाळा । परी नाहीं जिव्हाळा स्वहिताचा ॥ ३ ॥
धरी बहु वेष वृथा करी दोष । नाम ब्रह्मरस अंगीं नाहीं ॥ ४ ॥
दुसरा हरिदास देखोनियां रंगीं । धांवोनियां वेगीं ग्रासों पाहे ॥ ५ ॥
दुसरियाचें पद ऐकोनियां कानीं । क्रोधें पेटे वन्हि पर्वतींचा ॥ ६ ॥
दुर्जनाचे भयें पळती साधुवृंदें । जैसीं तीं श्वापदें व्याघ्रा भेणें ॥ ७ ॥
बोले नानायुक्ति वश करी सभा । दुसरा रंगीं उभा राहों नेदि ॥ ८ ॥
राजमाने श्रेष्ठ मोठे अधिकारी । त्यापुढें कुसरी करिताती ॥ ९ ॥
धातमात करी नटे नानापरी । चंचळ परनारी भुलवितो ॥ १० ॥
ऐसें नाम विटंबुनि करील जो हरिकथा । तेणें परमार्थ विघ्न केलें ॥ ११ ॥

---

अभंग १८३०—(शि.) व (धु.), १८३१—(बा.)

१ अंधारीं (आ.) २ पुढील अभंग (बा.) प्रतीत आढळतो—

हरिभक्तपणाचा उभारिला ध्वज ॥ परमार्थाचें बीज न कळेचि ॥ १ ॥
काय करूं देवा जळो त्याचि बुद्धि ॥ जया नाहीं शुद्धि परलोकीची ॥ २ ॥
मुद्राधारण अंगीं तुळसीच्या माळा ॥ नाही कळवळा परमार्थाचा ॥ ३ ॥
उपजिविके लागीं घातला पसारा ॥ ज्ञान ते चौबारा विकोधावे ॥ ४ ॥
राजे व्यापारी मोठे अधिकारी ॥ दावितो कुसरी संगीताची ॥ ५ ॥
भला भला म्हणती मान तुकाविती ॥ फुगो लागे चित्ति गर्वे तेथें ॥ ६ ॥
घातपात करी नट नानापरी ॥ चंचळ परनारी भुलवितो ॥ ७ ॥
आपुलें वैभव दावी वाडेकोडें ॥ दुसऱ्यासी पुढें रिघो नेदी ॥ ८ ॥
लटिकें पैशुन्य बोले गुणागुण ॥ तया भेणें कोण राहो शके ॥ ९ ॥
दुर्जनाचे भयें जाती साधूवृंदें ॥ जैसी का श्वापदें व्याघ्र भये ॥ १० ॥
सुगंध चंदन जवादि कस्तुरी ॥ विष्टेच्या दाथरीं पडली जैसी ॥ ११ ॥
नामा म्हणे माझे हरिकथा माऊली ॥ प्रेम पान्हा घाली हरीभक्ता ॥ १२ ॥



अनुक्रमणिका

जाई जुई उत्तम सुगंध कस्तुरी । विष्ठेच्या दाथरीं आंथुरिला ॥ १२ ॥
साडे पंधरा सोनें होतें पालवण्या । परि झालें हीण डाक लागे ॥ १३ ॥
द्यावें दिव्यौषध रोगियाचे हिता । केलिया कुपथ्या वायां जाय ॥ १४ ॥
चतुर्विध अन्न षड्रस पक्वान्न । विटाळलें जाण श्वानमुखें ॥ १५ ॥
ऐसें म्हणतां माझी मळेल पैं वाचा । परि हा वैष्णवांचा धर्म नव्हे ॥ १६ ॥
संसार-सागरू हरिकथा तारू । तरिजे हा विचारू दुरी ठेला ॥ १७ ॥
जे कथा ऐकत्ती पसरोनि बाह्या । शांति क्षमा दया येती तेथें ॥ १८ ॥
शांति क्षमा दया येती भेटावया । तेथें मोक्ष व्हावया विलंब काय ॥ १९ ॥
आनंद नामाचा ऐकूनि गजर । ब्रह्मादिक हरिहर येती तेथें ॥ २० ॥
खुंटला अनुवाद मावळला शब्द । अनिर्वाच्य बोध प्रगटला ॥ २१ ॥
वैकुंठ सांडून धांवे चक्रपाणि । कीर्तनाचा ध्वनि ऐकुनियां ॥ २२ ॥
तेथें श्रोते वक्ते होतील निष्पाप । ऐशी पुण्यरूप हरिकथा ॥ २३ ॥
शून्यांचें निजशून्य जेथें हरपलें । एकाग्र मन जालें ध्यान तेथें ॥ २४ ॥
नामा म्हणे माझी हरिकथा माऊली । मोक्ष पान्हा घाली भक्तालागीं ॥ २५ ॥

[१८३२]

देवीचिये चाडे भोप्याचें आर्जव । येरवीं त्याचें नांव कोण घेनें ॥ १ ॥
सीतज्वरामुळें खावी नंदपुडी । येर कडु कुडी कोण सेवी ॥ २ ॥
सद्बुद्धिकारणें संतांचे गौरव । येरवीं त्यांचें नांव कोण पुसे ॥ ३ ॥
रोगामुळें पाहे वैद्याचें कारण । येरवीं कधीं कोण पुसे तया ॥ ४ ॥
तैसा नामा जगीं अगत्या अगत्य । असत्यासी सत्य न म्हणे कधीं ॥ ५ ॥

[१८३३]

काय चाड आम्हां बाहेरल्या वेषें । सुखाचें कारण असे अंतरीं तें ॥ १ ॥
भीतरीं पालट जंव नाहीं जाला । तोंवरी न बोला जाणपणें ॥ २ ॥
चंदनाचे संगें हें कळी टाकळी । नांवें परि उरली पालट देहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें सांगा मज कोणी । जेणें केशव येऊनि हृदयीं राहे ॥ ४ ॥

अभंग १८३२--(आ.), १८३३--(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[१८३४]

मांजरें केली एकादशी । इळवरी होतें उपवासी ।
यत्न करितां पारण्यासी । धांऊनि गिवसीं उंदिर ॥ १ ॥
लांडगा बैसला ध्यानस्थ । तोंवरी असे निवांत ।
जंव पेट सुटे जीवांत । मग घात करी वत्साचा ॥ २ ॥
श्वान गेलें मल्लिकार्जुना । देह कवंतीं घातलें जाणा ।
आलें मनुष्यदेहपणा । परि खोडी न संडी आपुली ॥ ३ ॥
श्वानें देखिला स्वयंपाक । जोंवरि जागे होते लोक ।
मग निजलिया निःशंक । चारी मडकीं फोडिलीं ॥ ४ ॥
वेश्या जाली पतिव्रता । तिचा भाव असे दुश्चिता ।
तिसी नाहीं आणिक चिंता । परद्वारावांचुनि ॥ ५ ॥
दात्यानें केली समाराधना । बहुत लोक जेविले जाणा ।
परि न संडी वोखटी वासना । खटनट चाळितसे ॥ ६ ॥
ऐशा प्रकारच्या भक्ति । असती त्या नेणों किती ।
एक ओळगा लक्ष्मीपति । म्हणे विष्णुदास नामा ॥ ७ ॥

[१८३५]

एकचि हें तत्त्व एकाकार देशीं । एक तो नेमेसी सर्व जनीं ॥ १ ॥
ऐसें ब्रह्म पाहा आहे सर्व एक । नलगे तो विवेक करणें कांहीं ॥ २ ॥
मिथ्या हें डंबर माया मथितार्थ । हरि हाची स्वार्थ वेगीं करी ॥ ३ ॥
नामा म्हणे समर्थ बोलिला तो. वेद । नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

[१८३६]

जाखाई जोखाई उदंड दैवतें । वाउगेंचि व्यर्थ श्रमतोसी ॥ १ ॥
अंतकाळीं तुज सोडविना कोणी । एक्या चक्रपाणिवांचोनियां ॥ २ ॥
मागें थोर थोर कोणें केलें तप । उद्धरिलें अमूप नारायणें ॥ ३ ॥
नामा म्हणे कैसे वहु जाले भांड । न उच्चारी लंड नाम वाचे ॥ ४ ॥

---

अभंग १८३४—(शि.), १८३५ व १८३६—(आ.)

[१८३७]

नानापरिची दैवतें । बहुत असती असंख्यातें ।
सेंदुर शेरणी जें इच्छितें । तें काये आर्त पुरवितें ॥ १ ॥
[1]अंध नको होऊं आलीया । भजे भजे पंढरिराया ।
सोडूं नको विष्णु त्रिरात्र पारणिया । तोंडी कुलुप पाठीं गळ टोचोंनिया ॥ २ ॥[2]
नाना धातूंची प्रतिमा केली । षोडशोपचारें पूजिली ।
दुकळीं विकुनि खादली । ते काय आर्त पुरविती ॥ ३ ॥
आतां दृढ धरोनियां भाव । बोळगा बोळगा पंढरिराव ।
आपुले चरणीं देईल ठाव । विष्णुदास नामा म्हणे ॥ ४ ॥

[१८३८]

खाटिकाप्रमाणें करिसी व्यापार । मनीं निरंतर धरोनियां ॥ १ ॥
दुष्ट दुराचारी दुर्बल घातकी । परम पातकी दुष्ट बुद्धी ॥ २ ॥
अपमानीं आशा धन मेळविसी । नरकासी जासी जाण सत्य ॥ ३ ॥
नामा म्हणे जाण करूं मोटाळे । जाऊनियां लोळे विष्ठेमाजीं ॥ ४ ॥

[१८३९]

आपुली करणी न विचारी मनीं । वायां काय ठेवुनि बोल देवा ॥ १ ॥
खाटकी जो चेपी पशुची नरडी । अवचिता करंगळी सांपडली ॥ २ ॥
मेलों मेलों म्हणूनि गडबडां लोळे । परि कापी गळे आठवीना ॥ ३ ॥
आपुलें म्हणवुनि विव्हळतसे । खदखदां हांसे दुसऱ्यासी ॥ ४ ॥
[3]वाटपाडयानें घर [4]खाणोनि घेतलें । जितुकें मेळविलें तितुकें नेलें ॥ ५ ॥
आपुलें नेलें म्हणऊनि खळखळां रडे । परि घेतां दरवडे आठवीना ॥ ६ ॥
सोनाराचे घरीं पडिलेंसे खाण । चोरिलें सुवर्ण तेंहि नेलें ॥ ७ ॥

---

अभंग १८३७—(पं.) व (शि.), १८३८—(आ.), १८३९—(धु.)
१ अंध नको होऊं देहा आलिया । (पं.)
२ काही प्रतीत पुढील चरण क्र. २ व ३ च्या मध्ये आढळतो—
बाळा अबळा मुकी मौळी । क्षूद्र देवता जोवदान बळी ॥
तेणें न पावती सुखकल्लोळीं । एका विठ्ठलावांचोनि ॥
३ वाटपाडयाचें (धु.) ४ खाणोरि (धु.)

आपुलें नेलें म्हणवुनि मोकलितो धाया । ठकविल्या आयाबाया ते आठवीना ॥ ८ ॥
तराळाचे घरीं असे आला जेवा । म्हणतसे देवा काय करूं ॥ ९ ॥
दुसऱ्यासी मागतां परम सुख वाटे । आपण देतां फुटे काळीज तें ॥ १० ॥
जन्मवरी पोशिलें लेंकुराचे परि । हातीं घेऊनि सुरी उभा राहे ॥ ११ ॥
गर्दन सुळीं देतां म्हणे काय केलें । पुढिल्यासि मारिलें आठवीना ॥ १२ ॥
नामा म्हणे विष्णुदास ऐसे जे निर्लज्ज । त्यासी पंढरिराज केंवि भेटे ॥ १३ ॥[1]

[ १८४० ]

अर्चन विष्णूचें नाहीं पूजन । तये गांवींचे अनामिक जन ।
भूतप्रेताचें करिती भजन । तयासि दंडन यम करी ॥ १ ॥
हरीचें वंचुनी सुकृत करी । तया नाम पुण्य ठेवि जरी ।
तुटोनि पडो त्यांची वैखरी । अंतीं महा-घोरीं वास तया ॥ २ ॥
समारंभ करिती आणिका देवांचा । म्हणती येणें विष्णु तृप्त होय साचा ।
धिग् धिग् आचार जळो त्याचा । वायांविण वाचा विटाळली ॥ ३ ॥
पहा हो नवही द्वारें एकचि देहीं । रसस्वाद कान देतील काई ।
जयाचा मान तयाच्या ठायीं । येतसे पाहीं सेवितां ॥ ४ ॥
तो देवदेवां शिरोमणी । असुर रुळती जयाच्या चरणीं ।
तो सांडितां चक्रपाणि । भजना हानी होईल तुझिया ॥ ५ ॥
[2]विष्णुदास नामा विनवी जगा । अझुनि तरी हरिसि शरण रिघा ।
जे जे अपराध केले असतिल मागा । ते ते नेईल भंगा स्वामी माझा ॥ ६ ॥

---

अभंग १८४०---(पं.) व (शि.)

१ (धु.) प्रतीतला संपूर्ण अभंग पुढीलप्रमाणे---
आपुली करणी मनीं न विचारिती ॥ वायांचि ठेविती । बोल देवा ॥ १ ॥
पायांळ पारधी पाणियाडा राखे ॥ अवचिता डंसे । सर्प तेथें ॥ २ ॥
लहरी येतसे विव्हळ होतसे ॥ मांडितसे फांसे । आठवीना ॥ ३ ॥
खाटिक प××× ची कापोंजाय नळी ॥ अवचिता आंगोळी । सांपडली ॥ ४ ॥
सांपडली म्हणवोनि रडे घळघळां ॥ कापितां हे गळा । आठविना ॥ ५ ॥
मैंदाचे घरी माणुस येक मेले ॥ कुटुंब बुडाले । म्हणतसे ॥ ६ ॥
बुडाले म्हणवोनि घळघळां रडे ॥ घालितां दरवडे । आठवीना ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसे लौंद जे निर्लज्ज ॥ तयां केशव राजा । केंवि भेटे ॥ ८ ॥
२ विष्णुदास नामा विनवी जगा । अझुनी तरी हरीसी शरण रिघा ।
तो सर्व नेईल दोष भंगा । स्वामी माझा ॥ ६ ॥ (पं.)

अनुक्रमणिका

[१८४१]

व्यर्थ या व्युत्पत्ति लावितोसी श्रुति । विषयाची तृप्ति काय चाड ॥ १ ॥
मायेचा हा फांसा मोहजाळ सोसा । वायां कासाविसा होसी झणीं ॥ २ ॥
टाकी टाकी असत्य [१]होईल सर्व कृत्य । भज का रे नित्य एक्या नामें ॥ ३ ॥
नामा म्हणे दैवत तो एक अच्युत । सांगितला हेत खेचर विसा ॥ ४ ॥

[१८४२]

केशवापरते देव आणिक आहेती । ऐसें श्रुति स्मृति बोलतील ॥ १ ॥
तरी ते शब्द झणीं कानीं हो पडती । पाखांडी म्हणती सहावें ते ॥ २ ॥
इंद्रियांसी तुम्ही करा रे जतन । भजावा निधान श्रीविठ्ठल ॥ ३ ॥
छेदावया शिर हस्त सहस्रांचे । जरि बहुतांचे उगारले ॥ ४ ॥
परि तूतें नाम आन न देवाचें । केशव परतें कैसें असे ब्रह्म ॥ ५ ॥
अंगें चतुराननां जालिया हो भेटी । तोही जरी गोष्टी ऐसी करी ॥ ६ ॥
परि तो चळला पोटीं असे जाण । एकीं दुजेपण दावी तरी ॥ ७ ॥
ब्रह्मकटाह एक उल्लंघो शके ऐसा । वर्तोनि दाही दिशा वर्ते जरी ॥ ८ ॥
केशव नव्हे तो होका अनारिसा । म्हणोनियां वासां पाहों नका ॥ ९ ॥
व्यसन भक्ति प्रौढी पुरुषार्थ पांचवा । जिवाचिया जिवा सेवा ना कां ॥ १० ॥
सर्वांभूतीं आहे केशव परमात्मा । न विसंबावें वर्मा नामा म्हणे ॥ ११ ॥

[१८४३]

दुर्जनाची बुद्धि वोखटी दारुण । आपण मरोनि दुजिया मारी ॥ १ ॥
माशी जातां पोटीं मेली तेचि क्षणी । प्राण्या वोकवूनि कष्टी करी ॥ २ ॥
दीपकाची ज्योति पतंग नासला । अंधार पडिला जनांमध्यें ॥ ३ ॥
तैसा नैसर्गिक स्वभाव दुष्टांचा । शेखीं ज्याचा त्यासी फळां येतो ॥ ४ ॥
जाली सज्जनाची संगति कदापि । जाईना तथापि त्याची क्रिया ॥ ५ ॥
सहज मळलें धुतां शुद्ध होय । बिब्बयाचा काय डाग जातो ॥ ६ ॥

---

अभंग १८४१—(पं.), (शि.) व (आ.), १८४२—(आ.), १८४३—(पं.), (शि.) व (भा.).

१ विठ्ठल हेचि सत्य (आ.)

वज्रहि फुटेल नभहि तुटेल । भला तो होईल ऐसा नव्हे ॥ ७ ॥
नामा म्हणे कुंभपाकाचा तो धनी । तयासी भल्यांनीं बोलूं नये ॥ ८ ॥

[१८४४]

दुष्ट तो दुर्जन दुरीच धरावा । संग न करावा पापियाचा ॥ १ ॥
सर्पाचें पिलें सानें म्हणऊनि पोशिलें । त्यासी पान दिधलें अमृताचें ॥ २ ॥
नव्हे तें निर्विष न संडी स्वभावगुण । घेऊं पाहे प्राण पोसिल्याचे ॥ ३ ॥
विष्णुदास नामा सांगतसे युक्ति । विवेक हा चित्तीं दृढ धरा ॥ ४ ॥

[१८४५]

समर्थासी करी क्रोध हे अहंता । अखंड ममता मानी मदा ॥ १ ॥
आपुल्या आपण व्यर्थ सांगे स्तुति । वडिलांची कीर्ति भोग सांगे ॥ २ ॥
वमन जालिया संचितसे अन्न । काय भाग्यहीन दुर्जन तो ॥ ३ ॥
नामा म्हणे जाणे असतां शरीरीं । जातो यमपुरीं भोगावया ॥ ४ ॥

[१८४६]

कोळशासी दूध [1]मज्जोनियां धूतां । न पावे शुद्धता कोणे काळीं ॥ १ ॥
दुर्जनासी तैसा बोधितां परमार्थ । नवजायचि स्वार्थ जाण त्याचा ॥ २ ॥
सूकराच्या परी नेणती मिष्टान्न । विष्टा ते भक्षण करिताती ॥ ३ ॥
मोहिन्नले प्राणी सर्वत्र असतां । काय सांगूं आतां नवला हो ॥ ४ ॥
नामा म्हणे तया न होयचि मोक्ष । येवोनि पद्माक्ष केंवि भेटे ॥ ५ ॥

[१८४७]

वेडिया उपचार गाढवा गुढार । म्हैसिया बिढार पुष्पवनीं ॥ १ ॥
पद्मासनीं केंवि कुंजर हा बैसे । कोडिया न दिसे चंदन बरवा ॥ २ ॥
तैसा नव्हे देव मूर्ख जनांच्या भक्ति । भल्याचा विरक्ति ज्ञानवारा ॥ ३ ॥
गेळीस ऊंस कळकटिया सुदिवस । सूकराप्रति रस आंबियाचा ॥ ४ ॥

अभंग १८४४ व १८४५—(शि.), १८४६—(पं.), (शि.) व (धु.), १८४७—(शि.)
१ मर्दोनियां (आ.)

दर्दुरा क्षीरपान त्रिदोषिया मौन । मद्यपिया मन स्थिर नव्हे ॥ ५ ॥
नामा म्हणे हरि सबाह्य भरला । भरोनि उरला दाही दिशा ॥ ६ ॥

[ १८४८ ]

थिल्लर ते नेणें सागराचा अंत । मुंगीस अग्नींत रिघ नाहीं ॥ १ ॥
श्वास काय जाणे मेरूचें प्रमाण । कोसळल्या गगन न कळे त्यास ॥ २ ॥
अंध काय जाणे कैसा उगवे दिन । पाषाणा पर्जन्य न कळे जेवीं ॥ ३ ॥
देहवंत जीव काय जाणे देव । नामा म्हणे भाव काय तेथें ॥ ४ ॥

[ १८४९ ]

जयाचे उदरीं जन्मला जो नर । पिडी तया थोर सर्वकाळ ॥ १ ॥
मानिली अंतरीं सखि जिवलग । आत्महत्या मग घात करी ॥ २ ॥
मानीना तो भक्ति भ्रष्ट आचरण । दोषी नारायण सदोदित ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे पातकी चांडाळ । बुडविलें कुळ बेचाळिस ॥ ४ ॥

[ १८५० ]

अभक्ताचे स्थळीं भ्रांताची संगती । परदारा चित्तीं परनिंदा ॥ १ ॥
नेणें भूतदया शांतीचें लक्षण । कार्याकारण बोलतसे ॥ २ ॥
हरिचिया दासा करिती मत्सर । करी निरंतर द्वेषबुद्धि ॥ ३ ॥
नामा म्हणे व्यर्थ पेटला पर्वत । नेणें अपघात स्वयें पावे ॥ ४ ॥

[ १८५१ ]

मूर्ख बैसले कीर्तनीं । न कळे अर्थाची करणी ॥ १ ॥
घुबड पाहे भलतीकडे । नाईके नामाचे पवाडे ॥ २ ॥
पाहूं इच्छी परनारी । चित्त पादरक्षावरी ॥ ३ ॥
नामा म्हणे सांगू किती । मूढ सांगितलें नायकती ॥ ४ ॥

[ १८५२ ]

कथे बैसोनि उठोनि जाती । खर होऊनि फिरती ॥ १ ॥
नाम नावडे नावडे । संग वैष्णवांचा न घडे ॥ २ ॥
नामा म्हणे सांगों किती । पूर्वजांसहित नरका जाती ॥ ३ ॥

अभंग १८४८ ते १८५०—(आ.), १८५१—(धु.) व (शि), १८५२—(आ.)

अनुक्रमणिका

[ १८५३ ]

देव धर्मी नाहीं चाड । त्यासी पुढें [1]आला नाड ॥ १ ॥
जैसे डोंगरीचें झाड । त्याचें जन्म जाले वाड ॥ २ ॥
नामा म्हणे भक्ति गोड । स्वानंद नेणती ते मूढ ॥ ३ ॥[2]

[ १८५४ ]

ज्यालागीं जोडिसी ते न येती तुजसरसीं । यम कासाविसि करी तये वेळां ॥ १ ॥
तूं तरी अज्ञान न देखसी डोळा । जालासी गोठोळा धनगरांसी ॥ २ ॥
चिरीरी घेतो सांपडलिया हातीं । अवघीं त्याची पाळती टाकोनियां ॥ ३ ॥
[3]अंतीं न म्हणावें वचन निष्ठुर । वेगीं ठाका द्वार केशवाचें ॥ ४ ॥
नामा म्हणे शरण रिघा हरिपायीं । तया शेषशायी न विसंबे ॥ ५ ॥

[ १८५५ ]

विषयांचें गोंड कां करिसी कोड । होईल तुज [4]जाड इंद्रियबाधा ॥ १ ॥
सर्व हें लटिकें जाण तूं बा निकें । रामेंविण एकें न सुटिजे ॥ २ ॥
मायाजाळमोहो इंद्रियांचा रोहो । परि न धरिसी भावो भजनपंथें ॥ ३ ॥[5]
[6]नामा म्हणे देवा करी तूं लवलाहो । मयुराचा टाहो घन गर्जे ॥ ४ ॥

[ १८५६ ]

लव निमिष म्हणतां आहे नाहीं पाहतां । क्षण एक संपादिता विषयो हा ॥ १ ॥
स्वहित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनों ॥ २ ॥

---

अभंग १८५३—(पं.), (शि.) व (आ.), १८५४—(आ.), १८५५—(पं.) व (शि.), १८५६—(आ.)

१ आली (आ.)
२ (पं.) प्रतीमध्ये पुढील चरण अधिक मिळतो—
जैसे कडू वृंदावन । पाहिलिया होये शीण ॥
३ संतीं (वा.) ४ जोड (आ.)
५ (शि.) प्रतीत व इतर काही प्रतींत पुढील चरण अधिक मिळतात. त्यांचे क्रम असे—
कासवीची दृष्टी जैं येईजे भेटी । तैं अमृत वृष्टी करी त्यासी ॥ ४ ॥
तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान । वाचे नारायण अमृतमय ॥ ५ ॥
धन्य त्याचें कुळ सदा पैं सुफळ । हीन निसीफळ रामनाम ॥ ६ ॥
६ नामा म्हणे चोखडा भक्त तो उत्तम । वाचेसी सुगम रामनाम ॥ (शि.)

संपत्तीचे वळें एक जालें आंधळें । वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं ॥ ३ ॥
एक विद्यावंत जातीचा अभिमान । ते नेले तमोगुणें रसातळां ॥ ४ ॥
मिथ्या मायामोह करूनि हव्यास । वेंचिलें आयुष्य वायांविण ॥ ५ ॥
नामा म्हणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवी केशवा मायबापा ॥ ६ ॥

[१८५७]

देह पडे तोंवरी देहाचा अभिमान । न करीं मी अज्ञान आत्महित ॥ १ ॥
मी माझें म्हणतां गेले नेणों किती । रंक चक्रवर्ती असंख्यात ॥ २ ॥
क्षणक्षणा देहींचें आयुष्य पैं झडे । वासना ते वाढे नित्य नवी ॥ ३ ॥
मोहाची खाणोरी मिळाली चोरटी । खाऊनि शेवटीं घर घेती ॥ ४ ॥
जंववरी संपत्ति तंववरी हे सखे । गेलिया ते भुंके सुणें जैसें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा मी वो तुझा दास । मज आहे विश्वास तुझे नामीं ॥ ६ ॥

[१८५८]

भुलले हे लोक काळाचें भातुकें । सुरशक्रादिकें पाहतासी ॥ १ ॥
देवा तुझी माया अगम्य अगाध । प्रपंचाचा वेध सुटों नेदी ॥ २ ॥
माझें घरदार माझा हा संसार । मी मोठा चतुर म्हणतसें ॥ ३ ॥
आपण देखतां जाती ते पाहती । मीपणाची भ्रांति सुटो नेणें ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां काय म्यां बोलावें । भोंवत असावें चौऱ्यांशीला ॥ ५ ॥

[१८५९]

विषय सेवितां तुज । नव्हे पुढील काज ।
न भेटे तुज । गरुडध्वज निश्चयेंसी ॥ १ ॥
काय करिसी खटपट । वायां मार्ग दुर्घट ।
वरपडा होसी कष्ट । [1]परि तरो नेदिती ॥ २ ॥
सुटकेचें मूळ जाण । रामकृष्ण नारायण ।
येणें तुटेल भवबंधन । जन्मा न येसी सर्वथा ॥ ३ ॥

अभंग १८५७—(पं.), (शि.) व (भा.), १८५८—(आ.), १८५९—(पं.), (शि.) व (आ.)

१ परि संसार न सुटेचि ॥ (आ.)

साधन इतुकेंचि पुरे । न लागती मंत्रांचे भारे ।
ते बुडविती साचारे । [1]परि तरो नेदिती ॥ ४ ॥
नामा म्हणे ते पामर । नेणतीच हा मार्ग सार ।
हरी वाचे नाहीं उच्चार । तो जाणावा महादोषी ॥ ५ ॥

[ १८६० ]

मायेचा तो फांसा अहंकार वळसा । परी हृषिकेशा भजतीना ॥ १ ॥
नव्हे हे सुटिका हा बोल लटिका । केशवासी एका न भज कां रे ॥ २ ॥
होतील त्यासि मुक्ति पुरतील आर्ती । चरण चिंतिती विठ्ठलाचे ॥ ३ ॥
नामा म्हणे केशव सर्वांभूतीं देव । ऐसा धरी भाव भजनशीळ ॥ ४ ॥

[ १८६१ ]

कां शिणसि घरदार मायेच्या बंधनें । वायांचि वेसंण अनहितासी ॥ १ ॥
भजे यादवराया लागे त्याचा पायां । आणिक उपाया करूं नको ॥ २ ॥
सर्वभावें हरिभजन तूं करी । भक्ति हे पुढारी तारील सत्य ॥ ३ ॥
नामा म्हणे दया मांडी सांडी माया । भजन लवलाह्या हरिचें करी ॥ ४ ॥

[ १८६२ ]

संग खोटा परनारीचा । नाश होईल या देहाचा ॥ १ ॥
रावण प्राणासी मुकला । भस्मासुर भस्म जाला ॥ २ ॥
गुरुपत्नीशीं रतला । क्षयरोग त्या चंद्राला ॥ ३ ॥
इंद्रा अंगीं सहस्र भगें । नामा म्हणे विषयासंगें ॥ ४ ॥

[ १८६३ ]

लावण्य सुंदर रूपानें बरवी । पापीण जाणावी ते कामिनी ॥ १ ॥
देखतां होतसे संगाची वासना । भक्ताच्या भजना नाश होय ॥ २ ॥

---

अभंग १८६० व १८६१—(पं.) व (शि.), १८६२ व १८६३—(आ.)
१ परि तीरा निघों न देती ॥ (पं., शि. व आ.)

अनुक्रमणिका

ऐसी जे घातकी जन्म कासयासी । चांडाळीण तिसी नरक प्राप्त ॥ ३ ॥
नामा म्हणे तिचें पाहूं नये तोंड । पापीण ते रांड बुडवी नरा ॥ ४ ॥

[१८६४]

कायारूप जिचें हीनवट अती । माऊली धन्य ती आहे नारी ॥ १ ॥
तियेवरी मन कदापि नवजाये । भजना न होये कदा चळ ॥ २ ॥
ऐसिये माऊली परउपकारी । घात हा न करी भजनाचा ॥ ३ ॥
नामा म्हणे तिचे चरण वंदावे । वदन पहावें माऊलीचें ॥ ४ ॥

[१८६५]

घरीं नांदतो बरवें परी । म्हणुनि केलिसे दुसरी अंतुरी ।
नित्य भांडण तया घरीं । आणिक कांहीं न देखों ॥ १ ॥
दुसरी न करावी बाईल । भंड फजिती होईल ।
बोभाट वेसदारा जाईल । बायकाच्या पागवथ्या ॥ २ ॥
धाकटीकडे पाहतां कोडें । वडील धडधडा रडे ।
मेल्या तुझें गेलें मढें । तिकडे कां रे पाहतोसी ॥ ३ ॥
वडील बाईल म्हणे उण्या । धाकटी बाईल केली सुण्या ।
लाज नाहीं तुझ्या जिण्या । काळतोंडचा बैसलासी ॥ ४ ॥
वडील बाईल धरी दाढी । धाकटी ओढून धरी शेंडी ।
सांपडलासी यमझाडी । लाशी वरपडा जालासी ॥ ५ ॥
सवती सवतीचा करकरा । उभा शिणलों दातारा ।
भेटी करी वनींच्या व्याघ्रा । परी संसारीं उबगलों ॥ ६ ॥
सवतीसवतीची कैशी धरणी । कौतुक पाहती शेजारणी ।
तया पुरुषाची विटंबनीं । थोर जाचणी तयासी ॥ ७ ॥
नामा म्हणे गा श्रीहरी । दोघी बायका ज्याचे घरीं ।
त्याचे नसावें शेजारीं । थोर दुःख तयाशीं ॥ ८ ॥
सर्वकाळीं परमात्मा आहे सर्वदेशीं । हें भावना अहर्निश दृढ धरी ॥ ९ ॥
संतसमुदाय मिळती जेथें जेथें । जावें तेथें तेथें लोटांगणीं ॥ १० ॥
चिंता न करी नाम्या येणें तरसी जाण । तुज सांगितली खूण निर्वाणींची ॥ ११ ॥

---

अभंग १८६४—(आ.), १८६५—(प.) व (धु.)

अनुक्रमणिका

[ १८६६ ]

पाहा परदारा जननिये समान । परद्रव्य पाषाण म्हणोनि मानी ॥ १ ॥
निंदेसी तूं मुका होऊनि तत्त्वतः । परद्वेषीं तत्त्वतः न घाली दृष्टी ॥ २ ॥
ऐसें दृढ मनीं धरूनि राहसी । तरी माझें पावसी निजपद ॥ ३ ॥
पराकारणें प्राण वेंचि जो सर्वथा । जाणे परवेथा कळवळोनी ॥ ४ ॥
परसुखें संतोष धरी जो मानसीं । जरी तुज परलोकासी जाणें आहे ॥ ५ ॥
देहाचा अभिमान न धरावा चित्तीं । धरावी उपरति उपशमु ॥ ६ ॥
सर्वकाळ प्रीति संतांचि संगति । गावें अनुरागें प्रीति नामें माझी ॥ ७ ॥
सर्वांभूतीं सर्वदा ऐसी समबुद्धि । सांडावी उपाधि प्रपंचाची ॥ ८ ॥

[ १८६७ ]

वासनेचा त्याग करा रे सर्वथा । भावें त्या अनंता शरण रिघा ॥ १ ॥
कृपेचा सागर नुपेक्षी निर्वाणीं । कळिकाळापासुनि सोडवील ॥ २ ॥
[1]भक्तजनपाळक अनाथ कैवारी । ब्रिदें चराचरीं बणिताती ॥ ३ ॥
शरीर संपत्तीचा टाका अभिमान । मन करा तल्लीन विठ्ठल पायीं ॥ ४ ॥
आसनीं शयनीं मनीं चिंता रे गोविंदु । तेणें तुटे कंदु भवव्याधीचा ॥ ५ ॥
परदारा परनिंदा परधन परपीडन । सांडूनि भजन हरिचें करा ॥ ६ ॥
[2]सर्वभूतीं कृपा संतांची संगती । मग नाहीं पुनरावृत्ति मरण जन्म ॥ ७ ॥
शुकसनकादिक जनक चक्रवर्ती । परीक्षिती प्रल्हाद बिभीषण ॥ ८ ॥
बळी भीष्म नारद उद्धव रुक्मांगद । शिबिये परमानंद पावविले ॥ ९ ॥
शास्त्रांचें हें सार वेदांचें गव्हार । नाम परिकर कलियुगीं ॥ १० ॥[3]

[ १८६८ ]

चांदणें नावडे चोरा । सद्‌बुद्धि नावडे रांडेच्या पोरा ।
वृक्ष नावडे कुंजरा । सत्य कुचरा नावडे ॥ १ ॥

अभंग १८६६--(आ.), १८६७--(पं.) व (शि.), १८६८--(आ.)

१ अनाथांचा नाथ दीनांचा कैवारी । (आ.)

२ करा सर्वभावें संतांची संगती । नाही अर्थाअर्थी जन्मा येणें ॥ (आ.)

३ काही प्रतींत पुढील चरण आढळत नाही. मात्र तो छापील प्रतीत आढळतो [ पहा (आ.) प्रत ]--
नामा म्हणे नको साधन आणिक । दिधली मज भाक पुंडलिकें ॥ १ ॥

चंदन जाणावा सुगंधाची धूति । कर्पूर जाणावा उत्तम याति ।
हंस जाणावा चालतिये गति । कोकिळ श्रुति ओळखावी ॥ २ ॥
लांव जाणावी उफराटिये दृष्टीं । क्रोधी जाणावा भोंवयांसीं गांठीं ।
लटिक्या जाणा बहुत गोष्टी । नष्ट कुचेष्टीं ओळखावा ॥ ३ ॥
नारी जाणावी भ्रतारभक्ति । आचारें जाणावी महासति ।
धनुर्धर जाणावा संधानयुक्ति । संत तापसी ओळखावा ॥ ४ ॥
जयीं घातलिया निघे खरा । ज्ञान जाणे तोचि चतुरा ।
शिंदळी जाणावी नीच उत्तरा । कुसळी घरोघरां फिरतसे ॥ ५ ॥
इतुकिया बोलाची न मानावी खंती । विठ्ठल चरणीं ठेवुनियां मति ।
प्रसन्न होईल लक्ष्मीपति । म्हणे विष्णुदास नामा ॥ ६ ॥

[ १८६९ ]

धीर धरी सत्य हे तो नारायणा । शुद्ध आचरणा न सांडावें ॥ १ ॥
लौकिकाची कांहीं न धरावी लाज । हेंचि निज काज साधावें तें ॥ २ ॥
दंभ अभिमान सर्व त्यजोनियां । शरण त्या सखिया जावें आतां ॥ ३ ॥
निंदा करिती तो मानावा आदर । स्तुति तें उत्तर नायकावें ॥ ४ ॥
न धरावी चाड मानसन्मानाची । आवडी भक्तीची रूढवावी ॥ ५ ॥
नामा म्हणे हेंचि रूढवावें मानसीं । क्षण एक नामासी विसंबू नये ॥ ६ ॥

[ १८७० ]

अंतींचा लाभु आधींच साधिजे । देह असतां कीजे हरिभक्ती ॥ १ ॥
आदिमध्यअंती तोचि हा व्यापकू । विश्वप्रतिपाळकु नारायण ॥ २ ॥
विषय महापुरीं जे पतित जीव भारी । तैसे परिचेहि हरिनाम घ्यावें ॥ ३ ॥
नामा म्हणे हा रे दुर्लभ नरजन्म । केशव मेघःश्यामु अनुसरा वेगीं ॥ ४ ॥

[ १८७१ ]

जंव हंस काया नवजाय सांडोनी । तव घेई ठाकोनि रामनाम ॥ १ ॥
अंतकाळ वेळीं तुझें नव्हे कोण्ही । मी माझें म्हणवूनि भुललासी ॥ २ ॥

अभंग १८६९--(आ.), १८७०--(पं.), १८७१--(पं.) व (शि.)

राहें निरंतर राघवाचे द्वारीं । तेणें भवसागरीं तरसी बापां ॥ ३ ॥
नवमास मायें वाहिलासी उदरीं । आस केली थोरी होसिल म्हणोनी ॥ ४ ॥
स्तनपान देऊनि मोहें प्रतिपाळी । तेहि अंतकाळीं दूर ठाकी ॥ ५ ॥
सर्वस्व स्वामिणि म्हणवितसे कांता । तेहि केश देतां रडतसे ॥ ६ ॥
म्हणे म्यां मेल्याचें सुख नाहीं देखिलें । तेणें तंव पाळिलें अर्धें प्राणें ॥ ७ ॥
गाई घोडे म्हैसी आणिक त्या दासी । धन त्वां सायासीं मेळविलें ॥ ८ ॥
तुझिया धनाला नाहीं पार लेखा । एकलाचि मूर्खा जासी अंतीं ॥ ९ ॥
हातींच्या मुद्रिका कानींचे ते नग । करोनि लगबग काढिती वेगीं ॥ १० ॥
अंगींचीं लुगडीं काढोनियां घेती । तुज बांधोनियां नेती यमदूत ॥ ११ ॥
भूमिभार जाला म्हणती वेग करा । नातळती शरीरा इष्ट मित्र ॥ १२ ॥
स्मशानीं नेऊनि भडाग्नि देऊनि । येती परतोनी सकळ जन ॥ १३ ॥
एकलेंचि येणें एकलेंचि जाणें । पहा दृढ ज्ञानें विचारोनी ॥ १४ ॥
पाप-पुण्य दोन्ही अंतींचीं सांगती । येरें तीं राहती जेथिचीं तेथें ॥ १५ ॥
ऐसा हा संसार माया वेष्टियला । म्हणोनि दुऱ्हाविला योगी जनीं ॥ १६ ॥
विष्णुदास नामा विनवितसे तुम्हां । झणीं परब्रह्मा विसराल ॥ १७ ॥

[ १८७२ ]

अवचट देह लाधला प्राणिया । भक्तिविण वायां गेला जाण ॥ १ ॥
धिक् त्याचें जिणें जन्माला कासया । जरी पंढरिराया विसरला ॥ २ ॥
रामनामीं रत नव्हेचि बापुडें । जननिये सांकडें घातलें तेणें ॥ ३ ॥
ऐसा जन्म नको नको गा श्रीरामा । म्हणे तुझा नामा विष्णुदास ॥ ४ ॥

[ १८७३ ]

जड हेंचि खळें आयुष्याची रासी । काळ माप उसी मवीतसे ॥ १ ॥
माप तें लागलें माप तें लागलें । माप तें लागलें झडाझडां ॥ २ ॥
नामा म्हणे जावें शरण केशवा । सळेचा जो ठेवा न पवसी ॥ ३ ॥[1]

अभंग १८७२--(आ.), १८७३--(पं.), (शि.) व (आ.)
१ तिसऱ्या चरणापूर्वी काही प्रतींत पुढील चरण अधिक मिळतो---
मनोमय साक्ष माणिकाप्रमाणें । तूंचि नारायण काळें खंडीं ॥ ३ ॥ (आ.)



अनुक्रमणिका

[ १८७४ ]

अतिथी आलिया द्यावें अन्नदान । अर्पी जीव प्राण परमार्थी ॥ १ ॥
तोचि एक नर श्रीहरि समान । करी दुजें कोण नाहीं ऐसा ॥ २ ॥
दीनासी सन्मान करितां आदर । त्याचे उपकारा पार नाहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें असावें भाविकां । सर्वांभूतीं ऐक्य देखा पाहें ॥ ४ ॥

[ १८७५ ]

भूमिदानें होसी भूमिपाळु । कनकदानें कांति निर्मळु ।
चंदनदानें सदा शितळु । जन्मोजन्मीं प्राणिया ॥ १ ॥
अन्नदानें दृढायुषीं । उदकदानें सदासुखी ।
मंदिरदानें भुवन पालखी । सुपरिमळु उपचार ॥ २ ॥
वस्त्रदानें सुंदरपण । तांबूलदानें मनुष्यपण ।
[1]गोपीचंदनें ब्राह्मणपण । अतिलावण्य सुंदरता ॥ ३ ॥
जे वृक्ष लाविती सर्वकाळ । तयावरी शस्त्राचें झल्लाळ ।
जे ईश्वरीं अर्पिती फळ । [2]पुत्रवंत होऊनी नांदती ॥ ४ ॥
ऐशा दानांच्या पंक्ति । वेगळाल्या सांगों किती ।
एका घ्या रे लक्ष्मीपति । विष्णुदास नामा म्हणे ॥ ५ ॥

[ १८७६ ]

एकीं एकादशी करितां काय वेंचे । उपवासी राहतां काय वेंचे ॥ १ ॥
एक तुळसीदळ वाहतां काय वेंचे । पाऊलीं वंदितां काय वेंचे ॥ २ ॥
तुज जागरणा जातां काय वेंचे । हरि हरि म्हणतां काय वेंचे ॥ ३ ॥
संतसमागमा जातां काय वेंचे । चरणरज वंदितां काय वेंचे ॥ ४ ॥
एक दंडवत करितां काय वेंचे । अपराधी म्हणवितां काय वेंचे ॥ ५ ॥
एक प्रदक्षिणा करितां काय वेंचे । तीर्थयात्रेसी जातां काय वेंचे ॥ ६ ॥
ऐसि निमोली भक्ति कां न करिसी निदैवा । नामा म्हणे केशवा अनुसर पां ॥ ७ ॥

---

अभंग-१८७४ व १८७५--(पं.) व (शि.), १८७६--(आ.)
१ ज्ञानदानें (वा.) २ नानाविध निर्मळ (आ.)

अनुक्रमणिका

[ १८७७ ]

एकादशीं दिनीं खाईल जो अन्न । सूकर होऊनि येईल जन्मा ॥ १ ॥
एकादशीं दिनीं करील जो भोग । त्यासी मातासंग घडतसे ॥ २ ॥
एकादशीं दिनीं खेळेल सोंगटी । काळ हाणील खुंटी गुदस्थानीं ॥ ३ ॥
रजस्त्री शोणित सेविल्या समान । तांबुल चर्वण करील जी ॥ ४ ॥
नामा म्हणे नाहीं माझ्याकडे दोष । पुराणीं हें व्यासवाक्य आहे ॥ ५ ॥

[ १८७८ ]

निंदील हे जन सुखें निंदू द्यावें । सज्जनीं क्षोभावें नये बापा ॥ १ ॥
निंदा स्तुति ज्याला समान पैं जाली । त्याची स्थिति आली समाधिसी ॥ २ ॥
शत्रु मित्र ज्याला होती समानत्वें । तोचि पैं देवातें आवडला ॥ ३ ॥
माती आणि सोनें ज्या भासे समान । तो एक निधान योगिराज ॥ ४ ॥
नामा म्हणे भक्त ऐसे जे असती । तेणें पावन होती तिन्ही लोक ॥ ५ ॥

[ १८७९ ]

भवसागर तोडितां कां रे करितसां चिंता । पैल उभा दाता पांडुरंग ॥ १ ॥
निजाचें जें पीठ सोडूनि वैकुंठ । येथें वाळवंट आवडलें ॥ २ ॥
देव गुज सांगे पंढरीसी यारे । प्रेमसुख घ्यारे नाम माझें ॥ ३ ॥
तारीन भवसिंधु घ्यारे माझी भाक । साक्ष पुंडलिक करूनि सांगे ॥ ४ ॥
काया वाचा मनें दृढ धरा जीवीं । मी त्याचा चालवी भार सर्व ॥ ५ ॥
हें जरी लटिकें नामया पुसा । आहे त्या भरंवसा नामीं माझे ॥ ६ ॥

[ १८८० ]

एक तत्त्व त्रिभुवनीं । दुसरें न धरी तूं मनीं ॥ १ ॥
म्हणे कां नरहरि नारायण । मग तुज गांजिल कवण ॥ २ ॥
दोन मनीं जरी तूं धरिसी । तरी वायां दंडिला जासी ॥ ३ ॥
त्रिविध भक्ती चराचरीं । तयामाजी एक तूं करी ॥ ४ ॥

---

अभंग १८७७—(धु.), १८७८—(पं.), (शि.) व (धु.), १८७९ व १८८०—(आ.)

चहुं वेदीं जें बोलिलें । तें तूं करी बा उगलें ॥ ५ ॥
पंच-इंद्रियांचा संग । त्यांचा नको करूं पांग ॥ ६ ॥
साही चक्री मन पवन । तेथें नव्हे आत्मनिधान ॥ ७ ॥
सप्त स्वरीं करी कीर्तन । आणिक न लगे रे साधन ॥ ८ ॥
अष्टही गुण सात्विक पूजा । भावें भजा गरुडध्वजा ॥ ९ ॥
नवही द्वारें दंडिती । पुनरपि कोठे कैंचि भक्ति ॥ १० ॥
दाही दिशा अवलोकितां । दिवस गेले मोजितां ॥ ११ ॥
अकरा रुद्र जाले जरी । तरी एकचि श्रीहरि ॥ १२ ॥
बारा मास आणि पक्ष । व्यर्थ जाती दे तूं लक्ष ॥ १३ ॥
तेरा गुणांचा तांबूल । समर्पावें पूगीफल ॥ १४ ॥
चौदा भुवनें ज्याचे पोटीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ १५ ॥
पंधरा दिवसां एकादशी । करा जागर उपवासी ॥ १६ ॥
षोडश उपचारें पूजा । भावें भजा गरुडध्वजा ॥ १७ ॥
सत्रावी जीवनकळा । तिचा घे कांरे सोहळा ॥ १८ ॥
अठरा पुराणें वानिसी । निरंतर कृष्णकीर्ति ॥ १९ ॥
म्हणे विष्णुदास नामा । शरण जावें पुरुषोत्तमा ॥ २० ॥

[ १८८१ ]

हरिनामीं उदास तो पतित निष्ठुर । तया यमकिंकर गांजितील ॥ १ ॥
तोचि हरिचा दासु नामीं ज्या विश्वासु । तया गर्भवासु नाहीं नाहीं ॥ २ ॥
मार्ग सांडोनियां आडमार्गी जाती । ते व्याघ्रा वरपडे होती क्षणामाजीं ॥ ३ ॥
नामा म्हणे जेणें नामीं आळस केला । तो येवोनि गेला व्यर्थ एक ॥ ४ ॥

[ १८८२ ]

रामनाम म्हणतां संसाराचें भय । म्हणती त्याच्या होय जिव्हे कुष्ट ॥ १ ॥
अमृत सेवितां कैंचे ये मरण । जाणती हे खूण अनुभवी ॥ २ ॥
ज्याची एकवृत्ति रामनामीं प्रीति । असतां कैसे होती गर्भवास ॥ ३ ॥
नामा म्हणे नामीं दृढ भाव धरा । आत्महित करा जाणते हो ॥ ४ ॥

अभंग १८८१ व १८८२—(आ.)

अनुक्रमणिका

[ १८८३ ]

दाहीदिशा फेरे कष्टविसी सैरा । किती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥
विठ्ठलाचे नामीं दृढ धरी भाव । येर सांडी वाव मृगजळ ॥ २ ॥
भक्ति मुक्ति सिद्धि जोडोनियां कर । करिती निरंतर वोळगण ॥ ३ ॥
नामा म्हणे मना धरी पैं विश्वास । मग तुज गर्भवास नव्हे नव्हे ॥ ४ ॥

[ १८८४ ]

सांडी सांडी पसारा विषयांचा चारा । विठ्ठल विठ्ठल मोहरा वळघे वेगीं ॥ १ ॥
होईल तुझें हित होसिल पूर्ण भरित । सर्वांभूतीं हित तेचि दया ॥ २ ॥
वळघे विठ्ठलरूपा मार्ग हाचि सोपा । विषयाच्या खेपा चुकतील ॥ ३ ॥
नामा म्हणे केवळ आम्हां नित्यकाळ । दिननिशीं पळ विठ्ठल देव ॥ ४ ॥

[ १८८५ ]

व्यर्थ का हव्यास करिसी परोपरी । नाम निरंतरीं न म्हणा कां रे ॥ १ ॥
आयुष्य जाईल क्षणांत सरोन । पावसी पतन कुंभिपाकीं ॥ २ ॥
नाम संकीर्तन नाइके स्वभावें । प्रत्यक्ष ते शव जगामाजीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसे गेले बहुतेक । सांगे सकळिक हेंचि आतां ॥ ४ ॥

[ १८८६ ]

मुषक हव्यासें चालुनि भूमीतें । मांजर तयातें टपतसे ॥ १ ॥
तैसा तुज काळ टपत वेळोवेळां । वेगीं त्या गोपाळा शरण जाई ॥ २ ॥
भानुचेनि मापें आयुष्य जें चळे । वोसरे अवचितां डोळे कांहीं झांकी ॥ ३ ॥
नामा म्हणे कांरे निश्चिती हे मूढा । हरिनाम गोडा सेवीस ना ॥ ४ ॥

[ १८८७ ]

पवित्र आणि परिकर । उभविलें मंदिर ।
दीपेंविण मनोहर । शोभा न पवे ॥ १ ॥

अभंग १८८३ व १८८४—(पं.) व (शि.), १८८५—(आ.), १८८६ व १८८७—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

श्यामअंगीं तरुणी । सुंदर होय रमणी ।
पुरुषाविण कामिनी । शोभा न पवे ॥ २ ॥
द्रव्याविण नर । जरी जाहला सुंदर ।
तो त्याविण चतुर । शोभा न पवे ॥ ३ ॥
योगिया आणि कठिण । इंद्रिया नाहीं दमन ।
षट्कर्मेंविण ब्राह्मण । शोभा न पवे ॥ ४ ॥
नामा म्हणे सुंदरा । रखुमादेवीवरा ।
तुजविण दातारा । शोभा न पवे ॥ ५ ॥

[१८८८]

निरंतर तुम्ही करावा विचार । भवाब्धीचा पार होय कैसा ॥ १ ॥
जन्म गेले वायां विषयाचे संगें । भुलले वाउगें मायामोहें ॥ २ ॥
अवघा करितां संसाराचा धंदा । वाचे वदा सदा हरिनाम ॥ ३ ॥
सर्वभावें एका विठोबातें भजा । आरते करा पूजा हरिभक्त ॥ ४ ॥
सर्व सुख होई तुम्हांला अपैतें । न याल मागुतें गर्भवासा ॥ ५ ॥
नामा म्हणे तुम्ही विचारूनि पहा । सर्वकाळ रहा संतसंगें ॥ ६ ॥

[१८८९]

न फिटे हें ओझें मायेचा गुंडाळा । एका तूं गोपाळा शरण जाई ॥ १ ॥
तुटेल बिरडें सुटेल हा मोह । केशवींच भाव असों देणें ॥ २ ॥
कैंचे हे क्लेश उदासीन वायां । भजन यादवराया हेंचि सत्य ॥ ३ ॥
नामा म्हणे सुफळ भजनाचें करी । सर्वांभूतीं हरि भजन भावो ॥ ४ ॥

[१८९०]

कल्मश हरती नामें जयाचेनि । ते विरारोनी काय करावें ॥ १ ॥
संसारतारक विसांवा हरी । गर्भवास चुकवी तो मुरारी ॥ २ ॥
बाह्या उभारोनी घेतां रामनाम । नामा म्हणे केशव परमात्मा ॥ ३ ॥

अभंग १८८८—(आ.), १८८९—(पं.) व (शि.), १८९०—(आ.)

अनुक्रमणिका

[ १८९१ ]

उदरास भरण खळ बुद्धीसि कारण । त्याचें परिहरण रामनाम ॥ १ ॥
कामसंदीपन दोष आचरण । त्याचें परिहरण रामनाम ॥ २ ॥
दुर्वासना गहन दुर्बुद्धि आचरण । त्याचें परिहरण रामनाम ॥ ३ ॥
नामा म्हणे कारण संसारतारण । जरी मनीं निधान रामनाम ॥ ४ ॥

[ १८९२ ]

[1]देवोदेवी बोळे दे तूं जीवन भातें । मेहुडें दुभतें जना यया ॥ १ ॥
तैसें मनीं करा भजन भाव धरा । विषय पसारा टाका वेगीं ॥ २ ॥
उपायो न लगे दया ते धरावी । आपुली म्हणावी माय जगीं ॥ ३ ॥
नामा म्हणे बाप विठ्ठल तो आमुचा । कुळदेव साचा पुरातन ॥ ४ ॥

[ १८९३ ]

गौळियाचे घरीं कैवल्याचे दानीं । परब्रह्म अंगणीं क्रीडतसे ॥ १ ॥
ऐसें कांहीं करा आलेनो संसारा । जेणें जोडे सोयरा पांडुरंग ॥ २ ॥
करितां त्याचें काज मनीं न धरी लाज । म्हणे हें शरण मज सर्व भावें ॥ ३ ॥
राखे बळिचें द्वार पाहे त्याची वास । म्हणे हा माझा दास अंतरंगु ॥ ४ ॥
गोवळचाचें उच्छिष्ट मनीं न धरी वीट । आवडी निकट गोपाळाची ॥ ५ ॥
तरीच क्रिया कर्म केलें होये सफळ । जरी हृदयीं गोपाळ येऊनि राहे ॥ ६ ॥
येरी ते मायावी जग भुलवणी । नित्य विभांडणी सर्वभावें ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसें संतांचिया सोई । विठोबाचे पायीं [2]भेटी मन ॥ ८ ॥

[ १८९४ ]

विठ्ठलाचे पाय धरोनियां राहे । मग संसार तें काय करील तुझें ॥ १ ॥
संसाराचें भय नाहीं हरिचे दासा । विठु आम्हां सरिसा निरंतर ॥ २ ॥

---

अभंग १८९१—(आ.), १८९२ व १८९३—(पं.), (शि.) व (आ.), १८९४—(पं.) व (शि.)

१ देवो देवो बोले तू जीवन भातें । (आ.)  २ ठाव मज (पं.), मन ठेवी (आ.)

निरंतर वसे हरि भक्तापाशीं । विसंबेना त्यासी कदाकाळीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसा विठ्ठल सोडोनि । वेर्थ काय जनीं शिणताती ॥ ४ ॥

[१८९५]

जन्मा येऊनियां काय पुण्य केलें । बाळपण गेलें वायांविण ॥ १ ॥
संतसंगें सुख हुंडारलें जाणा । नामसंकीर्तना नोळखत ॥ २ ॥
तारुण्यपणेंहि नाठवेचि देवा । वृद्धपणीं सेवा अंतरली ॥ ३ ॥
यापरी जन्मुनि गेलासी रे वायां । पंढरिच्या राया नोळखतां ॥ ४ ॥
आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं । अजुनी कां श्रीहरी नोळखसी ॥ ५ ॥
सहस्र अपराध जरी म्यांरे केले । तारी वा विठ्ठले म्हणे नामा ॥ ६ ॥

[१८९६]

बाळपणीं वर्षे बारा । तीं तुझीं गेलीं रे अवधारा ।
तें तूं धांवसी सैरा । खेळाचेनि विनोदें ॥ १ ॥
म्हणवोनि आहेस नागर तरुणा । तंव वोळगे रामराणा ।
आलिया म्हातारपणा । मग तुज कैचि आठवण ॥ २ ॥
तुज भरली अठरा । मग तूं होसी निमासुरा ।
पहिले पंचविसाच्या भरा । झणें गव्हारा भुललासी ॥ ३ ॥
आणिक भरलिया सात पांचा । मग होसी महिमेचा ।
गर्वें खिळेल तुझी वाचा । देवा ब्राह्मणातें न भजसी ॥ ४ ॥
त्वचा मांस शिरा जाळी । बांधोनि हाडांची मोळी ।
लेखितोसि सदाकाळीं । देहचि रत्न आहे माझें ॥ ५ ॥
बहु श्रम या शिराचा रे । म्हणे मी मी तारुण्याचा भरें ।
ऐसा संशय मनाचा रे । तूं संडी रे अज्ञाना ॥ ६ ॥
माथवीये पडे मासोळी । तें म्हणे मी आहे प्रबळ जळीं ।
तैसी विषयाच्या पाल्हाळीं । भुललासी गव्हारा ॥ ७ ॥
तुज भरलिया साठी । मग तुझ्या हातीं येईल काठी ।
मग तीं अडोरें लागती । म्हणती बागुल आला रे ॥ ८ ॥
म्हणती थोर रे म्हातारा । कानीं झालासि बहिरा ।
कैसे न ऐकसी परिकरा । नाम हरि हराचें ॥ ९ ॥

अभंग १८९५—(पं.) व (शि.), १८९६—(आ.)

अनुक्रमणिका

दातांची पाथीं उठी । मग चाववेना भाकर रोटी ।
नाक लागलें हनुवटी । नाम होटीं न उच्चारवे ॥ १० ॥
बैसोनि उंबरवाटिया तळवटीं । आया बाया सांगती गोष्टी ।
म्हणती म्हातारा वैल दृष्टी । कैसा अक्षयीं जाला गे ॥ ११ ॥
खोकलिया येतसा खंकारा । म्हणती रांडेचा म्हातारा ।
अझूनि न जाय मरणद्वारा । किती दिवस वांचेल ॥ १२ ॥
ऐसा जाणोनि अवसर । बोळखा वेगें सारंगधर ।
विष्णुदास नामयाचा दातार । वर विठ्ठल पंढरिये ॥ १३ ॥

[१८९७]

संसार करितां देव जैं सांपडे । तरि कां जाले वेडे सनकादिक ॥ १ ॥
संसारीं असतां देव जरी भेटता । शुकदेव कासया जाता तया लागीं ॥ २ ॥
घराश्रमीं जरी जोडे परब्रह्म । तरी कां घराश्रम त्याग केला ॥ ३ ॥
जातीच्या आचारें सांपडे जरी सार । तरी कां निरहंकार जाले साधु ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां सकळ सांडोन । आलोसें शरण विठोबासी ॥ ५ ॥

[१८९८]

परब्रह्मींची गोडी नेणती तीं बापुडीं । संसारसाकडीं विषयभरित ॥ १ ॥
तूतें चुकलीरे जगजीवनरक्षा । अनुभवाविण लक्षा न येचि रे कोणा ॥ २ ॥
जवळी असतांचि क्षीर नव्हेसि वरपडा । रुधिर सेवितां गोचिडा जन्म गेला ॥ ३ ॥
दर्दुरा कमळिणी एके ठायीं बिढार । वास तो मधुकर घेऊनि गेला ॥ ४ ॥
मधुमक्षिया मोहोळ रचितां रात्रंदिवस । भाग्यवंत रस घेवोनि गेला ॥ ५ ॥
शेळीस घातली उसांची वैरणी । घेऊं नेणे धणी त्या रसाची ॥ ६ ॥
नामा म्हणे ऐसीं चुकलीं बापुडीं । अमृत सेवितां फुडी चवी नेणें ॥ ७ ॥[1]

अभंग १८९७--(आ.), १८९८--(धु.)

१ काही प्रतींत ६, ४, १ व ३ या क्रमाने चरण येतात, तसेच (धु.) प्रतीत पुढील चरण २ व ५ च्या जागीं आढळतात--
तैसी हे चुकलीं जगीं जगजीवन । अनुभवावांचुनी नेणवे कोणा ॥ २ ॥
कुल्लाळाचे घरीं बांधिलासे हस्ती । तयावरी माती वाहतसे ॥ ५ ॥

[१८९९]

मिथ्या मायाजळ मृगजळ बाधा । लागलासे धंदा संसारिया ॥ १ ॥
आलेंरे आलेंरे हाकित टाकित । मूढा गिवसित काळचक्रीं ॥ २ ॥
बंधनापासूनि बांधलासे पायीं । बुडतों मी डोहीं निर्जळा ये ॥ ३ ॥
कोण भरंवसा धरिलासे जिवीं । बळिया सोडवी कदा काळीं ॥ ४ ॥
[1]पुत्र कलत्र बंधु माझे म्हणसी झणीं । न पवती निर्वाणीं धांवणिया ॥ ५ ॥
[2]नामा म्हणे वेगीं होऊनि सावधान । जाई येक्या शरण केशवराजा ॥ ६ ॥

[१९००]

आलेनो संसार सोडवणें करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥
प्रपंच न सरे कदा कल्पकोडी । वासनेचि बेडी पडे पायीं ॥ २ ॥
व्यर्थ मायादेवी गर्भवास गोवी । नश्वर भोगावी नाना योनी ॥ ३ ॥
नामा म्हणे पाहा विचारूनि मनीं । स्मरावा निर्वाणीं पांडुरंग ॥ ४ ॥

[१९०१]

आलेनो संसारा उठा वेगें चला । जिवलगा विठ्ठला भेटीलागीं ॥ १ ॥
दुर्लभ मनुष्यजन्म न लभे रे मागुता । [3]लाहो घ्या सर्वथा पंढरिचा ॥ २ ॥
भावें लोटांगण घाला महाद्वारीं । होईल बोहरी त्रिविध तापा ॥ ३ ॥
श्रीमुखाची वास पहा धणीवरी । आठवी अंतरीं घडिये घडिये ॥ ४ ॥
शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळसीमाळा । तनमन ओवाळा चरणांवरूनि ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो अनाथा कोंवसा । पुढतीं गर्भवासा येऊं नेदी ॥ ६ ॥

[१९०२]

अवघे निरंतर करा हा विचार । भवसिंधूचां पार तरिजे केवीं ॥ १ ॥
अवघे जन्म वायां गेले विषयसंगें । भुललेती वाउगे मायामोहें ॥ २ ॥
अवघा वेळ करितां संसाराचा धंदा । वाचे वसो सदा हरिचें नाम ॥ ३ ॥

---

अभंग १८९९—(धु.) व (आ.), १९०० व १९०१—(आ.), १९०२—(पं.) व (शि.)
१ पुत्र पत्नी बंधु म्हणसील झणीं । धांवोनि निर्वाणीं पाव आतां ॥ ५ ॥ (आ.)
२ नामा म्हणे वेगीं सावधान व्हावें । शरणही जावें पांडुरंगा ॥ ६ ॥ (आ.)

अनुक्रमणिका

अवघ्या भावीं एका विठ्ठलातें भजा । आतें पूजा करा हरिदासाची ॥ ४ ॥
अवघें सुख तुम्हां होईल अपैतें । न याल मागुते गर्भवासा ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघें अनुभवोनि पहा । सर्वकाळ राहा संतसंगें ॥ ६ ॥

[ १९०३ ]

अवघे सावधान होऊनि विचारा । सोडवण करा [1]संसाराची ॥ १ ॥
अवघा काळ वाचे म्हणा नारायण । वायां एक क्षण जाऊं नेदी ॥ २ ॥[2]
अवघें हें आयुष्य सरोनि जाईल । मग कोण होईल साह्य तुम्हां ॥ ३ ॥
अवघा हा प्रपंच जाणोनि लटिका । शरण रिघा एका पंढरिराया ॥ ४ ॥
अवघे मायामोहें गुंतलेती पहा । अवघे सहज आहां [3]ब्रह्मरूप ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे सुखाचेचि व्हाल । जरी मन ठेवाल विठ्ठलपायीं ॥ ६ ॥

[ १९०४ ]

जळीं बुडबुडे देखतां देखतां । क्षण न लागतां दिसेनाती ॥ १ ॥
तैसा हा संसार पाहतां पाहतां । अंतकाळीं हातां काई नाहीं ॥ २ ॥
गारुडयाचा खेळ दिसे क्षणभर । तैसा हा संसार दिसे खरा ॥ ३ ॥
नामा म्हणे तेथें कांहीं नसे [4]बरें । क्षणाचें हें सर्व खरें आहे ॥ ४ ॥

[ १९०५ ]

संसाराचें [5]दुःख सुख म्हणों नये । पुढें दुःख पाहे अनिवार ॥ १ ॥
तया दुःख नाहीं अंतपार जाणा । काळाची यातना बहुतांपरी ॥ २ ॥
संसाराची चिंता वाहतां जन्म गेला । सोस हा बाढला बहुतांपरी ॥ ३ ॥
हितहि बुडालें परत्र दुरावलें । नरदेह बुडविलें भजनेंविण ॥ ४ ॥
भजनाच्या प्रतापें दुःख दुरी जाय । जैसें अभ्र होय देशधडी ॥ ५ ॥
वायुच्या झंझाटें वृक्ष उन्मळती । [6]परी माना गति तैसें दुःख ॥ ६ ॥
नामा म्हणे नाम दुःखाचा परिहार । सुखाचा अनिवार पार नाहीं ॥ ७ ॥

---

अभंग १९०३—(शि.), १९०४—(आ.), १९०५—(न.)

१ चौऱ्यांशींची (शि.)  २ हा चरण काही प्रतींत नाही.  ३ जीवन्मुक्त (शि.)
४ बा रे (बा.)  ५ सुख (न.)  ६ परिणामगति (न.)

[ १९०६ ]

प्रपंच घडामोडी न मरे कल्पकोडी । वासनेची बेडी पडली पायीं ॥ १ ॥
सोडवण करा आलेनो संसारा । शरण जा उदारा [1]विठोबासी ॥ २ ॥
लटकी मायादेवी गर्भवासीं गोवी । नरक भोगवी नाना योनी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही विचारावें मनीं । सोयरा [2]निर्वाणीं पांडुरंग ॥ ४ ॥

[ १९०७ ]

प्रपंच स्वार्थासि साधावया चांग । वैराग्याचें अंग दाविसी जना ॥ १ ॥
अनुताप नित्य नाहीं कदाकाळीं । मग संचिताची होळी कैसी होय ॥ २ ॥
पवित्र ते वाचा कां रे गमविसी । रामनाम न म्हणसी अरे मूढा ॥ ३ ॥
नामा म्हणे जीव कासया ठेवावा । न भजतां केशवा मायबाप ॥ ४ ॥

[ १९०८ ]

स्वयें घरदार प्रपंच मांडिला । जोडुनियां दिला बाळा हातीं ॥ १ ॥
तैसें सर्वांभूतीं असावें संसारीं । प्राचीनाची दोरी साक्ष आहे ॥ २ ॥
वाटसरू वस्ती येऊनि राहिला । प्रातःकाळीं गेला उठोनियां ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां नाहीं प्रापंचिक । पंढरिनायक साह्य जाला ॥ ४ ॥

[ १९०९ ]

फुटल्या घटाचें नाहीं नागवणें । संसार भोगणें तेणें न्यायें ॥ १ ॥
स्वप्नींचि ती मात जागृतीसी सांगें । तैसा भवरोग प्रारब्धाचा ॥ २ ॥
नामा म्हणे ऐसा जाण तो संसार । वाउगा पसारा जायजाणा ॥ ३ ॥

[ १९१० ]

जायजाणा देह [3]जाईल नेणसी । लौकिकीं मिरविसी लाजेसिना ॥ १ ॥
माझें माझें [4]माझें मानिसी निभ्रांत । करिसी आघात रात्रंदिवस ॥ २ ॥

---

अभंग १९०६—(पं), (शि.) व (धु.), १९०७ व १९०८—(आ.), १९०९—(शि.), १९१०—(पं.) व (बा.)

१ पांडुरंगा (धु.) २ निदानी (धु.) ३ जाणता (बा.) ४ सर्व (बा.)

अनुक्रमणिका

सांग तूं कोणाचा आलासि कोठोनि । दृढ बुद्धि मनीं विचारीं पां ॥ ३ ॥
धन संपत्ति करोनि मदें मातलासी । पुढत पुढतीं पडसी गर्भवासी ॥ ४ ॥
पुत्र कलत्र दारा यांचा जालासी म्हणियारा । यांच्या पातकांचा भारा वाहसील ॥ ५ ॥
अंतीं यमापाशीं बांधोनियां नेती । कवतुक पाहती सकळ जन ॥ ६ ॥
नानापरीं तुज करिती यातना । सांगे तेथें कोणा बोभाशील ॥ ७ ॥
धन पुत्र दारा तुज नये कामा । एका मेघश्यामा वांचोनिया ॥ ८ ॥
विषयाचेनि संगें भुलशील ह्मणें । भोगिसी पतनें रात्रंदिवस ॥ ९ ॥
नामा म्हणे एक ध्यायीं कमलापति । निजाचा सांगाति केशवराज ॥ १० ॥

[१९११]

शरीर काळाचें भातुकें । तुम्ही नेणा कां इतुकें ॥ १ ॥
माझा जन्म गेला वायां । तुजविण पंढरिराया ॥ २ ॥
अझुनि तूं कां रे निश्चित । काळ जवळी हटकित ॥ ३ ॥
नामा म्हणे अवघीं चोरें । शेखीं हरिनाम सोयरें ॥ ४ ॥

[१९१२]

औट हात [1]जायाचे कोपट । दोन दिवस फुकट भोगाकारी ॥ १ ॥
कवणाचें घर कवणाचें दार । भावें बोळगारे नरहरी ॥ २ ॥
आढें मोडलें घर जर्जर जालें । मोडोनियां गेलें वारियानें ॥ ३ ॥
खचला तो पाया पडली ते भिंती । नामा म्हणे चित्तीं घर नलगे ॥ ४ ॥

[१९१३]

देह आहे तंव करा रे धांवणी । शरण चक्रपाणि रिघा वेगीं ॥ १ ॥
येर ते लटिके इष्टमित्र सखे । हे तंव पारिखे सवचोर ॥ २ ॥
लावुनि मोहातें दास्यत्व करविती । अंतकाळीं होती पाठिमोरी ॥ ३ ॥
मायेचें भुररे भुलवी सकळ । हें तुज न कळे कटकटां ॥ ४ ॥

अभंग १९११—(आ.), १९१२—(पं.) व (शि.), १९१३—(पं.), (शि.) व (न.)
१ जयाचे (पं.)

अनुक्रमणिका

यापरी आयुष्य लोटलें रे जना । पुढें यमयातना न चुकती ॥ ५ ॥
धोतरा देऊनी सर्वस्व हरीती । नामा म्हणे गती हेची जना ॥ ६ ॥

[१९१४]

यम सांगे दूता । तुम्ही जावें मृत्युलोका ।
आपुला लोक जितुका । तितुकाचि आणावा ॥ १ ॥
तुम्हां सांगतों कुळरंग । निंदा आणि द्वेष करिती राग ।
खरी खोटी चाहडी सांगे । तें कुळ आपुलें ॥ २ ॥
ज्याचें विषयावर ध्यान । परद्रव्य परस्त्री गमन ।
धर्मासी विन्मुखपण । तें कुळ आपुलें ॥ ३ ॥
भावेंविण भक्ति करिती । भक्तिविणें भाव दाविती ।
त्यांची तुम्ही फजिती । बहुतां प्रकारें करावी ॥ ४ ॥
मंत्रसंचारी जे लोक । देव सांडून दैवता उपासक ।
झोटिंग वेताळ खेताळ देख । ते सखे बापा तुमचे ॥ ५ ॥
लटिके वासनेचा नवसा । करिती करविति पशुहिंसा ।
त्यानें बहुत दिवस भरंवसा । धरिला आहे ॥ ६ ॥
घातकी पातकी गुरुद्रोही । हित सांगतां गुरुसी हेडवी ।
विष्णुदासा वेगळें करुन पाही । सांगितले तितुके आणावे ॥ ७ ॥
नामा म्हणे एक्या पातकिया दंडिती । नाना विपत्ति काय सांगू किती ।
विष्णुदासाचे वंदिती । चरणरज ते यम ॥ ८ ॥

[१९१५]

दुर्लभ नरदेह जाला तुम्हा आम्हां । येथें साधूं प्रेमा राघोबाचा ॥ १ ॥
अवघे हातोहातीं तरों भवसिंधु । आवडी गोविंदु गाऊं गीतीं ॥ २ ॥
हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां । शोक मोह दुःख निरसूं तेणें ॥ ३ ॥
एकमेकां करूं सदा सावधान । नामी अनुसंधान तुटीं नेदूं ॥ ४ ॥
घेऊं सर्वभावें रामनाम दीक्षा । विश्वासें सकळिकां हेंचि सांगों ॥ ५ ॥
नामा म्हणे शरण रिघो पंढरिनाथा । नुपेक्षी सर्वथा दीनबंधु ॥ ६ ॥

अभंग १९१४—(न.), १९१५—(पं.), (शि.) व (न.)

अनुक्रमणिका

[ १९१६ ]

नामा म्हणावया तूं कां रे करंटा । काय तुझे अदृष्टीं लिहिलें असे ॥ १ ॥
यमाचे यमपाश पडतील गळां । जाशील सगळा काळापोटीं ॥ २ ॥
शरीराची आशा बाळ हें तारुण्य । अवचित वृद्धपण येईल मूढा ॥ ३ ॥
लक्ष्मी धन मद पुत्र स्त्री घरदार । नेतां यमकिंकर न सोडविती ॥ ४ ॥
मायबाप सखी न येती सांगातें । जंव शरीरीं पुरतें बळ आहे ॥ ५ ॥
न येती सांगातें सज्जन सोयरीं । वानप्रस्थ ब्रह्मचारी श्रेष्ठ जाले ॥ ६ ॥
घेशील तूं सोंग संन्यास आश्रम । सांडोनि घराश्रम न सुटती ॥ ७ ॥
नामा म्हणे नाम नित्य नरहरी । म्हणतां श्रीहरी तरशील ॥ ८ ॥

[ १९१७ ]

बाळ वृद्ध तरुण काया हे जर्जर । वेगीं हा पामर आळसी जाला ॥ १ ॥
काय करूं देवा नाहीं यासि भावो । न करी उपावो तुझे भजनीं ॥ २ ॥
मन ठेवी ठायीं रंगे तूं श्रीरंगीं । गोष्टी त्या वाउग्या बोलूं नको ॥ ३ ॥
नामा म्हणे श्रीरंग चिती पां चोखडा । [1]उघडा पवाडा सांगितला ॥ ४ ॥

[ १९१८ ]

धनमानबळें नाठविसी देवा । मृत्युकाळीं तेव्हां कोण आहे ॥ १ ॥
यमाचे यमदंड बैसतील माथां । तेव्हां तुज रक्षिता कोण आहे ॥ २ ॥
मायबापबंधु तोंवरीं सोयरीं । इंद्रियें जोंवरी वाहताती ॥ ३ ॥
सर्वस्व स्वामिनी म्हणविसी कांता । तेहि केश देतां रडतसे ॥ ४ ॥
विष्णुदास नामा जातांचि शरण । स्वप्नीं जन्ममरण नाहीं नाहीं ॥ ५ ॥

[ १९१९ ]

भुक्ति मुक्ति सिद्धि यावयाकारणें । सेवकाशी देणें पांडुरंगा ॥ १ ॥
ऐसिया तुज सांगणें आपणातें म्हणविती । तया अधोगति कल्पकोडी ॥ २ ॥

---

अभंग १९१६ ते १९१८--(पं.) व (शि.), १९१९--(आ.)
१ पुराणीं (पं.)

देहो सरल्या मिळे ज्योतिस ज्योति । ऐसें म्हणतां किती सितरिले ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें नाशिवंत शरीर । पूजा हरिहर एक वेळां ॥ ४ ॥

[ १९२० ]

विषयाचा आंदणा दिसे केविलवाणा । करीतसे कल्पना नानाविध ॥ १ ॥
कुटुंब पाईक म्हणवी हरिचा दास । मागे ग्रासोग्रास दारोदारीं ॥ २ ॥
जळो त्याचें कर्म जळो त्याचा धर्म । जळो तो आश्रम जाणिवेचा ॥ ३ ॥
कल्पद्रुमातळीं काखे घेऊनि झोळी । बैसोनि सांभाळीं भिक्षा अन्न ॥ ४ ॥
[१]अधम पोटभरी विचार तो न करी । पुढती दारोदारीं हिंडो जाय ॥ ५ ॥
पोटालागीं करी नाना विटंबना । संतोषवी मना दुर्जनांच्या ॥ ६ ॥
न करी हरिचें ध्यान बैसोनि एकांतीं । जन्माची विश्रांति जेणें होय ॥ ७ ॥
द्रव्याच्या अभिलाषें जागे सटवीपाशीं । नवजे एकादशी जागरणा ॥ ८ ॥
उत्तम मध्यम अधम न विचारी । स्तुति नाना करी आशाबद्ध ॥ ९ ॥
वैराग्याची वार्ता कैंची दैवहता । नुपजे सर्वथा प्रेमभाव ॥ १० ॥
नामा म्हणे ऐसें तारी एक्या गुणें । अजा आरोहण गजस्कंधीं ॥ ११ ॥

[ १९२१ ]

देहाचें ममत्व जंव नाहीं तुटलें । [२]जंव नाहीं विटलें विषयीं मन ॥ १ ॥
[३]तंववरी निजसुख कैसेनि आतुडे । जंववरी न झडे मीतूंपण ॥ २ ॥
मीचि एक भक्त मीचि एक मुक्त । म्हणविती पतित दुराचारी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे कृपेविण देवा । केंवि जोडे ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

[ १९२२ ]

भक्तीविणें जिणें जळों लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखरूप ॥ १ ॥
एक एक योनि कोटि कोटि फेरा । मनुष्य देहवारा मग लागे ॥ २ ॥

अभंग १९२०—(पं.), (शि.) व (न.), १९२१—(पं.), (धु.) व (गं.), १९२२—(आ.)

१ अधम विचार नव्हे पोटभरी। (न.) २ विषयीं विटलें मन नाहीं ॥ १ ॥ (आ.)
३ तंव नित्य सुख कैसेनि आतुडे । नेणती बापुडे प्रेमसुख ॥ २ ॥ (आ.)

वीस लक्ष योनि वृक्षामध्यें घ्याव्या । जळचरीं भोगाव्या नव लक्ष ॥ ३ ॥
अकरा लक्ष योनि किरडामध्यें घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्षामध्यें ॥ ४ ॥
तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवाभीतरीं चारी लक्ष ॥ ५ ॥
नामा म्हणे तेव्हां नरदेह या नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

[ १९२३ ]

शेवटिली पाळी तेव्हां मनुष्यजन्म । चुकलिया वर्म फेरा पडे ॥ १ ॥
एक जन्मीं ओळखी करा आतमारामा । संसार [1]सुगम भोगूं नका ॥ २ ॥
संसारीं असावें असोनि नसावें । कीर्तन करावें वेळोवेळां ॥ ३ ॥
नामा म्हणे विठो भक्ताचिये द्वारीं । घेऊनियां करीं सुदर्शन ॥ ४ ॥

[ १९२४ ]

वावडी दुरिच्या दुरी उडतसे अंबरीं । हातीं असे दोरी परि लक्ष तेथें ॥ १ ॥
दुडी वरी दुडी पाण्या निघाली गुजरी । चाले मोकळ्या करीं परि लक्ष तेथें ॥ २ ॥
व्यभिचारि नारी परपुरुष जिव्हारीं । वर्ते घरोचारीं परि लक्ष तेथें ॥ ३ ॥
तस्कर नगरीं परद्रव्य जिव्हारीं । वर्ते घरोघरीं परि लक्ष तेथें ॥ ४ ॥
धनलोभ्याचें धन ठेंवियेलें दुरी । वर्ते ग्रामांतरीं परि लक्ष तेथें ॥ ५ ॥
नामा म्हणे असावें भलतिया व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं ठेवूनियां ॥ ६ ॥

[ १९२५ ]

भक्तीविण मोक्ष नव्हे हा सिद्धांत । वेद बोले हात उभारोनि ॥ १ ॥
जगीं तेंचि ज्ञान जाणाया लागुनि । संता वोळगोनि वश्य कीजे ॥ २ ॥
प्रपंच हा खोटा शास्त्रें निवडिला । पाहिजे साक्षीला सद्गुरु तो ॥ ३ ॥
नामा म्हणे सेवा घडावी संतांची । घ्यावी कृपा त्यांची तेंचि ज्ञान ॥ ४ ॥

[ १९२६ ]

हरिविण जिणें व्यर्थचि संसारीं । जग अलंकारीं मिरवीत ॥ १ ॥
देवाविण शब्द लटकें करणें । भांडा रंजविणें सभेमाजीं ॥ २ ॥

---

अभंग १९२३—(आ.), १९२४—(पं.), (धु.), (शि.), (न.) व (भा.), १९२५—(धु.), १९२६—(आ.)

१ संभ्रमा (बा.)



अनुक्रमणिका

आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥
नामा म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभागी तो ॥ ४ ॥

[१९२७]

तुम्हां स्वहित करणें आहे । सेवा राघोबाचे पाय ॥ १ ॥
दुष्टबुद्धि दुरी करा । तोडा अविद्येचा थारा ॥ २ ॥
शुद्ध करा तुमचें मन । तुम्हां जवळी नारायण ॥ ३ ॥
निर्मळ करा अंतःकरण । लावा राघोबासी ध्यान ॥ ४ ॥
नामा म्हणे दृढ धरा । तारू निर्वाणीचा खरा ॥ ५ ॥

[१९२८]

मृगजळडोहो कां उपससी वायां । वेगीं लवलाह्या शरण रिघें ॥ १ ॥
भजे तूं विठ्ठला सर्वांभूतीं भावें । न लगति नांवें आणिकांचीं ॥ २ ॥
होईल सुटका घडेल भजन । नाम जनार्दन येईल वाचे ॥ ३ ॥
नामा म्हणे घडे भजन विठ्ठलीं । ऐसि हे निमोली भक्ति करी ॥ ४ ॥

[१९२९]

हरिसी शरण रिघा वहिलें । राहे कळिकाळ उगले ॥ १ ॥
खंडलें एका बोलें । विठ्ठल समर्थे अंगिकारिलें ॥ २ ॥
नामयानें संसारा जिंकिलें । केशवचरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

[१९३०]

न लगती डोंगर चढावे । हळुच पाऊल धरावें ॥ १ ॥
विठ्ठलाचे पायीं बरवे । गंगा विनटे स्वभावें ॥ २ ॥
नामा म्हणे तीर्थ बरवें । मुकुटीं धरिलें सदाशिवें ॥ ३ ॥

अभंग १९२७—(धु.), १९२८—(पं.) व (शि.), १९२९—(आ.), १९३०—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[ १९३१ ]

आतां पांडुरंग स्मरा । जन्ममृत्यु चुकवा फेरा ॥ १ ॥
ऐसा कांहीं करा नेम । मुखीं स्मरा रामनाम ॥ २ ॥
चिंता ऐसें ध्यान । तेणें असा समाधान ॥ ३ ॥
नामा म्हणे हरिदास । त्यासि असावा अभ्यास ॥ ४ ॥

[ १९३२ ]

हरिकथा ऐकतां अन्ये पैं गोष्टी । निधान त्या दृष्टीं अंतरलें ॥ १ ॥
घडी घडी प्रेम अंतरु न द्यावें । सावधान व्हावें रामनामीं ॥ २ ॥
यापरी स्वहितीं ठेवियेलें लक्ष । ते पावती मोक्ष म्हणे नामा ॥ ३ ॥

[ १९३३ ]

कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग । न लगे तुज उद्वेग करणें कांहीं ॥ १ ॥
समर्थ सोयरा राम हा निधान । जनीं जनार्दन एक ध्याई ॥ २ ॥
नाम हेंचि सार नाम हेंचि सार । तराल निर्धार श्रुति सांगे ॥ ३ ॥
नामा म्हणे उच्चार रामकृष्ण सार । तुटेल येरझार भवाब्धीची ॥ ४ ॥

[ १९३४ ]

एकवेळ नयनीं पहावा । मग जाईजे भलत्या गांवा ॥ १ ॥
आठवाल वेळोवेळां । विठोबा आहे रे जवळां ॥ २ ॥
हृदयीं मांडुनियां ठसा । नामा म्हणे केशव ऐसा ॥ ३ ॥

[ १९३५ ]

राम वाचे बोल । तया पुरुषा नाहीं मोल ॥ १ ॥
धन्य तयाचें शरीर । वरी जना उपकार ॥ २ ॥
ऋणिया तो तारी । विश्वव्यापक तो हरि ॥ ३ ॥
नामा म्हणे स्वामी । सुखें वसे अंतर्यामीं ॥ ४ ॥

अभंग १९३१—(पं.) व (शि.), १९३२ व १९३३—(आ.), १९३४—(शि.), १९३५—(पं.) व (शि.)

[१९३६]

राम म्हणतां रामचि होसी । भाक घेई मजपाशीं ॥ १ ॥
लवण समुद्रां जागा मागे । तेंहि समुद्र जालें अंगें ॥ २ ॥
वात दीपासंगें गेली । तेहि दीप अंगें जाली ॥ ३ ॥
नामा सांगे भाविक लोकां । नाम घेतां राहूं नका ॥ ४ ॥

[१९३७]

केशव म्हणतां जासी केशवपंथें । त्याहुनि सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥
वेद कां पढसी शास्त्र कां सांगसी । उदंड वाचेसी हरी म्हणतां ॥ २ ॥
पहा याहुनियां आन नाहीं सार । भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ॥ ३ ॥
नामा म्हणे धरी केशवीं विश्वास । तरसी गर्भवास नामें येकें ॥ ४ ॥

[१९३८]

गुळ गोड न लगे म्हणावा । तैसा देव न लगे वानावा ॥ १ ॥
सेवि तोचि चवी जाणे । येरा सांगतां लाजिरवाणें ॥ २ ॥
नामा म्हणे या खुणा । तुम्ही ओळखा पंढरिराणा ॥ ३ ॥

[१९३९]

मारगीं चालतां उगलें न चालावें । वाचेसी म्हणावें रामकृष्ण ॥ १ ॥
हरि [1]बा हरि मुकुंदा मुरारी । माधव नरहरी केशिराज ॥ २ ॥
ऐसा छंद वाचे सर्वकाळ जया । नामा म्हणे तया दोष कैंचे ॥ ३ ॥

[१९४०]

देवा सन्मुख दीपमाळा । कोणी भक्त हो उजळा ॥ १ ॥
तेल घालारे फारसें । नाम म्हणा रे उल्हासें ॥ २ ॥
नामा दीपमाळा उजळी । तेणें भक्ति त्यासी जाली ॥ ३ ॥

---

अभंग १९३६—(आ.), १९३७—(पं.) व (शि.), १९३८—(आ.), १९३९ व १९४०—(पं.) व (शि.)

१ बोला (पं.)

[१९४१]

तो देव स्मरारे अनंतु । जो कां वैकुंठींचा नाथु ।
दृढ धरा रे हृदयांतु । तेणें यमपंथु चुकेल ॥ १ ॥
आकांतीं द्रौपदिये स्मरिला । तिचीं वस्त्रें आपणचि जाला ।
सभेमाजीं मान रक्षिला । काळ पैं जाला कौरवांचा ॥ २ ॥
विमलार्जुन उन्मळिला । जरासंध तोहि मारिला ।
कंसासुर निर्दाळिला । कान्हया जाला गोकुळींचा ॥ ३ ॥
ध्रुव जेणें अढळपदीं बैसविला । नामें एके अजामेळ उद्धरिला ।
उत्तरेचा गर्भ रक्षिला । तें सोडविला परीक्षितीं ॥ ४ ॥
जाति कुळ न पाहसी । नामें एकें उद्धरिलें गणिकेसी ।
त्या गोपाळाचें उच्छिष्ट खासी । गज सोडविसी पाणियाडें ॥ ५ ॥
ऐसा तूं कृपाळु गा देवा । प्रसन्न जालासि पांडवा ।
विष्णुदास नामा विनवी केशवा । प्रेमभाव द्यावा मजलागीं ॥ ६ ॥

[१९४२]

भक्त प्रल्हादाकारणें । वैकुंठीहुनि धांवणें ॥ १ ॥
नरहरी पातला पातला । महादोषा पळ सुटला ॥ २ ॥
शंख चक्र पद्म गदा । ना भी ना भी रे प्रल्हादा ॥ ३ ॥
दैत्य धरी मांडीवरी । नखें विदारी नरहरी ॥ ४ ॥
पावला गरुडध्वज । नामया स्वामी केशवराज ॥ ५ ॥

[१९४३]

जागा रे गोपाळांनों रामनामीं जागा । कळिकाळ अंकणा महादोष जाती भंगा ॥ १ ॥
सहस्रदळ समान अनुहत ध्वनि उठी । नामाचेनि बळें पापें रिघालीं कपाटीं ॥ २ ॥
दशमीं एक व्रत करी दिंडी दरुशन । एकादशीं उपवास तुम्ही जागा जागरण ॥ ३ ॥
द्वादशी साधन कोटिकुळें उद्धरती । नामा म्हणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ४ ॥

[१९४४]

नामामृत सरिता पवित्र हरिकथा । त्रिभुवनींच्या तीर्थां मुगुटमणि ॥ १ ॥
तेथें माझ्या मना होई क्षेत्रवासी । राहे संतापाशीं सुख घेत ॥ २ ॥

अभंग १९४१—(पं.), (शि.) व (न.), १९४२—(न.), १९४३—(पं.) व (शि.), १९४४—(पं.), (शि.), (धु.) व (न.)

अहिक्य परत्र समतीरीं साजिरी । परमानंद लहरी हेलावति ॥ ३ ॥
मुक्तीची माउली मोक्षाची गाउली । शिणल्या साउली विषयासक्ता ॥ ४ ॥
तेथें सनकादिक प्रेमळ सकळ । राहिले निश्चळ करुनि चित्त ॥ ५ ॥
नामा म्हणे माझे सखे हरिजन । तारूं त्याचे चरण दृढ धरा ॥ ६ ॥[1]

[ १९४५ ]

नित्य नेम आम्हां चिंतन श्रीरामा । आणिका त्या नेमा नेघों नेघों ॥ १ ॥
वळंघलों हरि भूतभाव निर्धारीं । दिसे चराचरीं हरिरूप ॥ २ ॥
जें जें पडे दृष्टीं आणिक नाहीं सृष्टीं । हरिरूपी भेटी हेंचि दिसे ॥ ३ ॥
नामा म्हणे विठ्ठल सर्वांभूतीं आहे । आणिक उपाय न लगती ॥ ४ ॥

[ १९४६ ]

एके हातीं टाळ एके हातीं दिंडी । म्हणा वाचे उदंडी रामनाम ॥ १ ॥
श्रीहरिसारिखा गोसावी पैं चांगु । फेडिला पैं पांगु जन्मांतरिचा ॥ २ ॥
तैसें नृत्य करी वेडें बागडें । वदन वाकुडें करूनियां ॥ ३ ॥
चुकलें पाडस कुरंगिणि गिवसिती । तैसा हृषिकेशी न्याहाळी तूतें ॥ ४ ॥
धेनु पान्हाय हुंबरे वत्सातें । तैसा वोरस तूतें केशिराज ॥ ५ ॥
नामा म्हणे इतुकें न करवे निर्देवा । तरी वाचेसि केशवा उच्चारीं पां ॥ ६ ॥

[ १९४७ ]

गुण दोष त्याचे म्हणतां श्लाघिजे । निर्वासन कीजे चित्त आधीं ॥ १ ॥
गाऊं नाचूं आम्ही आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्हीं मागों देवा ॥ २ ॥
मनाची पैं वृत्ति बुडे प्रेमडोहीं । नाठवती देहीं दुजा भाव ॥ ३ ॥
सगुणीं निर्गुणीं एकचि आवडी । चित्तीं दिली बुडी चिदानंदीं ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा मागणें ऐसी सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ५ ॥

---

अभंग १९४५—(आ.), १९४६—(शि.), १९४७—(आ.)

१ (धु.) प्रतीत येथे एक चरण अधिक आढळतो. तो असा—
कां करिसी साधन वाउगी खटपट । हेचि सोपी वाट वैकुंठीची ॥

अनुक्रमणिका

[१९४८]

तुमचें तीर्थ आम्ही आदरें सेवावें । तेणें तें पावावें परब्रह्म ॥ १ ॥
विश्वाकरवीं ब्रह्म म्हणवितां तुम्हीं । म्हणो जी माय आम्हीं पिता तुम्हीं ॥ २ ॥
जो तुमचे चरणिंचा तो नाहीं आम्हां । विष्णुदास नामा नसे तेथें ॥ ३ ॥

[१९४९]

उदाराचा राजा उभा याचि काजा । उभारोनि भुजा वाट पाहे ॥ १ ॥
म्हणे घ्यारे सुख प्रेम अलौलिक । साधन आणिक न लगे कांहीं ॥ २ ॥
मनाचेनि मनें हृदयीं मज धरा । वाचेसि उच्चारा नाम माझें ॥ ३ ॥
जेणें [1]कर्में मज साधिलें पुंडलिकें । तेंचि तुम्हा निकें सांगितलें ॥ ४ ॥
म्हणोनि पांडुरंग उभा भीमातीरीं । नामा निरंतरीं वोळगे चरण ॥ ५ ॥[2]

[१९५०]

देवराज आले मंचकीं बैसले । भक्तांसी दिधलें अभयदान ॥ १ ॥
दास हो तुम्ही सकळ सुखी रहा । सुखी राहोनियां आनंद करा ॥ २ ॥
रात्रंदिवस माझें करावें चिंतन । यमाचें बंधन नाहीं तुम्हां ॥ ३ ॥
विष्णुदास नामा गाऊनियां गेला । सेजे पहुडला देवराणा ॥ ४ ॥

[१९५१]

तप थोर देखिलें संसारीं । जो अखंड कीर्तन करी ।
त्याच्या तपा पुढारिले हरी । हें निर्धारें जाणा हो ॥ १ ॥
धन्य धन्य विष्णुदास । ऐसा हरिनामीं सौरस ।
ते पितरांसहित वैकुंठ । सर्वकाळ क्रमिती ॥ २ ॥
जप तप ज्ञान विठ्ठल । तयासि नाहीं काळवेळ ।
टाळी वाजवितांचि निर्मळ । महादोष हरतील ॥ ३ ॥
जेथें रामकृष्ण उच्चार । सकळ मंत्रांत मंत्रसार ।
पांचाहि वदनीं शंकर । नित्य रामनाम जपतसे ॥ ४ ॥

---

अभंग १९४८—(आ.), १९४९—(पं.), (शि.) व (गं.), १९५०—(पं.), (शि.) व (धु.), १९५१—(आ.)

१ क्रमे (पं.) २ पुढील चरण (पं) व (आ.) प्रतींत क्रमांक ५ म्हणून आढळतो—
अनुदिनीं आवडी करूनि नित्य नवी । मज धरा जिवीं सर्वभावें ॥ ५ ॥ (पं. व आ.)

अनुक्रमणिका

तो हा पुंडलिकें उभा केला । आपण दृष्टीसमोर बैसला ।
कीर्तनें त्रैलोक्य तारिला । स्वानंदानें पितरांसहित ॥ ५ ॥
न लगे करावे यज्ञयाग । न लगे आणिक मंत्रलाग ।
एक सेविलिया पांडुरंग । अनंत तीर्थें घडतील ॥ ६ ॥
पंचक्रोशी प्रदक्षिणा । नित्य नमस्कारी विठ्ठल चरणा ।
तरी घडेल पृथ्वीप्रदक्षिणा । कोटीच्या कोटी अनंत ॥ ७ ॥
सप्तपुरी द्वादश लिंगें । कीर्तनें डोलती लागवेगें ।
ऐसे भक्त तारिले पांडुरंगें । विटेवरी उभा नीट राहोनी ॥ ८ ॥
नामा सांगे गुह्य गोष्टी । विठ्ठल तारक एक सृष्टी ।
पंढरी देखिलिया दृष्टी । वैकुंठपद पाविजे ॥ ९ ॥

[ १९५२ ]

क्रिया कर्म धर्म तिहीं केलें सांग । जिहीं पांडुरंग देखियेला ॥ १ ॥
ओळखोनि मनें धरिला मानसीं । उभा अर्हनिशीं हृदय कमळीं ॥ २ ॥
निजानंदबोधें नामाचेनि छंदें । डोलति आनंदें वोसंडत ॥ ३ ॥
नाहीं देहस्मृति निमाली वासना । मावळली कल्पना भावाभाव ॥ ४ ॥
अखंड विदेही रजतमावेगळे । भोगती सोहळे प्रेमसुख ॥ ५ ॥
त्यांचिया द्वारींचा जालोंसे सांडोवा । म्हणोनि केशवा पढिये नामा ॥ ६ ॥

[ १९५३ ]

अवघी चित्तवृत्ति एकवटोनि जेणें । अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सुख एक तयासि फावलें । अवघें सुफळ जालें जन्म त्याचें ॥ २ ॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तेणें । ज्याचें विठ्ठलीं ध्यान मन जडलें ॥ ३ ॥
नित्य विठ्ठल नाम गर्जती सप्रेमें । अवघे नित्य नेम जाले त्यांचे ॥ ४ ॥
अवघा इष्ट मित्र बंधु मातापिता । केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय । मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

[ १९५४ ]

तेरामाजीं तीन सात साक्षात्कार । आठवा निर्धार असीपद ॥ १ ॥
नवमापासुनि दशमाचे अंतीं । बारावा निश्चिती योग जाणा ॥ २ ॥

अभंग १९५२—(पं.) व (शि.), १९५३—(पं.), (शि.) व (न.), १९५४—(पं.) व (शि.)

प्रथम अक्षरीं मध्यमा सूचना । नाम नारायणा अंतकाळीं ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही नाम स्मरा मनीं । वैकुंठभुवनीं वास होय ॥ ४ ॥

[ १९५५ ]

अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें । राहे अंगसंगें समागमें ॥ १ ॥
समागमें असे सर्व साक्षी देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ २ ॥
सदा मुखीं नाम आळस न उच्चारीं । प्रीति मानी हरि हास्यमुखें ॥ ३ ॥
फळपाकीं सर्व देतील प्राणिया । नामा धरी पाया बळकट ॥ ४ ॥

[ १९५६ ]

नागवे कळिकाळ ब्रीदावळी पायीं । तोचि लवलाहीं ध्यायिजेसु ॥ १ ॥
स्मरण विठ्ठल [1]चित्तीं पांडुरंग । नाहीं तया मग जन्ममरण ॥ २ ॥
आपणचि नांदे भक्ताचिये घरीं । आपणचि करी सर्व कृत्य ॥ ३ ॥
नामा म्हणे देव पंढरिनिवास । कळिकाळासी वास पाहों नेदी ॥ ४ ॥

[ १९५७ ]

भीष्मासि आपण पाडियलें रणीं । गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ १ ॥
कर्ण विदारिला अर्जुनाच्या बाणीं । गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ २ ॥[2]
हरिश्चंद्र वाहे डोंबाघरीं पाणी । गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ ३ ॥
परीक्षिती बैसे मरण-आसनीं । गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ ४ ॥
नामा म्हणे तुम्ही देव धरा मनीं । गोविंद निर्वाणीं भेटी देई ॥ ५ ॥

[ १९५८ ]

हरीस श्रवणीं ध्यावो नित्य तुम्ही । ठसावेल ध्यानीं अवघा राम जनीं वनीं ॥ १ ॥
नयनीं सखा पहा कृष्ण न्याहाळुनी । प्रकाशलें तेज रवि गेला लपोनि ॥ २ ॥
हरिचरणीं लावी मन दर्शन । जालिया जाती त्रिविधताप हरपोन ॥ ३ ॥
तुळसीचा सुगंध मस्तकीं धरा । नामा म्हणे चरण दृढ धरा ॥ ४ ॥

---

अभंग १९५५—(आ.), १९५६ व १९५७—(पं.) व (शि.), १९५८—(आ.)
१ चिती (पं.)
२ (शि.) व (पं.) प्रतींतील हा चरण (आ.) प्रतीत नाहीं.

अनुक्रमणिका

[ १९५९ ]

जिव्हे केशवाचें करितां कीर्तन । मिथ्या वदूं नको एक रामाविण ॥ १ ॥
म्हणऊनि हरिरंगीं रंगा । नाम घेतां महापातकें जाती भंगा ॥ २ ॥
चित्तीं चिंतितां होई सद्रूप । मिथ्या विषयीं लुब्ध जालिया काय सुख ॥ ३ ॥
भजन करा तुम्ही अच्युताचें । नामा म्हणे एकचित्तें साचें ॥ ४ ॥

[ १९६० ]

संसार बंधन केलें जेणें शून्य । तयासी अनन्य शरण रिघा ॥ १ ॥
मायबाप सखा विठ्ठल विसांवा । त्याचे पायीं ठेवा सदा मन ॥ २ ॥
निजबोधरूप तोचि ज्ञानदीप । आनंदस्वरूप बाप माझा ॥ ३ ॥
नामा म्हणे त्याचे संगतीचा वारा । पावे पैल पारा हेळामात्रें ॥ ४ ॥

[ १९६१ ]

आगमीं नाम निगमीं नाम । पुराणीं नाम केशवाचें ॥ १ ॥
अर्थी नाम पदीं नाम । धृपदीं नाम त्या केशवाचें ॥ २ ॥
अनुभवें भावें कपटें प्रपंचें । परि हरिचें नाम येऊं दे वाचे ॥ ३ ॥
नाम व्हावें नाम व्हावें । नाम व्हावें त्या केशवाचें ॥ ४ ॥
ऐसें नाम बहु सुंदर । नामीं तरले लहान थोर ॥ ५ ॥
नामा म्हणे अंतर । पडों नेदीं याऊपर ॥ ६ ॥

[ १९६२ ]

जें जें पुण्य जोडे हरिनाम गजरीं । त्याचे वांटेकरी [1]दोघेजण ॥ १ ॥
सावधान श्रोता आणि प्रेमळ वक्ता । जो भजे अनंता निर्विकल्प ॥ २ ॥
तेणें सुखें सुख वाढे नीच नवें । जाणती अनुभवें संतजन ॥ ३ ॥
हातीं सुदर्शन आनंदें कीर्तनीं । उभा चक्रपाणि मागें पुढें ॥ ४ ॥
प्रीतीच्या वोरसें अभयदान देत । हृदयीं आळंगित [2]आपुल्या दासा ॥ ५ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष आणि मुक्ति । टाकोनियां येती विश्रांतीसी ॥ ६ ॥

---

अभंग १९५९—(आ.), १९६०—(पं.) व (शि.), १९६१—(आ.), १९६२—(पं.), (शि.), (न.) व (गं.)

१ दोघे जाणा (न.) २ हरिच्या दासा (पं.)

करूनी कीर्तनाचा घोस मनीं धरूनी आस । पहातसे वास पंढरीची ॥ ७ ॥
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं । न संडिती वारी पंढरीची ॥ ८ ॥

[१९६३]

अवघे ते संसारीं जाणावे ते धन्य । ज्यांचें पूर्ण प्रेम पांडुरंगीं ॥ १ ॥
अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे । अवघें कुळ त्याचें पुण्यरूप ॥ २ ॥
अवघे रूपीं एक विठ्ठल भाविती । अवघे मनें भजती अवघेपणें ॥ ३ ॥
अवघे मिथ्या जाणोनि अवघिया विठ्ठलें । अवघे विनटले विठ्ठलपायीं ॥ ४ ॥
अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीती । ध्यानीं गीतीं गाती केशिराज ॥ ५ ॥
अवघा हा विठ्ठल भोगीं दिनराती । बोळगे किंकरवृत्ति नामा त्यातें ॥ ६ ॥

[१९६४]

सर्व जिवां [1]करी कारुण्य । वाचे सत्य उच्चारण ।
नित्य नामस्मरण । तोचि दास भगवंताचा ॥ १ ॥
धन्य धन्य भूमंडळीं । धन्य धन्य साधुवचन पाळी ।
वेदमर्यादा वेगळीं । कार्यें न करी सर्वथा ॥ २ ॥
प्रातःकाळीं उठुनी । नरहरिनाम उच्चारूनि ।
उभा राहुनि कीर्तनीं । जय जय नामें गर्जतसे ॥ ३ ॥
देवभक्ति आवडे ज्यासी । पुण्यप्रारब्ध म्हणती त्यासी ।
जो उपजोनि आपुले वंशीं । पूर्वजांसि उद्धरितो ॥ ४ ॥
तीर्थें एक भावभजन । नित्य सत्य तें पिंडदान ।
भूतदया तें भागीरथीं स्नान । तेथ जनार्दन उभा असे ॥ ५ ॥
देखिलिया ब्राह्मण । वेदांसमान देत मान ।
यथाशक्ति करूनि दान । अतिथिपूजन जो करी ॥ ६ ॥
नामा म्हणे तोचि तरे । वैकुंठ तेथें उतरे ।
तीर्थें म्हणती तो त्वरें । पाहों दृष्टी एकवेळ ॥ ७ ॥

[१९६५]

ब्रह्म ते ब्राह्मण श्रुतिचें वचन । सर्व नारायण सर्वभूतीं ॥ १ ॥
चहूं शिक्षाजनीं गुरु चाऱ्ही वर्ण । प्रत्यक्ष पुराणें साक्ष देती ॥ २ ॥

अभंग १९६३--(पं.), (शि.) व (न.), १९६४--(पं.), १९६५--(आ.)
१ धरी (पं.)

अनुक्रमणिका

हेळसुनी निंदी दुरावी ब्राह्मणा । सभेमाजीं जाणा दुऱ्हाविती ॥ ३ ॥
त्याचें पाप नाहीं खंडन सर्वथा । म्हणोनि अनंता भय वाटे ॥ ४ ॥
कोपला प्रहार ब्राह्मणा मारिला । लक्ष वेडावलीं भूषण त्या ॥ ५ ॥
क्रोध अग्निज्वाळा झगडती जेथें । न उरती तेथें काडिमात्रें ॥ ६ ॥
उगेंच ब्राह्मणा सांबें छळियेलें । सर्व शांत जालें आपोआप ॥ ७ ॥
अपेक्षिति कोण्ही तेंचि तें होतें । न बोलावे तेथें बोल कांहीं ॥ ८ ॥
अग्निसी लहान थोर न म्हणावा । पडे परिस्वाहा सर्व कांहीं ॥ ९ ॥
मार्कंडेय बुद्धि छळुनि ब्राह्मण । आयुष्य तें उणें होय माझें ॥ १० ॥
ब्राह्मणाचें वीर्य मातंगीचे पोटीं । त्याचि एका गोष्टी आशिर्वादि ॥ ११ ॥
आयुष्याचें कल्प सात चौदा होती । ऐकोनि विश्रांति कीर्तनानें ॥ १२ ॥
धन्य गोत वित्त स्त्रिया आणि पुत्र । सर्व व्हावें हित ब्राह्मणानें ॥ १३ ॥
कुळक्षयो व्हावें ऐसे वाटे जीवा । ब्राह्मणासी दावा नको बापा ॥ १४ ॥
नामा म्हणे ऐसे धन्य ते ब्राह्मण । धरिले चरण माथां त्यांचे ॥ १५ ॥

[१९६६]

भक्त विठोबाचे भोळे । त्यांचे पायीं ज्ञान लोळे ॥ १ ॥
भक्तिविण शब्दज्ञान । व्यर्थ अवघें तें जाण ॥ २ ॥
नाहीं ज्याचे चित्तीं भक्ती । जळो तयाची व्युत्पत्ति ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐसें जाण । नाहीं भक्तासी बंधन ॥ ४ ॥

[१९६७]

पिता शिकवी पुत्रासी । नको जाऊं बापा हरिकथेसी ।
तेथें पांचा तोंडाची विवशी । ते वैष्णवें आणिली आहे ॥ १ ॥
तिचियां गळां रुंडमाळा । अंगीं स्मशानींचा उधळा ।
कंठीं सर्पाचें हळाहळ । गजचर्म पांघुरलें ॥ २ ॥
नको जाऊं बापा तेथें । मागुता न येशी रे येथें ।
जे जे पाहूं गेले तियेतें । ते आले नाहीं मागुते ॥ ३ ॥
चंद्र पाहो गेला तियेसीं । ओढुनि बांधिला माळेसी ।
तैसा पडसी अभरंवशीं । मग मुकशी संसाराशी बापा ॥ ४ ॥
वारितां वारितां ध्रुव गेला । तो नेऊनि अढळपदीं घातला ।
बळी देशवटा दिधला । तो घातला पाताळीं ॥ ५ ॥

अभंग १९६६—(आ.), १९६७—(शि.)

अनुक्रमणिका

नारदा दिधली कांसवटी । हनुमान केला हिपुटी ।
रुक्मांगदाची वैंकुंठी । नगरी नेऊनि घातली ॥ ६ ॥

तिचे वैष्णव ल्हाणे । कळों नेदिती आपुलीं विंदानें ।
हरिकथारंगीं नाचणें । नाम कल्लोळीं ॥ ७ ॥

तीस दहा हात अकरा डोळे । ती किती काळाची न कळे ।
भयानक श्रीमुख कमळें । हातीं घेऊनि हिंडतसे ॥ ८ ॥

भस्म डौर त्रिशूळ हातीं । ते न वर्णवे वेदश्रुतीं ।
तिसी नाहीं कुळ यानी । आपपर तें कैंचे ॥ ९ ॥

[1]ते वेदशास्त्रा अगोचर । तीसवें असे एक ढोर ।
कोठें न मिळेचि बिढार । म्हणोनि स्मशानीं वसतसे ॥ १० ॥

ऐसी ती थोर लांव । तिसी गांव ना शिव ।
कोठेंचि न मिळे ठाव । म्हणोनी समुद्रि वसतसे ॥ ११ ॥[2]

तेथें सर्पाचें अंथरुण करी । निद्रा उदकाभीतरीं ।
तया वैष्णवा माझारीं । निरंतरीं वर्ततसे ॥ १२ ॥

मांगेन ते परियेसी । आहे ती संत महंतापाशीं ।
आणि हरिकथेसी । बैसली असे ॥ १३ ॥

म्हणवोनि विश्‍वासें तूं जामी । मुकसी आपल्या संसाराशी ।
नामा विनवी श्रोतियांसी । हें बोलणें वेदांचें ॥ १४ ॥

---

१ बैसावया रोडकें ढोर । त्यासि खावया न मिळे आहार ।
राहावया नाहीं बिढार । म्हणोनि स्मशानीं हिंडतसे ॥ (शि.)

२ (शि.) प्रतीत ११, १२, १३, १४ ही कडवी नाहीत, त्याऐवजी खालील चरण आढळतात—
वापुडे थियाळ सात्विक भले । तो तियेसी अन्न घालू गेले ।
तेणें तियेचें काय केलें । बाळ मारिलें पोटीचें ॥ ८ ॥
तेणें ठाव पुसिला तयाचा । आणि तयाच्याहि नगराचा ।
म्हणोनी आमुच्या बोलाचा । राग न धरी रे बापा ॥ ९ ॥
आणिक तियेची येकी सांगातिणी । काय सांगू तियेची करणी ।
करीं सुदर्शन घेऊनी । अहर्निशीं हिंडतसे ॥ १० ॥
तियेचि की व्याप्ति मोठी । येखादा अवचित पडे दृष्टी ।
त्यासी घाली वैकुंठीं । पुनरावृत्ती न सोडी ॥ ११ ॥
हे वैष्णव तेथिचे ल्हाणे । कळो नेदीती तेथिचीं विंदानें ।
वृद्धिची नेऊं घालणें । मग रहाणे वैकुंठीं ॥ १४ ॥
संग नको करु वैष्णवासीं । मुकसी आपुल्या जीवित्वासी ।
विष्णुदास नामा म्हणे परियेसी । ऐसा उपदेश संतांचा ॥ १५ ॥

[१९६८]

ऐसा आज्ञापी भक्तांसी आपण । त्यागा अभिमान तुम्ही जाण ॥ १ ॥
जाणावें प्रत्यक्ष स्वरूप सगुण । सर्व नारायण तोचि दिसे ॥ २ ॥
दिसे गोपाळांसी गोपिकांसहित । आनंदें डुल्लत म्हणे नामा ॥ ३ ॥

[१९६९]

सांडूनि पंढरिची वारी । मोक्ष मागती ते भिकारी ॥ १ ॥
ताट वोगरिलें निकें । सांडुनि कवण जाय भिके ॥ २ ॥
जो नेणें नामगोडी । तोचि मुक्तितें चरफडी ॥ ३ ॥
आम्ही पंढरिचे लाटे । नवजो वैकुंठींचे वाटे ॥ ४ ॥
झणीं भ्याल गर्भवासा । नामा म्हणे विष्णुदासा ॥ ५ ॥

[१९७०]

पंढरीची वारी करील जो कोणी । त्याच्या चक्रपाणि मागें पुढें ॥ १ ॥
लोखंड असतां सोनें जालें कैसें । समागम-मिषें गुणें त्याच्या ॥ २ ॥
तैसें एकवेळ करी मायबापा । चुकवी या खेपा चौऱ्यांशीच्या ॥ ३ ॥
नामा म्हणे असो प्रारब्ध सरे । होई कृपण निकुरें चरणाचें ॥ ४ ॥

[१९७१]

पंढरीस जावें जीवनमुक्त व्हावें । [1]विठ्ठला भेटावें जिवलगा ॥ १ ॥
कायावाचामन चरणीं [2]ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥
बाहेरी भीतरीं कैवल्य अवघें । वाचे न बोलावे ब्रह्मानंदु ॥ ४ ॥[3]
चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ५ ॥

---

अभंग १९६८ ते १९७०—(आ.), १९७१—(पं.) व (शि.)
१ जिवलगा भेटावें विठोबासी ॥ (शि. व पं.) २ विनटावें (शि. व पं.)
३ कडवी ४ व ५ (पं.) व (शि.) प्रतींत नाहींत, त्याऐवजी—
नामा म्हणे आम्हां दीनांचे माहेर । गातां मनोहर गोड वाटे ॥
असा चरण शेवटी आढळतो.

अनुक्रमणिका

[ १९७२ ]

विचारूनि पाहा पंढरिचें पाडें । सुख होय थोडें क्षीरसिंधु ॥ १ ॥
सांडूनि वैकुंठ आले जगजेठी । वस्ती वाळवंटीं केली जाण ॥ २ ॥
भक्त सहाकारी ब्रीदें बडिवार । सेवा सुखसार पांडुरंग ॥ ३ ॥
जिवाचे सोयरे न मिळे वैकुंठीं । हरिदासा भेटी आडलिया ॥ ४ ॥
प्रीतीचे वोरस उभा मागें पुढें । जीवासी आवडे भक्तराणा ॥ ५ ॥
लक्ष्मीचा विलास न वाटे विश्रांती । आवडे श्रीपति भक्तभावा ॥ ६ ॥
संगें सर्व काळ धांवे पाटो वाटीं । घाली कृपादृष्टी तयावरी ॥ ७ ॥
अमृत सुरस नव्हेति पैं गोडी । म्हणोनि आवडी काल्याची ॥ ८ ॥
हरुषें निर्भर सुरवरां खेळे । वाळवंटीं लोळे संतसंगें ॥ ९ ॥
अठ्ठावीस युगें उभा विटेवरी । भक्तप्रिय हरि स्वामी माझा ॥ १० ॥
नामा म्हणे त्याचे सुखरूप पाय । क्षणेक न होय जीवाहुनी ॥ ११ ॥

[ १९७३ ]

पुंडलिकें रचिली पेठ । संत ग्राहिक चोखट ॥ १ ॥
प्रेम साखरा वांटिती । नेघे त्याचे तोंडीं माती ॥ २ ॥
समतेचे फणस गरे । आंबे पिकले पडिभरें ॥ ३ ॥
नामद्राक्षाचे घड । अपार रस आले गोड ॥ ४ ॥
नामा म्हणे भावें घ्यावें । अभक्तांचें मढें जावें ॥ ५ ॥

[ १९७४ ]

कर्मजड मूढ पतित पामर । भवसिंधु पार नटके जया ॥ १ ॥
यालागीं पंढरी केली मुक्ति पेठ । भक्तें भूवैकुंठ वसविलें ॥ २ ॥
हेंचि पुंडलिकें मागितलें निकें । जें सर्वथा परलोकें चाड नाहीं ॥ ३ ॥
भक्ति मुक्ति सिद्धि जे जया आवडे । तें तया पवाडे विठ्ठलनामें ॥ ४ ॥
न लगती सायास करणें काया क्लेश । नामाचा विश्वास दृढ धरा ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे चला पंढरिये । भेटों मायबाप पांडुरंगा ॥ ६ ॥

अभंग १९७२--(आ.), १९७३ व १९७४--(पं.), (शि.) व (धु.)

[ १९७५ ]

अठ्ठावीस युगें उभा ठेला द्वारीं । पुंडलिकावरी ठेवुनि लक्ष ॥ १ ॥
कृपेचा सागर भक्तजनवत्सल । आमुचा विठ्ठल मायबाप ॥ २ ॥
भक्तीसी भाळला अरूप रूपा आला । वेळाईत जाला भक्तालागीं ॥ ३ ॥
भक्तिचिया रूपें न घडे तें केलें । वैकुंठा आणिलें भूमंडळीं ॥ ४ ॥
भक्ति मुक्ति सिद्धि त्या पायीं लागती । उद्भट गर्जती विठ्ठलनामें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा उदाराचा राव । सेवा चरणीं ठाव देई आम्हां ॥ ६ ॥

[ १९७६ ]

शब्दाचें सुख श्रवणाचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ १ ॥
स्पर्शाचें सुख त्वचेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ २ ॥
रूपाचें सुख नेत्राचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ ३ ॥
रसाचें तें सुख रसनेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ ४ ॥
गंधाचें सुख नाकाचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ ५ ॥[१]
नामा म्हणे ऐसे जयाचे उपकार । तयासी गव्हार विसरले ॥ ६ ॥

[ १९७७ ]

आप तेज वायु पृथ्वि आणि गगन । [२]त्याचें केलें बा शरिरनिधान ॥ १ ॥
त्यामाजीं घातलें मन पवन । पिंडब्रह्मांड केली रचना ॥ २ ॥
काय सांगों तुझी करणी नारायणा । वेदपारायणा केशिराजा ॥ ३ ॥
पृथ्वीवरी तीर्थें आहेत अपार । परि पंढरीची सर एका नाहीं ॥ ४ ॥
जन्मोजन्मींच्या पातका दरारा । चुके येरझारा एके खेपे ॥ ५ ॥
ब्रह्मज्ञानेंविण मोक्ष आहे भूतीं । वाचेसि म्हणती विठ्ठलनाम ॥ ६ ॥
बेचाळिसांसहित जातील वैकुंठा । नामा म्हणे भेटा विठ्ठलदेवा ॥ ७ ॥

---

अभंग १९७५—(पं.), १९७६ व १९७७—(पं.) व (शि.)
१ हा चरण (पं.) व (शि.) प्रतींत आढळत नाही.
२ मेले ते कवण पांचामध्यें ॥ (शि.)

अनुक्रमणिका

[१९७८]

साठी घडीमाजीं । एक वेंची देवकाजी ॥ १ ॥

[1]आराणुक सारुनि कानीं । सर्वभावें केशव पूजी ॥ २ ॥

हेंचि भक्तीचें लक्षण । संतोषला नारायण ॥ ३ ॥[2]

कोटीकुळें पावन तुझीं । नामा म्हणे भाक माझी ॥ ४ ॥

[१९७९]

तुम्हीं आम्हीं जाऊं चला । भेटूं जिवलगा विठ्ठला ॥ १ ॥

विठो सांपडला फुका । जो दुर्लभ तिन्हीं लोकां ॥ २ ॥

वेदपुराणासि वाड । तो हा भाविकांसीं भीड ॥ ३ ॥

नामा म्हणे वंदूं चरण । कांहीं पुसूं जीवींची खूण ॥ ४ ॥

[१९८०]

पैल दक्षिणेचा वारा । येतां देखिलें सामोरा ॥ १ ॥

चला चला पंढरपुरा । विठोबारायाच्या नगरा ॥ २ ॥

पायीं संतांच्या लागत । पाचारितो पंढरिनाथ ॥ ३ ॥

[3]नामा म्हणे वेग करा । विठ्ठल भक्तांचा सोयरा ॥ ४ ॥

[१९८१]

पूर्ण परिपूर्ण पंढरी हे पेठ । आपण वैकुंठ समचरण ॥ १ ॥

ऐसें कांहीं करा नाम हेंचि धरा । विठ्ठल अपारा जप करा ॥ २ ॥

करितां साधन नागवी अहंकार । विठ्ठल उच्चार पुण्य ओघें ॥ ३ ॥

नामा म्हणे घेई विठ्ठल कुळदेवो । सर्व हाचि भावो केशव ऐसा ॥ ४ ॥

[१९८२]

न पढावे वेद नको शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ १ ॥

[4]न साधवे योग न साधवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ २ ॥

---

अभंग १९७८—(पं.), (शि.) व (धु.), १९७९ ते १९८१—(पं.) व (शि.), १९८२—(धु.) व (आ.)

१ आराणुक करुनि आजी। (पं. व धु.) २ हा चरण (धु.) प्रतीत नाही.

३ (पं.) व (शि.) मध्ये—

येथोनि जवळी महाद्वार। करीं कांबळी अपार ॥

चांगा आला लोटांगणी। रुळे वैष्णवचरणीं ॥ असे चरण आढळतात.

४ नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य। (आ.)



अनुक्रमणिका

येर क्रियाकर्म करितां हो कलीं । माजीं कोण बळी तरले सांगा ॥ ३ ॥
नामा म्हणे गुज सांगितलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ४ ॥

[१९८३]

विष्णूचें सेवन जये गांवीं पूजा । नित्य तया द्विजा समारंभु ॥ १ ॥
घरीं वृंदावन नित्य अन्नदान । श्रीकृष्ण आपण तेथें असे ॥ २ ॥
ऐसी ध्यानगती विष्णूचें पूजन । तयासि पतन नाहीं नाहीं ॥ ३ ॥
नामा म्हणे करा विष्णुकथा नित्य । रामनाम सत्य वचन धरा ॥ ४ ॥

[१९८४]

संतांचे घरीं जाहला पाहुणेर । नामाचा वोगर वाढियला ॥ १ ॥
घ्यारे ताटभरी घ्यारे ताटभरी । जेवा पोटभरी रामनाम ॥ २ ॥
पायरव होईल दुर्जना न सांगावें । एकांतीं सेवावें म्हणे नामा ॥ ३ ॥

[१९८५]

तप न करिसी जप हृषिकेशी । नाम अर्हनिशीं राघोबाचें ॥ १ ॥
तीर्थाचें हें तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामीं ॥ २ ॥
साधेल साधन तुटेल बंधन । वाचे नारायण सुफळ सदा ॥ ३ ॥
नामा म्हणे हरिनाम तें उच्चारी । तरीच उद्धारी इहलोकीं ॥ ४ ॥

[१९८६]

व्रत तप न लगे करणें सर्वथा । न लगे तुम्हां तीर्था जाणें तया ॥ १ ॥
आपुलेचि ठायीं असा सावधान । करा हरिकीर्तन सर्वकाळ ॥ २ ॥
न लगे तें कांहीं वर्जावें अन्न जीवन । लावा अनुसंधान हरिचे पायीं ॥ ३ ॥
न लगे योग याग न लगे संग त्याग । असो द्या अनुराग हरिचे पायीं ॥ ४ ॥
न लगे निरंजनीं करणें वास तुम्हां । दृढ धरा प्रेमा हरिचे नामीं ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम दृढ धरा कंठीं । तेणें देईल भेटी पांडुरंग ॥ ६ ॥

---

अभंग १९८३ ते १९८५--(आ.), १९८६--(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[ १९८७ ]

तेहतीस कोटींची केली सोडवण । तो हा राम जपून धरा वेगीं ॥ १ ॥
राघवाचें नाम वाचेसी उच्चारा । निजाचा सोयरा रामचंद्र ॥ २ ॥
सागरीं ह्या शिळा तारिल्या अवलीळा । ब्रह्मयाची बाला उद्धरिली ॥ ३ ॥
रावण कुंभकर्ण विदारिले बाणीं । दिधली राजधानी शरणागता ॥ ४ ॥
वाल्मिक भविष्य कथुनियां गेला । रामें पवाडा केला तिहीं लोकीं ॥ ५ ॥
नामा म्हणे रामनाम हें दुर्लभ । शिव स्वयंभ हेंचि जपे ॥ ६ ॥

[ १९८८ ]

अवघे हो ऐका अवघे श्रवणीं । अवघेचि होऊनि एकचित्त ॥ १ ॥
विठोबाचें नाम अवघेंचि गोमटें । विचारी नेटेंपाटें आपुल्या मनीं ॥ २ ॥
अवघी हेचि क्रिया अवघें हेंचि कर्म । अवघ्या हाचि धर्म सत्य जाणा ॥ ३ ॥
अवघें हें सगुण अवघें हें निर्गुण । अवघे परिपूर्ण शुद्धबद्ध ॥ ४ ॥
अवघा हा आचार अवघा हा विचार । अवघा हा संसार सर्वकाळ ॥ ५ ॥
अवघा जेणें दुरी ठाके भवभ्रम । तें हें निरंतर नाम गाय नामा ॥ ६ ॥

[ १९८९ ]

गुरुराव गुण गंभीरवो वावो चैतन्य प्रकाशु ।
योगी सहज सुकामिनी विलासु ॥ धृ० ॥
चिदानंदघनु तनु सांवळावो हरि पाहतां निवती लोचन ।
तनुमन चरणीं वो गुंतलीं नाम गोपाळाचें अमृत समान ॥ १ ॥
पितांबरशेला मालगंठीं या रावो गोपाळा ।
मुगुटीं झळाळ सर्वांगीं कस्तुरीचें विलेपन कटीं रुळे वनमाळा ॥ २ ॥
येणेंचि जन्में पाविजे गोपाळाशीं आनु नाहीं सार ।
श्रीवत्सलांछन हेचि खूण विष्णुदास नामया दातार ॥ ३ ॥

[ १९९० ]

चेईला तो जाणारे सद्‌गुरुवचनीं निर्धारें ।
विपरित भावना विसर पडिला कंठीं जया परिहार रे ॥ १ ॥
आपणा पैं पहावया कवण लावूं दिवा रे ।
चंद्र सूर्य जेणें प्रकाशे तो मी कैसा पाहूं रे ॥ २ ॥

---

अभंग १९८७—(पं.), १९८८ व १९८९—(पं.) व (शि.), १९९०—(आ.)



अनुक्रमणिका

अंत त्यासी नाहीं रे स्थान मान कांहीं रे ।
चेईला तेणें ओळखिला येरासी भाई रे ।। ३ ।।

पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर नाहीं दाही दिशा रे ।
महाप्रळयीं सप्त सागर एक होती अनुभविया तो तैसा रे ।। ४ ।।

दाही दिशा व्यापूनियां तो अंधकार महा– ।
रविप्रकाश जाहल्या आपोआप निरसला रे ।। ५ ।।

काष्ठीं पावक उपजला तोहि तया समोर ।
नामा म्हणे केशिराजा चेईल्या आम्हां तुम्ही रे ।। ६ ।।

[ १९९१ ]

गुरुच्या वचनें होईल पैं ज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची ।। १ ।।
वेदीं हे विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ।। २ ।।
साधकासी सिद्धि होईल पैं प्राप्ति । न कळे निगुति प्रेमखूण ।। ३ ।।
नामा म्हणे सोडा जाणिवेचा शीण । संतांची हे खूण जाणे संत ।। ४ ।।

[ १९९२ ]

कृपेचा कोंवळा रघुनाथ दास । धरीन त्याची कास सर्वभावें ।। १ ।।
सांडुनि सर्व संगु होईन शरणागत । करिती मनोरथ पूर्ण माझे ।। २ ।।
भवसिंधूचा पार उतरोनि निर्धारीं । त्यापरतीं सोयरीं नाहीं सृष्टी ।। ३ ।।
अंतरींचें गुज सांगती श्रवणीं । अमृत संजीवनी रामनाम ।। ४ ।।
तेणें त्रिविधताप हरती मनींचे । जाणती जीवींचे जाले कष्ट ।। ५ ।।
तो जिवलग जननी परिस लोभापरु । सर्वस्व उदारु प्राणसखा ।। ६ ।।
नामा त्याचे बळें [1]झेलतु यमासी । रिघोनि पाठीसी केशवाच्या ।। ७ ।।

[ १९९३ ]

मी माझें म्हणतां अर्थ जोडितां साहिचक्र गेलें ।
नळ नीळ मांधाता पुरुषार्थी सारिखे तेहि काळें ग्रासियले ।
कपिल महामुनि सिद्ध विचारितां सागररायें पैं अंगा गेले ।
कुमार अंतःपुर सांडुनियां ते भक्तराज काय जाले रे ।। १ ।।
संसार स्वप्न जाणुनियां शरण रिघे पंढरिया राया रे ।। धृ० ।।

---

अभंग १९९१—(पं.) व (धु.), १९९२ व १९९३—(पं.) व (शि.)
१ जुंझेल (शि. व पं.)

दुंदुभिरायें धर्म चालविला तेणें शांतिचा सागर म्हणविलें ।
अजपाळ जैपाळ राजा दशरथ सूर्यवंशीं ते जन्मले ॥ २ ॥
जळींचे तरंग जळींच निमाले नेणों तेथें काय जालें ।
रामलक्ष्मण भरतशत्रुघ्न सांग पां ते काय जाले रे ॥ ३ ॥
सूर्यवंशीं राजा हरिश्चंद्र जन्मला स्वप्न तेणें काय साच केलें ।
स्त्रीपुत्रातें विकुनियां तेणें ब्राह्मणां सुखिया पैं केलें ।
शिबी चक्रवर्तीनें आपुले [1]प्राण देऊनि जीव ते भक्तराज काय जाले रे ॥ ४ ॥
शरीराचे मुद्‌गले सामास कवण वेंचि ऋषि भोजनासी आले ।
स्त्रीपुत्रातें वेंचुनियां तेणें अतिथा सुखी केलें ।
सत्त्व पहावया कैलासींचा राणा कांतिपूर नगरीं उजू ठेले ।
श्रियाळ पोटींचें बाळक दिधलें सांग पां तें काय जालें रे ॥ ५ ॥
कौरवां पांडवां अति दळ संग्राम अठरा अक्षौहिणि रणासी आले ।
नववेळ नारायण आले गेले परी अकरा रुद्र गणतीसी आले ।
छपन्नकोटी यादवें तीं कृष्ण भालुका तीर्थी निमाले ।
नामा म्हणे ऐसे कल्पनेचे अवघे परंपरी भजिन्नले ॥ ६ ॥

[ १९९४ ]

तत्त्वमसि वाक्य उपदेशिलें तुज । तें तूं जीवीं कां अझून धरिसी दूर ॥ धृ० ॥
त्रिभुवनापरता धांवतोसी दुरी । आधीं तूं आपुली शुद्धि करी ।
उदय अस्तु जाला कवणिये घरीं । पिंडामाझारीं पाहे पां ॥ १ ॥
जागृतीमध्यें कवण जागते । दोहीं माजीं स्वप्न कोण देखतें ।
सुषुप्तीमध्यें कोण नांदतें । मग अनुवादतें तें कवण ॥ २ ॥
जागृती वरोनि करीं चिंतन । सुषुप्तीमाजीं रिघे ज्ञान ।
दोन्हींमाजीं स्वप्न देखे कवण । जीव कीं मन सांग पां ॥ ३ ॥
निद्रा मरण हें एक स्थान । दोहींचा देखणा जाणे आपण ।
लहान सुईंच्या इंधनाहून । आढळलें मन पांचासीं ॥ ४ ॥
इंद्रियें चपळ चेइलीं । जागत होतीं तीं कां परतलीं ।
जाऊनियां कवणा घरीं लपालीं । मना मिळालीं कवणें गुणें ॥ ५ ॥
सांगतां तेथें अनुवाद कैंचा । नाहीं तूंपण खुंटली वाचा ।
विष्णुदास नामा बोळिला साचा । परमपदीं बैसलासे ॥ ६ ॥

अभंग १९९४—(आ.)
१ मांस (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[१९९५]

संसार सागरीं रे माझें माहेर पंढरपुरीं ।
विठोबा बाप माझा माता रखुमाई सुंदरी ॥ १ ॥
पुंडलिक भाऊ माझा तोहि नांदे बरव्यापरी ।
सासुरें दुर्बळ भारी मज मोकलिलें दुरी ॥ २ ॥
सुखदु:ख कवणा सांगूं माझें माहेर पंढरपुरीं ॥ धृ० ॥
भ्रतार निष्ठुर वो काम क्रोध दोघे दीर ।
आशा हे सासू माझी ते मज गांजितसे थोर ॥ ३ ॥
तृष्णा हे नणंद सखी तिनें व्यापियेलें घरीं ।
भक्ति हे माझी भगिनी ते मज होईल निर्धारीं ॥ ४ ॥
वर्ष महिने दिवस घडिया वाट पाहे अजुनी ।
देहामाजीं करिती देखा त्यावया न पवे कोणीं ॥ ५ ॥
गजेंद्र हरिश्चंद्र त्यासी सोडवाया आला ।
प्रल्हाद अंबऋषि तिहीं तुझा धांवा केला ॥ ६ ॥
उपमन्यू दूध मागतां क्षीरसागरू दिला ।
गजेंद्र अजामेळ त्यांच्या सत्त्वां तूं पावला ।
नामया विष्णुदास गीतीं गोविंदु गाईला ॥ ७ ॥

[१९९६]

बोलवरी बोलती । श्रुति वाखाणिती ।
हरि पाविजे ती गति । वेगळी असे ॥ १ ॥
तुज न पवे गा तें स्वप्न । हरिशब्द एकचि ब्रह्म ।
पाविजे तें वर्म । वेगळें असे ॥ २ ॥
एक जाणीव खटपट । करिती ते सैराट ।
हरि पाविजे ती वाट । वेगळी असे ॥ ३ ॥
एक आहेत तार्किक । [1]चर्चिकवादक ।
हरि पाविजे तें सुख । वेगळें असे ॥ ४ ॥
एक चातुर्यवक्ते । व्युत्पन्न कवित्वें ।
संत रंजविते । लोकाचारी ॥ ५ ॥

---

अभंग १९९५—(आ.), १९९६—(पं.), (शि.) व (आ.)
१ चार्वाकादिवादक (आ.)

जिहीं तुज जाणितलें । तिहीं मौन धरिलें ।
नामा म्हणे ते पावले । भक्तियोगें ॥ ६ ॥

[ १९९७ ]

आम्हां संगतीं नावडे कांहीं । म्हणोनि जालों बा विदेही ।
दुःखमूळ संगतीचे पाईं । आम्ही नव्हों या गांवींचे ॥ १ ॥
आम्हां नाहीं रूप नांव । वस्तीसी नाहीं एक ठाव ।
मन घ्या इच्छेसी धांव । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ २ ॥
स्नान केलें गंगातीरीं । गंध लाविलें पंढरपुरीं ।
संध्या केली कृष्णातीरीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ ३ ॥
भिक्षा केली कोल्हापुरीं । [1]भोजन केलें महाद्वारीं ।
निद्रा केली माहुरीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ ४ ॥
ऐसियाची संगत करी । त्याचे चरण हृदयीं धरी ।
नामा म्हणे या संसारीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ ५ ॥

[ १९९८ ]

कळावंताच्या कळाकुसरी । त्या मी नेणें गा श्रीहरी ॥ १ ॥
वारा धांवे भलत्या ठायां । तैसी माझी रंगछाया ॥ २ ॥
प्रेमभातें भरलें अंगीं । तेणें छंदें नाचे रंगीं ॥ ३ ॥
घातमात नेणें देवा । नामा विनवितो केशवा ॥ ४ ॥

[ १९९९ ]

पावावया ब्रह्मपूर्ण । सांडुनि देई दोषगुण ॥ १ ॥
सर्वांभूतीं समदृष्टी । हेचि भक्ति गोमटी ॥ २ ॥
यावेगळे थोर नाहीं । बरवें शोधुनियां पाही ॥ ३ ॥
येणें संसार सुखाचा । म्हणे नामा शिंपियाचा ॥ ४ ॥

[ २००० ]

भक्तिप्रतापें पावलों मी सुपंथ । सफळ निश्चित परमार्थ ॥ १ ॥
देव सर्वांभूतीं असतां प्रगट । निर्वाणिं चोखट भक्ति जाण ॥ २ ॥

---

अभंग १९९७––(पं.), (शि.) व (न.), १९९८ ते २०००––(पं.) व (शि.)
१ हात धुतला तुळजापुरीं ॥ (पं. व शि.)

अनुक्रमणिका

भरुनियां मनीं जपसील नाम । तेणें निजधाम पावसील ॥ ३ ॥
जप तप ध्यान न लगे साधन । भक्ति तें कारण नामा म्हणे ॥ ४ ॥

[२००१]

माझिया मनें मज उपदेश केला । तो मज बिंबला हृदयकमळीं ॥ १ ॥
निर्वाणीची एक सांगितली खूण । कैवल्य चरण केशवाचे ॥ २ ॥
श्रुति स्मृति आणिक पुराणें । पढोनि जाणणें हेंचि सत्य ॥ ३ ॥
क्रिया कर्म धर्म करणें ज्या कारणें । ते खूण निर्वाण चरण हेचि ॥ ४ ॥
जप तप अनुष्ठान करोनि साधन । प्रत्यक्ष निधान चरण हेचि ॥ ५ ॥
नामा म्हणे मज कळलें अनुभवें । न विसंबे चरण जीवें तुझे ॥ ६ ॥

[२००२]

अच्युता अनंता गोविंदा । अरे मेघःश्यामा तूं आत्मया रामा रे ॥ १ ॥
आत्मया तूं रामा रे । म्हणा म्हणा गोविंद नामा रे ॥ २ ॥
ऐसें तुझें ध्यान लागो आम्हा रे । नामयाचा स्वामी पंढरिराणा रे ॥ ३ ॥

[२००३]

द्वारावतीभुवना गेलों । शंख चक्र घेउनी आलों ॥ १ ॥
वाटे प्रपंचें धरियेलों । रामनामें सोडविलों ॥ २ ॥
शंखचक्र भरुनी केणें । द्वारावतीं केलें पेणें ॥ ३ ॥
नामा म्हणे लाभ जाला । फुकासाठीं हरि जोडला ॥ ४ ॥

[२००४]

अरे अलगटा माझिया तूं मना । किती रानोराना हिंडविसी ॥ १ ॥
रे विठोबाचे पायीं दृढ घाली मिठी । कां हिंडसी हिंपुटी वायांविण ॥ २ ॥
क्रिया कर्म धर्म तुज काय चाड । जवळी असतां गोड प्रेमसुख ॥ ३ ॥
संकल्प विकल्प सांडी तूं समूळ । राहे रे निश्चळ क्षणभरी ॥ ४ ॥

अभंग २००१—(पं.), २००२—(आ.), २००३—(शि.), २००४—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[1]आपुलें निजहित जाण तूं त्वरित । वासनारहित होई वेगीं ॥ ५ ॥
नामा म्हणे मज पहिलेंच कळतें । सोसणें न लगतें गर्भवास ॥ ६ ॥

[२००५]

दाही दिशा मना तूं सईरा । न चुकती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥
विठोबाचे नामीं दृढ धरी भाव । येर सांडी वाव मृगजळ ॥ २ ॥
भुक्ति मुक्ति सिद्धि जोडोनियां कर । करिती निरंतर वळगणें ॥ ३ ॥
नामा म्हणे मना धरीं तूं विश्वास । मग गर्भवास नव्हे तुज ॥ ४ ॥

[२००६]

अरे मना तूं मर्कटा । पापिया चांडाळा लंपटा ।
परद्वार हिंडसी सुनटा । अरे पापी चांडाळा ॥ १ ॥
अरे तुज पापावरी बहु गोडी । देवाधर्मीं नाहीं आवडी ।
तेणें न पावसी पैलथडी । कर्मबांदवडी पडिसील ॥ २ ॥
अरे तूं अभिलाषिसी परनारी । तेणें सिद्धपंथ राहेल दुरी ।
जवळ येईल यमपुरी । आपदा पावसील ॥ ३ ॥
आतां तुज वाटतसे गोड । अंतकाळीं जाईल जड ।
महादोषें येतील सुखाआड । करतील कईवाड यमदूत ॥ ४ ॥
माझें शिकविलें नाइकसी । आतां सांगेन बळिया केशवासी ।
धरूनि नेईल वैकुंठासी । चरणीं जडसी म्हणे नामा ॥ ५ ॥

[२००७]

हें गे आयुष्य हातोंहातीं गेलें । आंगीं आदळलें जन्म मरण ॥ १ ॥
कांरे निदसुरा दैवहत मना । आपुली सूचना न करिसी ॥ २ ॥
कांरे तुज भ्रांति पडलीसे मूढा । वेढी चहूंकडा काळसैन्य ॥ ३ ॥
नानारोगें तुझी काया वेधियेली । नरकाची भरलीं नवही द्वारें ॥ ४ ॥

अभंग २००५—(आ.), २००६ व २००७—(पं.) व (शि.)
१ आपुले आपण विचारी रे हित । (पं. व शि.)

अनुक्रमणिका

पाळिली पोशिली आप्त माझी सखी । अंतीं तुज पारखी होती जाण ॥ ५ ॥
नामा म्हणे तुज येतों लोटांगण । तारील नारायण भरंवशानें ॥ ६ ॥[1]

[२००८]

उत्कंठित तप एक विठ्ठलनाम । आतां क्रियाकर्म कोणालागीं ॥ १ ॥
राहे रे तूं मना राहे रे निवांत । ध्याई अखंडित नारायण ॥ २ ॥
संतसमागमें साधीं हें साधन । पावसी निर्वाण नित्य सुख ॥ ३ ॥
नामा म्हणे तूं सहज सुखरूप । होऊनि निर्विकल्प विचारी पां ॥ ४ ॥

[२००९]

क्षण एक मना बैसोनि एकांतीं । विचारी विश्रांति कोठें आहे ॥ १ ॥
लक्षचौऱ्यांशीच्या करितां येरझारा । शिणलासि गव्हारा वेळोवेळां ॥ २ ॥
अझूनि तुज लाज न वाटे पैं कैसी । नरकाचे द्वारांसि जावें किती ॥ ३ ॥
दुर्लभ आयुष्य मनुष्य देहींचें । जातसे मोलाचें वायांविण ॥ ४ ॥
खापराचे साठीं सांडिला परिस । गहिंवरें फुटतसे हृदय माझें ॥ ५ ॥
पुत्रकलत्रादिक सुखाची सोयरी । त्यांची ममता थोरी धरिली तुवां ॥ ६ ॥
अनुदिनीं पाळितां अनुभवेंचि पाहे । कोण सुख आहे तयाजवळी ॥ ७ ॥
जगाचा जिवलग मायबाप आपुला । तो तुवां दुरावला केशिराज ॥ ८ ॥
स्वप्नींचिया धना लुब्धलासि काय । आलें काळभय हाकित तुज ॥ ९ ॥
संतापाचें सदन शोकाचे पुतळे । ते त्वां मानियेले हितकारी ॥ १० ॥
कैंची सुखनिद्रा इंगळाचे शेजे । प्रत्यया आणुनि तुझें तूंचि पाही ॥ ११ ॥
तुज राखेल कोण येवढीये संकटीं । रिघसी ज्याचे पोटीं मरणा भेणें ॥ १२ ॥
आदि मध्य अवसानीं सोडविल निर्वाणीं । तया चक्रपाणि सेवी वेगीं ॥ १३ ॥
जो जो क्षण लाविसी हरिभजनाकडे । तो तो गांठीं पडे सार्थकीं रे ॥ १४ ॥
नामा म्हणे तुजचि येतों काकुळती । सोडि रे संगती वासनेची ॥ १५ ॥

अभंग २००८—(पं.) व (शि.), २००९—(पं.)
१ सहाव्या चरणाऐवजी (पं.) व (शि.) प्रतींमध्ये—
नामा म्हणे अजुनी तरी शरण तया । वेगीं रिघे राया पंढरीच्या ॥ असा चरण आढळतो.

अनुक्रमणिका

[२०१०]

वासनेची करणी ऐके तूं रे मना । [1]या केली रचना ब्रह्मांडाची ॥ १ ॥
निर्गुण चैतन्य सदा सुखरासी । त्यां दिलीं चौऱ्यांशीं लक्ष सोंगें ॥ २ ॥
ऐसी हे लाघवी खेळे नाना खेळ । तेथें तूं दुर्बळ काय करिसी ॥ ३ ॥
क्षण एक चंचळ क्षण एक निश्चळ । क्षण एक विफळ सावध करी ॥ ४ ॥
क्षण एक कृपाळ क्षण एक निष्ठुर । क्षण एक उदार कृपण करी ॥ ५ ॥
क्षण एक सात्विक क्षण एक राजस । क्षण एक तामस करोनि सांडी ॥ ६ ॥
[2]क्षण एक प्रवृत्ति क्षण एक निवृत्ति । क्षण एक विश्रांति तप्त करी ॥ ७ ॥
क्षण एक आवडे क्षण एक नावडे । क्षण एक बिघडे घडलें सुख ॥ ८ ॥
ऐसी हे लाघवी पाहतां क्षणभंगुर । ब्रह्मादि हरिहर ठकले जेणें ॥ ९ ॥
नामा म्हणे तरीच इचा संग तुटे । दैवयोगें भेटे संतसंग ॥ १० ॥

[२०११]

वेदी तोचि शास्त्री सर्वांठायीं तोचि । पुराणांत तोचि अंतःकरणीं ॥ १ ॥
नाम सदा ध्यायी नाम सदा ध्यायी । रामनाम ध्यायी अरे मना ॥ २ ॥
नामा म्हणे देह नाहीं पुनरपें । केशवनाम सोपें उच्चारी बापा ॥ ३ ॥

[२०१२]

धरी रे मना तूं विश्वास या नामीं । अखंड रामनामीं ओळखी धरी ॥ १ ॥
जप करी ऐसा अखंड खंडेना । निशिदिनीं मना होय जागा ॥ २ ॥
नामा म्हणे मना होईं रामरूप । अखंडित जप सोहं सोहं ॥ ३ ॥

[२०१३]

प्रेमामृत सरिता पवित्र हरिकथा । त्रिभुवनींच्या तीर्था मुगुटमणि ॥ १ ॥
तेथें माझ्या मना होईल क्षेत्रवासी । राहे संतापाशीं सुख घेतां ॥ २ ॥
ऐहिक परत्र दोन्हीं समतीरीं । परमानंद लहरी झेपावत ॥ ३ ॥
मुक्तांचें जीवन मुमुक्षा माऊली । शिणल्या साउली विषयासक्तां ॥ ४ ॥

अभंग २०१०—(धु.), (शि.) व (पं.), २०११ व २०१२—(पं.) व (शि.), २०१३—(आ.)

१ म्यां (पं.) २ क्षीणची प्रवृत्ति क्षीणचि निवृत्ति । (धु.)

परमहंसकुळ सनकादिक सकळ । राहिले निश्चळ करोनि चित्त ॥ ५ ॥
नामा म्हणे मना सोइरे हरिजन । तारक त्याचे चरण दृढ धरी ॥ ६ ॥

[२०१४]

अरे मना सोस कां करिसी किती । हे तंव वायां धनसंपत्ति ।
आयुष्य भविष्य नाहीं तुझिये हातीं । हे अवघे अंतीं जायजणे ॥ १ ॥
एक अर्बुद साठी कोटि देखा । तीस लक्ष दहा सहस्र लेखा ।
सात शतें नवमास मापा । तया हिरण्यकश्यपा काय जालें ॥ २ ॥
चौदा चौकड्या लंकानाथा । नव्याण्णव सहस्र राया दशरथा ।
तेही गेले मृत्युपंथा । [१]मागें सर्वथा नुरलेचि ॥ ३ ॥
चौदा कल्प मार्कंडेया पडे । तें लोमहर्षणाचा एक रोम झडे ।
कदलाभ्याचें पुरे निमिषें मोडे । गेले एवढें अरे मना ॥ ४ ॥
बगदालभ्याचे पुरे निमिषें । वट हंसाचे उपडे कपिच्छ ।
तयासि होतां मृत्युप्रवेश । तो एक श्वास भ्रशुंडीचा ॥ ५ ॥
मरणांत पुरे भ्रशुंडीचा । तें एक दिवस कूर्माचा ।
नामा विनवी केशवाचा । वेगीं विठोबाचा पंथ धरा ॥ ६ ॥

[२०१५]

गणपति पूजिले ते दोंदिल भले । वैष्णव न भले अरे मना ॥ १ ॥
सीतळा पूजिली ते म्हइसे भले । वैष्णव न भले अरे मना ॥ २ ॥
मैराळ पूजिले ते वाघे भले । वैष्णव न भले अरे मना ॥ ३ ॥
सूर्य पूजिले ते घोडे भले । वैष्णव न भले अरे मना ॥ ४ ॥[२]
नामा म्हणे जे कां विठ्ठलीं भजिले । ते वैष्णव भले सत्य मना ॥ ५ ॥

[२०१६]

धांवत धांवत जाईन वोरसे । दाटला उल्हासे कंठ माझा ॥ १ ॥
[३]अंतरीचें गुज सांगेन आपुलें । हृदयीं [४]दाटले प्रेमअश्रु ॥ २ ॥

---

अभंग २०१४—(पं.), (शि.) व (धु.), २०१५—(पं.) व (शि.), २०१६—(पं.), (शि.) व (आ.)

१ मा इतरांची कथा कायसी ॥ (पं.) २ (शि.) व (पं.) प्रतींत हा चरण आढळत नाही. ३ मुखदुःखजीवाचे (पं. व शि.) ४ फुटो पाहे (पं. व शि.)

अनुक्रमणिका

[1]धरोनी पितांबरें सांगेन येकांतीं । जीविची सर्व खंति तयापुढें ॥ ३ ॥
संतसमागमें दावी कवतुकें । पाठवी भातुकें देऊनियां ॥ ४ ॥
[2]नामा म्हणे मज आहे भरंवसा । मना तूं विश्वास दृढ धरी ॥ ५ ॥

[२०१७]

नको नको मना हिंडों दारोंदारीं । कष्ट जाले भारी वायांविण ॥ १ ॥
कल्पना सांडोनि संतासंगें राही । सर्व त्यांचे पायीं सुख आहे ॥ २ ॥
ज्यांचिया दर्शनें शोक मोह जळे । पाप ताप पळे काळभय ॥ ३ ॥
जवळीच देखती पायाळावांचून । तें सुख निधान वैकुंठींचें ॥ ४ ॥
नामा म्हणे आली शेवटील घडी । तों घेई आवडी हाचि एक ॥ ५ ॥

[२०१८]

लाजो नको मना हरीच्या कीर्तना । संसार पाहुणा दो दिवसांचा ॥ १ ॥
कंठीं नाहीं आइती म्हणोनि सांडू नको ज्योति । इतुकिये भ्रान्ति पडूं नको ॥ २ ॥
बाळकाचे बोल माउली प्रीति करी । तैसी कीर्ति हरी परिसे चित्तें ॥ ३ ॥
भलतिया परी बोले बा श्रीहरी । तो भवसागरीं तारील जाणा ॥ ४ ॥
येणें तारुण्यपणें भ्रमलासि झणें । भोगिसी पतनें जन्मांतरीं ॥ ५ ॥
तूं होय मागता हरी होय दाता । शरण जाई अनंता म्हणे नामा ॥ ६ ॥

[२०१९]

देवा तुझें मी चाटारू । सहस्रा एका हाकीं करूं ।
लाभ होतसे अपारू । घडी घडीये माझारीं ॥ १ ॥
तुझ्या पायाची जोडी । त्यासि होतसे परवडी ।
आवारू न लाहे एक घडी । नंदाप्रिय होतसे ॥ २ ॥
मुदल पुसतसे वेळोवेळां । हा मना रे पापी चांडाळा ।
सांग चोविसां आगळा । कवणेपरी न धाय ॥ ३ ॥

अभंग २०१७—(आ.), २०१८—(पं.) व (शि.), २०१९—(आ.)
१ पितांबर छाया करुनि भक्तासी । सांगेन मी ,खंती तयापुढें ॥ (आ.)
२ मनीची आवडी तोचि जाण एक । सांगेल ते सुख सद्गुरुराव ॥ (पं. व शि.)

वासना मागतसे तुज । हें द्यावी जी मज ।
दाटणी होतसे सहज । म्हणवोनि मज अंकितसे ॥ ४ ॥
नामा म्हणे जी दातारा । तुझिये भेटी सारंगधरा ।
लाभ होतसे अपारा । घडी घडीये विठ्ठला ॥ ५ ॥

[२०२०]

मन धांवे सैरावरा । मन मारुनि केलें एकमोहरा ॥ १ ॥
मन केलें तैसें होय । धावडिलें तेथें जाय ॥ २ ॥
मन लांचावलें न राहे । तत्त्वीं बैसलें कधि नवजाये ॥ ३ ॥
नामा म्हणे सोहंशब्दीं । मन वेधलें गोविंदीं ॥ ४ ॥

[२०२१]

मनाचें मनपण सांडितां रोकडें । अंतरीचें जोडे परब्रह्म ॥ १ ॥
नाथिला प्रपंच धरोनियां जीवीं । सत्य तें नाठवीं कदाकाळीं ॥ २ ॥
अजुनि तरी सांडी नाथिलें लटिकें । तरसील कवतुकें म्हणे नामा ॥ ३ ॥

[२०२२]

परब्रह्म विश्वाकारें अवतरलें भक्तिकाजा ।
मूर्ति सुनीळु सांवळी केशिराजु स्वामी माझा ॥ १ ॥
गोविंदा रे तुझें ध्यान लागो मना ।
[1]पाविजे प्रेमपद निर्मळ होत ज्ञाना ॥ २ ॥
मन हें वोवरी असे सुमनाचे चित्रशाळीं ।
दोन्ही चरण सुकुमारें वरी अष्टदळ कमळीं ॥ ३ ॥
संध्याराग रातले सुनीळ दिशातळवटीं ।
ध्वजवज्रांकुश चिन्हें साजती गोमटीं ॥ ४ ॥
इंदिरा तिथें थोकली तिच्या सुखा नाहीं पारु ।
ते चरणीं स्थिर जाली म्हणोनी म्हणती लक्ष्मीवरु ॥ ५ ॥
घवघवीत वांकी चरणीं ब्रीदाचा तोडरु ।
नखप्रभा फांकली तिनें लोपला दिनकरु ॥ ६ ॥

---

अभंग २०२० ते २०२२—(पं.) व (शि.)
१. पाविजे प्रेम पदनिर्मळ होत ज्ञाना ॥ (पं.)

सृष्टी घडीत मोडीत उत्पत्ति स्थिति प्रलय अवघे नवे ।
तो चतुर्मुख ब्रह्मा चरण पूजितो स्वभावें ॥ ७ ॥
देवाधिदेव शंभू कैलासींचा राणा ।
गंगा मुगुटिं धरिली तिचा जन्म अंगुळीचरणां ॥ ८ ॥
दैत्यकुळीं जन्मला देव पळती ज्याचेनि धाकें ।
पावो पाठिसीं लागला म्हणउनि दारवंटा राखे ॥ ९ ॥
शेष वर्णितां श्रमला वेद परतले माघारीं ।
नामा म्हणे अरे मना जरी याचे चरण धरी झडकरी ॥ १० ॥

[२०२३]

पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीची होसी । केशव न होसी अरे मना ॥ १ ॥
आप ध्यासी तरी आपचि होसी । परि केशव न होसी अरे मना ॥ २ ॥
वायु ध्यासी तरी वायुचि होसी । परि केशव न होसी अरे मना ॥ ३ ॥
आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी । परि केशव न होसी अरे मना ॥ ४ ॥
नामा म्हणे जरी केशवासी ध्यासी । तरी केशवचि होसी अरे मना ॥ ५ ॥

[२०२४]

धणीवरी ध्यान करी कांरे मना । या सुखनिधाना विठोबाच्या ॥ १ ॥
पढीये तैसें सुख आहे त्याचे पायीं । अनुसरोनि [1]पाही एकवेळ ॥ २ ॥
श्रीमुख साजिरें पाही दृष्टीभरी । जीवित्वाचें करी लिंबलोण ॥ ३ ॥
जेणें लक्ष धरोनि आहे पुंडलीक । तोचि भाव एक दृढ धरी ॥ ४ ॥
न लगे गुरुमंत्र न लगे जपतप । उघडें स्वरूप विटेवरी ॥ ५ ॥
नामा म्हणे धरी निकट चरण । तरीच प्रेमखूण पावसील ॥ ६ ॥

[२०२५]

संसारीं असतां जीवनमुक्त आम्ही । विठ्ठल हे नामीं विनटलों ॥ १ ॥
काया क्लेश करणें शरीर दंडणें । न लगे हिंडणें दाही दिशा ॥ २ ॥

---

अभंग २०२३ व २०२४—(पं.) व (शि.), २०२५—(पं.), (शि.) व (धु.)
१ पढी (पं.)

अनुक्रमणिका

कोण वाहे मंत्र वाउगी खटपट । गाऊं निष्कपट रामनाम ॥ ३ ॥[1]

नामा म्हणे मज आहे हा भरंवसा । मना तूं विश्वासा दृढ धरी ॥ ४ ॥

[२०२६]

शोधोनियां चारी वेद । सार काढोनियां भेद ॥ १ ॥

मना जाण जाण जाण । विठोबाची प्रेमखूण ॥ २ ॥

साही शास्त्राचे संमत । मंथुनि काढिले यथार्थ ॥ ३ ॥

याज्ञिकांची जीवनकळा । उन्मनीचा जो जिव्हाळा ॥ ४ ॥

नामा म्हणे माझें बापें । साधियेलें संतकृपें ॥ ५ ॥

[२०२७]

बोलिलें वेदांतीं ऐकिलें सिद्धान्तीं । बोल नेति नेति अनिर्वाच्य ॥ १ ॥

तोचि हा बोल बोल रे मना । बोल नारायणा समर्पावें ॥ २ ॥

माझा मायबापें सोडवूनि गळा । केशवीं बांधला बोला बोल ॥ ३ ॥

नामा म्हणे बोल बोलतांहि बोला । खेचरें दाविला प्रेमभक्ति ॥ ४ ॥

[२०२८]

मुख्य मातृकांची संख्या । सोळा अक्षरें नेटक्या ॥ १ ॥

समचरणीं अभंग । नव्हे ताळ छंदोभंग ॥ २ ॥

चौक पुलिता विसर्ग । गण यति लघु दीर्घ ॥ ३ ॥

जाणे एखादा निराळा । नामा म्हणे तो विरळा ॥ ४ ॥

[२०२९]

सोळा त्या समाधि औट पीठामाझारीं । तेथें नरहरि देव नांदे ॥ १ ॥

बारा गुंफेमाजीं भ्रमर गुंफे मध्यें । तेथें आत्मा शुद्ध ज्ञान नांदे ॥ २ ॥

गोल्हाटाचा भेद असेची आघवा । शुद्ध ज्ञानदिवा अलक्ष तो ॥ ३ ॥

नामा म्हणे आम्हां तेजाच्या उजेडा । देव केला घोडा बैसावया ॥ ४ ॥

---

अभंग २०२६—(पं.) व (शि.), २०२७ ते २०२९—(आ.)

१ हा चरण काही (पं.) व (धु.) प्रतींमध्ये मिळत नाही.

अनुक्रमणिका

[२०३०]

समाधिस्थ सदा राहे समाधान । निःशब्द म्हणणें याचिलागीं ॥ १ ॥
राम तें समान नव्हती समाधान । समाधि बैसणें एकचित्तें ॥ २ ॥
उन्मनी उपासना प्रेमाची दाटणी । आत्मरूप जनीं दिसतसे ॥ ३ ॥
नामा म्हणे रूप डोळ्यांतील बाहुली । तीचि जगीं जाहलीं जगदाकार ॥ ४ ॥

[२०३१]

वामांगी बाहुली तुर्या दावी कळा । ते लक्षी पाउलां रामरूप ॥ १ ॥
माया निजरूप दक्षिणांगीं वसे । तूर्याचा हा भास मावळला ॥ २ ॥
मी माया म्हणतां पाहे आपणातें । आत्माराम तेथें ज्ञानजळीं ॥ ३ ॥
नामा म्हणे ज्ञान माया ते आपण । दृष्टीचें देखणें आत्मरूप ॥ ४ ॥

[२०३२]

सत्य ज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप गुण [1]गुणातीत ॥ १ ॥
[2]नाद ना भेद ना छंदे निरंतर । दोहींच्या विचारें ब्रह्म नांदे ॥ २ ॥
येकवटीं ब्रह्म आत्माराम रूप । तें पाहा स्वरूप लावण्याचें ॥ ३ ॥
नामा म्हणे केलें चैतन्य जवळ । मांडियेला खेळ संतीं तेथें ॥ ४ ॥

[२०३३]

चैतन्याचा खेळ एकवट ब्रह्म । निर्गुणासी गुण रूप जाहलें ॥ १ ॥
चैतन्य त्या कळा रूपा आले संत । निर्गुणाचा हेत रामकृष्ण ॥ २ ॥
खेळ मांडियेला गोल्हाट शिखरीं । गोलांगुळांगुळीं समाधिस्थ ॥ ३ ॥
समाधी साधन अखंड उन्मनी । औटपीठ ध्वनी नाद होय ॥ ४ ॥
नामा म्हणे तेथें चौक्या ज्या रंगल्या । अरंग मिरवल्या संतसंगें ॥ ५ ॥

---

अभंग २०३० व २०३१—(आ.), २०३२—(पं.), २०३३—(आ.)

१ वर्ण जेथें (पं.)

२ तो हा डोळेभरी । पाहिला श्रीहरी । पाहातं पाहणें दुरी सारोनियां ॥ २ ॥
वाचेचा उच्चार । न चले साचार । स्वरुप निर्विकार । कोंदाटले ॥ ३ ॥
नामदेव म्हणे । ज्योतीची निजज्योती । ते हे उभी मूर्ति । विठेवरी ॥ ४ ॥
(पं.) प्रतीत असा अभंग सापडतो.

[२०३४]

खेळ मांडियेला गोल्हाट शिखरीं । अर्ध चंद्रावरी शेखीयाचा ॥ १ ॥
चोवीस त्या गुंफा रुद्रलिंगीं नांदे । अभेद तो वेद बोले तेथें ॥ २ ॥
तीही अक्षरांच्या वाटेच्या शेजारीं । सोळा चंद्र नारी भेदाभेद ॥ ३ ॥
[1]सूर्य एकवीस शोभती चहुंकडे । खेळती उघडे संत तेथें ॥ ४ ॥

[२०३५]

दृष्टीचें देखणें तेंचि रूप माया । शब्द बोलावया ज्ञान जालें ॥ १ ॥
ज्ञानाची जी जागा हृदयीं पाहावी । सत्रावीसी दावी खेळ तेथें ॥ २ ॥
सत्रावी जीवन माया तिचे पोटीं । ज्ञान जाली दृष्टी देखावया ॥ ३ ॥
देखणें सिद्धांत बोलणें वेदांत । शब्द तोचि हेत सत्रावीचा ॥ ४ ॥
[2]नाद आणि भेद देखणें सिद्धांत । बोलणें वेदांत हेचि दोनी ॥ ५ ॥
हेत तो अहंकार दोहींतें नाचवी । अविद्येसी दावी निजसुरा ॥ ६ ॥
नामा म्हणे सिद्ध देखणें हा जन्म । डोळ्यामाजीं [3]वर्म बोलिलें ते ॥ ७ ॥

[२०३६]

अंतःकरणीं विष्णु तोचि आत्मा असे । चंद्रमा भासे मन तेंची ॥ १ ॥
बुद्धि ब्रह्मदेव चित्त नारायण । अहंकार जाण रुद्ररूप ॥ २ ॥
ज्ञान आत्मे पांच ज्ञानीं ओळखावे । पांच ते पाहावे कर्मस्थानीं ॥ ३ ॥
नामा म्हणे कैसें दाखऊं उघडें । वाटतसें कोडें मज आतां ॥ ४ ॥

[२०३७]

षड्चक्र भेदोनी जातां उर्ध्वपंथें । ध्वनि अनुहात उमटे तेथें ॥ १ ॥
तये ध्वनीमाजीं भग्न होय मन । योगसिद्धि जाण कैसी घडे ॥ २ ॥
तेहि वोलांडितां सिद्धि आडव्या येती । घेऊनियां जाती आपुल्या पंथें ॥ ३ ॥
तेथें गुंतोनियां विचरती योगीजन । योगासी साधून काय होतें ॥ ४ ॥

अभंग २०३४—(आ.), २०३५—(धु.), २०३६—(आ.), २०३७—(शि.) व (धु.)
१ या अभंगाला नाममुद्रा नाही. २ बिंदू (धु.) ३ बाहुली तें (धु.)

अनुक्रमणिका

आधि तो साधितां कष्टाचे संभार । होय चकनाचूर शरीराचा ॥ ५ ॥
साधितिया पुढें ऐसीं विघ्नें येती । ठेऊनि मागुती फिरती मागें ॥ ६ ॥
वारियाची मोट कैसी बांधवेल । भलत्यासी सांगतां वाटेल हें लटिकें ॥ ७ ॥
[1]नामा म्हणे तुम्ही सोडोनियां भक्ति । करितां नामा युक्ति मूर्खजन ॥ ८ ॥

[ २०३८ ]

साधनाच्या माजीं एक गजराजू । सांधी त्यासी उजू होय पाहा ॥ १ ॥
नासिकाचे वारे कोंडोनियां प्राणें । उफराटें जाणें उर्ध्वपंथें ॥ २ ॥
गुदस्थानीं टांच देऊनियां जाण । कासावीस प्राण होती पाहा ॥ ३ ॥
गोल्हाट भेदितां कोल्हाटीच नाहीं । विठोबाची ग्वाही नामा म्हणे ॥ ४ ॥

[ २०३९ ]

त्रिकूट शिखरावरी पाहे पां नवल । परि अखंडीत धार वर्षे अमृताची ॥ १ ॥
त्रिवेणी संगमीं गगन निर्मळ वाहे । तेथें स्नान करुं जाय [2]आनंदमय ॥ २ ॥
गुरुमुखें स्नान करीं परब्रह्मी लक्ष धरी । अनुहात ध्वनि थोरी नाद गर्जे ॥ ३ ॥
उन्मनी जागृति गोल्हाट मंडळा जाय । तेथुनी निराळे पाहे निजतत्त्व ॥ ४ ॥
विष्णुदास नामा म्हणे अनुभवि तोचि जाणे । आम्ही गुरुखुणें वर्ततसों ॥ ५ ॥

[ २०४० ]

मायेसी रुसले भावासी त्यागिले । [3]जाऊनि राहिले काकापासीं ॥ १ ॥
काकीमुख दावा काकीमुख दावा । काकीमुख दावा बाईयांनों ॥ २ ॥
काकीचें श्रीमुख गोरक्षा लाधलें । काकिये पोखिले गोरक्षासी ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हां काकी पें वोळली । सत्रावी दिधली दोहावया ॥ ४ ॥

[ २०४१ ]

मुंगीस तो मार्गु सांपडे गोडीचा । योगीया लक्षीचा ज्ञान ज्योती ॥ १ ॥
तरीच ओळखिजे केशवचरण । त्या जन्ममरण मग कैंचें ॥ २ ॥

अभंग २०३८—(शि.) व (धु.) २०३९ ते २०४१—(पं.) व (शि.)
१ खटपट सांडोनि । पांडुरंग मनीं भक्ति घ्यावा ॥ ८ ॥ (धु.)
२ आनंदी होय माये । (पं. व शि.) ३ येऊनि बैसले काकीपासी ॥ (पं. व शि.)



अनुक्रमणिका

मत्स्य नानापरी क्रीडा खेळे जळीं । आनंदकल्लोळीं योगीराज ॥ ३ ॥
नामा म्हणे तोचि केशव जाणता । तया नाहीं व्यथा गर्भवासु ॥ ४ ॥

[२०४२]

पृथ्वीमाजीं पाहतां नाहीं म्यां देखिला । हस्तिसी उडविला ऐसा कोण्ही ॥ १ ॥
शोधितां शोधितां आलों पंढरीसी । तेथें ज्ञानोबासी देखियेलें ॥ २ ॥
मोक्षमार्गी देवें हा गजराज बांधला । तो [1]ज्ञानी उडाला गोल्हाटासी ॥ ३ ॥
पृथ्वीमाजीं पाहतां ज्ञानीच कोल्हाटी । ढिसाळ हे [2]दृष्टी तृणप्राय ॥ ४ ॥
उडोनियां तेणें दर्शन घेतलें । हस्तीसी जिंकिलें ज्ञानदेवें ॥ ५ ॥
याचिया इशाळे करील जो मूर्ख । पावोनियां दुःख कष्टी होय ॥ ६ ॥
धन्य ज्ञानदेव योग साधूनियां । भक्ति आचरोनियां दावी लोकां ॥ ७ ॥
नाम म्हणे सर्व खटपट सांडोनि । पांडुरंग मनीं भावें ध्यावा ॥ ८ ॥

[२०४३]

कृष्ण सहाय्य पांडवांसी । ते भोगिती नष्टचर्यासी ।
साह्य केलें हरिहरासी । प्रारब्ध कोणासी टळेना ॥ १ ॥
ऐसी प्रारब्धाची ठेव । जाले भिक्षुक पांडव ।
राज्य घोडे भाग्य सर्व । सांडियेला ठाव प्रारब्धें ॥ २ ॥
शरीर संचिता आधीन । धर्मराज हिंडे वन ।
कर्मे बुडाला रावण । आणि दुर्योधन प्रारब्धें ॥ ३ ॥
अभिमानें शिशुपाळ । कृष्ण हस्तें जाला काळ ।
यादव निमाले सकळ । केलें निर्मूळ प्रारब्धें ॥ ४ ॥
कर्मरेखा टळेना । बाण लागला जगज्जीवना ।
कृष्णें सांडिल्या गोपांगना । हें नारायणा प्रारब्ध ॥ ५ ॥
कामबुद्धीचें सुख । अति मानिति ते मूर्ख ।
चंद्रासी लागला कलंक । इंद्रासी दुःख प्रारब्धें ॥ ६ ॥
हरिश्चंद्र तारामती । घोर जन्मांतर भोगिती ।
नळराव पुरुषार्थी । तयाच्या विपत्ति प्रारब्धें ॥ ७ ॥
पतिव्रता सुशीळ । दमयंती पाळें पोळें ।
ऐसें अनिवार कपाळ । भोगी दुष्काळ प्रारब्धें ॥ ८ ॥

---

अभंग २०४२—(धु.) व (शि.), २०४३—(आ.)
१ ज्ञानबा (धु.) २ सृष्टी (शि.)

अनुक्रमणिका

ऐसी अनिवार जन्मांतरें । राज्य सांडिलें रघुवीरें ।
सवें मेळवूनि वानरें । फिरवी दिगंतरें प्रारब्धें ॥ ९ ॥

फिरत असतां काय जालें । पुढें प्रारब्ध ओढवलें ।
जानकीस राक्षसें नेलें । कष्ट भोगविले प्रारब्धें ॥ १० ॥

कर्मा आधीन शरीर । पूर्ण ब्रह्म रामचंद्र ।
रघुपति विष्णूचा अवतार । पाठीं जन्मांतर नामा म्हणे ॥ ११ ॥

[२०४४]

सगुण समान भजती अंतरीं । सर्व भूतांतरीं असे एक ॥ १ ॥
पाहा कोळियांची काय सांगों कीर्ति । विद्या अभ्यासिती मूर्तीपुढें ॥ २ ॥
द्रौपदीचे घरीं होते उपवासी । देठही लाविती अकस्मात ॥ ३ ॥
नामा म्हणे मुख्य प्रारब्ध कारण । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ४ ॥

[२०४५]

जाला कासावीस बाण लागतांची । प्रारब्धाची गति चुकवेना ॥ १ ॥
चुकतां ते रेखा क्रियामाण जाण । [१]. . . . . . . . . . . . . . . . . . ॥ २ ॥
बाणें पश्चाताप अर्जुनाचे मनीं । शस्त्र चक्रपाणि धरी न मी ॥ ३ ॥
नामा म्हणे धरुं ऐसे याचे संगा । तारुं पांडुरंगा उभा असे ॥ ४ ॥

[२०४६]

काय सांगो कर्मभोग । लिंगपात शिवाचा ॥ १ ॥
याच सुखें ब्रह्मा मुख । उभा नख छेदिला ॥ २ ॥
सुचिष्मंत पंडुपुत्र । भिक्षापात्र हिंडती ॥ ३ ॥
नामा म्हणे कर्मरेखा । देवांदिकां चुकेना ॥ ४ ॥

[२०४७]

हरिश्चंद्र राजा होता सत्त्वगुणी । वाहातसे पाणी डोंबाघरीं ॥ १ ॥
सत्य पतिव्रता तारामति राणी । राहिली भोगोनी कायाक्लेश ॥ २ ॥
भरतें ऐकतां मातेचें वचन । श्रीरामदर्शन कैसें घडे ॥ ३ ॥
माता पिता सर्व अव्हेरी जनक । नामा म्हणे भाक प्रारब्ध हें ॥ ४ ॥

---

अभंग २०४४—(पं.), २०४५ ते २०४७—(आ.)
१ अभंगाच्या चरणाची दुसरी ओळ मिळाली नाही.

अनुक्रमणिका

[२०४८]

प्रथम अवतारीं आई थोर ख्याती केली वो ।
ब्रह्मयाच्या कैवारा आपण मत्स्यरूप जाली वो ।
धुंडाळिला सागर आई शंखासुरा मिठी घाली वो ।
[1]आणिले चारी वेद ब्रह्मपुरी त्वां स्थापिली वो ॥ १॥
ऐसी बहु लोकां माझारीं आई खेळतसे [2]गोंधळी वो ।
भूलोका माझारीं अंबा नाचतसे वो ।
[3]संव्हारी दैत्य अंबा करी गदारोळी वो ॥ २ ॥
कूर्म [4]वेष धरूनी धरणी पाठीवरी धरली वो ।
महेंद्र मंथन मेळीं अंबा वेगींसी पावली वो ।
समुद्रमंथन करितां आई बरवा गोंधळ घाली वो ।
नारायण विश्वरूप देवा जे त्वांच दिधलें वो ॥ ३ ॥
वराहरूप धरूनी आई थोर पवाडा केला वो ।
पृथ्वीच्या कैवारा घालिसी गोंधळ दाढा वो ।
वधिला हिरण्याक्ष त्याचा केला त्वां रगडा वो ।
खेचर चि देवता धरणी धरीयली दाढा वो ॥ ४॥
त्रिकाळ रूप धरूनी स्तंभ फोडुनि निघाली वो ।
सिंहनादें गर्जतां हांक त्रिभुवनीं गाजली वो ।
वधिला हिरण्यकश्यप अंतरमाळा गळां घाली वो ।
प्रल्हादाकारणें कैसी गोंधळी नाचली वो ॥ ५॥
इंद्राच्या कैवारा आई सानें रूप धरिलें वो ।
बळिच्या द्वारा जाऊन भूमिदान मागितलें वो ।
त्रिलोक मोजतां बळीस पाताळीं घातलें वो ।
मागुता येईल म्हणवुनी त्याचें द्वार त्वां रक्षिलें वो ॥ ६ ॥
जमदग्नि रेणुके कुशीं धरियेला अवतार वो ।
हातीं परशु घेऊनी केला दैत्यांचा संहार वो ।
एकविस वेळ मेदिनी निःक्षत्रिय करूनी फेडिला भूमिभार वो ।
वधिला सहस्रार्जुन कामधेनुच्या कैवारा वो ॥ ७ ॥

---

अभंग २०४८—(पं.), (शि.) व (आ.)

१ वधियेलें राक्षस ब्रह्मपुरीं। (आ.) २ गोंधळीं अंबे (शि. व पं.)

३ तेहतिस कोटी देवता सर्वे मेळावुनी मेळीं वो।
त्रासिले राक्षस भक्त जनां प्रती-पाळी वो। (आ.)

४ रूप (पं. व शि.)

अनुक्रमणिका

पितृवचना कारणें आई वनवासासी गेली वो ।
अठरापद्में वानर मेळवुनि गोंधळ घाली वो ।
वधिला दशशिर लंका शरणागत दिधली वो ।
कौसल्या माऊली देवा बंदी सोडी केली वो ॥ ८ ॥

वसुदेवकुळटिळके तरी तूं कंसासुरे मारिते वो ।
कुळांतकुळतारिके तरि तूं कौरव संहारिते वो ।
[1]पांडव प्रतिपाळके भक्तजनासि तारके वो ।
तुझा गोंधळ गातां अंबे कोण वर्णू शके वो ॥ ९ ॥

[2]विधीमार्ग सांडुन असुरें देवा गांजियलें वो ।
त्याचिया कैवारा आई त्वां सौम्यरूप धरिलें वो ।
बौद्ध रूप धरुनि भक्तालागीं मोहिलें वो ।
कौसल्या देवता जे त्या रुपें त्वां दिधलें वो ॥ १० ॥

कलियुगाच्या अंतीं थोर होईल अन्नान वो ।
एकीं ठायीं होऊन खातील चारी वर्ण वो ।
तेव्हां पृथ्वी-भारें तुजला येईल शरण वो ।
तेव्हां तूं पावसी कलंकी अवतार धरूनी वो ॥ ११ ॥

पुंडलिकाकारणें पंढरपुरीं केला वास वो ।
तुझा गोंधळ गातां थोर जिवा उल्हास वो ।
तूं मायें माऊली तुझा भज बहु विश्वास वो ।
विनवी विष्णुदास नामा तुझ्या दासाचा मी दास वो ॥ १२ ॥

[२०४९]

विठाई सांवळे डोळसे रंगा येई हो ॥ धृ० ॥
कानीं कुंडलाची प्रभा । जैसे चंद्रसूर्य नभा हो ॥ १ ॥
गळां वैजयंती माळा । कांसे पितांबर पिवळा हो ॥ २ ॥
नामा म्हणे कृपावंत । झडकरी यावें पंढरीनाथा वो ॥ ३ ॥

[२०५०]

वाजविली डांक चौक ठेवियला वो ।
ठायीं पंढरीचे विठ्ठले तुज हाकारा केला वो ॥ १ ॥

अभंग २०४९—(शि.), २०५०—(पं.) व (शि.)
१ भक्त प्रतिपाळके अंबे पांडव संरक्षके वो । (शि. व पं.) २ वेदमार्ग (आ.)

अनुक्रमणिका

रंगा येई वो खेचरें विठाई सुंदरी वो ।
तुझीं पाऊलें गोजिरीं कैं मी दृष्टि देखेन वो ॥ २ ॥
पाजळला दीपु फिटला अंधकारू वो ।
न लावा उशीरू पांडुरंगे माउलिये वो ॥ ३ ॥
तमोगुणाचा रज जाळूनि धूप केला वो ।
उशिरू कां लाविला पांडुरंगे माउलिये वो ॥ ४ ॥
तनुमनाची मूद टाकीन बोवाळूनी तुजवरोनी वो ।
वैकुंठवासिनी पांडुरंगे माउलिये वो ॥ ५ ॥
अहंकार दैवतें झडपिलें नामयासी वो ।
येउनियां रंगासी रंग राखी आपुला वो ॥ ६ ॥

[२०५१]

जंबु या द्वीपामाजीं एक पंढरपुर गांव । धर्माचें नगर विठो पाटील त्याचें नाव ।
चला जाऊं तया ठायां । कांहीं भोजन मागावया ॥ १ ॥
विठोबाचा धर्म जागो । त्याचे चरणीं लक्ष लागो ॥ धृ० ॥
ज्यासी नाहीं पंखपाय तेणें करावें तें काय ।
शुद्धभाव धरूनी पंढरीसी जाय । इच्छिलें फळ देतो यासी नवलाव तें काय ॥ २ ॥
सुदामा ब्राह्मण दुःखें दरिद्रें पीडिला ।
मुष्टिपोहे घेऊनि त्याचे भेटीलागीं गेला ।
शुद्धभाव देखोनियां गांव सोनियाचा दिला ॥ ३ ॥
गण आणि गोत्रज सर्व हासताती मज ।
गेलें याचें मानुषपन येणें सांडियेली लाज ।
विनवी तो शिंपी नामा संतचरणींचा रज ॥ ४ ॥

[२०५२]

बावा अहंकार निशीं घनदाट । गुरु वचनीं फुटली पहाट ।
माता भक्ति भेटली बरवंट । तिनें मार्ग दाविला [1]चोखट गा ॥ १ ॥
नरहरी रामा गोविंदा वासुदेवा ॥ धृ० ॥

अभंग २०५१—(पं.) व (भा.), २०५२—(पं.), (शि.) व (भा.)
१ सुस्पष्ट (पं.)

एक बोल सुस्पष्ट बोलावा । वाचें हरि हरि म्हणावा ।
संत समागमु धरावा । तेणें ब्रह्मानंद होय आघवा गा ॥ २ ॥

आला सीतळ शांतीचा वारा । तेणें सुख जालें शरीरा ।
फिटला पातकांचा थारा । कळीकाळासी धाक दरारा गा ॥ ३ ॥

अनुहात वाजती टाळ । अनुक्षीर गीत रसाळ ।
अनुभवें तन्मय सकळ । नामा म्हणे केशव कृपाळु गा ॥ ४ ॥

[२०५३]

पिंगळा बोले महाद्वारीं । निशा सरली दिशा चारी ।
उठा उठा हो श्रीहरी । उदयो प्रकाशला दिनकरी ॥ १ ॥

देवा शकुन ऐकावा ॥ धृ० ॥

संत साधु अपरिमित । अवघा भरियेला थाट ।
टाळ विणे वाद्य वाजत । आवडी मंजुळ स्वरें गात ॥ २ ॥

नादें अंबर दणाणलें । तेहतीस कोटी देव मिळाले ।
आवडी पहावया आले । स्वर्ग सुखातें विसरले ॥ ३ ॥

आई रखुमाई माते । उठवा उठवा श्रीरंगातें ।
नारद तुंबर गायनातें । कर जोडुनि हनुमंत ॥ ४ ॥

उठिला सांवळा वनमाळी । आनंदली भक्तमंडळी ।
जयजयकारें पिटली टाळी । विठ्ठलनामें दिधली आरोळी ॥ ५ ॥

पिंगळा आनंदला मनीं । तेज न माये गगनीं ।
हर्षे घातली लोळणी । शिंपी नामा तुझे चरणीं ॥ ६ ॥

[२०५४]

नव्हे तेंचि कैसें जालें रे खेळिया । नाहीं तेंचि दिसूं लागलें रे ।
अरूप होतें तें रूपासि आलें । जीव शिव नाम पावलें रे ॥ १ ॥

आपलिच आवडी धरून खेळिया । आपआपणातें व्यालें रे ।
जोबनाकारणें केली बायको । तिने एवढें वाढविलें रे ॥ २ ॥

एक खेळिया तुज सांगितलें । ऐसें जाणुनि खेळ खेळे रे ॥ धृ० ॥

ब्राह्मणाचें पोर एक खेळासि भ्यालें । तें बारा वर्षे लपालें रे ।
कांपत कांपत बाहेर आलें । तें नागवेंचि पळून गेलें रे ॥ ३ ॥

अभंग २०५३—(आ.), २०५४—(पं.), (शि.) व (धु.)

अनुक्रमणिका

सहा तोंडचा एक संभूचें बाळ । त्यानें बहुतचि बळ आथियेलें रे ।
[1]खेळ खेळतां दगदगी व्यालें । तें कपाट फोडुनि गेलें रे ॥ ४॥

चहूं तोंडयाचा पोर एक नारयाहि जाण । तो खेळियामाजीं आगळा रे ।
कुचाली करूनी पोरें भांडवी । आपण राहे वेगळा रे ॥ ५॥

गंगा गौरी दोघी भांडवी । संन्यासी धाडले राना रे ।
खेळ खेळे परि डायीं न सांपडे । तो एक खेळिया शहाणा रे ॥ ६॥

खेळिया माजी हनुम्या शहाणा । न पडे कामव्यसनीं रे ।
कामचि नाहीं तेथें क्रोधचि कैंचा । तेथें कैचें भांडण रे ।
[2]राम्या गडयाची आवडी मोठी । म्हणूनि लंके पेणे रे ॥ ७॥

यादवाचा पोर एक गोप्या भला । तो बहुतचि खेळ खेळला रे ।
लहान थोर अवघे मारिलीं । खेळचि मोडूनि गेला रे ॥ ८॥

[3]ऐसे खेळिये कोटयानकोटी । गणित नाहीं त्याला रे ।
विष्णुदास नामा म्हणे वडील हो । पहा देहीं शोधुनी रे ॥ ९॥

[२०५५]

एका ब्राह्मणाचें घरीं खाण पडिलें । सातां चोरीं एक मुसळ नेलें ।
बापुडें ब्राह्मण नागविलें । धाऊणे आले वोसगांवीचे ॥ १॥

वोसगांवींचा हनुमंत खोटा । त्याचा बाप जुनाट चोरटा ।
मारूनि [4]नेतो दाही वाटा । जना चोहटा नागविलें ॥ २॥

नागविला चोहांटीचा वाणी । आणिक नेली प्रभूची गोणी ।
शेळी आली लांडगा घेऊनि । गाढव बंदीखानीं बोंबलत ॥ ३॥

एका संन्याशानें कुतरें खादलें । गांवच्या खाटका प्रायश्चित्त दिलें ।
बापुडे कुंभार नागवेले । डोचकें फोडिलें म्हातारीचें ॥ ४॥

ऐशा [5]सिद्धांतीच्या खुणा । एक जाणे पंढरीराणा ।
विष्णुदास नामा करीं विज्ञापना । संत प्रेमळ जाणती ॥ ५॥

अभंग २०५५—(शि.)
१ खेळ खेळतां चकवील तें । (पं., शि. व धु.)
२ दहा तोंडांची पोरेंचि मारिलीं । रामा गडया कारणें रे ।
३ खेळिया माझी येक भीष्महीं । जाणा तो न पडे काम-बळ वळसा रे ।
आपला काम तेणे शांतनुसि । वोपिला निराळा राहिला कैसा रे ।
सूर्याचा पोर येक यमही जाणा । तो शणोनो फोडिला डोई रे ।
खेळ खेळे परी जयासि न पडे । चुकविला काळाचा फांसा रे । (पं., धु. व शि.)
४ घेता (शि.) ५ संतांच्या (शि.)

[२०५६]

मुंगी उमगा मुंगी उमगा । मुंगीचें मुखीं त्रिवेणी गंगा ॥ १ ॥
उदकाचें टवळें मसीची माती । अंधारीं मुंगीनें तेथें लाविली ज्योती ॥ २ ॥
अवघें आकाश मुंगीये मागें । मुंगीये संसार सांडिला मागें ॥ ३ ॥
विष्णुदास नामा मुंगीये मागें । मुंगी उमगली खेचरसंगें ॥ ४ ॥

[२०५७]

मुंगीनें आकाश कवळिलें बाहीं । तेथें एक नवल वर्तलें पाहीं ॥ १ ॥
मुंगी उमगा मुंगी उमगा । मुंगीचे माथां त्रिवेणी गंगा ॥ २ ॥
मुंगीचे गळां [1]तुळईचा लोढणा । विष्णुदास नामा बोलिला खुणा ॥ ३ ॥

[२०५८]

समुद्राचें पाणी मुंगी मुखांतुनी । काढाया लागोनि श्रम थोडे ॥ १ ॥
केशवाची भक्ति कठीण त्याहूनि । वायां दंभपणीं नोहे नोहे ॥ २ ॥
आकाश अंगुळें माप सुयेमान । भूमीचे वजन पालडेनि ॥ ३ ॥
नामा म्हणे वारा वळूं ये कदापि । केशवाचें रूपीं नव्हे बुद्धि ॥ ४ ॥

[२०५९]

आंधळयानें स्वरूप देखियलें नयनीं । मुकें बहिऱ्या कानीं गोष्टी सांगे ॥ १ ॥
कांसवीचें दूध दुहितां भरणा । दुही त्याला जाणा हात नाहीं ॥ २ ॥
वारियाच्या लोथा बांधोनियां माथां । वांझेचिया सुता बळिवंता ॥ ३ ॥
मुंगीनें त्रैलोक्य धरियेलें तोंडीं । नामा म्हणे पिंडीं प्रचीत आहे ॥ ४ ॥

[२०६०]

हाटकर कुणबी वाट मोडी । रिकामा ब्राह्मण करितो चहाडी ॥ १ ॥
गुळेंविण शिंपी बोटें चाटी । प्रेमेंविण तेली क्षेम दे लाटीं ॥ २ ॥

अभंग २०५६ व २०५७—(धु.), २०५८ ते २०६०—(आ.)
१ तुळसीचा (धु.)

अनुक्रमणिका

जिताची कोष्टी घातला खांचे । प्रेमेंविण कुंभार नाचे ॥ ३ ॥
लोहार हिंवाविण तापे । सोनारा लागले धापे ॥ ४ ॥
नामा म्हणे यातिचे चाळे । दुखणेंविण परीट विवळे ॥ ५ ॥

[२०६१]

[1]अकरा लोचन त्याचे पांच मुख । आठ कान देख पुच्छ दोन ॥ १ ॥
अरतखंड निरत प्रचंड । उमाळ उदंड उभा फार ॥ २ ॥
दहा पाय चहुं चालत ते जाय । नव्हेत ग माय सावज त्या ॥ ३ ॥
नामा म्हणे त्याचा अर्थ करी चोख । पूर्वज पातक लया जाय ॥ ४ ॥

[२०६२]

बारा हात लुगडें एकचि नारी । पालऊं घातला खांदियावरी ॥ १ ॥
जाईन त्या गोकुळां पाहीन त्या गोपाळा । तयालागीं उतावेळ मन माझें ॥ २ ॥
एकें हातीं घातिला तांबियाचा वाळा । हाळदोळी वांटुनी सुदलें मी डोळां ॥ ३ ॥
एकली जातां नोळखे मातें । विष्णुदास नाम्यास नेईन सांगातें ॥ ४ ॥

[२०६३]

राइयेयेवढें पांखरूं त्रिभुवनीं त्याचा फेरा रे ।
नर आणि नारी तया पांखराचा चारा रे ।
पिंडामध्यें आहे त्याचा शोध तुम्हीं करा रे ।
मेरूच्या शिखरी त्या पांखराचा थारा रे ॥ १ ॥
येउनि संसारा याचा अनुभव तुम्हीं करा रे ।
चौऱ्यांशीं लक्ष योनी चुकेल जन्माचा फेरा रे ॥ धृ० ॥
अठ्ठावीस योजनें तया पांखराचा फेरा रे ।
बत्तिसा मुखांनीं तें बा घेतसे चारा रे ।
अहंसभेमध्यें याचा शोध तुम्ही करा रे ।
अकराही लोचन तया चोची असती फारा रे ॥ २ ॥

---

अभंग २०६१—(धु.), २०६२—(पं.) व (शि.), २०६३—(पं.), (शि.) व (धु.)
१ आकाश (धु.)

अनुक्रमणिका

एकवीस स्वर्गाहुनि तया पांखरांची उंची रे ।
सप्तही पाताळाखालीं तया पांखरांची निची रे ।
नेत्रांतील बाहुली तया पांखरांची निची रे ।
उडालें पांखरू सप्तही सागर घेऊन चोचीं रे ॥ ३ ॥

ऐसें तें पांखरू दादा आहे सृष्टीवरी रे ।
मेरु आणि मांदार तया पांखरांचे उदरीं रे ।
शिवाचें आसन दादा कवणिये परी रे ।
[1]पिंडीं आणि ब्रह्मांडीं म्हणती दशवें द्वारीं रे ॥ ४ ॥

ऐसें तें पांखरूं गोरक्षरायें वळखिलें रे ।
पिंडीं आणि ब्रह्मांडीं मच्छिंद्रनाथें देखियेलें रे ।
त्याचियेनि अंगसंगें [2]सद्‌गुरुनाथें दाखविलें रे ।
त्याचियाचि प्रसादें नाम्या [3]शिप्यानें गाईली रे ॥ ५ ॥[4]

[२०६४]

प्रळयाचे काळीं ब्रह्मांड जळालें । कोण त्यांत उरलें सांगा मज ॥ १ ॥
प्रभा ते फांकली जाती ते गुंतली । सांग मज खोली स्वरूपाची ॥ २ ॥
ब्रह्मांडाची जेव्हां राख जळून जाली । कोणी ती लावली अरूपरूपीं ॥ ३ ॥
विष्णुदास नामा म्हणे सांगा हेंचि गूढ । नाहीं तरी मूढ होऊनि राहें ॥ ४ ॥

[२०६५]

मेलें जित्यासी सांगे गोष्टी । आंधळे ओवी सुवर्णाच्या गांठी ।
पांगुळ लागे पवनाच्या पाठीं । बाळका पोटीं माय वाढे ॥ १ ॥
थोटयानें धवळार रचियेलें । मुकें पुराण सांगूं बैसलें ।
सवेंचि बहिरे ऐकों ठेलें । वेडें हासलें शहाणियासी ॥ २ ॥
आणिक एक नवल सांगूं काई । जीत वाघ शलभानें [5]भक्षिला पाहीं ।
मुंगीनें पर्वत उचलिला बाहीं । माशी करी छाया सूर्यासी पैं ॥ ३ ॥
मृदंगें वाहिला गुरव राणा । वांझेच्या स्तनीं संचरला पान्हा ।
माया फुलें खोऊं नाचे दवणा । जाण सुजाणा न कळेची ॥ ४ ॥

---

अभंग २०६४—(आ.), २०६५—(भा.)
१ पिंडी आणि ब्रह्मांडीं याचा अनुभव घेतां रे । चुकेल चौऱ्यांशीचा फेरा रे ॥ (धु.)
२ गोरक्षनाथें (धु.) ३ शिष्य नाम्या शिप्यानें (धु.)
४ (धु.) प्रतीत ३ व ४ चरण नाहीत. ५ विदारिला गाई (भा.)

[1]मुरकुटें सगळा सागर गिळिला । माशानें पारधी मारिला ।
सशानें सिंह भोवंडिला । वेदांपुराणां न कळेची ॥ ५ ॥
हें तुम्ही म्हणाल उमानें । हें तंव उरफाटें दृष्टी पाहाणें ।
विष्णुदास नामा म्हणे । अनुभवी या खुणा जाणती ॥ ६ ॥

[२०६६]

नीर समुद्र तो कोण । कोठें क्षीराब्धि आसन ॥ १ ॥
दधि समुद्र कोण्या ठायीं । खारा समुद्र कोण्या गृहीं ॥ २ ॥
रत्न समुद्र तो कोण । कोठें मदनाचें आसन ॥ ३ ॥
मन समुद्र कोठें आहे । नामा म्हणे शोधून पाहे ॥ ४ ॥
नेत्र नीर समुद्र देखा । क्षीर सत्रावी ओळखा ॥ ५ ॥
दधिसमुद्र नाकीं आहे । खारा शरीरीं तो पाहे ॥ ६ ॥
नाभीं रत्नाकर देखा । माथां मदन ओळखा ॥ ७ ॥
नामा म्हणे सांगूं काय । मन समुद्र हृदयीं आहे ॥ ८ ॥

[२०६७]

राधा वनींच्या पुत्रास धन बहुत जालें । तो म्हणे आतां धर्म करीन ।
बापाचिये श्राद्धा आवंतिले ब्राह्मण । एक जेवण सुदामाचें ॥ १ ॥
कैसी नागवण आली रे बापा । वेंचा परते पाप आणिक नाहीं ॥ धृ० ॥
सहाजणां ब्राह्मणां सवा सवा शेराचा भात । कढीत हिंग जिरें बहुत ।
त्यावरी घातलें मुगाचें वरण । येवो का मरण जेवित्यासी ॥ २ ॥
सहाजणां ब्राह्मणां घातले सहा वडे । घालितां रडे उसकाबुसकी ।
त्यावरी घातलें तूप लोणकढें । जावो का मढें या जेवित्याचें ॥ ३ ॥
सगळ्या गव्हाची रांधिली क्षीरीं । ही एक महामारी आली देखा ।
त्यावरी घातली साखर गूळ । उठो का पोटशूळ जेवित्यांसी ॥ ४ ॥
जेवणें जालें दहींभात आला । तंव आत्मा लागला ब्रह्मांडासी ।
बहुतेक दिवसासी अंतर पाडिला । समुळीं नागविला म्हणे नामा ॥ ५ ॥

अभंग २०६६--(धु.), २०६७--(आ.)
१ टिटवेने (भा.)

एन ४२४७—५४.

अनुक्रमणिका

[२०६८]

मुंगी व्याली शिंगी जाली तिचें दूध किती ।
सतरा रांजण भरून गेलें पेले बारा हत्ती ॥ १ ॥
आम्ही लटिकें न बोलूं वर्तमान खोटें ॥ धृ० ॥
लटिकें गेलें कटकें तेथें गाडग्याएवढें राळें ।
उडत चिमणी चलत चाले तिचे वाटीएवढे डोळे ॥ २ ॥
शेळी करी घुसळण तेथें मांजर काढी लोणी ।
उंदिर गेले देशांतरा ताकें भरल्या गोणी ॥ ३ ॥
पाण्यांत कांसव गीत गाय वनांत कोल्हा नाचे ।
सावज मनीं संतोषला खोकड पुस्तक वाचे ॥ ४ ॥
कांतणी घरीं लग्न लागलें सरडा कणीक कांडी ।
बागुल वंध्या कण्या परणी घुवड मांडे रांधी ॥ ५ ॥
वाभुळीचे खोडीं माशानें केले कोटें ।
सशानें सिंह ग्रासिला बेडुक आले लोटें ॥ ६ ॥
विष्णुदास नामा म्हणे ऐका त्यांची ख्याती ।
लटिकें म्हणतील त्यांचे पूर्वज नरका जाती ॥ ७ ॥

[२०६९]

त्रिभुवनाची परि मांडिली शरीरीं ।
गोकुळाभीतरीं उभारिली ॥ १ ॥
शेषाचियें दृष्टीं मूळ भूमिका चोखटी ।
तेथूनि मूळ दृष्टी आरंभिली ॥ २ ॥
मन विदानी आणि कुंडलिनी चतुर्दळांपासुनी ।
पवनवेगीं टाकुनी पति समया स्वाधिष्ठानीं ॥ ३ ॥
मणिपूरपर्यंत कळवट शोभिवंत ।
तेथुनि टाकितसे नीट कर्मभूमीं ॥ ४ ॥
बारा सोळा नारी श्रीपति मुरारी ।
हृदयमंदिरीं गोपिराजु ॥ ५ ॥
कनक घाटेवरी सत्रावी सुंदरी ।
चाले उन्मत्त भारी चंद्रकळा ॥ ६ ॥

अभंग २०६८—(आ.), २०६९—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

तेथें रोवियला दारवंटा दावी त्याच्या वाटा ।
जावया वैकुंठा गौळियासी ॥ ७ ॥

मृत्युलोकींच्या सैंवरा आल्या ज्या चौबारा ।
देखिल्या त्या घरा चौघीजणी ॥ ८ ॥

त्या चिपोळीयां वाहती मिळोनियां येती ।
चालती मागती पश्चिमपंथीं ॥ ९ ॥

अनुहतावरी वाट करुनी नीट ।
विशुद्ध नगरा येती धीट ॥ १० ॥

तेथुनी वाट असे नीट दारवंटा ।
तेथुनी जावें ब्रह्मरंध्र कपाटां ॥ ११ ॥

हेंचि परब्रह्म राऊळ तेथुनी ।
जाऊं नये पुढारी सांडुनी राया ॥ १२ ॥

तेथें रविशशीवरी आणि ब्रह्मरश्मी स्वरूप ।
एकांत ओवरी आहे अमूप ॥ १३ ॥

विष्णुदास नामा सांगे निर्वाणीच्या खुणा ।
अनुभवी तोचि जाणे येरा चोजवणा ॥ १४ ॥

[२०७०]

या वो क्षेत्र केलें जुंपलीं आउतें । अठरा धान्यें तेथें पेरियेलीं ॥ १ ॥
मेघःशाम मेघ वर्षे सर्वां धारीं । बीज विटेवरी सासिन्नले ॥ २ ॥
जगाचें जीवन पंढरी पिकली । चराया सोकलीं भूतें जाणा ॥ ३ ॥
घालूनियां माळा रक्षी कळिकाळा । काय कलिमळा संसाराची ॥ ४ ॥
पापा सोंकरणें भक्ति हे गोफण । भूस सांडी कण वेंचिताती ॥ ५ ॥
वेद-शास्त्र ऐसें बोल बोलविता । गूढ वेगळितां लाभ होती ॥ ६ ॥
नामा म्हणे स्वामी विठ्ठल सुकाळ । अन्न ब्रह्म फळ त्रिभुवनीं ॥ ७ ॥

[२०७१]

चालती कुळवाडी न टके । उपकें घेतलीसे नाकें ।
चार वर्षें पिकलें निकें । त्यांचे कण सांचले ॥ १ ॥

---

अभंग २०७०—(शि.), २०७१—(आ.)



अनुक्रमणिका

पुढें एक निपाणिक पडिलें । त्या कृपणाचें द्रव्य सांचलें ।
कृपणाचें घर भरिलें । वंचक जाला भक्तांसी ॥ २ ॥

स्त्रियांबाळां खाऊं नेदी । धर्म न करीच निशुद्धी ।
डोईस बांधलीसे चिंधी । खादीं रकटें ठिगळाचें ॥ ३ ॥

त्या द्रव्यांचें करी कळांतर लेखा । सजगाणीस देई रुका ।
रुक्यास घेई पैका । आठा दिवसांच्या बोला ॥ ४ ॥

सवाई दिडी-दुणी । अकर्ताच घरीं आणी ।
तो न भजे चक्रपाणि । पाप दुणी होतसे ॥ ५ ॥

तंव एक अतीत घरासी आला । बाईलीनें त्यासी स्वैंपाक केला ।
तंव आपण उठून जागला । झडकरी आला दारासी ॥ ६ ॥

कोणें दाखविलें माझें घर । त्यावरी घेईन जहर ।
कोठें गेला सुना मोगर । अरगळा कोणें काढिली ॥ ७ ॥

ऐसा तो ब्राह्मण चडफडत गेला । आपण परतोन माघारा आला ।
धांवोनि घाव हाणितला । डोई फोडिली बायलेची ॥ ८ ॥

कैसी केली बोहरी । बोज नाहीं तुझे घरीं ।
नागविलें इया पोटीं । तीन वेळां खाताती ॥ ९ ॥

ऐसी गजबज ऐकोन । शेजारी आला धांवोन ।
त्यासी हातीं धरोन । गृहाभितरीं हिंडविला ॥ १० ॥

त्यासी बैसावया दिला पिढा । तो स्वैंपाक आणोनि पुढां ।
पहा हो बायलेचा धाडसा केवढा । ऐका तुम्ही दादोजी ॥ ११ ॥

ऐसीं पूर्ण अकरा वर्षें भरलीं । बारा वर्षांची साउली पडली ।
या रीतीनें गुजराण जाली । तंव अग्नि लागला गृहासी ॥ १२ ॥

शेतांतून कुळवाडें केली चोरी । पाणी निघालें पेवा भितरीं ।
सुनेनें घालून घेतलें विहिरीं । ऐसेपरी नागवलों ॥ १३ ॥

ऐसे जे नर असती । ते जन्मोजन्मीं नागवती ।
त्यांची न चुके यातायाती । विष्णुदास म्हणे नामा ॥ १४ ॥

[ २०७२ ]

आम्हां कीर्तन कुळवाडी । आणिक नाहीं उदीम जोडी ॥ १ ॥

वाचा पिकली पिकली । हरिनामाची वृष्टि जाली ॥ २ ॥

---

अभंग २०७२—(पं.) व (धु.)

अनुक्रमणिका

दशमी एकादशी । जाल्या कैवल्याच्या राशी ॥ ३ ॥
संत म्हणती नामा भला । हरिनामाचा सुकाळ केला ॥ ४ ॥

[ २०७३ ]

जन तुम्ही करा रे उदीम । वाचे स्मरा नारायण ।
तो तुम्हां चुकवील जन्ममरण । मायाभ्रमण चुकविल ॥ १ ॥
तारूं करूनी शरीराचें । केणें भरिलें हरिनामाचें ।
शिड उभविलें सत्त्वाचें । वल्हें पडती धर्माचें ॥ २ ॥
आत्मयांची करुनी कुबे काठी । वारा लागतो जगजेठी ।
तारूं चाले थोरा नेटी । विठ्ठल भेटी पंढरीये ॥ ३ ॥
तारवा सांपडलें बंदर । राया विठोबाचें नगर ।
तें बा संतांचें माहेर । विष्णुदास म्हणे नामा ॥ ४ ॥

[ २०७४ ]

जन्मासी येवोनि जाहलों मी चाटा । गेलों होतों हाटा पंढरीये ॥ १ ॥
गुंड गे करी गुंड गे करी । बैसलों द्वारीं पंढरीये ॥ २ ॥
शनिवारीं पुंडलिकापाशीं । चंद्रभागेसी स्नान केलिये ॥ ३ ॥
आदित्यवारीं करीं पह्याळें । कळीकाळा न भीयें त्याचेनी बळिये ॥ ४ ॥
सोमवारीं वेणुनादींच्या हाटा । जातसे चाटा उभवोनी गुढीये ॥ ५ ॥
विष्णुदास नामयानें उभवोनी गुढी । विकलीसे प्रौढी केशीराज ॥ ६ ॥

[ २०७५ ]

चौऱ्यांशीं लक्ष जन्म हिंडतां । घोंगडें अनंता जर्जर जालें ॥ १ ॥
जेथें जाय तेथें तुटचि पडे । मुद्दल न घडे काय करूं ॥ २ ॥
संचित आटलें व्यवसाय खुंटले । म्हणोनि ठाकिलें द्वार तुझें ॥ ३ ॥
नामा म्हणे विठोबा जरी होसी जाणतां । तरी या बोला उचिता प्रेम देईं ॥ ४ ॥

[ २०७६ ]

घोंगडें हें नव्हे धडुत पैं माझें । पांघुरतां ओझें होत असे ॥ १ ॥
घे आपुलें घोंगडें देई माझा पांवा । अझुनि कां चाळविसी केशिराजा ॥ २ ॥
विष्णुदास नामा केशवा विनवी । ऐहिक्य परत्रीं नाहीं चाड मज ॥ ३ ॥

अभंग २०७३ व २०७४—(आ.), २०७५ व २०७६—(पं.) व (शि.)

अनुक्रमणिका

[२०७७]

औट हात घोंगडें दिधलें हरी । पांघरलों नाहीं धणीवरी ॥ १ ॥
माझें घोंगडें कृष्णा गा जतन करी । नागविलें थोरीं पांचाजणीं ॥ २ ॥
साठीं तीनशें दसोडी । पदरीं औट कोडी रोमावळी ॥ ३ ॥
बहात्तर गांठी सोळा फुंदणी । घोंगडी दाटणी होत असे ॥ ४ ॥
त्रिगुणीं दोरिया जाणा । घोंगडें पांघरवी पंढरीराणा ॥ ५ ॥
त्याचें घोंगडें त्यासी दिधलें । उघडें नामें भक्ती पांघरविलें ॥ ६ ॥

[२०७८]

पाटोळा तिमलारे मजवरी घाली कांबळें ॥ धृ० ॥
आषाढमासिचा रे कैसा शीतळ वारा ।
वर्षतो मेहुला रे कैशा शीतळ धारा ॥ १ ॥
झिरमिर झिरमिर रे कैसा वर्षतो मेघू ।
जाळीचें घोंगडें बा मजवर घालीं सेवूं ॥ २ ॥
प्रेमाचें भरतें गा कैसा महापूर आला ।
नामया विष्णुदास केशवराजीं मिनला ॥ ३ ॥

[२०७९]

देह मंदिराभीतरीं । शेजे सूदला श्रीहरी ।
निद्रा उन्मनीचे भरी । तें म्यां स्वप्नीं देखिलें ॥ १ ॥
स्वप्ना भुललें बाई । मागील नाठवेचि कांहीं ।
हा जीव परवस्तूच्या ठायीं । तनुमनें आटला ॥ २ ॥
स्वप्न सांगूं कोणासी । विवेक करिती तयासी ।
हें कोडें अज्ञानासी । संतावांचुनी नुगवे ॥ ३ ॥
[1]ध्यानीं पहुडला सांवळा । जवळी नारी बारा सोळा ।
विंजणें वारिती सकळां । सोहं शब्दें जागरणीं ॥ ४ ॥
धिं धिं तुरे वाजती । अनुहत ध्वनि गर्जती ।
तेथें निद्रा ना सुषुप्ती । चंद्र सूर्य मावळले ॥ ५ ॥

---

अभंग २०७७ व २०७८—(आ.), २०७९—(पं.) व (शि.)
१ ध्वनी (शि. व पं.)

अनुक्रमणिका

मन पवना नाहीं भेद । तया ठायीं हा गोविंद ।
तेथें खुंटला अनुवाद । वेदश्रुति आटल्या ॥ ६ ॥

म्हणे विष्णुदास नामा । जन्ममरण नाहीं आम्हां ।
कृपा केली मेघश्यामा । संतसंगें तारिलों ॥ ७ ॥

[२०८०]

वेणुनादीं चरे पाणी पी भीवरें । ते धेनु हुंबरे [1]वत्सालागीं ॥ १ ॥
वाणें ते सांवळी नामें तें श्रीधरा । चरे वसुंधरा चवदा भुवनें ॥ २ ॥[2]
[3]केशव नामें गाय माधव नामें गाय । विठ्ठल नामें गाय कामधेनु ॥ ३ ॥
[4]प्रेमें ते पान्हावे भक्ता घरीं जाय । भुकेलिया खाय पातकासी ॥ ४ ॥
नामा म्हणे गाय भाग्यवंता घरीं । पाप्या जन्मवरी पाठी लागे ॥ ५ ॥

[२०८१]

परा पश्यंति मध्यमा वैखरी । तें गाय दुभे वैष्णवा घरीं ॥ १ ॥
तें एके विठ्ठलें पंढरी राखिली । दुभावया दिधली पुंडलिका ॥ २ ॥
चाऱ्ही वेद मुखीं धरूनियां राहे । विठ्ठलाचे द्वारीं [5]नामा गाये ॥ ३ ॥

[२०८२]

कैलास भुवनीं । देव बसले सिंहासनीं ।
आपण भवानी । कर जोडुनी उभी असे ॥ १ ॥

भक्तिरस द्यावा । तेथील अनुभव घ्यावा ।
नित्य हरिजागरू सांगावा । कोण फळ तयाचें ॥ २ ॥

अभंग २०८०—(धु.), २०८१—(पं.) व (शि.), २०८२—(आ.)
१ संतांघरीं (धु.) २ दुसरा चरण काही (धु.) प्रतींत नाही.
३ रामनाम गाये कृष्णनाम गाये । गोविंद नाम गाये कामधेनु ॥ (धु.)
४ भक्तिद्वारा धाय प्रेम पान्हाये । भुकेलिया खाये पातकांत ॥ ४ ॥
प्रेमरसें गायें भक्तीतें पान्हाये । भुके तयातें खाये पातकासी ॥ ५ ॥ (धु.)
नामा म्हणे हरि भाग्यवंता घरीं । पापिया जन्मवरी पाठी लागे ॥ ५ ॥ (धु.)
व
नामा म्हणे गाये संता घरीं आहे । पापिया नसाते पाठीलागे ॥ (धु.)
५ गाय नामया देतु (पं. व शि.)

अनुक्रमणिका

बैसविलें तिनें त्यासी हातावरी । दाविली नगरी बिभीषणाची ॥ १८॥
पाहें बापा आतां होऊनियां स्वस्थ । पुरवी हा हेत आपुला तूं ॥ १९ ॥
पाहोनियां लंका आनंदला मनीं । धन्य हे करणी कर्त्याची ॥ २० ॥
रम्य स्थळ जागा अपूर्व ते फार । होतसे गजर नामघोष ॥ २१ ॥
घरोघरीं होय वेदपारायण । रामनामीं मन सर्वत्रांचें ॥ २२ ॥
सर्व पाहोनियां लंकेची रचना । आला तो सदना बिभीषणाच्या ॥ २३ ॥
पाहातों तो नामा उभा कीर्तनास । गुण गात असे देवाजीचे ॥ २४ ॥
शरण जे गेले माझ्या पंढरीनाथा । नाहीं भय चिंता त्यांस कांहीं ॥ २५ ॥
विस्मय तो करी परसोबा अंतरीं । फिरला माघारीं तेथूनियां ॥ २६ ॥
बैसवला तेव्हां रुक्मिणीनें करीं । आणिला पंढरी क्षेत्रामाजीं ॥ २७ ॥
समजलें तेव्हां नामया लागुनी । पुसतसे खूण तुजलागीं ॥ २८ ॥
परसोबा सांगत त्यासि सविस्तर । बिभीषणमंदिर कैसें असें ॥ २९ ॥
ऐकोनियां ऐसें न करी उत्तर । कां रे अहंकार धरिलासी ॥ ३० ॥
हातीं तुझ्या आला होता चिंतामणी । कैसा तो गोफणीं लाविलासी ॥ ३१ ॥
कल्पवृक्ष तुझ्या आंगणीं लाविला । कैसा उपडिला अभागिया ॥ ३२ ॥
अमृताचा घट हातासी लाधला । कैसा उलंडिला वेडिया तूं ॥ ३३ ॥
तैसा महाराज तोचि बिभीषण । कां नाहीं नमन केलें त्यासी ॥ ३४ ॥
सदोदित ज्याचे हृदयीं रामचंद्र । दूजा कां विचार धरिला तेथें ॥ ३५ ॥
अहंकारें मोठे मोठे नाडलेती । सांगसी त्या तूं युक्ती शास्त्राच्या ते ॥ ३६ ॥
तोचि अहंकार धरिलासी अजून । होई आतां लीन संतापायीं ॥ ३७ ॥
तेणें हा झडेल अंतरींचा मळ । दिसेल सकळ ब्रह्मरूप ॥ ३८ ॥
समजला तेव्हां परसोबा तो मनीं । न कळे करणी नामा तुझी ॥ ३९ ॥
गळोनियां गेला त्याचा अभिमान । जाला तेव्हां लीन संतापायीं ॥ ४० ॥
संताची करणी असे अघटित । करी दंडवत नामदेव ॥ ४१ ॥

[ १२ ]

माते डावा डोळा उजवा हे सारिखे । एक समतुके पाहे दोन्ही ॥ १ ॥
नांवें वेगळालीं इतकेंचि जाण । परी काय केलें येणें सांग मातें ॥ २ ॥
नाहीं जाणत न घडे तूं कैंची माउली । म्हणवोनि देह घाली चरणावरी ॥ ३ ॥

अनुक्रमणिका

वायांविण सीण धरसी रे कासया । ऐक रे परसया सांगेन तुज ॥ ४ ॥
नाम्याच्या खांद्यांवरी ठेवोनियां हात । आपण पंढरीनाथ येत होते ॥ ५ ॥
नाम्यासह ते भ्रांति पडली चित्तीं । म्हणवोनि एकांतीं राउळीं पुशिलें ॥ ६ ॥
देव गुह्य बोलिले मीं तें चित्तीं ठेविलें । दुजें वरीयेलें भक्तिलागीं ॥ ७ ॥
त्यापासूनि नाम्याची शंका येतसे आम्हा । अखंड परमात्मा ज्या जवळी ॥ ८ ॥
नाम्यासी देखोनी लोटांगणीं जावें । दुजें न धरावें आन चित्तीं ॥ ९ ॥
इतुकें ऐकोनी परसा विनविता जाला । काय बोलियेला रुक्माईसी ॥ १० ॥
माते पांडुरंगीं मज भेट करावी । धरीन मी जीवीं चरण त्याचे ॥ ११ ॥
नेणेची हें वर्म माझी मूढ मती । मज करा विश्रांति विठ्ठलचरणीं ॥ १२ ॥
तंव ते आदिमाता सांगे परसोबासी । दैवें हें आम्हासी दिधलें नाहीं ॥ १३ ॥
भेटवावें तुज आज्ञा नसतां मज । कोपतील सहज देवराव ॥ १४ ॥
तूं नाम्या विनवी निरभिमान होई । तो दाखवील सोई देवाजीची ॥ १५ ॥
मागें होतें तें अवघेंचि विसरलों । लोटांगणीं आलों नामयासी ॥ १६ ॥
परसा म्हणे नाम्या तुझें बरवें गाणें । जैसें कां नाणें टांकसाळीचें ॥ १७ ॥

## परसा भागवताने केलेली नामदेवाची स्तुती

[१३]

कीर्तनाच्या वेळे अति सप्रेमेची । प्रत्यक्ष हृषिकेशी अवतरले ॥ १ ॥
धन्य तुझें जिणें धन्य माता पिता । धन्य ते सरिता सागरेसी ॥ २ ॥
तुम्ही जातीचे ब्राह्मण मी आहे शिंपी । मज काय देतोसी उपमा ऐवढी ॥ ३ ॥
चरणींचा रज सेवकही संताचा । विशेषही तुमचा आज्ञाधार ॥ ४ ॥
नाठविसी लटिकें देसी थोरपण । तुम्ही अहां ब्राह्मण आम्ही शिंपी ॥ ५ ॥
शास्त्रें पुराणें असती तुमचीये घरीं । होती निरंतरीं अध्येयनें ॥ ६ ॥
पढतमूर्ख आम्हा न कळेची भेद । मज तो गोविंद वश्य कैंचा ॥ ७ ॥
मी तुमचा सेवकु अंगलग पाईकु । मज आहे उपदेशु तुमचाच कीं ॥ ८ ॥
धोतरें प्रक्षाळणें लाविणें पत्रावळी । तुमची उष्टावळी प्रसाद मज ॥ ९ ॥
थोरत्वातें मानोनी थोरपणें गेलों । जीवनें सांडिलों मच्छ जैसा ॥ १० ॥
करी तळमळ मज आतां सांभाळीं । भेटी करीं विठ्ठलीं नाम्या मज ॥ ११ ॥
रखुमाईचा वर आहे तुम्हापाशीं । जाईजे तियेसी पुसावया ॥ १२ ॥

जें सांगेल तूतें दावील केशवातें । भक्तवत्सल जेथें तेथें असे ॥ १३ ॥
रखुमाईनें मज सांगितली मात । तुझिया खांद्या हात श्रीहरिचा ॥ १४ ॥
तो दाखविल तूतें सांगेल केशवातें । माझी आण त्यातें घालोनियां ॥ १५ ॥
पूर्वीं प्रसन्न मज नागनाथीं जाला । मस्तकीं ठेविला हात तेणें ॥ १६ ॥
तेंचि रूप पाहीं धरोनियां राहीं । शंका न धरी कांहीं आण माझी ॥ १७ ॥
मागें एक नाम बोलिलों उत्तर । तेणें तुझें जिव्हार दुखविलें ॥ १८ ॥
पूर्वज पायातळीं बोलिला ब्रीदावळी । एकाएकीं आकळी बुद्धि ठेली ॥ १९ ॥
रामचरणीं शिळा उद्धरिली पहातां । ते नेली तत्काळतां परलोकासी ॥ २० ॥
तैसा मी पाषाण नुद्धरशील जाण । खंती करसी तरी आण विठोबाची ॥ २१ ॥
भुजंगचाली तो नाम्यानें दाविला । तंव एरु गेला धरावया ॥ २२ ॥
परसा पळे कैसा लागला पाठीं । परतोनि पाहे दृष्टी तो अदृश्य जाला ॥ २३ ॥
ज्ञानीं ज्ञानदेव ध्यानीं नामदेव । भक्ति चांगदेव पुढारेले ॥ २४ ॥
या तिन्ही मूर्ती एकचि पैं असती । यांची कांहीं भ्रांति न धरावी ॥ २५ ॥
परसा म्हणे जैसी सरिता सागरीं । तैसे ते श्रीहरी मिळोनि गेले ॥ २६ ॥

[ १४ ]

परसा म्हणे नाम्या मी तुज देखिलें । प्रत्यक्ष विठ्ठलें ऐसें जाण ॥ १ ॥
तूंच तूं विठ्ठल तूंच तूं विठ्ठल । हाचि सत्य बोल जाण आम्हां ॥ २ ॥
तुवां पदें केलीं राऊळें सांगितलीं । येरी कवित्वें केलीं आपल्या मतें ॥ ३ ॥
तूं शिंपी नामा आम्ही उत्तम याती । वायां अहंवर्ती पडलों देखा ॥ ४ ॥
आम्ही एक आपुले दृष्टीनें देखिलें । देवभक्त जाले दोन्ही एकरूप ॥ ५ ॥
तुझें नाम जपतां महापातकें जाती । तेणें होय मुक्ति म्हणे परसा ॥ ६ ॥

[ १५ ]

कवित्वापरीस कवित्व आगळें पैं आहे । परि ते न कळे सोय नामयाची ॥ १ ॥
नाम बरवें नामदेव बरवा । एकत्व बरवा परमात्मा ॥ २ ॥
दुधावरील साय तें मी वाणूं काय । तैसें गाणें गाय नामदेव ॥ ३ ॥
नामा तोचि कुडी केशव तोचि देव । तेथील अनुभव परसा म्हणे ॥ ४ ॥

[१६]

कविरस वाटोनि क्षीरीस हिंगाची फोडणी । भक्तीवीण आळवणी तैसी केंवी रुचे ॥ १ ॥
तसें रसाळ अमृत नामयाचें गीत । अनुभवी जाणत तेथिची गोडी ॥ २ ॥
दुधातुपाची वाटी लावोनियां होटीं । कांजी तया पोटीं केंवि रुचे ॥ ३ ॥
धायवरी जेवीजे तुपेसी क्षीरी । त्यावरी भाकरी नाचण्याची ॥ ४ ॥
तैसें केशवाचें प्रेम नामदेव जाणे । तेथील अनुभव परसा म्हणे ॥ ५ ॥

[१७]

केशव परीसता नामा परिसविता । तयाचिया चित्ता एक आला ॥ १ ॥
कायसी आम्ही केली बापुडी । नामयाची घडी एक नये ॥ २ ॥
धिग् धिग् जीवित्व वायां गेलें । नामया फावलें परसा म्हणे ॥ ३ ॥

[१८]

गंगातीरीं तप तुवां काय केलें । योगिया सरीसें फळ लाधलें ॥ १ ॥
नामयारे तुवां कोणें योगें साधिलें । निजरूप ठाकलें परब्रह्म ॥ २ ॥
अधल्या जन्मीं दशमी दिंडी आणि जागरण । तेणें प्रेमें लाधले चरण केशवाचे ॥ ३ ॥
मज पाहतां स्वामीकाजीं वेंचलासी । करवतीं धारातीर्थे नाहलासी ॥ ४ ॥
जती पद देवोनी द्रवपण पावलें । केशवराजें मज कांहीं नाहीं वंचिलें ॥ ५ ॥
नामा आणि केशव एकची जाणावे । परसा भागवत बोलिला स्वभावें ॥ ६ ॥

[१९]

तुम्हीं गावें तेंचि आम्हीं अंतरीं घ्यावें । म्हणोनी स्वभावें भावाभाव नाहीं येथें ॥ १ ॥
आम्ही तुम्ही कांहीं नाहीं बा वेगळे । ऐसा खेळे मेळे दिवस चारी ॥ २ ॥
जाणें तें न चुके अपकीर्ति कायसी । नामा परसोबासी विनवीतसे ॥ ३ ॥

[२०]

वैष्णवांचा थाट पताकांचे भार । करिती जयजयकार नामघोष ॥ १ ॥
पुष्पांचा वर्षाव विमानांची दाटी । नामघोष सृष्टीं न समाये ॥ २ ॥
ऋषिगण गंधर्व इंद्र प्रजापती । धन्य धन्य म्हणती नामयासी ॥ ३ ॥

एन ४२४७—६०अ

अनुक्रमणिका

देव वेळाईत केला सेवा ऋणें । अनन्य अनन्य भक्ति याची ॥ ४ ॥
आळंकापूर ज्ञानिया इंद्रनीळ सोपान । निवृत्तीसी जाणा त्रिंबकेश्वरीं ॥ ५ ॥
नामा महाद्वारीं श्रेष्ठ हे पंढरी । प्रत्यक्ष भूमिवरी वैकुंठ हें ॥ ६ ॥
देवें नामयासी पोटासीं धरिलें । नेत्रोदकें क्षाळिलें सर्वांग हें ॥ ७ ॥
जन्मोनि सार्थक तुवां बरवें केलें । वनीं मोकलीलें मजलागीं ॥ ८ ॥
तंव राहीरुक्माई सत्यभामादि प्रभूति । नामा आलिंगिती प्रेमें करून ॥ ९ ॥
धन्य दिन सुखाचा वेदघोष विप्रांचा । वैष्णवीं[१] नामाचा घोष केला ॥ १० ॥
तेथें पूजा नमस्कारें परसा यानें केली । हृदयीं धरिलीं चरणकमळें ॥ ११ ॥

[२१]

टाळ मांदळी नाहीं चाड । नाम गोड विठोबाचें ॥ १ ॥
वाहो टाळिया नाचों बागडें । गावों नामें गोड विठोबाचीं ॥ २ ॥
परसा म्हणे थेर अवघी उपाधी । नाम गातां सिद्धी होईल रोकडी ॥ ३ ॥

[२२]

पैल मेळा रे कवणाचा । नामा येतो केशवाचा ॥ १ ॥
ब्रीद दिसतें अंबरीं । गरुड टके याच्या परीं ॥ २ ॥
परसा येतो लोटांगणीं । नामा लागला त्याचे चरणीं ॥ ३ ॥

[२३]

कृतयुगीं नामा प्रल्हाद पैं जाला । स्तंभीं अवतरला नारायण ॥ १ ॥
त्रेतायुगीं नामा अंगद कपि असे । [१]रामचंद्रें त्यासी आलिंगिला ॥ २ ॥
धन्य तो नामा धन्य तो नामा । पढिये पुरुषोत्तमा जीवाहुनी ॥ ३ ॥
द्वापारीं नामा उद्धव गहन । नारायण क्षण न विसंबे ॥ ४ ॥
कलियुगीं नामा सत्य पैं साकार । न कळे तो पार ब्रह्मादिकां ॥ ५ ॥
चहूंयुगीं नामा वेगळा नाहीं जाला । म्हणवुनी पुरला नारायण ॥ ६ ॥
विष्णुदास नामा केशवीं रंगला । देव आत्मा जाला म्हणे परसा ॥ ७ ॥

---

१ रामे परमपुरुषें

[२४]

अणुमाजीं राम रेणुमाजीं राम । तृणकाष्टीं राम वर्ततसे ॥ १ ॥
बाहेरीं भीतरीं राम चराचरीं । विश्वीं विश्वाकारीं वर्ततसे ॥ २ ॥
रामेंविण स्थळ रितेंचि पैं नाहीं । वर्ते सर्वांठायीं रामींराम ॥ ३ ॥
परसा भागवत कायावाचामनें । श्रीरामावांचून अन्य नेणें ॥ ४ ॥

[२५]

इंद्रनीळ तनु प्रसन्न वदन । दशन दीप्ति जाण हीरयाचे ॥ १ ॥
अडोनिया सरा पाहूं या गोपाळ । डोळियां सुकाळ होईल आजी ॥ २ ॥
कंठीं वैजयंती नयन पुंजाळती । आरत्या ओवाळीती गोपबाळा ॥ ३ ॥
काळासी अटक योगियाचें हीत । परसा भागवत जवळी उभा ॥ ४ ॥

नाराचे अभंग

[२६]

देवा माझें मीपण ठेवीं आपुले चरणीं । घालीं माझे मनीं रूप तुझें ॥ १ ॥
मग मी लोकाचारी असेन वर्तता । राहीन चिंतिता चरण तुझे ॥ २ ॥
चंदनाची वृत्ति वेधले तरुवर । सबाह्य अभ्यंतर काय जालें ॥ ३ ॥
सरिता सिंधूसी मिळोनि हरपली । सागरची जाली एकसरें ॥ ४ ॥
लवण जळाचे प्रवृत्ति जसे । ऐक्यभावें न दिसे वेगळें कांहीं ॥ ५ ॥
नारा म्हणे शरण आलों केशिराजा । ऐसा भाव माझा करी गा वेगीं ॥ ६ ॥

[२७]

तुज मी अनन्य शरण । सर्व पांडुरंगा जाण ॥ १ ॥
माता बाळा कोपे रागें । द्यावें आहारातें मागे ॥ २ ॥
जाय कडीयेसी नेघे । परी तिच्या अंगसंगें ॥ ३ ॥
ह्मणे खटी परतें लोटी । परि सदा पायीं मिठी ॥ ४ ॥
नारा म्हणे नामयाचा । बापा सांभाळावी वाचा ॥ ५ ॥

[२८]

तुज भांडवल मोक्ष एक गांठीं । तो केला पावन तुझ्या नामें ॥ १ ॥
आतां गौप्य काय आहे तुझ्यापाशीं । जें तूं मज देशी पांडुरंगा ॥ २ ॥

अनुक्रमणिका

चतुर्विध मुक्ति दृष्टि वोळंगती । ध्यातां तुझे चित्तीं चरणकमळ ॥ ३ ॥
आणिका ऋद्धि सिद्धि दाखविसी आस । या दासीचा अभिलाष कोण करी ॥ ४ ॥
भूतळीचें वैभव निजकर्मभोग । तें तुज उद्वेग करणें बहू ॥ ५ ॥
नारा म्हणे नाम्यानें सांगितलें बीज । तेंचि मजसी गुज बोल कांहीं ॥ ६ ॥

[२९]

मी आहे तेथें मग तूं कइंचा । हा उपजत ठाइचा तोडी वेळ ॥ १ ॥
अपुला करोनि ठेवीं तुझ्या चरणीं । न मानिती कोणी क्षिती नाहीं ॥ २ ॥
सेवासुख देईं हेंचि दुजेपण । येर तो अभिमान खंडी माझा ॥ ३ ॥
[1]नारा म्हणे अससी माझिया जिव्हाळा । सुखरूपा विठ्ठला केशीराजा ॥ ४ ॥

[३०]

तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें । बहु जन्म वियोगें शिणलों होतों ॥ १ ॥
उठवितां येथुनी मुरकुंडी घालीं । कृपेची साउलि देखुनी तुझी ॥ २ ॥
आहाळले पोळले तापत्रय विराले । तृष्णा विभांडिले नानापरी ॥ ३ ॥
कामक्रोध मदमत्सर अहंकार । देह निरंतर जाजावलें ॥ ४ ॥
बुडतीया जरी अवचितां सांगडी । तें जीवें न सोडी तैसें जालें ॥ ५ ॥
विनवी नामयाचा विष्णुदास नारा । वंशपरंपरा दास तुझा ॥ ६ ॥

[३१]

माझ्या विठोबाचें श्रीमुख साजिरें । झळकतीं कुंडलें मनोहर ॥ १ ॥
मना तें तूं आठवी आसनीं शयनीं । भोगिसी उन्मनी सहज सुख ॥ २ ॥
गगनीं असो पैं न येतो मार्तंड । तैसें अखंडू करूं ध्यान ॥ ३ ॥
कमलकळीके जैसा भ्रमरे आसक्त । तैसा तूं निश्चित राहें चरणीं ॥ ४ ॥
जैसा कां समंधु जीवन [2]जळचरें । येणेंचि निर्धारें दृढ धरी ॥ ५ ॥
[3]नारा म्हणे माझ्या बापाचें साधन । सांपडली खूण अंतरींची ॥ ६ ॥

१ नामा म्हणे देवा आवडसि माझ्या जीवा । सुखरूप केशवा वीठल राजा ॥ (पं.)
२ जळधरा (पं.) ३ नामा (शि. व पं.)

[ ३२ ]

तापत्रय तापले देहे असे पीडिलें । वासना विभांडिलें मन माझें ॥ १ ॥
विठोबा वेगळें न देखें मी सुख । पाहेन तुझें मुख एक वेळ ॥ २ ॥
सुखाची [1]साउली पाहीन दृष्टीभरी । जाईन महाद्वारीं लोटांगणीं ॥ ३ ॥
हारला शीणभाग जन्मजन्मांतरींचा । नारा नामयाचा शरणागत ॥ ४ ॥

[ ३३ ]

पुंडलिकाद्वारीं होतसे वेव्हार । नामयाचीं पोरें भांडताती ॥ १ ॥
येऊनियां चौघे उभे ठेले सत्वर । बोलताती पोरें नामयाचीं ॥ २ ॥
आमुचा अंकीं लागताती पुराणीं । नामयाचे ऋणीं बांघलासी ॥ ३ ॥
नामयाचा नारा बैसलासे दारीं । विठोबावरी आळ आला ॥ ४ ॥

[ ३४ ]

कैंचें आम्हां जाति कुळ । कैंचें आम्ही धर्मशीळ ॥ १ ॥
तुझ्या नामीं अनुसरलों । तिहीं लोकीं सरते जालों ॥ २ ॥
नारा विनवी विष्णुदास । आमुचे वंशीं हा विश्वास ॥ ३ ॥

[ ३५ ]

आम्हां व्रत एकादशी । देव केशव तीर्थ तुळशी ॥ १ ॥
अणिक नेणों बा साधन । [2]आमचा विषय हरिकीर्तन ॥ २ ॥
संत संगती निरंतर । प्रेमधन हें भांडार ॥ ३ ॥
[3]विनवी विष्णुदास नारा । आमची ऐसी परंपरा ॥ ४ ॥

[ ३६ ]

कोटी यज्ञांचीं हीं फळें । त्याहुनी हरिनाम आगळें ॥ १ ॥
तें फळ वेगळें सांगावया । नाहीं उपमा द्यावया ॥ २ ॥
महापातकांचिया राशी । नामें पावती मोक्षासी ॥ ३ ॥

---

१ माऊली (पं.) २ आमुचे वोंसी (घु.) ३ म्हणे विष्णुदास नामा। (घु.)

अनुक्रमणिका

दोन अक्षरांसाठीं । गणिका घातली वैकुंठीं ॥ ४ ॥
हरिनामाचा संग्रह करा । म्हणे विष्णुदास नारा ॥ ५ ॥

[ ३७ ]

काळा अलोट अभंग । हरिचे दास अंतरंग ॥ १ ॥
हाकारिती वेळोवेळां । कृष्णा गोविंदा गोपाळा ॥ २ ॥
कंठीं तुळशीच्या माळा । नेत्रीं अश्रूंचिया किळा ॥ ३ ॥
गुढिया झळकती रोमांकुरीं । कंप न धरेचि शरीरीं ॥ ४ ॥
आंतु बाहेरी निरंतरी । मागा पुढां अवघा हरि ॥ ५ ॥
संतचरणींचा रजकण । नारा नामयाचा प्राण ॥ ६ ॥

[ ३८ ]

सुखदुःखा भेटों गेलें । चित्त चैतन्या मिळालें ॥ १ ॥
आला अनुभव नामाचा । ठेवा लाधला प्रेमाचा ॥ २ ॥
जन्ममरणाची काळजी । तुटोनी गेली तये वेळीं ॥ ३ ॥
सरले संकल्प विकल्प । हृदयीं देखिलें विठ्ठलरूप ॥ ४ ॥
शून्य जाले भावाभाव । अवघा आतुडला केशव ॥ ५ ॥
नारा म्हणे नामयाचा । मज विश्वास नामाचा ॥ ६ ॥

गोंदाचे अभंग

[ ३९ ]

नैवेद्याचा नेम असे दामाजीसी । नित्य विठ्ठलासी न्यावें बोणें ॥ १ ॥
बोणें दाखवावें मग अन्न घ्यावें । ऐसा तो सद्‌भाव त्याचे मनीं ॥ २ ॥
ऐसें करितां दिन कांहीं क्रमियेले । दामाजी चालिले ग्रामांतरा ॥ ३ ॥
दामाशेटी काय म्हणे गोणाईसी । नित्य विठोबासी न्यावें बोणें ॥ ४ ॥
गोणाई बोलिली सांगा नामदेवा । करील तो सेवा विठ्ठलाची ॥ ५ ॥
दामाजीनें पुत्र बोलाविला नामा । करी मेघःश्यामा सेवा नित्य ॥ ६ ॥
नित्यानित्य न्यावें विठोबासी बोणें । मग अन्न घेणें आज्ञा केली ॥ ७ ॥
अवश्य म्हणोनि लागला चरणासी । धरिलें पोटासी नामदेवा ॥ ८ ॥
नामदेवा हातीं समर्पिलें बोणें । गेला तो तेथुनी गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४०]

नामदेवा कैसा हा रे नफा केला । नैवेद्य तो नेला विठ्ठलासी ॥ १ ॥
नैवेद्य नेऊनि ठेवियेला पुढें । प्रेमें बोले गोड नामदेव ॥ २ ॥
नामदेव म्हणे जेवावें विठ्ठला । माथा ठेवियेला चरणांवरी ॥ ३ ॥
नामदेव माथा ठेवी चरणांवरी । न जेवीच परी पांडुरंग ॥ ४ ॥
न जेवी म्हणोनी नामा शोक करी । मुख पाहे हरि प्रीति करोनि ॥ ५ ॥
नेमें नामा काय म्हणे विठ्ठलासी । कां रे न जेविसी मायबापा ॥ ६ ॥
माझे पितयाचे हातें तूं जेविसी । मज दुजें पाहसी पांडुरंगा ॥ ७ ॥
घरासी मी आतां बोणें नेऊं काई । मारील गोणाई भज आतां ॥ ८ ॥
काय करूं आतां देवा हो श्रीहरी । नामा विनंती करी गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४१]

विनवितो देवा बहुत प्रकारीं । जेवावें श्रीहरी मायबापा ॥ १ ॥
दोनी कर जोडोनी घालीं लोटांगण । द्या जीवदान देवराया ॥ २ ॥
अझुनी न ये तुज बा करुणा । काय नारायणा करूं आतां ॥ ३ ॥
मारील गोणाई घेईल माझा जीव । काय तरी कींव न ये माझी ॥ ४ ॥
काय करूं आतां विठ्ठल रुक्माई । मारील गोणाई मजलागीं ॥ ५ ॥
न ये तुज कांहीं कींव माझी पाहीं । वाहीन आतां पायीं शिरकमळ ॥ ६ ॥
वाहीन शिरकमळ म्हणे नामदेव । धरिला सद्भाव ऐसा मनीं ॥ ७ ॥
देहत्याग त्यानें मांडिला शरिरीं । फांसा करूनी दोरी लावियेली ॥ ८ ॥
गळां घालोनि फांस बांधिला काष्ठांसी । त्यागितां प्राणासी धरिलें देवें ॥ ९ ॥
उठविला नामा पांडुरंगें करीं । आलिंगी श्रीहरी गोंदा म्हणे ॥ १० ॥

[४२]

आलिंगिला नामा हृदयीं विठ्ठलें । ताट विस्तारिलें रुक्माईनें ॥ १ ॥
विठ्ठल रुक्माई तिसरा नामदेव । जेवियेले भावें तिघेजण ॥ २ ॥
जेवूनियां त्यांनीं विडा तो घेतला । नामा सुखी केला पांडुरंगें ॥ ३ ॥
देव त्यास म्हणे जाहलों समाधान । घाली लोटांगण नामदेव ॥ ४ ॥
मनोरथ माझा पुरविला देवा । नित्य ऐसी सेवा घडवावी ॥ ५ ॥

ऐसी मज भाक देई नारायणा । करावी वासना तृप्त माझी ॥ ६ ॥
विठ्ठलानें भाक दिली नामयासी । नित्य सेवा ऐसी दिधली तुज ॥ ७ ॥
ऐसें भाष्यवचन करोनी देवासी । लागला चरणांसी नामदेव ॥ ८ ॥
आज्ञा घेऊनियां नामा तो चालिला । मंदिरासी आला गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४३]

नामा आला घरा पुसत गोणाई । उशीर कां पाही लावियेला ॥ १ ॥
ताट जो पाहिलें रिकामें देखिलें । बोणें काय केलें पुसतसे ॥ २ ॥
नामा म्हणे बोणें देव जेवियेला । म्हणोनि लागला उशीर मज ॥ ३ ॥
बोणें कोठें देव जेविता देखिला । त्वां दिलें पोराला नामदेवा ॥ ४ ॥
ऐसें नित्य बोणें देशी तूं पोरासी । सोंग घेऊन येसी मजपाशीं ॥ ५ ॥
काढुनी चराट नामा टांगियेला । बहुत ताडिला गोणाईनें ॥ ६ ॥
रागें रागें त्याला अधिक अधिक मारी । मिळोनी शेजारीं सोडविला ॥ ७ ॥
आण वाहे नामा म्हणे गोणाईसी । जेविले हृषिकेशी पांडुरंग ॥ ८ ॥
नको मारूं आई दिलें नाहीं कोणा । लागत करणा गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४४]

नामयाचा नेम पाहों आदरिला । मत्तामध्यें केला नेम तिनें ॥ १ ॥
मनामध्यें म्हणे आणिक द्यावें बोणें । पहावी हे खूण कैसी आहे ॥ २ ॥
एके दिवशीं बोणें दिल्हें नाम्यापाशीं । न्यावें हें देवासी म्हणे माय ॥ ३ ॥
नामा म्हणे आई जेवील हृषिकेशी । आणिक मारिसी मज काय ॥ ४ ॥
न मारि म्हणोनि बोलिली गोणाई । माथा ठेवूनि पायीं चालियेला ॥ ५ ॥
नैवेद्य घेऊनि गेला विठूपासीं । बैसले सुखेंसी तिघेजणें ॥ ६ ॥
तिघेजणें एके ठायीं ते जेविलीं । गोणाई अवचित आली तेथें ॥ ७ ॥
कवाडा आडुनी पहात गोणाई । तिघे एकेठायीं जेविताती ॥ ८ ॥
जेवितां देखिलें आली ते घरासी । साक्ष आली तिसी गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४५]

साक्ष आल्यावरी कष्टी जाहली मनीं । मारिलें पापिणी नामयासी ॥ १ ॥
मारिलें म्हणोनि महा शोक करीत । जेवूनियां घरीं आला नामा ॥ २ ॥

अनुक्रमणिका

नामा आला घरा पाहे मातेकडे । आनंदानें रडे गोणाबाई ॥ ३ ॥
नामा विनवित दोन्ही कर जोडोनि । लागला चरणीं गोणाईच्या ॥ ४ ॥
नामा म्हणे माते कां शोक करिसी । सांग मजपाशीं काय जाहलें ॥ ५ ॥
माता म्हणे आतां काय सांगूं नाम्या । साक्ष माझ्या मना आली आजी ॥ ६ ॥
कवाडा आडून देखियेलें आम्हीं । जेवियेलां तुम्हीं तिघेजण ॥ ७ ॥
व्यर्थ मी मारिलें केला जाच तुज । ऐसा भक्तराज गांजियेला ॥ ८ ॥
आतां मज देव कोपेल विठ्ठले । ऐसें माता बोले गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४६]

नामयाची माता काय म्हणे देवा । मज तूं केशवा कोपूं नको ॥ १ ॥
मज कोपूं नको देवा पांडुरंगा । गोणाई गोविन्दा विनवीतसे ॥ २ ॥
न कळतां देवा मारिला मी नामा । मज क्षमा करा मायबापा ॥ ३ ॥
सर्वस्वीं मी अपराधी पंढरीच्या राया । नाम्याविषयीं दया असों द्यावी ॥ ४ ॥
घातलें तयासी तिनें लोटांगण । केलें समाधान विठ्ठलानें ॥ ५ ॥
नामा आलिंगिला हृदयीं मातेनें । जोडला सज्जन देव तुज ॥ ६ ॥
तुज हा जोडला पंढरीचा राव । जाहला बरवा ठाव नामदेवा ॥ ७ ॥
बहुत पूर्वपुण्य होतें तुझे गांठीं । पडली हे मिठी विठ्ठलासी ॥ ८ ॥
नामा विठ्ठलासी नाहीं द्वैतपण । धरीत चरण गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४७]

विठ्ठल रुक्माई भक्त नामदेव । नित्यानित्य सद्‌भावें जेवितसे ॥ १ ॥
सेवा करितां बहु दिवस क्रमियेले । नागवन आले फार दिवसें ॥ २ ॥
कांहीं नाहीं द्रव्य आणि धन । राजाई ते म्हणे गोणाईसी ॥ ३ ॥
काय खावें आतां असो कोणे परी । लाविले दारोदारीं विठ्ठलानें ॥ ४ ॥
उपवास सोसूं आतां दिवस किती । घालूं या पोरास काय आतां ॥ ५ ॥
विठ्ठलानें कांहीं बरें नाहीं केलें । नाम्या वेडें केलें पांडुरंगें ॥ ६ ॥
वेडें करूनि आम्हां जाच तूं करिसी । पोट मारविसी मायबापा ॥ ७ ॥
किती दुःख सोसूं आतां या शरीरीं । करीन निर्धारीं जीवघात ॥ ८ ॥
चौपोरांसहित घालीन भीमे उडी । लागेन पैलथडी गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४८]

दोघेजण बाळ नारा म्हादा तान्हे । बांधियेलें तिनें मागें पुढें ॥ १ ॥
उडी .ते घातली भींवरेचे डोहीं । आला लवलाहि पांडुरंग ॥ २ ॥
येऊनी शिरला भींवरेचे डोहीं । ओढोनी राजाई ठेवी कांठीं ॥ ३ ॥
पाहें तों राजाई कांठीं उभी आहे । क्रोधें बोलताहे विठ्ठलासी ॥ ४ ॥
क्रोधें म्हणे देवा कांरे जाचितोसि । लल्लाट महिशी आपटिलें ॥ ५ ॥
क्रोधें ते आणिक टाकियेली उडी । नेली पैलथडी विठ्ठलानें ॥ ६ ॥
मग ते राजाई चालिली घरासी । देखिला वाटेसी मेला सर्प ॥ ७ ॥
सर्प तो घेऊनी वेगीं आली घरासी । ठेवी शिजावयासी चुलीवरी ॥ ८ ॥
सर्प हा शिजला खाऊं पांचजणें । केला विचार तिनें गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[४९]

शिजला तो सर्प काढिलें झांकण । पाहे तो सुवर्ण तोंडावरी ॥ १ ॥
सुवर्ण देखोनि सुखी जाहली मनीं । बाई हरिखोनी सांगे नाम्या ॥ २ ॥
सांगितलें वर्तमान नाम्यापाशीं । नामा म्हणे तिसी पाहूं सोनें ॥ ३ ॥
सुवर्ण आणूनि ठेविलें पुढें । काय केलें वेडे नामा म्हणे ॥ ४ ॥
कशासाठीं माझ्या स्वामिसी पीडिलें । कां गे कष्टी केलें देवराया ॥ ५ ॥
मेळविले द्विज तया नामयानें । वांटियलें सोनें ब्राह्मणांसी ॥ ६ ॥
तेव्हां राजाईनें आकांत मांडिला । नामा वेडा केला पांडुरंगें ॥ ७ ॥
सुवर्णासारखी वस्तु ते वांटिली । भूली ते घातली नामयासी ॥ ८ ॥
नामदेवा तिनें बहु जाच केला । कृपाळु पावला गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[५०]

जाच केला म्हणोनि चालिला श्रीहरी । भक्तांचा कैवारी पांडुरंग ॥ १ ॥
पंढरीचा वाणी जाला केशवशेट । लावियेली मूठ ढवळा नंदी ॥ २ ॥
वराईची गोणी घालून त्यावरी । आणून नाम्याघरीं उतरली ॥ ३ ॥
पुसतां तो नामा गेला अंघोळीसी । सांगे राजाईसी केशवशेट ॥ ४ ॥
धनाची हे गोणी वेंचा तुम्ही घरीं । सांगा बहुतापरी नामयासी ॥ ५ ॥

नामदेव माझा मित्र आहे सगा । केशवशेटी सांगा दिल्ही गोणी ॥ ६ ॥
वचन सांगोनी केशवशेट गेला । नामदेव आला मंदिरासी ॥ ७ ॥
येऊनी पुसत कवणाची गोणी । तुमचा मित्र वाणी केशवशेट ॥ ८ ॥
नामा पाहे तंव वराईची गोणी । दु:खी जाहला मनीं गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[५१]

वराईची गोणी कळली राजाईसी । नामा ब्राह्मणासी बोलावीत ॥ १ ॥
इतुक्यामध्यें होन मडकेंभर काढिले । गोणी ते शिविली होती तैसी ॥ २ ॥
द्विज मिळवुनि आला नामदेव । वांटियेलें सर्व द्रव्य त्यानें ॥ ३ ॥
नामा म्हणे द्रव्य ज्याचें त्या दिधलें । ऋण तें ठेविलें नाहीं कांहीं ॥ ४ ॥
राजाई ते होन सांभाळाया गेली । हातां राख आली कोळशाची ॥ ५ ॥
कोळसे देखोनि खोंचली ते मनीं । धन्य तुझी करणी पांडुरंगा ॥ ६ ॥
नामदेवापुढें सांगे वर्तमान । चोरोनियां होन म्यां ठेविले होते ॥ ७ ॥
पाहतां त्या होनाचे जाहले कोळसे । नामा पाहतसे जालें सोनें ॥ ८ ॥
वांटिलें ब्राह्मणा तेही होन त्यानें । फेडियलें ऋण गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[५२]

राजाईचा संशय फेडिला मनींचा । कळला पूर्ण साचा पांडुरंग ॥ १ ॥
भावें ते राजाई म्हणे नामदेवा । सज्जन हा ठावा पांडुरंग ॥ २ ॥
विठ्ठलावांचुनी आणिक नाहीं थोर । धरिला निर्धार राजाईनें ॥ ३ ॥
विकल्प सांडुनी मन केलें शुद्ध । धरिला गोविंद मनामाजीं ॥ ४ ॥
नामा राजाई जाहला एकभाव । लावियेला जीव विठ्ठलपायीं ॥ ५ ॥
नारा विठा गोंदा माहादा आउबाई । त्यांनीं धरिला पायीं पांडुरंग ॥ ६ ॥
नामयाची दासी नागी दुसरी जनी । त्यांनीं सेवा करूनि केला देव ॥ ७ ॥
एकभाव पहा लाविला विठ्ठला । त्यांनीं जवळ केला पांडुरंग ॥ ८ ॥
विठ्ठलावांचोनी दुजें नाहीं मनीं । गेले लोटांगणीं देवराया ॥ ९ ॥

अनुक्रमणिका

ऐसा त्याचा भाव कळला देवासी । सकळ वैकुंठासी पाठविले ॥ १० ॥
अंतकाळीं नामा धरिला हृदयीं । ठेवियेला पायीं गोंदा म्हणे ॥ ११ ॥

[५३]

ऐसा नामा भक्त पूर्ण केली सेवा । उद्धरिलें जीवा संगतीच्या ॥ १ ॥
आवडला नामा देवा विठ्ठलासी । ठेवी चरणापासीं अखंडित ॥ २ ॥
नामयाची कुडी घातली पायरी । येतां जातां हरी पाय देती ॥ ३ ॥
आणिकहि पाय देती साधुसंत । ऐसा पूर्ण भक्त उद्धरिला ॥ ४ ॥
न सोडी विठ्ठल नामयासी घडी । बहु त्याची गोडी विठ्ठलासी ॥ ५ ॥
गोडी हे म्हणोनि ठेविलें चरणीं । आहे तो भजनीं नामदेव ॥ ६ ॥
ऐसा पांडुरंग भक्तांची माउली । करितो साउली मायबाप ॥ ७ ॥
नरदेहा आलिया भजावा हा देव । मनीं दुजाभाव धरूं नये ॥ ८ ॥
भजावें भजन नामयाचे परी । होय साहाकारी गोंदा म्हणे ॥ ९ ॥

[५४]

भावें भक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥
निष्कामें करावें देवाचें कीर्तन । भय हें सांडून शरीरांचें ॥ २ ॥
रणामध्यें कैसा भिडतो रणशूर । होवोनी उदार जीवावरी ॥ ३ ॥
तैसा पांडुरंगीं धरा हो निर्धार । उतरा हा पार भवसिंधू ॥ ४ ॥
सिंधु उतरोनी लावा जगढाल । पाहा तें नवल विठ्ठलाचें ॥ ५ ॥
देव जोडियेला तया काय उणें । गोंदा म्हणे मन धीट करा ॥ ६ ॥

[५५]

साठी नव लक्ष चौऱ्याण्णव कोटी । बापाची हे जोडी देई देवा ॥ १ ॥
जमान देउनी नाहींसें तूं करी । वायां येरझारीं शिणवितोसी ॥ २ ॥
आमुचे जमान देवा तुमचे पाये । तुझा कोठें आहे जमान सांगें ॥ ३ ॥
नामयाचा गोंदा बळकट धरितां जाला । विठोबा आणिला चौबारांत ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

[५६]

सेज सिद्ध जाली निजा श्रीधरा । आज्ञा द्यावी लोकां जाती आपुल्या घरा ॥ १ ॥

रात्र बहुत जाहाली देवा चला मंदिरा । राहिरखुमाबाई वाट पाहाती सुंदरा ॥ २ ॥

तुम्हांसमोरास देवा जाली पंढरी विनटला चरणीं गोंता उभा राहिला द्वारीं ॥ ३ ॥

## विठाचे अभंग

### निजठेवाप्राप्तीविषयी धरणं

[५७]

साधुसंतजना करितों प्रार्थना । भेटवा [1]देवराणा द्वारकेचा ॥ १ ॥

तनमनप्राण वेधले त्याचे पायीं । येऊनियां राहीं हृदयकमळीं ॥ २ ॥

गोपाळाचे मेळीं खेळे वनमाळी । यमुने पाबळीं वेणु वाहे ॥ ३ ॥

शंख चक्र करीं मोरपिच्छ शिरीं । कानीं मकराकारी मुक्ताफळें ॥ ४ ॥

गळां वनमाळा कासे सोनसळा । देखुनि व्रजबाळा तन्मय जाल्या ॥ ५ ॥

नंदाचे नंदनें मोहियेलें मन । लागलेसें ध्यान गोविंदाचें ॥ ६ ॥

विठा नामयाच्या चरणींचा रज । भेटवा यादवराज द्वारकेचा ॥ ७ ॥

[५८]

मग साधुसंत म्हणती विठ्या जाय । मग तूं याचे पाय सोडूं नको ॥ १ ॥

अठ्ठाविस युगें एकाचें धरणें । तेथें हें मागणें दुसरें कोठें ॥ २ ॥

एकाची मागणि मागे पैं होईल । मग तुजशीं येईल बोलतां दुःख ॥ ३ ॥

म्हणोनि पंढरीनाथु खुणची दावीतु । नामयाचा विठा पुसतु वेन्हारीं धीटु ॥ ४ ॥

[५९]

विठा नामयाचा आला पंढरपुरा । भेटला सोयरा विटेवरी ॥ १ ॥

सुखदुःख अवघें सांगितलें श्रीहरी । धरणें तुझे द्वारीं घेईन देवा ॥ २ ॥

नामयासारिखा आणिक कोणी आहे । सृष्टीमाजी पाहे विचारूनी ॥ ३ ॥

नामा माझा सखा जिवाचा तो जीव । त्याचा आहे भाव माझे ठायीं ॥ ४ ॥

मजवांचुनि नामा दुजें नेणें कांहीं । मी त्याचे हृदयीं सदा असे ॥ ५ ॥

नामयानें नाम जोडिलें निधान । ठेविलें सर्व धन तुझ्या पायीं ॥ ६ ॥

समर्थासी कांहीं बोलूं नये आतां । ठेविणें कृपानाथा देई वेगीं ॥ ७ ॥

---

१ पंढरीराणा

चहुंयुगीं नामा सांगतोचि आहे । वेगळा कांहीं नोहे क्षणभरी ॥ ८ ॥
माझिया बापाची तुजजवळ ठेवी । विठा म्हणे द्यावी केशिराजा ॥ ९ ॥

[ ६० ]

पूर्व जन्मीं आराधितां । तुझें वर्म आलें आमुच्या हातां ॥
नामदेवें सांगितलें जातां । तें सर्वथा देईजे ॥ १ ॥
आमुचे वडिलीं गा जोडिलें । तें तुझे पायीं गा ठेविलें ॥
गौप्य करितां नोव्हे गा भलें । दे उगलें गा दातारा ॥ २ ॥
आमुचें आम्हांसी गा देतां । कां बा नये तुझ्या चित्ता ॥
गाऱ्हाणें देईन संतां । चौघां देखतां घेईन ॥ ३ ॥
तुझा दारवंटा राखेन हरी । तुज रीघों नेदी बाहेरी ॥
मोकलिसी अधांतरीं । हे लाज कवणातें ॥ ४ ॥
आणिक कांहीं न मागें तूतें । सेवावृत्ती द्यावी मातें ॥
मज निरवावें संतातें । आपुला दास म्हणोन ॥ ५ ॥
नामयाचा विठा म्हणे । यांत कांहीं करिसी उणें ॥
तरी आमुच्या वडिलांचें निरूपणें । बांधलासी गा विठ्ठला ॥ ६ ॥

[ ६१ ]

आमुचा नामा तुज गेला निरवुनी । मी तुजवांचोनी नेणें कवण ॥ १ ॥
कायावाचामनें जोडिलें जें बापें । तें दिधलें तुज पैं ठेवावया ॥ २ ॥
तें देगा आमुचें नको करूं विचारू । नामा तुझा डिंगरू त्याचे आम्ही ॥ ३ ॥
जुनें नाणें आमुच्या वडिलाचें ठेवणें । बहुता कष्टी तेणें जोडियेलें ॥ ४ ॥
तें आम्हालागोनी ठेविलें तुझ्या पायीं । आमुचें आम्हां देई केशीराजा ॥ ५ ॥
तूं अनाथ कोंवसा दीनाचा कृपाळू । तरी आमुचा सांभाळू करी गा वेगें ॥ ६ ॥
आमुचे संचितार्थ आम्हासी देउनी । यश घे त्रिभुवनीं म्हणे विठा ॥ ७ ॥

[ ६२ ]

आमुचे ठेवणें जुगादीचें नाणें । जातां नामयानें सांगितलें ॥ १ ॥
इतके दिवस पाहिली तुझी वाट । परी तूं उदास न बोलसी ॥ २ ॥
तुजवांचोनि आम्हां कोण असे पोशिता । देई कृपावंता नाम प्रेम ॥ ३ ॥

आम्ही तुझीं सेवकें रंकाहुनी रंक । कठीण बोलणें निकें वदें तुज ॥ ४ ॥
म्हणोनि वेळोवेळां लागे तुझ्या पायीं । लटकीच गोवाई करूं नको ॥ ५ ॥
तुज आम्हांसी वेगळीक नाहीं । तरी तूं न धरी कांहीं दुजाभाव ॥ ६ ॥
आपुलें म्हणावें अंधारीं ओळखावें । नामप्रेम द्यावें म्हणे विठा ॥ ७ ॥

[ ६३ ]

हरिनामाचा ध्वनि ऐकोनी श्रवणीं । जाईन लोटांगणीं तेथवरी ॥ १ ॥
माझे सखे अवघे वैष्णवजन । त्याचें मज दर्शन कैं होईल ॥ २ ॥
एक उभे गाती एक बैसुनी ऐकती । हृदयीं आलिंगिती गोपीनाथु ॥ ३ ॥
ऐशियाचे संगतीं आहे बाप माझा । विनविती विठा नामयाचा ॥ ४ ॥

[ ६४ ]

आमुचा बाप [1]अग्रेज तुझा । तूं बा आम्हां होसी आजा ॥ १ ॥
[2]कैसें आम्हां धरिलें दुरीं । सांग कृपाळुवा हरी ॥ २ ॥
तूं आमुचा मुळपुरुष । आम्ही अवघे तुझे अंश ॥ ३ ॥
आम्ही तुझी तिसरी पिढी । संत जाणताती प्रौढी ॥ ४ ॥
अरे कायशीं शतें लोटलीं । कैशी लाघावळी तुटती ॥ ५ ॥[3]
हांसोनी बोले केशीराज । विठ्या अवघें घेई मज ॥ ६ ॥

[ ६५ ]

माझिया बापाचा तुजपाशीं ठेवा । विठो म्हणे द्यावा केशीराजा ॥ १ ॥
ठेविलें ठेवणें झडकरी देई । वेव्हार कांहीं लावूं नको ॥ २ ॥
आपुलें मागतां कोण आड येईल । आतां जाणवेल तुझें माझें ॥ ३ ॥
विटेसहित चरणीं घालीन मिठी । करीन सवसाटी जन्मोजन्मीं ॥ ४ ॥
विठा म्हणे मज खवळिसी वायां । पिसाळलिया पायां झोंबेन तरी ॥ ५ ॥

[ ६६ ]

मायबापें काय नसती आमुचीं । लेंकरें [4]आमचीं त्याचे हातीं ॥ १ ॥
माझें देई माझ्या हातीं लवलाहीं । होई उतराई केशिराजा ॥ २ ॥

१ आत्मज (पं.) २ कांहो विठो धरीले दुरी (पं. व पा.) ३ काही प्रतींत हा चरण नाही.
४ मेल्याची जित्या (पं.)

तुझ्या पायीं माझा बांधीन गळा । न भियें कळिकाळा सत्य जाणा ॥ ३ ॥
जितुकें देणें तितुकें मी घेईन आतां । नामयानें जातां सांगितलें ॥ ४ ॥
रगटचा पाटोळ्यासी पडियेली मिठी । आतां जगजेठी तुज मज ॥ ५ ॥
बोरी काटे कांहो केळी आहो फाटे । नामयाचें विठें खवळलें ॥ ६ ॥

[ ६७ ]

खवळलों आतां न भियें रे तुज । मांडियेली लाज लौकिकाची ॥ १ ॥
आम्ही दीन शिंपे यातीचे हो हीन । दे माझें ठेवणें केशिराजा ॥ २ ॥
साठी लक्ष चौऱ्याण्णव कोटी । त्यांतून एक कवडी न सोडी मी ॥ ३ ॥
आणिक याहुनी असेल आगळें । ते घेईन बळें न सोडी तुज ॥ ४ ॥
तुज थोरपण काईगा हें देवा । आम्हां दुर्बळाचा ठेवा अभिलाषसी ॥ ५ ॥
पोरटीं म्हणोनि अभिलाष करिसी । तें कोठें निस्तरिसी म्हणे विठा ॥ ६ ॥

[ ६८ ]

तुज काय देवा न पुरतें आलें । विश्वासें ठेविलें अभिलाषेसी ॥ १ ॥
लाजिरवाणें नको करूं देवा आतां । देईगा कृपावंता नामप्रेम ॥ २ ॥
शरणागत वज्रपंजर म्हणवीसी । तरी कां तूं न देसी आम्हां आमुचें ॥ ३ ॥
माझ्या नामयानें जन्मोनि जोडिलें । तें दे गा वहिलें म्हणे विठा ॥ ४ ॥

[ ६९ ]

उदार चक्रवर्ती लक्ष्मीचा पती । तरी कां काकुळती चित्तीं वाहासी ॥ १ ॥
आम्हां दुर्बळांचें ठेवणें कां ठेविलें । दिवाळें निघालें काय तुझें ॥ २ ॥
ज्याचें घेसी त्याचें ऐसेंचि करिसी । तें न चले मजपाशीं केशिराजा ॥ ३ ॥
चौघाचारीं तुज वेढीन मी आतां । मग बैसेल माथां अपकीर्ती ॥ ४ ॥
आठराही बोलती साही सत्य वाचा । उदार ठायींचा कां न होसी ॥ ५ ॥
देणें घेणें तुज न सुटे सर्वथा । विचारूनि आतां पाहे मनीं ॥ ६ ॥
नामयाचें ठेवणें तुजजवळी आहे । न सोडी तुझे पाय म्हणे विठा ॥ ७ ॥

अनुक्रमणिका

[७०]

माझिया बापाची मिराशी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ १ ॥
उपास पारणें राखें दारवंटा । केला भोगवटा आम्हांलागीं ॥ २ ॥
तुजपुरतें दुजें नेणें आणिक कांहीं । देखें सर्वांठायीं रूप तुझें ॥ ३ ॥[1]
तुझ्या सुखें धाला तुजमाजीं निवाला । आपुल्या विसरला देहभाव ॥ ४ ॥
आम्हांसी घातलें तुझीये आभारीं । विठा अंगिकारी नारायणा ॥ ५ ॥

[७१]

हाटकरी आम्ही आठवडे मुळींचे । पंढरपुरीचे वारकरी ॥ १ ॥
खेप ठिकाणाची वस्तु सवंगाची । सवाई निढळाची उणीं नव्हे ॥ २ ॥
चोहाटा चौकाचें दुकान नाक्याचें । जागा मिराशीची पुरातन ॥ ३ ॥
हरिनाम घेणें नित्य हमेशाही । तेव्हां तोटा नाहीं कोणें काळीं ॥ ४ ॥
विठा म्हणे वजन केली वैकुंठीची । गुणीं निर्गुणींची कडासन ॥ ५ ॥

[७२]

माझिया बापासी तुझाचि विश्वास । म्हणवी तुझा दास अंतरंग ॥ १ ॥
वृत्तिसहित मन ठेवुनी तुझ्या पायीं । तुजपरतें कांहीं जाणेचिना ॥ २ ॥
तों आम्हांलागीं शब्दें न पुसंसी । विसरोनी गेलासी दीनानाथा ॥ ३ ॥
जागे ठाणांतरी पंढरी चोहोटा । राखे दारवंटा रात्रंदिवस ॥ ४ ॥
छत्र चवर धरूं हाडपी डोळे करूं । जाणवी आवसरू सेवा विधी ॥ ५ ॥
शरीर प्राणाचा देऊनियां बळी । धरिले हृदयकमळीं चरण तुझे ॥ ६ ॥
विठा म्हणे तुज नाहीं आठवण । सहज तूं निर्गुण पंढरिराया ॥ ७ ॥

[७३]

भूतळीचीं तीर्थें नामा जंव करी । गांजीयेलें पोरीं नामयाच्या ॥ १ ॥
तुमचें ठेवणें खेचराचे पायीं । आणिकाचे वाहीं पडों नका ॥ २ ॥

---

१ चरण ३ व ४ (पं.) प्रतीत नाहीत.
वंशपरंपरा अम्ही तुझे देवा । मोकली केशवा लाज कोणा ॥ ३ ॥
तुझ्या नामापरते अणिक नेणो काही । देखे सर्वाठाई रुप तुझे ॥ ४ ॥
सोडोनि सर्वसुख धरीले तुझेपाई । रात्रंदीवस ध्यान हृदयी तुझे ॥ ५ ॥ (पं.)



अनुक्रमणिका

वायां मृगजळ दाविसील आम्हां । सर्वथा पुरुषोत्तमा न सोडीं मी ॥ ३ ॥
झोंडाचें ठेवणें ठेवावें कवणें । झोंडापरिस होणें झोंड जेणें ॥ ४ ॥
नामयाचा [1]विठा झोंड पैं [2]जाला । विठो उभा केला भक्तिसुखें ॥ ५ ॥

[ ७४ ]

[3]माझा ठेवा दाखवीं लवलाही । बांधीन मी पायीं जीव तुझ्या ॥ १ ॥
सिद्धच ठेवणें नामयानें ठेविलें । त्यासी कां लाविलें आडवें हें ॥ २ ॥
दोहीं कटावरी ठेऊनियां हात । कैसा हा पहात घरघेणें ॥ ३ ॥
तुझिया पायासीं बांधीन मी गळा । न भीयें कळिकाळा सत्य जाण ॥ ४ ॥
[4]दारकोंड करोनि बैसेन दारवंटा । नामयाचा विठा हालों नेदी ॥ ५ ॥

[ ७५ ]

पंढरीराया माझिया बापें । प्रसन्न केलें तुज प्रतापें ॥ १ ॥
आम्हां दिलें तुझे हातीं । पाळीं म्हणे प्रेम भक्ती ॥ २ ॥
तृप्तिसहित माझिया मना । क्षेम घालीन तुझिया चरणा ॥ ३ ॥
तुझें गुणनाम कीर्तन । हें मज देईगा जीवदान ॥ ४ ॥
देऊनियां प्रेमाचें भातुकें । खेळविसी त्या कौतुकें ॥ ५ ॥
विठा म्हणे नामयाचा । प्रसाद तुझीये कृपेचा ॥ ६ ॥

[ ७६ ]

तुझ्या प्रेमाचे कारणें । म्हणे म्यां घेतलें धरणें ॥ १ ॥
विठोबा देई झडकरी । मी तर न सोडीं निर्धारीं ॥ २ ॥
[5]शीर फोडीन कवंती । न ये तुज काकुळती ॥ ३ ॥
देह घालीन गोरांजनीं । मोकलिसी मज लागोनी ॥ ४ ॥

---

१ गोंदा (पं.) २ जाहाला (पं.)
३ माझा बाचि ठेवि दाखवीं लवलाही । (पं.)
४ चोखामेळा बैसलासे दारवंठा । (पं.)
देइगा विठला देइगा विठ्ठला । देइगा विठ्ठला निलाजिऱ्या ॥ २ ॥
पुंडलिकाचे घेउनि जाणपण नेणे । तेणे घेतले धरणे हालो नेंदि ॥ ३ ॥
हे चरण (पं.) प्रतीमध्ये जास्त आहेत.
५ शरीर (पं.)

तुझे द्वारीं देईन प्राण । तरी तूं पाहासी निर्वाण ॥ ५ ॥
विठा म्हणे पंढरिराया । आम्हां शिणवूं नको वायां ॥ ६ ॥

[७७]

तुजसारिखा पंढरिनाथा । स्वामी शिरावरी असतां ॥ १ ॥
तरी मी आणिकांचा मागता । लाज कोणासी समर्था ॥ २ ॥
असोनी क्षीरसिंधू जवळी । क्षुधाक्रांत तळमळी ॥ ३ ॥
कामधेनुतें वोळगतां । न पुरे कामना सर्वथा ॥ ४ ॥
विठा म्हणे नारायणा । आतां शरण जाऊं कोणा ॥ ५ ॥

[७८]

जननी बाळका कोपे रागें । परि ते आहार तिसची मागे ॥ १ ॥
तैसा तुज मी शरण । पंढरिराया निरुता जाण ॥ २ ॥
खेती म्हणोनी परतें लोटी । परी ते चरणीं घाली मिठी ॥ ३ ॥
टाकोनि जाय कडीये नेघे । परि ते धांवे तियेचि मागें ॥ ४ ॥
विठा म्हणे पंढरिनाथा । आम्हां नुपेक्षीं सर्वथा ॥ ५ ॥

[७९]

हिंडता श्रमलों बहु श्रम जाला । अजूनि माझी तुला करुणा न ये ॥ १ ॥
मज काय देतां होईल तुझें उणें । किती होसी कृपण पांडुरंगा ॥ २ ॥
घेऊनी धरणें बैसलों महाद्वारीं । जालों पैं भिकारी पंढरीचा ॥ ३ ॥
विठा म्हणे देवा माझें मज देया । लौकिक वायां करितोसी ॥ ४ ॥

[८०]

जननी बाळकांचें जीवन । जरी तें नेणें भूकतहान ॥ १ ॥
तरी ते कशानें वांचती । विचारावें कमळापती ॥ २ ॥
वत्सांलागीं धेनु तान्हीं । लागूं नेदी आपुल्या स्तनीं ॥ ३ ॥
कूर्मी आपुलिया बाळा । नावलोकीं वेळोवेळां ॥ ४ ॥
[1]विठा म्हणे जगज्जीवना । आतां नुपेक्षावें दीना ॥ ५ ॥

---

१ कृपा आली पांडुरंगा । वीठा घेतला वो-संगा ॥ हा चरण (धु.) मध्ये जास्त आहे. काही प्रतींत हा चरण मिळत नाही.

[८१]

आमुचा बाप आम्हां सांगे । भाक दिधली पांडुरंगें ॥ १ ॥
'तुम्हां न विसंबें सर्वथा । तुमचा भार माझ्या माथां ॥ २ ॥
करीन तळहात सावळी । तुमची अवघी वंशावळी ॥ ३ ॥
विठा म्हणे विसरलासी । 'आम्हां शब्दीं न पुससी ॥ ४ ॥

[८२]

पितृभजन जरी पुंडलिक न करितां । तरी कां हा झोंड येता पंढरीसी ॥ १ ॥
वेव्हार करितां आम्हासी जिंकिलें । जन्म मरण केलें देशधडी ॥ २ ॥
विठा म्हणे यानें बुडविले अपार । पुढती हा चोर कबुल नाहीं ॥ ३ ॥

[८३]

माझे बापाचेनि धनें बडिवार बोलसी । ते तूं घेवोनी आलासी उजागरपणें ॥ १ ॥
उगलाचि देईं लावूं नको दावा । केशवासी ठावा आहे तुझा जीवभाव ॥ २ ॥
सरता पुरता आमुचेनि जालासी । तें तूं आणिका सांगसी कोण्या तोंडें ॥ ३ ॥
सांगतां बहुत होईल पैं व्याजें । मग सोई मज तुज लाविती कां ॥ ४ ॥
ते म्हणती ऋणबोडा हा ठायींचा । अहो यासी बोला वाचा बुद्धिवंती ॥ ५ ॥
तूं नामयाच्या विठया धीर आणि चतुर । तुजसी खेचर काय बोलिला ॥ ६ ॥

[८४]

उदमाचा करून झाडा । कर्म कदबा अवघा फाडा ॥ १ ॥
मग येणें जाणें नाहीं । पुढें वेव्हार न लगे कांहीं ॥ २ ॥
व्याज मुद्दल देऊन उजू । तिहीं लोकीं व्हावें रुजू ॥ ३ ॥
केशव म्हणे लिगाड तोडा । सुखसागर विठ्ठल जोडा ॥ ४ ॥

[८५]

निज आत्मज्ञान डोहीं । जे बुडोन गेले पाहीं ॥ १ ॥
तनु त्याग होतां त्याची । मग सगुणा भेटी कैंची ॥ २ ॥

१ करी यौग क्षेम चीत्ता । (पा.) २ फुकाचा तु न बोलसि ॥ (पं. व पा.)

अनुक्रमणिका

अहंभाव वांटून प्याले । ते जिवंतचि मुक्त जाले ॥ ३ ॥
केशव म्हणे डोळां । ते पाहावे वेळोवेळां ॥ ४ ॥

[८६]

तुझे पाय माझिया गळ्यासी । करीन एक मग उगलाची देसी ॥ १ ॥
आपुलें मागतां झणें धिक्कारिसी । चोरासी सांगसी निजगुज ॥ २ ॥
सांपडलीया लाथ बुक्की साहावी । जीवीं धूर धरावी विठो ऐसी ॥ ३ ॥
मग होणार तें हो या शरीरा । सांपडलीया धरा जीवें भावें ॥ ४ ॥
धुरेसी झगडा करावा सैरा । या रांडपोरां खवळसी काय ॥ ५ ॥
केशव म्हणे विठा झुंजार तूं भला । खेचरू दाखविला ठेवा तुझ्या बापाचा ॥ ६ ॥

[८७]

खेचरापासीं जाय पुससी मागसी तें आहे । येरा आणिका काय उमगेना ॥ १ ॥
जाय जाय वेगीं लवलाहे पाहें । खेचराचे पाय सोडूं नको ॥ २ ॥
तो सांगेल तें उगलेंच घेई । आणिकाचे वाहीं पडूं नको ॥ ३ ॥
केशव म्हणे नामयाच्या विठ्या भक्तराया । आलिंगुनी चहुं बाह्या दिधलें क्षेम ॥ ४ ॥

[८८]

तंव धांवुनि गेला चरणीं लागला । देवा तूं दाखविला ठेवा माझ्या मायबापाचा ॥ १ ॥
जाऊन तो धरीन न सोडी मी आतां । जे मज पंढरिनाथा ग्वाही दिधली ॥ २ ॥
तंव खेचरू तेथें स्नानसंध्या करी । तंव ओढोनी पाय धरी विठा नामयाचा ॥ ३ ॥
तंव तो अवचिता खडबडोनी भ्याला । कोठोनी घोला पडिला धाडी मजवरी ॥ ४ ॥
उठी परतां तूं कोणाचारे काय । ठाई ठाई राहें हालूं नको ॥ ५ ॥
तुझिया वडिलासी जाब देईन । धरोनी नेईन हें पोरं कोणाचें ॥ ६ ॥
लाडिके लडिवाळ आपुलें बा धांवे पायीं । तुज कोणी नाहीं मग तूं निलाजिरे ॥ ७ ॥
छंद ना बंद झोंबतोची धीटा । बांधे न चोहटा चौघांचारी ॥ ८ ॥
फजीत करतील तुज कीं मज जाण ।
खेचर विसोबा म्हणती जा तुज विठोबाची आण ॥ ९ ॥

[८९]

केशवाचे पाय जाणें मी आणिक कांहीं नेणें । म्हणोनि जीव प्राण अनुसरलों ॥ १ ॥
पाय ते अतू पाय ते अतू । पाय ते अतू खेचराचे ॥ २ ॥
पायापरते सुख आणिक नाहीं । विटेवरी पाय ध्येई मज ॥ ३ ॥
म्हणोनी पुढतां पुढती विठा लागे पायीं । म्हणे खेचर आई विनंती ऐका ॥ ४ ॥

[९०]

चराचरीं जाणा एक खेचरू । त्याचीं पाउलें साचारू धरिलीं आम्हीं ॥ १ ॥
आतां पाउलें न सोडूं । पाउलें न सोडूं वेव्हारू विठा ॥ २ ॥
या पाऊलाकारणें व्यवहारू जाला । खेचर वदला विठ्ठल साक्ष ॥ ३ ॥
तेचि पाऊलें साधुसंत आम्हां । विठा म्हणे परब्रह्मा पावन केलें ॥ ४ ॥

[९१]

तंव खेचरु ऐसी शिकवण बोली । कैसी खूण लाधली सांग विठ्या ॥ १ ॥
जयाचा तुज जाहला बहूत । तो जाला शरणागत विठोबासी ॥ २ ॥
वेद पुराणें शास्त्रें ते साक्ष देती । जें खेचर म्हणती ब्रह्मबीज ॥ ३ ॥
भारत आणि भागवत जया मुखें पाठ । संध्या गायत्री निष्ठा त्रिकाळ जप ॥ ४ ॥
जे केशवासी न कळे अखंड दंडे । ऐसीं बोलणीं उदंडें बोलोनी जाती ॥ ५ ॥
जाती आणि गोत वडील लहान थोर । अवघें पंढरपूर साक्ष देती ॥ ६ ॥
साधुसंतजन आणि महानुभाव । हरीचे दास सर्व सांगताती ॥ ७ ॥
जें खेचर विसोबा ज्ञानधन लाधला । ठेवा तो दिधला नामयासी ॥ ८ ॥

[९२]

सुखाचा निज ठेवा तुमचा केशवा । भाग्यें नामदेवा जोडलासी ॥ १ ॥
तेणें तुझी सेवा केली मनोभावें । म्हणोनियां देवें घेतली धांव ॥ २ ॥
उदंड हें निधान निक्षेपें ठेविलें । थोडें बहूत दिधलें भाग्यवंता ॥ ३ ॥
अभिलाषी वस्तु तुझे पायीं ठेविली । ते आम्हा उगवली म्हणे विठा ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

[९३]

माझा बाप माय विठोबा रखुमाई । वडील बंधु भाई पुंडलिक ॥ १ ॥
साधुसंत जन सोईरे हे जाण । वंदीन चरण भावें त्यांचे ॥ २ ॥
निजाचे सोईरे कां गा नोळखीसी । भ्रमें भुललासी मायाजाळीं ॥ ३ ॥
पाळिलों पोसिलों जन्मोनी जयाचा । उतराई त्याचा काई होऊं ॥ ४ ॥
पाहेपा परतोनी मुळिंचा तूं कोण । सद्‌गुरुशीं शरण रिघें वेगीं ॥ ५ ॥
सद्‌गुरु दयाळें लेवविलें अंजन । मज जनार्दन अवघा भासे ॥ ६ ॥
विठा म्हणे तारी आपुल्या शरणागता । अनाथाच्या नाथा पांडुरंगा ॥ ७ ॥

### करुणापर मागणे

[९४]

न लगे आयुष्य भविष्य संपत्ति । नाम लक्ष्मीपति द्यावें मज ॥ १ ॥
तेणें तिहीं लोकीं होईन सरता । आणिक कृपावंता न मागें कांहीं ॥ २ ॥
नामयाचें प्रेम मज देई देवा । न घालावें खेंवा संसाराशी ॥ ३ ॥
वडिलांचें ठेवणें तुवां अभिलाषिलें । तें देई वहिलें पांडुरंगा ॥ ४ ॥
संसार तारका भक्तजन पाळका । यादवकुलटिळका केशवराया ॥ ५ ॥
भवमूल छेदका गोपीमनरंजका । होसी बंधुसखा यादवकुळां ॥ ६ ॥
विठयाचा तूं स्वामी भक्तिप्रेम सुख । यदुवंशटिळक यादवराया ॥ ७ ॥

[९५]

तुजवीण जीवलग सोईरे । मज नाहीं बा दुसरे ॥ १ ॥
विठो धांवे दवडादवडी । भक्त आपुला सोडवी ॥ २ ॥
बहुत गांजिला संसारीं । जोजावला मदमत्सरीं ॥ ३ ॥
विषयसर्पें डंखियला । लोभ दंभें भक्षियला ॥ ४ ॥
कामक्रोधाचीये धाडी । पडियेलासें बांदवडी ॥ ५ ॥
विठा म्हणे राखे लाज । होसी आमुचा पूर्वज ॥ ६ ॥

[९६]

बोलूं रे वेदांतीं बोलूं रे सिद्धांतीं । बोलूं नेती नेती अनिर्वाच्य ॥ १ ॥
बोल बोल रे तूं मना । बोल नारायणा समर्पिला ॥ २ ॥

माझा बाप बोल बोलूनियां गेला । केशव बांधिला बोल बोलें ॥ ३ ॥
नामयाचा विठा बोल नाहीं विसरला । केशव उभा केला भक्तिसुखें ॥ ४ ॥

[९७]

बोल तो सधरू बोले तो उदारू । बोले राज्यधरू धीर धर्म ॥ १ ॥
बोल तो न कळे बोल तो न कळे । बोले तो न कळे जाणतेया ॥ २ ॥
बोलाच्या आधारें बोलाच्या विचारें । बोले सर्व सार जिणोनियां ॥ ३ ॥
बोले जें अव्यक्त स्वरूप विचारू । ब्रह्म बोल सारू विठा म्हणे ॥ ४ ॥

[९८]

तूंचि येसी तूंचि जासी । तूंचि भोगिसी गर्भवास ॥ १ ॥
नेणों आम्ही आणिक बापा । तुम्ही याची कृपा चिरंजीव ॥ २ ॥
पाप दोन्ही तूंचि भोगिसी । आमुचा न देसी भक्तिवांटा ॥ ३ ॥
नामयाचा विठा म्हणे केशवराजा । मी दाईज तुझा वांटेकरी ॥ ४ ॥

[९९]

पायीं घातला तोडरू । देखूनि पळाला संसारू ॥ १ ॥
आले हरीदास नेटके । भेणें पळालीं पातकें ॥ २ ॥
गळां घालोनि तुळसीमाळ । वीर करिती कोल्हाळ ॥ ३ ॥
हांकारिती सहस्रनामें । रंगीं नाचताती प्रेमें ॥ ४ ॥
पताका झळकती अंबरीं । वैष्णव नाचती गजरीं ॥ ५ ॥
विठा केशवाचा नटू । बोले कळिकाळासी धटू ॥ ६ ॥

[१००]

मी तुझा पोसणा अगा नारायणा । झणीं केविलवाणा दिसों दिसी ॥ १ ॥
तुझा म्हणवितां आणिका शरण जातां । लाज माझ्या चित्ता वाटे थोर ॥ २ ॥
रावाचा सेवक रंकाचिये द्वारीं । फिरतां घरोघरीं लाज कोणा ॥ ३ ॥
विठा म्हणे देवा मी तुझा शरण । मागतसे दान नाम तुझें ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

[१०१]

जावोनी वेव्हार सांगेन पंढरी । जेथें पुंडलिक द्वारीं उभा केला ॥ १ ॥

देवोनी जाय कां घेवोनी जाय । आतां न सोडी पाय केशवाचे ॥ २ ॥

एक आंगेसी एक जागेसी । तरी जीवें हृषिकेशी न सोडी तुज ॥ ३ ॥

वेव्हारा सन्निधी पुंडलिक लोभा । विठा म्हणे उभा तेणें केला ॥ ४ ॥

[१०२]

उभ्या धरणें आपण बैसला । म्हणोनी भला भला वेव्हारू हा ॥ १ ॥

आमुच्या वेव्हारीं साक्ष हा एकु । पुंडलिकें लोकु उद्धरिला ॥ २ ॥

नाहीं तरी वेव्हारू अवघाच खोटा । पुंडलिकाचे चोहटा उभा असे ॥ ३ ॥

ऐसें सात पांच वेव्हारीं बुडविले येणें । विठा म्हणे धरणें जीवीं पाय तुझे ॥ ४ ॥

[१०३]

मी तुझा अंकिला अगा पंढरिनाथा । ब्रीद आपुलें आतां साच करी ॥ १ ॥

पतितपावन ऐसें बोलती पुराणें । तारियले हीन अनंत याती ॥ २ ॥

म्हणोनि ब्रीदाचा तोडर तुझ्या पायीं । गर्जताती धाई वेदश्रुती ॥ ३ ॥

विठा म्हणे मज देई चरणसेवा । आणिक केशवा न मागें कांहीं ॥ ४ ॥

[१०४]

तीर्थ तपें व्रतें देवातें जोडिलें । तें नामदेवासी दिधलें प्रेमसुख ॥ १ ॥

ऐक्यसुख परब्रह्म साधिलें । यश जें जोडिलें त्रिभुवनींचें ॥ २ ॥

धन्य तुझें नाम धन्य तुझें नाम । धन्य देवा प्रेम तुझें पायीं ॥ ३ ॥

नामा गोतामाजीं पायाळू जन्मला । देव भावें आला भूमंडळीं ॥ ४ ॥

स्वर्गीचें ठेवणें उमगिलें तेणें । केशवनाम नाणें अगणित ॥ ५ ॥

नेत्रीं लेईला भक्तीचें अंजन । उमगिलें निधान नामनाणें ॥ ६ ॥

विठा म्हणे देवा तें प्रेम पायीं । न मागतां देईं केशिराजा ॥ ७ ॥

[१०५]

भिऊनियां निघे समर्थाचे पाठी । वैरियाची भेटी न करी तया ॥ १ ॥

तैसा तुज आलों शरण केशवें । मज त्वां राखावें चरणांजवळी ॥ २ ॥

अनुक्रमणिका

न करा उदास न राखा अभिमान । माझें आगमन विचारी कां ॥ ३ ॥
तुझें जें होईल तेंची मी करीन । सेवा मी मागेन अहीर्णिसी ॥ ४ ॥
अविद्या अपार संचली हे देवा । याचा मज कुढावा नाहीं कोणी ॥ ५ ॥
देवा मज आतां नको गर्भवास । विठा विष्णुदास विनवीतसे ॥ ६ ॥

[१०६]

दासीं देवा अनुसरावें । कां आणिकां शरण जावें ॥ १ ॥
लाभालाभ जेथींचा तेथें । श्रम अन्यथा तो व्यर्थ ॥ २ ॥
पुण्योदक भागीरथी । नेदी चातकाची तृप्ती ॥ ३ ॥
सेवित स्तवितां चकोरा । काय वर्षे अमृतधारा ॥ ४ ॥
कासवीविण कोण बाळा । पाळी निज दृष्टि स्नेहाळा ॥ ५ ॥
स्वामीचिया मनोभावा । करणें ते परम सेवा ॥ ६ ॥
दास विठा म्हणे मीन । कैसा वांचे उदकेविण ॥ ७ ॥

[१०७]

घेतां देतां तूं तिहीं लोकीं उदार । माझा कां अव्हेर केला बापा ॥ १ ॥
तुझी सेवा देईं तुझी सेवा देईं । तुझी सेवा देईं श्रीविठ्ठला ॥ २ ॥
विठा म्हणे केशवा नको हा संसार । तुझे चरणीं अभ्यंतर ध्यान देईं ॥ ३ ॥

[१०८]

कीर्तनाचा ध्वनि पडला माझ्या कानीं । जाईन लोटांगणीं तेथवरी ॥ १ ॥
माझें सुख तें पहा वैष्णवजन । तयांची दर्शनें कें होतील ॥ २ ॥
उभ्या गाती आणि कीर्तन ऐकती । हृदयीं आळविती केशीराज ॥ ३ ॥
ऐसीयाचे संगतीं होता बाप माझा । म्हणतसे राजा विठा नामयाचा ॥ ४ ॥

[१०९]

विश्वंभरा तुझें नाम गा दुर्लभ । परी केलें सुलभ नामदेवें ॥ १ ॥
नामाची सांगडी लावूनिया कासें । नामदेवें कैसें उतरिलें ॥ २ ॥
नाम मज देईं आणिक न मागो काई । प्रेम तुझे पायीं असों द्यावें ॥ ३ ॥

अनुक्रमणिका

पतितपावना देवकिनंदना । हरि नारायणा पद्मनाभा ॥ ४ ॥
मुखीं तुझें नाम आवडी प्रेमाची । मग वैकुंठीची चाड नाहीं ॥ ५ ॥
सुखाच्या सागरा केशवा उदारा । तो आम्हां सोयरा जिवलग ॥ ६ ॥
द्यावा प्रेमसौरसु नामामृतरसु । विठा विष्णुदासु विनवीतसे ॥ ७ ॥

[ ११० ]
माय वेल्हाळी वेल्हाळी । ब्रह्मरसा पान्हावली ॥ १ ॥
दोहणार चवघेजण । धार सुटेना अझुन ॥ २ ॥
साहा लागले कासेसी । अठरा करिती निदिध्यासी ॥ ३ ॥
न कळे ब्रह्मादिकां वाटा । म्हणे नामयाचा विठा ॥ ४ ॥

[ १११ ]
आनंदें नाचत पंढरीसी जाऊं । गीतीं गुण गाऊं विठोबाचे ॥ १ ॥
पंढरी पावन पुण्यभूमि जाणें । विठ्ठलदर्शनें दोष जाती ॥ २ ॥
आनंदें हो प्रेमें नाचों महाद्वारीं । आठवूं अंतरीं घडोघडी ॥ ३ ॥
आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । घोष हरिनामाचा सदा वाचे ॥ ४ ॥
विठा नामयाचा चरणीं जाला लीन । सांपडलें निधान विटेवरी ॥ ५ ॥

[ ११२ ]
विठोबाचे बहु उपकार शिरीं । चुकविली फेरी चौऱ्यांशीची ॥ १ ॥
[1]भ्रमणा दुःखाच्या बहुत वेदना । म्हणोनि नारायणा शरण आलों ॥ २ ॥
अनाथाच्या नाथा तूं दीनाचा गोसावी । तोडर तुझ्या पायीं शोभे देवा ॥ ३ ॥
कर्ता करविता सर्व तुझी सत्ता । विश्वाचा चाळिता चित्तवृत्ती ॥ ४ ॥
विठा म्हणे नाम स्मरे त्याचे मुखीं । बहु केलें सुखी शरणागतें ॥ ५ ॥

[ ११३ ]
पतितपावन ऐकिलासे कानीं । म्हणोनी चक्रपाणि शरण आलों ॥ १ ॥
जपतप नेणें मूढ मतिहीन । बोबडें गाईन नाम तुझें ॥ २ ॥
मग कृपाळुवा जी बोळला संपूर्ण । ओलावलें मन भक्तिबोधें ॥ ३ ॥
विठा म्हणे पूर्वपुण्य कांहीं होतें । तरीच पंढरीनाथें अंगिकारिलें ॥ ४ ॥

१ भ्रम हा दुःखाचा वाचे वदवेना। (पं.)

[११४]

ऐसें सुख कोठें आहे । मुक्ति मागोन करिसी काये ॥ १ ॥
सांडोनी पंढरीची वारी । मोक्ष मागे तो भिकारी ॥ २ ॥
सांडोनी वाळवंट । कां बा इच्छिसी वैकुंठ ॥ ३ ॥
मुखीं कवळ काल्याचे । ऐसे वैकुंठीं बा कैचें ॥ ४ ॥
नामयाचा विठा खेळे । बाप [1]नामची माझें भोळें ॥ ५ ॥

[११५]

धरोनी हनुवटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ १ ॥
म्हणे मी ऐसाचि पाहीन । चरण धरोनी राहीन ॥ २ ॥
जेवी कमळणी दिनकरा । चातका वरुषे जळधारा ॥ ३ ॥
बाळक जननी ये भावीं । चकोर चंद्रातें आळवी ॥ ४ ॥
कृपणाचें ठेविलें धन । तेथुनी न निघे त्याचें मन ॥ ५ ॥
विठा विनवी अनुसंधानें । तुज असतां मज काय उणें ॥ ६ ॥

[११६]

नामयाचे वंशीं मेंद जन्मला । मार्ग हा पाडिला वैकुंठींचा ॥ १ ॥
सतरावीचे पाश घेऊनियां हातीं । वाट दिवसरातीं पाडीतसे ॥ २ ॥
मेंदाच्या हाता आला सावकार । भांडारीं कुबेर घरीं ज्याचे ॥ ३ ॥
नामयाचा विठा सत्य हा मेंद । भुलवुनी गोविंद म्हणवितसे ॥ ४ ॥

[११७]

नामयाचे वंशीं जन्मलों लबाड । साधिलें घबाड विटेवरी ॥ १ ॥
प्रपंचासी आम्ही सोडिलें उदक । वैकुंठनायक आप्त केला ॥ २ ॥
लौकिकाची लाज निश्चयें सोडिली । दृढ मिठी दिली विठोपायीं ॥ ३ ॥
लबाड म्हणती निर्माण पैं जालें । तेथें बुडविलें मीतूंपण ॥ ४ ॥[2]
नामयाचा विठा सत्याचा लबाड । प्रपंच काबाड ब्रह्म केलें ॥ ५ ॥

१ नामे माझेची (शि.)   २ हा चरण काही प्रतींत नाही.

अनुक्रमणिका

[ ११८ ]

नामयाचे वंशीं जन्मा आलें सुणें । वडिलाचें ठेवणें प्राप्त जालें ॥ १ ॥
संतसज्जनांचें राखितसें द्वार । सुणें सारासार म्हणती मज ॥ २ ॥
प्रपंच [1]थोरला घालोनि आसन । आवडे पैं ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥
गुरुगुरु ऐसा शब्द माझा पाड । घातलें कवाड यमलोकीं ॥ ४ ॥
नामयाचा विठा सुणें सुणें एका । पूजिल्या निष्टंका परब्रह्म ॥ ५ ॥

[ ११९ ]

मरण हें पेरणें जन्म हें उगवणें । हे मायेची खूण जाणीतली ॥ १ ॥
सीणलो हो भारी बहु येरझारें । संग तुझा पुरे नारायेणा ॥ २ ॥
तूं तरी न मरें मी तरी न मरें । भक्ति हे संचरे हाचि लाभू ॥ ३ ॥
विठा म्हणे केशवा ठाईंचा मी नेणें । गर्भवास भोगणें तुझी लाज ॥ ४ ॥

[ १२० ]

वैकुंठनायका आनंदपददायका । यादवकुळटिळका केशीराजा ॥ १ ॥
संसारतारका भक्तजनपाळका । यादवकुळटिळका केशीराजा ॥ २ ॥
भवमुक्तिदायका गोपीमनरंजका । यादवकुळटिळका केशीराजा ॥ ३ ॥
विठ्याचा स्वामी भक्तप्रेम सुखा । यादवकुळटिळका केशीराजा ॥ ४ ॥

[ १२१ ]

एक होतें तें द्वैत पैं जालें । एक पाहतां द्वैत कैंचें उरलें ॥ १ ॥
द्वैताचा भास मृगजळीं दिसे । पाहूं गेलें तेथें भास भासे ॥ २ ॥
चहूंचें बोलणें सहाची नेणीव । अठराची जाणीव कैंची तेथें ॥ ३ ॥
नागरीचा भाव विठोबाचा दिसे । परत्रिचें पिसें लागुनी ठेलें ॥ ४ ॥
नामयाचा विठा नामीं विनटला । सर्वस्व हरपला देहभाव ॥ ५ ॥[2]

१ थारोळा (पं.) २ काही प्रतींत हा चरण मिळत नाही.

अनुक्रमणिका

## उपदेश

[ १२२ ]

देहसमय अंतीं इष्टमित्र मिळती । सांभाळा म्हणती मुलें माझीं ॥ १ ॥
स्त्री धनधान्य ते निरवुनी जात । आपुलें स्वहित विचारीना ॥ २ ॥
[1]गाडे घोडे म्हैसी सेवक आणि दासी । सांडोनियां जासी एकलाची ॥ ३ ॥
मी कोण रे काय कसा आलों येथें । हित कीं अनहित करोनी जातों ॥ ४ ॥
हें तंव सुचेना नाठवे ज्याच्या मना । जुंपिलें ते घाणा चौऱ्यांसीच्या ॥ ५ ॥
विठा म्हणे तया कोण सोडविता । वेगीं पंढरिनाथा शरण जावें ॥ ६ ॥

[ १२३ ]

माळा मुद्रा सोंग घेऊनि होती संत । सदा विषयांत चित्त त्यांचें ॥ १ ॥
पोटासाठीं एक घेऊनियां वेष । ठकविती देश रांडापोरें ॥ २ ॥
पाषाण बांधोनी नदीये निघाला । सांगा कोण गेला पैलतीरा ॥ ३ ॥
ब्राह्मणाचे परी मैंद वेष धरी । घालावया करीं फांसे जैसे ॥ ४ ॥
विठा म्हणे संत न म्हणा तयासी । जाती नरकासी अधःपाता ॥ ५ ॥

[ १२४ ]

उदर भरावया घेऊनियां सोंग । घरोघरीं बोंब उपदेशाची ॥ १ ॥
आपणां कळेना लोकां सांगे ज्ञान । धरूनियां ध्यान बक जैसा ॥ २ ॥
आपण बुडाले आणिकां बुडविती । हात धरूनीयां जाती यमलोका ॥ ३ ॥
दुरी पंथ जाणे तया यमपुरी । पापाची शिदोरी बांधोनियां ॥ ४ ॥
विठा म्हणे काय करूं त्याच्या कपाळा । पापाचा कंटाळा न धरिती ॥ ५ ॥

[ १२५ ]

मांजराचे डोळे गेले । उंदीर धराया तळमळे ॥ १ ॥
तैसा नव्हे रे संन्यास । धांवे विषयावरी हव्यास ॥ २ ॥
वेश्या जाली पट्टराणी । स्मरे ना पूर्वील करणी ॥ ३ ॥
सर्प प्रतिवर्षी पालटे । परि अहंकार न पालटे ॥ ४ ॥

---
१ गाई (शि. व पं.)

अनुक्रमणिका

पहिलें पोशिलें मर्कटा । कोणें शिकविल्या चेष्टा ॥ ५ ॥
म्हणे नामयाचा विठा । वज्र लागो या लल्लाटा ॥ ६ ॥

[ १२६ ]

कामधेनु गाई घालोनी बाहेरी । ताक घरोघरीं मागतसे ॥ १ ॥
कल्पतरु वृक्ष असे ज्याचे घरीं । तो कां दारोदारीं भीक मागे ॥ २ ॥
ऋद्धि आणि सिद्धि विठोबाच्या दासी । तया हृषिकेशी शरण जावें ॥ ३ ॥
इंद्र आणि चंद्र विठोबाचे किंकर । देव सुरवर ध्याती ज्यातें ॥ ४ ॥
राव आणि रंक विठोबाचे मागते । ते कायरे तूतें देती बापा ॥ ५ ॥
ऐसा कोण आहे सर्व पुरविता । एका भगवंतावांचोनियां ॥ ६ ॥
मुखीं नाम असे पुण्य ज्या पदरीं । कळीकाळावरी सत्ता त्याची ॥ ७ ॥
विठा म्हणे शरण जाय हृषिकेशी । मग निजसुखासी पावसील ॥ ८ ॥

[ १२७ ]

जातिज्ञान नाहीं मतिज्ञान पार । फुंजे दंभाकार लौकिकांत ॥ १ ॥
तेथें माझ्या मना नव्हे समाधान । न पाविजे खूण संतावीण ॥ २ ॥
संत तेचि जाणा शांत ज्यांचें मन । [1]अणूचें प्रमाण दूजें नाहीं ॥ ३ ॥
विठा म्हणे तेथें स्थिरावलें मन । जालें समाधान त्याचे संगें ॥ ४ ॥

[ १२८ ]

अनंत अपरंपार नाम हें सधर । नाम सुखसागर अमृत लहरी ॥ १ ॥
नाम हेचि तारूं नाम हेंचि तारक । भवमूळ छेदक नाम तुझें ॥ २ ॥
नाम हेंचि जीवन नाम हें निधान । नाम हें कारण आनंदाचें ॥ ३ ॥
नाम हे सांठा तोचि वैकुंठीचा मोठा । म्हणतसे विठा नामयाचा ॥ ४ ॥

[ १२९ ]

नाम तारी पतितासी । तें कां अव्हेरी भक्तांसी ॥ १ ॥
प्रेमळ देवाचे लडिवाळ । करी निजांगें प्रतिपाळ ॥ २ ॥

---

१ आमुचे (शि.)



अनुक्रमणिका

सेवाऋणें वागवी भार । जन्मोजन्मींचा दातार ॥ ३ ॥
स्वामी स्वयें अंगिकारी । वोळगा कांहो दारोदारीं ॥ ४ ॥
निष्ठुर नव्हे कोणे काळीं । कृपाकटाक्षें कुरवाळी ॥ ५ ॥
दास विठा म्हणे वेगें । यात्रें जावें माझ्या संगें ॥ ६ ॥

[१३०]

हरि म्हणा हरि म्हणा अहो जन । आणिक बोलाल तरी विठ्ठलाची आण ॥ १ ॥
अहिल्या पाषाण अजामेळ कुळहीन । उद्धरिला दर्शनें वाल्मिक जाण ॥ २ ॥
नामयाचा विठा संतचरणीं ठेवोनि माथा । कीर्तनेंवीण वृथा नको गोष्टी ॥ ३ ॥

[१३१]

धर्म अर्थ मोक्ष काम । [१]हाकारितां रामराम ॥ १ ॥
जें जें आवडे मनासी । त्यानें जावें पंढरीसी ॥ २ ॥
चला आनंदें कौतुकें । पेठ भरली पुंडलिकें ॥ ३ ॥
न चले कोणाची थोरी । राया रंका एकी सरी ॥ ४ ॥
सांडोनियां अहंभाव । हाचि करावा व्यवसाव ॥ ५ ॥
विठा म्हणे विष्णुदास । आणिक न लगे सायास ॥ ६ ॥

[१३२]

बरवें बरवें वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥ १ ॥
ऐसें सुख कोठें आहे । मुक्ति मागुनी करीसी काये ॥ २ ॥
म्हणे नामयाचा विठा । बापा नको जाऊं वैकुंठा ॥ ३ ॥[२]

[१३३]

देखुनी पंढरीच्या सुखा । मोक्षपद आलें फुका ॥ १ ॥
अवघें विठ्ठलचि जालें । येणें पुंडलिकें केलें ॥ २ ॥

---

१ उच्चारितां
२ हा चरण (शि.) व.(पं.) प्रतींमध्ये नाही. काही प्रतींत पुढील अधिक चरण मिळतात—
दिंडया पताकाचे भार । टाळघोळाचा गजर ॥ ३ ॥
संतमहंताची दाटणी । अगाध महीमा कीर्तनी ॥ ४ ॥
महाद्वाराचे रंगणी । नामा जातो लोटांगणी ॥ ५ ॥

अनुक्रमणिका

ऋद्धि सिद्धि पंढरपुरीं । होवोनी वोळती कामारी ॥ ३ ॥
मुक्ति वागती अंगणीं । घरोघरीं वाहे पाणी ॥ ४ ॥
तीर्थं चिंतवणी करिती । पुढें आमुची कोण गती ॥ ५ ॥
आला कळिकाळा त्रासु । विठा म्हणे विष्णुदासु ॥ ६ ॥

[ १३४ ]

बहुतां पुण्याचे कष्ट । त्यासी प्राप्त हें वैकुंठ ॥ १ ॥
तैसी नोहे ही पंढरी । पतित पापियातें तारी ॥ २ ॥
बहुता तपाचे प्रत्यक्ष । त्यासी अपकारी मोक्ष ॥ ३ ॥
जेणें केलीं तपतीर्थें । तोचि आवडे मुक्तीतें ॥ ४ ॥
देह यासी नानाविधि । त्यासी प्राप्त होय सिद्धि ॥ ५ ॥
विठा म्हणे नामघोष । पळ काढील महादोष ॥ ६ ॥

[ १३५ ]

ज्यासी नावडे पंढरी । तोचि वसेल अघोरीं ॥ १ ॥
त्यासी जाची यमदूत । सकळ पूर्वजांसहित ॥ २ ॥
जया नावडे हरिनाम । तया कुंभपाकीं धाम ॥ ३ ॥
जया नावडती संत । ते चालती यमपंथ ॥ ४ ॥
जया नावडे भीमरथी । तेचि अघोरीं पडती ॥ ५ ॥
या बोलाचा धरी विश्वास । विठा म्हणे विष्णुदास ॥ ६ ॥

[ १३६ ]

हरिकथा ऐकतां संसार आठविती । तयाच्या सुकृति अवघा नाश ॥ १ ॥
निश्चित होऊनि ऐकतां श्रवणीं । यमाची करणी न लगे कांहीं ॥ २ ॥
आतां रामकृष्ण म्हणे कां रे वाचा । कळिकाळ मोचा वाहतील ॥ ३ ॥
विठा म्हणे संतीं अवधान द्यावें । हृदयीं धरावें केशव नाम ॥ ४ ॥

[ १३७ ]

काय गाणीव काय जाणीव । काय शहाणीव कीर्तनाची ॥ १ ॥
थाक डोळे तोडिलें मोडिले । लोकां मानवलें बरें गातो ॥ २ ॥



अनुक्रमणिका

हरिचें नाम तूं नेणसी । वायां कीर्तनीं उभा ठाकसी ॥ ३ ॥
हरीचें नाम तुम्ही गा रे प्रेमें । विठा म्हणे माझ्या बापाच्या नांवें ॥ ४ ॥

[ १३८ ]

जैसा आंबा वर्षत पाडी । तैसी धरीं गोडी कीर्तनीं नाचे ॥ १ ॥
न करी घातमात न लावी वेळू । तेणें हा गोपाळू अंतरला ॥ २ ॥
दुधावरील साय मधेसी गोडी । तैसी धरी आवडी रामनामीं ॥ ३ ॥
जतीचा साटा तो वैष्णव लाटा । म्हणतसे विठा नामयाचा ॥ ४ ॥

[ १३९ ]

यात्रे बोलवितो हरी । कांहो नवजा पंढरी ॥ १ ॥
विठोबा कृपेचा कोंवळा । बहु भक्तांचा कळवळा ॥ २ ॥
भक्त आठवती चित्तीं । देवा वाटे परम खंती ॥ ३ ॥
देव अवज्ञा अनुचित । पृथक सत्ता आत्मघात ॥ ४ ॥
ऋण वारी भगवंत । दुबळा नव्हे लक्ष्मीकांत ॥ ५ ॥
दास विठा म्हणे त्वरा । यात्रा पंढरीची करा ॥ ६ ॥

[ १४० ]

द्रौपदीचें थालीपात्र । त्यांत कैचें शाखापत्र ॥ १ ॥
माव याची अभिन्नव । वाव मानसीं उपाव ॥ २ ॥
जंव लाधला तो आपण । केलें तृप्त त्रिभुवन ॥ ३ ॥
सेवा घेऊनी सारी काम । अंगें चैतन्य निष्काम ॥ ४ ॥
याच्या छळें आकर्षिला । बळिचा द्वारपाळ जाला ॥ ५ ॥
भक्तियोगें द्वेषभयें । वेध लावुनी सन्मुख होये ॥ ६ ॥
दोहीं बाहीं आपण देव । काय नेणां पंढरीराव ॥ ७ ॥
दास विठा म्हणे धंदा । कृपा देवाची संपादा ॥ ८ ॥

[ १४१ ]

कृष्ण गौळियाचें लोणी चोरी । तंव अवचिता शेंडी सांपडली हरी ॥
घेवोनि आलिया बाहेरी । तंव यशोदे वोसंगा ॥ १ ॥

चाकाटलिया गौळणी । देवो विसरल्या गान्हाणीं ॥
लाजे मौन्य धरोनि । अवलोकिती गोविंदा ॥ २ ॥
आम्हां अवधियांपासी असे । पैल यशोदा वोसंगा दिसे ॥
हें स्वप्न कीं साच असे । म्हणती मानसें वेडावलीं ॥ ३ ॥
ऐसा अनेक परीच्या वेदश्रुती । वाचे वर्णाविया न येती ॥
विठा विनवी विष्णुदासा प्रती । ऐसा यशोदेचा कान्हया ॥ ४ ॥

[ १४२ ]

त्रैलोक्या माझारीं एक विठाबाई सुंदरी हो ।
पुंडलिकाकारणें तिष्ठत भीमातीरीं हो ॥ १ ॥
उदो बोला उदो बोला विठाबाई माऊलीचा ॥ धृ० ॥
मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवना माझारीं हो ॥ २ ॥
चौक साधियला नामीं कळस ठेविला वरी हो ॥ ३ ॥
गोंधळया माझारीं एक पुंडलिक नेटका हो ।
घातला गोंधळ विठाई दाविली तिहीं लोकां हो ॥ ४ ॥
गोंधळ घालीत गेली कैसी रावणाच्या घरा हो ।
शरणागत रक्षिलें वधियलें दशशिरा हो ॥ ५ ॥
आषाढी कार्तिकी तुझा गोंधळ वाळवंटीं हो ।
येती सनकादिक गरुडटके यांची दाटी हो ॥ ६ ॥
करुनी गोपाळकाला गोंधळ घाली वेणूनादीं हो ।
गोपिकांसहीत सर्व गोपाळांची मांदी हो ॥ ७ ॥
नामयाचा विठा कैसा गोंधळी नेटका हो ।
वडिलांची विठाई कुलस्वामिनी अंबिका हो ॥ ८ ॥

[ १४३ ]

गर्भवास ऐसा मजसी भिववितो । गाई बैसवितो व्याघ्रापुढें ॥ १ ॥
नको हा संसार नको हा संसार । नको हा संसार देवराया ॥ २ ॥
कोपें काळसर्पे धरिलें अजेसी । तेणें कासाविसी सांगों नेणें ॥ ३ ॥
विठा म्हणे तुझें केशवा मी बाळ । ऐसा तूं कृपाळ मायबापा ॥ ४ ॥

[१४४]

संसारसागर भरला दुरुस्त । विवेकी पोहणार विरळा संत ॥ १ ॥

कामाचिया लाटा अंगीं आदळती । नेणो गेले किती वाहुनियां ॥ २ ॥

भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा । एक पडिले घरा चौऱ्यांशीच्या ॥ ३ ॥

तेथें नावाड्या विठ्ठल भवसिंधू तारूं । भक्तां पैलपारू उतरीतो ॥ ४ ॥

विठा म्हणे नाम स्मरा श्रीरामाचें । भय कळिकाळाचें नाहीं तुम्हां ॥ ५ ॥

● ● ●

अनुक्रमणिका

[१४५]

गातां विठोबाची कीर्ति । महापातकें जळती ॥ १ ॥
सर्व सुखाचा आगर । उभा असे विटेवर ॥ २ ॥
आठवितां पाय त्याचे । मग तुम्हां भय कैचें ॥ ३ ॥
कांयावाचामनें भाव । जनी म्हणे गावा देव ॥ ४ ॥

[१४६]

जन्मा येउनियां देख । करा देहाचें सार्थक ॥ १ ॥
वाचे नाम विठ्ठलाचें । तेणें सार्थक देहाचें ॥ २ ॥
ऐसा नामाचा महिमा । शेषा वर्णितां जाली सीमा ॥ ३ ॥
नाम तारक त्रिभुवनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[१४७]

नाम फुकट चोखट । नाम घेतां न ये वीट ॥ १ ॥
जड शिळा ज्या सागरीं । आत्माराम नामें तारी ॥ २ ॥
पुत्रभाव स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥
नाममहिमा जनी जाणे । ध्यातां विठ्ठलाचें होणें ॥ ४ ॥

[१४८]

येक नाम सर्व सार । वरकड अवघें तें असार ॥ १ ॥
म्हणोनियां परतें करा । आधीं विठ्ठल हें स्मरा ॥ २ ॥
जनी म्हणे देवाधिदेव । एक विठ्ठल पंढरीराव ॥ ३ ॥

[१४९]

काय हें करावें । [1]धनवंतादि अवघे ॥ १ ॥
तुझें नास नाहीं जेथें । नको [2]माझा वास तेथें ॥ २ ॥
तुजविण [3]बोल न मानी । करी ऐसें म्हणे जनी ॥ ३ ॥

१ धनवित्तासी अवघे ॥ (शि. व पं.) २ माझी आस तेथें ॥ ३ बोक मानी। (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[१५०]

विठ्ठल नामाची नाहीं गोडी । काळ हाणोनि तोंड फोडी ॥ १ ॥
गळां बांधोनि खांबासी । विंचू लाविती जिव्हेसी ॥ २ ॥
ऐसा अभिमानी मेला । नर्ककुंडी थारा त्याला ॥ ३ ॥
नामा बोध करी मना । दासी जनी लागे चरणा ॥ ४ ॥

[१५१]

तो हा भक्तांचे तोडरीं । वाचे उच्चारितां हरी ॥ १ ॥
काम होऊनि निष्काम । काम जाला मनीं प्रेम ॥ २ ॥
तो हा पूर्ण काम होय । अखंडित नाम गाय ॥ ३ ॥
काम निष्काम जाला मनीं । वंदी नाचे दासी जनी ॥ ४ ॥

[१५२]

नाम विठोबाचें घ्यावें । मग पाऊल टाकावें ॥ १ ॥
नाम तारक हें थोर । नामें तारिले अपार ॥ २ ॥
अजामेळ उद्धरिला । चोखामेळा मुक्तीस नेला ॥ ३ ॥
नाम दळणीं कांडणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[१५३]

निराकारीचें नाणें । शुद्ध ब्रह्मीचें ठेवणें ॥ १ ॥
प्रयत्नें काढिलें बाहेरी । संतसाधु सवदागरीं ॥ २ ॥
व्यास वसिष्ठ नारद मुनी । टांकसाळ घातली त्यांनीं ॥ ३ ॥
उद्धव अक्रुर स्वच्छंदीं । त्यांनीं आटविली चांदी ॥ ४ ॥
केशव नामयाचा शिक्का । हारप चाले तिन्ही लोकां ॥ ५ ॥
पारख नामयाची जनी । वरती विठोबाची निशाणी ॥ ६ ॥

[१५४]

माझा शिणभाग गेला । तुज पाहतां विठ्ठला ॥ १ ॥
पाप ताप याती । तुझें नाम ज्यांचे चित्तीं ॥ २ ॥

अनुक्रमणिका

अखंडित नामस्मरण । बाधूं न शके तया विघ्न ॥ ३ ॥
जनी म्हणे हरिहर । भजतां वैकुंठीं त्या घर ॥ ४ ॥

[ १५५ ]

नाम विठोबाचें थोर । तरला कोळी आणि कुंभार ॥ १ ॥
ऐसी नामाची आवडी । तुटे संसाराची बेडी ॥ २ ॥
नाम गाय वेळोवेळां । दासी जनीसी नित्य चाळा ॥ ३ ॥

[ १५६ ]

मारुनियां त्या रावणा । राज्य दिधलें बिभीषणा ॥ १ ॥
सोडवूनी सीता सती । राम अयोध्येसी येती ॥ २ ॥
ख्याती केली रामायणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥

[ १५७ ]

येऊं ऐसें जाऊं । जनासंगें हेंचि दाऊं ॥ १ ॥
आपण करुं हरिकीर्तन । जाणोनी भक्तीचें जीवन ॥ २ ॥
नाम संशयछेदन । भवपाशाचें मोचन ॥ ३ ॥
जनी म्हणे हो देवासी । होईल त्याला करणी ऐसी ॥ ४ ॥

[ १५८ ]

हरिहर ब्रह्मादिक । नामें तरले तिन्ही लोक ॥ १ ॥
ऐसा कथेचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥
जपें तपें लाजविलीं । तीर्थें शरणागत आलीं ॥ ३ ॥
नामदेवा कीर्तनीं । ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ॥ ४ ॥
देव श्रुती देती ग्वाही । जनी म्हणे सांगूं कायी ॥ ५ ॥

[ १५९ ]

व्हावें कथेसी सादर । मन करुनियां स्थिर ॥ १ ॥
बाबा काय झोपी जातां । झोके चौरासीचे खातां ॥ २ ॥

अनुक्रमणिका

नरदेह कैसा रे मागुता । भेटी नव्हे त्या सीताकांता ।। ३ ।।
आळस निद्रा उठाउठी । त्यजा स्वरूपीं घाला मिठी ।। ४ ।।
जनी म्हणे हरिचें नाम । मुखीं म्हणा धरूनि प्रेम ।। ५ ।।

[ १६० ]

पुंडलिक भक्तवळी । विठो आणिला भूतळीं ।। १ ।।
[1]अनंत अवतार केवळ । उभा विटेवरी सकळ ।। २ ।।
वसुदेवा न कळे पार । नाम्यासवें जेवी फार ।। ३ ।।
भक्तभावार्था विकला । दासी जनीला आनंद जाला ।। ४ ।।

[ १६१ ]

भक्त भला पुंडलिका । तुझ्या भावार्थाचा शिक्का ।। १ ।।
भलें घालूनियां कोडें । परब्रह्म दारापुढें ।। २ ।।
घाव घातला निशाणीं । ख्याती केली त्रिभुवनीं ।। ३ ।।
जनी म्हणे पुंडलिका । धन्य तूंचि तिहीं लोकां ।। ४ ।।

[ १६२ ]

पंढरीचें सुख पुंडलिकासी आलें । तेणें हें वाढिलें भक्तालागीं ।। १ ।।
भुक्ति मुक्ति वरदान दिधलें । तेंहि नाहीं ठेविलें आपणापाशीं ।। २ ।।
उदार चक्रवर्ती बाप पुंडलिक । नामें विश्व लोक उद्धरिले ।। ३ ।।

[ १६३ ]

[2]अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ।। १ ।।
तुझी रांड रंडकी जाली । [3]जन्मसावित्री चुडा त्याली ।। २ ।।
[4]तुझें गेलें मढें । तुला पाहून काळ रडे ।। ३ ।।
उभी राहूनि [5]आंगणीं । शिव्या देत दासी जनी ।। ४ ।।

१ आनंद (शि. व पं.)
२ अरे विठ्या विठ्या विठ्या ।
३ जन्मोजन्मी
४ तुझ्या दारी लागोपेटा । कधी जासील वैकुंठा ।। ४ ।। (पं.) प्रतीमध्ये हा चरण अधिक आहे.
५ वृंदावनी (पं.)

अनुक्रमणिका

[१६४]

जन्म [1]खातां उष्टावळी । सदा राखी चंद्रावळी ॥ १ ॥
राईरुक्मिणीचा कांत । भक्तिसाठीं कण्या खात ॥ २ ॥
देव भुलले पांडुरंग । ऐसा जाणावा श्रीरंग ॥ ३ ॥
जनी म्हणे देवराज । करी [2]भक्ताचें हो काज ॥ ४ ॥

[१६५]

ऐसा आहे पांडुरंग । भोग भोगूनि निःसंग ॥ १ ॥
अविद्येनें नवल केलें । मिथ्या सत्यत्व दाविलें ॥ २ ॥
जैसी वांझेची संतति । तैसी संसार उत्पत्ति ॥ ३ ॥
तेथें कैंचि बा धरिसी । ब्रह्मी पूर्ण जनी दासी ॥ ४ ॥

[१६६]

स्मरतांचि पावसी । तरी भक्तांसी [3]लाभसी ॥ १ ॥
ऐसे कांहीं न घडे देवा । वायां कोण करी सेवा ॥ २ ॥
न पुरतां आस । मग कोण पुसे देवास ॥ ३ ॥
कोठें चक्रपाणि । तुज आधीन [4]लाहीं जनी ॥ ४ ॥

[१६७]

बाप रखुमाबाई वर । माझें निजाचें माहेर ॥ १ ॥
तें हें जाणा पंढरपूर । जग मुक्तीचें माहेर ॥ २ ॥
तेथें मुक्ति नाहीं म्हणे । जनी न पाहे त्याचें वदन ॥ ३ ॥

[१६८]

अनंत लावण्याची शोभा । तो हा विटेवरी उभा ॥ १ ॥
पितांबर माळ गांठीं । भाविकासी घाली मिठी ॥ २ ॥
त्याचे पाय चुरी हातें । कष्टलीस माझे माते ॥ ३ ॥
आवडी बोले त्यासी । चला जाऊं एकांतासी ॥ ४ ॥
ऐसा ब्रह्मींचा पुतळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ५ ॥

---

१ गेला (शि. व पं.) २ दासीचे हे (शि. व पं.) ३ लाधसी (शि. व पं.) ४ नाहीं (शि. व पं.)

[ १६९ ]

देव देखिला देखिला । नामें ओळखुनी ठेविला ॥ १ ॥
तो हा विटेवरी देव । सर्व सुखाचा केशव ॥ २ ॥
जनी म्हणे पूर्णकाम । विठ्ठल देवांचा विश्राम ॥ ३ ॥

[ १७० ]

योगीं शीण जाला । तुजवांचुनी विठ्ठला ॥ १ ॥
योग करितां अष्टांग । तुजविण शुका रोग ॥ २ ॥
बैसला कपाटीं । रंभा लागे त्याच्या पाठीं ॥ ३ ॥
तईं त्वांचि सांभाळिला । जेव्हां तुज शरण आला ॥ ४ ॥
सांगोनि पुत्रातें । त्वांचि छळिलें कश्यपातें ॥ ५ ॥
अमरांच्या राया । म्हणे जनी सुखालया ॥ ६ ॥

[ १७१ ]

आळवितां धांव घाली । ऐसी प्रेमाची भुकेली ॥ १ ॥
ते हे यशोदेची बाळा । बरवी पाहातसें डोळां ॥ २ ॥
विटेवरी उभी नीट । केली पुंडलिकें धीट ॥ ३ ॥
स्वानंदाचें लेणें ल्याली । पाहून दासी जनी धाली ॥ ४ ॥

[ १७२ ]

स्तन पाजायाशी । आली होती ते माउशी ॥ १ ॥
तिच्या उरावरी लोळे । विठो माझा क्रीडा खेळे ॥ २ ॥
मेलें मेलें कृष्ण नाथा । सोडी सोडीं रे अनंता ॥ ३ ॥
लिंग देह विरविले । जनीं म्हणे या विठ्ठलें ॥ ४ ॥

[ १७३ ]

अहो यशोदेचा हरी । गोपिकांसी क्रीडा करी ॥ १ ॥
वेणु वाजवितो हरी । सर्व देवांचा साहाकारी ॥ २ ॥
धांवे धांवे गाईपाठीं । जनी म्हणे जगजेठी ॥ ३ ॥

अनुक्रमणिका

[१७४]

विठो माझा लेंकुरवाळा । मंगें [1]लेंकुरांचा मेळा ॥ १ ॥
निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ॥ २ ॥
पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥
गोरा कुंभार मांडिवरी । चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥
वंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥ ५ ॥
जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥[2]

[१७५]

नोवरीया संगें वऱ्हाडीया सोहोळां । मांडे पुरणपोळया मिळे अन्न ॥ १ ॥
परीसाचेनि संगें लोहो होय सोनें । तयाचीं भूषणें श्रीमंतासी ॥ २ ॥
जनी म्हणे जोड जाली विठोबाची । दासी नामयाची म्हणोनियां ॥ ३ ॥

[१७६]

तुझ्या निजरुपाकारणें । वेडावलीं दरुषणें ॥ १ ॥
परि सोय न कळे त्यांसी । समीप असतां देवासी ॥ २ ॥
चारी श्रमें हो कष्टती । वेदशास्त्रें धुंडाळिती ॥ ३ ॥
परि कवणें रीति तुला । न जाणवे जी विठ्ठला ॥ ४ ॥
तुझी कृपा होय जरी । दासी जनी ध्रुपद करी ॥ ५ ॥

[१७७]

पंढरी सांडोनि जाती वाराणसी । काय सुख त्यांसी आहे तेथें ॥ १ ॥
तया पंचक्रोसीं म्हणती मरावें । मरोनियां व्हावें जीवन्मुक्त ॥ २ ॥
नको गा विठोबा मज धाडूं काशी । सांगेंन तुजपाशीं ऐक आतां ॥ ३ ॥
मरचीमात्र वेरण स्तंभीं घाली । घालोनियां गाळी पापपुण्य ॥ ४ ॥
जावोनियां तेथें प्रहर दोन रात्रीं । सत्य मिथ्या श्रोतीं श्रवण करा ॥ ५ ॥
आई आई बाबा म्हणती काय करुं । ऐसें दुःख थोरु आहे तेथें ॥ ६ ॥
इक्षूदंड घाणा जैसा भरी माळी । तैसा तो कवळी काळनाथ ॥ ७ ॥
लिंगदेहादिक करिती कंदन । तेथील यातना नको देवा ॥ ८ ॥
न जाय तो जीव एकसरी हरी । रडती नानापरी नानादुःखें ॥ ९ ॥

---

१ गोपाळांचा (पं.) २ चरण पाचवा व सहावा (पं.) प्रतीमध्ये नाही.

अमरादिक थोर थोर भांबावले । भुलोनियां गेले मुक्तीसाठीं ॥ १० ॥
ती ही मुक्ति माझी खेळे पंढरीसी । लागतां पायांसी संतांचिया ॥ ११ ॥
ऐसिये पंढरी पहाती शिखरीं । आणि भीमातीरीं मोक्ष आला ॥ १२ ॥
सख्या पुंडलिका लागतांचि पाया । मुक्ति म्हणे वायां गेलें मी कीं ॥ १३ ॥
घररिघवणी मुक्ति होय दासी । मोक्ष तो पाठीसीं धांव घाली ॥ १४ ॥
मोक्ष सुखासाठीं मुक्ति लोळे । बीं नेघे कोणी कदा काळीं ॥ १५ ॥
मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं । आमुची ती काय धरिती सोयी ॥ १६ ॥
समर्थाचे घरीं भिक्षा नानापरी । मागल्या पदरीं घालिताती ॥ १७ ॥
अंबोल्या सांडोनी कोण मागे भीक । सामराज्याचें सुख तुझें ॥ १८ ॥
जनी म्हणे तुज रखुमाईची आण । जरी मज क्षण विसंबसी ॥ १९ ॥

**करुणा**

[१७८]

पाय जोडुनी विटेवरी । [1]कर ठेउनी कटावरी ॥ १ ॥
रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडलें मकराकार ॥ २ ॥
[2]गळां वैजयंती माळा । तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
गरुड सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ४ ॥

[१७९]

येगे माझे विठाबाई । कृपादृष्टीनें तूं पाही ॥ १ ॥
तुजविण न सुचे कांहीं । आतां मी वो करूं कांहीं ॥ २ ।
माझा भाव तुजवरी । आतां रक्षी नानापरी ॥ ३ ॥
येई सखये धांउनी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[१८०]

हात निढळावरी ठेवुनि । वाट पाहे चक्रपाणि ॥ १ ॥
धांव धांव पांडुरंगे । सखे जिवलगे अंतरंगे ॥ २ ॥
तुजवांचुनि दाही दिशा । [3]वोस मज जगदीशा ॥ ३ ॥
हांसें करुं नको जनासी । म्हणे नामयाची दासी ॥ ४ ॥

---

१ कटी हात उभा हरी ॥ (धु.)
२ गळां माळा वैजयंति । पुढे गोपाळ नाचति ॥ (धु.)
३ वाट पाहातें जगदीशा ॥ (स्थळप्रत)

अनुक्रमणिका

[ १८१ ]

[1]सख्या घेतलें पदरीं । आतां न टाकावें दुरी ॥ १ ॥
तुम्हा थोरांचें उचित । ऐसें नव्हे विपरीत ॥ २ ॥
ब्रह्मियाच्या ताता । सज्जना लक्ष्मीच्या कांता ॥ ३ ॥
आपुली म्हणवूनि । आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

[ १८२ ]

गंगा गेली सिंधूपाशीं । तेणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
[2]तरी सांगावें कवणाला । ऐसें बोलें वा विठ्ठला ॥ २ ॥
जळ कोपे जळचरा । [3]माता अव्हेरी लेंकुरा ॥ ३ ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

[ १८३ ]

माझी आंधळयाची काठी । [4]अडकली कवणे बेटीं ॥ १ ॥
[5]आतां सांगूं मी कवणासी । धावें पावें हृषिकेशी ॥ २ ॥
तुजवांचूनी विठ्ठला । कोणी नाहीं रे मजला ॥ ३ ॥[6]
माथा ठेवीं तुझे चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

---

१ आधीं घेतलें पदरीं । आतां न धरावें दुरी ॥ १ ॥
तुम्हां थोरांचें उचितें । हेंचि काय सांगू तूतें ॥ २ ॥
अहो ब्रह्मियाच्या ताता । सखया लक्ष्मीच्या कांता ॥ ३ ॥
दयेच्या सागरा । जनी म्हणे अमरेश्वरा ॥ ४ ॥
२ तरी सांगावें कवणा । बोल बापा नारायेणा ॥ (शि. व पं.)
३ माता बाळा नेदी थारा ॥ (शि. व पं.)
४ हारपली (पं. व धु.)
५ माझीये हारणी । गुंतलीस कोणे रानि ॥ २ ॥ (शि.)
६ चरण ३ व ४ (धु.) प्रतीमध्ये नाहीत. त्याऐवजी—
अता काय मी हो करुं । प्राण कंठीं किती धरुं ॥ ३ ॥
देवा तुझ्या हो चरणीं । माथा ठेवी दासी जनी ॥ ४ ॥
हे दोन वेगळे चरण आहेत.
माझिये जननी हरिणी । गुंतलीस कवणें वनीं ॥ १ ॥
मुकें तुझें मी पाडस । चुकलें माये पाहे त्यास ॥ २ ॥
चुकली माझिये हरिणी । फिरतसे रानोरानीं ॥ ३ ॥
आतां भेटवा जननी । विनवितसे दासी जनी ॥ ४ ॥



अनुक्रमणिका

[१८४]

कां गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ॥ १ ॥
मायबाप तूंचि धनी । मला सांभाळी निर्वाणीं ॥ २ ॥
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें किती मी पामर ॥ ३ ॥
दीनानाथा दीनबंधु । जनी म्हणे कृपासिंधू ॥ ४ ॥

[१८५]

[1]अगा रुक्मिणीनायका । सुरा असुरा प्रिय लोकां ॥ १ ॥
ते तूं धांवे माझे आई । सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥
अगा शिवाचिया जपा । मदनताता निष्पापा ॥ ३ ॥
आपुली म्हणवुनी । आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

[१८६]

नाहीं केली तुझी सेवा । दुःख वाटतसे माझे जिवा ॥ १ ॥
नष्ट पापीण मी हीन । नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥
जें जें [2]दुःख जालें मला । ते त्वां सोसिलें विठ्ठला ॥ ३ ॥
रात्रंदिवस मजपाशीं । दळूं कांडूं लागलासी ॥ ४ ॥
क्षमा करावी देवराया । दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

[१८७]

येरे येरे माझ्या रामा । मनमोहन मेघःशामा ॥ १ ॥
संतमिसें भेटी । देई [3]देई कृपा-दृष्टी ॥ २ ॥
आमची चुकवी जन्मव्याधी । आम्हां देई हो समाधी ॥ ३ ॥
जनी म्हणे चक्रपाणि । करी ऐसी हो करणी ॥ ४ ॥

---

१ काही प्रतींत खालील अभंग आढळतो---
रुक्मिणीच्या कुंका । सुरां अमरा प्रिय लोकां ॥ १ ॥
तूं धांव माझे आई । सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥
शिवाचिया जपा । मदनताता ये निष्पापा ॥ ३ ॥
दयेच्या सागरा । म्हणे जनी अमरेश्वरा ॥ ४ ॥
आपुली म्हणवोनी आपंगावी दासी जनी ॥ (धु.) हा चरण जास्त आढळतो.
२ कष्ट (धु.) ३ देई सांगें गोष्टी ॥ (शि. व पं.)

[ १८८ ]

अहो नारायणा । कृपा कां कराना ॥ १ ॥
मी तो अज्ञानाची राशी । म्हणोन आले पायापाशीं ॥ २ ॥
जनी म्हणे आतां । सोडवी कृपावंता ॥ ३ ॥

[ १८९ ]

ऐक बापा हृषिकेशी । मज ठेवी पायांपाशीं ॥ १ ॥
तुझें रूप पाहीन डोळां । मुखीं नाम वेळोवेळां ॥ २ ॥
हातीं धरिल्याची लाज । माझें सर्व करी काज ॥ ३ ॥
तुजविण देवराया । कोणी नाहीं रे सखया ॥ ४ ॥
कमळापति कमळापाणि । दासी जनी लागे चरणीं ॥ ५ ॥

[ १९० ]

पोट भरुनी व्यालासी । मज सांडुनी कोठें जासी ॥ १ ॥
धीरा धरा पांडुरंगा । मज कां टाकिलें निःसंगा ॥ २ ॥
ज्याचा जार त्यासी भार । मजला नाहीं आणिक यार ॥ ३ ॥
विठाबाई मायबहिणी । तुझे कृपें तरली जनी ॥ ४ ॥

[ १९१ ]

अविद्येच्या रात्रीं । अडकले हो अंधारीं ॥ १ ॥
तेथुनी काढावें गोविंदा । यशोदेच्या परमानंदा ॥ २ ॥
तुझें सन्निधेचे पाशीं । ठाव नाहीं अविद्येसी ॥ ३ ॥
तुझें संगति पावन । उद्धरिलें ब्रह्में पूर्ण ॥ ४ ॥
अजामेळ शुद्ध केला । म्हणे दासी जनी भला ॥ ५ ॥

[ १९२ ]

धनगोत कलत्र माय । सर्व जोडी तुझे पाय ॥ १ ॥
सखा तुजवीण पाहीं । दुजा कोणी मज नाहीं ॥ २ ॥
माझी न करावी सांडणी । म्हणे तुझी दासी जनी ॥ ३ ॥

[१९३]

मी वत्स माझी गायी । न ये आतां करुं काई ॥ १ ॥
तुम्ही तरी सांगा कांहीं । शेखीं विनवा विठाबाई ॥ २ ॥
येई माझिये हरणी । चुकलें पाडस दासी जनी ॥ ३ ॥

[१९४]

सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पायां ॥ १ ॥
ऐसें करीं अखंडित । शुद्ध [1]प्रेम शुद्ध [2]चित्त ॥ २ ॥
[3]वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरीनाथा ॥ ३ ॥
जावें ओंवाळुनि । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ४ ॥

[१९५]

कां गा उशिर लावला । माझा विसर पडिला ॥ १ ॥
तुजवेरी संसार । बोळविलें घरदार ॥ २ ॥
तो तूं आपुल्या दासासी । म्हणे जनी विसंबसी ॥ ३ ॥

[१९६]

किती सांगूं तूतें । बुद्धि शिकवणें हें मातें ॥ १ ॥
सोमवंशाच्या भूषणा । प्रतिपाळीं हर्षे दीनां ॥ २ ॥
शिकवावें तूतें । हाचि अपराध आमुतें ॥ ३ ॥
स्वामीलागीं धीट ऐसी । म्हणती शिकवी जनी दासी ॥ ४ ॥

[१९७]

शिणल्या बाह्या आतां । येऊनियां लावी हातां ॥ १ ॥
तूं माझें वो माहेर । काय पहातोसी अंतर ॥ २ ॥
वोंवाळुनी पायां । जीवें भावें पंढरीराया ॥ ३ ॥
धर्म ताता धर्म [4]लेकीं । म्हणे जनी हे विलोकी ॥ ४ ॥

१ नेम (भा.) २ व्रत (भा.) ३ बोध (भा.) ४ लोकी (शि. व पं.)

[१९८]

योग न्यावा सिद्धि । सकळ गुणाचिया निधी ॥ १ ॥

अरुपाच्या रूपा । सांबराजाचिया जपा ॥ २ ॥

ब्रह्मियाचा ताता । म्हणे जनी पंढरिनाथा ॥ ३ ॥

[१९९]

माय मेली बाप मेला । आतां सांभाळीं विठ्ठला ॥ १ ॥

मी तुझें गा लेंकरुं । नको मजशीं अव्हेरुं ॥ २ ॥

मतिमंद तुझी दासी । ठाव द्यावा पायांपाशीं ॥ ३ ॥

तुजविण सखे कोण । माझे करील [१]संरक्षण ॥ ४ ॥

अंत किती पाहासी देवा । थोर श्रम जाला जीवा ॥ ५ ॥

सकल जीवाच्या जीवना । म्हणे जनी नारायणा ॥ ६ ॥

[२००]

अहो सखीये साजणी । ज्ञानाबाई हो हरणी ॥ १ ॥

मज पाडसाची माय । भक्तिवत्साची ते गाय ॥ २ ॥

कां गा उशीर लाविला । तुजविण शिण जाला ॥ ३ ॥

अहो बैसलें दळणीं । धांव घाली म्हणे जनी ॥ ४ ॥

[२०१]

काय करुं या कर्मासी । धांव पाव हृषिकेशी ॥ १ ॥

नाश होतो आयुष्याचा । तुझें नांव न ये वाचा ॥ २ ॥

काय जिणें या देहाचें । अखंड अवघ्या रात्रीचें ॥ ३ ॥

व्यर्थ कष्टविली माता । तुझें नाम न ये गातां ॥ ४ ॥

[२]जन्म मरणाचें दुःख । म्हणे जनी दाखवी मुख ॥ ५ ॥

[२०२]

अहो ब्रह्मांडपाळका । ऐकें रुक्मिणीच्या कुंका ॥ १ ॥

देवा घेतलें पदरीं । तें तूं टाकूं नको दुरी ॥ २ ॥

१ समाधान (शि. व पं.) २ जन्मोनिया दुःख । (शि., पं. व धु.)

होतें लोकामध्यें निंद्य । तें त्वां जगांत केलें बंद्य ॥ ३ ॥
विनवीतसे दासी जनी । परिसा माझी विनवणी ॥ ४ ॥

[२०३]

अहो देवा हरिहर । उतरी आम्हां भवपार ॥ १ ॥
देवा आम्ही तुझे दास । करुं वैकुंठीं बो वास ॥ २ ॥
जनी म्हणे कल्पवृक्ष । देव दुष्टासी पैं भक्ष ॥ ३ ॥

[२०४]

शरण आलें नारायणा । आतां तारी हो पावना ॥ १ ॥
शरण आला मारुतिराया । त्याची दिव्य केली काया ॥ २ ॥
शरणं प्रल्हाद तो आला । हिरण्यकश्यपू मारिला ॥ ३ ॥
जनी म्हणे देवा शरण । व्हावें भल्यानें जाणोन ॥ ४ ॥

[२०५]

ऐका बापा माझ्या पंढरीच्या राया । कीर्तना आलेया आर्तभूतां ॥ १ ॥
माझ्या दुणेदारा पुरवी त्यांची आस । न करीं निरास आर्तभूतां ॥ २ ॥
त्रैलोक्याच्या राया सख्या उमरावा । अभय तो द्यावा कर तयां ॥ ३ ॥
जैसा चंद्रश्रवा सूर्यं उचैश्रवा । अढळपद ध्रुवा दिधलेंसें ॥ ४ ॥
उपमन्यु बाळका क्षीराचा सागरु । ऐसा तूं दातारू काय वानूं ॥ ५ ॥
म्हणे दासी जनी आलेंया कीर्तनीं । तयां कंटाळुनी पिटूं नका ॥ ६ ॥

[२०६]

गजेंद्रासी उद्धरिलें । आम्ही तुझें काय केलें ॥ १ ॥
तारिली गणिका । तिहीं लोकीं तुझा शिक्का ॥ २ ॥
वाल्हा कोळी अजामेळ । पापी केला पुण्यशील ॥ ३ ॥
गुणदोष मना नाणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

[२०७]

राजाई गोणाई । अखंडीत तुझे पायीं ॥ १ ॥
मज ठेवियलें द्वारीं । नीच म्हणोनि बाहेरी ॥ २ ॥
नारा गोंदा महादा विठा । ठेवियलें अग्रवाटा ॥ ३ ॥
देवा केव्हां क्षेम देसी । आपुली म्हणोनि जनी दासी ॥ ४ ॥

[२०८]

काय करुं पंढरीनाथा । काळ साह्य नाहीं आतां ॥ १ ॥
मज टाकिलें परदेशीं । [1]नारा विठा तुजपाशीं ॥ २ ॥
श्रम बहु जाला जीवा । [2]आतां सांभाळीं केशवा ॥ ३ ॥
कोण सखा तुजविण । माझें करी समाधान ॥ ४ ॥[3]
हीन दीन तुझें पोटीं । जनी म्हणे द्यावी भेटी ॥ ५ ॥

भेट

[२०९]

तुझे पाय रूप डोळां । नाहीं देखिलें गोपाळा ॥ १ ॥
काय करुं या कर्मासी । नाश होतो आयुष्यासी ॥ २ ॥
जन्मा येऊनियां दुःख । नाहीं पाहिलें श्रीमुख ॥ ३ ॥
लळे पुरविसी आमुचे । जनी म्हणे ब्रीद साचें ॥ ४ ॥

[२१०]

वाट पाहतें मी डोळां । कां गा न येसी विठ्ठला ॥ १ ॥
तूं वो माझी निज जननी । मज कां टाकियलें वनीं ॥ २ ॥
धीर किती धरूं आता । कव घाली पंढरीनाथा ॥ ३ ॥
मला आवड भेटीची । धणी घेईन पायांची ॥ ४ ॥
सर्व जिवांचे स्वामिणी । म्हणे जनी मायबहिणी ॥ ५ ॥

१ नारायना दुरल्या देशी ॥ (भा.) २ कधीं भेटसी केशवा ॥ (भा.)
३ हा चरण (भा.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

[२११]

येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥
भीमा आणि चंद्रभागा । तुझे चरणींच्या गंगा ॥ २ ॥
इतुक्यांसहित त्वां बा यावें । माझे रंगणीं नाचावें ॥ ३ ॥
माझा रंग तुझिया गुणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[२१२]

आतां वाट पाहूं किती । देवा रुक्माईच्या पती ॥ १ ॥
येई येई पांडुरंगे । भेटी देई मजसंगें ॥ २ ॥
मी बा बुडतें भवजळीं । [1]सांग बरवी बिद्रावळी ॥ ३ ॥
[2]राग न धरावा मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[२१३]

विठोबारायाच्या अगा लेकवळा । जाऊनी कळवळा सांगा माझा ॥ १ ॥
विठोबारायाच्या अगा मुख्य प्राणा । भेटवी निधाना आपुलिया ॥ २ ॥
अगे क्षेत्र माये सखे पंढरीये । मोकलिते पाय जीव जातो ॥ ३ ॥
विश्वाचिये माते सुखाचें अमृत । सखा पंढरीनाथ विनवी तरी ॥ ४ ॥
तूं मायबहिणी देवाचे रुक्मिणी । धरोनियां जनी घाली पायीं ॥ ५ ॥

[२१४]

कां गे निष्ठुर जालीसी । मुक्या बाळातें सांडिसी ॥ १ ॥
तुज वांचोनियां [3]माये । जीव माझा जावो पाहे ॥ २ ॥
मी वत्स माझी माय । न ये आतां करूं काय ॥ ३ ॥
प्राण धरियेला कंठीं । जनी म्हणे देई भेटी ॥ ४ ॥

---

१ सांभाळावी (शि. व पं.)
२ आतां शरण आलो तुज । देवा नको धरु दुजे ॥ हा चरण (पं.) प्रतीमध्ये अधिक आहे.
३ गाये (शि. व पं.)

[२१५]

धन्य ते पंढरी धन्य पंढरिनाथ । तेणें हो पतित उद्धरिले ॥ १ ॥
धन्य नामदेव धन्य पंढरिनाथ । तयानें अनाथ उद्धरिले ॥ २ ॥
धन्य ज्ञानेश्वर धन्य त्याचा भाव । त्याचे पायीं देव आम्हां भेटो ॥ ३ ॥
नामयाँची जनी पालट पैं जाला । भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

[२१६]

चिंतनीं चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥
उन्मनीच्या सुखाआंत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥
कवटाळुनी भेटी पोटीं । जनी म्हणे सांगूं गोष्टी ॥ ३ ॥

[२१७]

[1]देहाचा पालट विठोबाचे भेटी । जळ लवणा गांठीं पडोन ठेली ॥ १ ॥
धन्य मायबाप नामदेव माझा । तेणें पंढरिराजा दाखविलें ॥ २ ॥
रात्रंदिवस भाव विठ्ठलाचे पायीं । चित्त ठायीचें ठायीं मावळलें ॥ ३ ॥
नामयाचे जनी आनंद पैं जाला । भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

[२१८]

पुंडलिकें नवल केलें । गोपिगोपाळ आणिले ॥ १ ॥
हेचि देईं हृषिकेशी । तुझें नाम अर्हानिशीं ॥ २ ॥
नलगे आणिक प्रकार । मुखीं हरी निरंतर ॥ ३ ॥
रूप न्याहाळिन डोळां । पुढें नाचेन वेळोवेळां ॥ ४ ॥
सर्वांठायीं तुज पाहे । ऐसें देऊनि करी साह्य ॥ ५ ॥
[2]धांवा करितां रात्र जाली । दासी जनीसी भेट दिली ॥ ६ ॥

भक्तवत्सलता

[२१९]

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणि ॥ १ ॥
पाटी घेऊनि डोईवरी । नेऊनियां टाकी दुरी ॥ २ ॥

---

१ देहासी पालटवी (शि.), देहासी (पं.) २ सई (शि., पं. व धु.)

[1]ऐसा भक्तीसी [2]भुलला । नीच कामें करूं लागला ।। ३ ।।
जनी म्हणे बा विठ्ठला । काय उतराई होऊं तुला ।। ४ ।।

[२२०]

पूर्वी काय तप नेणें पैं हो केलें । निधान जोडिलें पंढरीचें ।। १ ।।
येऊनियां देव दळूं लागे अंगें । रखुमाईचा संग दूर केला ।। २ ।।
तैसाचि पैं संगें येऊनि बाहेरी । वेंचोनियां भरी शेणी अंगें ।। ३ ।।
ओझें जालें म्हणोनि पाठी पितांबरीं । घेऊनियां घरीं आणितसे ।। ४ ।।
ऐसें जेथें काम करी चक्रपाणि । तेथें कैंची जनी नामयाची ।। ५ ।।

[२२१]

येकलीच गाणें गासी । दुजा [3]शब्द उमटे पाशी ।। १ ।।
कोण गे तुझ्याबरोबरी । गाणें गाती निरंतरीं ।। २ ।।
[4]पांडुरंग माझा पिता । रखुमाई जाली माता ।। ३ ।।
ऐशियाच्या घरीं आले । जनी म्हणे धन्य जालें ।। ४ ।।[5]

[२२२]

जनी डोईनें गांजली । विठाबाई धांविन्नली ।। १ ।।
[6]देव आले लवडसवडी । उवा मारितसे तांतडी ।। २ ।।
केश विंचरूनी मोकळे । जनी म्हणे निर्मळ जालें ।। ३ ।।

[२२३]

जनी बैसली न्हायाला । पाणी नाहीं विसणाला ।। १ ।।
[7]घागर घेउनि हातांत । पाणी आणी दीनानाथ ।। २ ।।

---

१ कैसा (पं.) २ भुकेला (धु.) ३ साद उमटता (शि.)
४ खूण कळली नामयासी देवा । विठ्ठल पुरता जनीच्या भावा ।। ३ ।। (शि.)
५ चरण ३ व ४ हे (शि.) प्रतीत नाहीत. ६ देव हातें बुचडा सोडी ।
७ घागर घेऊनि पाण्या गेली । मागें मागें धांव घाली ।। २ ।।
घागर घेऊनियां हातीं । पाणी रांजणांत ओती ।। ३ ।।
ऐशा येरझारा केल्या । रांजण घागरी भरिल्या ।। ४ ।।
पाणी पुरे पांडुरंगा । दासी जनीच्या अंतरंगा ।। ५ ।।

अनुक्रमणिका

करूनियां येरझार । पाणी भरी सारंगधर ॥ ३ ॥
पुरे पुरे रे विठ्ठला । जनिचा अंतरंग धाला ॥ ४ ॥

[२२४]

[1]एके दिवशीं न्हावयास । पाणी नव्हतें विसणास ॥ १ ॥
देव धांवोनियां आले । शीतळ उदक घे घे बोले ॥ २ ॥
आपुल्या हातें विसणी । घाली जनीच्या डोयीं पाणी ॥ ३ ॥
माझ्या डोईच्या केसांस । न्हाणें नव्हतें फार दिवस ॥ ४ ॥
तेणें मुरडी केशांस । कां म्हणे उगीच बैस ॥ ५ ॥
आपुल्या हातें वेणी घाली । जनी म्हणे माय आली ॥ ६ ॥

[२२५]

तुळशीचे वनीं । जनी उकलीत वेणी ॥ १ ॥
हातीं घेऊनियां लोणी । डोई चोळी चक्रपाणि ॥ २ ॥
माझे जनीला नाहीं कोणी । म्हणूनी देव घाली पाणी ॥ ३ ॥
जनी सांगे सर्व लोकां । न्हाऊं घाली माझा सखा ॥ ४ ॥

[२२६]

साळी कांडायास काढी । [2]चक्रपाणि उखळ झाडी ॥ १ ॥
कांडितां कांडितां । शीण आला पंढरिनाथा ॥ २ ॥[3]
कांडीताना घाम आला । तेणें पितांबर भिजला ॥ ३ ॥
[4]पायीं पैंजण हातीं कडी । कोंडा पाखडोनि काढी ॥ ४ ॥
हाता आला असे फोड । जनी म्हणे मुसळ सोड ॥ ५ ॥[5]

---

१ माझे जेनिचे केसास । न्हान नव्हते बहुत दिवस ॥ ४ ॥
तन्हे मुरकांडी केसास । कां ग जेनि तू उदास ॥ ५ ॥
धाऊनियां विठो आला । हिवसे पाणी विसणाला ॥ २ ॥
आपुल्या हातें विंचरी वेणी । न्हाणु घातली मग जनि ॥ ३ ॥
(धु.) प्रतीमध्ये हे चरण जास्त आहेत.

२ पुढे विठ्ठल उखळ झाडी ॥ (धु.) ३ चरण २ व ४ हे (धु.) प्रतीमध्ये नाहीत.

४ प्रेमे सुखाचे कांडण । जनी म्हणे जाले काम ॥ ४ ॥ (धु.)

५ चरण २ व ५ हे (शि.) प्रतीमध्ये नाहीत.

अनुक्रमणिका

[२२७]

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारे सोसी आघाताचे ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥
आंगा आपुले ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ४ ॥
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची जनी दासी ॥ ५ ॥

[२२८]

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥
घार हिंडते आकाशीं । झेप घाली पिल्लांपासीं ॥ २ ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥ ३ ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥ ४ ॥
तैसी आम्हांसी विठ्ठल माये । जनी [1]वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

[२२९]

भक्त जें जें कर्म करिती । तें तूं [2]सोसिसी कृपामूर्ती ॥ १ ॥
हें तो नवल नव्हे देवा । तूं भुललासी भक्तिभावा ॥ २ ॥
वाग्दोर धरुनी हातीं । चारी घोडे चहूं हातीं ॥ ३ ॥
धूतां लाज नाहीं तुला । दासी जनी म्हणे भला ॥ ४ ॥

[२३०]

देव भावाचा लंपट । सांडुनि आला हो वैकुंठ ॥ १ ॥
पुंडलिकापुढें उभा । सम चरणींची शोभा ॥ २ ॥
हातीं चक्र पायीं वांकी । मुख भक्ताचें अवलोकीं ॥ ३ ॥
उभा बैसे न सर्वथा । पाहे कोठें भक्तकथा ॥ ४ ॥
सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे शारंगधर ॥ ५ ॥

१ निरंतर ध्याये (शि. व पं.) २ होसी (शि.)

[२३१]

दुःशासन द्रौपदीसी । घेउनी आला तो सभेसी ॥ १ ॥
दुर्योधन आज्ञा करी । नग्न करावी सुंदरी ॥ २ ॥
आतां उपाय कृष्णा काय । धांवें माझे कृष्णमाय ॥ ३ ॥
निरी ओढितां दुर्जन । जाले आणिक निर्माण ॥ ४ ॥
ऐसी असंख्य फेडिलीं । देवीं तितुकीं पुरविलीं ॥ ५ ॥
[1]तया संतां राखिलें कैसें । जनी मनीं प्रेमें हांसे ॥ ६ ॥

[२३२]

ब्राह्मणाचें पोर । मागे दूध रडे फार ॥ १ ॥
माता म्हणे बालकासी । दूध मागे देवापाशीं ॥ २ ॥
क्षिराब्धीची वाटी । म्हणे जनी लावी होटी ॥ ३ ॥

[२३३]

पंढरीच्या राया । तुझ्या विनवणी पायां ॥ १ ॥
काय वर्णू हरिच्या गोष्टी । अनंत ब्रह्मांडें याचे पोटीं ॥ २ ॥
सेना न्हावी याचे घरीं । अखंड राबे विठ्ठल हरी ॥ ३ ॥
राम चिंता ध्यानीं मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[२३४]

भिल्लणीचीं फळें कैशीं । चाखोनी वाहातसे देवासी ॥ १ ॥
भावें तिची अंगिकारी । सर्वांहुनी कृपा करी ॥ २ ॥
गुज वान्नरांसी पुसावें । राक्षसातें हो जिंकावें ॥ ३ ॥
वान्नर अवघे भुभुःकार । बोलताती रामासमोर ॥ ४ ॥
आज्ञा करावी आम्हांसी । रावण आणितो तुम्हांपासीं ॥ ५ ॥
तुझ्या नामाच्या प्रतापें । हनुमंत गेला जो संतापें ॥ ६ ॥
सीताशुद्धि करूनी आला । दासी जनीस आनंद जाला ॥ ७ ॥

---
१ तया स्मरताचि कैसे। (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[२३५]

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तांचा कळवळा ॥ १ ॥
त्याचा जाला म्हणीयारा । राहे धरी धरी थारा ॥ २ ॥
देव बाटविला त्याणें । हांसे जनी गाय गाणें ॥ ३ ॥

[२३६]

चोखामेळा संत भला । तेणें देव भुलवीला ॥ १ ॥
भक्ति आहे ज्याची मोठी । त्याला पावतो संकटीं ॥ २ ॥
[१]चोख्यामेळ्याची करणी । [२]तेणें देव केला ऋणी ॥ ३ ॥
[३]लागा विठ्ठल चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[२३७]

माळियाचा लेक जाला । सेखीं कुर्म्यालागीं गेला ॥ १ ॥
चांभारानें जानव्यासी । काढोन दाविलें भटांसी ॥ २ ॥
तुरका घरीं सेले विणी । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥[४]

[२३८]

माझा लोभ नाहीं देवा । तुझी करीं ना मी सेवा ॥ १ ॥
नाहीं अंगीं थोरपण । मिथ्या धरिसी गुमान ॥ २ ॥
रागा येऊनि काय करिसी । तुझें बळ आम्हांपासीं ॥ ३ ॥
नाहीं सामर्थ्य तुज हरी । जनी म्हणे धरिला चोरीं ॥ ४ ॥

[२३९]

द्रौपदीकारण । पाठीराखा नारायण ॥ १ ॥
गोरा कुंभाराच्या संगें । चिखल तुडवूं लागे अंगें ॥ २ ॥

---

१ चोखामेळा जालें ज्ञान । हासे जनी गाय गाणे ॥ ३ ॥ (धु.)
२ नामदेव केला ऋणी ॥ (धु.)
३ ऐसा पुत्र देसि संता । तरी तो अवडे पंढरीनाथा ॥ ४ ॥ (धु.)
४ हा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही.

अनुक्रमणिका

कबिराच्या बैसोनी पाठी । शेला विणितां सांगे गोष्टी ॥ ३ ॥
चोख्यामेळ्यासाठीं । ढोरें ओढी जगजेठी ॥ ४ ॥
जनीसंगें दळूं लागे । सुरवर म्हणती धन्य भाग्यें ॥ ५ ॥

[ २४० ]

देव भक्ताचा अंकित । कामें त्याचीं सदा करित ॥ १ ॥
त्याचें पडों नेदी उणें । होय रक्षिता आपण ॥ २ ॥
जनी म्हणे [1]भक्तिभाव । देवदास ऐक्य जीव ॥ ३ ॥

[ २४१ ]

बाळे भोळे ठकविशी । तें तंव न चाले आम्हांपाशीं ॥ १ ॥
गर्व धरिसी नामाचा । सोहं सोहं गर्जे वाचा ॥ २ ॥
आशा तृष्णा तुम्हांपाशीं । नाहीं म्हणे जनी दासी ॥ ३ ॥

[ २४२ ]

जेवीं जेवीं [2]बा मुरारी । तुज वाढिली शिदोरी ॥ १ ॥
कनकाचे ताटीं । [3]दहींदुधें भरली वाटी ॥ २ ॥
आमुचें ब्रह्म सारंगपाणि । हिंडतसे रानोरानीं ॥ ३ ॥[4]
[5]गोपाळांचे मेळीं । हरि खेळे चेंडुफळी ॥ ४ ॥
तुळसीचे वनीं । [6]उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

[ २४३ ]

जनी म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जीवलगा ॥
विनवितें सांगा । महिमा साधुसंतांचा ॥ १ ॥
कैसी वसविली पंढरी । काय महिमा भीमातीरीं ॥
पुंडलिकाच्या द्वारीं । कां उभा राहिलासी ॥ २ ॥

---

१ भक्तभाव (शि. व पं.) २ गा (धु.) ३ रत्नजडित ठेविली वाटी ॥ (स्थळप्रत)
४ हा चरण (शि.) व (पं.) प्रतींमध्ये नाही.
५ भोवत्या गोपाळाच्या हरि । ते हे ब्रह्म गाई चारी ॥ ४॥ (शि. व पं.)
६ उभा म्हणे दासी जनी ॥ (धु.)

अनुक्रमणिका

कैसा आला हा गोविंद । कैसा जाला वेणुनाद ॥
येउनी नारद । कां राहिला ॥ ३ ॥

कृपा करा नारायणा । सांगा अंतरींच्या खुणा ॥
येऊं दे करुणा । दासी जनी विनवितसे ॥ ४ ॥

[ २४४ ]

दुर्योधना मारी । पांडवासी रक्षी हरी ॥ १ ॥
पांडव वनवासी जाये । तयापाठीं देव आहे ॥ २ ॥
उणें न पडे तयाचें । काम पुरवी हो मनाचे ॥ ३ ॥
जनी म्हणे विदुराच्या । कण्या भक्षी हो प्रीतीच्या ॥ ४ ॥

[ २४५ ]

स्कंधीं ऋषि तो वाहिला । बळीनें द्वारपाळ केला ॥ १ ॥
भक्ताआधीन होसी । त्याच्या वचनीं वर्तसी ॥ २ ॥
त्याचे गर्भवास सोसी । कष्टी होतां अंबऋषी ॥ ३ ॥
सर्व दुःखासी साहिलें । जनी म्हणे बरवें केलें ॥ ४ ॥

[ २४६ ]

भक्तीसाठीं याति नाहीं । नाहीं तयासी ते सोई ॥ १ ॥
रोहिदास तो चांभार । त्याचा करी कारभार ॥ २ ॥
जो कां भक्त यातिहीन । देव करी त्याचा मान ॥ ३ ॥
त्यासी भक्ताचा आधार । वाट पाहे निरंतर ॥ ४ ॥
जनी म्हणे [1]भवतासाठीं । विठो सदा गोण्या लोटी ॥ ५ ॥

[ २४७ ]

देव तारक तारक । देव दुष्टांसी मारक ॥ १ ॥
गीतेमध्यें आदि अंत । ऐसें बोलतो भगवत ॥ २ ॥
शत्रुलागीं आधीं मारी । भक्तसंकटीं रक्षी हरी ॥ ३ ॥
जनी म्हणे कृपा करी । भाव पाहोन अंतरीं ॥ ४ ॥

---

१ भक्तीसाठीं (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[२४८]

पांडवाचे घरीं । रात्रंदिवस मुरारी ॥ १ ॥

तैसा सखा नामयाचा । एके ठायीं जेवायाचा ॥ २ ॥

त्याच्या उच्छिष्टाचा ग्रास । जनी हातें उचली त्यास ॥ ३ ॥

[२४९]

भूत जालें ऋषि पोटीं । लावियेलें मृगापाठीं ॥ १ ॥

विश्वामित्रा घाला घाली । पोटीं शकुंतला आली ॥ २ ॥

भगांकित केला । इंद्र भूतानें झडपिला ॥ ३ ॥

तेंचि झालें हें भारत । म्हणे जनी केली मात ॥ ४ ॥

[२५०]

दोहीकडे दोही जाया । मध्यें गोरोबाची शय्या ॥ १ ॥

गोरा निद्रिस्त असतां । कपट करिती त्याच्या कांता ॥ २ ॥

गोरोबाचे दोन्ही हात । आपुल्या हृदयावरी ठेवित ॥ ३ ॥

जागा जाला गोरा भक्त । जनी म्हणे त्या निद्रित ॥ ४ ॥

[२५१]

अहो द्रौपदीच्या बंधू । तारक देवा कृपासिंधू ॥ १ ॥

पांचाळीसी वस्त्रें देत । पुरवितो जगन्नाथ ॥ २ ॥

जनी म्हणे भाग्यवंत । तिच्या भावाचा अंकित ॥ ३ ॥

[२५२]

बाप श्रोतियाचा राजा । कैसी उभारिली ध्वजा ॥ १ ॥

एक जाला परिक्षिती । ऐसे पवाडे गर्जिती ॥ २ ॥

भागवतीं रससुखें । द्रौपदी वाढी सावकाशें ॥ ३ ॥

ज्याची ऐकतां गर्जना । कंप काळाचिया मना ॥ ४ ॥

सात दिवस वृष्टि जाली । जनी म्हणे मात केली ॥ ५ ॥

[२५३]

मांडियेला डाव । कौरवांनीं दुष्ट भाव ॥ १ ॥

टाकियेला फांसा । पांडव गेले वनवासा ॥ २ ॥



अनुक्रमणिका

वना गेले पांडव वळी । दिनकरें दिधली थाळी ॥ ३ ॥

पांडवांची कृष्णाबाई । जनी म्हणे माझी आई ॥ ४ ॥

[ २५४ ]

कोणे एके दिवशीं । विठो आला जनीपाशीं ॥ १ ॥

हळूच मागतो खायाशी । काय देऊं वा मी तुसी ॥ २ ॥

हातीं धरून नेला आंत । वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥

प्रेमसुखाचा ढेकर दिला । जनी म्हणे विठो धाला ॥ ४ ॥

[ २५५ ]

एके दिवशीं वाडियांत । देव आले अवचित ॥ १ ॥

अवघीं पायांस लागलीं । देवें त्यावरी कृपा केली ॥ २ ॥

बाहेर कामासी गुंतल्यें । देवें मजला विचारिलें ॥ ३ ॥

बाहेर आहेस वो बोलती । देव मजला हाटकिती ॥ ४ ॥

हात धुऊनि जवळ गेल्यें । कोठें गे जनी हांसून बोले ॥ ५ ॥

[ २५६ ]

दळण्याच्या मिषें । विठ्ठल सावकाशें ॥ १ ॥

देहबुद्धीचें वैरण । द्वैत खडा रे निसून ॥ २ ॥

एकलीच गातां । दुजां साद उमटतां ॥ ३ ॥

कोण तुझे बरोबरी । साद देतो निरंतरीं ॥ ४ ॥

खूण कळली नामदेवा । विठ्ठल श्रोता जनीच्या भावा ॥ ५ ॥

[ २५७ ]

मग हांसोनि सकळी । पाहूं देव कैसा बळी ॥ १ ॥

आले नामदेवा घरीं । प्रेमें भुललासे हरी ॥ २ ॥

घाली जातिया वैरण । गाय आवडीचें गाणें ॥ ३ ॥

पुढें देखे ज्ञानेश्वरा । देव जालासे घाबरा ॥ ४ ॥

जनी म्हणे पंढरिनाथा । जाय राउळासी आतां ॥ ५ ॥

अनुक्रमणिका

[२५८]

निवृत्ती पुसत । कोठें होते पंढरिनाथ ॥ १ ॥
खूण कळली हृषिकेशी । सांगों नको निवृत्तीसी ॥ २ ॥
उत्तर दिलें ज्ञानदेवें । नवल केवढें सांगावें ॥ ३ ॥
शिव वंदी पायवणी । न ये योगियांचें ध्यानीं ॥ ४ ॥
द्वारीं उभे ब्रह्मादिक । गुण गाती सकळिक ॥ ५ ॥
जनीसवें दळी देव । तिचा देखोनियां भाव ॥ ६ ॥

[२५९]

काकड आरती । करावया कमळापती ॥ १ ॥
भक्त मिळाले सकळ । रितें देखिलें देऊळ ॥ २ ॥
ज्ञानेश्वर बोले । आतां देव कोठें गेले ॥ ३ ॥
ठावें जाहलें अंतरीं । देव दळी जनीघरीं ॥ ४ ॥

[२६०]

जाय जाय राउळासी । नको येऊं आम्हांपाशीं ॥ १ ॥
जाऊं आम्हीं बरोबर । जाला तिचा हो चाकर ॥ २ ॥
तिजसंगें काम करी । ऐसें जाणा देव हरी ॥ ३ ॥
चहूं हातीं धुणें केलें । जनी म्हणे बरें जालें ॥ ४ ॥

[२६१]

आतां पुरे हा संसार । कोठें फेडुं उपकार ॥ १ ॥
सांडूनियां थोरपण । करी दळण कांडण ॥ २ ॥
नारिरूप होउनी हरी । माझें न्हाणें धुणें करी ॥ ३ ॥
राना जाये वेंची शेणी । शेखीं वाहे घरीं पाणी ॥ ४ ॥
ठाव मागें पायापाशीं । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

[ २६२ ]

धुणें घेऊनि कांखेमी । जनी गेली उपवासी ॥ १ ॥

मागें विठ्ठल धांवला । म्हणे कां टाकिलें मला ॥ २ ॥

धाऊनी देवा कां आलासी । म्हणे नामयाची दासी ॥ ३ ॥[1]

[ २६३ ]

जनी जाय शेणासाठीं । उभा आहे तिच्या पाठीं ॥ १ ॥

पितांबराची कांस खोवी । मागें चाले जनाबाई ॥ २ ॥

गौऱ्या वेंचुनि बांधिली मोट । जनी म्हणे द्यावी गांठ ॥ ३ ॥

मोट उचलून डोई घेई । मागें चाले जनाबाई ॥ ४ ॥

[ २६४ ]

राना गेली शेणीसाठीं । वेचूं लागे विठो पाठीं ॥ १ ॥

पितांबर ओंचे खोंवी । पायीं शोभा पारखावी ॥ २ ॥

पूर्ण भरोनियां मोट । जनी म्हणे द्यावी गांठ ॥ ३ ॥[2]

[ २६५ ]

जनीचिया बोलें करी नित्य [3]काम । वसवी तिचें धाम लक्ष्मीसहित ॥ १ ॥

जनीचिया गोष्टी प्रेम ज्याचे मनीं । तयाचे चरणीं ओढवी माया ॥ २ ॥

महेशादि देव तेहि तयां ध्याती । [4]जे आवडें गांती जनी ध्याती ॥ ३ ॥

[ २६६ ]

आई मेली बाप मेला । मज सांभाळी विठ्ठला ॥ १ ॥

हरी रे मज कोणी नाहीं । माझी खात असे डोई ॥ २ ॥

---

१ मूळ अभंगांत असलेला चौथा चरण गाळला आहे. काही प्रतींत खालीलप्रमाणे चौथा चरण आहे---

खाली घालुनिया मान । मागें चालीले जगजीवन ॥ ४ ॥ (धु.)

काही प्रतींत चौथा चरण नाही.

ह्या अभंगात पुष्कळच पाठ आहेत. पैकी १ व २ यांमध्ये---

म्हणे कां वा तू आलासी । जाय जाय राउळासी ॥

असा अधिक चरण आढळतो.

३ नेम (शि. व पं.) ४ जे आवडीने गाती जनीचे बोल ॥ (शि. व पं.)

अनुक्रमणिका

विठ्ठल म्हणे रुक्मिणी । माझे जनीला नाहीं कोणी ॥ ३ ॥
हातीं घेउनी तेलफणी । केंस विंचरून घाली वेणी ॥ ४ ॥
वेणी घालुन दिधली गांठ । जनी म्हणे चोळ बा पाठ ॥ ५ ॥
जनी म्हणे बा गोपाळा । करी दुबळीचा सोहळा ॥ ६ ॥

[ २६७ ]

एक प्रहर रात्र जाली । फेरी विठ्ठलाची आली ॥ १ ॥
नामा म्हणे जनी पाहे । द्वारीं उभा कोण आहे ॥ २ ॥
प्रभा घरांत दाटली । अवघी एकसरा उठली ॥ ३ ॥
[1]एकमेकां आलिंगन । नामा म्हणे दासी जनी धन्य ॥ ४ ॥[2]

[ २६८ ]

जनी जाय पाणीयासी । मागें धांवे हृषिकेशी ॥ १ ॥
पाय भिजों नेदी हात । माथां घागरी वहात ॥ २ ॥
[3]पाणी रांजणांत भरी । सडासारवण करी ॥ ३ ॥
धुणें धुऊनियां आणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[ २६९ ]

शेटचा जाला हरी । द्रव्य गोणी लोटी द्वारीं ॥ १ ॥
[4]बुद्धि सांगे राजाईसी । तुम्ही न छळावें नाम्यासी ॥ २ ॥
अवघ्या वित्तासी वेंचावें । सरल्या मजपाशीं मागावें ॥ ३ ॥
विठ्ठलसेटचा नाम माझें । नामदेवा सांगा वोजें ॥ ४ ॥
आतां उचित दासासी । [5]ऐसें बोले राजाईसीं ॥ ५ ॥
ऐसें बोलोनियां गेला । जनी म्हणे नामा आला ॥ ६ ॥

[ २७० ]

नामदेवाचे घरीं । चौदाजणें स्मरती हरी ॥ १ ॥
चौघे पुत्र चौघी सुना । नित्य स्मरती नारायणा ॥ २ ॥

---

१ पदक येकावळि गळां । उभा विठ्ठल सांवळा ॥ ५ ॥ (धु.) प्रतीमध्ये हा चरण अधिक आहे.
२ हा अभंग कदाचित नामदेवाचा असण्याची शक्यता आहे.
३ रांजण पाणीयानें भरी । सडा समार्जन करी ॥ ३ ॥ (धु.)
४ गुज (पं.) ५ सांगे राजाईसी वोजें ॥ (पं.)

आणिक मायबाप पाहीं । नामदेव राजाबाई ॥ ३ ॥
आऊबाई लेकी निंबाबाई बहिणी । पंधरावी ती दासी जनी ॥ ४ ॥

[ २७१ ]

माझा नामा मज देई । जीव देईन तुझे पायीं ॥ १ ॥
पुंडलिका भुलविलें । तैसें माझिया बाळा केलें ॥ २ ॥
तें गां न चले मजपाशीं । दे गा माझ्या नामयासी ॥ ३ ॥
तुझ्यासंगें जे जे गेले । ते त्वां जिवेंची मारिले ॥ ४ ॥
विठ्ठल म्हणे गोणाबाई । नामा तुझा घेवोनियां जाई ॥ ५ ॥
[1]हातीं धरोनियां आली । दासी जनी आनंदली ॥ ६ ॥

[ २७२ ]

धरा सतराचा हो मेळा । कारखाना जाला गोळा ॥
वाजविती आपुल्या कळा । प्रेमबळा आनंदें ॥ १ ॥
झडतो नामाचा चौघडा । ब्रह्मीं ब्रह्मरूपींचा हुडा ॥
संत ऐकताती कोडां । प्रेमबळा आनंदें ॥ २ ॥
नामा दामा दोनी काळू । नामा विटा दमामे पैलू ॥
चौघी सुना चारी हेलू । कडकडां बोलू उमटती ॥ ३ ॥
गोंदा म्हादा करणी करी । नादें दुमदुमली पंढरी ॥
आऊबाई तुतारी । मंजुळ उमटती स्वरीं ॥ ४ ॥
गोणाबाई नौबतपल्ला । नाद अंबरीं कोंदला ॥
राजाई झांज मंजुळ बोला । मंजुळ स्वर उमटला ॥ ५ ॥
जनाबाई घडयाळ मोगरी । घटका भरतां टोला मारी ॥
काळ व्यर्थचि गेला तरी । गजर आनंदें करी ॥ ६ ॥

[ २७३ ]

विठोबा चला मंदिरांत । गस्त हिंडती बाजारांत ॥ १ ॥
रांगोळी घातली गुलालाची । शेज म्यां केली पुष्पांची ॥ २ ॥

१ नामा घेऊनिया आली । (धु.)

अनुक्रमणिका

समया जळती अर्ध रात्रीं । गळ्यामध्यें माळ मोत्यांची ॥ ३ ॥

नामदेवाला सांपडलें माणिक । घेतलें जनीनें हातांत ॥ ४ ॥

घेउनी गेली राउळांत । गस्त हिंडती हकिमाची बाजारांत ॥ ५ ॥

[२७४]

लोलो लागला अंबेचा । विठाबाई [1]आनंदीचा ॥ १ ॥

आदि ठाणें पंढरपूर । नांदे कान्हाई सुंदर ॥ २ ॥

गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देई मला ॥ ३ ॥

शुद्ध देखोनियां भाव । पोटीं आले नामदेव ॥ ४ ॥

दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद जाला ॥ ५ ॥

[२७५]

नामदेवा पुत्र जाला । विठो बारशासी आला ॥ १ ॥

आंगडें टोपडें पेहरण । शेला [2]मुंडासा घेऊन ॥ २ ॥

[3]माझ्या जीवीच्या जीवना । नाम ठेवी नारायणा ॥ ३ ॥

[4]जनी म्हणे पांडुरंगा । नांव काय ठेवूं सांगा ॥ ४ ॥[5]

[२७६]

हाटीं जायचि तांतडी । नामा होता पंलथडी ॥ १ ॥

म्हणे जा गे आणा त्यासी । नाहीं तरी मी उपवासी ॥ २ ॥

जनी धांवत चालली । मागें विठ्ठल माऊली ॥ ३ ॥

[२७७]

पुंडलिकापाशीं । नामा उभा कीर्तनासीं ॥ १ ॥

येऊनियां पांडुरंग । स्वयें टाळ धरी अंग ॥ २ ॥

गाऊं लागे बरोबरी । नाहीं बोलायाची उरी ॥ ३ ॥

स्वर देवाचा उमटला । दासी जनीनें ओळखिला ॥ ४ ॥

---

१ माऊलीचा (शि. व पं.) २ मुद्रीका (धु. व पं.)

३ सरि बींदली माथलि । नाना रत्ने मुक्ताफळी ॥ ३ ॥ (पं.) प्रतीत जास्त चरण.

४ आवघे आनंदले चित्तीं । पाई लोळण घालीती ॥ ४ ॥ (पं.)

५ म्हणे याचे नाव काये । दासी जनीसी आनंद होये ॥

[ २७८ ]

ऐसी कीर्तनाची गोडी । वैकुंठींहुनी घाली उडी ॥ १ ॥
आपण वैकुंठींच नसे । भक्तापासी जाण वसे ॥ २ ॥
जनी म्हणे कृपानिधी । भक्तभावाची मांदी शोधी ॥ ३ ॥

[ २७९ ]

राधा आणि मुरारी । क्रीडा कुंजवनीं करी ॥ १ ॥
राधा डुलत डुलत । आली निजभुवनांत ॥ २ ॥
सुमनाचे सेजेवरी । राधा आणि तो मुरारी ॥ ३ ॥
आवडीनें विडे देत । दासी जनी उभी तेथ ॥ ४ ॥

[ २८० ]

विठ्ठलाचा छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ १ ॥
हाचि बोला हो सिद्धांत । देव सांगे हो धादांत ॥ २ ॥
जनी म्हणे सांगेन आतां । कृपें ऐका पंढरिनाथा ॥ ३ ॥

[ २८१ ]

जनीनें बोलिलें तैसेंच लिहिलें । साध्य परिसिलें तुम्हीं संतीं ॥ १ ॥
अहो ज्ञानदेवा असावें तुम्हा ठावें । येणें काय लहाणीव आणिली आम्हां ॥ २ ॥
माझी मज आण सांगतें प्रमाण । सेवितें चरण तुझे स्वामी ॥ ३ ॥
जनीचे हो बोल स्वानंदाचें डोल । [1]स्वामि [2]मुखीं बोल दुणावती ॥ ४ ॥
शुद्ध सत्व कागद नित्य करी शाई । अखंडित लिही जनीपाशीं ॥ ५ ॥
हांसोनि ज्ञानदेवें पिटीयेली टाळी । जयजयकार सकळीं केला थोर ॥ ६ ॥

[ २८२ ]

जिव्हा लागली नामस्मरणीं । रित्या माप भरी गोणी ॥ १ ॥
नित्य नेमाची लाखोली । गुरु आज्ञेनें मी पाळी ॥ २ ॥
मज भरंवसा नामाचा । गजर नाम्याच्या दासीचा ॥ ३ ॥
विटेवरी ब्रह्म दिसे । जनी त्याला पाहातसे ॥ ४ ॥

---

१ स्वात्म (शि. व पं.) २ सुखीं (शि. व पं.)

[ २८३ ]

सोंगा सोंगा जाये । नवल जाऊनी हांसताहे ॥ १ ॥
हांसोनियां वडवी टिरी । कोण नाठवी हे परी ॥ २ ॥
हा नाठवी आपणा । म्हणे जनी भुलले जाणा ॥ ३ ॥

[ २८४ ]

देहभाव सर्व जाय । तेव्हां विदेही सुख होय ॥ १ ॥
तया निद्रें जे पहुडले । भवजागृति नाहीं आले ॥ २ ॥
ऐसी विश्रांती लाधली । आनंदकळा संचरली ॥ ३ ॥
त्या एकीं एक होतां । दासी जनी कैंचि आतां ॥ ४ ॥

[ २८५ ]

एके रात्रींचे समयीं । देव आले लवलाही ॥ १ ॥
सुखशेजें पहुडले । जनीसवें गुज बोले ॥ २ ॥
गुज बोलतां बोलतां । निद्रा आली अवचिता ॥ ३ ॥
उठा उठा चक्रपाणि । उजाडलें म्हणे जनी ॥ ४ ॥

[ २८६ ]

पदक माळा सकला दे । [1]तेथें टाकिली गोविंदें ॥ १ ॥
देव तांतडी निघाले । वाकळ घेऊनी पळाले ॥ २ ॥
भक्त येतो महाद्वारीं । चोर पडले देव्हारीं ॥ ३ ॥
नवल जालें पंढरपुरीं । देव राबे दासी घरीं ॥ ४ ॥
त्रिभुवनांत मात गेली । दासी जनी प्रगटली ॥ ५ ॥

[ २८७ ]

पदक विठ्ठलाचें गेलें । ब्राह्मण म्हणती जनीनें नेलें ॥ १ ॥
अगे शिंपियाचे जनी । नेलें पदक दे आणुनी ॥ २ ॥
देवासमोर तुझें घर । तुझें येणें निरंतर ॥ ३ ॥

१ ठेवियेले वो गोविंदें ॥ (भा.)

अनुक्रमणिका

म्यां नेलें नाहीं जाण । सख्या विठोबाची आण ॥ ४ ॥
वाकळ झाडूनि पाहती । पडलें पदक घेऊनि जाती ॥ ५ ॥
जनीवरी आली चोरी । ब्राह्मण करिती मारामारी ॥ ६ ॥
धाविन्नले चाळीस गडी । जनीवरी पडली उडी ॥ ७ ॥[1]
दंडीं लाविल्या काढण्या । विठोबा धांव रे धावण्या ॥ ८ ॥
चंद्रभागें रोविला शूळ । जनाबाईस आलें मूळ ॥ ९ ॥
हातीं टाळी वाजविती । मुखीं विठ्ठल बोलती ॥ १० ॥
विलंब लागला ते वेळीं । म्हणती जनिला द्या रे सुळी ॥ ११ ॥
ऐसा येळकोट केला । जनी म्हणे विठो मेला ॥ १२ ॥
तंव सुळाचें जालें पाणी । धन्य म्हणे दासी जनी ॥ १३ ॥

[२८८]

प्रेमभावें तुम्हीं नाचा । रामरंगें रंगो वाचा ॥ १ ॥
हेंचि मागों देवाजीला । आवडी शांती खरें बोला ॥ २ ॥
जैसी माय तान्हयातें । खेळउनी चुंबी त्यातें ॥ ३ ॥
तेंवि तुम्हीं संतजना । सर्वां धरावी भावना ॥ ४ ॥
हरि कोठवळा जाला । म्हणे जनी भक्तीं केला ॥ ५ ॥

[२८९]

अर्थ जे काढिती उपनिषदामाजी । सांडोनियां गोड भाजी घेती माठ ॥ १ ॥
भूगोलाचा स्वामी सुप्रसन्न जाला । त्यासी मागे पाला भाजीचा तो ॥ २ ॥
पुंडलिकें धन जोडिलें असतां । प्रार्थोनियां देतां न घेती हे ॥ ३ ॥
मग [2]गडी हो पाहें देवचि येथोनी । जवळी होती जनी फावलें तिये ॥ ४ ॥

[२९०]

ऋषि म्हणती धर्मदेवा । आमचा आशीर्वाद घ्यावा ॥ १ ॥
पांडवपालक गोविंद । तिहीं लोकीं गाजे ब्रिद ॥ २ ॥

१ चरण ७, ९, १०, ११ व १२ हे (धु.) प्रतीमध्ये नाहीत.
२ दगडी (शि. व पं.)

भक्तिभावें केला वश्य । हरि सांभाळी तयास ॥ ३ ॥
रात्रंदिवस तुम्हांपासी । दुजा ठाव नाहीं त्यासी ॥ ४ ॥
देव द्रौपदीतें सांभाळी । उभा पाठीशीं वनमाळी ॥ ५ ॥
वनीं सांभाळी पांडवासी । सुदर्शन त्याजपाशीं ॥ ६ ॥
हरिभक्ति जाहला ऋणी । म्हणे नामयाची जनी ॥ ७ ॥

[२९१]

वेदांतीं हें बोलिलें । सिद्धांतीं हें नेमियेलें ॥ १ ॥
लागा लागा भक्तिवाटा । धरा हेचि नेमनिष्ठा ॥ २ ॥
वेदबाह्य तें कर्म । सांडी न करीं अधर्म ॥ ३ ॥
तोचि एक होय ज्ञानी । देवनिष्ठ म्हणे जनी ॥ ४ ॥

[२९२]

जनीचें बोलणें वाची नित्य कोणी । तयाचे आंगणीं तिष्ठतसे ॥ १ ॥
जनीचिया पदा अखंडीत गाये । तयाचे मी पायें वंदी माथा ॥ २ ॥
जनीचें आवडे जयासी वचन । तयासी नारायण कृपा करी ॥ ३ ॥
पांडुरंग म्हणे ऐक ज्ञानदेवा । ऐसा वर द्यावा जनीसाठीं ॥ ४ ॥

### मागणे

[२९३]

ऐसा वर देई हरी । गाई नाम निरंतरीं ॥ १ ॥
पुरवीं आस माझी देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ २ ॥
हेंचि आहे माझे मनीं । कृपा करी चक्रपाणि ॥ ३ ॥
रूप न्याहाळूनियां डोळां । मुखीं नाम लागो चाळा ॥ ४ ॥
उदाराच्या राया । दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

[२९४]

साधु आणि संत । जन्म द्यावा जी कलींत ॥ १ ॥
मागणें तें हेंचि देवा । कृपा करी हो केशवा ॥ २ ॥

संत दयाळ परम । तया साक्षी आत्माराम ॥ ३ ॥
जनी म्हणे ऐसे साधु । तयापाशीं तूं गोविंदु ॥ ४ ॥

[२९५]

विटेवरी ब्रह्म दिसे । जनी त्याला पाहातसे ॥ १ ॥
देव भावाचा अंकित । जाणे दासाचें तें चित्त ॥ २ ॥[1]
भक्ति जनी मागे देवा । तिचा मनोरथ पुरवा ॥ ३ ॥

[२९६]

देवा देई गर्भवास । तरीच पुरेल माझी आस ॥ १ ॥
परि हे देखा रे पंढरी । सेवा नामयाचे द्वारीं ॥ २ ॥
[2]करीं पक्षि कां सूकर । श्वान श्वापद मार्जार ॥ ३ ॥
ऐसा हेत माझे मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[२९७]

ऐसा पुत्र देई संतां । तरी त्या आवडी पंढरिनाथा ॥ १ ॥
गीता नित्य नेमें । वाची ज्ञानेश्वरी प्रेमें ॥ २ ॥
संतांच्या चरणा । करी मस्तक ठेंगणा ॥ ३ ॥
कन्या व्हावी भागिरथी । तुझें प्रेम जिचे चित्तीं ॥ ४ ॥
ऐसे करी संतजना । दासी जनीच्या निधाना ॥ ५ ॥

[२९८]

माझें दुःख नाशी देवा । मज सुख दे केशवा ॥ १ ॥
आम्हां सुख ऐसें देईं । तुझी कृपा विठाबाई ॥ २ ॥
चरणीं अनन्य शरण । त्यासी नाहीं जन्ममरण ॥ ३ ॥
जनी म्हणे हेंचि मागें । धण्या सर्व तुज सांगें ॥ ४ ॥

---

१ चरण २ व ३ हे (धु.) प्रतीमध्ये नाहीत. त्याऐवजी खालील चरण आढळतात--
पुर आला भीवरेसी । पानी लागले पायेरिसी ॥ २ ॥
संत सज्जन मिळाले । धावोनी नाम्यापासी आले ॥ ३ ॥
णामा पुसे वीठोवासी । उतार द्यावा भीवरसी ॥ ४ ॥
दीन्न वछंळा माहाराजा । जनी म्हणे केले काजा ॥ ५ ॥
२ मज करी हे पंढरी । आथवा नामयाचे घरी ॥ ३ ॥ (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[२९९]

रुक्माई आईचें आहे ऐसें [1]भाग्य । असावें आरोग्य चिरकाल ॥ १ ॥
सख्या पुंडलिका आवडतें स्थळ । असावें चिरकाळ स्वस्तिक्षेम ॥ २ ॥
अहो संतजन आवडतें धन । असावें कल्याण चिरकाळ ॥ ३ ॥
जन्मोजन्मीं हेंचि [2]मागें गोविंदासी । म्हणे जनी दासी नामयाची ॥ ४ ॥

[३००]

परधन कामिनी समूळ नासी मना । नाहीं हे वासना माया केली ॥ १ ॥
[3]तृष्णा हे अधम न व्हावी मजला । प्रेमाचा जिव्हाळा देई तुझ्या ॥ २ ॥
निरपेक्ष वासना दे गा मज देवा । आणि तुझी सेवा आवडीची ॥ ३ ॥
शांतीचीं भूषणें मिरविती अंगीं । वैष्णव आणि योगी म्हणावे ते ॥ ४ ॥
असो तो अकुळी हो का भलते याती । माथां वंदी प्रीती जनी त्यासी ॥ ५ ॥

[३०१]

द्वारकेच्या राया । बुद्धि दे गा नाम गाया ॥ १ ॥
मतिमंद तुझी दासी । ठाव देईं चरणांपासीं ॥ २ ॥
तुझे पदरीं पडलें खरी । आतां सांभाळ करी हरी ॥ ३ ॥
न कळे हरीची करणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

## संतस्तुती

[३०२]

संतांचा तो संग नव्हे भलतैसा । पालटावी दशा तात्काळिक ॥ १ ॥
चंदनाचे संगें पालटती झाडें । दुर्बळ लांकडें देवामाथां ॥ २ ॥
हें कां ऐसें व्हावें संगती स्वभावें । आणिके न पालटावें देहालागीं ॥ ३ ॥
तैसा निःसंगाचा संग अग्रगणी । जनी ध्याय मनीं ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

[३०३]

संत हे कोण तरी देवाचे हे डोळे । पूजेविण आंधळे देवाचिये ॥ १ ॥
कोण्या नेत्रें देव पाहे तुजकडे । यासाठीं आवडे संत करी ॥ २ ॥

---

१ सौभाग्य (शि. व पं.) २ मागावे देवासी।
३ लोभ तृष्ण आशा भायार नाही परी। आर्जव ते करी देवाजीचे ॥ २ ॥ (शि. व पं.)

संत ऐसें करी देवाचें काम । सांडियेल्या ध्यान कोण ऐके ॥ ३ ॥
संत पुससी तरी देवाचे ते पाय । आगमा न गमे सोय मागाडीये ॥ ४ ॥
संत पुससी तरी देवाचें तें पोट । धरुनियां बोट दावितो हरी ॥ ५ ॥
संत म्हणसी तरी देवाचा हा गळा । जेणें रस आगळा वेदादिकां ॥ ६ ॥
संत जरी पुससी तरी देवाचें वदन । माझें तें वचन संत जाले ॥ ७ ॥
परादीया चारी सांडूनि मीपणी । संत बोले वाणी विठोबाची ॥ ८ ॥
परेचिया चारी आनंदा माझारीं । संत जाले अंतरीं पडजीभ देवा ॥ ९ ॥
क्षर जे नासिलें अक्षर ते काढिलें । निःशब्दाचें जाले बोले संत ॥ १० ॥
शब्द तो उडाला नाद तो बुडाला । भेद तो आटला मायाभावी ॥ ११ ॥
विठो वटावरी पारंबिया जाले । केश ते वाढले माय संत ॥ १२ ॥
कुरळ होऊनियां देती ते सुढाळ । म्हणे जनी वोवाळ जीवेंभावें ॥ १३ ॥

[ ३०४ ]

भक्तामाजीं अग्रगणी । पुंडलिक महामुनि ॥ १ ॥
त्याचे प्रसादें तरले । साधुसंत उद्धरिले ॥ २ ॥
तोचि प्रसाद आम्हांसी । विटेवरी हृषिकेशी ॥ ३ ॥
पुंडलिक बापमाय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

[ ३०५ ]

अळंकापुरवासिनी बैसे माझ्या मनीं । सन्मुख इंद्रायणी वाहातसे ॥ १ ॥
ज्ञानाबाई आई आर्त तुझे पायीं । धांवोनियां येई दुडदुडा ॥ २ ॥
बहू कासाविस होतो माझा जीव । कळवळयाची कीव येऊं देई ॥ ३ ॥
नामयाची जनी आपंगावी आपुली । याहिं सांभाळिली मायबापें ॥ ४ ॥

[ ३०६ ]

आंधळ्याची काठी । अडकली कवणे वेठीं ॥ १ ॥
माझिये हरणी । गुंतलीस कोणे रानीं ॥ २ ॥
मुकें मी पाडस । चुकलें भोंवें पाहे वास ॥ ३ ॥
तुजवीण काय करूं । प्राण किती कंठी धरूं ॥ ४ ॥

अनुक्रमणिका

आतां जीव जाऊं पाहे । धांव घाली माझे आये ॥ ५ ॥
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ॥ ६ ॥

[ ३०७ ]

पाहतां पंढरीच्या राया । त्याच्या मुक्ति लागे पायां ॥ १ ॥
पुरुषार्थे चारी । त्याचें मोक्ष आर्जव करी ॥ २ ॥
धन संपत्तीचा दाता । होय पाहतां पंढरिनाथा ॥ ३ ॥
संताचे चरणीं । लोळे नाचे दासी जनी ॥ ४ ॥

[ ३०८ ]

विष्णुमुद्रेचा अंकिला । तोचि वैष्णव एक भला ॥ १ ॥
अहं जाळोनी अंगारा । सोहं भस्मीं तीर्थ सारा ॥ २ ॥
विष्णु माया द्वारावती । भक्ती मुद्रा त्या मिरवती ॥ ३ ॥
पंचायतन पूजी भावें । अहं सोहं भस्मीं नांवें ॥ ४ ॥
प्रेमतुळसी कानीं । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

[ ३०९ ]

वैष्णवं तो एक इतर तीं सोंगें । ठसे देउनी अंगें चितारिती ॥ १ ॥
जिचे योनि जन्मला तिसी दंडूं लागला । तीर्थरूप केला देशधडी ॥ २ ॥
नाइकोनी ब्रह्मज्ञान जो का दुराचारी । अखंड द्वेष करी सज्जनांचा ॥ ३ ॥
विद्येच्या अभिमानें नाईके कीर्तन । पाखांडी हें म्हणे करिती कायी ॥ ४ ॥
पंचरस पात्रा कांता हे बुडविती । उद्धरलों म्हणती आम्ही संत ॥ ५ ॥
कीर्तनाचा द्वेष करी तो चांडाळ । तयाचा विटाळ मातंगीसी ॥ ६ ॥
वैष्णव तो एक चोखामेळा महार । जनी म्हणे निर्धार केला संतीं ॥ ७ ॥

[ ३१० ]

पंढरीचा वारकरी । त्याचे पाय माझे शिरीं ॥ १ ॥
हो कां उत्तम चांडाळ । पायीं ठेवीन कपाळ ॥ २ ॥

अनुक्रमणिका

वंद्य होय हरिहरा । सिद्ध मुनि ऋषीश्वरा ॥ ३ ॥
मुखीं नाम गर्जे वाणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[३११]

आले वैष्णवांचे भारे । दिले हरिनाम नगारे ॥ १ ॥
अवघी दुमदुमली पंढरी । कडकडाट गरुडपारीं ॥ २ ॥
टाळ मृदंग धुमाळी । रंगणीं नाचे वनमाळी ॥ ३ ॥
ऐसा आनंद सोहळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

[३१२]

स्त्री जन्म म्हणवुनी न व्हावें उदास । साधुसंतां ऐसें केलें मज ॥ १ ॥
संतांचे घरची दासी मी अंकिली । विठोबानें दिली प्रेमकळा ॥ २ ॥
विदूर सात्विक माझिये कुळीचा । अंगिकार त्याचा केला देवें ॥ ३ ॥
न विचारितां कुळ गणिका उद्धरिली । नामें सरती केली तिहीं लोकीं ॥ ४ ॥
ऋषींचीं कुळें उच्चारिलीं जेणें । रौरवीं तेणें वस्ती केली ॥ ५ ॥
नामयाची जनी भक्तीतें सादर । माझें तें साचार विटेवरी ॥ ६ ॥

[३१३]

संतभार पंढरींत । कीर्तनाचा गजर होत ॥ १ ॥
तेथें असे देव उभा । जैसी समचरणांची शोभा ॥ २ ॥
रंग भरे कीर्तनांत । प्रेमें हरिदास नाचत ॥ ३ ॥
सखा विरळा ज्ञानेश्वर । नामयाचा जो जिव्हार ॥ ४ ॥
ऐशा संता शरण जावें । जनी म्हणे त्याला ध्यावें ॥ ५ ॥

### आत्मस्वरूपस्थिती

[३१४]

सांवळी ते मूर्ति हृदयीं बिंबली । [१]देहो बुद्धि पालटली माझी साची ॥ १ ॥
[२]धन्य माझी भक्ति धन्य माझा भाव । हृदयीं पंढरीराव राहतसे ॥ २ ॥

---

१ तरिच पालटली देहेबुद्धी ॥ (धु. व शि.)
२ धन्य माझा जन्म धन्य माझा वौंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ २ ॥ (धु.)

अनुक्रमणिका

आशा तृष्णा कैशा मावळल्या दोन्हीं । चिंता विठ्ठलाचरणीं जडोनि ठेली ॥ ३ ॥
नामयाचे जनी विश्रांति पैं जाली । हृदयीं राहिली विठ्ठलमूर्ति ॥ ४ ॥[1]

[ ३१५ ]

वामसव्य दोहींकडे । देखें कृष्णाचें रूपडें ॥ १ ॥
आतां खाले पाहूं जरी । चहुंकडे दिसे हरी ॥ २ ॥
चराचरीं जें जें दिसे । तें तें अविद्याची नासे ॥ ३ ॥
माझें नाठवे मीपण । तेथें कैचें दुजेपण ॥ ४ ॥
सर्वांठायीं पूर्ण कळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ५ ॥

[ ३१६ ]

धरिला पंढरीचा चोर । गळां बांधोनियां दोर ॥ १ ॥
[2]हृदय बंदिखाना केला । आंत विठ्ठल कोंडिला ॥ २ ॥
शब्दें केली [3]जवाजुडी । विठ्ठल पायीं घातली बेडी ॥ ३ ॥
सोहं शब्दाचा मारा [4]केला । विठ्ठल काकुलती आला ॥ ४ ॥
जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडी मी तुला ॥ ५ ॥

[ ३१७ ]

दळूं कांडूं खेळूं । सर्व पाप ताप जाळूं ॥ १ ॥
सर्व जीवामध्यें पाहूं । एक आम्ही होउनी राहूं ॥ २ ॥
जनी म्हणे ब्रह्म होऊं । ऐसें सर्वांघटीं पाहूं ॥ ३ ॥

---

१ हा अभंग खालीलप्रमाणेंही आढळतो--
मांवळी श्रीमूर्ति हृदयीं बिंबली । तरी पालटली देहबुद्धि ॥ १ ॥
धन्य माझा जन्म धन्य माझा भाव । ध्यानीं केशीराज नांदतसे ॥ २ ॥
आशा तृष्णा कैशा मावळल्या देहीं । बुडोनियां पांयीं ठेले चित्त ॥ ३ ॥
जनी म्हणे ऐसी विश्रांती पैं झाली । हृदयीं न्याहाळी केशीराजा ॥ ४ ॥
२ हृदयीं बंदीवास (धु.), बंदीवान
३ जडाजुडी (धु.)
४ दीला (धु.)



अनुक्रमणिका

३१८ ]

चरण विठोबाचे देखिले । साही रिपु हारपले ॥ १ ॥
नाहीं नाहीं म्हणती आम्ही । सांगसी त्या लागूं कामीं ॥ २ ॥
नाहीं तरी जाऊं देशीं । जनी नामयाची दासी ॥ ३ ॥

[ ३१९ ]

भ्रांती माझें मन प्रपंचीं गुंतलें । श्रवण मनन होऊनि ठेलें ॥ १ ॥
[1]बापें बोधिलें बापें बोधिलें । बोधुनी कैसी तद्रूप जालें ॥ २ ॥
निजध्यासें कैसा अवघाचि सांपडला । [2]कीं विश्वरूपीं देखिला बाईयांनो ॥ ३ ॥
नामयाची जनी स्वयंबोध जाला । अवघाचि पुसिला ठाव देखा ॥ ४ ॥

[ ३२० ]

संतमहानुभाव येती दिगंबर । नम्रतेचें घर विरळा जाणे ॥ १ ॥
निवालें मीपण तें जें ठायीं नाहीं । सोहं शब्द सोई तेथें कैंची ॥ २ ॥
पाहतां हा कोण दावितां हा कोण । पाहतां दावितां हे खूण विरळा जाणे ॥ ३ ॥
नामयाची जनी वस्तु पैं जाली । तेचि होउनि ठेली तदाकार ॥ ४ ॥

[ ३२१ ]

त्या वैष्णवांच्या माता । तो नेणें देव ताता ॥ १ ॥
तिहीं कर्मं हें पुसिलें । अकर्म समूळ नाहींसें केलें ॥ २ ॥
कानाचा हो कान । जालें धरूनियां ध्यान ॥ ३ ॥
डोळियाचा हो डोळा । करूनि जालें प्रेमसोहळा ॥ ४ ॥
तोहि वसे नरदेहीं । जनी दासी वंदी पायीं ॥ ५ ॥

[ ३२२ ]

देहभाव पूर्ण जाय । तेव्हां [3]हें धैर्य सुख होय ॥ १ ॥
तयां निद्रे जे निजले । [4]भाव जागृती नाहीं आले ॥ २ ॥

१ बोधें बोधलें बोध (धु.) २ वीश्वरुप देखीले बाईयेवो ॥ (धु.)
३ विदेही सुख होय (शि. व पं.) ४ भव (शि. व पं.)

ऐसी विश्रांति लाधली । आनंद कळा संचरली ॥ ३॥
तेथें सर्वांग सुखी जालें । लिंगदेह विसरलें ॥ ४॥
त्या एकीं एक होतां । दासी जनी नाहीं आतां ॥ ५॥

[ ३२३ ]

[1]जोड जाली रे [2]शिवासी । भ्रांत फिटली रे जिवाची ॥ १॥
आनंदची आनंदला । आनंद बोधचि बोधला ॥ २॥
आनंदाची लहरी उठी । ब्रह्मानंदें गिळिला पोटीं ॥ ३॥
एकपण जेथें पाहीं । तेथें [3]विज्ञप्ति उरली नाहीं ॥ ४॥
ऐसी सद्‌गुरुची करणी । दासी जनी विठ्ठल चरणीं ॥ ५॥

[ ३२४ ]

बाई मी लिहिणें शिकलें सद्‌गुरुरायापाशीं ॥ धृ० ॥
ब्रह्मीं जाला जो उल्लेख । तोचि नादाकार देख ॥
पुढें ओंकाराची रेख । तुर्या म्हणावें तिसी ॥ १॥
माया महत्‌तत्त्वाचें सुभर । तीन पांचाचा प्रकार ॥
पुढें पंचविसाचा भार । गणित केलें छत्तीस ॥ २॥
बारा सोळा एकविस हजार । आणिक सहाशाचा उबार ॥
माप चाले सोहंकार । ओळखिलें बावन्न मात्रेसी ॥ ३॥
चार खोल्या चार घरीं । चौघे पुरुष चार नारी ॥
ओळखुनी सर्वांशीं अंतरीं । राहिलें पांचव्यापासीं ॥ ४॥
पांच शहाणे पांच मूर्ख । पांच चाळक असती देख ॥
पांच दरोडेखोर आणिक । ओळखिलें दोघांसी ॥ ५॥
एक बीजाचा अंकूर । होय वृक्षासी विस्तार ॥
शाखा पत्रें फळ फुलभार । बीजापोटीं सामावें ॥ ६॥
कांतीण तंतूशी काढून । वरी क्रीडा करिती जाण ॥
शेवटीं तंतूशी गिळुन । एकटी राहे आपैसी ॥ ७॥
वेदशास्त्र आणि पुराणा । याचा अर्थ आणितां मना ॥
कनकी नगाच्या भूषणा । अनुभव वाटे जीवासी ॥ ८॥

१ जोडी (पं.) २ शीवाची (शि. व पं.) ३ दीप्ती (शि. व पं.)

नामदेवाचे प्रताप । शिरीं विठोबाचा हात ॥
जनी म्हणे केली मात । पुसा ज्ञानेश्वरासी ॥ ९ ॥

[ ३२५ ]

नम्रतेविण योग्यता मिरविती । ते केवी पावती ब्रह्मसुख ॥ १ ॥
लटिकें नेत्र लावुनि ध्यान पैं करिती । ते केवी पावती केशवातें ॥ २ ॥
एक संत म्हणविती नग्न पैं हिंडती । अंतरीची स्थिती खडबड ॥ ३ ॥
जालेपणाचे गुण दिसताती सगुण । वस्तु ते आपण होऊनि ठेली ॥ ४ ॥[1]
सागरीं गंगा मिळोनि गेली जैसी । परतोनियां तियेसी नाम नाहीं ॥ ५ ॥
नामयाची जनी निर्गुणीं बोधिली । ठेवा जो लाधली पांडुरंग ॥ ६ ॥

[ ३२६ ]

शब्दांचें ब्रह्म लौकिक हो दिसे । जैसे ते फांसे मईंदाचे ॥ १ ॥
ज्ञानी तो कोण विज्ञानी तो कोण । दोहींचा आपण साक्षभूत ॥ २ ॥
स्वयें सुखें धाला आपणांतें विसरला । तो योगि राहिला नाहीं येथें ॥ ३ ॥
नामयाची जनी सागरीं मिळाली । [2]परतोनि मुळीं केवी जाय ॥ ४ ॥

[ ३२७ ]

अखंडित ध्यानीं । पांडुरंग जपे वाणी ॥ १ ॥
पांडुरंग नाम जप । हेंचि माझें महा तप ॥ २ ॥
ऐसें आलें प्रत्ययासी । सहज तेणें तत्वमसी ॥ ३ ॥
पावलिया हो स्वपद । सहज विराला तो शब्द ॥ ४ ॥
संदेह अवघाचि फिटला । जनी म्हणे उदयो जाला ॥ ५ ॥

[ ३२८ ]

देव खातें देव पितें । देवावरी मी निजतें ॥ १ ॥
देव देतें देव घेतें । देवासवें व्यवहारितें ॥ २ ॥
देव येथें देव येथें । देवाविणें नाहीं रितें ॥ ३ ॥
जनी म्हणे विठाबाई । भरूनि उरलें अंतरबाही ॥ ४ ॥

१ हा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही. २ स्वये सुख धाली पांडुरंग ॥ (धु.)

[ ३२९ ]

श्रीमूर्ति असे बिंबली । तरी हे देहस्थिति पालटली ॥ १ ॥
धन्य माझा इह जन्म । हृदयीं विठोबाचें नाम ॥ २ ॥
तृष्णा आणि आशा । पळून गेल्या दाही दिशा ॥ ३ ॥
नामा म्हणे जनी पाहे । द्वारीं विठ्ठल उभा आहे ॥ ४ ॥

[ ३३० ]

जनी दृष्टी पाहे । जिकडे तिकडे हरी आहे ॥ १ ॥
मग म्हणे वो देवासी । तुमच्या नामयाची दासी ॥ २ ॥
नामयाचा प्रसाद । जाला जनीला आनंद ॥ ३ ॥

[ ३३१ ]

जाली पूर्णकृपा आहे । ऐसा पूर जो कां पाहे ॥ १ ॥
ऐसा पूर जो कां पाहे । गुरुपुत्र तोचि होये ॥ २ ॥
पूर्णपदीं जो स्थापिला । जनी म्हणे धन्य जाला ॥ ३ ॥

[ ३३२ ]

नित्य हातानें वारावें । हृदय अंतरीं प्रेरित जावें ॥ १ ॥
ऐसा स्वरूपाचा पूर । आला असे नेत्रावर ॥ २ ॥
स्वरूपाचा पूर आला । पाहतां डोळा झाकुळला ॥ ३ ॥
जनी म्हणे ऐसा पूर । पाहे तोचि रघुवीर ॥ ४ ॥

[ ३३३ ]

गगन सर्वत्र तत्वता । त्यासी चिखल लावूं जातां ॥ १ ॥
तैसा जाण पांडुरंग । भोग भोगुनी निःसंग ॥ २ ॥
सिद्ध सनकादिक । गणगंधर्व अनेक ॥ ३ ॥[१]

---

१ हा चरण (शि. व पं.) मध्ये नाही.
खालील चरण (शि.) मध्ये वेगळा मिळतो—
अविद्येने नवल केले । मिथ्या देह सत्य केले ॥

अनुक्रमणिका

जैसी वांझेची संतती । तैसी संसारउत्पती ॥ ४ ॥
तेथें कैचें धरिसी ध्यान । दासी जनी ब्रह्म पूर्ण ॥ ५ ॥

[ ३३४ ]

काळाचिये लेख । नाहीं ब्रह्मा विष्णु मुख्य ॥ १ ॥
युग एक लव झडे । तोही न सरे काळापुढें ॥ २ ॥
अविद्येनें नवल केलें । मिथ्या देह सत्य केलें ॥ ३ ॥[1]
महीपाळ स्वर्गपाळ । तेही ग्रासले समूळ ॥ ४ ॥
वर्म चुकलीं वापुडीं । दासी जनी विठ्ठल जोडी ॥ ५ ॥

[ ३३५ ]

रक्तवर्ण त्रिकुट स्थान । श्रीहाट पाहे श्वेतवर्ण ॥ १ ॥
श्यामवर्ण तें गोलाट । निळबिंदू औट पीट ॥ २ ॥
वरी भ्रमरगुंफा पाहे । दशमद्वारीं गुरु आहे ॥ ३ ॥
नवद्वारातें भेदुनी । दशमद्वारीं गेली जनी ॥ ४ ॥

[ ३३६ ]

शून्यावरी शून्य पाहे । तयावरी शून्य आहे ॥ १ ॥
प्रथम शून्य रक्तवर्ण । त्याचें नांव अधःशून्य ॥ २ ॥
उर्ध्वशून्य श्वेतवर्ण । मध्यशून्य श्यामवर्ण ॥ ३ ॥
महाशून्य वर्ण नीळ । त्यांत स्वरूप केवळ ॥ ४ ॥
अनुहात घंटा श्रवणीं । ऐकुनी विस्मित जाहली जनी ॥ ५ ॥

[ ३३७ ]

ज्योत पहा चमकली । काय सांगूं त्याची बोली ॥ १ ॥
प्रवृत्ति निवृत्ति दोघीजणी । लीन होती त्याच्या चरणीं ॥ २ ॥
परा पश्यंती मध्यमा । वैखरीची जाली सीमा ॥ ३ ॥
चारी वाचा कुंठित जाहली । सोहं ज्योत प्रकाशली ॥ ४ ॥
ज्योत परब्रह्मीं जाणा । जनी म्हणे निरंजना ॥ ५ ॥

---

१ हा चरण (शि.) प्रतीत नाही. त्या चरणाऐवजी--
सिद्धसनकादिक गणगंधर्व अनेक । हा वेगळा चरण सापडतो.

अनुक्रमणिका

[ ३३८ ]

ज्योत परब्रह्मीं होय । खेचरी दर्पणीनें पाहे ॥ १ ॥
ईडा पिंगळा सुशुम्ना । तिन्ही पाहे हृदयभुवना ॥ २ ॥
हळू हळू रीघ करी । सूक्ष्म हृदय अंतरीं ॥ ३ ॥
हृदयकमलावरी जासी । जनी म्हणे मुक्त होसी ॥ ४ ॥

[ ३३९ ]

नाहीं आकाश घडणी । पाहा स्वरूपाची खाणी ॥ १ ॥
स्वरूप हे अगोचर । गुरु करिती गोचर ॥ २ ॥
गोचर करिताती जाणा । दृष्टि दिसे निरंजना ॥ ३ ॥
नाहीं हात पाय त्यासी । जनी म्हणे स्वरूपासी ॥ ४ ॥

[ ३४० ]

माझे मनीं जें जें होतें । तें तें दिधलें अनंतें ॥ १ ॥
देह नेउनी विदेही केलें । शांति देउनी मीपण नेलें ॥ २ ॥
मूळ नेलें हें क्रोधाचें । ठाणें केलें विवेकाचें ॥ ३ ॥
निज पदीं दिधला ठाव । जनी म्हणे दाता देव ॥ ४ ॥

[ ३४१ ]

धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ १ ॥
कामधाम माझें केशवाचे पायीं । दिननिशीं पाहे हारपली ॥ २ ॥
शुक सनकादिकां जेणें सुखी केलें । तें सुख राहिलें माझ्या मनीं ॥ ३ ॥
जनी म्हणे जगीं अलभ्य लाभ झाला । हरी सांपडला विटेवरी ॥ ४ ॥

### जनाबाईचा निश्चय

[ ३४२ ]

दळितां कांडितां । तुज गाईन अनंता ॥ १ ॥
न विसंबें क्षणभरी । तुझें नाम गा मुरारी ॥ २ ॥
नित्य हाचि कारभार । मुखीं [1]हरि निरंतर ॥ ३ ॥

१ राही

मायबाप बंधुबहिणी । तूं बा सखा चक्रपाणि ॥ ४ ॥
लक्ष लागलें चरणासी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥[1]

[ ३४३ ]

चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवर पाहूं ॥ १ ॥
हातीं टाळी मुखीं हरी । गात जाऊं महाद्वारीं ॥ २ ॥
स्नान करूं भिवरेसी । पुंडलिका पायांपाशीं ॥ ३ ॥
डोळे भरून पाहूं देवा । तेणे विसरूं देहभावा ॥ ४ ॥
ऐसा निश्चय करूनी । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

[ ३४४ ]

जनी म्हणे नामयासी । चला जाऊं पंढरीसी ॥ १ ॥
आला विषयाचा कंटाळा । जाऊं भेटूं त्या गोपाळा ॥ २ ॥
आवडीनें जगजेठी । गळां घालूनियां मिठी ॥ ३ ॥[2]
आवडीनें गुज कानीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[ ३४५ ]

तुझा लोभ नाहीं देवा । तुझी करीना मी सेवा ॥ १ ॥
नाहीं अंगीं थोरपण । मिथ्या धरीसी गुमान ॥ २ ॥
रागा येउनी काय करिशी । तुझें बळ आम्हांपाशीं ॥ ३ ॥
नाहीं सामर्थ्य तुज हरी । जनी म्हणे धरिली चोरी ॥ ४ ॥

[ ३४६ ]

तुझे चरणीं घालूनि मिठी । चाड नाहीं रे वैकुंठीं ॥ १ ॥
सर्वभावें गाईन नाम । सखा तूंचि आत्माराम ॥ २ ॥
नित्य पाय वंदिन माथा । तेणें नासे भवभय व्यथा ॥ ३ ॥
रूप न्याहाळीन दृष्टी । सर्व सुखें सांगेन गोष्टी ॥ ४ ॥
दीनानाथा चक्रपाणि । दासी जनी लावी ध्यानीं ॥ ५ ॥

---
१ (धु.) प्रतीत काही ठिकाणी हा चरण नाही. २ हा चरण (धु.) प्रतीत नाही.

अनुक्रमणिका

[ ३४७ ]

आतां भीत नाहीं देवा । आदि अंत तुझा ठावा ॥ १ ॥
जालें नामाचेनि बळकट । तेणें वैकुंठ पायवाट ॥ २ ॥
ज्ञान वैराग्य विवेक बळें । तें तंव आम्हांसवें खेळे ॥ ३ ॥
दया क्षमा आम्हांपुढें । जनी म्हणे जाले वेडे ॥ ४ ॥

[ ३४८ ]

माझें चित्त तुझे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥ १ ॥
मुखीं उच्चार नामाचा । काया मनें जीवें वाचा ॥ २ ॥
धरणें तें ऐसें धरूं । जनी म्हणे विठ्ठल स्मरूं ॥ ३ ॥

[ ३४९ ]

आम्ही पातकांच्या राशी । आलों तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥
मना येईल तें तूं करी । आतां तारी अथवा मारी ॥ २ ॥
जनी म्हणे सृष्टीवरी । एक अससी तूं बा हरी ॥ ३ ॥

[ ३५० ]

मना लागो हाचि धंदा । रामकृष्ण हरि गोविंदा ॥ १ ॥
जिव्हे करूं नित्य नेम । सदा विठोबाचें नाम ॥ २ ॥
नामामध्यें नामसार । जप करी निरंतर ॥ ३ ॥
म्हणे जनी राम म्हणा । मंत्र सकळ हा जाणा ॥ ४ ॥

[ ३५१ ]

स्मरण तें हेंचि करूं । वाचे रामराम स्मरूं ॥ १ ॥
आणिक न करूं तें काम । वाचे धरूं हाचि नेम ॥ २ ॥
सुकृताचें फळ । जनी म्हणे हें केवळ ॥ ३ ॥

[ ३५२ ]

मनामागें मन लावूं । तेथें सर्व सुख पाहूं ॥ १ ॥
मग आम्हा काय उणें । दया करी नारायण ॥ २ ॥
जनी म्हणे ऐसें मन । करूं देवा हो आधिन ॥ ३ ॥

[ ३५३ ]

[1]सत्त्व रज तमें असें हें बांधीलें । शरीर दृढ जालें अहंकारें ॥ १ ॥
सांडी अहंकार धरीं दृढभाव । हृदयीं पंढरिराव धरोनियां ॥ २ ॥
नामयाची जनी भक्तीसी भुलली । ते चरणीं राहिली विठोबाचे ॥ ३ ॥

[ ३५४ ]

नित्य सारूं हरीकथा । तेथें काळ काय जातां ॥ १ ॥
वनवासी कां धाडिलें । कृपाळें बा हो विठ्ठलें ॥ २ ॥
आशा मनिशा तृषा तिन्ही । ह्या तों ठेविल्या बांधोनि ॥ ३ ॥
काम क्रोध विषय जाले । हें तों मोहोनि राहिले ॥ ४ ॥
अवलोकुनि कृपादृष्टि । जनी म्हणे देई भेटी ॥ ५ ॥

[ ३५५ ]

करूं हरीचें कीर्तन । गाऊं निर्मळ ते गुण ॥ १ ॥
सदा धरूं संतसग । मुखीं म्हणूं पांडुरंग ॥ २ ॥
करूं जनांवरी कृपा । रामकृष्ण म्हणवूं लोकां ॥ ३ ॥
जनी म्हणे [2]किती करूं । नाम वळकट धरूं ॥ ४ ॥

[ ३५६ ]

आनंदाचे डोहीं । जो कां समुळ जाला नाहीं ॥ १ ॥
कीर्तनें जन्मला । हरीभक्तीनें शिंपिला ॥ २ ॥
आळवितसे अंतवरी । वाचा नाम लाहो करी ॥ ३ ॥
समूळ जाला नाहीं । देहे जनी विठ्ठल पायीं ॥ ४ ॥

[ ३५७ ]

आम्ही स्वर्ग [3]लोक मानूं जैसा ओक । देखोनियां सुख [4]पंढरीचे ॥ १ ॥
नलगे वैकुंठ [5]न वांछुं कैलास । सर्वस्वाची आस विठोपायीं ॥ २ ॥

---

१ सत्व रज तम बांधीलें शरीर । अहंकाराचे घर दृढ जाले ॥ १ ॥ (शि. व पं.)
२ कीर्ति (शि. व पं.) ३ सुख (शि., पं. व धु.) ४ वैकुंठीचे ५ न वाणु कैलास (धु.)

अनुक्रमणिका

नलगे संतति धन आणि मान । एक करणें ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥
[1]सत्य कीं मायीक आमुचें बोलणें । तुमची तुम्हा आण सांगा हरी ॥ ४ ॥
जीवभाव आम्ही सांडुं ओवाळुनी । [2]म्हणे दासी जनी नामयाची ॥ ५ ॥

[३५८]

आतां येतो स्वामी आम्ही । कृपा असो द्यावी तुम्ही ॥ १ ॥
बहु दिवस सांभाळ केला । पुन्हा जन्म नाहीं दिला ॥ २ ॥
थोर सुकृताच्या राशी । तुमचे पाय मजपाशीं ॥ ३ ॥
ऐसा नामदेव बोले । ऐकोनि दासी जनी डोले ॥ ४ ॥

[३५९]

मी तो समर्थाची दासी । मिठी घालीन पायासी ॥ १ ॥
हाचि माझा दृढभाव । करीन नामाचा उत्सव ॥ २ ॥
आम्हां दासीचें हें काम । मुखीं विठ्ठल हरिनाम ॥ ३ ॥[3]
सर्व सुख पायीं लोळे । जनीसंगें विठ्ठल खेळे ॥ ४ ॥

[३६०]

नामयाचें ठेवणें जनीस लाधलें । धन सांपडलें विटेवरी ॥ १ ॥
धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ २ ॥
कामधाम माझें विठोबाचे पाय । दिवसानिशीं माये हारपली ॥ ३ ॥
माझ्या वडिलांचे दैवत तो हा पंढरिनाथ । तेणें माझा आर्त पुरविला ॥ ४ ॥
संसारींचें सुख नेघे माझे चित्तीं । तरीच पुनरावृत्ति चुकविल्या ॥ ५ ॥
नामयाचे जनी आनंद पैं जाला । हृदयीं बिंबला पांडुरंग ॥ ६ ॥

[३६१]

धन्य ज्याचे चरणीं गंगाओघ जाला । मस्तकीं धरिला उमाकांतें ॥ १ ॥
धुंडितां ते पाय शिणला तो ब्रह्मा । बोल ठेवीं कर्मा अपुलिया ॥ २ ॥
शुक सनकादिक फिरती हरिजन । नारदादि गाणें जयासाठीं ॥ ३ ॥
ते चरण आम्हांसी गवसले अनायासी । धन्य जाली दासी जनी म्हणे ॥ ४ ॥

---

१ लटीकेची माईक (शि., पं. व धु.), हे माझे तुझे तुचि जाणे सांगे हरी (धु.)
२ नामा लोटांगणी महाद्वारि ॥ (धु.) हा अभंग नामदेवाचा ठरतो.
३ हा चरण (धु.) प्रतीमध्ये नाही. पण काही (धु.) प्रतींत असा सापडतो—
नाम दळणी कांडणी । गाये नामयाची जनी ॥ ३ ॥

[ ३६२ ]

डोईचा पदर आला खांद्यावरी । भरल्या बाजारीं जाईन मी ॥ १ ॥
हातीं घेईन टाळ खांद्यावरी वीणा । आतां मज मना कोण करी ॥ २ ॥
पंढरिच्या पेठें मांडियेलें पाल । मनगटावर तेल घाला तुम्ही ॥ ३ ॥
जनी म्हणे देवा मी जालें वेसवा । रिघालें केशवा घर तुझें ॥ ४ ॥

[ ३६३ ]

जात्यावरील गीतासी । दळणमिसें गोविंदासी ॥ १ ॥
देह बुद्धीचें वैरण । बरवा कण हो निसून ॥ २ ॥
नामाचा हो कोळी । गुरुआज्ञेतें मी पाळीं ॥ ३ ॥[१]
मज भरवसा नाम्याचा । गजर दासी जनीचा ॥ ४ ॥[२]

[ ३६४ ]

सुंदर माझें जातें गे फिरे भंवते । ओंव्या गाऊं कौतुकें [३]तूं येरे बा विठ्ठला ॥ १ ॥
जीवशिव दोनी खुंटे गे प्रपंचाचे नेटें गे । लावुनी पांचीं बोटें गे तूं येरे बा विठ्ठला ॥ २ ॥
[४]सासु आणि सासरा दीर तो तिसरा । ओंव्या गाऊं भ्रतारा तूं येरे बा विठ्ठला ॥ ३ ॥
[५]बारा सोळा गडणी अवघ्या कामिनी । ओंव्या गाऊं बसूनि तूं येरे बा विठ्ठला ॥ ४ ॥
प्रपंचदळण दळिलें पीठ भरिलें । [६]सासुपुढें ठेविलें तूं येरे बा विठ्ठला ॥ ५ ॥
[७]सत्वाचें आधण ठेविलें पुण्य वैरिलें । पाप तें उतूं गेलें तूं येरे बा विठ्ठला ॥ ६ ॥
जनी जातें गाइल कीर्त राहिल । थोडासा लाभ होईल तूं येरे बा विठ्ठला ॥ ७ ॥

[ ३६५ ]

वैराग्य अभिमानें फिरविलें जातें । म्हणवोनि यातें भाव खुंटा ॥ १ ॥
संचित मातृका वैरण घातली । अव्यक्ति [८]दळिली व्यक्ताव्यक्त ॥ २ ॥

---

१ हा चरण (शि.) व (पं.) प्रतींत नाही.
२ हा चरण (शि.) व (पं.) प्रतींत नाही. त्याऐवजी—
विठ्ठलासी ज्याची गोडी । जनी म्हणे ते आवडी ॥ ३ ॥ हा चरण जास्त आहे.
३ 'तूं ये रे बा विठ्ठला' हे शब्द (भा.) प्रतीत नाहीत.
४ कामक्रोध सासु आणि सासरा दीर तो तिसरा । (भा.)
५ बारा सोळा गडणी जमल्या अवघ्या कामिनी । द्यावी आशा सोडुनी हारी रे ॥ (धु.)
६ नेरुनी सासुये दिधले हारीं रे ॥ (भा.) ७ जाते गे फिरते बहुत । ओव्या गाऊ कौतुक तूं येरे बा विठ्ठला ॥ (धु.) प्रतीत हा चरण जास्त आहे.
८ बुडाली (शि. व पं.)

नाम तें रूपा दळियेलें सर्व । पीठ भरी राव पंढरीचा ॥ ३ ॥
नवल हा देव बैसला दळणीं । नाहीं केली जनी नामयाची ॥ ४ ॥

## उपदेश

### [ ३६६ ]

भक्तिभावें वोळगा देव । महाराज पंढरिराव ॥ १ ॥
पंढरीसी जावें । संतजनीं भेटावें ॥ २ ॥
भक्ति आहे ज्याचें चित्तीं । त्याला पावतो निश्चिती ॥ ३ ॥
भाव धरा मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

### [ ३६७ ]

बांधोनियां हात गयावळ मारिती । दंड ते करिती मोक्षासाठीं ॥ १ ॥
गेले ते पितर मोक्षालागीं तुझे । आतां देई माझे दक्षिणेसी ॥ २ ॥
बापुडे केश बोडिती मिशी दाढी । मग दक्षणा हिरडी खातसे हे ॥ ३ ॥
फार काय सांगूं मेल्याविण मुक्ति । नाहीं ते वांछिती स्वप्नसुख ॥ ४ ॥
अनंत जन्म मृत्यु होतां जैसें दुःख । त्याहूनि विशेष आहे तेथें ॥ ५ ॥
भांबावले जन धांवे आटाआटी । सांडूनियां कोटि अनंत पद ॥ ६ ॥
नलगे गाळावें नलगे तळावें । नलगे मरावें मुक्तिसाठीं ॥ ७ ॥
मुक्ति लागे पायां जाऊनियां पाहे । जीव आतां देह जनी नाहीं ॥ ८ ॥

### [ ३६८ ]

[1]धनियाचे पडपें गेला । जीव जिवें नाहीं झाला ॥ १ ॥
देहीं देह हारपले । गेह गेहातीत जालें ॥ २ ॥
जाला आश्रम आश्रमा । जनी म्हणे धरा प्रेमा ॥ ३ ॥

### [ ३६९ ]

जाली जगाचिये सीमा । वस्तुभाव येर व्योमा ॥ १ ॥
पहा हो अधिकारी । नको असोनी भिकारी ॥ २ ॥
पट तंतूचा घडला । घट मृत्तिकेचा केला ॥ ३ ॥
पहा श्वानसमची पंडित । जनी म्हणे एकचि मात ॥ ४ ॥

---

१ धणी याच्या पडपें मेले । जीव जीता नाही जाले ॥ (धु.)

[ ३७० ]

नाद पडे कानीं । मृग पैज घाली प्राणी ॥ १ ॥
आवडी अंतरीं । गज मेला पडे गारी ॥ २ ॥
चोख पाहे अंग । दीपे नाडला पतंग ॥ ३ ॥
गोडी रस गळा । मच्छ अडकला गळा ॥ ४ ॥
गंधें अलि नेला । म्हणे जनी तोचि मेला ॥ ५ ॥

[ ३७१ ]

भृंगीचिया अंगीं कोणतें हो बळ । शरिरें अनाढळ केली आळी ॥ १ ॥
काय [1]तिनें तपमुद्रा धरियेली । म्हणोनियां जाली भृंगी अंगें ॥ २ ॥
अरे बा शहाणिया तैसा करी जप । संतयोगें पाप नाहीं होय ॥ ३ ॥
नामयाची जनी पिटि ती डांगोरा । [2]संदेह न धरा करा पूजा ॥ ४ ॥

[ ३७२ ]

जहाज तारिलें तारिलें । शेवटीं उगमासीं आलें ॥ १ ॥
भाव शिडासी लाविला । नाम फरारा सोडिला ॥ २ ॥
कथा भरियेलें केणें । घ्या रे नका दैन्यवाणें ॥ ३ ॥
एका नामाचा विसार । आधीं देउनी निर्धार ॥ ४ ॥
केणें देतो फुकासाठीं । आर्तभूत व्हावें पोटीं ॥ ५ ॥
आर्तभूत व्हा रे । जनी म्हणे [3]केणें घ्यारे ॥ ६ ॥

[ ३७३ ]

हेंचि देवाचें भजन । सदा राहे समाधान ॥ १ ॥
येर अवघे संसारिक । इंद्र देव ब्रह्मादिक ॥ २ ॥
वरकडाचा पाड किती । जनी देवास बोलती ॥ ३ ॥

[ ३७४ ]

चोरा संगतीनें गेला । वाटें जातां नागवला ॥ १ ॥
तैसी सांडोनियां भक्ति । धरी विषयाची संगती ॥ २ ॥

---

१ तेणे जपमुद्रा (शि. व पं.) २ हरी जप करा अखंडीत ॥ (शि. व पं.)
३ नाम (भा.)

अनुक्रमणिका

अग्निसवें खेळे । न जळे तो परी पोळे ॥ ३ ॥
विश्वासला चोरा । जनी म्हणे घाला खरा ॥ ४ ॥

[ ३७५ ]

जगीं विठ्ठल रुक्मिणी । तुम्ही अखंड स्मरा ध्यानीं ॥ १ ॥
मग तुज काय उणें । जाले सोयरे त्रिभुवनें ॥ २ ॥
साराचें जें सार । भवसिंधु उतरी पार ॥ ३ ॥
मन ठेउनी चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[ ३७६ ]

सुखें संसार करावा । माजीं विठ्ठल आठवावा ॥ १ ॥
असोनियां देहीं नाहीं । छाया पुरुष जैसा पाहीं ॥ २ ॥
[1]आहो सूर्य घटाकासी । तैसी देहीं जनी दासी ॥ ३ ॥

[ ३७७ ]

अंगीं त्याला शांती । दया क्षमा सर्वांभूतीं ॥ १ ॥
तेथें जाऊन पाहे देवा । ब्रह्मादिक करिती सेवा ॥ २ ॥
आवडी असे पैं कीर्तनीं । लवे संताचे चरणीं ॥ ३ ॥
जैसी दया पुत्रावरी । तेंचि पाहे चराचरीं ॥ ४ ॥
वहु अपराध केला । म्हणे जनी तो रक्षिला ॥ ५ ॥

[ ३७८ ]

मृदु वाहे पाणी । व्रज मानी ऐसें लोणी ॥ १ ॥
क्षमा ऐसी जिवीं । क्रोधभूत हे पृथ्वी ॥ २ ॥
गंधमाती सरी । करुनी आपुली कस्तुरी ॥ ३ ॥
गुणदोष मना नाणीं । म्हणे [2]बहिरी होय जनी ॥ ४ ॥

१ जैसा सूर्य घटाकेशीं। (स्थळप्रत)  २ वहिरा (शि. व ध्रु.)

अनुक्रमणिका

[ ३७९ ]

आपणची सारा । पाहावें कीं नारीनरां ॥ १ ॥
पटाकारणें हे जनी । पांडुरंग तंतु मानि ॥ २ ॥
भावेंवीण भजलें । भिऊनियां झांकी डोळे ॥ ३ ॥
म्हणे काय पाहूं येथें । भिन्न नव्हे वस्तु जेथें ॥ ४ ॥
भिन्नाभिन्न नाहीं मनीं । [1]म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

[ ३८० ]

आक्रोशें ध्यानासी आणी पुरुषोत्तमा । पृथ्वीयेसी क्षमा उणी आणी ॥ १ ॥
अखंडित शुद्ध असावें अंतर । लोणिया कठोर वाटे मनीं ॥ २ ॥
बोलें तें वचन बहु हळुवट । सुमनाअंगीं दाट जडभार ॥ ३ ॥
नाम तें स्मरण अमृतसंजिवनी । म्हणे दासी जनी हेंचि करा ॥ ४ ॥

[ ३८१ ]

आम्ही आणि संत, संत आणि आम्ही । सूर्य आणि रश्मि काय दोन ॥ १ ॥
दीप आणि सारंग सारंग आणि दीप । ध्यान आणि जप काय दोन ॥ २ ॥
शांति आणि विरक्ति विरक्ति आणि शांति । समाधान काय तृप्ति दोन ॥ ३ ॥
रोग आणि व्याधी व्याधी आणि रोग । देह आणि अंग काय दोन ॥ ४ ॥
कान आणि श्रोत्र श्रोत्र आणि कान । यश आणि मान काय दोन ॥ ५ ॥
देव आणि संत संत आणि देव । म्हणे जनी भाव एक ऐसा ॥ ६ ॥

[ ३८२ ]

संत आणि देव मानी जो वेगळे । तेणें तेथें आगळ केले दोष ॥ १ ॥
माता ते वेगळी कुच ते उरीचें । म्हणोनियां त्याचें मर्दन करी ॥ २ ॥
पाप तें वेगळें पुण्य तें आगळें । म्हणोनी गरळें पितो मद ॥ ३ ॥
दिवस उगवतां पाहों नये त्यातें । जेणें हो संतांतें द्वेषियेलें ॥ ४ ॥
तयाचा विटाळ वाहे रजस्वला । म्हणे जनी चांडाळा बोलु नका ॥ ५ ॥

१ जळमेघ म्हणे जनि ॥ (शि. व पं.)

अनुक्रमणिका

[ ३८३ ]

पाणी तेंचि मेघ मेघ तेंचि पाणी । काय या दोन्हीपणीं वेगळीक ॥ १ ॥
माती तेचि धूळ धूळ तेचि माती । भेंडा आणि भिंती काय दोन ॥ २ ॥
साखरीं ते गोडी गोडी ते साखरेसी । थिजलें तुपासी काय दोन्ही ॥ ३ ॥
डोळा तें बुबुळ बुबुळ तो डोळा । शांति ज्ञानकळा काय भिन्न ॥ ४ ॥
वदन ते ओठ ओठ ते वदन । क्षेम आलिंगन काय दोन ॥ ५ ॥
जीभ ते पडजीभ पडजीभ ते जीभ । आशा आणि लोभ काय दोन ॥ ६ ॥
संत तेचि देव देव तेचि संत । म्हणे जनी मात गोष्टी भिन्न ॥ ७ ॥

[ ३८४ ]

प्रपंची जो रडे । ब्रह्मवन त्यातें जडे ॥ १ ॥
ऐसा अखंडित ब्रह्मीं । विठ्ठला जो कर्माकर्मी ॥ २ ॥
पुत्रदेह ध्याय ध्यानीं । कांता धन हे कामिनी ॥ ३ ॥
सिंधुसी सांडावा । जनी म्हणे गा सदैवा ॥ ४ ॥

[ ३८५ ]

काम लागे कृष्णापाठीं । केली स्मशानाची गांठी ॥ १ ॥
प्रेम कामें भुलविला । कृष्ण स्मशानासी नेला ॥ २ ॥
भुलविला मनीं । रुद्र पाहोनी मोहनी ॥ ३ ॥
कन्येचिये पाठीं । ब्रह्म [1]लागे हातवटी ॥ ४ ॥
काम पराशरालागीं । ज्ञानासी लाविली आगी ॥ ५ ॥
काम गेला शुकापाठीं । म्हणे जनी मारीं काठी ॥ ६ ॥

[ ३८६ ]

भजन करी महादेव । राम पूजी सदाशिव ॥ १ ॥
दोघे देव एक पाही । तयां ऐक्य दुजें नाहीं ॥ २ ॥
शिवा रामा नाहीं भेद । ऐसे देव तेही सिद्ध ॥ ३ ॥
जनी म्हणे आत्मा एक । सर्व घटीं तो व्यापक ॥ ४ ॥

१ धांवे (शि.)

[ ३८७ ]

पतंग सुखावला भारी । उडी घाली दीपावरी ॥ १ ॥
परि तो देहांती मुकला । दोहीं पदार्थी नाडिला ॥ २ ॥
ऐसे विषयाचे संगति । [1]बहु गेले अधोगति ॥ ३ ॥
ऐसे विषयानें भुलले । जनी म्हणे वायां गेले ॥ ४ ॥

[ ३८८ ]

येऊनियां जन्मा एक । करा देहाचें सार्थक ॥ १ ॥
वाचे नाम विठ्ठलाचें । तेणें सार्थक जन्माचें ॥ २ ॥
ऐसा नामाचा महिमा । शेष वर्णितां जाली सीमा ॥ ३ ॥
नाम शास्त्रीं त्रिभुवनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[ ३८९ ]

विवेकाची पेठ । उघडी पंढरीची वाट ॥ १ ॥
तेथें नाहीं कांहीं धोका । उठाउठी भेटे सखा ॥ २ ॥
मरोनियां जावें । शरण विठोबासी व्हावें ॥ ३ ॥
म्हणे नामयाची जनी । देव करा ऐसा ऋणी ॥ ४ ॥

[ ३९० ]

शरीर हें जायाचें नश्वर आणिकांचें । म्हणाल जरी त्यांचे काय काज ॥ १ ॥
आंबरसें चोखिला बिजसालें सांडिला । पुढें तेणें उभविला दुजा एकू ॥ २ ॥
समूळ साल माया सांडुनियां दिजे । वरि अहं बीज जतन करा ॥ ३ ॥
तें बीज भाजोनि करा ओवाळणी । संताचे चरणीं समूळ देह ॥ ४ ॥
पुढें त्या बीजाची न करावी दुराशा । न धरावी आशा पुढिलांची ॥ ५ ॥
आहे नाहीं देह धरीं ऐसा भाव । म्हणे जनी देव सहज होसी ॥ ६ ॥

[ ३९१ ]

नाना व्रत तप दानें । मुखीं हरीची स्मरणें ॥ १ ॥
येथें असो द्यावा भाव । पुरवी अंतरीचें देव ॥ २ ॥

---

१ प्राणी गेले अधोगति ॥ (धु.)

हाचि विश्वास [1]धरूनी । कृपा करील चक्रपाणि ॥ ३ ॥
भक्तिभाव ज्याचा पुरा । त्यासी धांवतो सामोरा ॥ ४ ॥
लक्ष लावा पायांपाशीं । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

[ ३९२ ]

शूरांचें तें शस्त्र कृपणाचें धन । विध्वंसिला प्राण हातां न ये ॥ १ ॥
गजमाथां मोतीं सर्पाचा तो मान । आसलीया प्राण हातां न ये ॥ २ ॥
सिहाचें तें नख पतिव्रतेचे स्तन । गेलियाही प्राण हातां न ये ॥ ३ ॥
[2]वीराल्यावांचुन देह अहंभाव । जनी म्हणे देव हातां न ये ॥ ४ ॥

[ ३९३ ]

संसारीं निधान लाधलें जनां । सद्‌गुरुचरणा सेवी बापा ॥ १ ॥
कायावाचामनें तयास देऊन । वस्तु मागून घे अगोचर ॥ २ ॥
तें गोचर नव्हे जाण गुरुकृपेंवीण । एऱ्हवीं तें आपणामाजीं आहे ॥ ३ ॥
असतां सम्यक परि जना चुकामुक । भुलली निष्टंक मंत्रतंत्रें ॥ ४ ॥
माळ वेष्टण करीं टपोर घेतीं शिरीं । नेम अष्टोत्तरीं करिताती ॥ ५ ॥
जो माळ करविता वाचेसि वदविता । तया हृदयस्था नेणे कोणी ॥ ६ ॥
सोहं आत्मा प्रगट जो दाखवी वाट । सद्‌गुरु वरिष्ठ तोचि जाणा ॥ ७ ॥
तया उत्तीर्णता व्हावया पदार्था । न देखों सर्वथा जनी म्हणे ॥ ८ ॥

[ ३९४ ]

कीर्तनासी जातां मार्गीं टाकी पाय । अश्वमेघ होये फळ तया ॥ १ ॥
[3]ओखद तरी तेथें घडे हिंसा । जन्मवेद भाषा वेदापाशीं ॥ २ ॥
गंगा वाराणसी धरोनि पदरीं । [4]चाललीसे नारी दोहींकडे ॥ ३ ॥

---

१ ध्यानि (धु.)
२ देह भाव याचा नीमाल्यावांचून । म्हणे देव जनी प्राप्त नोव्हे ॥ ४ ॥ (धु.)
मृगाची कस्तुरी व्याघ्राचे आसन । आसलीया प्राण होता नये ॥ ५ ॥ (जास्त चरण) (धु.). प्रतीत 'प्राप्त नोव्हे' हा पाठ 'होता नये' ऐवजी काही प्रतींत आढळतो.
३ अश्वमेघ तरी तेथे होय हिंसा । जन्ममृत्युफांसा यज्ञापासीं ॥ (शि., पं. व धु.)
४ चालती शेजारीं दोहींकडे ॥ (शि., पं. व धु.)

आमच्या बापाची ऐकावया कीर्ति । जाऊं म्हणोन घेती ऐक्य कथीं ॥ ४ ॥
कीर्तनासी जावें कैसें कोणेपरी । असू द्या अंतरीं गोष्ट हित ॥ ५ ॥
वऱ्हाडी धांवे जैसा प्रयोजनीं । तान्हेलें तें पाणी पुसावया ॥ ६ ॥
व्याकुळ तें एक चुकलें बालक । त्याचा करीत शोक धांवे माता ॥ ७ ॥
अशी कथे जातां गंगा त्या चरणीं । म्हणे दासी जनी भाक मानी ॥ ८ ॥

[ ३९५ ]

कीर्तनाचा रस आवडे नरासी । लागती पायांसी मुक्ति चाऱ्ही ॥ १ ॥
वारी पंढरीची निश्चय ज्यां केला । वारकरी जाला पंढरीचा ॥ २ ॥
मोक्षाचा जो मोक्ष मुक्तीची जी मुक्ति । जनी म्हणे किती सांगू फार ॥ ३ ॥

## कृष्णजन्म बालक्रीडा व काला

[ ३९६ ]

गौळण म्हणे गौळणीला । पुत्र जाहला यशोदेला ॥ १ ॥
एक धांवती एकीपुढें । ताटी वाटी सुंठवडे ॥ २ ॥
सुईणीची गलबल जाली । दासी जनी हेल घाली ॥ ३ ॥

[ ३९७ ]

मग म्हणे नंदाजीला । पुत्रमुख पाहू चला ॥ १ ॥
स्नान घालूनि त्यासी । वस्त्रें दिधलीं ब्राह्मणांसी ॥ २ ॥
परब्रह्म तें पाहूनी । ब्रह्मीं मिळे दासी जनी ॥ ३ ॥

[ ३९८ ]

आलिया ब्राह्मणासी दान । द्रव्य दिधलें अपार जाण ॥ १ ॥
गाईम्हसींचीं खिल्लारें । [1]ब्राह्मणा दिधलीं अपारें ॥ २ ॥
कामधेनूची दुभनी । कल्पवृक्षाची दाटणी ॥ ३ ॥[2]
ऐसा आनंद सोहळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥[3]

---

१ ब्राह्मण भागले नेतां फार ॥ २ चरण ३ व ४ हे (शि.) प्रतीत नाहीत.
३ (पं.) व. (शि.) प्रतींत पुढील पद्धतीने अभंग मिळतो—
हरी जन्मले नंदाघरी । ऋद्धी सिद्धी काम करी ॥ १ ॥
कल्पवृक्ष चिंतामणी । कामधेनुची दुभणी ॥ २ ॥
सर्व सुख पाहूनी । मनी आनंदली दासी जनी ॥ ३ ॥

[३९९]

वैकुंठींचा हरी । तान्हा यशोदेच्या घरीं ॥ १ ॥
रांगतसे हा अंगणीं । माथा जावळाची वेणी ॥ २ ॥
पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ॥ ३ ॥
धन्य यशोदा ते माय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

[४००]

[1]ब्रह्मा वंदी ज्याचे पाय । त्याची यशोदा ती माय ॥ १ ॥
[2]सामराज्याचा जो दानी । मागे यशोदेसी लोणी ॥ २ ॥
क्षीरसागर ज्याचे चरणीं । त्याला पायावरतें न्हाणी ॥ ३ ॥
[3]देव ब्रह्मांड पालकीं । त्याची टाळू हातें माखीं ॥ ४ ॥[4]
शुक सनकादिक योगीं । जनी म्हणे दळू लागी ॥ ५ ॥

[४०१]

अहो गोकुळींच्या देवा । आदि अंत तुम्हां ठावा ॥ १ ॥
न लगे पुसावें हो कोणा । आदि अंत हो सुजाणा ॥ २ ॥
जनी म्हणे वो गोकुळीं । किती खासी उष्टावळी ॥ ३ ॥

[४०२]

असो थोरथोरांची मात । तूंचि मिळालासी गोपाळांत ॥ १ ॥
त्यांच्या शिदोऱ्या सोडिसी । ग्रासोग्रासीं उच्छिष्ट खासी ॥ २ ॥
न म्हणे सोंवळें ओंवळें । प्रत्यक्षचि तें ओवळें ॥ ३ ॥

---

१ (धु.) प्रतीमध्ये खालीलप्रमाणे चरण आढळतात—
वीश्वाचा जनीता । यशोदेसी म्हणे माता ॥ ३ ॥
जो कां त्रैलोक्याचा पति । त्याचे भाळी लावी माति ॥ ४ ॥
जो कां वैकुंठ नायकी । त्यासि न्हाणी कानफुंकी ॥ ५ ॥
२ जगाचा जगदानि । (पं.), देव कैवल्याचा दानी । (धु.),
साम्राज्याचा दानी । (धु.)
३ यशोदाते पाई न्हाणी । (धु.)
४ हा चरण (शि.) व (पं.) प्रतींमध्ये नाही.

स्वानंदाचे डोहीं हात । धुतले सर्वांही निश्चित ॥ ४ ॥
हातीं काठ्या पायीं जोडे । दासी जनी वाट झाडे ॥ ५ ॥

## ज्ञानेश्वर स्तुती

[४०३]

भावअक्षराची गांठी । ब्रह्मज्ञानानें गोमटी ॥ १ ॥
ते हे माय ज्ञानेश्वरी । संतजना माहेश्वरी ॥ २ ॥
ज्ञानेश्वर मंगळ मुनी । सेवा करी दासी जनी ॥ ३ ॥

[४०४]

[1]गीतेवरी आन टीका । त्यांनीं वाढियेली लोकां ॥ १ ॥
रत्नकनक ताटामाजीं । त्यानें वोगरिलें कांजी ॥ २ ॥
एका ज्ञानेशावांचोनी । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥

[४०५]

[2]ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनियां जावें । बा माझ्या पोटा यावें ॥ २ ॥
ऐसें करीं माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥
[3]जावें वोवाळुनी । जन्मोजन्मीं दासी जनी ॥ ४ ॥

[४०६]

मायेहूनि माय मानी । करी जिवाची ओंवाळणी ॥ १ ॥
परलोकींचें तारूं । म्हणे माझा ज्ञानेश्वरू ॥ २ ॥
वित्त गोत चित्त पाहे । सत्य वंदी गुरुचे पाय ॥ ३ ॥
पतिव्रते जैसा पती । जनी म्हणे सांगो किती ॥ ४ ॥

[४०७]

संत राउळा चालिले । ज्ञानेश्वर तंव बोले ॥ १ ॥
केवढें नवल सांगावें । दासी जनीचें पद ल्याहावें ॥ २ ॥

---

१ गीतेवरी टीका । एक ज्ञानेश्वरी देखा ॥ ४ ॥ (शि. व पं.)
२ विवेक सागरा । बापा माझ्या ज्ञानेश्वरा ॥ १ ॥ (शि. व पं.)
३ पुरवि आवडीची धणी । म्हणे नामयाची जनि ॥ ४ ॥ (शि. व पं.)

पाय जोडुनी विटेवरी । कटीं हात उभा हरी ॥ ३ ॥
रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडल मनोहर ॥ ४ ॥
सोनसळा वैजयंती । पुढें गोपाळ नाचती ॥ ५ ॥
गरुडपारीं सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ६ ॥

[४०८]

ज्ञानेश्वर अभंग बोलिले ज्या शब्दां । चिदानंद बाबा लिही त्यांस ॥ १ ॥
निवृत्तीचे बोल लिहिले सोपानें । मुक्ताईचीं वचनें ज्ञानदेवें ॥ २ ॥
चांगयाचा लिहिणार शामा तो कांसार । परमानंद खेचर लिहित होता ॥ ३ ॥
सांगे पूर्णानंद लिही परमानंद । भगवंत भेटी आनंद रामानंद ॥ ४ ॥
सांवत्या माळ्याचा काशिबा गुरव । कूर्म्याचा वसुदेव काईत होता ॥ ५ ॥
[1]चोखामेळ्याचा अनंतभट्ट अभ्यंग । म्हणोनी नामयाचे जनीचा पांडुरंग ॥ ६ ॥

[४०९]

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार ॥ १ ॥
महाविष्णुचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ २ ॥
ब्रह्मा सोपान तो जाला । भक्तां आनंद वर्तला ॥ ३ ॥
आदि शक्ति मुक्ताबाई । दासी जनी लागे पायीं ॥ ४ ॥

[४१०]

सोपानाची ऐसी मूर्ति । विश्वकर्ता ब्रह्मा म्हणती ॥ १ ॥
ऐसे बोले पुराणांत । सृष्टिकर्ता जो भगवंत ॥ २ ॥
जनी म्हणे हा सोपान । ब्रह्मा अवतरला पूर्ण ॥ ३ ॥

[४११]

नामयाचा गुरु । तो हा सोपान सद्‌गुरु ॥ १ ॥
कऱ्हेवरीं करुनी वस्ती । ब्रह्मपुरी तिशी म्हणती ॥ २ ॥

---

१ चोखीमेळीयाचे आनंतभट लीही । दासी जनीचे लिही पांडुरंगा ॥ ६ ॥ (शि. व पं.)

माझ्या जिवींच्या जीवना । हृदयीं राहें तूं सोपाना ॥ ३ ॥
[1]चीत्त उधवण्याचि सत्ता । जनी म्हणे माझ्या ताता ॥ ४ ॥

[ ४१२ ]

वाचे म्हणतां सोपान । प्राप्त वैकुंठचि जाण ॥ १ ॥
सोपानदेव करितां जप । समूळ नासे त्रिविधताप ॥ २ ॥
सोपानदेव धरितां ध्यानें । पुन: जन्मा नाहीं येणें ॥ ३ ॥
दासी जनी तल्लिन जाली । सोपानचरणीं विनटली ॥ ४ ॥

[ ४१३ ]

शालिवाहन शके अक्राशें नव्वद । निवृत्ति आनंद प्रगटले ॥ १ ॥
त्र्याण्णवाच्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले । सोपान देखिले शाण्णवांत ॥ २ ॥
नव्याण्णवाच्या सालीं मुक्ताई देखिली । जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥ ३ ॥

## सेना न्हावी चरित्र

[ ४१४ ]

सेना न्हावी भक्त भला । तेणें देव भुलविला ॥ १ ॥
नित्य जपे नामावळी । लावी विठ्ठलाची टाळी ॥ २ ॥
रूप पालटोनि गेला । सेना न्हावी विठ्ठल जाला ॥ ३ ॥
काखें घेउनी धोकटी । गेला राजियाचे भेटी ॥ ४ ॥
आपुले हातें भार घाली । राजियाची सेवा केली ॥ ५ ॥
विसर तो पडला रामा । काय करूं मेघ:श्यामा ॥ ६ ॥
राजा अयनियांत पाहे । चतुर्भुज उभा राहे ॥ ७ ॥
दूत धाडूनियां नेला । राजियानें बोलाविला ॥ ८ ॥
राजा बोले प्रीतिकर । रात्रीं सेवा केली फार ॥ ९ ॥
राजसदनाप्रती न्यावें । भीतरींच घेउनी जावें ॥ १० ॥
आतां बरा विचार नाहीं । सेना म्हणे करूं काई ॥ ११ ॥
सेना न्हावी गौरविला । राजियानें मान दिला ॥ १२ ॥
कितीकांचा शीण गेला । जनी म्हणे न्हावी जाला ॥ १३ ॥

---

१ चित्त उद्धन ज्याची सत्ता । (स्थळप्रत)

अनुक्रमणिका

## श्रीनामदेव चरित्र

[४१५]

गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देईं मला ॥ १ ॥
ऐसा पुत्र देई भक्त । ज्याला आवडे पंढरीनाथ ॥ २ ॥
शुद्ध देखोनियां भाव । पोटीं आले नामदेव ॥ ३ ॥
दामाशेटी हरूषला । दासी जनीनें ओवाळिला ॥ ४ ॥

## नामदेवाचे गोणाईशी भाषण

[४१६]

माझा हा विठोबा येईल गे जेव्हां । जेवीन मी तेव्हां गोणाबाई ॥ १ ॥
त्वरें राऊळासी जाऊनीयां पाहे । लवकरी बाहे भोजनासी ॥ २ ॥
भरलिया रागें क्रोध त्याचा साहे । लवकरी बाहे भोजनासी ॥ ३ ॥
ज्ञानेश्वरा घरीं असेल बैसला । जाउनी विठ्ठला पाहे तेथें ॥ ४ ॥
जनी म्हणे देवा चला पुरुषोत्तमा । खोळंबला नामा भोजनासी ॥ ५ ॥[१]

[४१७]

गोणाई राजाई दोघी सासू सुना । दामा नामा जाणा बाप लेक ॥ १ ॥
नारा विठा गोंदा महादा चवघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥ २ ॥
लाडाई गोडाई येसाई साखराई । चवघी सुना पाही नामयाच्या ॥ ३ ॥
[२]लिंबाई ती लेकी आऊबाई बहिणी । वेडीपिशी दासी त्याची जनी ॥ ४ ॥

[४१८]

सुंबाचा करदोडा रकटयाची लंगोटी । नामा वाळवंटीं कथा करी ॥ १ ॥
ब्रह्मादिक देव येवोनि पाहाती । आनंदें गर्जति जयजयकार ॥ २ ॥
जनी म्हणे त्याचें काय वर्णूं सुख । पहाती जे मुख विठोबाचें ॥ ३ ॥

---

१ (भा.) प्रतीत हा अभंग नाही.
२ इतक्याही जणी अभंग आरंभीले । देवे पूर्ण केले नामा म्हणे ॥ ५ ॥ या पाठाप्रमाणे हा अभंग नामदेवाचा ठरतो.

[४१९]

मागें किती संत जाले । नाम्या ऐसें कोण बोले ॥ १ ॥
नामा जातां राउळासी । देव बोले आधि त्यासी ॥ २ ॥
केवढें नवल सांगावें । दासी जनीचें पद लिहावें ॥ ३ ॥

[४२०.]

पूर आला [१]भीवरेसी । पाणी लागे पायरीसी ॥ १ ॥
संतजन हो मिळाले । उठुनी नाम्याजवळी गेले ॥ २ ॥
नामा सांगे विठोबासी । उतार द्यावा भिवरेसी ॥ ३ ॥
[२]वोहटला पूर । जनी आनंदें निर्भर ॥ ४ ॥

[४२१]

सण दिवाळीचा आला । नामा राउळासी गेला ॥ १ ॥
हातीं धरूनी देवासी । चला आमुच्या घरासी ॥ २ ॥
देव घरासी आणिले । चंदनपाटी बैसविले ॥ ३ ॥[३]
गोणाईनें उटणें केलें । [४]दामशेटीनें न्हाणिले ॥ ४ ॥
पदर काढिला माथ्याचा । बाळ पुशिला नंदाचा ॥ ५ ॥
हातीं घेउनी पंचारती । चक्रपाणि ओवाळिती ॥ ६ ॥[५]
देव जेऊनी तृप्त जाले । दासीं जनीनें विडे दिले ॥ ७ ॥

[४२२]

वोढिला ताडिला । देव भक्तिनें [६]फाडिला ॥ १ ॥
एका प्रेमा नामासाठीं । भक्ति कोंडियला कंठीं ॥ २ ॥
जाला नाम्याचा मजूर । मोळचा बांधाटचाचा थर ॥ ३ ॥
भिंती चांदया रचिले । त्याचें छप्पर शेकारीलें ॥ ४ ॥
वरी सोडूनियां पाणी । धन्य भक्त म्हणे जनी ॥ ५ ॥

---

१ पंढरीसी (स्थळप्रत) २ दीनवत्सल महाराज । जनी म्हणे केलें काज ॥ ४ ॥ (स्थळप्रत)
३ हा चरण (पं.) व (धु.) च्या काही प्रतींत नाही.
देव घरासी आणिले । चंदनपाटी बैसवीले ॥
केव्हा येईल माझा हरि । आलींगीन दोन्ही करी ॥ (धु.) प्रतीमध्ये हे चरण जास्त आहेत.
४ राजाईने न्हाणीले ॥ (धु.) ५ हा चरण (पं.) प्रतीमध्ये नाही. ६ फोडीला (शि.)

अनुक्रमणिका

[४२३]

वारा पाणी मुसळ धारा । तेणें मोडिलें [1]छपरा ॥ १ ॥
मग विठाई धांवली । हातीं चक्र धांवत आली ॥ २ ॥
वासे लाविले चौफेर । क्षणामध्यें केलें घर ॥ ३ ॥
जागा जाला नामदेव । द्वारीं उभे पंढरिराव ॥ ४ ॥
डोयीं ठेवून पायांवरी । दासी जनी चरण चुरी ॥ ५ ॥

[४२४]

ज्ञानेश्वर म्हणे नाम्यासवें जेवीसी । नाहीं हृषिकेशी म्हणतसे ॥ १ ॥
सांगितलें एक भलतेंचि बोलसी । आहे याची भ्रांति ज्ञानेश्वरा ॥ २ ॥[2]
वाहियेलें त्वरें ऐसें कांहीं काम । उठे मेघःशाम तातडीनें ॥ ३ ॥
निरोप येवोनि सांगावा एकांतीं । म्हणे जनीप्रति पांडुरंग ॥ ४ ॥
देव म्हणे नाम्या ऐकावें वचन । येईल साधोन वेळ तुझी ॥ ५ ॥
जनी म्हणे आतां समजलें मज । धरीन उमज येथोनियां ॥ ६ ॥

[४२५]

आषाढी एकादशी । नामा होतां उपवासी ॥ १ ॥
देवें गरुडा धाडिलें । वेगीं त्याला बोलाविलें ।
राही म्हणे पांडुरंगा । कोणे बोलाविलें सांगा ॥ २ ॥
माझ्या जीवीचें जीवन । त्यासी बोलाविलें जाण ॥ ३ ॥
ऐसा भक्तराज निका । दासी जनीचा आत्मसखा ॥ ४ ॥

[४२६]

नामा येऊनियां पाहे । आजि कौतुक दिसताहे ॥ १ ॥
तंव निवेदी राजाई । लागे नामयाचे पायीं ॥ २ ॥
नामा म्हणे या द्रव्यासी । आम्ही नातळों मानसीं ॥ ३ ॥
वेगीं बोलला ब्राह्मण । करूं आतां संतर्पण ॥ ४ ॥

---

१ निवारा २ चरण २, ३ व ५ हे (भा.) प्रतीत नाहीत.

अनुक्रमणिका

हातीं टाळ दिंडीगान । हेंचि आमुचें सर्व धन ॥ ५ ॥
ऐसें आश्चर्य देखोनी । जनी हांसतसे मनीं ॥ ६ ॥

[४२७]

करूनी आरती । नामा आला घराप्रती ॥ १ ॥
तेणें धरियेलें व्रता । अन्न न घ्यावें सर्वथा ॥ २ ॥
ऐसा जाणोनियां नेम । अनुभवी पुरुषोत्तम ॥ ३ ॥
आषाढी एकादशी । विप्रवेषें हृषिकेशी ॥ ४ ॥
आला नामयाचे सदनीं । नाम गाय दासी जनी ॥ ५ ॥

[४२८]

नमुनी ब्राह्मण । म्हणे मज द्यावें अन्न ॥ १ ॥
नामा म्हणे एकादशी । इच्छित द्यावें फराळासी ॥ २ ॥
अन्नावांचोनी आतां । मज नको रे सर्वथा ॥ ३ ॥
हातापायांची वेंगडी । विप्रें घातली मुरकुंडी ॥ ४ ॥
जीव सोडी चक्रपाणि । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

[४२९]

जनसमुदाय मिळाला । धिःकारिती नामयाला ॥ १ ॥
विप्र बोलावुनी वेगें । प्रेत नेलें चंद्रभागे ॥ २ ॥
मोठें रचुनी सरण । मध्यें निजविला ब्राह्मण ॥ ३ ॥
शय्यागमनीं पहूडला । म्हणे अग्नि द्या आम्हाला ॥ ४ ॥
अग्नि दिला जयाप्रती । देव विमानीं पाहती ॥ ५ ॥
विस्मित जाला चक्रपाणि । प्रगट होय म्हणे जनी ॥ ६ ॥

[४३०]

अग्नी लागतां अंगासी । बावरले हृषिकेशी ॥ १ ॥
निजरूपें प्रगटले । चरणीं मस्तक ठेविलें ॥ २ ॥
सोनसळा वैजयंती । कोटि सूर्य ते लोपती ॥ ३ ॥

नामा म्हणे विठोबाला । भला अंत रे पाहिला ॥ ४ ॥
हातीं धरूनी नामयासी । पाठ थापटी हृषिकेशी ॥ ५ ॥
गेला राउळीं चक्रपाणि । भावे वंदी दासी जनी ॥ ६ ॥

[ ४३१ ]

ऐका हो नामयाचा जन्म मूळसंचित ॥ धृ० ॥
हिरण्यकश्यपकुळीं नामा प्रल्हाद । पद्मीणी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद ॥ १ ॥
दुसरा जन्म याचा अंगद रामभक्त । मंथरा नाम माझें भरतें मारिली लाथ ॥ २ ॥
द्वापारीं कृष्णसेवा उद्धव जन्मला । कुब्ज्या नाम माझें देवें उद्धार केला ॥ ३ ॥
कलींत नामदेव विठ्ठलचिंतनीं । त्याचीच सेवेलागीं जन्मली जनी ॥ ४ ॥

## हरिश्चंद्र आख्यान

[ ४३२ ]

अपूर्व कोणे एके काळीं । देव सभेच्या मंडळीं ॥ १ ॥
करी त्रैलोक्यभ्रमणा । करीं वाहे ब्रह्मवीणा ॥ २ ॥
देती सर्वही सन्मान । सिद्ध साधू योगी जन ॥ ३ ॥
सांगे अपूर्व कहाणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

[ ४३३ ]

नारद सांगे मृत्युलोकीं । हरिश्चंद्र पुण्यश्लोकी ॥ १ ॥
कैसा सत्वाचा समुद्र । ऐसा नाहीं नृपवर ॥ २ ॥
नारदाची ऐकून गोष्ट । सुखावला तो वसिष्ठ ॥ ३ ॥
कोप विश्वामित्रा आला । कैसा वाढविता शिष्याला ॥ ४ ॥
तपतेजें सूर्यराशी । छळीन म्हणे हरिश्चंद्रासीं ॥ ५ ॥
उदय पश्चिमे दिनकर । सत्त्व ढाळीना नृपवर ॥ ६ ॥
वसिष्ठाच्या ऐकुनी बोला । विश्वामित्रा क्रोध आला ॥ ७ ॥
जरी उतरेल माझ्या तुकीं । देईन आपुल्या तपासी ॥ ८ ॥
ऐसा दोघांचा संवाद । होतां उठला नारद ॥ ९ ॥
इंद्र म्हणे कां निर्फळ । शब्दाशब्दी वाढेल कळ ॥ १० ॥
ऐसे ऐकतां वचन । जनी म्हणे केलें गमन ॥ ११ ॥[1]

---

१ या अभंगातील ३, ७, ८, ९ व १० हे चरण (भा.) प्रतीमध्ये नाहीत.

अनुक्रमणिका

[४३४]

इंद्रसभे जाला वाद । करूं रायासी सावध ॥ १ ॥
येरीकडे ब्रह्मऋषी । कृपें बोळला शिष्यासी ॥ २ ॥
नवी व्याली जैसी गाय । पक्षी अंडजीं झेपाय ॥ ३ ॥
बाप माझा तैशापरी । होय शिष्याचा साहाकारी ॥ ४ ॥
येऊनियां मागेल तूतें । छळ करील गाधिसुत ॥ ५ ॥
बापा सावध अंतरीं । सत्व ढाळील नानापरी ॥ ६ ॥
धरी श्वापदांच्या झुंडी । तुझ्या देशांत भवंडी ॥ ७ ॥
मानीं शब्दाला आमुच्या । वना न जावें ऋषीच्या ॥ ८ ॥
ऐसें बोलोनी रायासी । गेला वसिष्ठ तपासी ॥ ९ ॥
तुझ्या सत्वालागीं हानी । करूं इच्छी म्हणे जनी ॥ १० ॥

[४३५]

विश्वामित्र तत्क्षणीं । सिद्धआश्रमा येउनी ॥ १ ॥
बैसे येउनी आश्रमासी । करी मातंग यागासी ॥ २ ॥
सहस्र अवदान आहुती । होतां प्रगटली शक्ति ॥ ३ ॥
विश्वामित्रें तये वेळे । देवी वरदानाचे बळें ॥ ४ ॥
व्याघ्र हिंडती रानें रानें । बंद केलें येणें जाणें ॥ ५ ॥
कृषा न जाती कृषिक । तीर्थयात्रेसी पांथिक ॥ ६ ॥
धेनु न जाती वनासी । वाट नाहीं वेव्हारासी ॥ ७ ॥
प्रजा जाऊन राजसभे । हात जोडोनियां उभे ॥ ८ ॥
ऐसी प्रजेची हे वाणी । राजा विचारितो मनीं ॥ ९ ॥
गुरुवचन धरितां चित्तीं । माझी होईल अपकीर्ति ॥ १० ॥
राव निघाला स्वारीसी । म्हणे नामयाची दासी ॥ ११ ॥

[४३६]

नाना वाजंत्र्यांच्या ध्वनीं । राजा आरूढला वाहनीं ॥ १ ॥
राव प्रवेशला वनीं । अवघीं श्वापदें मारूनी ॥ २ ॥

आश्रमीं आणावयासी राव । केले ऋषीनें लाघव ॥ ३ ॥
मृग कनकाचा साजरा । आला रायाच्या सामोरा ॥ ४ ॥
गुणी लाविलासे बाण । घेऊं पाहे त्याचा प्राण ॥ ५ ॥
येरु कीलान मारुनी जाय । धरणी न ठेवी तो पाय ॥ ६ ॥
राव लागे तया पाठीं । दम न समावे पोटीं ॥ ७ ॥
प्रवेशला तये वनीं । देखे अपूर्व नयनीं ॥ ८ ॥
धेनुव्याघ्र एके स्थानीं । चाटी एकमेकां दोन्हीं ॥ ९ ॥
निर्वैर श्वापदगण । राव विस्मय करी देखोन ॥ १० ॥
पुढें जातां सुगंध पाणी । राव स्नानातें करूनी ॥ ११ ॥
भावें पूजिला गिरिजावर । नमन केलें जोडुनी कर ॥ १२ ॥
विश्वामित्रें तया वनीं । दोघी रूपसा नयनीं ॥ १३ ॥
रायापुढें नृत्य करी । टाळ विणा झणत्कारी ॥ १४ ॥
द्रव्य आणविलें अपारे । राव देतो आपल्या करें ॥ १५ ॥
नाहीं द्रव्यासी कारण । तुझ्या स्वरूपासी लीन ॥ १६ ॥
बोले मुनिवर्यदासी । राजा कोपला मानसीं ॥ १७ ॥
आज्ञा केली प्रधानासी । मारा बाहेर घाला यासी ॥ १८ ॥
रक्तवदन आश्रमासी । म्हणे नामयाची दासी ॥ १९ ॥

[ ४३७ ]

ऋषिअंगणीं कामिनी । लोळती येऊनी दोघीजणी ॥ १ ॥
तुम्हां दिला कोणे त्रास । त्याचा करीन मी ग्रास ॥ २ ॥
आम्ही बोलिलों रायासी । घेत नाहीं उचितासी ॥ ३ ॥
ऐसें बोलतां वचन । राव कोपला दारुण ॥ ४ ॥
केलें प्रधानें ताडण । बाहेर घातलें मारून ॥ ५ ॥
त्यांच्या परिसोनी बोला । विश्वामित्र कोपें आला ॥ ६ ॥
म्हणे रायासी अधमा । माझी प्रतापमहिमा ॥ ७ ॥
वसिष्ठाच्या पडिभारें । मातलासी द्रव्यें थोरें ॥ ८ ॥
निर्वैर श्वापदांसी । कां रे मारिलें तयासी ॥ ९ ॥

वधूनियां शेवटीं त्यासी । मारियेल्या तापस दासी ॥ १० ॥
पुढें रसाळ आहे कथा । निद्रा लागेल नृपनाथा ॥ ११ ॥
स्वप्नीं मागेल दानासी । म्हणे नामयाची दासी ॥ १२ ॥

[४३८]

विश्वामित्र द्विजचिन्ह । स्वप्नीं प्रगटे आपण ॥ १ ॥
देखोनियां द्विजवरातें । नमियेलें जोडुनी हातें ॥ २ ॥
राव बोले उदारपणीं । काय इच्छा आहे मनीं ॥ ३ ॥
दयावंत धर्ममूर्ति । तुझी तिहीं लोकीं कीर्ति ॥ ४ ॥
अंकुश कडिया लेखणी । राया वोपी माझ्या पाणी ॥ ५ ॥
उदारपणें देसी जरी । उदक घाली माझे करीं ॥ ६ ॥
कृपा करुनी आम्हांवरी । आलें पाहिजे नगरीं ॥ ७ ॥
येथें संकल्पावांचून । नाहीं होत माझें येण ॥ ८ ॥
रायें घेऊन जीवन । ऋषि हस्तकीं घालून ॥ ९ ॥
एक नवल देखे दृष्टीं । काळपुरुष उभा पाठीं ॥ १० ॥
लोहदंड घेउनी करीं । घालूं पाहे त्याचे शिरीं ॥ ११ ॥
तेणें जाला भयाभीत । राव स्वप्नांत बरळत ॥ १२ ॥
राव बैसला उठोन । करी देवाचें स्मरण ॥ १३ ॥
तारामती पुसे राया । कां हो बरळलां स्वामिया ॥ १४ ॥
राज्यदान सुकृतकोटी । एक काळपुरुष पाठीं ॥ १५ ॥
लोहदंड घेऊन करीं । घालूं पाहे माझे शिरीं ॥ १६ ॥
येरु म्हणे या जीवनीं । करा स्नानातें जाउनी ॥ १७ ॥
अग्निमुखीं द्यावें दान । स्वप्नदोष नासती जाण ॥ १८ ॥
म्हणे प्रधान महाराजा । दान करा कांहीं द्विजा ॥ १९ ॥
ऐसें बोलतां वचन । आला विश्वामित्र जाण ॥ २० ॥
राजा बोले कर जोडून । शयनीं देखियेलें स्वप्न ॥ २१ ॥
ह्याच स्वरूपा प्रमाण । ऐसा देखिला ब्राह्मण ॥ २२ ॥
सिंहासन समेदिनी । राया दे गा मजलागोनि ॥ २३ ॥
आतां मागें दक्षणेसी । म्हणे नामयाची दासी ॥ २४ ॥

अनुक्रमणिका

[४३९]

ऋषि म्हणे रे समर्था । असो स्वप्नींची हे वार्ता ॥ १ ॥
इच्छा धरून आलों येथें । औट तुक दे कनकातें ॥ २ ॥
कृपा करून द्याल जरी । उदक घाली माझे करीं ॥ ३ ॥
दया करा आम्हांवरी । आलें पाहिजे नगरीं ॥ ४ ॥
येथें संकल्पावांचून । नाहीं होत माझें येणें ॥ ५ ॥
रायें घेऊनी जीवन । ऋषिहस्तकीं घालून ॥ ६ ॥
विश्वामित्र शिबिकासनीं । राव चालिला घेऊनी ॥ ७ ॥
मार्गीं वाद्यांचा लाघव । अयोध्येसी आला राव ॥ ८ ॥
राव प्रवेशला नगरीं । विश्वामित्र बैसला द्वारीं ॥ ९ ॥
दंड पडताळूनि हातीं । लक्षियेली तारामती ॥ १० ॥
उभी थरथरां कांपत । राजा जाणविली मात ॥ ११ ॥
राव म्हणे ऋषीश्वर । कोण्या अन्यायानें मार ॥ १२ ॥
केला संकल्प आम्हांसी । नाहीं दिलें दक्षणेसी ॥ १३ ॥
दान न देतां आम्हांसी । तूं कां गेलासी सदनासी ॥ १४ ॥
हात बांधोनियां राया । दंडहस्तें मारी तया ॥ १५ ॥
तंव आला रोहिदास । चरणीं ठेवी मस्तकास ॥ १६ ॥
येरु रक्तांबर नयन । पुसे कवणाचा कवण ॥ १७ ॥
राव म्हणे कुळभूषण । आहे आमुचा नंदन ॥ १८ ॥
राजा पाचारी भांडारी । आणा कनकातें झडकरी ॥ १९ ॥
मज दिलें राज्यदान । तेंचि घेसी तूं परतोन ॥ २० ॥
छत्र मुद्रा सिंहासन । ऋषि हस्तकीं वोपून ॥ २१ ॥
हें तो आलें राज्यदानें । औट भार कनक देणें ॥ २२ ॥
धनवंत सौदागर । उभे रायाचे समोर ॥ २३ ॥
धन देतो जी अपार । सोडा रायाला सत्वर ॥ २४ ॥
विश्वामित्र म्हणे त्यांसी । काय करावें द्रव्यासी ॥ २५ ॥
क्षितिवरी जितकें धन । तेंहि माझेंचि संपूर्ण ॥ २६ ॥
नाहीं कोणाचा उपाव । जनी म्हणे रक्षील देव ॥ २७ ॥

[४४०]

राव म्हणे अहो ऋषि । काशीखंड वाराणसी ॥ १ ॥
तेथे जाऊनियां आम्ही । ऋण फेडूं तुमचें स्वामी ॥ २ ॥
एक मासाची अवधी । तुम्ही द्यावी कृपानिधी ॥ ३ ॥
ऋषि म्हणे खरें बोला । नातरी शापीन तिघांला ॥ ४ ॥
रोहिदास म्हणे त्यासी । गहाण राहीन तुम्हांपाशी ॥ ५ ॥
पितृवचनाचें ऋण । त्यांचा उतराई होईन ॥ ६ ॥
ऋण हत्या आणि वैर । नाहीं चुकत मेल्यावर ॥ ७ ॥
ऐसी बाळकाची वाणी । ऐकूनि दचकला मनीं ॥ ८ ॥
ऋषि बोलला नृपासी । नको राहूं आमुचे देशीं ॥ ९ ॥
निघे निघे त्यासी म्हणे । बाहेर आलीं तिघेजणें ॥ १० ॥
वनीं निघाला त्वरित । जाला लोकांचा आकांत ॥ ११ ॥
लोट पूर जाती पळा । नेत्रीं उदक ढळढळां ॥ १२ ॥
कैसा ब्राम्हण पहा हो । नृपचंद्रा लागीं राहो ॥ १३ ॥
राजा बाहेर दवडूनी । पाहे आमुचाचि धणी ॥ १४ ॥
नगरलोकांसी फिरवुनी । राव निघाला तेथुनी ॥ १५ ॥
अलंकार देखियेला । मागें विश्वामित्र आला ॥ १६ ॥
माझ्या राज्यांतील संपत्ती । तारामती धरिली हातीं ॥ १७ ॥
घेई भूषण उतरोनि । म्हणे नामयाची जनी ॥ १८ ॥

[४४१]

विश्वामित्रें जाऊनि पुढें । वणवा लाविला चहूंकडे ॥ १ ॥
धुम्रें दाटलें अंबर । ज्वाळा येती भयंकर ॥ २ ॥
विश्वामित्रें काय केलें । राया बाळातें चुकविलें ॥ ३ ॥
दोघे न पडतां दृष्टी । होवोनियां परम कष्टी ॥ ४ ॥
म्हणे अहा कटकटा । काय लिहिलें अदृष्टा ॥ ५ ॥
मेलें वणव्यांत जळोनि । ऐसें आलें तिचे मनीं ॥ ६ ॥
पिटी लल्लाट करगळे । अंग टाकी धरणीं लोळे ॥ ७ ॥

अनुक्रमणिका

म्हणे बाळा रोहिदासा । भेट देई गा पाडसा ॥ ८ ॥
सूर्यवंशीं चुडारत्ना । प्राणपति गा निधाना ॥ ९ ॥
राव दृष्टि न पडतां । अग्नि खाईन तत्वतां ॥ १० ॥
ऐसें विचारिलें मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ११ ॥

[४४२]

धर्मशिळे आली राणी । ऋषि दचकला मनीं ॥ १ ॥
अग्नि विझवोनी अंगें । सतीपुढें आला रागें ॥ २ ॥
म्हणे कवणाची कवणें । अग्नि खासी कवण्या गुणें ॥ ३ ॥
येरी म्हणे पांथिकातें । पति बाळ चुकले मातें ॥ ४ ॥
तुम्हीं असतील देखिलें । मज सांगा जी वहिलें ॥ ५ ॥
ऋषि बोले तिजलागून । मेले अग्नींत जळून ॥ ६ ॥
तारामती नेउनी तेथें । दाखविलीं दोन्हीं प्रेतें ॥ ७ ॥
त्वचा अंगींची जळाली । हात पाय गोळा जालीं ॥ ८ ॥
देखें नृपाचें तें मढें । पाहें वल्लभा मजकडे ॥ ९ ॥
रुसूं नका बोला वेगें । गुजगोष्टी मजसंगें ॥ १० ॥
रोहिदास कवळी पोटीं । लावीं लल्लाट लल्लाटीं ॥ ११ ॥
शोक करी तारामती । अस्त जाला तो गभस्ती ॥ १२ ॥
प्रेत कवळी कां निर्फळ । गेला गेला हंसनीळ ॥ १३ ॥
आतां प्राप्त झाली निशी । व्याघ्र भक्षील तिघांसी ॥ १४ ॥
सति पुढोनियां प्रेत । नेलें ओढोनी परत ॥ १५ ॥
उदर फोडोनी त्वरीत । टाकियेलें काढुनी आर्त ॥ १६ ॥
रागें गुरगुरी तो जाणा । भय दावी क्षणक्षणां ॥ १७ ॥
येरी नेत्र झांकियेलें । पंचप्राण आकर्षिले ॥ १८ ॥
तारामती सांडील प्राण । लटिकें प्रतिज्ञा वचन ॥ १९ ॥
पतिपुत्र दोघेजण । आला घेउनी ब्राह्मण ॥ २० ॥
नाहीं व्याघ्र ना वणवा । मृगजळाचा हेलावा ॥ २१ ॥
तिघेजण एक जालीं । दासी जनी आनंदली ॥ २२ ॥



अनुक्रमणिका

[ ४४३ ]

पंथ क्रमितां तिघांसी । आडवा आला कपटवेषी ॥ १ ॥
होवोनियां वृद्ध विप्र । हातीं कांठी भार्याकुमर ॥ २ ॥
म्हणे धन्य रे नृपेशा । तुझा कीर्तिघोष ठसा ॥ ३ ॥
भेरी गर्जती त्रिभुवनीं । धांवून आलों मी ऐकुनी ॥ ४ ॥
आज्ञा करावी जी स्वामी । तुमचे शरणागत आम्ही ॥ ५ ॥
करुणा दाखवी रायासी । दीन आम्ही तीर्थवासी ॥ ६ ॥
पुढें प्रवास कठीण । पायीं नाहीं पायतण ॥ ७ ॥
तिघां वोपोनियां जोडे । जनी म्हणे जाती पुढें ॥ ८ ॥

[ ४४४ ]

आज्ञा करुनी सूर्यासी । तपवी द्वादश कळेसी ॥ १ ॥
वाप तपाच्या सामर्थ्यें । आज्ञा वंदिली आदित्यें ॥ २ ॥
पर्वताच्या लाह्या होती । असा प्रकाशला गभस्ती ॥ ३ ॥
रोहिदास म्हणे तात । बहु जालों तृषाक्रांत ॥ ४ ॥
भाकितसें हो करुणा । सत्वर मेळवीं जीवना ॥ ५ ॥
प्राप्त न होतां जरी तोय । जीव माझा जाऊं पाहे ॥ ६ ॥
बाळ कडे घेऊनियां । पैल दिसे तेथें छाया ॥ ७ ॥
उदकं प्राशन करुनी । पंथ क्रमुं म्हणे जनी ॥ ८ ॥

[ ४४५ ]

पुढें जातां कष्टप्रेम । निर्मी मोहाचे आश्रम ॥ १ ॥
धर्म पोयेची कुसरी । शोभा रमणीय साजिरी ॥ २ ॥
वृक्ष लागले अंबरीं । डोलताती नानापरी ॥ ३ ॥
फणस कर्दळी गंभेरी । आंबे नारळी खर्जुरी ॥ ४ ॥
चिंचा पोफळी जांभळी । गुंज खिरण्या रायकेळीं ॥ ५ ॥
सीताफळें कळें निंब । बोरें परीच्या दाळिंब ॥ ६ ॥
जाई मोगरा सेवंती । चांपा बकुल मालती ॥ ७ ॥

अनुक्रमणिका

पारिजातक हे चमेली । झेंडू गुलाबास मखमली ॥ ८ ॥
तुळसी मंजुळ शोभती । नानापरी पुष्पजाती ॥ ९ ॥
प्राप्त वसंताचा काळ । मधु कुंजती कोकिळ ॥ १० ॥
रंभा ऐशा देवांगना । सर्व श्रृंगारी भूषणा ॥ ११ ॥
वेलवाळा तोयें सारीं । उभ्या तिष्ठताती द्वारीं ॥ १२ ॥
सुगंध वनीं शीतळ जळ । ऐसें शोभे रम्य स्थळ ॥ १३ ॥
ऐसी देखोनी वाटिका । चोज नाहीं नृपनायका ॥ १४ ॥
म्हणती हे धर्मपोये । जनी म्हणे पुढें जाये ॥ १५ ॥

[४४६]

पोई अव्हेरितां रायें । मागें ऋषि धांवताहे ॥ १ ॥
धन्य धन्य रे नरेंद्रा । हातीं धरी हरिश्चंद्रा ॥ २ ॥
उष्ण न ध्यायी कहार । मार्गीं श्रम जाला फार ॥ ३ ॥
करा आश्रम पुण्यता । आम्हां घडों द्यावें तीर्थां ॥ ४ ॥
येथें केलिया आराम । व्यर्थ जाती वायां श्रम ॥ ५ ॥
क्रमा चार दिवस । पाहा पोईचा हा वास ॥ ६ ॥
द्यावी आम्हां सर्व जोडी । कृपा कराल ती थोडी ॥ ७ ॥
करा आनंदें भोजन । सेवा सिद्ध उदकपान ॥ ८ ॥
म्हणे जावें आश्रमाला । पुढें पंथासी लागला ॥ ९ ॥
त्राहें त्राहें रे जगदीशा । सत्त्व रक्षिशील कैसा ॥ १० ॥
ऐसा छळक हा ऋषि । नेणों पार कैसा नेशी ॥ ११ ॥
आमची चिंता तुजला हरी । जनी म्हणे कृपा करी ॥ १२ ॥

[४४७]

ऋषि आश्रमा येउनी । येतां देखे ताराराणी ॥ १ ॥
माव करुनि तात्काळ । कैसा निर्मिला नृपाळ ॥ २ ॥
येऊनि आश्रमासी पाहे । डोळां देखियेला राये ॥ ३ ॥
शुद्ध सुमन सेजे नीरा । घालिताती विंझणवारा ॥ ४ ॥
सुगंध चंदन चर्चिती । नानापरींच्या उटया देती ॥ ५ ॥

रत्नखचिताची झारी । राय घेऊनियां करीं ॥ ६ ॥
करी आनंदें प्राशन । पुढें दिव्यान्न भोजन ॥ ७ ॥
ऐसें करितां अवलोकन । राजा पाहे शामवदन ॥ ८ ॥
नव्हे तेंचि कैसें जालें । सूर्या अंधत्व आलें ॥ ९ ॥
पुष्पभार शेषावरी । कैसा आजि जाला भारी ॥ १० ॥
धृव मेरु गजबजिला । तैसी परी जाली रायाला ॥ ११ ॥
जोडोनियां करपद्मा । म्हणे बरी केली सीमा ॥ १२ ॥
ऐसें होतें जरी मनीं । तरी कां राज्य दिलें दानीं ॥ १३ ॥
बुद्धि भविष्यानुसार । मी तों आहे येथें स्थिर ॥ १४ ॥
म्हणोनियां पुढें जाय । अव्हेरिलें धर्मपोय ॥ १५ ॥
मागीं देखियेलें राया । जनी म्हणे लागे पायां ॥ १६ ॥

[४४८]

येतां देखोनियां बाळ । ऋषि धांवला तत्काळ ॥ १ ॥
कडे घेऊनि तयाला । ऋषि आश्रमासी आला ॥ २ ॥
तुझें मायबापीं प्रेम । होय पाहोनी आराम ॥ ३ ॥
सुखें करुनी भोजन । सुवासित उदकपान ॥ ४ ॥
करुनी क्रमियेलें पंथा । तिहीं सांगितली वार्ता ॥ ५ ॥
बाळ येतसे मागून । त्याचा परामर्ष [१]करणें ॥ ६ ॥
म्हणोनी सारिलें विदान । पुढें वाहिलें दिव्यान्न ॥ ७ ॥
रडे मोकलुनी धाय । येथें कल्पांतीं न राहे ॥ ८ ॥
पुढें लागला पंथासी । [२]ऋषि तटस्थ मानसीं ॥ ९ ॥
वदनीं बोट घाली वोजा । ऋषि करितसे चोजा ॥ १० ॥
ऐसें सत्त्वादिकांपुढें । तप खद्योत बापुडें ॥ ११ ॥
काय करणें ऐसियांसी । व्यर्थ मुकलों तपासी ॥ १२ ॥
मार्गीं तिघें एक जालीं । दासी जनी आनंदली ॥ १३ ॥

१ यमकाच्या दृष्टीने 'करण' असा शब्द पाहिजे.
२ कौषिक (भा.)

अनुक्रमणिका

[ ४४९ ]

ऐसें क्रमितां अवधारी । विश्वेश्वराचे नगरीं ॥ १ ॥
देखियेली वाराणसी । थोर आनंद मानसीं ॥ २ ॥
म्हणती घ्यावें शिवदर्शन । तेणें श्रमनिवारण ॥ ३ ॥
बाप येऊनि चौबारा । उभा धरूनि पदरा ॥ ४ ॥
म्हणे कोठें रे दक्षणा । बरा होसी चुकवणा ॥ ५ ॥
जो कां राजा सूर्यवंशीं । छत्र चामर जयासी ॥ ६ ॥
माथां बांधोनियां तृण । घाली विक्रया आपण ॥ ७ ॥
राणी म्हणे प्राणेश्वरा । आधीं विकरा माझा करा ॥ ८ ॥
रोहिदास कर जोडुनी । चरणीं मस्तक ठेवुनी ॥ ९ ॥
आधीं माझिया द्रव्यासी । तुम्ही द्यावें कौशिकासी ॥ १० ॥
ऐसें दोघांचें उत्तर । नवल करी ऋषीश्वर ॥ ११ ॥
काय करा याच्या बोला । म्हणे वजनीं सोनें घाला ॥ १२ ॥
अग्निहोत्री तो ब्राह्मण । उभा रायातें येऊन ॥ १३ ॥
देई तारामती तुक । एक भार हा कनक ॥ १४ ॥
रोहिदास म्हणे ताता । माता स्नेह माझ्या चित्ता ॥ १५ ॥
राव बोलिला वचन । शीघ्र यावें बा भेटोंन ॥ १६ ॥
उभी राहोनी वेल्हाळा । पोटीं बाळाचा उमाळा ॥ १७ ॥
अश्रु ढाळिती लोचन । हां हा शब्दें करी रुदन ॥ १८ ॥
बोले कौशिक ये माते । स्नेह सोड चाल पंथें ॥ १९ ॥
करूनियां ताडातोडीं । पाहे कवतुक आवडी ॥ २० ॥
माता म्हणे बाळकासी । ममता असूं दे मजपाशीं ॥ २१ ॥
रोहिदास ताराराणी । तेही घेतली ब्राह्मणीं ॥ २२ ॥
मोल देऊनियां दुणें । राव घेतला डोंबानें ॥ २३ ॥
घेऊनियां घरा आला । येऊन सांगतो भार्येला ॥ २४ ॥
सेवक आणिला तुम्हांसी । सेवा घ्यावी [1]आवडेल तैसी ॥ २५ ॥
घागर घेऊनियां हातीं । पाणी आणि शीघ्र गति ॥ २६ ॥

---

१ याजपासी (भा.)

कुंभ घेऊनि चालिला । खडा हाणोनि फोडिला ॥ २७ ॥
रिक्तपाणि येतां त्यासी । अवघे धुमसिती रायासी ॥ २८ ॥
हा तो पहिलाच शकुन । पुढें यानें काय करणें ॥ २९ ॥
म्हणती हा तो नव्हे भला । यासी ठेवा स्मशानाला ॥ ३० ॥
राव रक्षी स्मशानासी । म्हणे नामयाची दासी ॥ ३१ ॥

[४५०]

अनामिक त्यासी पुसे । तुमचें भोजनाचें कैसें ॥ १ ॥
कर संपुष्ट जोडुनी । राव विनवी मधुर वचनीं ॥ २ ॥
जेणें निघे तुमचें काम । राखा माझाही स्वधर्म ॥ ३ ॥
नृपा दिलें कोरें अन्न । सुखें करावें भोजन ॥ ४ ॥
धान्य घेऊनियां करीं । राव आला गंगातीरीं ॥ ५ ॥[1]
स्नान संध्या नेम सारी । राजा स्वयंपाक करी ॥ ६ ॥
गाय अग्नीचा पैं ग्रास । ठाव वाढिला धर्मास ॥ ७ ॥
ग्रास घालावा वदनीं । आला विश्वामित्र मुनी ॥ ८ ॥
बैसावें जों भोजनासी । अकस्मात् पावे ऋषी ॥ ९ ॥
एक भाग भक्षियेला । दुजा राजाचा उचलिला ॥ १० ॥
तृप्त होवोनि ऋषीश्वर । उठे देउनी ढेंकर ॥ ११ ॥
पदर कसुनी कटासी । सदा सादर सेवेसी ॥ १२ ॥
निराहार शक्ति हीन । दिसे जैसा रंक दीन ॥ १३ ॥
ऐसा छळीं प्रतिदिनीं । म्हणे नामयाची जनी ॥ १४ ॥

[४५१]

येरीकडे ताराराणी । द्विजा घरीं वाहे पाणी ॥ १ ॥
छिद्र पाडोनी रांजणा । पाणी त्यामध्यें थारेना ॥ २ ॥
नानापरीचें गांजणें । देती गाळी हो प्रदानें ॥ ३ ॥
पाणी वाहणें कीं खेळां । होऊं आली सांजवेळा ॥ ४ ॥
काळ कौशिक ब्राह्मणें । नित्य अग्निहोत्र करणें ॥ ५ ॥

१ चरण ५ व ६ (भा.) प्रतीमध्ये नाहीत.

अनुक्रमणिका

रोहिदासा आज्ञा करी । समिधा आणाव्या झडकरी ॥ ६ ॥
संगें घेऊनियां गडी । वना चालिला तांतडी ॥ ७ ॥
धरूनियां सर्पवेष । रोहिदासा केला दंश ॥ ८ ॥
येऊनी सांगती मातेस । सर्पें खादलें पुत्रास ॥ ९ ॥
गेला चंद्र उतरोनी । दिसे जैसी म्लान वदनीं ॥ १० ॥
करुणा आली ब्राह्मणासी । जाय सांभाळी पुत्रासी ॥ ११ ॥
रडे मोकलोनी धाय । म्हणे आतां मी करूं काय ॥ १२ ॥
काय करूं आतां कैसें । कोठें गेलें हो पाडस ॥ १३ ॥
[१]प्राण रोहिदासा कंठीं । करा पाडसाची भेटी ॥ १४ ॥
निबिड अंधार काळोख । दीर्घ स्वरें मारी हांक ॥ १५ ॥
ठेंचा पायीं अडखळत । पुढें पायासीं लागत ॥ १६ ॥
बाळ कवळोनि हात । जनी म्हणे शोक करीत ॥ १७ ॥

[४५२]

वेष धरोनि ब्राह्मण । तिसी करी संभाषण ॥ १ ॥
खेद न करी मानसीं । काय करणें होणारासी ॥ २ ॥
वेगीं संस्कारी याला । दिवसां मागती जा कामाला ॥ ३ ॥
घेऊनियां प्रेतासी । वेगीं चेतवी अग्नीसी ॥ ४ ॥
ज्वाला अवलोकितां नयनीं । राव आला तत्क्षणीं ॥ ५ ॥
म्हणे कोण गे तूं येथ । येरी म्हणे तुमचा सुत ॥ ६ ॥
कैचा सुत कैसा काय । आमचा हक्क कोठें आहे ॥ ७ ॥
करुणा ग्लानी करी त्याची । म्हणे गोष्ट हे तों कैंची ॥ ८ ॥
बरेपणें जाई आतां । दंड बैसतील माथां ॥ ९ ॥
घेई प्रेत ओसंगळी । वेगें प्रवेशे देउळीं ॥ १० ॥
आवडें प्रेत झोपीं जाय । ऋषी धांवे लवलाहे ॥ ११ ॥
उदर चिरोनियां नखीं । मांस कवळें घाली मुखीं ॥ १२ ॥
येऊनियां महाद्वारीं । जनी म्हणे शोक करी ॥ १३ ॥

१ प्राण राहिला संकटी ।

अनुक्रमणिका

[४५३]

धांवा धांवा नगरवासी । लास भक्षिते लेंकुराशी ॥ १ ॥
अवघे होऊनियां गोळा । कोणी न जातो देउळा ॥ २ ॥
जाळ करोनी पाहती । शेण धुळी धोंडे माती ॥ ३ ॥
मारोनी बाहेर घातली । केली डोंबाचे हवालीं ॥ ४ ॥
हिच्या करा शिरच्छेदाला । तंव तो आज्ञापी रायाला ॥ ५ ॥
रायें घेऊनियां तिला । आणियेलें ठिकाणाला ॥ ६ ॥
म्हणे करी हो स्मरण । तुझें कुळदैवत कोण ॥ ७ ॥
खड्ग पुसोनियां धारा । घाव घाली जो शिरा ॥ ८ ॥
ऋषि धांवला सत्वरी । वरच्यावरी कर धरी ॥ ९ ॥
म्हणे माग मी प्रसन्न । येरी बोले हास्यवदन ॥ १० ॥
रोहिदासा ऐसा पुत्र । हरिश्चंद्र राजा भ्रतार ॥ ११ ॥
याचक विश्वामित्रा ऐसा । जन्मोजन्मीं दे जगदीशा ॥ १२ ॥
बापा भली केली सीमा । तप वोपितों मी तुम्हां ॥ १३ ॥
गगनीं विमानें दाटती । सुमनभार वरुषती ॥ १४ ॥
वेगें उतरलीं विमानें । नामयाची जनी म्हणे ॥ १५ ॥

[४५४]

दूत विनविती कर जोडुनी । म्हणती आरुढावें विमानीं ॥ १ ॥
ऋषि म्हणे न घडे ऐसें । ह्याचि तृप्ति नाहीं आस ॥ २ ॥
पटावरुनि काढिला । पटीं बैसवीन ह्याला ॥ ३ ॥
थोर वाजत गाजत । विप्र मंत्रघोष करीत ॥ ४ ॥
विजयी जाला हरिश्चंद्र । आडवा पावला परिवार ॥ ५ ॥
लक्षानुलक्ष आरत्या करिती । नगरनारी ओवाळिती ॥ ६ ॥
ऋषि अभिषेकिती रायाला । थोर मनीं आनंदला ॥ ७ ॥
राया प्राप्ती जाला पट । गुढी उभवी वसिष्ट ॥ ८ ॥
येथुनी हरिश्चंद्र आख्यान । नामयाची जनी म्हण ॥ ९ ॥

अनुक्रमणिका

## थालीपाक

[४५५]

थालीपाक ऐकतां । हरि वारी जन्मव्यथा ॥ १ ॥
दुर्योधनाच्या घरासी । आला दुर्वास हो ऋषी ॥ २ ॥
सेवें बहुत तोषविला । वर माग तूं इच्छिला ॥ ३ ॥
शिष्यासह रानीं जावें । इच्छाभोजन मागावें ॥ ४ ॥
नंतर शाप द्यावा । आतां जातों वर द्यावा ॥ ५ ॥
हर हर शब्द थोर केला । जाला वनांत गलबला ॥ ६ ॥
नवल सर्वांसी वाटलें । जनी म्हणे ऋषी आले ॥ ७ ॥

[४५६]

मध्यरात्रीं ऋषिसहित । आला दुर्वास वनांत ॥ १ ॥
पंडुसुत जागे जाले । ऋषि समस्त वंदिले ॥ २ ॥
धर्म भीमाकडे पाहे । सत्वहानि होत आहे ॥ ३ ॥
द्रौपदीनें धावा केला । [1]निजला देव जागा झाला ॥ ४ ॥
ऋषि तृप्त केले वनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

[४५७]

करचरण प्रक्षाळुनी । उभी ठेली वृंदावनीं ॥ १ ॥
जोडोनियां करकमळा । [2]धांवे पावे बा गोपाळा ॥ २ ॥
कृष्णा पाहतोसी काय । आमुचें सत्व जाउं पाहे ॥ ३ ॥
ऋषि स्नानासी कोपिष्ट । गेले सांगोनियां स्पष्ट ॥ ४ ॥
दिवसा कर्मांचा उगाणा । सर्व सारोनियां जाणा ॥ ५ ॥
आतां येतो शीघ्र गती । अन्नें वाढा पात्रावरती ॥ ६ ॥
अन्न न देखतां डोळां । भस्म करीन सकळां ॥ ७ ॥

---

१ देव जेवितां उठिला ॥ (स्थळप्रत)
मार्गी चालता तातडी । क्षूधा लागलीसे गाढी ॥ ३ ॥ (शि. व पं.)
तिच्या पावला निर्वाणी । म्हणे नामयाची जनि ॥ ६ ॥ (धु.)
२ म्हणे धांव रे घननीळा ॥ (धु.)

गेला घालोनी संकटी । लाज राखें जगजेठी ॥ ८ ॥
[1]कोणी नाहीं रे निर्वाणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ९ ॥

[४५८]

ताट विस्तारी रुक्मिणी । देव बैसले भोजनीं ॥ १ ॥
इतक्यामध्यें अकस्मात । ध्वनि उमटला कानांत ॥ २ ॥
धांवा ऐकतां श्रवणीं । ताट लोटी चक्रपाणि ॥ ३ ॥
उठिला खडबडोनि कैसा । पावे बहिणीचिया क्लेशा ॥ ४ ॥
उभी वृंदावनीं बाळा । पुढें देखिला सांवळा ॥ ५ ॥
मुगुट कुंडलें मेखळा । वैजयंति वनमाळा ॥ ६ ॥
शंख चक्र आयुधें करीं । दिसे घवघवीत हरि ॥ ७ ॥
झळके पीतांबर कासे । नयनीं कोंदला प्रकाशे ॥ ८ ॥
पाहतां आनंदली मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ९ ॥

[४५९]

रत्नाचे मंचकीं पहुडे चक्रपाणि । चोळीत रुक्मिणी चरणांबुज ॥ १ ॥
कानीं पडियेले द्रौपदीचे बोल । उठे घननीळ तातडीनें ॥ २ ॥
रुक्मिणी म्हणे ऐक एक गोष्ट । पडिलें संकटीं तान्हें माझें ॥ ३ ॥
टाकिला गरुड अनवाणी पाय । जनी म्हणे माय धाविन्नली ॥ ४ ॥

[४६०]

वंदोनी श्रीकृष्णचरण । हरुषें घाली लोटांगण ॥ १ ॥
म्हणे तूंचि माझ्या मना । स्वस्थ करी गा नारायणा ॥ २ ॥
आश्रमासी येतां ऋषि । भोजन घालावें तयासी ॥ ३ ॥
ऐकतांचि हांसे देव । न दिसे प्राप्तीचा उपाव ॥ ४ ॥
अवकाळीं कैचें अन्न । विचारितां दिसे विघ्न ॥ ५ ॥
त्यांचे असो बळ तैसें । कांहीं वोपावें आम्हांस ॥ ६ ॥
स्वस्थ नव्हे माझें मन । क्षुधा लागली दारुण ॥ ७ ॥

१ तूंचि सोयरा निदानी । (धु.).

अनुक्रमणिका

ताटीं विस्तारिला मेवा । तुझा ऐकोनियां धांवा ॥ ८ ॥
न जेवितां आलों येथ । बहु जालों क्षुधाक्रांत ॥ ९ ॥
[1]सत्वर मेळवीं भोजनीं । म्हणे नामयाची जनी ॥ १० ॥

[४६१]

हासें आलें द्रौपदीसी । बापा वचन परियेसी ॥ १ ॥
सर्व अरिष्टभंजना । तुजवीणा बाहो कोणा ॥ २ ॥
एक भाव तुझे पायीं । या वेगळें कांहीं नाहीं ॥ ३ ॥
थाळीमाजीं पाहतां अन्न । होय क्षुधेचें हरण ॥ ४ ॥
थाळी दाखवी देवासी । कैंचा विश्वास तुजसी ॥ ५ ॥
धांडोळितां कष्टें बहुतें । किंचित शाखापत्र तेथें ॥ ६ ॥
निर्मी कैवल्याचा दानी । म्हणे नामयाची जनी ॥ ७ ॥

[४६२]

कर पसरिला भगवंतें । घाली द्रौपदी देंठातें ॥ १ ॥
म्हणे पावो विश्वंभर । बोले द्रौपदी सुंदर ॥ २ ॥
देतां तृप्तीचा ढेंकर । धालें त्रैलोक्य अपार ॥ ३ ॥
दावी कौतुक श्रीपती । पर्वत अन्नाचे पाहाती ॥ ४ ॥
उष्ण घवघवीत कैसी । वाफा उठती आकाशीं ॥ ५ ॥
नाना परिचीं दिव्यान्नें । डोळां दावीं नारायणें ॥ ६ ॥
चोज सर्वांचिया मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ७ ॥

[४६३]

येरीकडे गंगातीरीं । कवतुक दाखवी श्रीहरी ॥ १ ॥
धर्मासहित साहीजण । ऋषिलागीं देती अन्न ॥ २ ॥
रतनखचित मंडपा आंत । पंगती बैसल्या आनंदभूत ॥ ३ ॥
नानापरिचें दिव्य अन्न । वाढी द्रौपदी आपण ॥ ४ ॥
मिठी पडली वदनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

---

१ विलंभ लागताचि येथे । भस्म करतील सकळा ॥ १० ॥ (शि. व पं.)

[४६४]

म्हणती माथां असते तोंड । अन्नें भक्षितों उदंड ॥ १ ॥
कैचीं पोटें आमुचीं लहान । गोड धर्मा घरचें अन्न ॥ २ ॥
उदरें सागराच्या ऐसी । करुनी यावें धर्मापाशीं ॥ ३ ॥
तृप्ति द्रौपदीच्या हातें । नित्य भक्षाया अन्नातें ॥ ४ ॥
वदन करवेना तळीं । वरुती चंद्राची मंडळी ॥ ५ ॥
तंद्री लागलीसे नेत्रा । कोण सांभाळितें धोत्रा ॥ ६ ॥
तरी आवडी भोजनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ७ ॥

[४६५]

ऐशा धाल्या ऋषिपंक्ती । ढेकर आनंदाचे देती ॥ १ ॥
तृप्ति बाणली सर्वांसी । तरी आवड अन्नापाशीं ॥ २ ॥
उठले हात प्रक्षाळुनी । विडे घेतले सर्वांनीं ॥ ३ ॥
न बैसवे सुखासनीं । अवघे पहुडले शयनीं ॥ ४ ॥
ते देखोनि निद्रिस्थ । साही जणें झालीं गुप्त ॥ ५ ॥
माया निर्मियेली जैसी । आतां गुप्त जाली तैसी ॥ ६ ॥[1]
[2]कोणा न कळे याची करणी । म्हणे नामयाची जनी ॥ ७ ॥

[४६६]

म्हणे पाचारा भूदेवा । धर्म म्हणे सहदेवा ॥ १ ॥
गंगातिरासी येउन । नमियेले ऋषिजन ॥ २ ॥
त्वरा करा ऋषिजन । पात्रीं विस्तारिलें अन्न ॥ ३ ॥
म्हणती बापा ऐसें नव्हे । पोट आहे किंवा काय ॥ ४ ॥
आतां स्वस्थ प्रसादें । तृप्त जालीं ऋषिवृंदें ॥ ५ ॥
कैंच्या नष्ट दुर्योधनें । आम्हां धाडिलें दुर्जनें ॥ ६ ॥
कष्टी करितां अंबऋषि । चक्र लागलें पाठीसी ॥ ७ ॥
तेचि गोष्टी जाली आतां । शीघ्र पळावें तत्वतां ॥ ८ ॥

१ हा चरण काही (धु.) प्रतींत नाही. २ देवा न कळे तुझी करणीं । (धु.)

अनुक्रमणिका

माझा आशिर्वाद धर्मा । नित्य कल्याणचि तुम्हा ॥ ९ ॥
ऋषि निघाले तेथूनि । म्हणे नामयाची जनी ॥ १० ॥

[४६७]

ऐशापरि पांडवातें । रक्षियेलें दीनानाथें ॥ १ ॥
शंखचक्र आयुधें करीं । छाया पितांबर करी ॥ २ ॥
हस्त ठेऊनियां माथां । सुखी असा निर्भय चित्तां ॥ ३ ॥
आज्ञा घेउनी सर्वांची । देव गेले द्वारकेसी ॥ ४ ॥
सरला थालीपाक आतां । पुढें सावधान श्रोता ॥ ५ ॥
कथा पुढील गहन । घोषयात्रा निरूपण ॥ ६ ॥
येथुनी अध्याय कळस । जनी म्हणे जाला रस ॥ ७ ॥

[४६८]

ऐसा योग घडें ज्यातें । धन्य माता आणि ताते ॥ १ ॥
अखंड वासना । ब्रह्मार्पण देवार्चना ॥ २ ॥
ब्रह्मभावें हो देवा । ऐसा पूजी जो भूदेवा ॥ ३ ॥
नम्रता चरणीं । म्हणे जनी सरली मनीं ॥ ४ ॥[1]

## तीर्थावळी

[४६९]

जावोनी राउळा जोडूनियां कर । बोले ज्ञानेश्वर विठोबासी ॥ १ ॥
करावीं हीं तीर्थे आवड अंतरीं । घ्यावें बरोबरी नामदेवा ॥ २ ॥
ऐकतांचि [2]ऐसें म्हणे पांडुरंग । न धाडितां राग येईल तुज ॥ ३ ॥
तयाविण मज घडी जरी जाय । युगा ऐसी होय ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥
जनी म्हणे मग नामया पाचारी । कृपाळुवा हरि मायबाप ॥ ५ ॥

---

१ तुळसी वृंदावन नारायणी ऐसे मन। (पं.) प्रतीमध्ये असा एक अधिक चरण मिळतो.
२ हासे बोले (पं.)

अनुक्रमणिका

[ ४७० ]

जाय बरोबरी नामया तूं जाय । न चले उपाय कांहीं येथें ॥ १ ॥
करूं काय मज पडिलें सांकडें । उल्लंघेना भीड मज याची ॥ २ ॥
नामा म्हणे ऐका स्वामी नारायणा । एक विज्ञापना परिसावी ॥ ३ ॥
कटावरी कर नाहीं ज्या देवाचे । न घे मी तयाचें दरुशन ॥ ४ ॥
मारितांचि हांक यावें त्वां झडकरी । बरें म्हणे हरि नामयासी ॥ ५ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान चांगया । जनी म्हणे तया सांगतसे ॥ ६ ॥

[ ४७१ ]

तुम्ही सकळिक आहांत सज्ञान । हें माझें अज्ञान फार आहे ॥ १ ॥
याजबरोबर चालावी हो वाटें । मोडतील कांटे सांभाळावें ॥ २ ॥
हळूहळु जावें करूं नका घाई । चालायाची नाहीं संवय त्यासी ॥ ३ ॥
लागतांचि भूक न धरी हा निर्धार । घ्यावा समाचार क्षणक्षणा ॥ ४ ॥
जनी म्हणे ऐसें बोलिला घननीळ । नेत्रींहुनि जळ वाहतसे ॥ ५ ॥

[ ४७२ ]

वियोग नाम्याचा न साहे गोपाळा । न जाय राउळा पांडुरंग ॥ १ ॥
पद्मतळीयांत राहे विश्वंभर । कळे समाचार रुक्मिणीसी ॥ २ ॥
चलावें मंदिरीं स्वामी पुरुषोत्तमा । येईल गे नामा माझा जेव्हां ॥ ३ ॥
तयाविण मज दाही दिशा ओस । न लगे चित्तास गोड कांहीं ॥ ४ ॥
जनी म्हणे ऐसी आवड नाम्याची । म्हणोनियां त्याची जाले दासी ॥ ५ ॥

पाळणा

[ ४७३ ]

जो जो जो जो रे गोरक्षा । जगदोद्धारा जगदीशा ॥ १ ॥
शुद्ध सुमनांची सेज । भक्तिभावें आंत नीज ॥ २ ॥
माता उन्मनी केवळ । निजीं निजले गोपाळ ॥ ३ ॥
मागें घालुनी आनंदा । सुखें निजे बा गोविंदा ॥ ४ ॥
अद्वय नाम गीती गातां । दासी जनी कैंची आतां ॥ ५ ॥

अनुक्रमणिका

## पदें

[४७४]

पुण्यवंत तो पाताळ लोकीं नेला । दरिद्री तो भाग्यवंत केला ॥
चोरटयाचा बहुमान वाढविला । कीर्तिवानाचा अपमान केला ॥ १ ॥

धुंद झाला तुझा दरबार ॥ धृ० ॥

वैरियासि दिधली मोक्षसिद्धि । कपटिया दिधली महानिधी ॥
सेवकाच्या ढुंगा न मिळे चिंधी । चाळकासी त्रैलोक्य भावें वंदी ॥ २ ॥

पतिव्रता ती वृथा गुंतविली । वेश्या गणिका ती सत्यलोका नेली ॥
कळी स्वकुळा लावियेली । यादववृंदा ही गोष्ट बरी नाहीं केली ॥ ३ ॥

सत्यवानाचा बहु केला छळ । कीर्तिवानाचें मारियेलें बाळ ॥
सखा म्हणविसी त्याचें नासी बळ । जनी म्हणे मी जाणें तुझे खेळ ॥ ४ ॥

[४७५]

माझें अचडें बचडें । छकुडे गे राधे रूपडें । पांघरूं घालीती कुंचडें ॥ धृ० ॥
हरि माझा गे सांवळा । पायीं पैंजण वाजे खुळखुळा । यानें भुलविल्या गोपिबाळा ॥ १ ॥
हरि माझा गे नेणता । करी त्रिभुवनाचा घोंगता । जो कां नांदे त्रिभुवनीं ॥ २ ॥
ऐसे देवाजीचे गडी । पेंद्या सुदाम्याची जोडी । बळिभद्र त्याचा गडी ॥ ३ ॥
जनी म्हणे तू चक्रपाणि । खेळ खेळतो वृंदावनीं । लुब्ध जाल्या त्या गौळणी ॥ ४ ॥

[४७६]

विठोबा मला मूळ धाडा । धांवत येईन दुडदुडां ॥
चरणीं लोळेन गडबडा । माझा जीव जाला वेडा ॥ १ ॥

कर ठेवुनी कटावरी । उभा राहिला विटेंवरी ॥
मुकुट घातला सरीं । कलगी खोविली वरी ॥ २ ॥

पितांबर नेसूनिया पिवळा । गळां तुळसीच्या माळा ॥
कीं रूप सुंदर सांवळा । तेज झळके झळाळा ॥ ३ ॥

नामदेवाचें कौतुक । मला सांपडलें माणिक ॥
विठोबा पाहुनी तुझें मुख । हारपली माझी तहान भूक ॥ ४ ॥

विठोबा तुझी संगत बरी । जैसा चंदन मैलगिरी ॥
संत चालले पंढरी । निशाण पताका जरतारी ॥ ५ ॥

जशी मोहोळासी लुब्ध मासी । तसी तूं सखी माझी होसी ।।
सुख दु:ख सांगेन तुजपासी । माझा जीव होईल खुषी ।। ६ ।।
काळी मध्यान रात्र जाली । फेरी विठ्ठलाची आली ।।
जनी म्हणे सूक पडली । भेट नाहीं विठ्ठलाची जाली ।। ७ ।।

[ ४७७ ]

नवल वर्तलें नवल वर्तलें नवल गुरुचे पायीं ।
कापूर जळूनि गेला तेथें काजळी उरली नाहीं ।। १ ।।
साखर पेरुनी ऊंस काढिला कान जाला डोळा ।
निबर बायको भ्रतार तान्हा सासरा तो भोळा ।। २ ।।
नवल वर्तलें नवल वर्तलें नवल चोजवेना ।
डोहामाजीं मासोळीनें वांचविलें जीवना ।। ३ ।।
नवल वर्तलें नवल वर्तलें अनाम चक्रपाणि ।
गोकुळ चोरुन नेलें तेथें कैंची दासी जनी ।। ४ ।।

[ ४७८ ]

खंडेराया तुज करिते नवसू । मरूं दे रे सासू खंडेराया ।। १ ।।
सासू मेल्यावरी तुटेल आसरा । मरूं दे सासरा खंडेराया ।। २ ।।
सासरा मेलिया होईल आनंद । मरूं दे नणंद खंडेराया ।। ३ ।।
नणंद मरतां होईन मोकळी । गळां घालीन झोळी भंडाराची ।। ४ ।।
जनी म्हणे खंडे अवघे मरूं दे । एकटी राहूं दे पायापाशीं ।। ५ ।।

## दशावतार वर्णन

[ ४७९ ]

ऐसा हा देवानें थोर पवाडा केला । पूर्व अवतारीं जाला हयग्रीव ।। १ ।।
मग अंबऋषिसाठीं पडियेला संकटीं । मच्छ जाला पोटीं समुद्राच्या ।। २ ।।
होउनी कच्छप पर्वत धरिला । वराहें मारिला दैत्य भार ।। ३ ।।
तयाचा सहोदर मृत्यु नाहीं ऐसा वर । तेव्हां अवतार नारसिंह जाला ।। ४ ।।
अर्धनारी नटेश्वर दुसरा तो वामन । भार्गव तो निधान दशरथीं ।। ५ ।।

अनुक्रमणिका

होऊनियां कृष्ण कंस वधियेला । आतां बुद्ध जाला सखा माझा ॥ ६ ॥
लीला अवतारी हरि करी खेळ नाना । म्हणे जनी जाणा तें मी होत्यें ॥ ७ ॥

## प्रारब्धगती

[ ४८० ]

[1]बघायाला गेले क्रियामाण शिडी । घालूनियां उडी तेथें आले ॥ १ ॥
पुरवी या नवसा म्हणवी गा देवा । टोंचियेले जीवा गळ देहीं ॥ २ ॥
आठ चारीं फेरे फिरविती त्यासी । पाहती नवसासी पुरलें नाहीं ॥ ३ ॥
दुःख सुख तेथें पाहूनी प्रमाण । करिती समान क्रीयमाण ॥ ४ ॥
दुरुनी पाहती दावी जनी दासी । म्हणे नामयासी पहावें स्वामी ॥ ५ ॥

[ ४८१ ]

शेष पुसतां बाणातें । कोण काजा आला येथें ॥ १ ॥
बाण करी हाहाकार । मुखें पडलीया धूर ॥ २ ॥
वृक्ष पाडी हो मक्षिका । तैसे येथें जालें देखा ॥ ३ ॥
काय शिखंडीचे बाण । करितां भीष्माचें पतन ॥ ४ ॥
तेथें मागितलें पाणी । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

## कूट

[ ४८२ ]

मांडियला खेळ । रंग बुद्धिबळ ॥ १ ॥
कैंचा शह आला । प्याद्याखालीं फर्जी मेला ॥ २ ॥
शहबाजू जाली । जनी म्हणे मात केली ॥ ३ ॥

## भक्तिस्वरूप

[ ४८३ ]

भक्ति ते कठीण इंगळाची खाई । रिघणें त्या डोहीं कठीण असे ॥ १ ॥
भक्ति ते कठीण विषग्रास घेणें । उदास पैं होणें जीवें भावें ॥ २ ॥

१ वगाड लागले (शि. व पं.)

भक्ति ते कठीण भक्ति ते कठीण । सोसी जो तो वार घडे तया ॥ ३ ॥

[1]भक्ति ते कठीण विचारूनि पाहे जनी । भक्तियोगें संतसमागमीं सर्व सिद्धी ॥ ४ ॥

## काकड आरती

[ ४८४ ]

उठा पांडुरंगा प्रभातसमयो पातला । वैष्णवांचा मेळा गरुडपारीं धातला ॥ १ ॥

वाठवंटापासूनि महाद्वारापर्यंत । सुरवरांची दाटी उभे जोडूनि हात ॥ २ ॥

शुकसनकादिक नारद तुंबर भक्तांच्या कोटी । कवाडाआडूनि पाहताती जगजेठी ॥ ३ ॥

सुरवरांची विमानें गगनीं दाटलीं सकळ । रखुमाबाई माते वेगीं उठवा घननीळ ॥ ४ ॥

रंभादीक नाचती उभ्या जोडुनि हात ।
त्रिशूळ डमरू घेउनि आला गिरजेचा कांत ॥ ५ ॥

पंचप्राण आरत्या घेऊनियां देवस्त्रिया येती ।
भावें ओवाळिती राई रखुमाबाईचा पती ॥ ६ ॥

अनंत अवतार घेसी भक्ताकारणें । कनवाळु कृपाळु दीनालागीं उद्धरणें ॥ ७ ॥

चौयुगांचा भक्त नामा उभा कीर्तनीं । पाठीमागें डोळे झांकुनी उभी ते जनी ॥ ८ ॥

---

१ आधीच ये मरण । म्हणे जनी पुसणे भक्तीयोग ॥ (शि., पं. व धु.)



अनुक्रमणिका

## पंढरपूर प्रतीतील अप्रकाशित अभंग

[४८५]

अजामेळ रत दासी [1]जन्मात । अंतकाळीं तूतें पाचारीना ॥ १ ॥
आपल्या पुत्रासी म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ॥ २ ॥
कुट्टिणीनें तप काय केलें होतें । राव्या मिसें तेथें सुखी केलें ॥ ३ ॥
गोवळियाचीं पोरें बोंगाळ सेंबडीं । त्यांची तुज गोडी उच्छिष्टाची ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां किती म्यां बोलावें । मज नुपेक्षावें ब्रीदासाठीं ॥ ५ ॥

[४८६]

अच्युता केशवा मुकुंदा माधवा । देवाचिया देवा कृपासिंधु ॥ १ ॥
दाखवी पाउलें येतुली प्रार्थना । जगाच्या जीवना दीनानाथा ॥ २ ॥
त्राहे त्राहे त्राहे पतित किंकर । न करी अव्हेर म्हणवुनि ॥ ३ ॥
तुजविण कांहीं नेणें मी आणिक । उदास [2]निशंक उभा द्वारीं ॥ ४ ॥
नामा म्हणे माझी प्रार्थना केतुली । भक्तीचिया माउली म्हणवूनि ॥ ५ ॥

[४८७]

आसनीं शयनीं चिंती ऐसें देवा । सदा संग द्यावा हरिदासाचा ॥ १ ॥
प्रीती करुनी दुणी नाम तुझें द्यावें । सुख अनुभवावें विचारुनी ॥ २ ॥
ऐसे मनोरथ कोण करिल पूर्ण । तुज एकाविण पंढरिराया ॥ ३ ॥
सुखाचा सागर त्रिभुवनींचा राजा । मायबाप माझा पांडुरंगा ॥ ४ ॥
सर्वज्ञ चतुर दीनाचें माहेर । घेतलासे भार अनाथाचा ॥ ५ ॥
अनंत जन्मांचा शरणागत तुमचा । काया मनोवाचा विनटलों ॥ ६ ॥
नामा म्हणे मज निरवी संतजना । मी तुझा पोसणा दास म्हणोनी ॥ ७ ॥

[४८८]

धांव धांव आतां पडिलों संकटीं । संसाराची मोठीं आढी देवा ॥ १ ॥
पंढरीच्या राया सुखाच्या सागरा । नुपेक्षितां थारा देवापायीं ॥ २ ॥
कल्पनेची वेली वाढली अतुट । प्रारब्धाचा खुंट बळावला ॥ ३ ॥

---

१ 'जन्मान्त' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.
२ 'निश्शंक' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.

अनुक्रमणिका

मायामोह श्रम फैलावला आंगीं । ऐसिया आपंगीं नाहीं कोणी ॥ ४ ॥
नामा म्हणे व्यर्थ जातों मी वाहुनी । काढी ऐसा कोणी दुजा नाहीं ॥ ५ ॥

[४८९]

तुम्ही थोरल्या पाटलाचे लेक । तुम्हां मध्यें रे मी गरीब आहें एक ।
भला म्हणसी रे जाय गाई राख । माझ्या कांटा रे कांटा रे कांटा मोडला पाईं ।
कान्होबा संभाळ रे संभाळ आपुल्या गाई ॥ १ ॥
आपुली आपुल्या घरासि जातों भाई ॥ धृ० ॥
यमुना तीरीं रे नित्य करितां अंगोळी । मला म्हणतो रे जाये आण शिदोरी ।
मी कैसा रे आणु करुन भाकरी । काम करी भाई ॥ २ ॥
अजी भला रे भला खजूर लांबविला । गूळ घालुनियां फारच गोड केला ।
तुम्ही अवघ्यानें फार घेतला । मी निपट म्हणोनी मला थोडाच दिला ॥ ३ ॥
काली विवली रे भली येक सोनेरी । या गौळचाची गोरी गाय पळाली ।
जे देखीन तो करीन हाता मारी । माजी हीरोन रे काटी कांबळी ॥ ४ ॥
कृष्ण म्हणे रे उगा राहे बोबडचा । माझ्या कवडचा रे जिंकून नेल्या साऱ्या ।
मला म्हणतो रे फिरुन खेळ गडचा । नामा म्हणे रे तुमच्या गोष्टी रोकडचा ॥ ५ ॥
कान्होबा संभाळ रे संभाळ आपुल्या गाई ॥ धृ० ॥

[४९०]

जो हे सदाशिव योगी । ज्याची लक्ष्मी राजभोगी ॥ १ ॥
ज्याचे नवविधी घरीं । कामधेनु वसे द्वारीं ॥ २ ॥
नित्य वसे चिंतामणी । सदा शिवाचे सदनीं ॥ ३ ॥
दिल्ही रावणासी लंका । काय ठावा तिहीं लोकां ॥ ४ ॥
देह बुद्धि जाल्या नाश । काय घेतला संन्यास ॥ ५ ॥
नामा म्हणे दासापाशीं । रिद्धी सिद्धी घरीं दासी ॥ ६ ॥

[४९१]

मागें तुझी कांस धरियेली ज्यांनीं । वायां नाहीं कोणी गेलीं देवा ॥ १ ॥
मजवरी ऐसी निर्दया कासया । दर्शन द्यावया उशीर कां ॥ २ ॥
जीव पायावरी दिधला रे बळी । रूपेंचि न्याहाळी बांधुनियां ॥ ३ ॥
नामा म्हणे अंत पाहासी कासया । सर्व जाणतिया केशिराजा ॥ ४ ॥

[४९२]

मन हें चंचळ स्थिर नोहे कदा । विषयाच्या स्वादा भांबावतें ॥ १॥
याचिलागीं मोठा सुलभ उपाव । नाम मुखीं गावें वेळोवेळां ॥ २ ॥
चालतां बोलतां विषय भोगितां । नाम वाचे घेतां नाहीं बाधा ॥ ३ ॥
लौकिकीं निर्मळ थोरावती कीर्ती । सायुज्यता अंतीं ठेविलीसे ॥ ४ ॥
योग याग तपें मोठीं अवघड । कीर्तनीं जोडे सर्व सिद्धी ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम जिवाचें जीवन । शंकराचें ध्यान अखंडित ॥ ६ ॥

[४९३]

[1]भांड भागवता पडिलेंसे मित्र । दोहींचे तें गोत्र एक जातें ॥ १ ॥
वेश्या पतिव्रता पाहिलासे जार । दोहींचा आचार एक जाला ॥ २ ॥
संगतीं संमंधें संगतीतें बंधें । सत्य गति बोधे केशवराज ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्ही संगती । ब्रह्म तें लाधलें नारायणें ॥ ४ ॥

[४९४]

बाप कवणाचा माय कवणाची । सोयरीं धायरीं तेंही कवणाचीं ॥ १ ॥
जंव संपत्ति देखति तंवचि मानिति । सरलिया कवणाचें कवण म्हणती ॥ २ ॥
स्तनपान देऊनी वाढवी माऊली । तेही अंतकाळीं वेगळी ठेली ॥ ३ ॥
नामा म्हणे पाप पुण्य हे सांगाती । येर अवघी भ्रांति अरे मना ॥ ४ ॥

[४९५]

फुंदत फुंदत न देखेचि कांहीं । प्रेमाचिये सोई धांवतसे ॥ १ ॥
नामें पिसें नामें पिसें । नामें पिसें प्रेमाचें ॥ २ ॥
विष्णुदास नामा प्रेमाचिये साठीं । जीवें भावें केशवीं घातली मिठी ॥ ३ ॥

[४९६]

नको नको देवा संतति संपत्ति । खोटी त्याची रीति दिसताहे ॥ १ ॥
तुझे ठायीं मन राहे ऐसें करी । प्रार्थना श्रीहरी वारंवार ॥ २ ॥

---

१ 'भक्त' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.

प्रपंचाच्या ठायीं सुख मानिताती । नेणों त्यांची गति कैसी होय ॥ ३ ॥
नामा म्हणे दीन दारीं मी ठाकलों । कासाविस जालों कामक्रोधें ॥ ४ ॥

[४९७]

नटनाटकी नारायणा । पार नाहीं तुझिया गुणां ।
कां न ये माझी तुज करुणा । दयाघना पांडुरंगा ॥ १ ॥
पडिलों मोहाच्या बांधवडीं । पायीं जडली आशा बेडी ।
तुझी कीर्ती ऐसी चोखडी । घालुनि उडी सोडवी ॥ २ ॥
मागें तारिले अनेक । महापापी अजामेळादिक ।
आतां कां हो अलौकिक । मौन्य सुख धरिलेंसे ॥ ३ ॥
मी जरी महापापी । तुझा म्हणवितों साक्षेपी ।
येथें उपेक्षितें तथापि । ब्रीद स्वरूपीं लोपलें ॥ ४ ॥
नामा म्हणे देवाधिदेवा । भेटीस उशीर न करावा ।
पुरवी माझा येतुला हेवा । ये माधवा विठ्ठला ॥ ५ ॥

## धुळे प्रतीतील अप्रकाशित अभंग

[४९८]

विष्णुवीण ध्यान । भूतांचें पूजन ।
अनामिक जन । तेथील जे ॥ १ ॥
नेणती वेद । काढिती जे अभेद ।
ते पशु शब्द । श्रुती बोले ॥ २ ॥
न पुजी ब्राह्मण । नाहीं वृंदावन ।
नेणें तें कीर्तन । कृष्ण महिमा ॥ ३ ॥
रामकृष्ण मूर्ती । पूजील हस्तीं ।
जाये तो अधोगती । यैसा नरु ॥ ४ ॥
देवासि न पुजी । आघोरी तो सहजीं ।
संध्यास्नान काजीं । नेणें कांहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे काज । कृष्ण विष्णु भज ।
संसाराचें चोज । करुं नको ॥ ६ ॥

अनुक्रमणिका

[४९९]

पंढरी आनंद पाहातीये घडी । वास कल्पकोडी वैकुंठींचा ॥ १ ॥
आणितां अनुमाना नपवे समसरीं । महिमा न कळे थोरी सहस्त्रमुख ॥ २ ॥
जें सुख सुरवरां स्वप्नीं नाहीं दृष्टी । तें या वाळवंटीं आम्हां तुम्हां ॥ ३ ॥
धन्य चंद्रभागा पुण्य सरोवर । धन्य भीमातीर पुण्यभूमी ॥ ४ ॥
धन्य नरनारी गर्जती जे नामीं । ऐकोनि डोले प्रेमीं शूळपाणि ॥ ५ ॥
धन्य वेणु नाद धन्य वृंदावन । धन्य तें जीवन क्षेत्र वासी ॥ ६ ॥
धन्य पंचक्रोसी धन्य आसपासी । गर्जती अहर्निसीं नाम घोष ॥ ७ ॥
धन्य पशुपक्षी कीटक पतंग भुजंग । जया अंगसंग पांडुरंग ॥ ८ ॥
धन्य ते तरुवर अवघे साने थोर । अवतरले सुर गुप्त रूप ॥ ९ ॥
धन्य ते संसारी आवघे जीवन मुक्त । ज्याचें कुळ दैवत पांडुरंग ॥ १० ॥
धन्य त्यांचा वंश जाणोनि विश्वास । धन्य विष्णुदास नामा तेथें ॥ ११ ॥

[५००]

पैल गोपाळ सांवळा । कांसे मिरवी सोनसळा ॥ १ ॥
पैल उभा तो श्रीहरी । शंख चक्र शोभे करीं ॥ २ ॥
नामा म्हणे स्वामी माझा । विठो पंढरीचा राजा ॥ ३ ॥

[५०१]

तैसें हें सहज श्रीरामाचें ध्यान । वाचे नारायण अमृतमय ॥ १ ॥
धन्य त्याचें कुळ सदा पैं सकळ । दिननिशीं पळ राम नाम ॥ २ ॥
नामा म्हणे चोखडा भक्त तो उत्तम । वाचे सुगम हें राम नाम ॥ ३ ॥

[५०२]

तुजविण देवा नेणों मी आणिका । पंढरीनायेका सोयरिया ॥ १ ॥
देईं देईं भेट न करी उदास । काय पाहातोस मागें पुढें ॥ २ ॥
अंतराचा ठेवा जाणता तूं सर्व । काय म्यां सांगावें विवंचोनि ॥ ३ ॥
नामा म्हणे किती घेईं बा लौकरी । अनाथ मी द्वारीं उभा असें ॥ ४ ॥

[५०३]

जेथें भक्तीचा जिव्हाळा । तेथें न लगे कांहीं कळा ॥ १ ॥
आचरणें देव भेटे । तरी तें व्याधा घडलें कोठें ॥ २ ॥
जरी म्हणा प्रौढपण । ध्रुव बाळ केवळ सान ॥ ३ ॥
बळ पाहिजे विद्येचें । तरी ते गजेंद्रासि कैसें ॥ ४ ॥
जाती कैचें लाहे । तरी विदुर नीच नोहे ॥ ५ ॥
सत्ता पाहिजे शौर्याची । तरी ते उग्रसेना कैंची ॥ ६ ॥
रूप रेखा व्हावी साच । तरी ते कुब्जेलागीं कैचें ॥ ७ ॥
धनवंता भेटे हरी । तरी तो सुदामा भिकारी ॥ ८ ॥
सोडुनी द्यावा अभिमान । तरी तो अहंकारी रावण ॥ ९ ॥
देव भेटतो निष्कामें । तरी त्या गोपिका सकाम ॥ १० ॥
नामा म्हणे आवडती । देवा होय मुख्य भक्ती ॥ ११ ॥

[५०४]

जयाचिये मनीं नाहीं आणिक काम । त्याचा योगक्षेम तूंचि होसी ॥ १॥
सर्व भाव तुज भाविती दातारा । त्याचिया संसारा तूंचि होसी ॥ २ ॥
आहिक परत्र जें कांहीं देसी । तेंहि तूंचि होसी नारायणा ॥ ३ ॥
नामा म्हणे माझी [1]भक्तीची माऊली । केशवा पाऊली आहिके भाव ॥ ४॥

[५०५]

जन्मोनि संसारीं करितां भरोवरीं । अंतरला दुरी पांडुरंग ॥ १ ॥
मन जैसें पिसें हिंडत सुनाट । चुकोनियां वाट माहेराची ॥ २ ॥
नामा म्हणे देवा काये करुं यासी । तुजविण कोणासी सांगों आतां ॥ ३ ॥

[५०६]

काये करावें हें वदन । जेथें नाहीं हरिचें कीर्तन ।
काये करावे हे श्रवण । हरिचे गुण नाइकति ॥ १ ॥
काये करावे हे नयन । जे नोळखति पाप पुण्य ।
काये करावे हे करचरण । तिर्थागमन न घडेची ॥ २ ॥

---

१ 'भक्ताची' असा पाठ योग्य वाटतो.

काये करावें जोडलें धन । जैसे कां भुजंग रक्षण ।
काये करावें गृहस्थपण । अतीता भोजन न घडेचि ॥ ३ ॥

काये करावें योगीपण । मूळ इंद्रिया नाहीं बंधन ।
कांये करावें कठिणपण । उदकीं पाषण भिजेचिना ॥ ४ ॥

काये करावें सुंदरपण । मन मैळ कुश्चील तनु ।
काये करावें जाणितेपण । सर्वांभूतीं भजन जया नाहीं ॥ ५ ॥

काये करावें आयुष्यहीन । नुसतें बत्तिस लक्षण ।
नामा म्हणे तैसें भक्तिविण । केशव निधान अंतरलें ॥ ६ ॥

[५०७]

भक्ति हे पोर्णिमा बोध तो चंद्रमा । आनंद सिंधुप्रेमा भरतें आलें ॥ १ ॥
सिंधुचें गर्जन राम नाम थोर । वृत्ति लहरी फार थोरावती ॥ २ ॥
नामा म्हणे येथें जाला जो सुश्रांत । तोचि जीवनमुक्त देवा ऐक्य ॥ ३ ॥

[५०८]

न लगे मंत्रसार न लगती तपें । राम नाम सोपें मूळ मज ॥ १ ॥
ज्यांचेनि स्मरणें तरली गणिका । वैकुंठीच्या लोकां प्राप्त जाली ॥ २ ॥
राम नाम मंत्र जपरे तूं मना । तुटती यातना यमलोकींच्या ॥ ३ ॥
नामा म्हणे मंत्र जप हा परम । तो देह उत्तम तिहीं लोकीं ॥ ४ ॥

[५०९]

नाम हेंचि आदि नाम हें अनादी । नामें निरुपाधी सेवा तुझी ॥ १ ॥
नाम हेंचि सिद्धि नाम हे समाधी । नामें भवव्याधि निवारेल ॥ २ ॥
नाम सर्वांघटीं सानाची त्रिपुटी । नाम हें संकटीं सोडवील ॥ ३ ॥
नाम हें पूजन नाम हेंचि पूजा । नाम भावें भजा भयें कैसें ॥ ४ ॥
नाम हें आरत्र नाम हें परत्र । नाम तें सर्वत्र शोभिवंत ॥ ५ ॥
नाम म्हणे नाम आरोधी विरोधी । सेवितां भवाब्धि आटोनि जाये ॥ ६ ॥

[५१०]

पाणी तें देखणें वायु तेचि शब्द । गोविला गोविंद आकारामाजीं ॥ १ ॥
प्रणव ओंकार तेचि आत्मा होती । स्वच्छंदें बोलती देखण्यासी ॥ २ ॥

देखणें आपण शब्द तो आपण । आपली ते खूण आपण तोचि ॥ ३ ॥
आपला संवाद आपणचि आला । आपण विराला आपणामाजी ॥ ४ ॥
जीव तो देखणें सींव तो वी शब्द । येक रूप नाद खेवण्याचे ॥ ५ ॥
अहं हें देखणें सोहं शब्द होणें । ऐक्यतेंसि पाहाणें निश्चय तो ॥ ६ ॥
नामा म्हणे निश्चय सबळ । तोचि ब्रह्मगोळ नाचवितां ॥ ७ ॥

[५११]

मायेविण जें माहेर । ममतेविण जे सोयरे ॥ धृ० ॥
ते मज भेटवी केशवा । संत विश्रांतिचा ठेवा ॥ १ ॥
आंगेंविण आलिंगन । देऊनि निवविलें तनुमन ॥ २ ॥
असुनि नसती सर्वंगत । सर्वांभूतीं सर्वातीत ॥ ३ ॥
लोभाविण लोभापर । लोभाविरहित करुणाकर ॥ ४ ॥
नामा म्हणे विठोबाचे भेटी । प्राण दाटलासे कंठीं ॥ ५ ॥

[५१२]

रडे मोकलुनि धाय । देवा आतां करुं काय ॥ १ ॥
राहूं कोणाचा आधारा । सांग आतां विश्वंभरा ॥ २ ॥
तुजवांचुनि दाही दिशा । वोस वाटे जगदीशा ॥ ३ ॥
नंद म्हणे देवा । टाकुनि गेलासी यादवा ॥ ४ ॥
गडी म्हणे हरी । खेळुं कोणा बरोंबरी ॥ ५ ॥
ऐसे आक्रोशें रडती । नामा म्हणे धन्य भक्ति ॥ ६ ॥

[५१३]

लक्ष चौऱ्यांशीं सोसुनियां श्रम । दुर्लभ मनुष्यजन्म पावला ॥
सर्वांभूतीं हरी आहे निरंतर । वोळखी तूं करी संतसंग ॥ १ ॥
नामा म्हणे जंव न कळे काळवेळ । चिंती तूं उपाव सुटिकेचा ॥ २ ॥

[५१४]

केलिया सुधापान होतां ये अमर । तरि तुझा पार न कळेचि ॥ १ ॥
देव देव नेणें भुलोनियां गेलें । तुज विसरले मति मंद ॥ २ ॥

मानव विषईं लुब्धोनि बुडाले । तेहि पैं गुंतले मोहफांसा ॥ ३ ॥
नामा म्हणे मी जगामाजी रंक । तुझा पार देख केविं कळे ॥ ४ ॥

[५१५]

कैवल्याचें भरतें आलें भीमातटा । परब्रह्म चोखटा कोंदाटलें ॥ १ ॥
घ्यारे घ्यारे तुम्ही सुखाचें फुकाचें । पाय विठोबाचे हृदयीं धरा ॥ २ ॥
लोटला क्षीरसिंधु आला हो संगमा । देखोनि भुलला प्रेमा पुंडलिकाच्या ॥ ३ ॥
पृथ्वीचीं तीर्थें जालीसे मीलनें । व्हावया पावनें येथें आलीं ॥ ४ ॥
ऋषीमुनी गंधर्व शुक सनकादिक । पातले प्रत्यक्ष सुखालागीं ॥ ५ ॥
नामा म्हणे वेगीं ठाकारे पंढरी । प्रेम सुख लहरी तेथें आहे ॥ ६ ॥

[५१६]

चित्रकारें पुष्पमाळा लिहियेली । परिमळ तो लिहितां नये रे ॥ १ ॥
शशिसूर्यबिंब अवघें लिहितां येईल । प्रकाश तो लिहितां नये रे ॥ २ ॥
संन्याश्याचें सोंग अवघें येईल । वैराग्य तों आणितां नये रे ॥ ३ ॥
ज्याचें रत्न हारपतां तया न गवसतां । हानीची चिंता मानूं नये रे ॥ ४ ॥
नामा म्हणे करणी करों येईल । विठोबाचें प्रेम आणितां नये रे ॥ ५ ॥

[५१७]

चरण ध्याऊं तरी चरण पाताळीं । हृदयकमळीं केवीं राहे ॥ १ ॥
रूप ध्याऊं तरी वेदां अगोचर । वर्णितां साचार केंवि होय ॥ २ ॥
नाम ध्याऊं तरी अनंत गुणनाम । त्याविण परब्रह्म पाविजेना ॥ ३ ॥
तीर्थें हिंडिजे तरी भूमि नव खंड । आयुष्य उदंड नाहीं मज ॥ ४ ॥
धर्म करुं तरी न तुटे हे तृष्णा । संसार बंधन केवीं तुटे ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा अघटित घडे । जन्म मरण कोडें घालिसी झणीं ॥ ६ ॥

[५१८]

जतन करावया उभा विटेवरी । तळवटीं पंढरी वोडवली ॥ १ ॥
तिहीं लोकीं पिकला जगज्जीवन । प्राप्त पाहुनि देतसे ॥ २ ॥

अनुक्रमणिका

चातक चिंतनीं चळधर गगनीं । पुढारला मुनी पुंडरिक ॥ ३ ॥
विष्णुदासुनामा विनवी वेळोवेळां । प्रेमजीवनकळा मुराली ॥ ४ ॥

[५१९]

जिव्हा हेचि पोथी करुनी चांगली । लिहीन नामावळी लक्ष कोडी ॥ १ ॥
गोविंद गोपाळाचा टाळ । दिसतो निर्मळ सर्वांभूतीं ॥ २ ॥
वारंवार तेंचि वाचिन सत्वर । न राहें मी स्थिर पळलव ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंचि सदा माझें काम । देणें घेणें राम कृष्ण हरी ॥ ४ ॥

[५२०]

तीर्थाचें जें मूळ वृत्ताचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरीसी ॥ १ ॥
तें आम्ही देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांची ॥ २ ॥
सुरवरां चिंतामणी मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तेंचि असे ॥ ३ ॥
जीवांचें जीवन सुखाचें जें सार । उभें कटीं कर ठेऊनियां ॥ ४ ॥
नामा म्हणे नाहीं श्रुति आतुडलें । आम्हां सांपडलें गीत गातां ॥ ५ ॥

[५२१]

तूं करुणानिधी रघुराया रे । वंदिन तुझे पायां रे ॥ धृ० ॥
शरणागत मी निश्चय तुझा । दावि भजन सदुपाया रे ॥ १ ॥
माझा त्वां प्रतिपाळ करावा । निरसुनी दुस्तर माया रे ॥ २ ॥
नामा म्हणे ब्रीद आठवी स्वमनीं । अगणित सगुणीं काया रे ॥ ३ ॥

[५२२]

तुझिया नामें घननीळा । मुक्ती दिधली अजामेळा ।
चरणीं उद्धरिली शिळा । स्मरण मात्रें केलिया ॥ १ ॥
रामकृष्ण केशव विठ्ठल वाचे उच्चारा । तेणें हारती महापातकें ।
मुक्ती देई अवधारा ॥ २ ॥
उपमन्यु बाळक तान्हें । त्यानें मांडिलें निर्वाण ।
त्याचें ऐकोनि नाम स्मरण । क्षीरसागर रिधला ॥ ३ ॥

हिरण्यकश्यप दैत्य बळी । त्यानें पुत्र गांजिला छळी ।
तो त्वां सोडविला वनमाळी । स्मरण मात्र केलिया ॥ ४ ॥

द्रौपदी सभेसि आणिली । नग्न करू आरंभिली ।
तीसि वस्त्रें जें पुरविलीं । स्मरण मात्र केलिया ॥ ५ ॥

ऐसा कृपाळु अनंत । तो तुम्ही स्मरा हृदयांत ।
अंतीं देईल मुक्तिपंथ । विष्णुदासनामा म्हणे ॥ ६ ॥

[ ५२३ ]

तुझें नाम नारायणा । फोडी पाषाणासि पान्हा ॥ १ ॥

नाम घेतां वाल्मीकानें । टोणप्यासी फुटलीं पानें ॥ २ ॥

अजामेळ पापराशी । नामें नेला वैकुंठासी ॥ ३ ॥

नाम पावन पावन । नामा म्हणे हेंचि धन्य ॥ ४ ॥

[ ५२४ ]

आहो दाटला सन्मुख । मागें पुढे तेंचि देख ।
ब्रह्ममय जाला हरी । सत्य दाटला मुरारी ॥ १ ॥

आतां फुटेना कीं वाट । अणुरेणूहुनि दाट ॥ २ ॥

सदा आखंड भरला । ब्रह्मरूप एक जाला ॥ ३ ॥

नामदेवाचा हो पूर । लोटे चैतन्य सागर ॥ ४ ॥

[ ५२५ ]

ऐसा कैसा होसी तूं शिकवलें नाईकेसी ।
यालागीं भोगिसी तूं जन्म दुःख ।
मृगजळींचें पाणी रे ढाळ देतसे हरणी ।
आत्मा पडलिया धरणी मग जाणवेल ॥ १ ॥

अविसा सरीसा गलुगिलु पाहे मासा ।
टोंचलिया घसा मग जाणवेल ॥ २ ॥

घाट पारधियाचे नादें लुब्धला हरिण ।
हृदयीं भेदले बाण मग जाणवेल ॥ ३ ॥

एन ४२४७—६९

अनुक्रमणिका

पतंगाच्यापरी दिव्यावरी घालूं पाहे उडी ।
कुडी पोळलिया भीतरीं मग जाणवेल ॥ ४ ॥

विष्णुदास नामा विनवितसे तुम्हां ।
झणें परब्रह्म विसंबे बापा ॥ ५ ॥

[५२६]

उत्तरा आरती चरण मुरारे । कपुरका दीपला कपुर की बाती ।
कपुर बरै दिन रात मुरारै ॥ १ ॥
खांड सरोजी और मेवा । लंकासुपारी नारेल खोवा ॥ २ ॥
कहत नामदेऊ बलि बलि जाऊं । वैकुंठ जाऊं त बहुरी न आऊ ॥ ३ ॥

[५२७]

करुणा कंठस्वरिं आलड नारायणा । रुक्मिणीरमणा भावें तुज ॥ १ ॥
लक्ष्मीचे प्रीती वेधलेंसे मन । दीनांचें वचन नायकसी ॥ २ ॥
दीनांचा दयाळ मागील बोभाट । म्हणोनि हृदयस्फोट केला देवा ॥ ३ ॥
आपलें म्हणोनि मज उपेक्षावें । ऐसें न करावें नामयासी ॥ ४ ॥

[५२८]

कल्पतरु तुझें नाम नारायणा । माझी हे करुणा येऊं द्यावी ॥ १ ॥
लक्षुमीचा पती उणें काय तुज । देणें किती मज असे देवा ॥ २ ॥
जरि म्हणसील तुझें कर्म हीन । घेउनी सुदर्शन कर्मा मारी ॥ ३ ॥
सर्व खेळ तुझे कर्म तुज स्वाधीन । चालवी पायांविण पांगुळ ते ॥ ४ ॥
कर्ता हर्ता तूंचि ऋषीकेशी देवा । बोल ते आणिसी आम्हांवरी ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा चित्तावर घेसी । काय न करिसी रंका रावो ॥ ६ ॥

[५२९]

कां बा घातलें संसारीं । आतां कष्टीं वेगळें करी ॥ १ ॥
करा देवा अंगिकार । आतां फेडा माझा भार ॥ २ ॥

अनुक्रमणिका

माझे वागवी बा ओझें । दिधलियाचें क्षेम कीजे ॥
नामा धरितसे पाय । देवा आतां उशीर काय ॥ ३ ॥

[५३०]

कामादिक वैरी लाविले पाठिंसी । निश्चित हृषिकेशी बैसावया ॥ १ ॥
तुज आम्ही कष्टी करितसों फार । म्हणोनि करकर टाळूं पहासी ॥ २ ॥
परि देवा आम्ही न सोडूं तुम्हांसी । आपुले मनासीं विचारावें ॥ ३ ॥
नामयासी सलगी आधिंच कां द्यावी । मग कां करावें उपेक्षित ॥ ४ ॥

[५३१]

काया कासी पुरी आत्मा विश्वेश्वर देव । शांती भैरव रक्षितसे सत्राविचा ।
बोध भागीरथी देखा । मग मनकर्णिका स्नान करा ॥ १ ॥
श्रोत्र चक्षु जिव्हा घ्राण आणि त्वचा । हा पंच गंगेचा संगम जाला ।
ज्ञान तो माधव ज्ञान दृष्टी पाहे । अखंडित साहे त्याचे पाईं ॥ २ ॥
काम क्रोध लोभ दंभ अहंकार पंचक्रोशी । पार वस्ती त्याची परमार्थ केदार ।
वैराग्य मारुती निश्चय सांगाती दंडपाणी ॥ ३ ॥
शोधावें आंतर तेचि अंतर्गृहीं लिंगें । ठाईं ठाईं तेचि तत्वें ।
पंच कर्णें शोधा करा । येकवृत्ती भाव धरा चित्तीं म्हणे नामा ॥ ४ ॥

[५३२]

किती धांवा करूं सांग बा समर्था । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ १ ॥
काय जालें मज मोकलिलें देवा । प्रारब्धाचा ठेवा जैसा तैसा ॥ २ ॥
मागें तारियेले भक्त ते अपार । जाला मजवर [1]निष्ठुरता ॥ ३ ॥
नामा म्हणे किती करूं लोकचार । जाणसी अंतर आमुचें तूं ॥ ४ ॥

[५३३]

आरती कीजै राजाराम रीझै । भक्ति करौं जमत्रास न दीजै ।
पहिली आरती पहुप की माला । काली नाग नाथै श्रीकृष्ण गुपाला ।
दुसरी आरती देवकी नन्दन । संत उधारण कंस निकन्दन ।
तीसरी आरती त्रिभुवन सोहै । . . . . . . . . . .

१ 'निष्ठुरसा' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.



अनुक्रमणिका

चौथी आरती चहुँ जग पूजा । एक निरंजन अवर न दूजा ।
पंचवी आरती राम जी को भावै । राम जी का हरिजस नामदेउ गावे ।

[५३४]

अहो पांडुरंगा रुक्माईच्या कांता । निरोप द्यावा आतां येतों आम्ही ॥ १ ॥
राईरक्माबाई सत्यभामा माता । निरोप द्यावा आतां येतों आम्ही ॥ २ ॥
माझा नमस्कार गरुड हनुमंता । निरोप द्यावा आतां येतों आम्ही ॥ ३ ॥
नामा म्हणे चरणीं ठेऊनियां माथा । निरोप द्यावा आतां येतों आम्ही ॥ ४ ॥

[५३५]

आतां केशिराजा हेचि विनवणी । मस्तक चरणी ठेवितसे ॥ १ ॥
देह माझा असो भलते ठाईं । चित्त तुझे पायीं असों द्यावें ॥ २ ॥
काळाचें खंडन घडलें चिंतन । जन तनुधन विन्मुखता ॥ ३ ॥
कफवात पित्त देह आवसानीं । ठेवावें वारूनी दुरिते हो ॥ ४ ॥
नामा म्हणे तूं या काळाचा जनिता । येथेंचि ऐक्यता सकळांची ॥ ५ ॥

[५३६]

आतां तुझी भीड कोण ठेवी देवा । कलागत केशवा करुं तुझी ॥ १ ॥
अंतरींचा खोटा बाह्य दावी साच । काये त्या प्रीतीचें सुख आसे ॥ २ ॥
समर्थाच्या घरीं राहिल्या पां जाण । न मिळेचि अन्न भले काये ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझें ठेवि शहाणपण । [1]उठ उतरीन संतांमध्यें ॥ ४ ॥

[५३७]

आदि महामाया निर्गुण गुणाची । समचरणीं उभी विटे ॥
कोटी जन्माचें संचित प्रारब्ध । देखिलिया क्रियमाण फिटे ॥
स्वरूपरूपें रूपत्व पावली । राहिलि पंढरि पेठे ॥
भीवरींच्या तीरीं कृपाळु माऊली । भक्तासी सप्रेम भेटे ॥ १ ॥

१ अर्थ लागत नाही.

अनुक्रमणिका

माये सुंदरे ओ माये सुंदरे । गोकुळीं पवाडे केले बहुत ।
गोवर्धनीं जाहला ठसा । वृंदावनीं वेणु वाहुनियां ।
गोपिकांसी वेदु जैसा पुंडलिका कारणें । पंढरी आलासी विसावा होसी भक्ताचा ॥
सनकादिक तुझ्या गोंधळासी येती । मनोरथ पुरविसी त्यांचा ॥ २ ॥
दक्षिण चरणीं तोडर गर्जे । वाम चरणीं वाजे काकी ।
सकळ हीं तीर्थें राहिलीं तेथें । विश्रांती तये विषयीं ।
जानु जंघेवरी पितांबरें मालगंठी । पहातां भक्तां जाहले सुखी ।
हें रूप देखोनि मदन आला पोटीं । नामा म्हणे लागो दृष्टी ॥ ३ ॥

[ ५३८ ]

अनंत मूर्ति तुवां देखिल्या लोचनीं । त्यांत कोणती मनीं ठेवियेली ॥ १ ॥
अनंत नामें तुवां उच्चारिलीं वदनीं । त्यांत कोणतें नामीं नेम धरिला ॥ २ ॥
अनंत तीर्थीं देह सुस्नात केलासी । निष्पाप जालासी कोण्या ठाईं ॥ ३ ॥
अनंत शास्त्रें तुवां शोधिलीं नयनीं । अर्थ कोण तो मनीं ठेवियेला ॥ ४ ॥
नामा म्हणे विश्वासतां विठो भेटे । [1]कावल पालटे कैवल्य होय ॥ ५ ॥

[ ५३९ ]

अरे मना यातना सोसिल्या बहुवसा । येतां गर्भवासा वेळोवेळां ॥ १ ॥
विठोबाचें नाहीं घडलें भजन । भोगिले दारुण गर्भवास ॥ २ ॥
आतां तरि हित विचारी आपुलें । जंव आहे लाधलें मनुष्य देह ॥ ३ ॥
मागीलहि जन्म गेले पैं अनंत । नव्हेचि पैं तेथें ज्ञान भक्ति ॥ ४ ॥
म्हणउनी भक्तिप्रेम जो अंतरला । तो घेई आपुला साधोनियां ॥ ५ ॥
कृपा तुवां दीनानाथा पंढरिराया । दिधलें इंद्रिया भजनालागीं ॥ ६ ॥
नयनीं पाहे मूर्ति जिव्हे वर्णी कीर्ति । संतांच्या संगतीं निरंतर ॥ ७ ॥
तुलसीची माळ मकरंद घेऊनि । जावें लोटांगणीं देवद्वारीं ॥ ८ ॥
इतुकें करितां न लगति सायास । झणीं करिसी उदास सीणवणी ॥ ९ ॥
नामा म्हणे आतां येतों काकुलती । सोडि हे संगती वासनेची ॥ १० ॥

१ 'काया पालटे' किंवा 'कैवल्य पालटे' असे पाठ असावे. पुरावा नाही.

[५४०]

अविनाश वस्तु स्वयंभू संचली । ऐसी तैसी बोली साहिना त्या ॥ १ ॥
वर्णितां लागेनाचि पार । जाला तदाकार अनुभवें ॥ २ ॥
मौन्य रूपें तेणें दाखविली खुणा । दिसेना आपणा दुजेंविण ॥ ३ ॥
घेऊं लागे नाम जाला लज्जित । बोलताती संत ब्रह्म असे ॥ ४ ॥
नामदेव म्हणे ब्रह्म तें अब्रह्म । त्या नामीं निमग्न नाना जाले ॥ ५ ॥

[५४१]

विठ्ठल विठ्ठल म्हणारे सकळ । तेणें मायाजाळ तुटे वेगें ॥ १ ॥
विठ्ठल विठ्ठल ज्या माऊलीचे होटीं । विठ्ठल तिचे पोटीं गर्भवास ॥ २ ॥
नामा म्हणे माझी जिव्हा दे [१]यिळखा । असत्य केशवा वदे जरी ॥ ३ ॥

[५४२]

हें कोणाचें महिमान । पाणियाचें मोतीं होणं ॥ धृ० ॥
आहो पडतां [२]नाजुदुं । मुक्त मोती होय सिंधु ॥ १ ॥
शिळेमाजी हो दर्दुरी । अन्नोदक दिलें हरि ॥ २ ॥
नामयाचें ब्रह्मज्ञान । आवघ्या सत्तेचें महिमान ॥ ३ ॥

**गंगावने बाडांतील अप्रकाशित अभंग**

[५४३]

बहु सुख देखिलें संताचे चरणीं । भवश्रमापासूनि मुक्त जालों ॥ १ ॥
तेणें मी विसरलों संमोहाचें दुःख । नेणें ताहान भूक काय जाली ॥ २ ॥
सुख जेवीं चकोरा चंद्र देखतां दृष्टी । तैसी मज भेटी हरिदासांची ॥ ३ ॥
तृषाक्रांता सुख देखतां सरिता । तैसें मज होतां संत भेटी ॥ ४ ॥
शिनल्या बाळा सुख ओसंगीं । तैसा मी संतसंगीं तुष्ट होय ॥ ५ ॥
चुकल्या पाडसा सुख भेटतां कुरंगिणी । तैसी मज धणी संतसंगें ॥ ६ ॥
नामा म्हणे त्याचा वियोग केशवा । होतेक्षणीं जावा प्राण माझा ॥ ७ ॥

१ 'विळखा' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.
२ 'नीरबिंदु' असा पाठ योग्य वाटतो. पुरावा नाही.

अनुक्रमणिका

[५४४]

विठो माझें रे मन करिताहे तळमळ । तुझिया वियोगें जाण ।
जाऊं पाहे माझा प्राण । न धरी जीवा मी तुझी आण रे ॥ १ ॥
धाकुनि तूं लवलाहीं । लवकरी भेट देई । माझें आरत तुझे पाईं रे ॥ २ ॥
तुजविण नाहीं चित्तीं । गणगोत संपत्ती । नामया केशवीं अति प्रीती रे ॥ ३ ॥

## शिरवळ प्रतीतील अप्रकाशित अभंग

[५४५]

जाणीव शहाणीव वाहाताती ओझें । तरी पुसणें माझें तें सांगा तुम्ही ॥ १ ॥
प्रेम तें म्हणिजे कासया ऐसें । भोगिजे तें कैसें सांगा मज ॥ २ ॥
भक्ति ते ठेवी कासयाचें नांव । भावाचें वैभव कोणतें भोगी ॥ ३ ॥
नामा म्हणे हें तयासींच कळे । जें अहंभावावेगळें निरंतर ॥ ४ ॥

## लाडाई

[५४६]

जोडोनियां पाणि करी विनवणी । धांव चक्रपाणि पांडुरंगा ॥ १ ॥
कोणा निरविलें हें नाहीं कळलें । येईं गे विठ्ठले मायबहिणी ॥ २ ॥
ऐकोनियां धांवा धांवला अनंत । शंख चक्रांकित उभा पुढें ॥ ३ ॥
उचलोनि मुकुंदा घाली वोसंगळा । सांभाळी विठ्ठला तुझा तूंची ॥ ४ ॥
देव म्हणे तुझ्या पूर्वजासी भाक । दिधली ऐक सांगतों मी ॥ ५ ॥
तुमची वंशावळी पोशीन मी सत्य । म्हणोनि कुर्वाळी पद्य कर ॥ ६ ॥
येरी चरणावरी ठेविला माथा । कृपाळु अनंता सांभाळावें ॥ ७ ॥
ध्यानीं धरोनियां मूर्ती सबाहे अंतरीं । आतां या उपरी न देखे कांहीं ॥ ८ ॥
लाडाई म्हणे देवा घेई हृदयांत । देवें मग गुप्त केली तेथें ॥ ९ ॥

## जनाबाई

[५४७]

धन्य वंश जयाचा । वारकरी पंढरीचा ॥ १ ॥
जन्मोजन्मींचा अंकिला । त्यांनीं देव ऋषि केला ॥ २ ॥

अनुक्रमणिका

हाय पितरा उव्हास । समपुरी नाहीं त्यास ॥ ३ ॥
धन्य तयाची जननी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

## परिसा भागवत

[५४८]

आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठ्ठलासी ।
आज्ञा द्यावी वो मजसि । समाधी विश्रांती लागीं ॥ १ ॥
आयुष्य कळसासि आलें । अभंग सिद्धी नेले ।
ज्ञानेश्वर संगती घडलें । तीर्थ मिसें जगद्रोध्हरण ॥ २ ॥
जन्मा आलियाचें कृत्य । जना लावाये सुपंथ ।
विठ्ठल मंत्र त्रिभुवनांत । जग जानत महीमा हे ॥ ३ ॥
सर्व सिद्धी मनोरथ । तुझेनि कृपें पावलों समस्त ।
म्हणे परीस भागवत । नामा नाम जपतसे ॥ ४ ॥

• • •

अनुक्रमणिका

## पंढरपूर प्रतीत सापडणारी एक तीर्थावळी

[५४९]

॥ श्रीगणेशायनमः॥ श्रीसरस्वतिये नमः॥ तिर्थावळि नमन साधुसंताविठलाचिया भक्ता यैका अनुभवाचि मातु : पंढरियेविण निवालों म्हणति : हे बोलणें अवघेंच वातु : गेलों नरसिंपुरा नरहरि दरुषणें पातका पुरलांसे अंतु : निरे भिवरे संगमि स्नान करूनियां तेथें : पैं जालों सुस्नातु : गेलों गोदावरिये देखिलें नासिक : खरदुषणा जेथें घातु : देखिलि पंचवटिका जनकस्थानि सितेलक्षुमणेंसिं रघुनाथु : सुंदराचें दरुषण देखोनिया डोळां कपाळेस्वरा संयुग्त : आरुणा वरुणा प्राचि सरस्वति कशांवर्ति सुस्नातु : घुर्‌भेश्वरलिंग देखिलें जेथें सिवालै पै सुस्नातु : गंगाद्वारा आदितिर्थे करुनियां तेथे पैं जालों सुस्नातु जपतपध्यान पुजा करून ते गंईं आनंदलो हृदयांतु ॥ धन्य जालों कृत्य कृत्य जालों माझें जिवितो पंढरिनाथु ॥ छ धृपद ॥

माझा स्वामि तो विठल हरि पैल पाहा या पंढरपुरि : उभा देहुडा हे विटेवरि : समचरण ज्याच्या कटावरि : ॥ माझा स्वामि तो विठल हरि : ॥ छ ॥

देखिलि तापि जालो नि : पापि तापत्रय गेलि भंगा : संताचि साउलि आनाथाचि माउलि देखिलि नर्बदागंगा : वोंकारमाधाता देखिला जेथें : नमन केलें ज्योतिर्लिंगा : महिचें स्नान दुर्लभ लाधलों दोशभिति ज्याच्या वोद्या : वेदावति आदि तिर्थें करुनियां पुन्यच घडलें सर्वांगा ॥ १ ॥

भिमाशंकर लिंग देखिलें ज्येथें भिमा जालि पुण्यगंगा : दुरुनि देखिलि द्वारका-नगरी जेथें वास, श्रीरंगा : समुद्राचि ध्वनि यैकोनियां कानि पातका सिंहदृस्टिमृगा : आप अप. . तें पावलो तो आनंदुन माय जग़ा : गोमतिचें स्नान कृस्णा सनिध करुनि स्वर्गद्वार चढलो पैं गा : श्रीकृस्णासि देखोनि धन्य जालों कृत्याकृत्य जालों मज पंढरि अग्वेमागा : ॥ २ ॥ छ ॥

रे माझा स्वामि सोविठल हरी पैल पाहातां पंढरपुरीं : उभा देहुडा विटेवरी समचरण ज्याच्या कटावरी रे माझा स्वामि तो विठलहरि : पैले पाहाता पंढरपुरी ॥ छ ॥

चक्रतिर्थी आदितिर्थें करुनिया धन्य जालो संवसारी : षण्मास राहिल्यां द्वारकेचें पुन्य येकेदिसि संकोद्वारी : तेथे जाउनिया पाहिला देवशंकोनारायणहरी : पद्मतिर्था-माजि उत्तमकलेते आनंदें वाहिली सिरीं आंबा वंदिलि गोपिचंदनें गोपिकाच्या

सरोवरी : गेलो पिंडतारका आगस्तिकुंडा स्नान केले कविरी : चतुर्भुज कृष्ण देखिला जेथे सहितआयोध्यें चान्हि : रुक्मावति गंगा देखिली जेथे अजन्माचें पाप हरी : काय सांगो तेथें स्नान तप केलें दुर्वासया रुशेश्वरी : धन्य जालो कृत्याकृत्य जालों मज अठवली पंढरी : ॥ ३ ॥ माझा स्वामि तो विठल हरी ॥ छ ॥

अनुपम्य देखिलें रखुमाईचें बन कृस्णासी विवाह् जेथे : कर्दम कुंडिचें स्नान करुनिया हरी संसाराचे वेथे अमृतासारीखें मधुमतिचें निर संसाराचे वेथे ॥ क्षिरसमुद्रा ऐसे जेथें : आज्ञा गोविंदाचि नवल काय सांगो स्वादु पाहाता येकाचि हातें : कृष्ण कि माधव देखिला : जेथें तो वर्णिला कैलास नाथें : गेलो रेवातिरा भिमकुंडि स्नाननमन केलें आदिमाते : ॥ हीडे अंबेचें वन देखिलें गहन जें प्रिय साधुसाधकातें : सुवर्णगंगाप्रयागकुंड आदि तिर्थें करुनि तेणेंचि पंथे : मुचकुंदाचि गुफा ढवळपुरीयेसि देव दामोदर जेथें : धन्य जालों कृत्याकृत्य जालों मज पंढरी अठवे मातें ॥ ४ ॥

ऐसें पंचकृष्ण देखोनियां मि स्नानें दानें होये युक्त गेलो प्रभासे देखिला देवो सोहर विठुचा सोमनाथ आज्ञिकुंड ब्रह्माकुंड कपिल माहागंगा : तेथें जालो सुचुर्भुत : दक्षाचा स्त्रापि चंद्र क्षयरोगि तो किल्मिक्षापासावमुक्त : ज्वाळाचे देखिलें कळंक तिर्थस्नान केलें सागरांत : अनुपम्य देखिलें भालुकातिर्थ मज अठवले श्री कृष्णनाथ : हीरण्येचे तिर पडले यादव काये सांगो तेथीचि मात : वैकुंठीचा नाथ वैकुंठासी गेला तो नाम्या देखिला अश्वथ : सेवटी लाधलों तयाचा संगमि जालों सावचित : धन्य जालों कृत्याकृत्य जालों माझे जिवितो पंढरीनाथ : ॥ ५ ॥

रे जाता सुर्यकुड देखिलें शुभाचे कुष्ट पै गेलें : पश्चमे त्रिवेणि कृष्णप्रियागिं विधियुक्त स्नान पैं केलें मत्रिछाचे नगर उलघुनि सिधपुर देखिलें : माधवाचे चरणि प्राचि सरस्वति थोरा पुण्य नेलें तेथें : बींदु पडलातें देखिलें पाटणबिंदु सरोवर जालें : कपिल माहामुनि : श्रीहरी होउनि मातेसि ज्ञान उपदेसिलें : अंबेचें स्थल देखिलें : जेथें नंदासि सर्पें ग्रासीलें : गोपाळ गौळणी रुदना करीति : तेथें मण्य घेउनिश्रीकृष्ण आलें : चढोलो अबुदागीरी आर्बुदावरुनि अवलेस्वरा नमन केलें : धन्य जालो कृत्याकृत्य जालो मज पंढरपुर स्मरलें ॥ ६ ॥

तेथुनि जातां येक लिग देखिला महेशु : सारणेश्वर धुरजेठी : सकळतिर्था आदि म्हणति : ते देखिले पुस्कर क्षेत्र युक्तदृष्टि : यज्ञ वन्हाव पुजुनि सुखि केला परमेष्टि : आमृत उदक कमळदळ पवित्र उपमा देतां नाहि सृष्टि गेलो राम-वरदा जेथे फरशरामे क्षेत्रियाच्या कोटि तयाच्या रुधिरें तर्पण करुनि सुखि केला

परमेष्ठि : गेलो प्रथोदका वचिष्ट सनिधि प्राचि सरस्वतिचें तटीं : यज्ञ करुनिया पृथ्वी दुहिलि प्रथकराज्ञजगजेवी : जोति पै सरोवर देखिलें जेथें श्रीकृष्ण गिता उपदेसिलि किरिटि : समस्तहि कुरुक्षेत्र देखिलें जेथें घोउनि थानेसराचि भेटी : सरस्वतिचे स्नान आनंदे करुनि तो आनदन माय घेटि : धन्य जालो कृत्याकृत्य जालो मज पंढरीचे पेमपोठि : ॥ ७ ॥ माझा स्वामि तो विठल हरी : ॥ छ ॥

आद्वैत वनादिवने देखोनियां म्या टाकिलें यमुना तिर सूर्याची कन्या यमाची भज्नि आमृत जयेचें भिर : तप्तकुंडातुनि येतसे माउलि गंगेचे भेटी सरोवर : इंद्रप्रहस्ना जयवतरुषा वन देखिलें हस्तनापुर : अंतरवेदिक देखोनियां टाकिलें मायापुर : हरीद्वार : गंगा देखिलि मुक्तिच जैसि सकळ तिर्थाचें माहेर : सिता आळकनंदा चक्षु भद्रा च्यान्हि : वोघ परीकर हरीचे वर्मांगुष्ट ब्राह्माड फोडुनि आलीसे उदकाचि धार : तेथुनि गंगा धूर मंडळा गेलि मेरुचे मस्तकि स्थिर : सिता अळकनंदा चक्षु भद्रा च्यान्ही वोघ जिचे परीकर : चहूदेशा गेली अळकनंदा तिनें पवित्र केलें सचराचर : तेथुनि गंगा भरतखंडा गेलि उधरीले राजे सगर : सहस्त्रमूखि गंगा सागरा मिळालि कवण जाणे तिचे पार : धन्य जालों कृत्याकृत्य जालो मज अठवे परपुर : ॥ ८ ॥ माझा स्वामि तो विठल हरी ॥ छ ॥

तेथुनि जाता कुजा बिका तिर्थ देखिलें : रुसिकेश जेथे देवो : गांधारी सहित धृतराष्ट्र जेथें सुधला कौरवरावो : पाहिले तपोवन धात्रि पुलियुक्त सिधांसि जेथें निर्वाहो : मनभंग चित भगपर्वत चढतां शरीरबळा होये क्षे····· देवप्रयागीं रामपदें पाहातां तेथे होये आविदेवो : बै वैस्वा नररु भोगावति गंगा देवासि दुर्लभ भग वो : मंदाकिनि तिर पुजितां श्रीविठल रखुमाइचा नाहीं : पाचा पांडवासि केदार वदिला आणिक एक नवल वो : भिमशेने युधियुधि हर जोजितिला द्यापि मस्तकिं गदेचा घावो : लिंग दरुषणें स्त्राप घडे भिम दरुषणें वैस्णवासी वेवसाव : नवल देखिलें म्हैसियाचें रूप नटला तो कैलासरावो : हंसतिर्थादि तिर्थें करुनि मि लागलो तेथे पाहो : देखिलि धर्म सिळा माहापथु जेथे खुंटलासे वेवसाव : आवघड देखिला हिमाचल पर्वत पुढे न घळवेच पावो : भोवत्या नाना गंगा मध्यें मंदाकिनि देवांसि दुर्लभ ग वो : धन्य जालो कृत्याकृत्य जालो माझे जिवितो पंढरीरावो : ॥ ९ ॥

ऐसे पंचकेदार वदुनि जातां ढवळ गंगेचेनि तिरें पंचप्रयाग वदुनि ज्याच्या दरुषणें पातक नुरें : सुर्यधारा आनि प्रयासें कर्मुनी उळघुनि खड्गधारे : सिता अळकनंदा देखिलि जेवा होतसे हिवांचे तिर : बद्रिका भ्रमु देखिलाजे ये नारायण नाराकारे : प्तैनै कुंडिचे घेतले उदक अजन्माचें पातक नुरे : पंडुकेश्वर देखिल जेथें पापु

स्त्रापिला रुषेश्वरें : शक्ति वंदिलि माहादेवें : तेथे छेदिलि पै त्रिपुरे : पंचशैळादिक तिर्थें करुनियां वसुदरा धरीलि लोकवसति पुर्णकाम : परात्पर पांडुकेश्वर देखिला जेथें पंडु स्त्रापिला रुसेश्वरें : गंगेचा वोघ पाहावया जातां कष्ठलों बहुत शरीरें : अवघड मार्ग न दिसे पुढें भग तारीले विठलें : उदारें : सुरभी देवदारु भुज्य-पत्रांचि वने नानापरीचि परीकरें : पर्वतापासवि उतरतां गंगा देखिलि सुत्रृने थोरें : धन्य जालो कृत्याकृत्य जालो मज मोहिले परी पंढरपुरें माझा स्वामि तो विठलहरी : ॥ १० ॥

तेथुनि जातां उतरपथें खुटलि शरीराचि आस : हिवाचा पर्वत उलंघिता बहुत जालो कासाविस : सुरभि गाइचे थूळप देखिलें चामर जयाचें पुस : तयाचेनि क्षीर स्थानपान विठोबासि करीतां बहुत नमना उल्हास मानस सरुवर देखिलें जेथें : जैसे पैले आकाशें सुवर्णाच्या खाणि ज्याच्या होकोनि आद्यापि त्रिडति राजहंस : दक्षणे ब्रह्मा उत्तरे देवो पुर्वे पश्चमे प्रकाशे : हिमाद्रि पुलिंग पुळकश अभोज धनकश ऐसे आभुचि आज्ञान वसति तेथें विघ्न करीति राक्षेस : परतलो तेथुनि जाता पुर्व दिसे वनिबनि करुनि वास अवघड देखिलि गंडकि आदि करुनि सायास : शाळीग्रामाचा पर्वत देखला हरीक्षेत्र चालिसक्रोश : मुक्तीचें नक्षत्र देखिलें जेथें शाळिग्राम आस्मासास : वज्रकिटाचे लागले पाणिजिवे जालो कासाविस : हिवाच्या लहरीया आंगि चीडोनि वदले श्वास उस्वासा : ॥ श्रीहरीचि कृपा तरलो तेथुनि टाकिलि उतर प्रभास : चक्रतिर्था आदितिर्थे : करुनियां राहातातिं तापसा : ॥ ११ ॥

धन्य जालो कृत्याकृत्य जालो जो पुरी पंढरीपुरी मानस माझा स्वामि तो विठल हरी पैल पाहाता पंढरपुरी : उभा देहुडा विटेवरी : समचरण ज्याच्या कटावरी : माझा स्वामि तो विठलहरी : ॥ छ ॥

तेथुनि येता आयोध्या देखिलि : शरयुगंगेचा तिरीं राघवाचे चरण हृदई धरुनि स्नान केलें स्वर्गद्वारीं : निमिस्यारण्या ब्रह्माद्रिनेम्या पाहिले नयेचा तिरीं ॥ आद्यापि हरीकथा होतसे तेथें ते काये सांगो तेथील थोरी : सबळ देखिले कळकिरुप जेथें जेथे होते श्रीहरी : रेणुका प्रगट जालि देव फरशरामा अवतारी : कृस्णपदा कि म्हणति ते म्या पाहिली मधुपुरी : जन्मस्थान आणि गोकुळ विश्राति जेथें वधिला कौंस वैरी : मधुताळ आणि मचींद्र वृंदावनि देखिला : हरी : सुर्यकुंड भरतकुंड नदिग्रामादि वने देखिलि नानापरी : द्वादशवने वैकुंठी जैसि ऐसें शोभति भुमिवरि गोवर्धन पर्वत देखिला जे ये कृष्णें धरिला वामकरि : काळयाचे डोहि रुप जे देखिले श्रीहरिचें अक्षर ध्रु प्रल्हाद अंबरुसि वैष्णवांचें स्थानें देखिले नानापरि : आहिल्या सिळा उधरिलि रामें ते म्यां देखिलि गौतमेस्वरि : जानकि

जेथें पणिलि रामे ते म्या देखिलि जनकनगरि : श्रावण तटाक देखिलें जेथें दशरथें विधिला शरि सुकाचें स्थळ देखिले जेथें रंभा पातविलि सुस्वरिं माळवा देशा देखिला जेथें उजनि आवतिका तिरिं महिद्र क्षेत्र देखिलें जेथें महिकाळ वंदिला सिरिं : ॥ छ ॥

धन्य जालों कृत्याकृत्य जालों माझें अरंत्र पंढरपुरि ॥ १२ ॥

संकतिर्था आदिप्रयाग देखिला जेथें : वाहे त्रिवेणि गंगायमुना गुप्त सरस्वति सकळ मुक्ति चिच खाणि : गेलो वाराणसि बिंदमाधव जेथें विरचें स्वरभुलपाणि वंदुनि धुंडराज आणिक दंड पाणिभैरव देखिला नयेनि : विस्वेस्वर आणि भवानि मनकर्णिका अंतर ग्रुहि यात्रा आणिक पंचक्रोसि करुनि आनदन मायेजगिं : मुक्तिचें क्षेत्र गया देखिलि जेथें पितरां पिंडपाणि : फग्लुप्रेतसिळा करुणि आक्षवट वंदिलि ब्रह्मयौनि : वैजनाथ देखिला जेथें : इछिलें पाविजे मनि गंगासागरसंगम देखिला जेथें : सकळ पापांजलि धुणि : माधव देखिला साक्षांत श्रीहरि कापिल होउनि माहांमुनि : वाराह देखिला उकदेसि जेथें गंगावैतरणि जगंनाथ देखिला जेथें सकळ देवां मुगुटमणि : मध्यें सुभद्राद क्षणे बळिभङ्ग स्वेतवर्ण सहस्त्रफणि : तेथुनि येतां श्रोकुम देखिला सिह्याद्रि नृसिहवनि : देखिलि गोदावरि सुकृता चिरासिआवृत जयेचें पाणि : सप्तधा सागरासि मिलालि प्रगट दिसति वोघ तिन्हि : ब्रह्मसरिता अंतरवेदि जेथें नृसिहचक्रपाणि नमुनि वरदराज पाहिला : आरुणाचळ चिदांबर देखिला सहित लक्ष्मुमिराणि : नमुनि गोविदराज माहाका विस्णुकंचि देखिलि थोरापुण्यें : सेतु देखिला पवित्र परिकर क्षेत्र रामेस्वर नयेनि : राघवें स्थापिलें तें लिंग देखिलें निवालो धनुस्य कोटिस्थानि : ॥ धन्य जालो कृत्याकृत्य जालों परि पंढरिचे प्रेम मनि ॥ १३ ॥

ताम्रपर्णि कदरास्वामि पुढें देखिलि आळुवानगरि कंन्याकुमारि आदिकेशव आनंतशयनि देखिला हरि : तेथुनि येतां तिर्थे करितां महिद्र देखिला गिरि : पवनपुत्रे हनुमंत उडाला : तें स्थान म्या वंदिलें सिरिं : जनार्दन क्षेत्र देखिलें जेथें : शोभे समुद्राचे तिरि : हेमाद्रि केलें माघस्नान पवित्र निर्मळ निरिं : दक्षेणकासि गोकर्ण पातलो महेश माहाबळेस्वरि : ॥ आर्या वंदिलि समुद्रा माझारि स्नान केलें हरहरेस्वरिं : आनुहातध्वनि होतो ब्रह्मस्थानि काये वर्णु तेथिल थोरि : देवाचें निर्माल्य पातालिहुनि तें अद्यापि येतें भुमिवरि : तेथुनि वंदिलि वेद माता महांलक्ष्मि कोल्हापुरि : पंचगंगा वरुणा : कृष्ण तेथें पुजियेलें श्रीहरि : कृष्णावेण्या संगमि : स्नानें करुनियां नमन केलें माबळेस्वरि : संभुवेदिला पर्वतसिखरिं : मगं मि पावलो पंढरि : भिमरेचे तिरि विठल उभा कर ज्याच्या कटावरि : ष्टि पुंडलिक बैसला

चंद्रभागासरोवरि लक्षोनि दोहिंकडे दोरु पिंगरुड ज्याचे समोरि : जिविचे अर्तृ पुरलें आजि विठल धरुनि राहिलों अंतरि : पुर्वज उधरण तापत्रयहरण तें स्थान म्यां वंदिलें : सिरि : नामा म्हणे माझे सकळ मनोरथ पुरले देखोनि पंढरि : ॥ १४ ॥

माझा स्वामि तो विठल हरि : पैल पाहा पंढरपुरि : उभा देहुडां विटेवरि : समचरण ज्याच्या करकटावरि : माझा स्वामि तो विठल हरि : पैल पाहपां पंढरपुरि तिर्थावळि संपुर्णमस्तु : सके १५०३ । राक्षससंवत्सरे भाद्रपद शुद्धऽ सप्तमिस संपुर्णमस्तु : भोस्तु : ॥

• • •

[ इ ]

[ख]



[ग]

[घ]

[झ]



अनुक्रमणिका

[ध]





अनुक्रमणिका

[प]

[ भ ]

[म]

अनुक्रमणिका

[ह]

• • •

• • •

| अभंगाचा आरंभ | अभंग क्रमांक |
|---|---|
| **विसोबा खेचर** | |
| छंदें छंदें तीर्था | २ |
| जें जें असेल प्रारब्धीं | १ |
| **महादा** | |
| यादवांचे कुळीं | ३ |
| **लाडाई** | |
| पूर्वसंबंधें मज दिधलें | ४ |
| **आउबाई** | |
| शून्य साकारलें | ५ |
| **लिंबाई** | |
| तारी मज आतां | ६ |
| **परिसा भागवत** | |
| अणुमाजीं राम रेणुमाजीं | २४ |
| इंद्रनीळ तनु प्रसन्न वदन | २५ |
| कवित्वापरिस कवित्व | १५ |
| कविरस वाटोनि | १६ |
| कीर्तनाच्या वेळे अति | १३ |
| केशव परीसता नामा | १७ |
| कृतयुगीं नामा प्रल्हाद | २३ |
| गंगातीरीं तप तुवां | १८ |
| टाळ मांदळी | २१ |
| तुम्हीं गावें तेंचि | १९ |
| परसा म्हणे नामयासी | ७ |
| परसा म्हणे नाम्या | १४ |
| परसा सांगे स्त्रियेपाशीं | ९ |
| पैल मेळा रे | २२ |
| भूवैकुंठ जागा क्षेत्र हें | ११ |
| माते डावा डोळा | १२ |
| यावरी काय बोलली | १० |
| यावरी नामदेव काय | ८ |
| वैष्णवांचा थाट | २० |

| अभंगाचा आरंभ | अभंग क्रमांक |
|---|---|
| **नारा** | |
| आम्हां व्रत एकादशी | ३५ |
| काळा अलोट अभंग | ३७ |
| कैंचें आम्हां जातिकुळ | ३४ |
| कोटी यज्ञांचीं हीं | ३६ |
| तापत्रय तापले देहे | ३२ |
| तुज भांडवल मोक्ष | २८ |
| तुज मी अनन्य | २७ |
| तुझे चंरणीं चित्त रंगलें | ३० |
| देवा माझें मीपण | २६ |
| पुंडलिकाद्वारीं होतसे | ३३ |
| माझ्या विठोबाचें श्रीमुख | ३१ |
| मी आहें तेथें | २९ |
| सुखदु:खा भेटों गेलें | ३८ |
| **गोदा** | |
| आलिंगिला नामा हृदयीं | ४२ |
| ऐसा नामा भक्त पूर्ण | ५३ |
| जाच केला म्हणोनि | ५० |
| दोघेजण बाळ नारा म्हादा | ४८ |
| नामदेवा कैसा हा रे | ४० |
| नामयाचा नेम पाहों | ४४ |
| नामयाची माता काय | ४६ |
| नामा आला घरा | ४३ |
| नैवेद्याचा नेम असे | ३९ |
| भावें भक्तिवादें करावें | ५४ |
| राजाईचा संशय फेडिला | ५२ |
| वराईची गोणी कळली | ५१ |
| विठ्ठल रुक्माई भक्त | ४७ |
| विनविती देवा बहुत | ४१ |
| शिजला तो सर्प | ४९ |

अनुक्रमणिका

**विठा**



अनुक्रमणिका

**जनाबाई**

**[अ]**



**[आ]**



**[इ]**

• • •

क्रमांक १

५५ १७१

युगाबेरोबरीजानातीघटका गोकुळीच्याळोकाऐ
सेजाळे १ उध्दवसवनेदीसतीहाहीदीशा कायेरेजग
दीशाकेलेआला २ रोडावल्यागाईकरीतातीस्वंती
वछनकरीतीस्तनपान ३ अल्पानीतेहावर्जी
तीगोळनी आतान्यक्रपानीकेव्हाआला ४ येमु
नेच्यातीरीवृक्षरेखुकळे पत्रागनउडलेतयादुरवे ५
साथकाळीगडीआवधेचीबोलती मारुनीश्रीप
तीगेलानाही ६ जीवनावीणमछतैसेतळमळीती
नामालणेचीतीधेन्सेप्रेम ७ ५५ १७२

क्रमांक २

चा शोकतुजजाला ।।३।। नामाह्मणेदेवातुजऐसा
दाता ।।भजभवव्येथाकवणेपरि ।।४।। ।।१६७।।
आना थाचा नाथतुलिब्रिदावळि ।।मजकाहोजवि
भवव्येथा ।।१।। रिकस्लणे ना म्यागुरुवाचुनिया ।।मु
किपावावया आननाहि ।।२।। आननेणेकाहिकर्म
निविस्पति ।।नघेमाखिमासीगुरुविणा ।।३ जो ६६
रनाम्याजारगुरुसिचारण ।।तुटेभवबंधनतुझे

पंढरपूर प्रतीतील दोन हस्ताक्षरे

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

• • •

ते. ८८३. ॥ नामदेव ॥

॥ आकल्प आयुष्य व्हावे तया ।
॥ कुळा ॥ माझीया सकळा हरीच्य
॥ दासा ॥ १ ॥ कल्पनेची बाधा न
॥ हो कदाकाळी ॥ हे संत मंडळी सु
॥ खी आसो ॥ ध्रु ॥ अहंकाराचा
॥ वारा न लागो राजसा ॥ माझ
॥ वीष्णुदासा भावीकासी ॥ २ ॥
॥ शरीर प्रानाची करीन कुरवंडी
॥ क्षन येकन संडी संग साच्या ॥ ३ ॥
॥ नामा म्हणे सदा आसो त्याकृ ॥
॥ त्यान ॥ ज्या मनी नीधान पांडु
॥ रंग ॥ ४ ॥ नामदेव ॥ २९२ ॥

ते. ६५६

नगर प्रतीतील एक हस्ताक्षर

## [अ]

**अगडधूत** – बैरागी, गोसावी, नग्न भिकारी, ऐसपैस वाढीचा लठ्ठ माणूस.

**अगत्य** – निरुपाय, आस्था, जरूर, कळकळ, निष्ठा, साहाय्यकर्ता.

**अघ** – एका असुराचे नाव, पाप, गुन्हा, अपराध.

**अघटित** – चमत्कारिक, विलक्षण, आसुरी, भयंकर, आश्चर्यकारक, अवलक्षणी, अशक्य, अश्रुतपूर्व, लोकोत्तर साहसी.

**अघळ** – पूर्ण, परिपूर्ण.

**अचळ** – ओचा, पदर, स्थिर, गायी-म्हशी इत्यादींचे स्तन.

**अचिंत्य** – गूढ, दुर्ज्ञेय, अतर्क्य, इंद्रियांना गोचर नसलेले.

**अचोज** – अज्ञेय, न सापडणारा, आश्चर्य, नवल.

**अच्युत** – विष्णू, न ढळणारा, भ्रष्ट न झालेला, न ढळलेला.

**अज** – अजात, जन्मरहित, नित्य, ईश्वर (विष्णू), स्वयंभू, ज्याचा जन्म झालेला नाही असा, ज्याला जन्म नाही असा, ब्रह्मदेव, रघुवंशातील एक राजा, बोकड, बेरजेची पंक्ती.

**अजा** – कर्तृत्वहीन, मूर्ख, बावळट, शेळी.

**अजासर्पन्याय** – शेळी व साप यांमधील सख्यासख्यभाव, वैरभाव.

**अजासुत** – बकरा, मेंढरू, गरीब.

**अठरा** – १० इंद्रिये, ५ तन्मात्रे, बुद्धी, अहंकार, मन–असे अठरा घटक; संख्या-विशेष.

**अठराजणे** – (पुराणे), अठरा माणसे.

**अडाअडी** – प्रतिबंध, अटकाव, अडथळा, अडवणूक, तेढ.

**अडोर** – मूल (∠ अंडोर).

**अढळपद** – मोक्षपद, शाश्वतपद, ध्रुवपद, न सापडणारे पद (जागा).

**अणिमा** – सिद्धीचे नाव (आठ सिद्धींतील पहिली : अणिमा, लघिमा, प्राप्ती, प्राकाम्य, महिमा, ईशत्व, वशित्व, कामावसायिता, अशा आठ सिद्धी आहेत.), अत्यंत लहान किंवा बारीक असण्याचा धर्म किंवा स्थिती.

**अणु** – पदार्थाचा स्वतंत्र असा अतिसूक्ष्म भाग, बारीक कण, सूर्य किरणात जे धूळीचे कण दृष्टीस पडतात (दृग्गोचर होतात) त्यांच्या षष्ठांशाने लहान असणारा कण.

**अतित** – पूर्वकृत्य, पाहुणा, अतिथी, अनाहूत आलेला माणूस, दूर गेलेले किंवा मागे टाकलेले.

**अतिशय** – अनर्थ, अत्याचार, फार, पुष्कळ, अधिक, अतिरेक, मर्यादेचे उल्लंघन.

**अतुर्बळी** – बलाढ्य, शक्तिमान, बिनजोड (∠अतुल्यबळ, अतुर्बळ).

**अधम** – नीच, पापी, हलक्या दर्जाचा, दुष्ट, दुरात्मा, हलकट; (–ज्योतिष) सूर्य-चंद्राचा दारिद्र्य सुचविणारा योग; (–अंग) पाय; (–किडा) घोड्यांना होणारा एक रोग, विकार, काळपुळी; नेहमी आजारी असणारा.

**अधर** – ओठ (खालच्या बाजूचा); वाईट, नीच, खालच्या दर्जाचे; (–दिशा) अधोबिंदू.

**अधोऊर्ध्व** – श्वासोच्छ्वास, खाली व वर.

**अधोगति** – नीचस्थिती, हीन स्थिती, अवनती, ऱ्हास, खाली जाणे, उतरणे.

**अधोक्षज** – विष्णू [पुरुषमेध यज्ञाच्या वेळी विष्णूने देवांकडे डोळे खाली वळवून (कृपा दृष्टीने) बघितले. या दृष्टि-क्षेपातून सृष्टी निर्माण झाली (अशी कथा आहे.) यामुळे विष्णूला अधोक्षज म्हणतात.] ज्याचे डोळे खाली आहेत किंवा ज्याने (डोळे) दृष्टी खाली वळवली आहे असा.

**अनधिकार** – योग्यता नसलेला, अधिकार नसणे, पात्रता नसणे.

**अनमान** – अनादर, अनास्था, दुर्लक्ष्य, निष्काळजीपणा, उपेक्षा, बेपर्वाई, औदासीन्य.

**अनसुट** – अन्नशुद्धी, जेवणाचे सर्व पदार्थ ताटात वाढून झाल्यानंतर वर शेवटी वाढतात ते तूप (अनशुद, अनशुद्धः हे तूप वाढल्याशिवाय अन्न खाण्यास योग्य होत नाही असा संकेत.) चव न घेतलेले, न चाखलेले अन्न, अशा किंवा न उष्टावलेल्या अन्नाचे दान; ज्याला आपल्या वाटणीचा हिस्सा मिळालेला नाही असा; ज्याने रतिसुख घेतलेले, अनुभवलेले नाही असा पुरुष किंवा स्त्री; मनुष्याच्या मृत्यूनंतर येणाऱ्या भाद्रपद महिन्यातील कृष्ण पक्षात त्याला पिंड देण्याचा धार्मिक विधी; वर्षश्राद्धाचा आधला दिवस.

**अनाम** – नामातीत, अमूर्त, नामरहित, ज्याला नाव नाही किंवा नाव देता येत नाही असा, नावाने (वर्णनाने) ज्याला संबोधता येत नाही असा, ईश्वर, ब्रह्म.

**अनामिक** – अस्तित्वशून्य, ज्याचे नाव माहीत नाही असा. (पाहा : अनाम.)

**अनिर्वाच्य** – अनिर्वचनीय, अवर्णनीय, ज्याचे वर्णन करता येत नाही असा, शब्दात व्यक्त न होणारा, जे पूर्णपणे सांगता येणार नाही असे, जे सांगण्यासारखे नाही असे, ज्याचा निर्देश करू नये असे, वाईट.

**अनीरासा** – (अनारिसा) वेगळा, दूर, निराळा, भलता, भिन्न प्रकारचा किंवा जातीचा, विलक्षण, विचित्र.

**अनुज** – धाकटा, मागून जन्मास आलेला, लहान भाऊ.

**अनुताप** – पश्चात्ताप, स्वतःच्या अयोग्य कृत्याबद्दल वाटणारा खेद.

**अनुदिनी** – दररोज, प्रत्येक दिवशी.

**अनुपम्य** – अतुल्य, ज्याला दुसरी तुलना किंवा उपमा नाही असे, ज्याची बरोबरी करता येत नाही असे.

**अनुराग** – प्रेम, निष्ठा, भक्ती.

**अनुवादणे** – पुन्हा पुन्हा सांगणे किंवा बोलणे, स्पष्टीकरण व्हावे म्हणून तोच मजकूर अर्थहानी होऊ न देता किंवा अर्थहानी न करता निराळ्या शब्दांत सांगणे, पूर्वी जे कोणी काही बोलले असेल तेच बोलणे, प्रतिपादणे, किंवा त्याला दुजोरा देणे, नक्कल करणे, वायफळ भाषण करणे, भाषांतर करणे.

**अनुसरणे** – स्वीकारणे, मागोमाग जाणे, अनुकरण करणे, अनुरूप असणे, धरून असणे.

**अनुसंधान** – संबंध, संगती, जवळीक, अवधान, रोख, अनुरोध, लक्ष, धागेदोरे, हेतू, मतलब, आख्यान.

**अनुहात** – अखंड, निरंतर, सतत, एकसारखा, न थांबता.

**अनुक्षीर** – अमृतासमान, अमृतामागे, अमृतापेक्षा किंवा अमृताहून गौण.

**अन्नान** – विपन्नावस्था, भीषण दारिद्र्य, अत्यंत निकृष्ट अवस्था, मुळीच अन्न मिळत नाही किंवा जवळ असत नाही अशी स्थिती किंवा अवस्था.

**अन्वय** – वंश, योग, संबंध; अनुसरणे; शब्दांचा परस्परांशी योग्य संबंध, पद्यातील शब्दांची गद्यरूपात मांडणी, कार्यकारण संबंध, तात्पर्य, नित्य साहचर्य, प्राप्ती, स्थिती (अणूपासून ब्रह्मापर्यंत), आत्मस्थिती.

**अपदा** – संकट, दुःख, क्लेश, अडचणीची स्थिती, दुर्दैव, विपत्ती.

**अपदास्थपण** – पदभ्रष्टता, अवनती, संकटग्रस्तता, क्लेशकारक स्थिती, दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडल्याची अवस्था.

**अपाव** – पायापर्यंत, पायापासून, पायावाचून.

**अपैसे** – आपोआप, सहज, तात्काळ, लगेच, आपल्या आपण, आयते.

**अपैते** – स्वाधीन, प्राप्त, वश, आयते, आपोआप.

**अबला** – स्त्री, जिला बल नाही अशी, असमर्थ, दुबळी.

**अभरवंसा (अभरंवसा)** – संकट, अविश्वास, विश्वासभंग, आश्वासनभंग.

**अभाव** – अश्रद्धा, नास्तिकता, अस्तित्व नसणे, उणे, भाव नसणे, नाश, प्रलय, मृत्यू, भावाहून भिन्न अवस्था, स्तुतीला अपात्र, ज्याचे आकलन त्याच्या प्रतियोग्याच्या ज्ञानाशिवाय होत नाही तो. (उदा० पटाच्या अभावाचे ज्ञान पटाच्या ज्ञानाशिवाय शक्य नाही.)

**अभाविक** – ज्यांच्यापाशी श्रद्धा नाही असे, देवावर विश्वास नसलेले, कल्पनेत नसलेले, ज्याच्या शक्यतेबद्दल विचारही मनात आलेला नव्हता असे, अति स्वल्प, कमी असणे.

**अभिनव** – अपूर्व, नवीन, तरुण, कोवळा, ताजा, टवटवीत, नवशिका, तोंडासारखे बोलणे, खुशामत.

**अभिज्ञा** – निपुण, मर्मज्ञ, सर्वज्ञ, आनुभविक, परमात्मा, ओळख, स्मरण.

**अभ्यागत** – पाहुणा, जवळ आलेला.

**अमित** – अमर्याद, अपार, पुष्कळ, अनंत, अव्हेरलेला, अज्ञात, असंस्कृत.

**अमुला** – आद्य, बिनतोड, बिनमोल, मुळापासूनचा.

**अमूप** – असंख्य, पुष्कळ, विपुल.

**अमृत** – देवलोकीचे पेय.

**अमंगळ** – अपवित्र, अशुभ.

**अयुत** – संख्यादर्शक शब्द (१० हजार).

**अयोनीसंभव** – स्त्री-पुरुष संयोगाशिवाय जन्मलेला. शुक्रशोणीत संयोगाने उत्पन्न न झालेला.

**अरज** – अजब, नवल.

**अरि** – शत्रू, वैरी.

**अरी** – (अरि पहा.)

**अरुच** – चव नसलेले, बेचव, रुचिहीन.

**अरुता** – इकडे, अलीकडे, योग्यता, कार्यक्षेत्र, योग्यस्थान, अत्यंत जरूरी.

**अरोगिणे** – सेवन करणे, जेवणे, खाणे.

**अर्गळा** – कडी, सांखळी, अडसर, अडणा, आडणा, दाब, नियंत्रणा, आडकाठी.

**अर्धचंद्र** – चंद्रकोर (अष्टमीचा चंद्र), अर्धवर्तुळाकार जे काही ते, गचांडी, हकालपट्टी.

**अर्धमात्रा** – ओंकाराची अर्धी मात्रा, अक्षरावरची अर्धी मात्रा, औषधाचे एका वेळचे जे प्रमाण त्याचा अर्धा भाग किंवा वळसा.

**अलक** – ब्रह्म, लक्ष्य, केस.

**अलक्ष** – ब्रह्म, अज्ञेय, अकल्प्य, जे जाणता येत नाही, ज्याची कल्पना करता येत नाही असे; दुर्लक्ष, तुच्छ, तिरस्कार.

**अलोहित** – लाल, नाजूक.

**अवगुण** – दुर्गुण, खोड, व्यसन, अहित, दुष्परिणाम.

**अवचट** – दैववशात, नशिबाने, अनपेक्षित, अकल्पित, एकाएकी, अकस्मात.

**अवचिन्ह** – दुश्चिन्ह, वाईट खोडी, वाईट शकून.

**अवदान** – आहुती, एका आहुतीपुरते होमद्रव्य, शौर्य, शौर्याचे कृत्य, प्रशस्त धंदा.

**अवनी** – पृथ्वी, भू-प्रदेश, पृथ्वीचा तळ.

**अवसर** – काळ, प्रसंग, संधी, वेळ, जागा, शिरकाव, फुरसत, देव-भूत इत्यादींचे अंगात येणारे वारे.

**अवस्था** – स्थिती, उत्कंठा, तन्मयता, दशा, परिस्थिती, स्वरूप, स्थिरता, हजर राहणे.

**अवज्ञा** – अनादर, तिरस्कार, अपमान, आज्ञाभंग, उपमर्द.

**अव्यय** – अक्षय, ब्रह्म, अविनाशी, शाश्वत, सुरक्षित, खुशाल, क्षेम, मितव्ययी, ज्याला विभक्ती आदी विकार होत नाही असा शब्द.

**अशौच** – अपवित्र, मलीनपणा, अमंगलपणा, सुतक किंवा सोवेर.

**अश्व** – घोडा, सात ही संख्या.

**अष्टदळ** – कमळाच्या आकाराची आठ पाकळ्यांची किंवा पानांची रांगोळी, आठ पानांचे किंवा पाकळ्यांचे, अष्टकोण.

**अष्टधान्ये** – आठ प्रकारची धान्ये.

**अष्टभाव** – शरीराचे सत्त्वगुणाचे आठ प्रकार [(१) स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, वैवर्ण्य, अश्रुपात, प्रलयः किंवा (२) कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रू, स्वेद, हास्य, लास्य, गायन.]

**अष्टलोकपाळ** – अष्ट दिक्पाल, अंतरिक्षाच्या आठ दिशांचे पालन करणाऱ्या देवता. (इंद्र, अग्नी, यम, नैऋत, वरुण, वायू, कुबेर, ईश.)

**असुख** – दुःख, सुख नसणे.

**असुर** – दैत्य, राक्षस, शक्तिमान.

**असोस** – पुष्कळ, उत्कट प्रेम, अतृप्ती, हाव.

**अस्कावेळ** – घास, अन्न.

**अस्तमान** – अस्त, सूर्यास्त, ग्रह-तारकांच्या अस्ताची वेळ.

**अस्त्र** – मंत्र, समंत्र शस्त्र, हत्यार, अस्त्रविद्या.

**अहिक्य** – ऐहिक, लौकिक, या (मृत्यू) लोकातील.

**अहंकारतस्कर** – अहंकार हाच चोर किंवा दुर्गुण.

**अहंभाव** – ताठा, अभिमान, अहंपणा, मीपणाची किंवा परमात्म्यापासून आपण वेगळे आहोत अशी जाणीव.

**अळुमाळु** – किंचित्, थोडे, परिपूर्ण.

**अक्षई** – सर्वकाळ, अविनाशी.

**अक्षर** – वर्ण, झिजत नाही असे, शिव, विष्णू, जीवात्मा, परमात्मा, भाषण, विद्वत्ता, वेद, मोक्ष, आकाश. (पाहा : अक्षई.)

**अक्षवाणे** – अक्षवाहण, ओवाळणे (दीप लावून किंवा भोवती पाणी फिरवून.), अरिष्ट नाहीसे करण्याचा विधी.

## [आ]

**आइती** – सिद्धता, तयारी, विस्तार, सामग्री, ऐट, डौल.

**आऊत** – औत, नांगर, इत्यादी; हत्यार, साधन; चिव्याचे पदार्थ (उदा० सूप, टोपली, इत्यादी.); माडाची पोय कापण्याचा कोयता.

**आकर्ण** – विशाल, लंबवर्तुळाकार, कानापर्यंत.

**आकळु** – आकलन, बंधन, आटोका.

**आकार** – प्रकार, अंदाज, आकृती, रूपरेषा किंवा आराखडा, चेहरा, चेहऱ्यावरील विकार, अभिप्राय, ऐक्य, ऐक्यज्ञान, ग्रह (एखाद्या विषयीचा.), सुमार, संभव, पद्धती, ठसा, बाह्यस्वरूप, वागणूक, राहणी, चाल, ढब, परिमाण, किंमत, सारा, आविर्भाव.

**आकारित** – आकार असलेले, आकार धारण केलेले, आकार असण्याची किंवा आकार धारण करण्याची क्षमता असलेले. (पाहा : आकार.)

**आकृति** – झोपल्यासारखे पडून राहण्याची स्थिती (पाहा : आकार.)

**आकांत** – अनर्थ, संकट, गोंधळ, कल्लोळ, असह्य उपद्रव, आरडाओरड, कोलाहल.

**आखरी** – अक्षय, शेवटी, मोकळी जागा, गाडीची दोन चाके ज्या आसाभोवती फिरतात त्याच्यावर बसविलेले तुळई-सारखे लाकूड. (गाडीची चौकट यावर बसविलेली असते.)

**आखिला** – अखिल, सर्व.

**आगम** – येणे, प्राप्ती, उत्पत्ती, प्रवाह, दस्तऐवज, उत्पन्न, मिळकत, विद्या, तात्त्विक ज्ञान, शास्त्र, वेद, मार्ग, येण्याचा रस्ता, नदीचे मुख, परिणाम, आरंभ.

**आगमनिगम** – वेद, आरंभ आणि शेवट. (पाहा : आगम.)

**आगळा** – अधिक, वरचढ, श्रेष्ठ, पुष्कळ, मोठा, उद्धट, मगरूर, निराळा, अडसर, वेगळा.

**आघात** – तडाखा, धक्का, जखम, वध, वधस्थान, संकट, प्रहार, अनर्थ.

**आच्छादित** – लपविलेला, आवरण घातलेला, झाकलेला.

**आज्य** – तूप.

**आडचाल्लो** – हट्टी, दुराग्रही.

**आडळ** – अडचण, एक वृक्ष, स्पर्श, अडलेला.

**आण** – शपथ, मिठाचे एक माप (रास), आणखी, आणि.

**आतित** – अतिथी, पाहुणा, ऐन जेवणाच्या वेळी आलेला अनाहूत पाहुणा.

**आत्मसोय** – आत्मसुख, ब्रह्मज्ञानापासून होणारे सुख, स्वतःची सोय, स्वतःचे सुख.

**आथिले** – असलेले, संपन्न, युक्त, भाग्यवान, थोर.

**आदित्य** – सूर्य, तेज, परमेश्वर, श्रीकृष्ण.

**आधर** – ओठ.

**आनत्व** – वेगळेपण, भिन्नत्व.

**आनार** – डाळिंब (झाड किंवा फळ).

**आनारिसा** – अद्वितीय. (पाहा : अनीरासा.)

**आप** – आपलेपण, पाणी.

**आपदा** – संकट, आपत्ती.

**आपरुप** – आत्मरूप, ब्रह्मरूप.

**आपंगिणे** – प्रेमाने जवळ करणे, स्वीकारणे, सांभाळ करणे.

**आफळणे** – आपटणे, अर्धवट शिजणे.

**आबळा** – व्यापून राहिलेला, हयगय, हेळसांड.

**आय** – आकार, अस्तित्व, जन्म, कर, येणे, उत्पन्न, आई.

**आरक्त** – लाल, तांबूस चकाकी असलेले.

**आरज** – आढयता, गर्व, श्रेष्ठ.

**आरडी – दरडी** – रान-डोंगर, नदीकाठ, डोंगराचा चढ-उतार, खाच-खळगा.

**आरता** – जवळ, नजीक.

**आराणूक** – स्वास्थ्य, विश्रांती, रिकामपण.

**आराध्य** – पूजनीय, उपास्य.

**आराधिणे** – पूजणे, प्रार्थिणे, सेवा करणे.

**आराला** – उत्कंठित, उत्सुक.

**आरुबर** – कोमल, मऊ, सुंदर.

**आरुष** – अडाणी, पोरकट, असंबद्ध, छांदिष्ट, वैदिक किंवा त्यापूर्वीचा.

**आरू** – फणा, तुरा.

**आरोळी** – हाक, गर्जना, किंचाळी.

**आर्त** – आतुरता, उत्कंठा, तळमळ, उत्कट इच्छा, पीडलेला, दुःखी, रोगी, अनाथ.

**आर्ती** – उत्कट इच्छा. (पाहा : आर्त.)

**आवतणे** – बोलावणे, निमंत्रण, निमंत्रण करणे.

**आवला** – नावाडी, वल्हवणारा, कर्णधार, सूत्रधार, मार्गदर्शक.

**आवारु** – नुकसान, दोन.

**आवंतिका** – उज्जयिनी, सात पवित्र संस्मरणीय नगरांपैकी एक.

**आव्हाट** – प्रतिबंध, आडमार्ग, वस्ती.

**आश्रम** – अवस्था, मार्ग (वर्णाश्रमातील : ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, संन्यास.), अरण्यातील वस्ती, निवास.

**आस** – इच्छा, उत्कंठा, आशा, कणा.

**आसाळी** – हडळ, पिशाच्च.

**आसीपत्र** – तलवारीच्या धारेसारखे पान.

**आसंदत्त** – खोडकर, दुराचारी.

**आसुंडणे** – हिसका देऊन ओढणे, झटकणे, पाखडणे (सुपात घालून).

**आहाच** – वरवर, मिथ्या, सरासरी, सहज, उगीच.

**आहाळणे** – भाजणे, पोळणे, होरपळणे.

**आहेवपण** – सौभाग्य, सधवापण.

**आळणे** – दाट करणे, घट्ट करणे, आटणे, संकोच पावणे, दाट किंवा घट्ट होणे.

**आळवण** – पुन्हा पुन्हा म्हणण्याची क्रिया, आवृत्त करणे, पदार्थ घट्ट होण्यासाठी लावलेले पीठ.

**आळी घेणे** – गप्प बसणे, छंद घेणे, गळ घालणे, हट्ट करणे.

**आळुकणे** – भुकेणे, तीव्र इच्छा असणे, हपापणे.

**आळका-के** – (विशेषण) (पाहा : आळुकणे), छंद, ध्यास, किंचित.

एन ४२४७—७४अ

**आळोआळ** – गल्लीगल्ली, प्रत्येक गल्ली.

**आंदणा** – नजराणा.

**आंदोळणे** – हालणे, हेलकावे घेणे, झोके घेणे किंवा देणे.

## [इ]

**इज्यत** – लज्जा, प्रतिष्ठा, अब्रू.

**इडापीडा** – अमंगळ, दुश्चिन्ह, उपद्रव.

**इष्टतुटी** – आप्तांपासून दुरावणे, नातेवाईकांपासून दूर होणे.

**इळ** – वेळ, काही वेळ, घटका.

**इंदु** – चंद्र.

**इंद्रावन** – कवंडळ, एक कडू फळ (दिसायला मात्र सुंदर).

## [उ]

**उगला** – स्तब्ध, गप्प, गुपचूप, निश्चल, निष्क्रिय.

**उगाळणे** – थुंकणे, ओकणे, पुन्हा पुन्हा सांगणे, घासणे व उपयोगी आणणे.

**उचित** – योग्य, लायक, नेहमीचे, परिपाठाचे, सवयीचे, स्वाभाविक.

**उच्छिष्ट** – उष्टे, उरलेले, भोगून टाकून दिलेले.

**उजरी** – तेज, चकाकी, उत्कर्ष, उदय, स्वच्छ, निर्मळ.

**उजळणे** – चकाकणे, सतेज होणे, गोरे होणे, सुधारणे, परिपक्व होण्याच्या मार्गास लागणे अथवा अवस्थेस येणे.

**उटी** – लेप, तेज, टेकण, रास.

**उणा** – नपुंसक, कमी, कमी प्रतीचा. (पाहा : उणाव.)

**उणाव** – उणेपणा, कमीपणा, अपुरेपणा, अपमानकारक.

**उणे** – दोष, वैगुण्य, खोडी, कमीपणा, अपुरेपणा.

**उत्कंठित** – उत्सुक, अधीर.

**उत्तर** – श्रेष्ठ, अंतिम, युक्त, पूर्ण, एक दिशा, पुढला, नंतरचा, अधिक, आठांनी अधिक, जबाब (प्रतिवचन).

**उदधि** – समुद्र.

**उदंड** – पुष्कळ, विपुल, अमाप.

**उद्धट** – दांडगा, प्रचंड, भव्य, धीट, पराक्रमी, वृद्धिंगत झालेला.

**उधळा** – भस्म, बेसुमार खर्च करणारा.

**उन्नति** – श्रेष्ठपद, उच्चपद, उत्कर्ष, समृद्धी, उंची, उद्धटपणा.

**उन्मनी** – तंद्री, लीनता ; जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुरीया यापलीकडची ब्रह्मलीन अवस्था.

**उपवर** – संभोगक्षम, लग्नाला योग्य, लग्नसंबंधास पात्र, नहाण आलेली.

**उपाद** – पीडा, त्रास, प्रपंच.

**उपेक्षिणे** – अव्हेरणे, त्याग करणे, दुर्लक्ष करणे, हयगय करणे, विचारात घेण्यास अपात्र ठरविणे.

**उबग** – कंटाळा, उद्वेग, किळस, त्रास.

**उबगणे** – त्रासणे, कंटाळणे. (पाहा : उबग.)

**उबारा** – उष्णता, दाह, उबटपणा, कोंडलेल्या जागेतील उष्णता.

**उभड** – गहिवर, उमाळा, उद्रेक, जोराचा प्रवाह किंवा स्फोट.

**उभरा** – भरण, घागर (पोषणाची), पक्क्या रंगाचा, फिका झालेला.

**उमगणे** – जाणणे, ओळखणे, हुडकणे, प्रगट होणे.

**उमज** – समज, शहाणपण, ज्ञान, उलगडा, आकलनशक्ती, शंकानिरसन.

**उमाणे** – कोडे, कूटप्रश्न.

**उरी** – बाकी, हिशेब, ठाव.

**उर्ध्वपुंड** – चंदनाचा उभा टिळा.

**उलणे** – दुभंगणे, पाझरणे, तडकणे, फाटणे.

**उलथणे** – पालथे घालणे, संपूर्ण चाळणे, उलटणे.

**उलीसा** – लहानसा, एवढासा, अगदी थोडा.

**उश्शाप** – शापनिवृत्ती, शापविमोचन, शापाची तीव्रता कमी करणारे वचन, शापापासून सुटका करणारे वचन.

उष्टावळी – उष्टे, खरकटे, अन्न खाऊ घालण्याचा एक संस्कार.

उंच – उच्च, वर, मोठा (जातीने).

उंडा – गोळा (भिजवलेल्या पिठाचा), एक खाद्यपदार्थ.

[ऋ]

ऋणाईत – कर्जबाजारी, ओशाळलेला.

ऋणिया – (पाहा : ऋणाईत.)

ऋणियारा – कर्ज देणारा, सावकार.

ऋषेश्वर – दिरंगाईचा किंवा सावकाशीचा अथवा अव्यवस्थित कारभार करणारा.

[ए]

एकट – एकटा, एकमेव.

एकदेसी – एकांगी, एका अंशापुरता मर्यादित, एका देशाचा, पक्षपाती.

एकदंत – गणपती.

एकमोर-रे – एकमार्गी, अन्य गोष्टीकडे चित्त जाऊ न देणारा.

एकवृत्ति – केवल मनोभाव.

एकसरे – एकेक सर्व, एकसारखे.

एकावळी – एकपदरी माळ (गळ्यातील दागिना).

एकोत्तरशत – एकशे एक.

एकोविष्णु – एक विष्णू हा देव.

[ऐ]

ऐवज – रक्कम, द्रव्य, मालमत्ता, योग्यता.

[ओ]

ओगरिणें – वाढणे (अन्न).

ओढण – ढाल, तणाव, तणाव्याची दोरी, मागील बाकी, रूढी, वहिवाट, मागे जाण्याचा हेका, पदर.

ओढाळ – उनाड, द्वाड, नियंत्रणात किंवा दाबात राहण्यास नाखूष.

ओल्हावणे – द्रवणे, उत्तेजित होणे, दया दाखविणे, अंतःकरण पाझरणे.

ओशाळपण – निलाजरेपण, स्वैरता, शरमिंदेपण.

ओळगणा – आश्रय, लोचटपणा, आलिंगन, बिलगणे.

ओळगणे – आश्रय घेणे, भजणे. (पाहा : ओळगणा.)

ओंकार – ॐ हा मंत्र.

[औ]

औट – साडेतीन.

[अं]

अंकणा – वश, भूषण, पैंजण.

अंकुश – एक उपकरण, हत्यार, अणकुचिदार हत्यार (लोखंडाचे), इशारतीसाठी हत्तीच्या गंडस्थळावर माहूत टोचतो ते हत्यार.

अंग – शरीर, ठिकाण (कौशल्याचे), शरीराचा कोणताही अवयव, कोणताही विभाग, अंश, संबंध, कर्तृत्व, गुप्त मदत.

अंगलग – जिव्हाळ्याचा, नात्याचा, जवळचा.

अंगवळा – संगत, निकटता, आळोखेपिळोखे, अंग झाकावयाचे वस्त्र.

अंगुष्ट – आंगठा.

अंगुळ – बोट (हाताचे), दहा (आकडा).

अंगोळिका – (पाहा : अंगुळ.)

अंजारणे – कुरवाळणे, माया लावणे, अंगावरून हलके हात फिरविणे, न दुखवता आपलासा करणे.

अंतमाळ – आतडे.

अंतर – भेद, अवकाश, विरोध, दोन वस्तूंमधली वा स्थितीमधली जागा, दुसरा, अडथळा, मर्म, स्वर्ग, अंतराळ, आतील बाजू.

अंतरणे – दुरावणे, मुकणे.

अंतुक – काळ, यम, नाश करणारा, संहार करणारा.

अंतुरी – स्त्री, पत्नी.

अंदु – साखळी, लोखंडी कांब, पट्टी.

**अंदोळ** – झोका, हेलकावा.

**अंध** – आंधळा, मूर्ख, सारासार विचारशक्ती नसलेला.

**अंबुज** – कमळ.

**अंबुजाक्ष** – कमळाप्रमाणे ज्याचे डोळे आहेत असा, विष्णू.

[क]

**कईवाड** – कारस्थान, युक्ती, अंगीकार.

**कटी** – कमर, कंबर.

**कठीण** – कठोर, टणक, अवघड.

**कठोरी** – निर्दय, दुष्ट, तीक्ष्ण, परिपूर्ण. (पाहा : कठीण.)

**कडदोरा** – करगोटा, कमरेत बांधायचा दोरा.

**कडाडी** – जोराने, वेगाने.

**कणव** – दया, करुणा.

**कवलाभ्या** – एका ऋषीचे नाव.

**कनक** – सोने, धोतरा.

**कनककमळ** – सोन्याचे कमळ.

**कनकदंड** – सुवर्णदंड.

**कनिष्ठ** – नीच, खालच्या दर्जाचा, गौण, सर्वात धाकटा.

**कपीराज** – वानरांचा प्रमुख, मारुती.

**कमळगर्भ** – विष्णू, कमळात जन्मलेला असा देव.

**कमिनी** – स्त्री, पत्नी (∠ कामिनी), प्रिया, कामातूर स्त्री, सुंदर स्त्री.

**कर** – हात.

**करणी** – कृत्य, कृती, आचरण, अलंकारदान, गवंड्याचे एक हत्यार, आश्चर्यकारक गोष्ट वा घटना, दुष्ट कृत्य.

**करणे** – उरकणे, क्रिया, आचरणे.

**करद्वय** – दोन हात.

**करवीरा** – कोल्हापूर.

**करुणालय** – दयेचे घर, दयानिधी, कृपाळू.

**करंटा** – दुर्दैवी, अभागी.

**करंटी** – कवची, करवंटी, वाईट भोग, वाईट भोग जिच्या वाट्याला आला आहे अशी स्त्री.

**कर्ण** – कान, सुकाणू, मूठ (भांड्याची.), अंगदेशचा राजा.

**कर्पुर** – कापूर, कापरासारखा गोरा.

**कर्मजड** – कर्मठ, कर्मसंचिताने जडावलेला, भारावलेला.

**कर्मरेखा** – नियती, पूर्व जन्मीच्या पापपुण्याचे फल.

**कर्मविपाक** – पूर्वजन्मीच्या पापपुण्याचे फल.

**कर्वत** – लाकूड कापण्याचे हत्यार.

**कलमष** – पाप, दुष्ट विचार (∠ कल्मष), डाग.

**कलिमल** – किल्मिष, मनातला वाईट भाव, पाप.

**कल्प** – संशय, योग्य, रचना, विधी, सदृश, उद्देश, प्रलय, ब्रह्मदेवाचा दिवस (सांकेतिक.), दीर्घ काल, तीव्र क्षोभ.

**कल्पतरु** – इंद्रलोकातील पाच देववृक्षांपैकी एक, इच्छिलेले देणारा वृक्ष.

**कल्पद्रुम** – (पाहा : कल्पतरु.)

**कल्मश** – (पाहा : कलमष.)

**कवच** – कठीण किंवा टणक आवरण.

**कवण** – कोण.

**कवळ** – (हातातील) वस्तू, आलिंगन, घास, डहाळ्यांचा जुडगा.

**कवाड** – दरवाजा, दार, दाराची फळी.

**कवि** – काव्य करणारा, विद्वान, शुक्राचार्य.

**कसवटी** – कसोटी सिद्ध करणारा दगड, परीक्षा, पारख.

**कळकटिया** – मलीन.

**कळी** – भांडण, कुरापत, उमलण्यापूर्वीची फुलाची स्थिती.

**कळांतर** – व्याज.

**काक** – कावळा.

**काख** – खांद्याखालील हात व बरगडी यामधील खोलगट भाग.

**काग** – कावळा.

**काज** – काम, प्रयोजन, उपयोग.

**काटणे** – मळणे (मलीन होणे), निघून जाणे, निभावून नेणे, कापणे.

**कानकोंडा** – शरमिंधा, दुर्लक्षित, उपेक्षित.

**कानडा** – दुर्बोध, न कळणारा, प्रतिकूल, असंस्कृत.

**कानडिया** – (पाहा : कानडा.)

**कानाडे** – वेडेवाकडे.

**कान्हाबाई** – श्रीकृष्ण (लाडके नाव).

**कापडी** – यात्रेकरू (भगवे वस्त्र धारण करून फिरणारा).

**काबाड** – कष्ट, श्रम, ओझे.

**काम** – उपयोग, वासना, करायचे ते.

**कामसंदीपन** – वासनाजागृती.

**कामारा** – अडाणी सेवक.

**कामारी** – सेविका.

**कामिनी** – विषयासक्त स्त्री, स्त्री. (पाहा : कमिनी.)

**कामिणी** – (पाहा : कामिनी.)

**काया** – शरीर, देह.

**काला** – दहीकाला, गोपाळकाला.

**कालिया** – कालिया नावाचा सर्प.

**कालिंदी** – यमुना नदी.

**कावळ** – जे निरुपयोगी ते.

**काशा** – गवत.

**काष्ट** – काडी, काटके, काठी.

**कास** – कमर, कंबर, ओटी (पोट), कासोटा.

**काळकूट** – हालाहल विष, जालीम विष.

**काळवंत** – कलावंत.

**काळी** – विठ्ठल (लक्षणेने.), शेतजमीन, रंगाने किंवा वर्णाने काळी.

**किरात** – भिल्ल, शंकर.

**किरीट** – मुकूट.

**किळ** – तेज, चमक, चकाकी, किरण.

**कीट** – चिकटा, मळाचा किंवा गंजाचा थर.

**कीटकभ्रमर** – किडे, भुंगे, इत्यादी क्षुद्र प्राणी.

**कीळ** – (पाहा : किळ.)

**कुचर** – वाईट आचार किंवा वर्तन आहे ज्याचे तो, अनाचारी, दुराचारी, कपटी, दुर्मुखलेला, धान्याचा न शिजणारा दाणा.

**कुचालि** – टवाळी, दुराचरण, चहाडी, निंदा, खोडी, कुचेष्टा.

**कुचेष्टी** – टवाळखोर, थट्टेखोर, निंदक.

**कुडावा** – पाठपुरावा, रक्षण, भिंत, कूड.

**कुडी** – शरीर, देह, वाईट, व्यर्थ, वीस ही संख्या.

**कुढावा** – रक्षणकर्ता, आधार. (पाहा : कुडावा.)

**कुप** – विहीर, आड.

**कुबजा** – कुरूप, कृष्णावतारातील दासी.

**कुबज्या** – कुबड असलेली स्त्री. (पाहा : कुबजा.)

**कुरवंडणे** – ओवाळणे, ओवाळून टाकणे.

**कुरंगी** – हरिणी, हरीण.

**कुर्वंडी** – ओवाळणी.

**कुऱ्ही** – धान्य पेरण्याचे यंत्र.

**कुलक्षण** – दुर्गुण, वाईट लक्षण.

**कुलाल** – कुंभार.

**कुल्लाळकुंसरी** – कुंभाराची कला, कुंभाराचे कौशल्य

**कुवाडे** – कोडे, कूट प्रश्न.

**कुश्चळ** – ओंगळ, घाणेरडे.

**कुश्चळी** – स्वैरिणी, गैरचालीची स्त्री.

**कुष्ट** – रक्तपिती, महारोग, कोड.

**कुसळी** – चेटकीण, लबाड स्त्री.

**कुळव** – नांगरलेली जमीन सपाट करण्याचे अवजार.

**कुळवाडी** – कुणबी, शेतकरी.

**कुळक्षय** – वंशाचा नाश (करणारा).

**कुक्षी** – कूस, काख.

**कूटस्थ** – अविनाशी, निर्विकार, सर्वत्र आणि सदा एकच असणारा, मूळ पुरुष, आत्मा, स्तब्ध.

**कूप** – विहीर, आड.
**केणें** – माल, जिन्नस, विक्रीची वस्तू, वस्त्राच्या घडीभोवती बांधलेली दोरी.
**केशिराज** – केशव, विष्णू, श्रीकृष्ण.
**केशी** – राक्षसाचे नाव.
**केसरी** – सिंह.
**कैक** – अनेक, कितीतरी.
**कैकाड** – टोपल्या वगैरे विणणारी जात, सामाजिक दर्जाने कनिष्ठ.
**कैटभ** – राक्षसाचे नाव.
**कैवल्य** – मोक्ष.
**कैवल्यदानी** – मोक्ष देणारा, ईश्वर, गुरू.
**कैवाड** – दार, दरवाजा, कारस्थान, मसलत.
**कैवार** – बाजू, साहाय्य.
**कैवारी** – बाजू घेणारा, साहाय्य करणारा.
**कोटे** – घरटे.
**कोडीसवाणे** – लोभसवाणे, लाडके, मनोहर, लाजाळू, लहान, स्पष्ट.
**कोडें** – पेच, गूढ प्रश्न.
**कोपट** –खोप, लहानसे गवताचे घर.
**कोल्हाळ** – कोलाहल, गलका, आक्रोश.
**कोळी** – मासे मारणारी जात, त्या जातीतील माणूस, व्यास.
**कौस्तुभ** – समुद्रमंथनातील चौदा रत्नांतील एक रत्नमणी.
**कंकणी** – कंकण, बांगडी.
**कंद** – साठा, गड्डा, उगम, उत्पत्तिस्थान.
**कंदु** – (पाहा : कंद.)
**कंपस्वर** – आंदोलनयुक्त स्वर.
**कंबुग्रीव** – शंखाची मागील बाजू, शंखासारखी मान.
**कांचनीक** – द्रव्यलोभी.
**कांची** – शहराचे नाव.
**कांचोळी** – चोळी (पाठीवर बंद असलेली).
**कांट** – मळ, गंज.
**कांडोवाड** – प्रत्येक पेर, दोन पेरांमधील प्रत्येक सांधा.
**कांत** – पती, नवरा, प्रियकर.
**कांतणे** – तासणे, कापणे, काढणे, त्रासणे, क्षीण होणे, जुंपणे.
**कांबळा** – घोंगडी.
**कांसवटी** – कासेचे वस्त्र, नेसते वस्त्र.
**किंकर** – सेवक, नोकर, भक्त.
**किंकरवृत्ती** – सेवकाचा भाव, भक्तिभाव.
**कुंजर** – हत्ती.
**कुंटण** – जारकर्म वा व्यभिचार किंवा वेश्याचार यांना साहाय्य करणारी मध्यस्थ स्त्री.
**कुंदा** – एक प्रकारचे गवत, कुणगा (शेताचा तुकडा).
**कुंभपाक** – एक नरक.
**कुंवसा** – आश्रय.
**कुंसरी** – कौशल्य, कला, शक्ती.
**कोंभ** – झाडाचा धुमारा, अंकूर.
**कोंवसा** – आधार, आश्रय.
**क्रियापारु** – मृत्यूनंतरच्या धार्मिक विधीची पूर्तता.
**कृतांत** – काळ, मृत्यू.
**कृपण** – कंजूष.
**कृपाळुवा** – हे दयाघना.
**कृष्णपक्ष** – महिन्याचा दुसरा पंधरवडा.

[ ख ]

**खग** – आकाशातील ज्योती (सूर्य, नक्षत्र, ग्रह, इत्यादी.), पक्षी.
**खटनट** – ओंगळ, वाईट, खाष्ट, लबाड, बदमाश.
**खट्वांग** – शंकराचे एक आयुध.
**खडतर** – उग्र, त्रासदायक, वात्रट, हेकट, दुष्ट.
**खण** – होडीतील दोन आडव्या फळ्यांमधील जागा, घराच्या बांधणीतील दोन खांबांमधील अंतर, पेटी, कप्पा, मजला, वस्त्राचा एकोणतीस तसू लांबीचा तुकडा.
**खदिरांगार** – खैराच्या लाकडाचे निखारे.
**खर** – गाढव, दडपण, आरक्तपणा (लालसर-पणा), गाळ, भृकुटी, कण.

**खरीद करणे** – विकत घेणे.
**खळ** – दुष्ट पुरुष, निर्धार, खंड, गोंदासारखा चिकट पदार्थ.
**खळेदान** – मळणीसाठी काढलेल्या धान्याचे दान.
**खाणणे** – खणणे.
**खाणी** – नीच अवस्था, मोठा खळगा, खोलगट भाग, साठा, जेवणखाण.
**खिल्लारी** – गवळी, गुराखी, धनगर, निगा राखलेली.
**खिळूं** – प्रतिबंधक वस्तू, खिडकी, दरवाजा.
**खुजट** – ठेंगणा-णी-णे, वाढ खुंटलेला-ली-ले.
**खूण** – चिन्ह, मर्म.
**खेताळ** – द्विरुक्तीवाचक निरर्थक शब्द, इत्यादी, वगैरे याअर्थी. (वेताळ खेताळ असा प्रयोग.)
**खेव** – अरिष्ट, संकट, आलिंगन.
**खेवणे** – (पाहा : खेव.)
**खेळियां** – सोंगाड्या.
**खोडा** – सापळा (हातपाय अडकावून ठेवणारा).
**खोडी** – सवय, व्यंग.
**खोळ** – पिशवी, गवसणी, आच्छादन.
**खंकारा** – खाकरून काढलेला घशातील कफ किंवा बेडका.
**खंड** – तुकडा, नाश.
**खंडे** – वस्त्र.
**खंती** – खेद, चिंता, काळजी.
**खंब** – दंड किंवा भांडी.
**खुंटणे** – थांबणे, थबकणे, तोडणे, तूट येणे, स्तब्ध होणे, अडून बसणे.
**खुंतणे** – गुंतणे.
**ख्याति** – कीर्ती, प्रसिद्धी.
**ख्याल** – संगीतातील चीजेचा एक प्रकार.

## [ग]

**गगन** – आकाश.
**गज** – हत्ती, परिमाण (२४ तसू) किंवा या लांबीची काठी, सळई, इत्यादी.
**गजवदन** – हत्तीचा मुखवटा किंवा तोंड असलेला, गणपती.
**गणगोत** – सगेसोयरे, नातेवाईक.
**गणिका** – वेश्या, कलावंतीण.
**गति** – शेवट, अवस्था, दशा, चाल, मार्ग (उपाय, इलाज).
**गरवार** – गरोदर.
**गरसोळा** – गळसरी, गळ्यातील सरीसारखा दागिना.
**गरळ** – लाळ (विष), आस्था.
**गरुडध्वज** – ज्याच्या रथाच्या निशाणावर गरुडाचे चिन्ह आहे तो, विष्णू.
**गर्ता** – खड्डा.
**गवसणी** – आवरण, आच्छादन.
**गव्हर** – मूर्ख, अडाणी.
**गव्हार** – (पाहा : गव्हर.)
**गळ** – लोखंडी टोकदार आकडा.
**गळाकाटू** – गळा कापणारा, नाश करणारा, फसविणारा.
**गाढें** – उत्कृष्ट, अप्रतीम, मजबूत, सूक्ष्म (खोल).
**गाण** – गणपती, (∠ गण), गायक.
**गाणीव** – गायनचातुर्य.
**गामा** – गाव, मोक्षपद (लक्षणेने).
**गायणी** – गायिका, गाणारी.
**गाल्हीरा** – गालगुच्चा.
**गिवसणे** – मिळवणे, पकडणे, कवटाळणे.
**गुज** – गूढ, रहस्य.
**गुजरण** – बाजाराला जाणारी स्त्री. (पाहा : गुजराण.)
**गुजराण** – निर्वाह, उपजीविका.
**गुजरी** – गोजिरी स्त्री, गुजर स्त्री.
**गुडगुड** – न समजणारी भाषा, एक प्रकारचा आवाज.
**गुढी** – आनंदोत्सवार्थ उभारलेली पताका किंवा निशाण (आंब्याचा मोहर, लिंबाची डहाळी, उंची वस्त्र व भांडे एकत्र बांधून उभारलेली काठी.)

**गुणीजन** – गायक, ज्याच्या अंगी चांगले गुण आहेत असा.

**गुरळा** – चूळ, गुळणी.

**गुरु** – उपदेशक, धार्मिक मार्गदर्शक, स्वामी, वडील नातलग, बृहस्पती, एक ग्रह, जड.

**गुल्फमणी** – पायाच्या घोटयाचा मणी.

**गुह्यक** – एका राक्षसाचे नाव.

**गेह** – घर.

**गोचीड** – अष्टपाद वर्गातील प्राणी (गाय-बैल इत्यादिकांच्या अंगाला चिकटून राहणारा लहान किडयासारखा प्राणी).

**गोठण** – दुपारच्या वेळी गुरे पाण्यावर जातात ती आसऱ्याची जागा, खेडेगावातील धुणी धुण्याची जागा.

**गोठणे** – दृढ होणे, घट्ट होणे.

**गोठोळा** – जाड गाठ, कामचुकार, अंग-चुकार.

**गोडावणे** – गोड होणे, प्रसन्न होणे.

**गोदोहन** – गाईची (दुधाची) धार काढणे.

**गोधन** – गाई हीच संपत्ती.

**गोपवेश** – गवळयाच्या रूपाने वावरणारा-राहणारा, अथवा गवळयांचा वेष.

**गोफण** – दोरीचे किंवा चामडयाचे अथवा खराचे दोरीने विणून केलेले दगड मारण्याचे साधन.

**गोमुखी** – गाईच्या तोंडासारखी जपमाळेची पिशवी.

**गोरस** – गाईचे दूध, किंवा दही इत्यादी किंवा त्यापासून केलेले पदार्थ.

**गोवणे** – गुंफणे, ओवणे, गुंतविणे, पकडणे.

**गोवळ** – गवळी.

**गोवा** – गुंता, घोटाळा.

**गोसा** – टोक, ओचा, घेर.

**गोसावी** – स्वामी, योगी.

**गोक्षीर** – गाईचे दूध.

**गौप्य** – गूढ, रहस्य.

**गौरव** – सन्मान, मोठेपण, थोरवी.

**गौरीहर** – पार्वती व शंकर.

**गांजणे** – छळणे, त्रास देणे.

**गांधिदण** – वैश्यव्यवहार, व्यापारकसब.

**गांवरस** – गांवढळ, आडाणी.

**गुंजावर्ण** – गुंजेच्या रंगाचा, तांबडा.

**गुंजाहार** – गुंजांची माळ.

**गुंडाळा** – गुंतागुंतीचे भेंडोळे, गाठोडे.

**गोंधळ** – कोलाहल, धुमश्चक्री.

**गोंवळिया** – (पाहा : गोवळ.)

**ग्रहमूळ** – जन्मकाळीचे ग्रह, जन्मकाळची नियती किंवा संचित.

**ग्रामाचार** – वाईट आचार, दुराचार.

**ग्रासु** – घास, भक्षण.

**ग्लानि** – विनवणी, आळवणी, मूर्च्छा.

## [घ]

**घडी** – घटका, साठ पळांचा अथवा चौवीस मिनिटांचा अवधी, दुमड, स्थिती.

**घननिळ** – मेघाप्रमाणे निळवर्ण, श्रीकृष्ण.

**घनवटणे** – दृढ होणे, गडद होणे.

**घनःश्याम** – मेघाप्रमाणे सावळा, श्रीकृष्ण.

**घनु** – मेघ, ढग.

**घरकुल** – लहान घर, खेळातील घर.

**घरघेणा** – घराचा नाश करणारा, कुटुंबाचा नाश करणारा, घरबुडव्या.

**घरटी** – गस्त, येरझारा, प्रत्येक घर.

**घररहाटः** – संसार, प्रपंच.

**घराचारु** – संसार, कुटुंबाचार.

**घराश्रम** – गृहस्थाश्रम, संसारी आयुष्य.

**घात** – नाश.

**घातमात** – घातपात, दुष्टावा.

**घाव** – (शस्त्राने केलेला) वार किंवा आघात.

**घुंगुर्डु** – चिलट, लहान डास.

**घृत** – तूप.

[ च ]

**चक्र** – चाक, शरीरातील षड्चक्रे (हृदय, नाभी इत्यादी.), वर्तुळाकार शस्त्र.

**चक्रपाणि** – विष्णू, श्रीकृष्ण.

**चक्रवर्ती** – सम्राट (योगातील सहा चक्रांचा), स्वानंद साम्राज्याचा सम्राट.

**चक्रवाक** – एक (सांकेतिक) पक्षी. (रात्रीच्या वेळी या पक्षाच्या नरमादीचा वियोग होतो असा कविसंकेत.)

**चक्रांकित** – चक्रावर रेषांची वर्तुळे असलेला दगड. (याची देवांश मानून पूजा करतात.)

**चतुर** – बुद्धिमान, धूर्त.

**चतुराई** – बुद्धिमत्ता, धूर्तता.

**चतुर्थ** – चार (आयुधे :– शंख, चक्र, गदा, पद्म), चवथा.

**चतुर्विध** – चार प्रकारचे [अन्न, खाद्य, चोष्य (चोखण्याचे), लेह्य (चाखण्याचे), पेय].

**चपेट** – संकट, आघात, चपराक.

**चरण** – पाय, खांब, वेदशाखा, ओळ.

**चरणचाल** – पायी चालणाराची गती.

**चराचर** – सजीव आणि निर्जीव (वस्तू, इत्यादी).

**चर्म** – चामडे, कातडी.

**चर्चित** – अंकित, माखलेले, फासलेले.

**चवाळें** – जाडी भरडी चौरस आकाराची लहान घोंगडी.

**चहूंतोंड** – चार मुखांचा, ब्रह्मदेव.

**चळ** – अस्थिरता, अंतर, च्युती.

**चळथा** – रास, ढीग.

**चाकाटणे** – पश्चात्ताप होणे, स्तिमित होणे, चकित होणे, दिपणे.

**चाट** – लबाड, चावट, उनाड, हलकट, व्यापार, सावकारी.

**चाटारु** – बडबड करणारा, थोरवी गाणारा.

**चाटु** – डाव, चमचा, गोड.

**चाड** – गोडी, चटक, आवड, छंद, किंमत.

**चापबाण** – धनुष्यबाण.

**चामर** – चवरी, रानगाईंच्या शेपटीचे केस एकत्र बांधून वारा घालण्यासाठी केलेले साधन.

**चाळणे** – धुंडाळणे, शोधणे, वेगवेगळे करणे.

**चित्रकथा** – पुराणकथा, दंतकथा.

**चित्रगुप्त** – मनुष्यमात्राच्या पापपुण्याची नोंद ठेवणारा यमाच्या दरबारातील चिटणीस. (पुराणसंकेतानुसार.)

**चिरीरी** – लहान सहान बक्षिसे.

**चिलिया** – चिलया नामक लहान मुलगा, भक्त.

**चुडेदान** – सौभाग्यदान, सुवासिनीचा अलंकार.

**चुनरी** – काळ्या ठिपक्यांचे लुगडे.

**चेइणे** – जागृत होणे, जागे होणे.

**चेपणे** – दाबणे, आवळणे, सपाट करणे.

**चोखट** – शुद्ध, पवित्र, आनंददायक, सुंदर, निर्मळ.

**चोखड** – (पाहा : चोखट.)

**चोज** – लाड, कौतुक, आश्चर्य, नखरा.

**चोजवणे** – लाडावणे, कौतुक करणे, आश्चर्य करणे, नखरा करणे.

**चोहोंटा** – चव्हाटा, चौक (बाजाराचा).

**चौक** – संबळ वाजविण्याची काठी.

**चौघे** – (पाहा : चौघेजण.)

**चौघेजण** – चार वेद.

**चौदाजणी** – चौदा विद्या (४ वेद, शिक्षा, छंद, व्याकरण, निरुक्त, ज्योतीष, कल्प, = ६ वेदांगे व न्याय, मीमांसा, पुराणे, धर्मशास्त्र.)

**चौदा विद्या** – (पाहा : चौदाजणी.)

**चौमुख** – चार वेदांचे मुख.

**चांगु** – चांगला.

**चिंतवनी** – चिंता.

[ छ ]

**छाक** – मुळीच, अजिबात.

**छंदाधिस्थ** – ध्यास लागलेला.

## [ ज ]

**जगदानिया** – उदार, उद्धारक.

**जघन** – कमर, मांडी, ढुंगण.

**जटाजूट** – डोक्यावरील केसांचा समूह.

**जड** – मंदबुद्धी, मूर्ख, कठीण, वजनदार.

**जडित** – रत्नखचीत.

**जडिबुट्टी** – मंतरलेली वनस्पती, ताईत, गंडा, दोरा, अडचणीच्या वेळी उपयोगी पडावे म्हणून बाजूला काढून ठेवलेले दागिने.

**जननी** – जन्म देणारी, आई.

**जनीता** – निर्माता, पिता.

**जपिजेणे** – जप करणे.

**जर्जर** – थकलेले, जीर्ण झालेले.

**जल्पणे** – बडबड करणे, वल्गना करणे, बढाई मारणे.

**जसवंती** – (विशेषनाम) गवळणीचे नाव.

**जहाज** – तारू, गलबत, जलयान, जीवन-प्रवासाचे वाहन.

**जळनिधी** – समुद्र.

**जाखाई** – जोखाई, क्षुद्र ग्रामदेवता.

**जागरण** – देवतासंकीर्तनाच्या निमित्ताने विशिष्टकाल जागणे, झोपेचा अभाव.

**जाच** – छळ, यातना.

**जाचणी** – छळणूक.

**जाचवणे** – छळणे, त्रास देणे.

**जाड** – जड, (कर्मनि) बांधलेला, लठ्ठ, स्थूल, खरबरीत किंवा भरीव.

**जाण-जाणीव** – ज्ञान, ज्ञातेपण, जाग–जागरूकता.

**जाणता** – ज्ञानी, दर्दी, वयाने प्रौढ.

**जाणु** – ज्ञानी.

**जातक** – शुभाशुभ जाणणारा, बालक, भिक्षू, स्नेह, अनुरूपता.

**जानणे** – जाणणे, ओळखणे.

**जानु** – गुडघा.

**जप्य** – जपाचा विषय, ज्याचा जप करायचा तो.

**जाप्यक** – जप करणारा.

**जायजणा** – नाशवंत.

**जाया** – पत्नी.

**जारण मारण** – शत्रूचे नुकसान व्हावे म्हणून केला जाणारा जादूटोणा, त्यासंबंधी मंत्रविद्या.

**जारु** – प्रियकर, विवाहित स्त्रीच्या प्रेमास पात्र झालेला परपुरुष.

**जालेपण** – जन्म, जन्म ही अवस्था.

**जाश्वनीळ** – शंकर.

**जिणे** – जगणे, जीवन.

**जिव्हार** – हृदय, आत्मा, प्राण, मर्म, अत्यंत नाजूक भाग.

**जिव्हाळा** – कळवळा, उत्कंठा, सामर्थ्य किंवा शक्ती.

**जीणे** – (पाहा : जिणे.)

**जीत** – पराभूत, वश केलेले.

**जीवन** – पाणी, अश्रू, जगणे.

**जीवनावेगळे** – पाण्यावाचून, पाण्याबाहेर, जीवनापासून दूर.

**जीवलग** – जिवाला जीव देणारा, जिव्हाळ्याचा, अतिशय प्रिय.

**जैत्य** – जय, यश.

**जोग** – निर्वाह, पोषण (त्याचे साधन), संसार-त्याग करून पत्करलेली जीवनरीती, वैराग्य.

**जोड** – लाभ, दोनाचा समुच्चय, तुकडा, तुलना, बरोबरी.

**जोडा** – पायतण, वहाण, पति-पत्नी, नवरा-नवरी.

**जोपन** – संगोपन, जोपासना, निगा.

**जोहर** – अग्नी, संकट, लक्षागृह.

**जंजार** – ओझे, त्रास.

**जुंपणे-जुंपिणे** – जोडणे.

**ज्योरे** – पाहा रे.

**ज्येष्ठ** – सर्वांत मोठा (राम).

## [ झ ]

**झगमग** – झाक, चकाकी, तेज.

अनुक्रमणिका

**झडपणे** – बाधा होणे, पछाडणे, वारा घालण्याचे साधन, वारा घालणे, उडी घालणे, वेगाने उतरणे.

**झणकर** – चटकन्, झटकन्, तीव्रतेने.

**झल्लाळ** – चकाकी, तेज, पाणी, तेजाचे किरण, लखाखी.

**झळंबणे** – पोळणे, चिकटणे, झोंबणे, घासणे, खरडणे, लोंबकळणे, पछाडणे.

**झाडणी** – खरडपट्टी, कानउघडणी, केरसुणी, केर काढणे, भूतबाधा उतरणे.

**झिलो** – मुलगा.

**झेपावणे** – झाप टाकणे, वेगाने येणे, पार पाडणे, पेलणे.

**झोटिंग** – भूत, पिशाच्च, लफंग्या माणूस.

**झोटी** – केस, झुलूप (केसांचे).

**झांजार** – जीर्ण, जर्जर, अस्पष्ट प्रकाश.

**झुंजार** – लढाऊ, शूर.

**झुंड** – जमाव, समुदाय.

**झेंगट** – एक वाद्य (तास), लचांड, गुंतागुंतीची वा पेच निर्माण करणारी परिस्थिती.

**झोंझार** – पोट.

**झोंबी** – कुस्ती, लढाई, झटापट.

## [ट]

**टका** –– निशाण, ध्वज, छत्र, सोळा पैशांइतकी रक्कम.

**टमकत** – लचकत, मुरकत, नखरेबाजपणे, विलासी गतीने.

**टवळे** – वाटीच्या आकाराचे भांडे.

**टवाळ** – निंदा, दोष, खोटेपणा, उनाड.

**टिरी** – ढुंगण.

**टिळक** – टिळा, तिळक, कपाळावरील गंध वगैरेची विशिष्ट आकाराची खूण.

## [ठ]

**ठकविणे** – फसवणे, लुबाडणे, भुलवणे.

**ठकावणे** – थकणे, फसणे, भुलणे.

**ठकुणे** – वास्तव्य करणे, उभे राहणे.

**ठसा** – छाप, मुद्रा, शिक्का, ओतकामाची कुंडी.

**ठसावणे** – खोलवर जाणे, (मनावर) बिंबणे.

**ठाई** – स्थान, मूळ.

**ठाकणे** – थांबणे, जवळ येणे, राहणे.

**ठाण** – पक्के आसन किंवा स्थान, जागा, मांडणी, बैठक, पागा.

**ठाय** – (पाहा : ठाई.)

**ठाव** – ठिकाण, स्थान, तळ, परमावधी.

**ठेवाठेवी** – व्यवस्था, उठाठेव.

**ठोसरा** – ठोसा.

## [ड]

**डवरणे** – बहरणे, गच्च भरून जांणे/येणे, उतरणे (डोक्यावरून), ओटा.

**डुळी** – शिक्यावरील भांडे.

**डोहळा** – गरोदर स्त्रीची इच्छा किंवा वासना.

**डोळस** – दृष्टी शाबूत असलेला, चतुर, सूक्ष्मदृष्टी, सुंदर डोळ्यांचा.

**डंख** – दंश, चावा, (कुटण्याची) लाट, (पोहे कुटण्याची) मध्यावर फिरणारी तुळई.

**डंखणे** – दंश करणे, चावणे.

**डंबर** – विस्तार, देखावा, दिमाख, समूह.

**डांगोरा** – लौकिक, प्रसिद्धी, वाद्यांचा आवाज करून एखादी गोष्ट जाहीर सांगणे.

**डिंगर** – मूल, लेकरू, पंढरपूरच्या देवासाठी पाऊलघडी घालणारा.

## [ढ]

**ढवळा** – पांढरा, स्वच्छ.

**ढापणे** – झांकणे, बंद करणे, लपविणे, दडपून टाकणे.

**ढालगज** – अमर्याद, उलाढाली, उपद्व्यापी, उद्धट, निर्लज्ज, आचरट.

**ढाळणे** – हलविणे, वारणे, (अश्रू) गाळणे, (ढिखळे) साफ करणे.

**ढोकळ** – हलका, कनिष्ठ प्रतीचा.

**ढोण** – चमत्कार, अवचित, सर्पणाचा (जळाऊ लाकडांचा) मोठा ढलपा, लठ्ठ कुरूप माणूस.

**ढोर** – गुरू, गुरे (गाई, बैल इत्यादी.)

## [त]

**तडक** – मोठा आवाज, विजेचा कडकडाट, जोराने, बिन हरकत, भरपूर, सरळ.

**तथास्तु** – (आशीर्वचन) तसे होओ (होवो!).

**तन** – शरीर, गवत.

**तनु** – (पाहा : तन.)

**तप्तताम्र** – तापलेले लोखंड, तापलेल्या लोखंडाचा एक नरक.

**तराळ** – बारा बलुत्यांपैकी गाव-कामगार (महार, कोळी जातीचा.), वेठ नेण्याचे व वाट दाखविण्याचे कांम करणारा.

**तर्पण** – नित्याच्या ब्रह्मयज्ञात किंवा श्राद्ध वगैरे विशिष्ट कर्मात देव, ऋषी व पितर यांना उद्देशून उदक देण्याचा विधी.

**तल्पठाण** – शरीराचा गुह्यभाग.

**तळपणे** – झळकणे, चमकणे, होरपळणे, घिरट्या घालणे, तेवत ठेवणे.

**ताटिका** – रावणाची बहीण, कजाग स्त्री.

**तानमान** – रागरंग, ताळतंत्र.

**तान्हा** – तहानेने व्याकूळ झालेला लहान मुलगा, आईच्या अंगावर दूध पिणारे मूल.

**तान्हावोले** – (पाहा : तान्हा.)

**तान्हे** – अगदी लहान मूल, आईच्या अंगावर दूध पिणारे मूल.

**ताप** – दुःख, भोग, त्रास, उष्णता, अस्वस्थता, उद्दीप्त मनोविकार.

**ताम्र** – तांबे.

**ताल** – गीत, वाद्य, नृत्य यातील गतींचे कालदर्शक नियत प्रमाण, ठेका; तळे, तेलाचे थारोळे, एक वाद्य, घराचा मजला, ताडाचे झाड.

**तासणे** – नेटके करणे, छेदून काढणे, कसेबसे करणे (काम), खरडपट्टी काढणे, बाकी काढणे (भाज्यांकाला भाजकांकाने भागून).

**तिफण** – तीन फण्यांची पाभर (शेतात बी पेरण्याचे एक अवजार).

**तिमणे** – पूर्णपणे ओले होणे, पदार्थ, जेवण.

**तुक** – योग्यता, तोल, तुलना.

**तुजवरी** – तुझ्याकारणे.

**तुटी** – वाकडेपणा, अडथळा, विरह, कमीपणा, तुटण्याची क्रिया.

**तुतार** – एक वाद्य, तुतारी.

**तुरंबणे** – खोवणे, धार करणे, खोळंबून ठेवणे, हुंगणे.

**तुर्या** – जागृती, सुषुप्ती, स्वप्न, या पलीकडची समाधिरूप चौथी अवस्था.

**तुळसीदळ** – तुळशीचे पान. (तुळस-सी : पवित्र मानलेले लहानसे झाड.)

**तुळी** – तुळई.

**तुळीका (तुळिका)** – गादी.

**तेजस** – तेजस्वी, बाणेदार.

**तेजाळ** – जोम, उत्साह, तेजस्वी, भव्य.

**तोडी** – संगीतातील एक राग.

**तोय** – पाणी.

**तंत्र** – धार्मिक विधीतील मंत्रानुसार हाताने करावयाचा पूजादि क्रियांचा—आचारांचा समुदाय.

**तांडवनृत्य** – शिवनृत्य.

**तोंडावर देणे** – मारणे.

**त्रास** – भय, भीती, उपद्रव, वीट, अप्रीती.

**त्रासणे** – दुःख देणे, उपद्रव करणे, विटणे.

**त्राणे** – रक्षण करणे.

**त्रिखंड** – तीन तुकडे, तीन विभाग, नाश.

**त्रिजटा** – शंकर.

**त्रिदोषी** – कफ, वात व पीत्त हे शरीरातील तीन दोष ज्याच्या ठिकाणी आहेत असा; विकार, विकल्प, हिंसा हे तीन दोष ज्याच्या ठिकाणी आहेत असा.

**त्रिपदागायत्री** – तत्, त्वम्, असि, या तीन पदांच्या समुच्चाने युक्त गायत्री मंत्र.

**त्रिपुटी** – एक नसेल तर बाकी दोहोंची सिद्धी होणार नाही अशा तऱ्हेने एकमेकांशी संबद्ध असलेल्या तीन गोष्टींचा समुच्चय. (त्रिपुटी अनेक आहेतः परमेश्वर-आत्मा-जगत्, ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान, ब्रह्म-माया-जीव, लक्ष-लक्षिता-लक्षण, साध्य-साधक-साधन, तस्यैवाहम-तवैवाहम्-त्वमेवाहम्.)

**त्रिपुर** – एका प्रांताचे नाव, एका दैत्याचे नाव.

**त्रिपुरारक्षक** – त्रिपुर प्रांताचे रक्षण करणारा.

**त्रिपुरारी** – त्रिपुर राक्षसाचा नाश करणारा, शंकर.

**त्रिपुरावधी** – त्रिपुर राक्षसाचा वध करणारा, शंकर.

**त्रिपांड** – तीन पावलांनी पादाक्रांत.

**त्रिपुंड** – कपाळावरील गंधाचे उभे तीन पट्टे.

**त्रिभंगी** – तीन ठिकाणी वाकलेला, वक्राकार असलेला.

**त्रिमूर्ती** – ब्रह्मा-विष्णू-महेश एकत्र, तिघे.

**त्रिलोकेशा** – तिन्ही लोकांचा स्वर्ग-मृत्युलोक-पाताळ यांचा –स्वामी.

**त्रिवळी** – पोटाला पडणाऱ्या तीन वळयांचा समुदाय.

**त्रिविक्रम** – विष्णू (वामनावतार)

**त्रिविधा** – ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद या तीन वेदांना मिळून त्रिविद्या म्हणतात.

**त्रिविध-ताप** – आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशी तीन प्रकारची पीडा.

**त्रिस्थळी** – काशी, प्रयाग व गया ही तीन स्थळे समुच्चयाने.

**तृण** – गवत.

**त्वरे** – लवकर, घाईने.

**त्वांचि** – तूच

## [थ]

**थटके** – समुदाय, दाट रांग, जमाव, घोळका, ठाशिव रचना.

**थडी** – काठ, तीर, किनारा, दुसरी बाजू, पल्ला, शेवट, नदीकाठाच्या जवळचा प्रदेश.

**थार** – आश्रय, वस्ती, ताळतंत्र, तारण, पत, पूर्णपणे.

**थाळा** – मोठे ताट, वधूला द्यायची देणगी.

**थिता** – व्यर्थ, वाया, उगाच.

**थिरु** – शेळ्या किंवा गुरे हाकताना तोंडाने करावयाचा आवाज.

**थिल्लर** – तळे, डबके, मंदबुद्धी, मंदबुद्धीचा माणूस, हलक्या दर्जाचा.

**थोकणे** – थांबणे, उभे राहणे, थांबविणे.

## [द]

**दग्ध** – जळलेले, नाश पावलेले, भ्रष्ट झालेले, कलंकित झालेले, अशुभ.

**दचकु** – भीती वाटायला लावणारा, भीति-दायक, अनपेक्षित, मनाला धक्का देणारे.

**दमना** – दमन, नियमन, संयम, आटोका, रग (जिरवणे), गाडीचा वरचा भाग.

**दमनिणे** – दमन करणे, खोड मोडणे, रग जिरविणे वठणीस आणणे.

**दर्दुर** – बेडूक.

**दर्प** – धाक, दरारा, गव, ताठा, उग्र वास.

**दवडणे** – गमावणे, फेकून देणे, पाठविणे, उधळणे, पळावयास लावणे.

**दशक** – वरचढ, दहा वस्तूंचा समुच्चय.

**दशम** – दहावा.

**दसोडी** – कापडाची दशी (क्षुद्रत्ववाचक).

**दळ**—सैन्य, समुदाय, तुकडा, जाडी, ग्राह्यांश, चूर्ण, तलवारीचे म्यान किंवा पाते, पान किंवा पाकळी.

**दाई** – सुईण, दुसरी आई.

**दाटणे** – गच्च भरून येणे, गर्दी होणे, भाववश होणे, घट्ट होणे, घट्ट बसणे, दाटीवाटीने बसणे, पसरणे.

**दाटुगे** – मोठे, बलवान.

**दाटोनी** – फुकाचे, उगाच.

**दाताल** – उदार.

**दादला** – स्वामी (परमेश्वर), पती.

**दानव** – दैत्य, राक्षस (हिरण्यकश्यपू).

**दानी** – दाता, दान देणारा.

**दामा** – दामाजीपंत (विशेषनाम).

**दारवंटा** – उंबरठा.

**दारूण** – दु:सह, कठोर, कठीण, निर्दय.

**दावे** – दोर.

**दास्यत्व** – सेवकत्व.

**दिगंतरी** – पृथ्वीबाहेरील किंवा सर्व दिशांपलीकडील प्रदेश, क्षितीज.

**दिनकर** – सूर्य.

**दिवाण** – मुख्य प्रधान, कारभारी.

**दिशाद्रुम** – दिशासमुदाय, संपूर्ण पृथ्वी.

**दीठावणे** – कृपाळू होणे, दृष्ट लागणे.

**दीन** – गरीब, विनम्र, अनाथ, दु:खी, केविलवाणा.

**दीनबंधु** – गरिबांचा सहाय्यकर्ता, विनम्रांचा सहाय्यकर्ता.

**दीनू** – दिवस. (पाहा : दीन.)

**दीपक** – दिवा, पेटविणारा, उत्तेजक, प्रकाश, एक राग (संगीतातील), साधारण धर्म.

**दीप्ती** – ज्वाला, तेज, सौंदर्य.

**दीक्षा** – व्रताचा उपदेश किंवा नियमाचरण किंवा ते स्वीकारणे.

**दुकळ** – दुष्काळ.

**दुरळ** – खडतर, कडक, उग्र, पीडा.

**दुग्ध** – दूध.

**दुधड** – मूर्ख, अकुशल, रहाटाला पाण्याचे लोटे बांधण्याचा एक प्रकार, दोन बाजूस.

**दुजेपणा** – वेगळेपणा, विभक्तपणा.

**दुडदुडा** – अतिजवळ पावले टाकीत, अतिजलद पावले पडतील अशा तऱ्हेने.

**दुडवादुडवी** – (पाहा : दुडदुडा.)

**दुणावणे** – दुप्पट होणे, वाढणे.

**दुधाणी** – दूध तापविण्याचे भांडे, दुधाची भांडी ठेवण्याचा हारा.

**दुभणी** – दुधाची धार काढण्याची क्रिया, दोहन.

**दुभणे** – दूध देणे, पान्हा सोडणे, पान्हावणे.

**दुभते** – दूध देणारे, भाकड न झालेले.

**दुराचारी** – वाईट वर्तनाचा, पापी.

**दुरावा** – वियोग, अंतर, दूरपणा.

**दुऱ्हावणे** – दूर जाणे, दूर राहणे.

**दुषणे** – विघडणे, सदोष होणे.

**दुल्लडी** – दोन सरांचा एक दागिना.

**देखण्या** – पाहणारा, सुंदर.

**देखी** – पाहणी.

**देवऋषी** – नारद, मंत्र–जादूटोणा करणारा, साधुत्वाचा अविर्भाव करणारा व अडाण्यांना लुबाडणारा माणूस.

**देवांगना** – अप्सरा.

**देव्हारा** – देव ठेवण्यासाठी केलेली लहानशी घुमटी.

**देशोधडी** – हद्दपार, देशापार.

**देह** – शरीर, गाव.

**देहवंत** – शरीरधारी, ज्याला शरीर आहे असा, गावकरी.

**देहुडा** – पायावर पाय वाकडा ठेवून दीड पायावर उभा असलेला, श्रीकृष्ण.

**दोड** – द्वाड, खोडकर, व्रात्य.

**दोडका** – एक फळभाजी (शिराळे).

**दोहणे** – दुधाची धार काढणे (पाहा : दुभणे).

**दोहावा** – पान्हा, दुधाची धार देण्याची स्थिती.

**दोहोणार** – दुधाची धार देणारे, पान्हा देणारे.

**दंडणे** – शिक्षा करणे, दमन करणे.

**दंडपाणी** – शंकर, शिव.

**दंभ** – ढोंग, स्तोम, पोकळ डौल.

**दांतोरी** – दात.

**दोंदिल** – मोठे पोट, मोठ्या पोटाचा.

**द्वाड** – दुष्ट, उपद्रवी, मूर्ख, खोडकर.

**द्वादश** – बारा.

**द्वाही** – शपथ, राजाज्ञेचा हुकूम.

**द्विज** – ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य; पक्षी, सर्प, दात, ब्रह्मचारी.

**द्विपद** – ब्राह्मणाचा, भृग ऋषींचा पाय. (ब्रह्मा, विष्णू, महेश, यांत श्रेष्ठ कोण हे ठरविताना परीक्षेसाठी भृगू ऋषींने निद्रिस्त विष्णूच्या छातीवर लाथ मारली. तो डाग विष्णूच्या छातीवर आहे, या पुराणकथेचा संदर्भ.)

**दृष्ट** – वाईट नजरेने होणारी पीडा.

**दृष्ढायुषी** – दीर्घायुषी.

**द्वैत** – भेदभाव, जीव व शिव वेगळे मानणारे तत्वज्ञ किंवा तत्त्वज्ञान.

## [ध]

**धगी** – आच, उबारा, (विस्तवाची) झळ, लहानशी शेकोटी, आगटी.

**धडुत** – जाडेभरडे वस्त्र किंवा फाटलेले वस्त्र.

**धणी** – मनसोक्त, तृप्त, यथेच्छ, उत्कट इच्छा, ध्यास, स्वामी.

**धन** – द्रव्य, संपत्ती, मूल्यवान वस्तू.

**धनुर्धर** – तिरंदाज, धनुष्याने लढाई करणारा, राम, अर्जुन, इत्यादी.

**धनुर्वाडे** – धनुर्धर.

**धरणी** – पृथ्वी, जमीन, पद्धती, रीत, धरण्याची क्रिया.

**धरणीधर** – शेष (सर्प), पर्वत.

**धरा** – पृथ्वी, जमीन.

**धवलार** – हवेली, भव्य विस्तीर्ण वाडा, चुनेगच्ची जमीन किंवा अशा बांधणीचे वा जमिनीचे घर.

**धवळणे** – शुभ्र प्रकाशणे, उजळणे.

**धवळा** – पांढरा.

**ध्वजवज्रांकुश** – ध्वज, वज्र आणि अंकूश ही आयुधे.

**धाक** – भीती ताकीद.

**धाणे** – संतोषणे, समाधान पावणे.

**धातमात** – युक्तिप्रयुक्ती, मंत्रतंत्र.

**धातुविद्या** – जादूटोणा.

**धाबळी** – घोंगडी, सोवळे, कबुतरांचे खुराडे.

**धाम** – नादानुकारी शब्द, स्वच्छ, एकदम, घर, वसतिस्थान, रोग, तेज, वैभव, शक्ती.

**धाय** – हृदय, मन, अंतःकरण, रडण्याचा आकांत.

**धावणी** – धावा, मदतीसाठी हाक, जलद चालण्याची तऱ्हा, उताराची वाट, मजल, गाडीच्या चाकाच्या परिघा-सभोवताली बसवतात ती लोखंडी पट्टी.

**धावण्या** – पाठोपाठ.

**धावा** – मदतीसाठी प्रार्थनावजा हाक, अशा प्रार्थनेचे पद.

**धिक्** – तिरस्कार करण्यासारखे, तिरस्काराचा उद्‌गार.

**धुणी** – धऊन स्वच्छ होण्याची क्रिया, धुण्याने झालेली स्वच्छता, नदीकाठची वा इतर धुणी धुण्याची जागा, धुण्याचे कपडे किंवा वस्त्रे, उधळपट्टी, नासाडी, गोसाव्याची आगटी.

**धुमाळी** – गोंधळ, अंदाधुंदी, एक राग (संगीतातील), जोराचा हल्ला, उधळ-पट्टीचा कारभार, शिडीसारखी उतरण.

**धुर्जटी** – शंकर.

**धुवट** – धुतलेले साधे वस्त्र, धुवून स्वच्छ केलेले वस्त्र.

**धूनी** – नदी, अफवा. (पाहा : धुणी.)

**धोतरा** – एक विषारी फुलझाड किंवा त्याचे बी.

**धोति-पोती** – हटयोगाची एक साधना, हटयोगाची साधना करणारा.

**धांगडी** – धष्टपुष्ट स्त्री, आडदांड स्त्री, गोंधळ घालणारी स्त्री.

**धुंदुवाती** – बेभान स्थिती.

**धृति** – धारणा, दृढ असणे, धरण्याची क्रिया, धैर्य, आधार, स्थैर्य, सत्तावीस योगा-तील आठवा योग.

**ध्रुपद** – गाण्याचा एक प्रकार, पदाचे पालुपदाचे कडवे. तालाचा एक प्रकार.

**ध्यायिजणे** – मनन करणे, चिंतन करणे.

**ध्येय** – साध्य, जी करायची किंवा मिळवायची असे मनात निश्चित केले आहे ती गोष्ट, ध्यानाला योग्य.

## [न]

**नक्र** – मगर, सुसर.

**नग** – दागिना, पर्वत, वृक्ष, वस्तू, पदार्थ, संख्या.

**नटका** – नटणारा, नखरेबाज, नटवा, तुटलेल्या अवयवाचा.

**नभ** – आकाश.

**नरोटी** – करटी, करवंटी, नारळाचे आतील खोबरे काढून घेतल्यानंतर उरणारे कवच, कमी दूध देणारी गाय किंवा म्हैस.

**नर्तन** – नाच, नाचणे.

**नवग्रह** – सूर्यमालेतील नऊ गोल (सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पती, शुक्र, शनी, राहू, केतू.), एका टोळीतील नऊ उपद्रवी माणसे.

**नवजणी** – नऊ प्राण, नऊ ग्रह, नवविधा भक्ती (श्रवण, सख्य, आत्मनिवेदन, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य.), नऊ स्त्रिया.

**नवनीत** – लोणी.

**नव्हाळी** – अपूर्वता, बहर, इच्छा, नवीनपणा, ताजेपणा.

**नश्वरिता** – नाशिवंतपणा, नष्ट होण्याची प्रकृती, अशाश्वत.

**नष्ट** – नाश पावलेले, द्वाड, दुष्ट, नाश करणारा.

**नष्टचर्या** – दुर्दैव, आपत्काळ.

**नष्टप्रकृती** – दुष्ट स्वभावाचा.

**नागर** – सुंदर, सभ्य, चतुर.

**नागवण** – फसवणूक, लुबाडणूक, लुटालूट.

**नागवणे** – लुबाडणे, लुटालूट करणे, फसवणे.

**नागवळ** – नागवला गेलेला, अज्ञानी.

**नाचणा** – नर्तक, नाचणारा.

**नाचणू** – नाच, नर्तन.

**नाटक** – खेळ (नाट्य), अटक करण्यास कठीण, गमतीचा प्रकार, थोडा काळ टिकलेले वैभव, थट्टेचा विषय.

**नाठाळ** – दुष्ट, लबाड, व्रात्य, उपद्रवी.

**नातळणे** – स्पर्श न करणे.

**नाथणे, नाथिणे** – पीडा देणे, आकर्षणे, वेसणीने अडकविणे.

**नाथिला** – वाईट, लटका.

**नादाकार** – वाद्य.

**नापिक** – न्हावी, ओसाड.

**नामनौका** – नामसंकीर्तनरूपी नौका जिच्यातून (संसारातून) तरून जाता येते.

**नार** – स्त्री.

**नारया** – नारद.

**नाराणुक** – असमाधान, अतृप्ती.

**नाराधणे** – संतोष नसणे, तृप्ती नसणे.

**नासापुट** – नाकपुडी.

**नाहो** – पती, नवरा.

**निक** – निश्चयेकरून, नीट.

**निकट** – जवळ.

**निकी** – नीट, चांगली, शुद्ध, पवित्र, बरोबर, तंतोतंत. (पाहा : निक.)

**निकुरा** – कठोर.

**निके** – (पाहा : निक.)

**निखळ** – शुद्ध, पवित्र, पूर्ण, भेसळ नसलेले.

**निगदणे** – सांगणे, शपथ घेणे, सेवा घेणे, निर्धार करणे.

**निगम** – शेवट, (आगम-) वेद.

**निघोट** – संपूर्ण, परिपूर्ण.

**निजधाम** – वैकुंठ, स्वगृह.

**निजपंथ** – आत्मस्वरूप, स्वतःची आचारपद्धती, स्वधर्म.

**निजसोय** – निजसुख, ब्रह्मसुख, ब्रह्मानंद, स्वतःची सोय.

**निढळ** – मस्तक, कपाळ, नशीब, कष्ट, प्रामाणिकपणा.

**निदसुरा** – निद्राधीन, अज्ञानी, अर्धवट झोपेत असलेला.

**निधान** – भांडार, धन, आश्रयस्थान.

**निपटणे** – मुळापासून उपटणे, उकरणे, नष्ट करणे, पुसून काढणे, खरवडणे.

**निपाणीक** – भिजलेल्या जमिनीच्या ओलाव्यास असलेले.

**निभ्रांत** – निःसंशय, शांत, निःशंक.

**निमग्न** – तल्लीन, एकाग्र, बुडलेले.

**निमाणे** – शेवट असणे, अंत होणे, शांत होणे.

**निमासुर** – सुरेख, सुंदर.

**निमोल** – अमोल, फुकट मिळणारे, निरुपयोगी.

**निरसणे** – दूर करणे, नाहीसे करणे.

**निरा** – नदीचे नाव, एक प्रकारचे गवत, एक प्रकारचे मद्य.

**निरास** – परिहार, आशाभंग.

**निराळ** – आकाश.

**निरुते** – शुद्ध, निश्चित, खरोखर, खचित.

**निरंजन** – भेदातीत, एकांत, आरती, देवापुढे ठेवण्याचा लहान दिवा.

**निर्बुजणे** – कंटाळणे, त्रासणे.

**निर्बूज** – मंद भ्रष्ट, त्रासलेला.

**निर्वाण** – मोक्ष, सुख, आनंद, तृप्ती, समाधान, शांत झालेले, अस्तंगत.

**निर्वासिन** – हद्दपारी, निरिच्छपणा, वासना नाही अशी स्थिती.

**निर्विकल्प** – भेदरहीत, अद्वैत, भेदातीत.

**निलोत्पल** – निळे कमळ.

**निवटणे** – ठार मारणे, उध्वस्त करणे, स्वच्छ करणे.

**निवाडा** – निर्णय, खरोखर, अखेर.

**निशा** – रात्र, खात्री, अति उपभोग.

**निशाण** – ध्वज, झेंडा, पताका, लक्ष्य, वेध.

**निशिदिनी** – रात्रंदिवस.

**निशी** – रात्र.

**निशुन्य** – शांती, पोकळी.

**निसुगा** – कोडगा, निर्लज्ज, सरळ.

**निसुरवाणे** – वाहते, गाढ, खोल.

**नीच** – दुष्ट, हीन, सखल, खोल.

**नुपेक्षिणे** – उपेक्षा न करणे, दुर्लक्ष न करणे.

**नेटका** – सरळ, तरबेज, नीट, सुंदर, लायक.

**नेटके** – (पाहा : नेटका.)

**नेटेपाटें** – मजबूत, निर्भय.

**नेणणे** – न जाणणे.

**नेणतें** – न जाणणारा, अज्ञानी, नवशिका.

**नेति** – नाही नाही असे उद्‌गार, तसे नव्हे.

**नेपुर** – नूपुर, पायातील दागिना, घागऱ्यांची पैंजण, चाळ.

**नेरुता** – शुद्ध, निश्चित.

**नैऋति** – नैऋत्य दिशा, नैऋत्य दिशेचा स्वामी.

**नैश्वरत्व** – नाशिवंतपणा, नष्टत्व.

**नौबद** – मोठा नगारा, डंका.

**नंदनु** – पुत्र, मुलगा, लाडका.

**नंदपुडी** – अनेक औषधांचे चूर्ण.

**नांगर** – शेतीची जमीन उकरण्याचे उपकरण, लोखंडी फाळ, औत.

**निंबलोण** – दृष्ट, वाईट नजरेचे; दुष्परिणाम टाळण्यासाठी निंबाची पाने, मीठ-मोहरी यांची ओवाळणी.

**न्याहाळणे** – पाहणे, लक्षपूर्वक किंवा टक लावून पाहणे.

**न्यून** – उणीव, कमतरता, कमी दर्जा किंवा योग्यता.

**न्हाणी** – स्नान, स्नानगृह.

## [प]

**पचणे** – जिरणे, उघडकीस न येणे, खाण्यास योग्य अशी भाजणे, रांधणे, शिजविणे, भाजणे.

**पटकुळ** – जुनी किंवा फाटकी घोंगडी किंवा घोंगडीचा तुकडा, एक जंगली फुलझाड (पेटकुळी, बकाळी).

**पडचाल्लो** – हट्टी, द्विरुक्तिपर निरर्थक शब्द (उदा० आडचाल्लो-पडचाल्लो).

**पडविणे** – नष्ट करणे, कोसळवणे.

**पडसूड** – दुय्यम प्रतीचा सूड.

**पडिभर** – आधार, गौरव, श्रेष्ठता, अधिकपण, बढाई, सोबती.

**पडिभरे** – आधिक. (पाहा : पडिभर.)

**पतित्व** – उधोगती, पती असणे ही स्थिती.

**पत्रवेठी** – पानांचे तुरे.

**पदवी** – मान किंवा अधिकार, हुद्दा, रस्ता.

एन ४२४७—७५३१

**पद्म** – कमळ, कमळाचे मूळ, कमळाच्या आकाराची रचना किंवा दागिना, शरीरातील नाडीचक्र, हत्तीच्या सोंडेवर शोभेसाठी काढलेली आकृती, सापाच्या फणेवर असणारे दहाच्या आकड्याचे चिन्ह, कुबेराचा एक निधी, १०० कोटी.

**पद्मनाभ** – विष्णू (ज्याच्या नाभीतून कमळ निघाले आहे असा).

**पद्मासन** – कमळांचे आसन, कोमल आसन = बैठक, ब्रह्मदेव.

**पद्माक्ष** – विष्णू (कमळासारखे सुंदर डोळे आहेत असा).

**पन्नग** – साप, नाग.

**पन्हाळ** – पाणी वाहण्यासाठी काढून दिलेली वाट, सारखे एकाच जागेवरून पाणी वाहात राहिल्यामुळे त्या ठिकाणी निर्माण झालेला चर.

**परजणे** – पेलणे, पसंत असणे, स्वाधीन ठेवणे, सिद्ध करणे (ठेवणे), अंगाभोवती फिरवणे, धार लावणे.

**परजन** – परका, दूरचे लोक.

**परता** – दूर, पलीकडे, पलीकडचा, कृपाकरून पेक्षा.

**परत्र** – अन्यत्र, परलोक, ब्रह्मलोक.

**परदारा** – दुसऱ्याची पत्नी, परस्त्री.

**परद्रव्य** – दुसऱ्याचे धन, परक्याची संपत्ती.

**परद्वारिणी** – व्यभिचारिणी, दुसऱ्याच्या किंवा परक्याच्या दारी (घरी) जाणारी अथवा राहणारी.

**परमहंस** – संन्यासी (एक भेद), परमेश्वर.

**परमेष्टी** – ब्रह्मदेव.

**परवडी** – आवड, चोखंदळपणा, छांदिष्टपणा, अव्यवस्था, गोंधळ, त्रेधा, क्रम, शिस्त, थर, पाल्हाळ, परवचा, कालच्या मागल्या दिवशी शिकलेला धडा.

**परा** – वाचेच्या चार अवस्थांपैकी पहिली, श्वासाचे पहिले स्फुरण, नाभीपासून उन्मेष वृत्ती, शब्दाचे योगाने जाणता येणारे सूक्ष्म स्वरूप.

**परात्परतर** – अत्यंत श्रेष्ठ, परमेश्वर.

**परिकर** – सुंदर, चांगले, मधुर, विस्तृत, परिवार, गर्दी, समुदाय, कमरपट्टा.

**परिधान** – नेसणे, नेसण्याचे वस्त्र, म्यान.

**परिपाठी** – प्रघात, मूळपीठिका, पद्धती, शिस्त, सविस्तर कथन, पठन.

**परिमळ** – सुवास, सुगंध, सुवासिक पदार्थ, सुगंधी पदार्थ, चोळणे, रतिसंभोग.

**परिमाळु** – (पाहा : परिमळ.)

**परिसणे** – ऐकणे, लक्ष देणे.

**परिहार** – निरसन, उपाय, त्याग, नाश, बलात्काराने घेतलेला ताबा, पळविणे.

**परीस** – स्पर्शाने लोखंडाचे सोने करणारा एक काल्पनिक दगड, स्पर्शमणी.

**परेहुनिपर** – परावाणीपेक्षा दुसरी. (पाहा : परा.)

**परोपरी** – अनेक प्रकारांनी, वारंवार.

**पर्यंक** – मंचक, पलंग, पालखी, वीरासन.

**पवन** – वायु, प्राण (प्राणायाम), श्वासोच्छ्वासाचे नियमन.

**पवाडा** – पराक्रम, कीर्ती, गौरवगीत.

**पश्यंति** – वाचेच्या चार अवस्थांपैकी दुसरी, परेपासून हृदयस्थानी ईषन्मात्र उमटणारी भासरूप वाणी, वेश्या.

**पसा** – बोटे जुळवून हाताचा केलेला खोलगट आकार, ओंजळ (एका हाताची).

**पहुडणे** – अंग टाकणे, झोपणे, आरामात पडून राहणे.

**पळ** – क्षण (घटिकेचा ६० वा अंश, तासाचा १५० वा भाग.), पलायन, चर (पाणी वाहून नेणारा).

**पक्षीराज** – पक्षांमध्ये श्रेष्ठ, पक्षांचा राजा, गरूड.

**पाइक** – सेवक, चाकर, जासूद.

**पाइराव** – पायरव, पायधूळ, वर्दळ.

**पाखरणे** – पसरणे.

**पाचारणे** – बोलावणे, निमंत्रण करणे, समाचार घेणे, विचारपूस करणे, सांत्वनास जाणे (घरातील मृत्यूनंतर).

**पाजळणे** – प्रज्वलीत करणे, पेटविणे, चेतविणे, धार देणे.

**पाटाव** – उंची, रेशमी, पैठणी.

**पाटी** – एक प्रकारची लाकडी बैठक किंवा फळी, सिंहासन, गादी, एक दागिना, मर्यादा रेषा (आटचापाट्यांच्या खेळात असते तशी), लिहिण्याचे साधन, मोठी टोपली किंवा हारा.

**पाटोळा** – चित्रविचित्र रेशमी वस्त्र, अंथरूण, पाटाच्या बायकोपासून झालेला मुलगा.

**पाठमोरी** – पाठ करून असणे, विमुख किंवा पराङ्मुख होणे, अशी स्त्री किंवा स्थिती, साहाय्यास-सोबतीस न येणे.

**पाड** – पर्वा, तुलना, प्रतिस्पर्धित्व, थोरवी, बाजारभाव, दर, निरख प्रमाण.

**पाडस** – वासरू.

**पाणवथा** – पाणवठा, नदी, गावच्या लोकांचे पाणी भरण्याचे किंवा धुणी धुण्याचे ठिकाण.

**पाणि** – हात.

**पातकभंजन** – पापे नष्ट करणारा.

**पातणे** – येऊन पोचणे, जवळ येणे, घडून येणे, अनुभवास येणे, भरवसा टाकणे.

**पातलिंग** – पतन पावलेले लिंग.

**पाते** – पापणी, पान, कोवळा गर, झावळ्यांच्या दोन्ही बाजूची अंगे, चपटे दांडे.

**पाथी** – रांग.

**पादरक्षा** – पादत्राण, वहाण.

**पानडी** – पाण्यातील, सरोवरातील, कंठ्यातील पदकाच्या जागी घालतात तो त्रिदळाच्या किंवा पानाच्या आकाराचा भाग.

**पानबुड्या** – पाण्यात बुडी मारून तळची वस्तू ओळखून बाहेर काढणारा.

**पानेडी** – (पाहा : पानडी.)

**पान्हा** – (पाहा : पान्हायणे.)

**पान्हायणे** – पान्हावणे, कासेतून दूध सोडणे.

**पाबळ** – किनारा, तीर, वृक्षावरून गळून पडणाऱ्या पानांची इत्यादींची दाट वृष्टी.

**पामर** – क्षुद्र, कःपदार्थ, नीच, निर्बळ, दुबळा.

**पायकी** – चाकरी, दास्य.

**पायरव** – नेहमीचे दळणवळण, राबता, वरदळ (वर्दळ).

**पायवणी** – चरणोदक, पायाचे तीर्थ.

**पायाळ** – योग्य, पात्र, लायक, पायाकडून जन्मलेला.

**पार** – पूर्णपणे, तीर (काठ), चौथरा, ओटा, चव्हाटा.

**पारणे** – समाधान, तृप्ती, एखाद्या व्रताची अखेर करण्याची सूचना किंवा विधी.

**पारावार** – अखेरची मर्यादा, सीमा, विस्तार.

**पारिखा** – परका, शत्रू, विन्मुख.

**पारु** – अंत, शेवट, तीन तासांचा अवधी, दर्जा. (पाहा : पार.)

**पारुषणे** – नष्ट होणे, तुच्छ करणे, शिळा होणे.

**पालखी** – डोलीसारखे वाहान.

**पालव** – पदर, टोक, खुणावणे (क्रियापद—पालवणे), झाडाची कोवळी पाने किंवा अंकूर.

**पालवणे** – झाकणे. (पाहा : पालव.)

**पालवी** – तजेला, जोम, कोवळी पाने.

**पाल्हाळ** – विस्तार, पसारा, उमाळा.

**पावक** – अग्नी.

**पावणे** – प्रसन्न होणे, प्राप्त होणे, पोचणे.

**पावन** – पवित्र, शुद्ध, एक मुनी, अग्नी, धूप, प्रायश्चित्त, पवित्र करण्याची क्रिया, गाईचे शेण.

**पावा** – मुरली (एक वाद्य).

**पासाव** – जवळ, पासून.

**पाहाणे** – बघणे.

**पाहाळणे** – उजाडणे.

**पाळ** – काठचा प्रदेश, बांधारा, मूळ (वृक्षाचे इत्यादी), आधार (कायम), कानाची कडा, जात्याचे तोंड, आळे, चर.

**पिच्छ** – पिसारा.

**पिढा** – पाट (बसण्याचे चौकोनी लाकडी आसन).

**पितृआज्ञा** – पित्याची आज्ञा.

**पितृभक्त** – ज्याची पित्याबद्दल निष्ठा आहे, पित्यावर अत्यंत प्रेम व श्रद्धा आहे असा.

**पियूष** – अमृत.

**पिलीं** – पिलें (पक्षी इत्यादिकांची).

**पिशून** – दुष्ट, कपटी, चहाडखोर, कळलाव्या.

**पिसाट** – वेडा.

**पीठ** – मुख्य स्थान, आसन.

**पुकारा** – मोठ्याने हाक, जाहीर आवाज.

**पुच्छ** – शेपटी.

**पुटी** – तेज, मूस (भट्टी), लेप, आच्छादन, थर.

**पुड** – पुढे, चूर्ण.

**पुढारणे** – पुढे होणे, सामोरे जाणे, सुधारणे.

**पुण्याहवाचन** – मंगल कार्याच्या वेळचे पवित्र कर्म.

**पुरातन** – प्राचीन, फार जुन्या काळचा.

**पुरुषसूक्त** – विश्वाच्या निर्मितीला कारण झालेल्या मूळ पुरुषाचे आवाहन करणारे वेदातील मंत्र.

**पूर्णभरित** – संतुष्ट, ज्ञानी.

**पूर्वज** – पूर्वीच्या पिढीतील घराण्यातील व्यक्ती.

**पेट** – आग, भूक, जळणे, बंदुकीची दारू.

**पेटा** – फेरा, पेटारा, समुदाय, गट, भारा, बाबत, सलोखा, नियंत्रण, प्राण्यांचे पिल्लू, समीकरणाची बाजू (गणितात).

**पेठ** – बाजार, दुकानांची रांग, अड्डा, वस्ती.

**पेढी** – सराफाचे दुकान, देवाची मूर्ती ठेवण्याचा ओटा.

**पेण** – मुक्काम, मुक्कामाची जागा.

**पेणें** – प्रयाण, निघणे. (पाहा : पेण.)

**पेहरण** – खमीज, सदरा.

**पेहे** – पेय, पदार्थ.

**पैठण** – शहराचे नाव, एक प्रकारचे लुगडे किंवा पागोटे.

**पैठा** – परिपाठ, प्रवेश.

**पैल** – पलीकडे, पलीकडचा काठ.

**पैलथडी** – पलीकडचा किनारा.

**पोकारणे** – (पुकारणे), मोठ्याने हाक मारणे.

**पोखरणे** – पोकळ होणे किंवा करणे, (पाहा : पोकारणे.)

**पोसणा** – पोसलेला, पाळलेला, दत्तक.

**पोहा** – मेळा, साळीचा एक पदार्थ.

**पंकजलोचन** – विष्णू, कमळाप्रमाणे ज्याचे डोळे आहेत असा.

**पंचाइत** – पंचायत, निवाडा करणारा गावातील पंचसमुदाय, अडचण.

**पंचानन** – शंकर, सिंह, पाच तोंडांचा.

**पंचाक्षरी** – मांत्रिक, भूतबाधा नाहीशी करणारा.

**पंथ** – मार्ग, संप्रदाय, रीत, चाल, पद्धत.

**पांग** – श्रम, मनोरथ.

**पांगणे** – सैरावैरा पळणे, विखरणे.

**पांचातोंडाची** – शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध-युक्त.

**पांचाळी** – द्रौपदी.

**पांढरा** – कपटी, सर्प, (रंग.)

**पांढरी** – गाळ साचून बनलेली शेतजमीन, सीमा, गावठाण, [रंग (स्त्री.).]

**पांत** – ओळ.

**पांतिकर** – भागीदार, वाटेकरी, ओळ लावणारा.

**पिंड** – शरीर, जीव, भाताचा गोळा.

**पुंजाळणे** – चमकणे, प्रज्वलित होणे किंवा करणे, गोळा होणे, एकत्र होणे.

**पेंडवळा** – (गवताचा) बांध, ओलावा.

**पेंडी** – बांधलेली जुडी.

**पेंव** – भराभर बाहेर पडणारा समुदाय, धान्य साठविण्याची जमिनीत केलेली खोली.

**प्रचित** – अनुभव, प्रत्यंतर.

**प्रजणे** – मारणे, नष्ट करणे.

**प्रतिख्याल** – प्रत्युत्तर, उलट जाणीव.

**प्रतित** – आनुभविक, साक्षात्कारी.

**प्रतिदिनीं** – दररोज.

**प्रबुद्ध** – पूर्णावस्थेत असलेला, आत्मज्ञानी, पूर्ण जागृत असलेला.

**प्रबंध** – काव्यादी रचना, बंधन, अखंडपणा.

**प्रविस्तार** – विशेष विस्तार असलेले.

**प्रष्णा** – शकून देवता, जिला प्रश्न करायचा ती देवता, विचारपूस करणारी देवता.

**प्रशस्ती** – प्रशंसा, तारीफ, वाखाणणी.

**प्रस्तर** – खडक, पाषाण.

**प्रक्षाळणे** – धुणे.

**प्राणनाथ** – पती, नवरा.

**प्राशन** – पिणे (पिण्याची क्रिया), पान.

**पृष्ठी** – पाठ.

**प्रौढि** – थोरवी, प्रतिष्ठा.

## [फ]

**फट्** – (उपपद : आधिक्यार्थी), पराकाष्ठेचा, छि:, थू:, हट्, (तिरस्कारणे).

**फणि** – सर्प, नाग, राहू.

**फासा** – पाश, पकड, सोंगटी.

**फिरगा** – फेरा, वळसा, यातायात, घोटाळा.

**फुटकाये** – सामान्य.

**फुत्कारणे** – रागाचा जोरदार सुस्कारा सोडणे. ('सर्प' फुत्कार करतो असे म्हणतात.)

**फेरा** – प्रदक्षिणा, पुनरागमन, रस्त्याचे किंवा नदीचे वळण, यातायात, घोटाळा.

**फोल** – फुकट, व्यर्थ, पोकळ, लबाडीचे.

## [ब]

**बक** – बगळा, ढोंगी.

**बगदालभ्य** – एका ऋषीचे नाव.

**बचनाग** – एक जालीम विषारी कंद किंवा त्याचे झाड.

**बचबच** – गोंधळ, अव्यवस्था, घोटाळा.

**बडिवार** – मोठेपणा, प्रतिष्ठा, वैभव, उत्कर्ष, पराक्रम, (यांची) बढाई.

**बडी** – मोठी, टोकाला आकडा लावलेली लांब काठी.

**बरवा** – सुंदर, नीटनेटका.

**बरवंट** – चांगला, चांगली, चांगले. (पाहा : बरवा.)

**बहिणुली** – बहीण. (लाडीक निर्देश.)

**बहिर्मुख** – उथळ विचार करणारा, इहलोकाच्या विषयांत गुंतलेला, विषयावर दृष्टी ठेवणारा, विषयासक्त, उदासीन.

**बहुली** – सुंदर, वारंवार.

**बाईल** – बायको, पत्नी.

**बागुल** – पोकळ भीती (दाखविण्याचे सोंग किंवा पुतळा), अवतार (परमेश्वराचा), एक जंगली प्राणी.

**बाण** – एक हत्यार, तीर, नळीत दारू ठासून त्याला काठी बांधलेले आयुध, आतषबाजीतील दारूकाम.

**बाध** – प्रतिबंध, हरकत, विरोध, अडथळा, ठपका, कमीपणा, निषेध, आक्षेप.

**बाबर** – केस, केसाची बट, ओल असलेली, पूर्ण न पोसलेली.

**बावनकस** – उत्तम, शुद्ध, हीण नसलेले.

**बासर** – अमर्याद.

**बाहणे** – हाक मारणे.

**बाही** – हात.

**बाहुभूषण** – हातावर (दंडावर) घालायचे अलंकार.

**बाहुवाटे** – दंडांवरील अलंकार.

**बाळीभोळी** – भाबडी.

**बिघडणे** – नासणे, नाश पावणे.

**बिडवई** – हित करणारा, तारक.

**बिढार** – घर, संसार, वसतिस्थान.

**बिढोर** – घर, वसतिस्थान, निवासस्थान.

**बिदी** – रस्ता.

**बिरडे** – गाठ, गुंडी व वळसा. मोड आलेले धान्य किंवा त्याची उसळ.

**बिऱ्हाड** – घर.

**बिलवार** – उच्च प्रतीची काचेची बांगडी, उच्च प्रतीचा.

**बिल्वदळ** – बेलाचे पान.

**बीजमंत्र** – मूलमंत्र.

**बुजगावणे** – पक्षांना भीती दाखविण्यासाठी शेतात उभे केलेले बाहुले.

**बुजवण** – (पाहा : बुजगावणे.)

**बुझणे** – समजणे, जाणणे, समाधान पावणे, शिकणे, ओळखणे.

**बुनादि** – मुळापासून.

**बेइमान (बेमान)** – कृतघ्न, अप्रामाणिक.

**बेत** – दांडगा, संकल्प, योजना, नमुना.

**बोटधारी** – रेशमी किंवा सुती काठाचे वस्त्र, कडेला थोडीशी माया सोडून मागे बोटाच्या रुंदीचा सुती किंवा रेशमी काठ असलेले वस्त्र.

**बोभाट** – गवगवा, कागाळी.

**बोभाणे** – मोठ्याने हाक मारणे (संरक्षणा-साठी).

**बोल** – वाणी, वाचा, शब्द.

**बोहरी** – नाश, भस्म.

**बंदर** – समुद्राच्या काठी असलेले व्यापाराचे गाव, माकड, बोर, सराफाची पिशवी.

**बंदिखाना** – तुरूंग.

**बांदवडी** – बंदी, बंधन.

**बिंदी** – लहान मुलांच्या किंवा स्त्रियांच्या कपाळावरील दागिना.

**बुंधी** – बुरखा, घुंघट.

**ब्रह्मकटाह** – ब्रह्मांड, विश्व.

**ब्रह्मचारी** – ज्याची इंद्रियांवर हुकमत आहे असा, विष्णू.

**ब्रह्मविधी** – आत्मज्ञानसाधना.

**ब्रह्मांड** – विश्व, जग.

**ब्रीद** – प्रतिज्ञा, बाणा.

## [भ]

**भक्तभद्रजाती** – भक्त व उत्तम लक्षणी (हत्ती).

**भग** – छिद्र, भोक, बारा आदित्यांपैकी एक, कल्याण, वैभव, उन्नती, बढती, स्त्रीची योनी.

**भग्न** – नाश, फुटलेला, मोडलेला, पराजित.

**भजणे/भजकारे** – पूजा किंवा भक्ती करणे.

**भडाग्नि** – मंत्रोच्चाराशिवाय प्रेतास दिलेला अग्नी.

**भणंग** – दरिद्री, ओसाड.

**भद्रा** – कल्याणकारी, गंगा, गाय, द्वितीया, सप्तमी व द्वादशी या तिथी.

**भरणा** – दूध काढण्याचे भांडे, भरण्याची किंवा माप पूर्ण करण्याची क्रिया.

**भरवंसा** – विश्वास, खात्री.

**भरी** – (भरणे) नादी लागणे.

**भरीत** – रायते, भरावाचे सामान.

**भव** – संसार, प्रपंच, उत्पन्न झालेला, जन्म, उत्कर्ष, कल्याण.

**भवकंद** – संसाराचे मूळ, संसाराचा गड्डा, जन्माचे किंवा अस्तित्वाचे मूळ, कल्याणाचे किंवा उन्नतीचा पाया.

**भवव्यथा** – संसारदु:ख, प्रापंचिक दु:ख.

**भवसिंधु** – संसारसमुद्र.

**भवानी** – पार्वती, पहिली विक्री (दिवसाची).

**भवाब्धी** – (पाहा : भवसिंधू.)

**भाक** – शपथ, वचन, भाषण, देवाचे उत्तर, नवसफेडीसाठी अनामत ठेवलेली गोष्ट.

**भाके** – करार.

**भागणे** – पळणे, थकणे, पुरणे (पुरेसे होणे).

**भागाभाग** – पळापळ.

**भाट** – स्तुतिपाठक, मजुरी.

**भातुके** – खाद्य.

**भाते** – भत्ता, वेतन, मजुरी, औषधी कंद.

**भालुका** – एक तीर्थस्थान.

**भाव** – निष्ठा, श्रद्धा, स्थिती, मनोविकार, मनोवृत्ती.

**भाष्यकार** – धर्मग्रंथ किंवा शास्त्रग्रंथ विशद करणारा.

**भाळ** – कपाळ.

**भीतंर** – अंतर, मन, आत.

**भुक्ति** – भोजन, अन्न, भोग.

**भुजबळी** – शक्तिमान, संरक्षणकर्ता.

**भुजा** – हात.

**भुजंग** – सर्प, जार.

**भुलवणी** – भुरळ, मोहित स्थिती.

**भुवनत्रयनाथ** – तिन्ही लोकांचा (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) पालनकर्ता, स्वामी, श्रीकृष्ण, विष्णू.

**भूधर** – शेष (सर्प), पर्वत.

**भूपति** – राजा.

**भूमिपती (भूप)** – राजा.

**भे** – भय, भीती.

**भेद** – (तत्वज्ञान) फरक, वेगळेपणा, यांचे प्रकार—

(१) स्वगतभेद : आंब्याच्या पानाशी मंजरी भिन्न आहे.

(२) सजातीय भेद : आंबा बकुलाशी भिन्न आहे.

(३) विजातीय भेद : वृक्ष हा दगडाशी भिन्न आहे.

**भेष** – वेष.

**भोक्ता** – उपभोग घेणारा.

**भोज** – संतोष, भोजन.

**भोपी** – भोप्याचे पुजारी.

**भंग** – नाश.

**भंड** – विटंबना.

**भांड** – नाटक, तमाशा.

**भांडार** – साठा, निधी.

**भ्रमर** – भुंगा.

**भ्रांत** – भ्रम, शंका, काळजी.

**भृत्य** – सेवक, नोकर.

## [म]

**मकरंद** – पुष्परस, फुलांतील मध.

**मगर** – सुसर.

**मणिग्रीव** – गळ्यातील रत्नाचा दागिना, रत्नासारखी सतेज किंवा तजेलदार मान.

**मत्त** – गर्विष्ठ, माजलेला.

**मत्ताभिमान** – अहंकाराची धुंदी, पराक्रमाची धुंदी.

**मत्स्य** – मासा.

**मथित** – तत्त्व, निष्कर्ष.

**मथितार्थ** – तत्त्वार्थ, रहस्य, तात्पर्य.

**मधुकर** – विष्णू, भ्रमर, प्रियकर, मधमाशी.

**मधुपर्कविधी** – शिष्ट, साधू, इत्यादींचे आदरातिथ्य करण्याचा विधी.

**मधुमक्षिया** – मधुमक्षिका, मधमाशी.

**मन्मथ** – मदन, काम, प्रेम.

**मयूरपत्र** – मोराचे पीस, मोरपीस.

**मर्कट** – माकड, वानर.

**मर्गजमणी** – पाच या रत्नाचा गोलक मणी.

**मर्दणे** – रगडणे, चूर्ण करणे, चोळणे, घासणे.

**मर्दन** – नाश, चुरडण्याची क्रिया, चोळण्याची किंवा घासण्याची क्रिया.

**मवणे** – मोजणे.

**मल्हार** – संगीतातील एक राग. (हा राग आळविला असता पाऊस पडतो असा संकेत. म्हणून पावसाळी काळ्या ढगांचे विशेषण.)

**मशक** – डास, क्षूद्र.

**मस-मसी** – काजळ, बुक्का.

**महाजन** – सावकार, व्यापारी, गावचे अधिकारी.

**महापातकी** – दुराचारी.

**महाभाष्यसूत्र** – मूलग्रंथावरील टीकेमधील तत्त्व.

**महासिद्धी** – आठ थोर शक्ती : अणिमा, महिमा, लघिमा, प्राप्ती, प्राकाश्य, ईशिता, वशिता, प्राकाम्य.

(१) अणिमा–शरीर अत्यंत सूक्ष्म होणे

(२) महिमा – शरीर अत्यंत मोठे होणे.

(३) लघिमा – वजनात हलके होणे.

(४) प्राप्ती – सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशी अधिष्ठानी देवतांच्या रूपाने संबंध घडणे.

(५) प्राकाश्य – ऐकून ठाऊक असलेल्या व स्वर्गादी पारलौकिक स्थानी व दिसण्याजोग इहलोकच्या स्थानी भोग व दर्शनाचे सामर्थ्य घेणे.

(६) ईशिता – शक्तीची, मायेची व तिच्या अंशाची ईशाच्या ठिकाणी व इतरांच्या ठिकाणी असलेली प्रेरणा.

(७) वशिता – विषय भोगीत असूनही त्यांच्या ठिकाणी आसक्त न होणे.

(८) प्राकाम्य – ज्या ज्या सुखाची इच्छा करावी ते ते सुख अमर्याद प्राप्त होणे.

**मही** – पृथ्वी, जमीन.

**महुडा** – ढग.

**महुरणे** – मोहरणे, परिपक्व दशेस येणे.

**महंती** – ऋषित्व, साधुत्व, पारमार्थिक-धार्मिक आचार्यधर्म.

**माका** – मला (कोंकणी).

**माखणे** – चोपडणे, भरणे, अंगाला लावणे (स्निग्ध पदार्थ).

**माजीवडे** – मध्याचा आश्रय करून राहणारे.

**माजू** – मध्यभाग.

**माझाई** – ममत्व, उन्मत्तपणा.

**मात** – खबर, गोष्ट, विपुलता, अद्‌भुत, कोंडमारा, विजय.

**मातणे** – चांगले चांगले खाऊन पुष्ट वा पुंड होणे.

**मातेरा** – पूर्णनाश, दुर्दशा.

**मार्तंड** – सूर्य, खंडोबा.

**माथवीय** – मातीच्या डेऱ्यातील पाणी.

**माथा-थे** – कपाळ, डोक्याचा अग्रभाग.

**मान (तान)** – (संगीतातील तान वगैरे) शास्त्रीय विशेष.

**मानदेश** – माणदेश.

**मानसमोहन** – मनाला मोहविणारा, अंतःकरण आकर्षून घेणारा.

**माया** – गोकुळातील नंदाची मुलगी, प्रेम, जादू, दंभ, ढोंग, देवी (दुर्गा), भ्रम, इहलोकीचा पसारा, चुकीचा किंवा खोटा ग्रह.

**मायावी** – कपटी. (पाहा : माया.)

**मार्दव** – मृदुता, कोमलता, स्निग्धता.

**माव** – माया, गौडबंगाल.

**मावा** – लाघवी, चित्ताकर्षक, खवा.

**मासोळी** – मासा, एक दागिना.

**माहियेर** – माहेर.

**मिष** – रूप, बतावणी, सोंग, निमित्त, कपट.

**मीन** – मासा, मगर.

**मुक्तमाळा** – मोत्यांचे हार.

**मुक्ताफळ** – मोती.

**मुक्ति** – मोक्ष, जननमरणफेऱ्यातून सुटका, मुक्ती (या ४ आहेत : सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता.)

**मुक्तिप्रद** – मोक्षदायक.

**मुद्राअगोचरी** – योगविद्येत वा धार्मिक विधीत सांगितलेली कमरेच्या वरील भागाची किंवा हाताच्या बोटांची ठेवण किंवा विशिष्ट मुखचर्या.

**मुद्रिका** – आंगठी, ठसा, नाणे.

**मुधेश** – एका संताचे नाव.

**मुरडणे** – मागे वळणे, पराभूत होणे, परतणे, मोडणे, थाटात चालणे, वागणे, विलासाचे प्रदर्शन करणे.

**मुरडी** – पीळदार.

**मुरडीव** – नागमोडी, वाकडी.

**मुरारी** – मुरा नावाच्या दैत्याचा शत्रू, श्रीकृष्ण.

**मुष्टी** – मूठ.

**मूषक** – उंदीर.

**मूळ** – मूळपुरुष, पाळ, पाया.

**मेख** – मेढ, खांब, पाचर.

**मेखळा** – मेखला, कमरपट्टा.

**मेघःश्याम** – ढगासारखा सावळा, श्रीकृष्ण.

**मेदिनी** – पृथ्वी, जमीन.

**मेरु** – एक श्रेष्ठ पर्वत. (हा स्वर्ग, मृत्यु, पाताळ यांना आधारभूत आहे असा संकेत.)

**मेहुडे** – मेघ, ढग.

**मैंद** – मंदबुद्धी.

**मंराळ** – खंडोबा.

**मोटघाळे** – गाठोडे, मोटकुळे.

**मोडणे** – दाबणे, झुगारणे, तुकडे करणे, ठार करणे, चूर्ण करणे.

**मोहरा** – अग्रभागाचा नेता, मुख्य, एक खडा, चेहरा, तजेला, सापाच्या डोक्यातील काल्पनिक मणी.

**मोहरी** – पुंगी, तोंडाने वाजवायचे एक वाद्य, मुरली, राई.

**मौन** – स्तब्धता, मुकेपणा.

**मौनरूप** – (पाहा : मौन.)

**मौनावणे** – मुकी बनणे, अबोल होणे.

**मंत्रसंचारी** – जादूटोणा करणारे.

**मंथन** – घुसळण, घुसळण्याची क्रिया.

**मंदल्याजेती** – त्रोटक काव्य.

**मांडणे** – रचणे, पसरणे, यथेच्छ चालू करणे, प्रतिपादन करणे.

**मांडा** – गव्हाच्या पिठाचे अतिशय पातळ पापुद्र्याचे पक्वान्न.

**मांदी** – समुदाय, कडे, वर्तुळ, पेटी.

**मांदुस** – तिजोरी, पेटी.

**मृगनाभी** – कस्तुरी.

**मृगतीर** – मृगजळ.

**म्हणियारा** – म्हटलेले (सांगितलेले) करणारा, दास.

**म्हातारा** – वृद्ध, वयोवृद्ध.

## [य]

**यति** – संन्यासी, तपस्वी.

**यमकिंकर** – यमदूत.

**यमझाडी** – संकट.

**यमशृंखळा** – मृत्यूचा फास.

**यातायात** – पुन्हा पुन्हा जनन आणि मरण, जन्म आणि मरण, संकट, पीडा, त्रास.

**यादवकुळटिळक** – यादवांच्या वंशाचे भूषण.

**याज्ञिक** – यज्ञ करणारा, अग्निहोत्री, यज्ञ करणारा पूर्वमीमांसक.

**येरझारा** – जन्म आणि मृत्यू यांचा फेरा, मागेपुढे फेऱ्या.

**योगमाया** – ईश्वराची मायारूप शक्ती.

**योगींद्र** – योगी माणसांमध्ये श्रेष्ठ, श्रीकृष्ण.

**योनी** – प्राण्यांच्या जाती, कारण, आदिकारण, स्त्रियांचे जननेंद्रिय.

## [र]

**रक्त** – लाल, तांबडा-डी-डे, रंगविलेले, प्रेमबद्ध, प्राण्यांच्या शरिरातील तांबडा द्रव.

**रगडणे** – नाश करणे, चिरडणे, चेपणे, जोराने चोळणे किंवा घासणे.

**रचणे** – उभी करणे, मांडणे, निर्माण करणे.

**रज** – धूळ, धुळीचा कण, फुलातील परागाचा कण.

**रजक** – धोबी, परीट, चितारी.

**रजरेणु** – धुळीचा कण.

**रडीवाला** – खोटेपणा करणारा.

**रतणे** – रममाण होणे, संभोगणे, आसक्त होणे.

**रमणी** – तरुण स्त्री, पत्नी, बायको, प्रिया, सुंदर स्त्री.

**रसना** – जीभ, लगाम, दोरी, कमरपट्टा, करगोटा.

**रसज्ञ** – मर्मज्ञ.

**रक्षपाळा** – रक्षक.

**राऊळ** – देऊळ, राजवाडा, मोठा वाडा.

**राग** – संगीतातील रंजक स्वरसमुदायाची रचना, रंग, तांबडेपणा, प्रेम, क्रोध.

**राजपट** – राजाचा मुकूट, राजवस्त्र.

**राजबिदी** – राजमार्ग, अतिशय सुंदर (राजबिंडा)

**राजस** – सुकुमार, देखणा, गोंडस, विषयासक्त.

**राजीवलोचन** – ज्याचे डोळे कमळासारखे आहेत असा, सुकुमार डोळे असलेला.

**राणी** – पत्नी, राजाची पत्नी, राजस्त्री, राज्य चालविणारी किंवा राज्यावर असलेली स्त्री.

**राणीव** – राजाचा अधिकार, राजपद, राज्य.

**रातणे** – तल्लीन होणे, मग्न होणे, रममाण होणे, कामक्रीडेत गुंतलेले असणे.

**रातोत्पळ** – तांबडे कमळ.

**राबणे** – श्रमणे.

**रावा** – पोपट.

**रिता** – रिकामा, पोकळ.

**रीस** – अस्वल.

**रूढविणे** – पसरविणे, दृढ करणे, रुजवणे, अंगवळणी पाडणे, रूढ करणे.

**रूपस** – रूपवान, देखणे.

**रूपसार** – देखणेपणाचे सार (तत्त्व) ज्याच्या ठिकाणी आहे असा, अतिशय सुंदर.

**रुळणे** – लोळणे, लोळण घेणे, झोकात हालणे, परिचित होणे, सराव होणे.

**रेखणे** – चिन्हीत करणे, कोरणे.

**रेषा** – (उभी) ओळ किंवा रेघ.

**रोकडी** – प्रत्यक्ष, रोखठोक, स्पष्ट.

**रोजनामा** – रोजच्या जमाखर्चाचे टिपण.

**रोटी** – भाकरी.

**रोमरंध्र** – त्वचेतील सूक्ष्म छिद्र.

**रोह** – कोंब, अंकूर.

**रोहिणी** – मृगजळ, नक्षत्र, नऊ वर्षांची मुलगी, वीज, तांबड्या किंवा कोणत्याही रंगाची गाय, गंडमाळा.

**रोहिणीची माव** – मृगजळाचे मायावीपण, अढळपद.

**रौद्रावभवा** – श्रुतीपासून जन्म पावलेला.

**रौरव** – एक महानरक.

**रंक** – गरीब, दीन, भिकारी.

**रंगछाया** – शोभा, तेज.

**रंगणी** – रांगणारा, रंगत.

**रंगमाला** – (मिरवणुकीपुढची) नक्षत्रमाला, रांगोळीची चित्रे.

**रंगशिळा** – देवाच्या मूर्तीसमोरील शिळा.

**रंजवण** – रंजन, करमणूक.

**रंजविणे** – आनंदित करणे, गुंगविणे, आल्हादित करणे, रंजन करणे.

**रुंजी** – फेरे, गुंजारव.

**रुंडमाळा** – मुंडक्यांची माळ.

## [ल]

**लगबग** – घाई, उतावीळ, त्वरा, धांदल.

**लटकी** – खोटी, व्यर्थ, निष्फळ, निराधार, विनाकारण, लबाडीची, अप्रामाणिकपणाची.

**लटिकें** – खोटे. (पाहा : लटकी.)

**लडिवाळ** – आवडीचा, प्रिय.

**लवड-सवडी** – लगबग, तातडी, त्वरा, घाई.

**लवनिमिष** – (कालवाचक उल्लेख) लव : तीन अपूर्णांकांचा अंश, निमिष : ३/१६ लव इतका काळ.

**लवलाह** – त्वरा, वेग.

**लहाण** – लहान (माणूस).

**लहानाली** – अगदी अल्प (वयाची).

**लाखोली** – लक्ष संख्या (नामसंकीर्तनाची किंवा देवाला अर्पण करावयाच्या वस्तूंची), असंख्य शिव्या.

**लाचावणे** – वश होणे, वश करून घेणे.

**लाठा** – समर्थ, बलवान, वांझ धान्याच्या रोपांची जुडी.

**लाडकोड** – प्रेम, कौतुक.

**लाडोबा** – लाडका, प्रिय.

**लाधणे** – मिळणे, प्राप्त होणे, उपयुक्त होणे.

**लास** – प्रेत, मृतदेह, डाग (फळावरचा), त्वचा भाजून पडलेला डाग, रोग निवारणासाठी त्वचा भाजतात ती, जन्माचा डाग.

**लासी** – डाकीण, पिशाच्च स्त्री.

**लाहाणे** – पात्र असणे, लाभणे, संपादणे, भोगणे.

**लाहो** – छंद, नाद, लाभ, लोभ, अतृप्ती, हव्यास, त्वरा, घाई.

**लिथाडणे** – लाथाडणे.

**लुगडे** – वस्त्र, स्त्रियांचे नेसण्याचे वस्त्र.

**लेखन** – साहित्य, साधन, लिहिणे, शैली.

**लेखा** – हिशेब, पर्वा.

**लेणे** – परिधान करणे, घालणे, धारण करणे, अलंकार.

**लोकपाळ** – दिशांचे संरक्षण करणाऱ्या देवता.

**लोकाचार** – लोकांची रीत, प्रधान वहिवाट.

**लोचन** – डोळा, पाहणे, निरखणे.

**लोण** – मीठ, उतारा, दृष्ट, एक प्रकारचे गवत, विजयाची खूण.

**लोधणे** – लुब्ध होणे, चिकट होणे.

**लोभापर** – कृपाळू.

**लोण्हार** – एक तीर्थस्थान.

**लोहो** – लोखंड.

**लंपट** – व्यसनी, मोहवश, कामुक, अधाशी, स्त्रीव्यसनी पुरुष किंवा पुरुषव्यसनी स्त्री.

**लांछन** – डाग, कलंक, बट्टा, खूण, चिन्ह, नाव.

**लांव** – एकपक्षी, डाकीण, हडळ.

## [व]

**वक्ता** – बोलणारा, व्याख्याता, वाचाळ.

**वक्त्र** – मुख, तोंड.

**वच्छलांछन** – भृगू ऋषीच्या लाथेची खूण. (पाहा : द्विजपद.)

**वज्र** – इंद्राचे आयुध, अमोघ शस्त्र, वीज, समर्थ माणूस, अति टणक किंवा कठीण, रत्नाला किंवा हिऱ्याला भोक पाडण्याचे हत्यार, पोलाद, काळा अभ्रक, कातड्याची दोरी, सत्तावीस योगातील पंधरावा योग.

**वडवानळ** – समुद्रातील अग्नी.

**वणवा** – डोंगरात किंवा रानात पेटलेला अग्नी, ओणवा.

**वत्स** – वासरू, मुलगा.

**वनचर** – रानात फिरणारे किंवा राहणारे, माकड.

**वन्हि** – अग्नी.

**वरदळ** – त्रास, रहदारी, नेहमीच्या उपयोगाची संसारातील भांडी, नफा.

**वरपडा** – आसक्त, वश, दु:खी.

**वरपंग** – वरवर, बाह्यात्कारी, बाहेरचा देखावा.

**वरवंट** – सुंदर, लुगड्याच्या निऱ्यांचा पोटाजवळचा केळ्यासारखा आकार.

**वरो** – नित्याचे अन्न.

**वर्जणे** – टाकणे, त्याग करणे, वगळणे.

**वर्जिणे** – मना करणे, प्रतिबंध करणे. (पाहा : वर्जणे.)

**वर्तमान** – चालू (काळ), हकीगत.

**वल्कल** – झाडाच्या आतील सालीपासून तयार केलेले वस्त्र.

**वसु** – एक देवता, संपत्ती, द्रव्य.

**वसुदेवकुळटिळक** – वसुदेवाच्या कुळाचे भूषण (कृष्ण).

**वसुपात्र** – कडे.

**वसुंधरा** – पृथ्वी, जमीन.

**वहिला** – निराळा, द्विरुक्तिवाचक निरर्थक शब्द (उदा० पहिलावहिला).

**वहिले** – सत्वर, लवकर, तातडीने, प्रथम, पहिले.

**वळगणे** – आश्रय, पकड, जोराने धरणे, घट्ट पकडणे, लोंबकळणे.

**वळघणे** – पकडणे, आश्रय करणे.

**वळती** – गुरे चरावयास जातात ती जागा, गुरे वळवून आणण्याची पाळी किंवा कृती (गुराखी खेळत असताना ज्याच्यावर डाव येतो त्याने गुरे वळवून आणायची हा संकेत), फेरा.

**वळसा** – वेढा, फेरा.

**वाइगा** – व्यर्थ, निरर्थक, एक वाटोळे भांडे.

**वाळक** – गोधडी, जख्ख म्हातारी स्त्री, जीर्ण वस्त्र, अव्यवस्थित कपडे केलेली मुलगी.

**वाकी** – स्त्रियांच्या दंडावर बांधण्याचा एक दागिना.

**वाखाणणे** – स्तुती करणे, नावाजणे.

**वाखोरी** – वाकाची दोरी.

**वागुर-रु** – जाळे, पाश, चिध्या.

**वाघियामुरळी** – खंडोबास वाहिलेला पुरुष व स्त्री.

**वाघुरा** – जाळे, पाश, फास.

**वाटपाडा** – लुटारू, दरोडेखोर.

**वाटुली** – प्रतीक्षा, वाट.

**वाड** – निष्फळ, रिते, दुष्प्राप्य, दुर्गम, अमर्याद, जोरदार.

**वाडकोड** – कौतुक, लडिवाळपणा.

**वाण** – न्यूनता, उणीव, वर्ण, रंग, ब्राह्मणास किंवा सुवासिनीस द्यायचे दान.

**वानणे** – वाणणे, वर्णन करणे, स्तुती करणे, गौरवपर बोलणे

**वानी** – उणी.

**वाम** – डावा-डावी-डावे, उलटा, कुटील, मनोहर, अतिसुंदर.

**वामांगुष्ठ** – डावा आंगठा.

**वायावीण** – व्यर्थ.

**वारणे** – निवारणे, परावृत्त करणे, प्रतिबंध करणे, हाक मारणे, बोलावणे.

**वारिक** – वाहन, न्हावी.

**वाव** – वावगे, व्यर्थ, अयोग्य, संधी, चार हात लांबी.

**वावडी** – पतंग, धान्य वारावण्यासाठी उंचावरची जागा, अफवा.

**वावरणे** – हिंडणे, फिरणे, काम करणे, व्यवहार करणे.

**वास** – वास्तव्य, आश्रयस्थान, मार्ग, प्रतीक्षा, झाक, छटा, गंध, वस्त्र.

**वासना** – प्रवृत्ती, इच्छा, कर्माचा मनावर राहणारा संस्कार.

**वासुदेव** – श्रीकृष्ण (वसुदेवाचा मुलगा), विष्णू.

**वाव्हे** – प्रिय, जिवलग.

**विकट** – भयंकर, करूण, प्रचंड, उद्धट.

**विकरा** – विक्री.

**विलकता** – भेद, हीन प्रकार, व्यंग आहे अशी स्थिती, दीन अवस्था.

**विकार** – विकृती, दोष, क्षुब्ध मनोवृत्ती.

**विकृति** – विपरीत वृत्ती, बिघाड.

**विक्राळ** – भयंकर.

**विखरी** – विषारी.

**विखार** – विषारी, विष.

**विख्यात** – प्रसिद्ध.

**विघडणे** – बिघडणे.

**विघ्नहरु** – संकटांचा नाश किंवा परिहार करणारा, गणपती.

**विचरणे** – मनन करणे, भटकणे.

**विडिया** – तांबूल.

**वितंड** – वाद, पोरकट.

**विदान** – (पाहा : विंदान.)

**विदारणे** – फाडणे, वध करणे, चिरणे.

**विद्‌गद** – सुंदर, (विदग्ध).

**विद्यावंत** – विद्वान, विद्येत प्रवीण. (विद्या = ज्ञान, ब्रह्मज्ञान, १४ विद्या.)

**विद्वंसणे** – नाश करणे.

**विधाता** – ब्रह्मदेव, सृष्टीचा निर्माता.

**विधिनिषेध** – कर्तव्याकर्तव्य, अमुक करावे अमुक करू नये याविषयी नियम.

**विधी** – निर्माता, ब्रह्मदेव, नियम.

**विनट** – आवड, तल्लीनता, रमणे.

**विनटणे** – तल्लीन होणे, रंगून जाणे, रमणे, नाचणे, मौज करणे, छानछोक करणे.

**विभूति** – भस्म, श्रेष्ठ व्यक्ती.

**विभांडणी** – दूरता.

**विरक्ति** – वैराग्य, अनासक्ती.

**विरगुंठी** – डोक्यावर विशिष्ट प्रकारे बांधलेली केसांची गाठ.

**विरहिणी** – वियोगगीत, विरहिणीचे गाणे, (पतीपासून वियोग झालेल्या स्त्रीविषयी, तिचा) भाव व्यक्त करणारे गीत, पतीपासून किंवा प्रियकरापासून जिचा विरह झाला आहे अशी स्त्री.

**विरळा** – दुर्लभ, दुष्प्राप्य.

**विराट** – सर्वव्यापी पुरुष, भगवान, भव्य, प्रचंड.

**विरु** – वीर, बलवान.

**विरंची** – ब्रह्मदेव.

**विर्जिणे** – (पाहा : वर्जिणे.)

**विलग** – अलिप्त, अव्यवस्थित, विस्कळीत, वेगळा.

**विलगट** – भ्रष्ट.

**विलोकणे** – पाहणे, अवलोकन करणे, विचारात घेणे.

**विवसी (विवशी)** – खाष्ट देवता, जखीण.

**विवाद** – चर्चा, वाद.

**विषयताप** – इंद्रियोपभोगापासून होणारा त्रास.
**विशाळ** – मोठे, विस्तृत.
**विष्टा** – मळ, मलोत्सर्ग.
**विसंबणे** – विसरणे, भरवशावर राहणे.
**विहरण** – आळ, विहीर, डबके, अपहार, विहार.
**विळ** – काळ.
**विळा** – कोयता.
**वेचणे** – खर्च करणे, निवडणे.
**वेठी** – तुरा, भूषण.
**वेडाराणी** – छांदिष्ट.
**वेढा** – संकट, अडचण, घेरा.
**वेणु** – बासरी, बांबू.
**वेणुनाद** – बासरीचा आवाज.
**वेताटी** – बोरूच्या जातीच्या वनस्पतीची किंवा वेलाची काठी.
**वेल्हाळ** – प्रिय, सुंदर.
**वेवादणे** – विशद, करणे, चर्चा करणे.
**वेष** – पोषाख, रूप, सोंग, मिष.
**वेष्टणे** – वेढा घालणे, घेरणे, आवरण घालणे, आच्छादणे.
**वेसदार** – नगरद्वार, गावकुसाचा दरवाजा.
**वेळाइतु** – वेळेवर किंवा संकट प्रसंगी साहाय्य करणारा, मदतीस धावणारा.
**वैखरी** – वाणीच्या चार शक्तींपैकी एक. (हिच्यामुळे शब्द मुखावाटे बाहेर पडतो.)
**वैतरणी** – यमलोकची एक नदी. (मृताला ही नदी तरून जावे लागते असा पौराणिक संकेत.)
**वैरणे** – अर्पण करणे, देणे, आधणात ओतणे.
**वैरी** – शत्रू.
**वोखटी** – वाईट.
**वोगर** – भोजन, जेवण, वाढप.
**वोज** – चांगुलपणा.
**वोजावणी** – रीत.
**वोढाळ** – भटके, सैराट.
**वोथरणे** – प्रतिध्वनी करणे.
**वोपणे** – देणे, विकणे.
**वोरस** – पान्हा, प्रीती.
**वोल्हावणे** – ओलावणे.
**वोवरी** – खोली, पडवी, ओसरी, सोपा.
**वोसरणे** – मागे हटणे, कमी होणे.
**वोस पडणे** – ओसाड होणे.
**वोसंग** – मांडी.
**वोसंडणे** – भरून वाहणे.
**वोळगणे** – बिलगणे, आलिंगन देणे.
**वोळणे** – प्राप्त होणे, जवळ येणे, वळणे, परावृत्त होणे.
**वोळसा** – फेरा.
**वंचक** – फसवणारा.
**वंचणे** – अंतरणे, दूरावणे.
**वांछणे** – इच्छा करणे.
**वांजट** – निष्फळ, वांझ.
**वांझ** – जिला मूल होत नाही ती.
**विंदान** – संधान, योजना, कौशल्य, चातुर्य.
**वेंच** – खर्च, क्षय, निवड.
**वोंगळ** – घाणेरडा-डी-डे, किळसवाणा-णी-णे.
**वृत्त** – शिरस्ता, वहिवाट, रचनाप्रकार (कवितेचा), खबर.
**वृथा** – व्यर्थ, फुकट.
**वृंदावन** – गोकुळाच्या शेजारचे एक पौराणिक वन (श्रीकृष्णाचे क्रीडास्थान), कारले, तुळस लावण्याची जागा (बांधून काढलेली).
**वृंद** – समाज, समुदाय, मंडळी.
**वृषभ** – बैल.
**वृषभारूढ** – नंदीवर बसलेला.
**व्यक्ति** – स्थिती, माणूस, उद्‌गार.
**व्याघ्र** – वाघ.
**व्याज** – निमित्त, सोंग, कपट, मुदलावरचे देय.
**व्याळ** – सर्प, साप.
**व्युत्पत्ती** – नैपुण्य, प्रावीण्य, ज्ञान, परंपरा.
**व्योम** – आकाश.

**व्योमाकार** – निराकार.

**व्यंकटा** – वाकडचा, विषम.

**व्रजवासी** – गोकुळचे रहिवासी.

## [ श ]

**शकट** – गाडा, गाडी, गाडीतळ, अडथळा, रोहिणी नक्षत्र.

**शलभ** – टोळ, पतंग (दिव्यावर झडप घालणारा कीटक).

**शव** – प्रेत, मृतदेह, तिरडी.

**शषी** – चंद्र.

**शाखा** – भाजी, फांदी, पोटभाग, पक्ष, तट, पारंबी.

**शारंगधर** – विष्णू, कृष्ण.

**शिक** – शिक्षा, शिंक (नाकातून जोराने निसटणारा वारा).

**शिपटी** – फोक, शिरटी (झाडझुडपाची), बारीक काठी.

**शिबी** – एक ऋषी (राजा).

**शिराणी** – आवड, महत्त्व, उपभोग. याप्रकारची वस्तू.

**शिरीळशेटी** – औटघटकेचा, अल्पकाळचा.

### एक दंतकथा

शिराळशेट नावाचा एक वाणी होऊन गेला. त्याच्यावर खूष होऊन राजाने त्यास साडेतीन (औट) घटकापर्यंत राजाचे अधिकार दिले. या अल्पकाळातही त्याने या अधिकारांचा उपयोग सार्वजनिक लोककल्याणासाठी केला. त्यामुळे लोकांत तो पूज्य झाला.

**शिरोमणी** – मुख्य, आघाडीचा.

**शिळघांटा** – ओल्या हरभऱ्यांचा एक पदार्थ.

**शिळवणी** – थंड करण्याची क्रिया किंवा पद्धती, ताकावर तरंगणारा पातळ स्निग्ध पदार्थ.

**शिक्षा** – वळण, अभ्यास, उपदेश, परिपत्य, वेदांच्या सहा अंगांपैकी एक (वर्णोच्चाराचे शास्त्र).

**शिश्नवृत्ती** – संभोगप्रिय, संभोगप्रीती.

**शीणणे** – थकणे, त्रासणे, खंत किंवा खेद वाटणे.

**शीळा** – पाषाण, दगड, अहिल्या (रामाने शिळा होऊन पडलेल्या अहिल्येचा पायांच्या स्पर्शाने उद्धार केला या कथेचा संदर्भ).

**शुकचंचु** – पोपटाची चोच.

**शुद्ध** – तूप, निर्भेळ, निर्मळ.

**शुद्धमती** – ज्याचे मन वा बुद्धी निर्मळ वा पवित्र आहे असा.

**शूळपाणी** – शंकर (हातात शूल असलेला).

**शेखी** – अखेर, पर्यवसानी, परिणामी. बढाई, घमेंड.

**शेटघा** – स्वामी, मालक.

**शेर** – काडेहुरा, निवली (कुंपणासाठी वापरतात ते चिकाचे झाड), वजनाचे एक माप, वेतन, विष्टा, वाघ.

**शेरणी** – खिरापत, प्रसाद (खोबऱ्याच्या तुकड्यांचा).

**शेषपत्रावळी** – अन्न वाढायच्या पानासकट त्यावरील अवशेष.

**शेषशायी** – शेषाच्या शय्येवर पहुडणारा, विष्णू.

**शेषापृष्ठ** – शेषाची पाठ.

**शिंगी** – शिंगे असलेला प्राणी, कानफाटे गोसावी वाजवतात ते लहान शिंगाचे वाद्य.

**शिंदळ** – दुराचारी, जारकर्मी, व्यभिचारी.

**शिंपणे** – सिंचन करणे, भिजविणे.

**शुंडादंड** – सोंड.

**शृंखला** – सांखळी. (सरीमागून सरींची अखंड साखळी.)

**शृंग** – शिंग, शिखर, पिचकारी किंवा कारंजे, टोक.

**श्रवण** – कान, ऐकणे (ऐकण्याची क्रिया).

**श्रावणारी** – श्रावण बाळाचा शत्रू, दशरथ.

**श्रीकर** – मांगल्यपूर्ण, श्रीकृष्ण.

**श्रीवत्स** – विष्णू, श्रीकृष्ण.

**श्रुति** – वेद, शब्द, बोल.

**श्रोता** – ऐकणारा, शिष्य.

**श्वान** – कुत्रा.

[ष]

**षट्कर्म** – सहा कर्तव्ये, (ब्राह्मणाची) : अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह; मंत्र-तंत्रविद्या, उपजिविका व हटयोग, यांच्या मार्गातही निरनिराळी सहा कर्मे सांगितली आहेत. त्यांनाही षट्कर्मे म्हणतात.

**षट्चक्र** – देहाच्या ठिकाणी असलेली सहा पद्माकार चक्रे. [सहा चक्रांची नावे : आधार, लिंग, नाभी, हृत्, कंठ, मूर्ध. यांना पद्मे असे म्हणतात. ही देहाच्या भागीरथी नामक मधल्या नाडीवर असतात. कूर्म, अनंतशेष, आधार, अनाहत, अधिष्ठान, नाभी, जठराग्नि, मानस, कर्पूर (याच्या शेवटी ब्रह्मरंध्र असते.) गरूड, गोल्हाट, त्रिगांती (भेद करणे), अशीही नावे आहेत. ही सगळी परिभाषा व व्यवस्था हटयोगात आहे.]

**षड्स** – स्वादिष्ट, रुचकर.

**षड्वर्ग** – षड्रिपु (काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर).

[स]

**सइ-य** – मैत्रीण, सखी.

**सईल** – सारखा, सैल.

**सकळिक** – सर्व, एकूण एक.

**सगुण** – रूपगुणसंपन्न, गुणांनी युक्त, सांसारिक, दोरी लावून सज्ज (धनुष्य).

**सजगाणी** – कसबीण, ढबू, जमिनीचे एक माप.

**सटवे** – साहाव्या.

**सडा** – शेण, रंग, वगैरेचे दाट शिंपण, पखरण किंवा विखरण; एकटा.

**सडासंमार्जन** – केर काढणे, सारवणे व सडा टाकणे; सकाळचे शुद्धीचे काम.

**सणकांडी** – तागावरील दोर (वास) काढून घेतल्यावर राहणारी काडी.

**सत्रावी** – चंद्राच्या सोळा कला ज्याच्यावर अधिष्ठित होतात ते मूळ चंद्रबिंब, संख्याविशेष.

**सत्त्व** – बल, तेज, त्रिगुणांपैकी एक (सत्त्व, रज, तम).

**सदन** – घर, निवास, वसतिस्थान.

**सदाशिव** – परमेश्वर, शंकर.

**सधर** – स्थिर, बळकट.

**सपाट** – साफ, उंच सखल नाही असा.

**सप्तस्वर** – संगीतातील सात सूर (षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद).

**सबराभरित** – सर्वव्यापक.

**सबाह्य** – अंतर्बाह्य, कायिक व मानसिक, आतून व बाहेरून.

**समसरी** – समान, सारखे.

**समाराधना** – व्रत, उत्सव, सोहळा, इत्यादी प्रसंगीचे भोजन.

**समावणे** – आत राहणे, अंतर्भूत होणे.

**सरणे** – पुरे पडणे, योग्य होणे, शोभणे, अनुसरणे, पुढे किंवा मागे होणे, सरकणे.

**सरते** – वंद्य, श्रेष्ठ, अखेरचे.

**सरा** – अखेरची वेंचणी (धान्याची).

**सरिसा** – जवळ, सन्निध, सारखा.

**सरिसे** – सारखे. (पाहा : सरिसा.)

**सरोज** – कमळ.

**सर्वेश्वर** – परमेश्वर, सर्वत्र भरून राहिलेला, ईश्वर.

**सवदागर** – व्यापारी, देवघेव करणारा.

**सवे** – सवय, सोबत.

**सवंगडी** – सोबती, खेळगडी.

**सहस्रदल** – कमळ, ब्रह्मरंध्र, हजार पाकळ्या किंवा पाने (असलेला).

**सहस्रमुख** – शेष, हजार तोंडे (असलेला).

**सहस्राधारा** – हजारो धारा.

**सहाकारी** – साहाय्यक, मदतनीस.

**सळ** – अभिमान, संकट, पट्टा, गांजणूक.

**साचा** – खरा, सत्य, समर्थ, ठसा.



अनुक्रमणिका

**साचे** – खरे, सत्य, समर्थ.

**साजणे** – शोभणे, प्रिय असणे, योग्य असणे, समाविष्ट होऊ शकणे, उघडकीस न येणे.

**साजणी** – प्रिया, मैत्रीण, रखेली.

**साजिरी** – सुंदर, शोभादायक, सुशोभित.

**साठी** – साठा, संग्रह, संगत, करिता, साठ वर्षे वय, घराच्या मागचा भाग, होडीत बसावयास घातलेले तक्ते, गाडीचा तळ, छपराचे ओंबण.

**सातुळी** – दोरा, सुतळी.

**सादृश्य** – सारखेपणा, साम्य.

**साधणे** – संपादणे, सिद्धीस नेणे, मिळविणे.

**साधुवृंद** – सज्जनांचा मेळा, संतांचा किंवा संन्याशांचा समुदाय, भक्तांचा समुदाय.

**सान** – लहान.

**साबडे** – साधे, सरळ, शुद्ध, भोळे, अजागळ.

**सामुद्रिक** – शरीराच्या अवयवावरील चिन्हांच्या शास्त्राप्रमाणे शुभाशुभ किंवा ते सांगणारा, समुद्रासंबंधी.

**सायास** – अतिशय कष्ट.

**सारजा** – शारदा, सरस्वती.

**सारणे** – संपविणे, दूर करणे.

**सारा** – गवत, धान्य, शेतीवरील कर.

**सारू** – तथ्यांश, सत्य, थोडक्यात मर्म.

**सारंगधरू** – विष्णू, कृष्ण.

**साली** – मेहुणी (बायकोची बहीण).

**सावज** – शिकारीचे जनावर, प्राणी (रानटी), श्वापद, पशू.

**सावळे** – वस्त्र, एक प्रकारचे लुगडे, स्त्रियांचे कोणतेही वस्त्र, माड-ताड-पोफळ यांची फांदी, काळसर-निळसर रंगाचे.

**साविला** – बरोबरीचा, ओळखीचा.

**सासिन्नणे** – भरास येणे, बहरणे, पूर्णता पावणे.

**साहाजणे** – सहा व्यक्ती. (पाहा : षड्वर्ग.)

**साहातोंड्या** – षडानन, कार्तिकेय, सहा तोंडांचा.

**साहि** – (पंथी) संख्याविशेष. (पाहा : षड्वर्ग.)

**साहिचक्र** – (पाहा : षट्चक्र.)

**साहिशास्त्रे** – षड्दर्शने (सांख्य, योग, वैशेषिक, न्याय, पूर्व मीमांसा व उत्तर मीमांसा).

**साही** – (चक्रवर्ती) श्रीकृष्ण, साहाय्यकर्ता, सहा पट, संख्याविशेष.

**साह्यकारी** – मदतनीस, पाठिंबा देणारा.

**साळुंका** – महादेवाच्या लिंगाची पाषाणाची बैठक, एक पक्षी.

**सिकता** – वाळू, असाध्य गोष्ट.

**सिद्धपंथ** – मुक्तीचा मार्ग (त्या मार्गाचे तत्त्वज्ञान), योगमार्ग.

**सिद्धि** – दैवी शक्ती, अद्भुत गोष्ट करण्याचे सामर्थ्य, अष्टसिद्धी (आणिमा, महिमा, लाघिमा, प्राकाम्य, प्राप्ती, ईशिता, वशिता, कामवासायिता), तप, सेवा, ध्यान, इत्यादीचे फल.

**सिबुर** – शांती, सहिष्णुता.

**सीत** – थंडी.

**सीतळु** – गार, थंड.

**सीताशुद्धि** – सीतेचा शोध, सीतेचे पावित्र्य.

**सीपटी** – (पाहा : शिपटी.)

**सुकर** – डुक्कर, सोपे, शुभहस्त.

**सुकुलिन** – श्रेष्ठ, चांगल्या कुळातील.

**सुकृत** – पुण्य, पुण्याईचे कृत्य, चांगले कृत्य किंवा कार्य.

**सुगड** – चतुर, कुशल, हुशार, एक प्रकारचा आकार.

**सुगी** – समृद्धीचा काळ, उत्तम काळ, मोसम.

**सुघड** – चतुर, चांगले, निर्मळ, सदाचारी, एक प्रकारचे भांडे.

**सुणे** – कुत्रे.

**सुदणे** – निजणे, झोपणे, बोलावणे, शिरणे, शिवणे (जोडणे), बांधणे.

**सुदर्शन** – विष्णूचे चक्र, पवित्र भेट.

**सुनट-सुनटा** – स्वैर-स्वैरतेचे.

**सुनीळु** – दाट निळा, अतिशय निळा, निळ्या ढगांच्या रंगाचा.

**सुफळ** – कृतार्थ, लाभदायक, सुपरिणामकारक.
**सुर** – देव.
**सुरपति** – इंद्र, परमेश्वर.
**सुरभि** – सुवासिक (पाणी), सुंदर, कामधेनू, गाय, वसंत (ऋतू), चाफा, बकुळ.
**सुरवर** – श्रेष्ठ देव.
**सुरंग** – चांगल्या रंगाचा, श्रेष्ठ वर्णाचा, सुंदर, तजेलदार, गेरू किंवा गेरूच्या रंगाचा, एक प्रकारचे झाड व त्याचे सुवासिक फूल.
**सुवर्ण** – चांगला रंग, सौंदर्य, सोने.
**सुश्लोक** – कीर्तिमान.
**सुसाट** – वेगवान, अनिवार.
**सुहास्य** – आनंदपूर्ण, हास्ययुक्त.
**सुहृद** – प्रेमळ मित्र.
**सूकर** – डुक्कर.
**सूत** – भाट, दोरा, तार, संबंध.
**सेज** – शय्या, बिछाना.
**सैरा** – दिशाहीन, स्वैर (उदा० सैरावैरा.)
**सोकरण** – सवकलेली किंवा नादावलेली गोष्ट, ज्याची सवय लागली आहे ती गोष्ट किंवा ज्याचे व्यसन लागले आहे अशी गोष्ट.
**सोज्वळ** – निर्मळ, निष्पाप, सतेज.
**सोनसळा** – पिंगट रंगाचे जरतारी रेशमी वस्त्र (पितांबर), सोन्याचे तेज किंवा सोन्याच्या तारा.
**सोपारे** – सुखावह.
**सोमसिद्धी** – शंकराची प्रसन्नता किंवा प्राप्ती (शैव पंथानुसार भक्तीचे फल).
**सोय** – अनुकूलता, जुळणी, लाभ.
**सोर** – आकांत, आक्रोश, एक मातीचे भांडे.
**सोळा** – सूक्ष्म अस्तित्वे : (पंचतन्मात्रे, पंचज्ञानद्रिये, पंचकर्मेंद्रिये व मन).
**सोळाकळी** – सोळा कलांची पूर्ण.
**सौजन्य** – प्रेम, चांगुलपणा.
**सौमित्र** – लक्ष्मण (सुमित्रेचा पुत्र, मुलगा).
**सौरसु** – आवड, गोडी.
**संकष्ट** – संकट.
**संग** – सहवास, आसक्ती, मैत्री.
**संचणे** – भरून राहणे.
**संचित** – पूर्वजन्मार्जित पापपुण्य.
**संजीवन** – अमरता, अमरपणा, अमृतसिद्धी.
**संतति** – मुलेबाळे.
**संधान** – नेम, निशाण, लक्ष्य, संबंध.
**संपुष्ट** – देव ठेवण्याचे पात्र (भांडे).
**संप्रदाय** – धर्म-तत्त्वज्ञानाचा मार्ग किंवा मत.
**संबोखणे** – संबोधणे, हाकारणे, बोलणे, समजावणे.
**संबोधन** – आठवी भक्ती, उद्देशून बोलणे.
**संभार** – सामग्री, संग्रह.
**संभ्रम** – वेड, आदर, मोह, संशय, गोंधळ.
**संभा** – शंभू, शंकर.
**संभूती** – जन्म, उत्पत्ती.
**संवादिणे** – परस्परांशी बोलणे, संभाषण करणे.
**संसारव्यथा** – प्रपंचाचे दुःख.
**संसारषड्चक्र** – प्रपंचाचा फेरा.
**संसारसांकण** – प्रपंचाची गोडी.
**सांकडे** – संकट, खड्डा, गर्ता.
**सांग** – सर्व अंगासह, निर्दोष, पूर्ण, यथास्थित.
**सांगडी** – जोडी, सोबत, मैत्री, तरून जाण्याचे साधन.
**सांगाती** – सोबती.
**सांजावण** – संमार्जन. (पाहा : सडासंमार्जन.)
**सांडणी** – त्याग, सांडण्याची क्रिया, उंट (मादी), विसरणे (विस्मृती).
**सांडणे** – ओवाळून टाकायचा जिन्नस (दृष्ट, भूतबाधा काढण्यासाठी), त्याज्य वस्तू, टाकणे, हरवणे.
**सांडोवा** – कुरवंडी; ओवाळणी.
**सिंधुतनया** – नदी, सागरकन्या.
**सितरणे** – फसविणे, नागविणे.
**सुंदरी** – देखणी स्त्री, सुंदर स्त्री.
**सौंगडी** – सवंगडी, सोबती.
**स्तन** – अचळ, सड.
**स्तंभ** – खांब.

**स्थपित** – उभारलेला, रचलेला.

**स्वस्थळ** – स्वस्थान, निजस्थान, आत्मरूप.

**स्वामिणी** – मालकीण.

**स्वाहा** – गिळंकृत (करणे), पटकन खाण्याची क्रिया, नाश करणे.

## [ह]

**हटकणे** – हाक मारणे, आव्हान देणे, हरकत घेणे, हाक मारून बोलावणे.

**हडबडणे** – गोंधळणे, गडबडणे, हाकलणे.

**हडसणे** – झटकणे ओढणे, ठासून बसवणे, आपटणे, बजावून सांगणे, पाखडणे (सुपात).

**हमामा** – गुराख्यांचा एक खेळ (त्यातील डाव).

**हरणे** – निवारणे, नाहीसे होणे, गमावणे, पराभूत होणे, हिरावून घेणे.

**हलहल** – हलाहल (समुद्रमंथनातून बाहेर आलेले विष), प्रक्षुब्धता.

**हवन** – होम, देवांना संतुष्ट करण्यासाठी अग्नीत आहुति टाकणे.

**हव्यास** – उत्कट, इच्छा, हाव, सोस.

**हळुवट** – हलके, उथळ.

**हाकारा** – पुकारा, हाकाटी, धावा.

**हाट** – बाजार, जत्रा.

**हाटक** – सोने.

**हाटकरी** – व्यापारी, उद्यमी.

**हाटु** – (पाहा : हाट.)

**हातणी** – हातातील, पिशवी (हातात घालायची), दगडविटांची आधारासाठी केलेली बांधणी, केरसुणी, कातडे कमावण्याचे एक आऊत.

**हान** – तूट, हानी.

**हारपणे** – हरवणे, (भान) हरवून जाणे.

**हाळदोळी** – हळद, हळद लावलेली, हळदीच्या रंगाची.

**हिमकाळ** – हिवाळा.

**हिलाल** – दिवटी.

**हिव** – थंडी

**हीनवट** – न्यूनता, व्यंगता, हिणकस.

**हुजत** – पोत्यास ऐवज जमा झाल्याची पावती.

**हुड** – लीला, खोडी, धटिंगण.

**हुमणी** – ढुशी, धक्का.

**हृद्गद** – मनातील अर्थ, मनातील अभिप्राय, प्रिय, अंतःकरणात कोरलेले.

**हेडवणे** – हेटाळणे.

**हेतु** – वासना, उद्देश, निमित्त, पुरावा, उगमाचे स्थान.

**हेम** – सोने, बुध (ग्रह), हिवाळा.

**हेमपुरी** – सुवर्णनगरी, सोन्याचे शहर.

**हेर** – क्षुद्र, टाकाऊ, क्षुल्लक, गुप्त दूत.

**हेळसणे** – तिरस्काराने वागणे, अवहेलना करणे, धिक्कारणे.

**हेळा** – क्षण.

**हेळामात्र** – क्षणमात्र, क्षणभर.

**होड** – पैज, शर्यत, ठराव, करार.

**हंसणे** – सतेज असणे, प्रफुल्लित असणे, कार्यक्षम असणे.

**हांडोरिया** – अडाणी, अज्ञानी.

**हाण** – नुकसान, हानी.

**हिंपुटी** – खिन्न, कष्टी, उदासीन, बारीक चेहऱ्याचा.

**हुंडारणे** – बागडणे, नाचणे, उधळणे.

**हुंबरी** – गुराख्यांचा एक खेळ (त्यातील डाव).

## [क्ष]

**क्षणभंगुर** – एका क्षणात नाश पावणारा, नाशिवंत, अशाश्वत.

**क्षणेक** – एक क्षण, थोडा वेळ.

**क्षरणे** – हळू हळू नाहीसे होणे, पाझरणे.

**क्षिती** – एक श्रुती (१४ वी), अंत, शेवट, पृथ्वी, जमीन, पर्वा.

**क्षिवाण** – भेट, कल्याण. (पाहा : क्षेम.)

**क्षीर** – दूध, चीक, पाणी, खीर.

**क्षीरसिंधु** – (पौराणिक) सप्तसमुद्रांपैकी एक, विष्णूचे शयनस्थान.

**क्षेत्रज्ञ** – आत्मा, जीवात्मा, प्रवीण, परमेश्वर, धर्मशास्त्रात सांगितलेल्या बारा पुत्रांपैकी एक.

**क्षेम** – भेट, प्रेमाचे आलिंगन, कुशल.

**क्षौर** – तीर्थाच्या ठिकाणी करावयाची हजामत.

[ज्ञ]

**ज्ञाता** – तज्ज्ञ, ज्ञानी.

**ज्ञाती** – जात, वर्ग.

• • •

[अ]

**अकथ** – अकथनीय, अकथ्य, न सांगण्यासारखे.
**अकुला** – अलख निरंजन, ब्रह्म, कुलरहित, वाईट घराण्यात जन्मलेला, नीच.
**अखिर** – अक्षर.
**अगई** – अगेय, गाण्यापलीकडील.
**अचला** – पृथ्वी, धरती.
**अठारह भार** – अठराभार वनस्पती.
**अडवार्थ** – भीती व्यर्थ होती.
**अणमडिआ** – न मढवलेला.
**अणेरी** – दुसऱ्याचा.
**अधिपति** – अधिपत्य, राज्य.
**अनत** – अन्यत्र.
**अनबोलता** – स्तब्ध, मुका, अस्पष्ट बोलणारा.
**अनंत** – अन्यत्र.
**अनंत्र** – अन्यत्र.
**अपश** – पशुतुल्य.
**अबदालव** – साधु किंवा फकिराप्रमाणे.
**अयांना** – मूर्ख, अजाण.
**अवखधं** – औषधी.
**अवघट** – कठीण.
**अषिरा** – अक्षर.
**अहालीया** – अहिल्या.
**अहंडं** – वजन, माप.
**अम्हचा** – (म.) आमचा.
**अल्लक** – प्रभूला, ईश्वराला, देवाला.
**अस्त्री** – स्त्री, पत्नी.

[आ]

**आंगणि** – अंगणात, घरात, चौकात.
**आकाजौ** – विधाड, नाश, अधम, निरुपयोगी.
**आगें** – पूर्वी, पूर्वीपासून.
**आछि** – (गु.) आहेस.
**आछै** – आहे.
**आड़ौ** – नष्ट करीन.
**आपा** – आपला.
**आपा** – अहंकार, गर्व.
**आपि** – प्रदान करा.
**आपिड** – दिला.
**आपिला** – प्राप्त केले.
**आपुइया** – दिला.
**आबरि** – आकाशात.
**आरौ मांडी**–ध्यानस्थ होऊन.
**आलम** – दुनिया, संसार, जग, लोक.
**आषरि** – अक्षर.

[इ]

**इजार** – विचार, इजारबंद, विजारी नाडी.

[ई]

**ईब** – आता, सध्या, आतापर्यंत.

[उ]

**उदिक** – पाणी, जल.
**उनमान** – प्रकार, रीती.
**उरगिला** – रक्षण केले, बचाव केला.
**उलगूं** – (म.) उलगडून, सोडून.

[ऊ]

**ऊभा** – उभे आहे, तयार आहे.
**ऊभी** – (म.) ऊर्मी.
**ऊरा** – कमी, थोडा.

[ऐं]

**ऐकल** – एकटा, निसळा.
**ऐकठघाई** – एकत्रित होत आहे.
**ऐवडी** – (म.) एवढी.

[औ]

**औडौ** – (म.) ओढणे, सहन करणे, वाहणे.

[अं]

**अंत न जाइला** – शेवट होणार नाही, समाप्ती होणार नाही.
**अंतरिथ** – हृदय-मन.

[क]

**कदे** – (प.) केव्हाही, वारंवार, क्वचित.
**कबिलास** – स्वर्ग, कैलास.

करवा – शरीर, घट.
क़लंदर – योगी, कैलास.
काइण – पढ़िया-विवाह केला.
काई – गंज, शेवाळे.
काछै – बांधणे, नेसणे.
काड़ला – काढला, प्रगट केला.
काती – (म.) कैंची.
कायक – का ? कशाकरिता, काय म्हणून.
कालकुष्ट – कालकूट, वीष.
काष्ट – लाकूड, काठी.
काष्ट – लाकूड.
किमची – कोणत्या प्रकारची, तऱ्हेची.
किसा – कैसा, कसा, कोणत्या रीतीने, कसला, कशासारखा.
कीले मेक – खुंटा गाडून टाकला (नामाच्या ठिकाणी भावना जखडून टाकल्या).
कुचित – थोडा.
कुजा – कोठे.
कुटिल – अप्रामाणिकपणा, दुष्टपणा.
कुरक्षेत्र – कुरुक्षेत्र.
कुरंग – कुरंग, मृग.
कुलह – टोपी, मुगुट.
कुसमल – (सं.) करमल, मळीन, पाप.
कुसमलताई – पुष्पत्व.
कूडे – व्यर्थ, सारहीन.
कूतल – कमजोर, अशक्त.
कूरनु – ढीग, समूह, पुष्कळ, अधिक.
कोडी – करोड.
कैरुं – कमलिनी.
कैरो – कौरव.
कौडा – द्यूत, जुवा खेळण्याची एक गोटी, कवडी.
कांचली – सापाची कात.
कांती – सुरी, चाकू.
कुंडे – नरक.
कूंडा – मोठी उथळ कढई, भांडे.
कूंतमसाहति – तर्कवितर्क.
क्रांती – क्रांती, परिवर्तन.

## [ख]

खुंदकार – संकेत, इशारा.

## [ग]

गत होईबौ – समाप्त झाले.
गनी – स्वामी, मालक.
गम – दशा, अवस्था.
गम – संतोष, शांती.
गरडागमी – गरुडवाहन, विष्णू.
गहला – गंभीर, खोल, अगाध.
गाजा – पसरला, विस्तार पावला.
गालि – व्यर्थ, सारहीन.
गाली – लज्जा.
गाहक – ग्राहक.
गुडवाई – गूळ तयार करण्याची प्रक्रिया.
गुरूवा – गुरु, आचार्य (गुळण्या).
गूड़ी – पतंग.
गोठि – गोष्टी, मैत्री.
गोडी – (म.) मधुरता, मिष्ठता.
गोवलि – अस्थाई.
ग्रेहि – गृहिणी, पानी.

## [घ]

घड़ता – घडण होत असताना.
घणौं – फार, अधिक, बहुत, पुष्कळ.
घनहरू – मेघ, ढग.
घाट – मार्ग, पथ, डोंगरातील रस्ता, पहाडातील पायवाट.
घाटा – नष्ट किंवा कमी केले.
घाणेरी – घाणेरडी.
घुंटिला – घटाघटा पितो.
घूतिग – घाणेरडा.
घौस बलायै – एक दिवशी आपत्ती आली.

## [च]

चटरा – पाठशाळा.
चरम न साई हो – माझा संपूर्ण अहंकार नष्ट झाला.

**चामद** – चामड्याचे.
**चिउंटघा** – लागणे, चिकटणे, लगटणे, बिलगणे.
**चिता** – अंत:करणात.
**चितारें** – चारही बाजूने.
**चिह्न** – इशारा, देखावा, भपका.
**चोघता** – पहाणे, लक्ष देणे, हुडकणे, आशा करणे, प्रतीक्षा करणे.
**चोघिलें** – टक लावून पाहिले.
**चोषा** – उत्तम, सुंदर, श्रेष्ठ, शुद्ध.
**चंडाली** – चांडाळाप्रमाणे, नीच, दुष्टसमान.
**चंदल** – चंद्र.

[छ]

**छिन** – क्षण.
**छिपीया** – शिंपी, दर्जी.
**छीन** – क्षण.
**छीपा** – रंगारी, दर्जी.
**छीपौ** – (म.) शिंपी, दर्जी.

[ज]

**जतन** – जितका, जितकी.
**जमधारी** – मृत्यूच्या बंधनात.
**जल······प्रवालें** – जलसिंचन करून प्रवाळ जतन केले तरी.
**जलहर** – जलधर, तलाव, नदी.
**जाइ-न पेली** – बरोबर जात नाही.
**जामा** – अवडंबर.
**जसरथ** – दशरथ.
**जहिंया** – जेथे.
**जिग** – यज्ञ.
**जुगुती** – युक्ती.
**जुहारों** – मागणी करणार.
**जैला** – (म.) गेला.
**जोइये** – पहा.
**जोइलें** – दिवा लावणे.
**जोई** – पाहून, पडताळून, पारख करून, परीक्षा पाहून.
**जोगेश्वर** – योगियांचा नाथ.
**जोवौ** – पहात आहे.
**जंत्र** – यंत्र (वाद्य यंत्र).

[झ]

**झूझै** – झपाटतो, आक्रमण करतो.
**झंपै** – लढणे, भांडण करणे.
**झोंझ** – कवडी, धन, मिळकत.

[ट]

**टूका** – संतुष्ट झाला.

[ठ]

**ठाली** – व्यर्थ, कर्मविहितन.

[ड]

**डउरू** – डमरू.
**डहकीला** – बेकार होऊन घरोघर फिरणे.
**डाक** – दुंदुभी, नगारा.
**डुंगर** – पर्वत.
**डाँग** – (म.) दंडा, लाठी, सोटा.

[ढ]

**ढारि** – त्याग करून.

[त]

**तत** – तितका, तेवढा, जितका, जेवढा.
**तपनी** – ताप, दु:ख.
**तलि** – तळ, खाली.
**तारी** – टाळ.
**तालाबेली** – (पं.) तडफडाट, तळमळ.
**तिरत** – तरून जाणे, पार उतरणे.
**तुमची** – (म.) तुमची.
**तांत्य** – तार.
**त्र्यंबक** – लोखंड.

[थ]

**थाई** – होत आहे.
**थिति** – शांति, स्थिरता.
**थंभा** – खांब.

[द]

**दगड़ा** – (म.) पत्थर, दगड.
**दर** – स्थान.

**दहिणादिक** – दक्षिणादी.
**दहु** – दोन.
**दार** – काठी, लाकूड.
**दारन** – दारुण, अधिक.
**दिन षपनी** – दिवसभर खपत असतो.
**दिव** – दिव्य.
**दीठी** – देखा.
**दुनी** – जग, जगातील लोक, मानव जात.
**दुरदुरा** – बेडूक.
**दुहेली** – कठीण.
**दुस्तर** – तरून जाण्यास कठीण (सागर).
**देहाढ़ा** – (राज) दिन, दिवस.
**देहुरे** – दरवाजा, द्वार.
**दोजग** – नरक.

## [ध]

**धगड़ा** – एक अपशब्द, परस्त्रीगमन करणारा.
**धिरत** – तूप.
**धोषा** – भ्रम.
**धंधाकार** – धंदा, व्यवसाय.

## [न]

**नटणी** – नटी.
**नटारंभ** – सृष्टीच्या प्रारंभ कालातील नट.
**नदरि** – नजरेमध्ये, दृष्टीत.
**नाई** – नाम, नाव.
**नाटी** – नटी.
**नाठा** – नष्ठ.
**निता** – नित्य.
**निधान** – संपत्ति, वस्तुकोष.
**निमानौ** – (सं. निम्न).
**निरपष** – निष्पक्ष.
**निरबंध** – बंधरहित, सीमारहित, बहुत.
**निरमाइलु** – निर्मल.
**निवाजि** – नमाज.
**निषर** – खरी, वास्तविक.
**निसरनी** – शिडी.
**निहाल** – प्रसन्न.
**निहोरो** – प्रार्थना, याचना.
**निहंद** – रक्षक.
**नीझर** – निर्झर.
**नींदै** – निंदा करण्याने.
**नीपजै** – उत्पन्न किंवा प्रकट होत आहे.
**नीर** – समीप.
**नीरा** – हिऱ्याची चमक.
**नीरौ** – समीप.
**नेत** – नित्य, सर्वदा.
**नेरे** – समीप, जवळ.
**नेहरौ** – स्नेह, प्रेम.
**नांका** – नाक.
**नृति** – नित्य.
**नृभै** – निर्भय.
**नृषत** – पहात पहात, निरीक्षण करीत.
**न्याइ** – न्याय.

## [प]

**पचि पचि गये** – हार गेले.
**पटा** – पट्टा, लिखित पत्र.
**पटंतर** – बराबरी.
**पडवणि** – पद्मिणी, कमलिनी.
**पतीजै** – विश्वास ठेवणे.
**पयाना** – लक्ष्य, उद्दिष्ट.
**परतषि** – प्रत्यक्ष.
**परमोध्यौ** – समजविले.
**परिहन** – पैरण, वस्त्र.
**परै झरि** – खाली पडत आहे.
**परोहत** – पोहत जात.
**पष** – पक्ष.
**पषाल** – धुणे.
**पषालन** – प्रक्षालन करणे, धुणे.
**पषालै** – (प्रक्षालन) धुणे, साफ करणे.
**पचै** – जळत आहे.
**पसवा** – पशू.
**पसवारा** – जुवा खेळणारा.
**पहरा** – दूर.
**पाइक** – (पायक) शिपाई.
**पाटै सुत्रै** – रेशमाच्या धाग्यात.
**पाणीयां** – पाणी.
**पातुर** – गणिका, वेश्या.
**पालिक** – पाळणा, पलंग.
**पावघे** – मिळो, प्राप्त होवो.
**पासा** – पाश्यात, जाळ्यात.

**पासी** – जाळे, पाश.
**पिछेकडि** – मागच्या बाजूला, बाहेर.
**पुतलीदेव** – मूर्ती.
**पुनि** – पुण्य.
**पुरवौरली** – इच्छा पुरी करो.
**पुलंदरियै** – (सं.) पुरंध्री, सौभाग्यवती स्त्री.
**पूगी** – पुरी झाली.
**पूंठि** – पीठ.
**पेटाबेलू** – जास्त खाणारा, अधाशी.
**पेलीला** – उपेक्षा करणे.
**पैआरु** – वाळलेले गवत.
**पैज** – दरवाजा.
**पैड़ी** – शिडी, मार्ग, पायरी.
**पैलीतिरी** – पैल तीरावर.
**पैहारी** – दूध पिणारा.
**पोतै** – (म.) पोते, कोथळा, लहान गठ्ठा किंवा गाठ.
**पोयौ** – गुंथा.
**पंषी** – पक्षी.
**पांनि पांनि** – पानोपानी.
**पांस सुमाई** – पंचाशी सहमत होऊन, पंचाना आवडेल त्याप्रमाणे.
**पिंड भरता** – पिंड दान देणे.
**पिंड** – शरीर.
**पुंडरक** – पुंडलिक, कमल.
**प्रकासा** – प्रकाशित, दृष्टीस पडणे.
**प्रतीति पाई** – विश्वास प्राप्त झाला, श्रद्धा बसली
**प्रबल** – दृढ.
**प्राग** – प्रयाग, तीर्थ.
**प्रोढ़ा** – वाढले प्रबाने – प्रमाणे.
**प्यंड** – पिंड, पृथ्वी.
**प्यंड परे** – मेल्यानंतर.

**[फ]**

**फोकट** – तुच्छ, व्यर्थ.

**[ब]**

**बकसि** – क्षमा कर.
**बधत** – मोठा किंवा अधिक होत आहे, उन्नत होत आहे.
**बपुरी** – बिचारी.
**बमेक** – विवेक, विचार, ज्ञान, बुद्धि.
**बलै** – प्रकाशमान होत आहे.
**बहनडी** – (राज.) बहीण.
**बहोरि** – पुन्हा.
**बाइर** – (बायर) स्त्री.
**बागा** – एक वस्त्र विशेष, कपडा, मानाचे वस्त्र.
**बाजी** – खेळ, क्रीडा.
**बाडी** – बगीचा.
**बाणी** – व्यापारी, वाणी, धान्याचा व्यापारी.
**बाद** – व्यर्थ.
**बाना** – वेश.
**बापौती** – पैतृक, अधिकार.
**बार** – विलंब, अवेळ.
**बालहा** – प्रिय.
**बाहिली** – बाहेरची.
**बाही** – सांभाळला, पालन केला.
**बिगारी** – बिन मजुरीचे काम, जबरदस्तीने करविलेले काम.
**बिचारै** – विचार करणे.
**बिठाल्यौ** – उष्ठावले.
**बिधाना** – नियम, निधान.
**बिसिमिलि** – अर्धमृत.
**बिसियार** – प्रचुर, अधिक.
**बिहूनौं** – रहित, विहीन.
**बिहौं** – विठ्ठल.
**बीठ्ठलियौ** – विठ्ठलच.
**बूठा** – बुडून गेला.
**बेड़ा** – नाव.
**बेढी** – कारागीर, मजूर.
**बेदनि** – वेदना, पीडा.
**बेनु** – वीणा.
**बेरिया** – बेडी.
**बेसासा** – विश्वास.
**बेसी** – अधिक.
**बैरागर** – (सं.) वज्राकर, हिऱ्याची खाण.
**बैषणोऐ** – बैठक.
**बैसंदर** – वैश्वानर, आग.
**बोलिधौं** – बोलेन, सांगेन.
**बंचिला** – त्याग केला

बंदि – बंधन.
बंदे – आत्मा, जीव.
बंध – बंधू, भाई.
बंधबरग – बंधुवर्ग.
बांटा – (म.) भाग, हिस्सा.

## [भ]

भइया – झाला.
भरई – भरणे, संग्रह करणे.
भवनपति – भुवनपती.
भाजन – पात्र, भांडे.
भाजै – (म.) भाजणे, जाळणे.
भेसर – म्हैस.
भैचकि – भयभीत होऊन.
भोवै – संसाराचे.

## [म]

मछार – मत्सर.
मनवा – मन.
मनसा – भाव, इच्छा.
मनिषा – मनुष्य.
मसकीन – दीन, विनम्र.
मसीति – (म.) मशीद.
महणारंभ – नाद.
महूरति – मुहूर्त, क्षण.
माइ – पुरेपूर भरणे, मावणार नाही.
माखन – (लोणी) दूध.
मातल – निशेत, मस्त.
मादल – वाद्यविशेष.
माली – माला.
मिटी – माती.
मिलसी – (पं.) मिळेल.
मीतुला – मित्र.
मुक्तिजाई – मुक्त झाला.
मुलमा – मुलामा.
मूनै – (पं.) मला.
मूली – मूल (धन).
मेर – मेरु पहाड.
मेल्हिलै – राखून ठेवलेले.
मैमत – हत्ती.
मो पै – माझ्याद्वारे.
मोषि – मोक्ष.
मौज – शरण, छाया.
मंजारी – मांजर.
मंझा – माझा.
मंझा – (म.) माझा.
मंडी बाजी – व्यापार, सौदा.
मंत्र उपायो – विचारविनिमय केला.
मंत्रावला – (मंत्रावर) श्रेष्ठ मंत्र.
मांही – कोठा.
म्हारो – (राज.) माझा.

## [य]

यारां – दोस्त, मित्र, बंधू, सुहृद.
येतलौं – इतका.
येवढा – (म.) एवढा, इतका.
यौ – येथे, या ठिकाणी, या प्रकारचा.

## [र]

रजबल – राज्यबल, राज्यवैभव.
रहत – रहित, हीन.
राउल – मंदिर.
राग राचेला – रागदारीत रचना केलेला.
रिदै – हृदय.
रैणी – रहाणी, रहाण्याची पद्धत.
रांचिला – अनुरक्त झाला.
रांधिले – शिजविले.
रुंडा – श्रेष्ठ.

## [ल]

लहैला – प्राप्त करीत आहे.
लह्या – प्राप्त केला.
लाडलडै – लाडीगोडी करतो.
लाधौ – प्राप्त केला.
लाहाइणें – प्राप्त करणे.
लीयौ न्हालि – आपलासा केला, संबंध जोडला.
लूण – मीठ.
लेषीला – मोल किंवा किंमत करणे.
लोई – लोक.

**लोकाई** – लोकापवाद, निंदा करणे.
**लोही** – लोहीत, लाल.
**ल्यौ** – एकाग्र ध्यान.

## [व]

**वखसंद** – दाता, मोक्ष देणारा.
**वरणि** – वर्ण, रूप.
**वाद** – वादविवाद, झगडा.
**वादि** – व्यर्थ.
**विगौवैं** – व्यर्थ घालविणे.
**विदंड** – वंदना करोत, स्तुती, प्रणाम करोत.
**विपुरुप** – कुरुप.
**विभौ** – वैभव.
**वंदि** – बंधन.

## [ष]

**षपाये** – समाप्त केले.
**षरी** – सत्य.
**षसम** – नाथ, मालिक.
**षसम** – मालिक, स्वामी, परमेश्वर.
**षाधा** – नष्ट केले.
**षूटि** – उघडी झाली, नष्ट झाली.
**षेइलै** – तयार केले, बनविले.
**षेचर** – पिशाच्च्य बुद्धीचा.
**षेदै** – पाठलाग करणे.
**षौलि** – क्षौर, चंदन लेप.

## [स]

**सकेला** – आवरणे.
**सगल** – सकल.
**सज्यादान** – शय्यादान.
**सति** – सत्य.
**सबैला** – सर्व.
**समंदे** – समुद्र.
**सरजीव** – सजीव.
**सरबे** – सर्व.
**सरबेसर** – सर्वेश्वर, ईश्वर.
**सरबंग** – पूर्ण, सर्व.
**सरापी** – शापित.
**सवारे** – पहाटे, प्रातःकाली.
**सषा** – टौंक.
**सहनक** – थाळी, पात्र, भांडे.
**सहर विसहर** – सर्व ठिकाणी, सर्वत्र.
**सहेटा (सहेत)** – सप्रेम.
**साइर** – सागर.
**साकत** – शाक्त.
**सार** – उपाय.
**सार** – सत्य.
**सारीषा** – सर्वदा.
**सारं** – प्रिय, सारखा, सदृश्य.
**सावलीऊ** – सावळी.
**सिहजा** – सेज, शय्या, अंथरुण.
**सीया** – शिवून ठेवले आहे.
**सीवत** – शिवीत असता.
**सीवना** – शिवण काम.
**सुरवाल** – विष्णू, देवांमध्ये श्रेष्ठ.
**सुचधारी** – सूत्रधार, संचालक, मालक.
**सुनि** – शून्य.
**सुपनी** – स्वप्न.
**सुरता** – श्रोता.
**सुरति** – ध्यान.
**सुरही** – गाय, सुरभी.
**सुष** – शुक.
**सुन्ने** – सोने.
**सुमृत** – स्मृती.
**सूकड़ि** – (म.) सुगड, मातीचे एक भांडे.
**सोइन** – सोन्याची.
**सोई** – ते (परब्रह्म).
**सोवनी** – सोन्याची.
**संबर** – शंभर वेळा.
**संभारु** – स्मरण करून.
**संभारे** – स्मरण करीत.
**संष** – मूर्ख.
**सांकडे** – बंधन.
**सांडी** – सांडणीस्वार.
**सिचना** – ससाण.
**स्यंघ** – सिंह, शेर, वाघ.
**स्यभूदेव** – स्यंभूदेव.
**स्वामा** – स्वामी.

## [ह]

**हमची** – आमची.
**हमची** – (म.) आमची.
**हमप** – अहंभाव.
**हमिता** – अहंभाव.
**हरिकारी** – औषध.
**हरिबकसिव** – हिरण्यकश्यप.
**हिरनगर्भ** – हिरण्यगर्भ, सोने.
**हेतारथ** – उद्दिष्ट, अर्थ.
**हेरों** – हेरणे, निरीक्षण करणे.
**है गै** – (हयगय) हत्ती-घोडे.
**होसी** – (पं.) होतो.
**हिंगलु** – हिंग.

• • •

अनुक्रमणिका

## शुद्धिपत्र

| क्रमांक | पृष्ठ | चुकीचे | बरोबर |
|---|---|---|---|
| १ | ५ | बालक्रीडा विभाग १ | 'बालक्रीडा' असे वाचावे. |
| २ | २९ | बालक्रीडा विभाग २ | हे पृष्ठ रद्द समजावे. |
| ३ | ५९ | बालक्रीडा विभाग ३ | हे पृष्ठ रद्द समजावे. |
| ४ | २४७ | गंगामाहात्म्य | हे पृष्ठ रद्द समजावे. |
| ५ | २८१ | नाममहिमा | हे पृष्ठ रद्द समजावे. |
| ६ | ४२० | तव (अभंग १०११) | तंव. |
| ७ | ५८९ | अभंग १४४६ | रद्द समजावा, कारण ८६४ शी साम्य. |
| ८ | ५८९ | अभंग १४४७ | रद्द समजावा, कारण ४२९ शी साम्य. |
| ९ | ६०५ | अभंग १५०२ | रद्द समजावा, कारण १४७६ शी साम्य. |
| १० | ६३९ | अभंग १६२४ | रद्द समजावा, कारण १४२९ शी साम्य. |
| ११ | ६८३ | अभंग १७५७ | रद्द समजावा, कारण ३२१ शी साम्य. |
| १२ | ७३९ | अभंग १९३३ | रद्द समजावा, कारण ६६७ शी साम्य. |
| १३ | ७६५ | हिडों (अभंग २०१७) | हिंडों. |
| १४ | ७७३ | अभंग २०४४ | रद्द समजावा, कारण ४९४ शी साम्य. |
| १५ | ७८८ | अभंग २०७२ | रद्द समजावा, कारण १२४१ शी साम्य. |
| १६ | ९०२ | उदमाचा (अभंग ८४) | उदीमाचा. |

एन ४२४७—७७

| क्रमांक | पृष्ठ | चुकीचे | बरोबर |
|---|---|---|---|
| १७ | ९१८ | दुरुस्त (अभंग १४४) | दुस्तर. |
| १८ | ९२२ | शिणंभाग (अभंग १५४) | शिणभाग. |
| १९ | ९२३ | ऐसें (अभंग १५७) | ऐसे. |
| २० | ९४२ | अभंग २३७ | रद्द समजावा. |
| २१ | ९४२ | अभंग २३९ | रद्द समजावा. |
| २२ | ९५० | धरा (अभंग २७२) | घरा. |



